

# श्रीमद्भगवद्गीता

## भाग चवथा

## उपसंहार


संपादक

चिंतामण गंगाधर भानु.



प्रकाशक

भट आणि मंडळी. बुधवार, पुणें शहर.

मुद्रक

बाळकृष्ण विष्णु साठे

पुणें, 'यशवंत' प्रेस.

आवृत्ति दुसरी.

सन १९१०

अनेक सद्गृहस्थकृत ग्रंथांच्या अवलोकनानें, अनेक
वेदांती सद्गृहस्थांच्या उपदेशानें व अनेक आश्रय-
दात्यांच्या प्रोत्साहनानें पुढील ग्रंथाची प्रेरणा
झाली आहे. माझें असें ह्यांत फारच थोडें
आहे. तेव्हां या सर्वांचे मनःपूर्वक नम्र-
तेनें आभार मानून व जगन्नियंत्या
परमेश्वराला शरण जाऊन हा
उपसंहार भाविक वाचकांस
अर्पण करितों.

# शेवटचे दोन शब्द.

श्रीमद्भगवंताच्या कृपेने व वाचकांच्या अनुग्रहानें मला गीतारूपी नंदनवनांत जो यथेच्छ विहार करण्याला अवसर मिळाला, त्या या अल्पावधींत माझ्या अल्पमतीला कांहीं दुर्लभ फळें अधिगत झालीं; तीं फळें मी मोठ्या प्रेमानें वाचकांस व परमभक्तीनें श्रीपरमेश्वरास समर्पण केलीं आहेत. गीतेचें तात्पर्य अगदीं थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, निष्काम आणि निरभिमान विहित कर्म व अधिकारानुसार प्राप्त झालेलें कर्तव्य विश्वज्ञानासह आत्मज्ञानपूर्वक समजून घेऊन एकाग्रचित्तानें व पराभक्तीनें परमेश्वराप्रीत्यर्थ तें आपलें कर्तव्य ईश्वरी प्रेरणा म्हणून करावयाचें; आणि तें परमेश्वराच्या पदकमलीं मोठ्या आनंदानें समर्पण करावयाचें; आणि परमेश्वरी अंतःस्वरूप व आपलें आत्मस्वरूप एकच आहे असें अखंडध्यानात्मक योगानें समजून घेऊन पराप्रकृतीच्या पलीकडील व पराप्रकृतीस आधारभूत असणाऱ्या व त्यास सत्ता देणाऱ्या अद्वैतज्ञानानंदामध्यें सहजस्थितीनें-तटस्थपणानें-राहावयाचें आणि प्राप्तकर्तव्य म्हणून सर्वत्र प्रेमसंचार होईल असें निरभिमानपूर्वक निष्काम आचरण ठेवावयाचें, हें मला स्वीकारतां आलेलें सार होय. हें सार मीं यथाशक्ति उत्सुक वाचकांच्या पुढें प्रेमानें ओगरिलें आहे. श्रीपरमेश्वरकृपेनें हें सार माझ्या आश्रयदात्यांची आत्मैक्यतृष्णा अल्पशी तरी शमविण्याचें श्रेय घेवो, त्यांस परमेश्वरी मार्गक्रमण सुसह होवो, त्या पारमार्थिक पंथांत सर्व विश्वभर हें प्रेमरसाचें, ज्ञानसागराचें, ब्रह्मरसाचें, दिव्य रसायन पथ्यकर होवो, व या पोषक औषधीनें त्यांचा उद्धार, सामाजिक उद्धार, राष्ट्रीय उन्नति व विश्वोत्क्रांति परमेश्वरी संकल्पाप्रमाणें घडवून आणण्याचें ज्ञानबळ व नीतिसामर्थ्य माझ्या सर्व आर्यबंधूंस येवो, अशी त्या विश्ववंद्य प्रभूस सप्रेम व भक्तिपुरःसर प्रार्थना करून आज त्या विश्वपूज्य दिव्य ग्रंथाची मोठ्या कष्टानें ताडातोड करून घेतो; व हा विरह श्रीपरमेश्वराच्या चरणीं 'तत्सतब्रह्मार्पणमस्तु' म्हणून समर्पण करितों.

त्या अखिलशास्त्रवंद्य ग्रंथाच्या निःसीम पारायणानें तरी आमचा सर्वथा धर्मकर्मशून्य झालेला व ज्ञानवियुक्त असलेला हीनदीन आर्यदेश उन्नतीच्या मार्गाला राजमान्य पद्धतीनें लागून इतर देशांचा उद्धार करण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेवो, अशी त्या महायोजक प्रभूची दीनवाणीनें प्रार्थना करून मी आपली लेखणी सध्यां तरी खालीं ठेवितों.

ॐ शांतिः शांतिः शांतिः ।

पुणें, शनवारपेठ मेहुणपुरा. }
१८२७ }

चिंतामण गंगाधर भानु.

॥ श्रीगजानन प्रसन्न ॥

# प्रस्तावना.

---

## दुसरी आवृत्ती.

ह्या आवृत्तींत विषयांची मांडामांड निराळी करून विचारस्पष्टता विशेष व्हावी ह्या हेतूनें प्रयत्न केला आहे. अद्वैताच्या समजुतीप्रीत्यर्थ कांहीं मजकूर नवीन घातला आहे.

रा. भट आणि मंडळी, तसेंच 'यशवंत' छापखान्यांतील मंडळी यांनीं या आवृत्तीचे वेळीं हरएक प्रकारची व विशेषतः प्रुफें तपासण्याची मदत केली यास्तव मी वरील मंडळीचा आभारी आहे.

**टीपः**—तिसऱ्या भागाचें चित्र अठराव्या अध्यायाचे आरंभीं घातलें आहे.

पुणें सदाशिवपेठ.<br>२५ एप्रील १९१० } चिंतामण गंगाधर भानु.




# उपसंहार

## भाग पहिला.

### तत्त्वज्ञानाची व्याप्ति. (ब्रह्मज्ञानाची व्याप्ति).

'गीताशास्त्र' हा ग्रंथ तत्त्वविषयक आहे अगर इतर कांहीं आहे, हे निश्चित करण्यासाठीं तत्त्वज्ञान म्हणजे काय व त्याची व्याप्ति केवढी आहे या प्रश्नांचा विचार करणें अवश्य आहे. हा विचार यथास्थित झाल्यास 'गीताशास्त्राचें' महत्व आपल्यास कळून येईल व तो तत्त्वविषयक ग्रंथ आहे किंवा नाहीं, याचाही निर्णय होईल.

### तत्त्वज्ञान म्हणजे काय?

तत्त्वज्ञानाचें, ज्ञानविज्ञानाचें लक्षण काय हें पहिल्याप्रथम ठरविलें पाहिजे. आतां आपण तत्त्वज्ञानाचें जे लक्षण करूं तें स्पष्ट (स्वच्छ), सार्थ आणि होतां होईल तितकें रुढीस अनुसरून असलें पाहिजे. उघडच आहे कीं, आपण जे लक्षण बांधूं किंवा ज्याचा आपण स्वीकार करूं ते स्वरूपतः स्पष्ट अथवा स्वच्छ असलें पाहिजे; म्हणजे (१) या लक्षणानें ज्या वस्तूचा आपल्यास निर्देश करावयाचा आहे ती वस्तु स्पष्ट झाली पाहिजे; तसेंच (२) आपल्या लक्षणानें लक्षीत अशी वस्तु **असली पाहिजे**; आणि (३) आजपर्यंत येथें आणि अन्यत्र जे तत्त्वज्ञ अथवा ब्रह्मज्ञ (ब्रह्मवादी) झाले त्यांनीं जीं लक्षणें बांधिलीं आहेत, त्या लक्षणांस फारसें सोडून जाणारें असें आपलें लक्षण नसलें पाहिजे. तसेंच या लक्षणानें तत्त्ववस्तूमध्यें (ब्रह्मवस्तूमध्यें) व इतर वस्तूंमध्यें असणारे विशेष स्पष्ट झाले पाहिजेत. उदाहरणार्थ, गीताग्रंथास 'शास्त्र' ही संज्ञा देण्याचा प्रघात आहे तो यथार्थ आहे कीं नाहीं हेही पाहिलें पाहिजे. तसेंच 'नीतितत्त्वें' 'अध्यात्मतत्त्वें' इत्यादि शब्दांचा अर्थ काय हेंही समजून घेतलें पाहिजे.

कोणतेंही शास्त्र घ्या, तें एकदेशी असतें म्हणजे ज्ञानमंदिराच्या एका परिछिन्न भागाचें ज्ञान त्या शास्त्रानें होतें. ज्योतिःशास्त्र, भूगर्भशास्त्र, रसायनशास्त्र, मानसशास्त्र, जीव-

नशास्त्र, व्याकरणशास्त्र, छंदःशास्त्र, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, समाजशास्त्र, धर्मशास्त्र, इत्यादि.. अनेक–अनंत म्हटलें तरी चालेल–शास्त्रें आपापल्या परीनें ब्रह्मवस्तूचा एकदेशी किंवा एक भागाचा अभ्यास करून प्रत्येकशः विवक्षित सिद्धांत सांगतात. हे सिद्धांत न्यायघटित व व्यवस्थित असतात हें खरें, पण काय? सारा एकदेशी अथवा परिछिन्न व्यापार! गणितशास्त्र वस्तूंची संख्या सांगेल पण वस्तूचे इतर गुणधर्म सांगणार नाहीं. त्याचप्रमाणें रसायनशास्त्र वस्तूचे रासायनिक धर्म मात्र सांगेल, पण संख्येसंबंधानें स्तब्ध राहील! असेंच प्रत्येक शास्त्रासंबंधें म्हणावें लागतें. तात्पर्य वस्तूच्या **एका भागांतील सामान्य गुणधर्मांचा निर्देश मात्र 'शास्त्र' शब्दानें होतो**; पण तत्त्वज्ञानाची गोष्ट तशी नाहीं. येथें ब्रह्मवस्तूच्या सर्व ज्ञानाचा अंतर्भाव होतो. ब्रह्मज्ञ पुरुष सर्वज्ञ होतो, इतकेंच नव्हे, तर 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' (ब्रह्मज्ञ पुरुष ब्रह्मच होतो) असा उपनिषदादि अपौरुषेय ग्रंथांचा डिंडिम आज हजारों वर्षें सारखा वाजत राहिला आहे. तत्त्वज्ञानाचा विषय म्हणजे ज्ञानाचें एकीकरण हा होय. 'एकविज्ञानेन सर्वं विज्ञातं भवति' हें तें एकीकरण होय. 'एक जाणलें म्हणजे सर्वांचें ज्ञान होतें' अशी ब्रह्मज्ञानाची सार्थ प्रतिज्ञा आहे. शास्त्र म्हणजे एकदेशी ज्ञान आणि ब्रह्मज्ञान म्हणजे वस्तूचें सर्व ज्ञानविज्ञान, असा दोहोंमध्यें विशेष आहे. शास्त्रामध्यें सामान्यतः दृश्य वस्तूचे नामरूपात्मक गुणधर्मांची मिमांसा असून ज्ञानैकदेशाचे सिद्धांत प्रथित होतात व ब्रह्मज्ञानामध्यें 'नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त अशी व सर्व शास्त्रविषयाचें अधिष्ठान असणारी जी केवळ वस्तू तिच्या स्वरूपवर्णनात्मक सिद्धांताचें प्रणयन केलेलें असतें. सारांश, एकदेशी सिद्धांत करावयाचा असल्यास नियमित भागाचें अथवा स्वरूपाचें सामान्य स्वरूपानें प्रणयन करणारीं जीं शास्त्रें त्यांचा आश्रय केला पाहिजे. हे एकदेशी सिद्धांत होत. पण या सर्व एकदेशी सिद्धांतांस म्हणजे शास्त्रांस एकस्वरूप देणारें जें शास्त्र त्याला ब्रह्मज्ञान म्हणावें. पहा कीं सर्व गतागतांचा गुरुत्वाकर्षणानें उलगडा करणारें गतिशास्त्र घ्या किंवा अनेकविध रूपांचा उलगडा करणारीं रसायनादि शास्त्रें घ्या या सर्वांस ही सायुज्यता, अथवा त्याही पलीकडची तादात्म्यमुक्ति (एकरसात्मकता) देणारें जें शास्त्र तें ब्रह्मज्ञान होय. या ब्रह्मज्ञानात केवळ 'केवल वस्तूचा–ब्रह्माचा' (Absolute) च विचार होतो असें नाही, तर ब्रह्माधिष्ठानावर जीवांच्या अपूर्ण ज्ञानानें उत्पन्न झालेली जी माया आणि तदंगभूत अनंत विश्वें व त्यांतील पदार्थ यांचाही शास्त्रानुषंगानें विचार होतो. अन्वयबोधानें सर्वच ब्रह्म आहे असें जें ब्रह्मज्ञान सांगतें तेंच ब्रह्मज्ञान व्यतिरेकानें ब्रह्मभेद दाखवून पुनः पदार्थमात्रांतील दिसणाऱ्या भेदांचाही शास्त्रांच्या सहाय्यानें विचार करितें.

आतां दृश्य वस्तूंच्या पलीकडे असणारी, दृश्याला सत्ता देणारी व तिला अंतर्बाह्य व्यापून तिचें नियमन करणारी जी 'ब्रह्मवस्तू' ती अज्ञेय, व अगम्य आहे असें स्पेन्सरादि साहेबच म्हणतात असें नाहीं; सर्व समंजस आस्तिक पंडित व प्रत्यक्ष उपनिषदेंही असेंच सांगत आलीं आहेत कीं, 'ब्रह्म ही केवल वस्तु' अतर्क्य, अगम्य अशीच

आहे. पण स्पेन्सरादि 'अज्ञेय वाद्यांस,' बौद्धांस, ख्रिस्त, महंमद इत्यादि पैगंबरांच्या अनुयायांस, आमच्या येथील श्रीवल्लभाचार्य, श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य, जैन, लिंगायत इत्यादि आस्तिक परंतु द्वैतवाद्यांस व त्यांच्या अनुयायांस जी गोष्ट समजणें त्यांच्या त्यांच्या दर्शनांमुळें (धार्मिकपंथांतील तात्विक ग्रंथांनीं) शक्य झालें नाहीं, ती गोष्ट अद्वैतमतप्रस्थापक जे श्रुतिसिद्धांतवादी श्रीमच्छंकराचार्य, व त्यांचे खरे अनुयायी यांस समजणें शक्य झालें आहे. कर्म, उपासना व राजयोग यांच्या द्वारानें चित्तशुद्धि करून घेऊन पराभक्तीचा उत्कर्ष जो मुमुक्षु करितो, त्याला श्रुतिद्वारा आत्मस्वरूप व परमात्मस्वरूप हीं एकच आहेत, असें ठाम व निःसंशय ज्ञान होऊन तो 'केवलवस्तु' पाहण्याला नव्हे तर 'ती वस्तु मीच होतों, मीच आहें व मीच असेन' असें समजण्याला व अनुभव घेण्याला समर्थ होतो. अशा पुरुषाला 'केवलवस्तु' ज्ञेय आहे. आणि अशा पुरुषांचे—नित्य असणाऱ्या एकस्वरूपी परमेश्वराचे—उद्गार म्हणजेच उपनिषदें व गीता होत; अथवा ब्रह्मज्ञानाचे (Philosophy) हे ग्रंथ होत. सारांश, इतर वादी म्हणतात त्याप्रमाणें ब्रह्म अज्ञेय नाहीं; 'ब्रह्म' ज्ञेय आहे; तसेंच ज्या स्वरूपांचा व भागांचा शास्त्रें विचार करितात, तीं स्वरूपें सर्वथा (अंतर्बाह्य) सद्रूप नाहींत, हें खरें; तरी पण ब्रह्मवस्तूवर जीवशिवांच्या अपूर्ण ज्ञानामुळें अध्यारोपद्वारां सिद्ध झालेल्या दृश्यवस्तूंची **मायेची तरी, निदान सत्ता आहेच.** तेव्हां सत्तेचा विचार करणारे ब्रह्मज्ञानग्रंथांस या **व्यावहारिक सत्तेचा** विचार तरी केलाच पाहिजे. नामरूपात्मक जगत् **भासत** आहे म्हणून **आहे** असें जीवमात्रास वाटतें, निश्चयशः वाटतें; तेव्हां ज्ञानसर्वस्व देणारा जो ब्रह्मविचार, त्यानें दृश्याचा विचार केलाच पाहिजे. तसेंच **सामान्याच्या** विचाराबरोबर **विशेषांचाही** विचार झाला पाहिजे. म्हणजे लंबकाचें वर्तुलाकार आंदोलन, (घड्याळांतील आंदोलकांचे वर्तुलांत फिरणें) पदार्थांचें लंबरेखांकित पतन, (पदार्थांचें सरळ रेघेंत खालीं पडणें) ग्रहांचें लंबवर्तुल परिभ्रमण, लंबवर्तुल (Ellipse). इत्यादि सर्व गतींच्या **साम्यांवरून** गुरुत्वाकर्षणाचा नियम निघाला हें खरें; पण लंबक वर्तुलाकृतीच कां फिरतो, धोंडा सरळ रेघेंतच कां पडतो व मंगलादि ग्रहें लंबवर्तुलांत कां फिरतात याचें उत्तर जेव्हां तत्वज्ञानाचे नियम सांगतील, तेव्हांच त्या नियमाला ब्रह्मस्वरूप येतें.

याप्रमाणें येथपर्यंत ब्रह्मज्ञान म्हणजे निरनिराळ्या शास्त्रांच्या सिद्धांतास एकरस करणारें व **विशेषांचें स्पष्टीकरण** करणारें **ज्ञान** होय, असा विचार सांगितला. आतां आणखी एक गोष्ट घेऊन ब्रह्मज्ञानाचें (Philosophy) लक्षण पूर्ण होतें का पाहूं या. मागें सांगितलेंच कीं, व्यवहारगत दृश्याच्या एकदेशीय अस्तित्वासंबंधानें व गुणधर्मसंबंधानें जे सिद्धांत कार्यकारणशः अथवा साहचर्यज्ञानानें आपण बांधितों त्यांस शास्त्र असें म्हणावें; म्हणजे शास्त्रामध्यें कार्यकारणांचा (sequences) व साहचर्यसंबंधांचा (Co-existency) विचार व्यवस्थित पद्धतीनें केला असतो. या अनेक शास्त्रांचें एकीकरण म्हणजे तत्त्वज्ञान होय. पण एवढ्यानें ब्रह्माची—ज्ञानसर्वस्वाची पूर्णता होत नाहीं. व्यवहारांत-

व्यवहाराच्या राज्यांत-'काय आहे!' इतक्याचाच शोध करून चालत नाहीं. 'कसें असावें?' याचाही विचारपूर्वक शोध व शोधपूर्वक विचार केला पाहिजे. 'मी कामक्रोधशून्य होऊन पापविन्मुख कसा होईन' असा अर्जुनाचा प्रश्नच सांगतो की 'कसें असावें, काय असावें!' हें ठरवून ठेविल्याशिवाय गीताज्ञानाला पूर्णत्व येत नाहीं. ज्ञान, तत्त्वज्ञान, ब्रह्मज्ञान ह्मटलें कीं त्यांत अस्तित्वाचा विचार येतो, त्याचप्रमाणें अस्तुंत्वाचा-पुरुषार्थांचा-विचार आलाच पाहिजे. या अस्तुत्वविद्येंत नीति, शासनपद्धति, न्यायपद्धति व धर्मपद्धति या पद्धतींचा व मानवी प्रयत्नाच्या सर्व शास्त्रांचा म्हणजे सर्व कलांचा अंतर्भाव होतो. ब्रह्मज्ञानामध्ये येणाऱ्या ज्या दोन बाजू त्या ह्याच होत. अथवा ब्रह्मज्ञानाची-ज्ञानस्वरूपाची-पहिली दोन अपत्यें म्हणजे व्यवहारांतल्या भाषेंत आपण बोलतों आहोंत-(१) अस्तिप्रधानज्ञानशास्त्रे (sciences) (२) अस्तुप्रधानपुरुषार्थ (arts) हीं दोन अपत्यें आहेत. या परस्परांचा अंतर्गत संबंध पाहिला असतां ब्रह्मज्ञानाचें स्वरूप थोडेसें कळेल. विश्वाकडे किंवा आपल्यास पुष्कळ रीतीनें इंद्रियगोचर होणाऱ्या जगताकडे, ज्या ज्या दृष्टीनें आपण पाहूं तितकीं शास्त्रें प्रकट होतात; त्यांत भौतिक, मानसिक वआत्मिक असे भेद होतात. तसेंच विश्व जाल्या सुंदर व रमणीय आहे खरें; पण जीवांचा-विशेषतः मानवी प्राण्यांचा प्रयत्न-तें जास्त सुंदर, सोयिकर आणि सुखकर करण्याचा-विचारपूर्वक व विवेकशः अखंडत्वानें चालला आहे. नैसर्गिक नियमांचें (शास्त्रांचें) आकलन करून घेऊन त्यांच्याद्वारां श्रीपरमेश्वरी स्वरूपाकडे विश्वास व प्राण्यांस कसें नेतां येईल, हा त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळणारा प्रश्न आहे. सर्व कला, सर्व नीति-शासन, न्याय-धर्म-पद्धति या सर्वांची दिशा एकच आहे. कमी अधिक प्रमाणानें सर्व विचारी पुरुषही त्या सत्यज्ञानसौंदर्यसागर परमेश्वराकडे जात आहेत. आतां परमेश्वरी स्वरूप कसें आहे, हें ठरविणें पुरुषार्थविद्येचें काम आहे, तसेंच शास्त्रांचें अन्यदृष्टीनेंही तेंच काम आहे. सारांश, व्यवहारांत व परमार्थांत 'वस्तुस्थिति काय आहे' आणि 'वस्तुस्थिति परमार्थतः व व्यवहारांत कशी असावी?' या दोहोंचा म्हणजे सर्व शास्त्रें व सर्व कला, सर्व नीति, सर्व धर्म, यांत अंतर्गत होणारे जे अंत्यसिद्धांत, त्यांची एकवाक्यता करून सर्व सिद्धांतांचा अंतर्भाव व त्याचें नियमन करणारें जें ज्ञानविज्ञान त्याला तत्त्वज्ञान, ब्रह्मज्ञान असें ह्मणावें. गीतेंतही असेंच सांगितलें आहे. 'यो मां पश्यति सर्वत्र सर्वंच मयि पश्यति' (अ० ६ श्लोक ३०) हा शास्त्रविचार व 'सर्व कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' [अ० ४ श्लोक ३३] हा कर्माला ब्रह्मस्वरूप देण्याचा पुरुषार्थविचार, या दोहोंस एकरसता प्राप्त होते. तेव्हां ब्रह्मविचार पूर्ण होतो, असें येथें सांगितलें आहे. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' [एकच असून त्याला एकदेशी शास्त्री व एकदेशी पुरुषार्थी भिन्न भिन्न नामांनीं आळवितात] असा श्रुतीचा अभिप्राय आहे. एवंच अस्ति [Science] व 'अस्तु [Art, Ethics, Politics and jurisprudence] 'पुरुषार्थ' यांस एकरसता देऊन सर्वांचे नियमन करणारें जें ज्ञान त्याला ब्रह्मज्ञान ह्मणावें, असा उपनिषदांचा, गीतेचा, व अलीकडील तत्त्वज्ञ पंडितांचा अभिप्राय आहे. 'शास्त्र' हा शब्द

मुद्दा 'अस्ति' दर्शक आहे. व 'विधि' प्रेरक आहे. कोणतेंही शास्त्र घेतलें तरी त्यांत वस्तुस्थिति कशी आहे व आपण वागावें कसें, याचा विचार शास्त्र करितें; हें आम्हांला तरी लोकांस सांगावयास नकोच आहे. हा एकच 'शास्त्र' शब्द 'ब्रह्मज्ञानांत सांख्य व योग या उभयतांचा समावेश होतो' असें दाखवितो.

आतां हा प्रकार श्रीमद्भगवद्गीतेंत कसा झाला आहे तो पाहूं. परब्रह्माचें प्रकट स्वरूप जो सगुण परमेश्वर, याचें स्वरूप सांगतांना सातव्या अध्यायांत 'भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धि रेवच। अहंकार इतीयं-मे भिन्ना प्रकृतिरष्टधा' [अ० ७ श्लोक ४] असें सांगून स्थूल सूक्ष्म पंचमहाभूतें व मन, बुद्धि व अहंकार हीं सर्व माझीं भिन्न स्वरूपें आहेत हा आधिभौतिक (Material जड) वस्तूंसंबंधीं शास्त्रांचा एक भाग ठरवला व पुनः 'जीवभूतां अन्यां परां प्रकृति विद्धि, यया इदं जगत् धार्यते' (अ० ७ श्लोक ५) असा चर, चेतन स्वरूपाचा (Force) दुसरा भाग सांगून आधिभौतिक शास्त्रांची परिसमाप्ति केली. ध्यानांत ठेवावयाचें हे कीं श्रीपरमेश्वराच्या सिद्धांताप्रमाणें केवळ पंचमहाभूतेंच जड आहेत असें नव्हे, तर इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार (Senses, Mind, Intellect, and Consciousness of Individual Self) ह्या सर्वांचाही जडांतच अंतर्भाव होतो! ह्याचप्रमाणें ज्याला चरात्मक वस्तु (Force) असें वर म्हटलें आहे, ती वस्तु जडाशीं नित्यसाहचर्यानें राहून ब्रह्मसत्तेनें सृष्टिस्थितिप्रलयांस कारण होते. ह्या चरात्मक वस्तूमध्यें केवळ संकर्षणविकर्षणांचाच (Attraction and Repulsion) मात्र अंतर्भाव होतो, असें नाहीं; तर सर्व शक्तींचा, मग ती गत्यात्मक, रसायनिक अथवा प्राणमूलक असो, या सर्वांचा अंतर्भाव होतो. काल, कार्यकारणसंबंध, साहचर्यसंबंध, (Coexistences) हे बुद्धीचे विलास आहेत व इच्छा, वासना, श्रद्धा इत्यादि मनोविकार, हेही बुद्धीचेच विलास आहेत, म्हणून त्यांचा अंतर्भाव बुद्धींत झाला. इच्छा, वासना, श्रद्धा, भक्ति यांच्या द्वारानें देहप्रीति, कुटुंबप्रेम, राजनिष्ठा, राष्ट्राभिमान, धर्मजागृति, मुमुक्षा इत्यादि आधिदैविक शास्त्रें निर्माण करून त्यांस एकरसत्त्व देणारी श्रद्धा या नांवाची वृत्ति बुद्धींतच आहे. एवंच सर्व आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक वस्तूंचा म्हणजे तद्गत शास्त्रांचा येथें अंतर्भाव झाला. पुढें आठ ते बारा श्लोकांत या सर्वांस एकरसात्मकता कशी येते तें समजून देणाऱ्या तत्त्वज्ञानाचा, ब्रह्मज्ञानाचा संक्षिप्त विचार झाला. असाच प्रकार आठव्याच्या प्रथमारंभीं, तेराव्या अध्यायांत व पंधराव्यांत केला आहे. ह्याचप्रमाणें युक्ताहारविहारादि शरीररक्षणाच्या सात्त्विक नीतीपासून तों—'यज्ञोदानं तपः कर्म' इत्यादि श्रेष्ठ नीतितत्त्वें घेऊन पुनः--देवादिकांस द्यावे लागणाऱ्या हविर्भागांच्या (यांतच राजास द्यावे लागणाऱ्या करांचा समावेश करून घ्यावयाचा) व लोकसंग्रहाच्या (यांत तर धार्मिक व राजकीय कर्तव्यांचा अंतर्भाव होतोच आहे) सिद्धांतापर्यंत सामान्यतः सर्व पुरुषार्थांचा विचार केला आहे. Duty (कर्तव्यकर्म) गीतेंत नाहीं;

असें कित्येक पंडितांस वाटतें त्यांनीं प्रत्येक अध्याय काळजीपूर्वक वाचावा म्हणजे अधिकारानुरूप कर्तव्यें सांगितलीं आहेत, असें त्यांच्या प्रत्ययास येईल. 'तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर' अशा सारखी हवीं तितकीं विधिपर वाक्यें सांपडतील. कार्य, कर्म तें कोणतें? असा प्रश्न असेल तर 'स्वधर्ममपिचावेक्ष्य, स्वधर्मे निधनं श्रेयः, श्रेयान् स्वधर्मः' इत्यादि कार्यकर्ममीमांसक वाक्यें पहावीं. पुनः स्वधर्म कोणता? असा संदेह येईल, तन्निवारणार्थ गुणकर्मविभागानें निष्पन्न होणाऱ्या वर्णांच्या धर्मांचीं लक्षणें 'शमोदमस्तपश्चैव' इ० अठराव्या अध्यायांतील बेचाळीस ते शेचाळीस श्लोकांत सांगितलीं आहेत, तीं पहावीं. शिवाय सात्त्विक कर्मापासून उत्पन्न होणारीं फळें संन्यस्त करावीं व कर्तृत्वाचा अभिमान टाकावा, हे सर्वसामान्य विधि अनेक प्रसंगीं सांगितले आहेतच. ह्याचप्रमाणें कित्येक महापंडित असें ह्मणतात कीं, गीता हा ग्रंथ केवळ नीतिपरच आहे; तें ह्मणणें नीतीमध्यें ब्रह्मज्ञानविज्ञानाचा अंतर्भाव केला, नीति शब्दाचा अर्थ, 'शास्त्रें व पुरुषार्थ, यांचे सिद्धांत एकरसात्मक करणारें तत्त्वज्ञानविज्ञान होय' असा हेगेल साहेबांच्या मतानुसार केला, तर मात्र बरोबर आहे. पण नीति म्हणजे 'मनुष्यप्राण्यांचा परस्पर ऐहिक व्यवहार नियमित करणारें विधिशास्त्र' असा जो प्रचलित अर्थ आहे तो कायम ठेविला तर 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' येथपासून सांगितलेलें ब्रह्मज्ञान, चवथ्यांतील यज्ञमीमांसा, सहाव्यांतील योगाभ्यास, द्वितीय षडध्यायांत निरूपिलेलें ब्रह्मस्वरूप, तेराव्यांतील ज्ञानज्ञेयविस्तार, चवध्यांतील व चवदाव्यांतील विश्वोत्पत्ति इत्यादि व्यर्थ होतील. सारांश गीतेमध्यें नीति नाहीं असें नाहीं तरी पण नीति मात्र आहे असेंही नाहीं. गीता हें "अठरा धान्यांचें कोडबोळें आहे, त्यांत असंबद्ध प्रलाप, विसंगतपणा, विषयांतरें आहेत," असें म्हणणारे सद्गृहस्थ एक दिशेनें मात्र ह्या तत्त्वज्ञापक ग्रंथाकडे पाहतात. म्हणून अशीं विधानें करण्याची बुद्धि त्यांस होते. सर्व शास्त्रांचा, सर्व पुरुषार्थांचा विचार संक्षिप्त अगर विस्तृत रीतीनें करावा लागला म्हणून 'विसंवादी दिसणारीं वाक्यें येथें आहेत असें प्रथमदर्शनीं वाटतें.' पण श्रुति, युक्ति व अनुभवानें सिद्ध असलेला जो केवलाद्वैत सिद्धांत म्हणजे ब्रह्मज्ञान हें प्राप्त करून घेण्याला आधिभौतिकादिशास्त्रांची, त्याचप्रमाणें कर्म, नीति, धर्म इत्यादिकांची आवश्यकता आहे, असें एकदां समजून घेतलें, व अधिकारानुरूप उपदेश करावा लागतो, हें या शिक्षणपद्धतीचें व्यावहारिक तत्त्व लक्ष्यांत ठेविलें म्हणजे अठरा अध्यायरूप दुव्यांनीं घडलेली गीतारूपी तत्त्वज्ञानबोधक माला बरोबर संघटित झाली आहे, असेंच दिसेल व अनुभवास येईल.

असो; आतां सर्व शास्त्रांचे व पुरुषार्थांचे सिद्धांत घेऊन व ते एकरसात्मक अद्वैतशृंखलेनें बद्ध आहेत असें दाखवून, पुनः तोच पंथ या गीतेंतही स्वीकारला आहे, हें सिद्ध करणें मोठी मौज आहे; पण ह्या प्रचंड उद्यमाला जीं साधनें आज अवश्यमेव हस्तगत हवीं आहेत, त्यांचा अभाव असल्यामुळें सद्यः प्रसंगीं हा विषय एकीकडे ठेवून दुसऱ्या साध्या व सोप्या विषयाकडे वळतों. पहिल्या षडाध्यायींत 'त्वं' पदार्थाचें आविष्करण आहे, हें

अनेक वेळां निरूपिलेंच आहे. आतां पहिला अध्याय तर ऐतिहासिक व विषादपर्यवसायी आहे. दुसरा अध्याय सांख्ययोगात्मक आहे. सांख्ययोगात्मक म्हणजे काय? सांख्य म्हणजे ज्ञान, अद्वैतज्ञान, होय. या ज्ञानाच्या साहाय्यानें ब्रह्मांत लीन होऊन जाण्याचा मार्ग आत्मस्वरूपाप्रमाणेंच येथें सांगितला आहे, म्हणून या अध्यायाला सांख्ययोग असें नांव दिलें. श्लोक ११ ते श्लोक ३८ पर्यंत सांख्यज्ञान सांगितलें. त्यांतही श्लोक २५ पर्यंत शुद्ध आत्मस्वरूपाचें आविष्करण वाणीला जितकें शक्य आहे, तितकें केलें आहे. आत्मा ही वस्तु नित्य आहे, निर्विकार आहे, वस्तु आहे, सर्वव्यापी आहे, अप्रमेय आहे, सनातन आहे, एकरसात्मक आहे, इंद्रियादिकांस अगोचर आहे, इ० प्रकारचें स्वरूप सांगून नित्य आत्मवस्तु विषयींचा शोक करणें योग्य नव्हे, असें अर्जुनास सांगितलें आहे. हें मुख्य तत्त्वज्ञान किंवा ब्रह्मज्ञान होय. एकरसात्मक घनदाट ओतप्रोत भरलेली आत्मवस्तु निर्विकार आहे, कालस्थलातीत आहे, कार्यकारणशून्य आहे, उपाधिजन्य इंद्रियादिकांस अगोचर आहे, इत्यादि भगवंतांनी केलेला विस्तार पुनः सांगण्याची आवश्यकता नाहीं. यच्चयावत् विश्वामध्यें गच्चोनगच्च पाणी भरलें, दुसरा कोठेंही वाव ठेविला नाहीं तर लाटा उत्पन्न होणें हें जसें प्रायः अघटित कार्य होईल, त्याप्रमाणें निरवकाश आकाशामध्यें जर एकच आत्मवस्तु घनदाट पसरली तर येथें विकार करणाऱ्या दुसऱ्या वस्तूचा अभावच असल्यामुळें विकारवशता, कालस्थलांतर्गतता, कारणसंबंधता, इंद्रियगोचरता इत्यादि उपाधि उत्पन्न होणेंच शक्य नाहीं. गणितशास्त्र, तर्कशास्त्र इत्यादि शुद्ध शास्त्रें ज्या अधिष्ठानाच्या आधारानें आपआपले सिद्धांत प्रगट करितात, तें एक रसात्मक आनंत्य ( Homogeneous Infinity ) म्हणजे ब्रह्म होय. बाकीच्या शास्त्रांस मुख्य आधार म्हणजे गणित व तर्क शास्त्रांचाच आहे. वस्तूंचे साहचर्यसंबंध (Co-existences) व कार्यकारणसंबंध ( Sequences) यांच्या आधारानें इतर म्हणजे मानसिक, जीवन, वनस्पति, भूगर्भ, ज्योतिष इत्यादि शास्त्रांचे सिद्धांत प्रकट होतात. तेव्हां असें म्हणावयास काय प्रतिबंध आहे, कीं सर्व अधिभौतिकादि शास्त्रांस एकवट करणारीं जीं गणित व तर्कशास्त्रें त्या महाशास्त्रांस ही अधिष्ठानभूत होणारें तें ब्रह्मज्ञान आहे. पुनः ह्या शास्त्रांस अधिष्ठान मिळतें तें आत्मज्ञानामुळें मिळतें; म्हणजे प्रमाण, प्रमेय, प्रमाता इत्यादि तार्किकसंबंध व धूम आणि अग्नि यांचा नित्य साहचर्यसंबंध हे तरी आपल्या बुद्धीस आकलन करितां येतात, ते आत्म्याच्या ज्ञानस्वरूपामुळेंच होय; आत्मा नित्य आहे हें ज्ञान अभंग असून नित्य परिचयाचें आहे. तेव्हां आत्मा आणि ब्रह्म हे पदार्थ अनन्य आहेत, इतकेंच नव्हे, तर अभिन्न आहेत. ब्रह्म नित्य आहे, अतएव आत्माही नित्यच आहे, तेव्हां शोकमोहाचें कांहींएक कारण नाहीं. असें असतांही म्हणजे आत्म्याचा परिचय नित्य असतांही आपल्यास शोक मोह होतात, याचें कारण आपल्यास [ सोपाधिक आत्म्यास, जीवात्म्यास ] आत्मस्वरूप कळलें नाहीं हेंच होय. पहा कीं, ' त्रिकोण म्हणजे तीन बाजूंनीं झालेली आकृति ' हें लक्षण जरी ठाऊक असलें व आपण पुष्कळ वेळ त्रिकोण पाहिला असला तरी त्रिकोणांतील तीन कोनांची बेरीज दोन काटकोनाबरोबर असते, हें एकदम समजत नाहीं. हें समजण्याला विचाराची

अपेक्षा असते. त्याचप्रमाणें मेघ, आर्द्रमहिषोदरतुल्य कृष्णमेघ आकाशांत आल्यानंतर पर्जन्य पडतो, असें नित्यज्ञान असलें तरी, ' आतां तसले ढग आले आहेत, तेव्हां पाऊस पडेलच ' असेंही निश्चयानें सांगवत नाहीं; हें सांगतां येण्यास कित्येक शास्त्रांची अपेक्षा असते, हाही अनुभव सर्वांस आहे. तेव्हां आवश्यक शास्त्रांचा एकनिष्ठेनें अभ्यास केल्याशिवाय नित्य परिचित आत्मस्वरूपही बरोबर समजत नाहीं. तें स्वरूप कळावें एतदर्थ पहिल्या पंचवीस श्लोकांची योजना आहे. या श्लोकांत अनेक उपलब्ध शास्त्रांच्या सिद्धांतांचें ग्रहण करूनच आत्मस्वरूप सांगितलें आहे व असें सिद्ध केलें आहे कीं आत्मा हा सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वनियंता, अजरामर व इंद्रियागोचर असून सर्व सचितांस अस्तित्व देणारा आहे. ह्याचप्रमाणें पुढें जो बुद्धियोग-कर्मयोग-सांगितला आहे, त्यांतही व्यवहार, नीति इत्यादिकांचे अंतिम सिद्धांत घेऊन, ते सिद्धांत आत्मस्वरूपांत अंतर्भूत होतात, आत्मस्वरूपांत ' आहे ' व ' असावें ' या उभयतांची, सांख्याची व योगाची, एकवाक्यता एका आत्मस्वरूपांत मात्र होते हें, स्थितप्रज्ञानाचीं लक्षणें दिलीं आहेत त्यांवरून ठरलें. शिवाय ब्रह्मस्वरूपावर दृश्याचा ( Phenomena ) अध्यारोप अज्ञानानें कसा होतो, हेंही सांगितलें.

सारांश ज्ञानाचा अत्यंत उत्कर्ष झाला म्हणजे सांख्ययोगाचे सिद्धांत प्रकट होतात व आत्मस्वरूपाचीं लक्षणें समजून घेण्याची आपली तयारी होते. वस्तुनिरीक्षण, प्रयोगसिद्धि, अनुगम व अनुमिति ( Observation Expriments Induction and Deduction & Methods ) इत्यादि आधिभौतिक शास्त्रांच्या पद्धति, अंतर्निरीक्षण ( Introspection ) आदि मानसिक शास्त्रांच्या पद्धति आणि सूक्ष्म अर्थापत्ति ( Dialectics ) ही आध्यात्मशास्त्राची ( Metaphysics ) पद्धति या सर्वांचाही सूत्ररूपानें गीताशास्त्रांत अंतर्भाव झाला आहे. ह्याचप्रमाणें कर्मयोगांत ( Practeial Philosophy ) पुरुषार्थ ठरविण्यासाठीं, अंतिम हेतु साध्य करण्याप्रीत्यर्थ, ज्या पद्धतींचा स्वीकार करावा लागतो त्यांचाही स्फुटरूपानें विचार केला आहे. मुमुक्षु पुरुषानें प्रथमतः १३, १४, १७ व १८ अध्यायांत केलेल्या गुणमीमांसेचा अभ्यास करावा व या गुणमीमांसेचे साहाय्यानें आपण कोणत्या वर्णांत येतों, आपल्या जन्मसंस्कारांनीं, विद्यासंस्कारानें व समाजसंस्कारानें कोणता विशेष आपल्या पूर्वजन्मसंचितगुणकर्मांवर झाला आहे, हें निःपक्षपातबुद्धीनें पाहून आपण कोणत्या वर्णाचें कर्म करावयाचें हें गुरुपरीक्षेनें स्वपरीक्षेनें व शास्त्रमर्यादेनें ठरवावें. हा अस्तिविषयक शास्त्रदृष्टीनें म्हणजे मानसशास्त्रें, शरीररचनाशास्त्रें व अध्यात्मिकशास्त्रदृष्टीनें विचार झाला. नंतर जें कर्म करावें असें विधिशास्त्रें ( व्यवहारनीति, राजशासन व धर्म इत्यादि ) नियमित करितील (अध्याय १८ पहा) तें कर्म ईश्वरी प्रेरणेस योग्य असें सात्त्विक असून तें अभिमानविरहित रीतीनें करण्याचा प्रयत्न करावा आणि कर्मफलाची अपेक्षा बिलकुल ठेवूं नये. परमेश्वरास सर्व कर्म अर्पण करावें. ( गीता अ० १८ श्लोक ४०-४८ ) हें केलें म्हणजे चित्तशुद्धि होते आणि आपला व्यवहार, तद्गत नीति, राजनिष्ठा, राष्ट्रनिष्ठा,

पितरनिष्ठा व देवतानिष्ठा, दृढतर होऊन, ज्ञानमार्गास लागणाऱ्या दीक्षेची आपली तयारी होते. नंतर ज्ञानमार्गाचा अभ्यास करण्यासाठीं व एकाग्रता साध्य करण्यासाठीं योगाचा अभ्यास करावा. हा योगाभ्यास चालला असतां आपलें कुलदैवत, आराध्य दैवत, यांच्या स्थूलसगुण व सूक्ष्मसगुण या रीतींनीं शास्त्रप्रणीत नवविधा भक्तीचें संपादन करावें. येणेंप्रमाणें योगाभ्यासाला अविकल्पस्वरूप येत जाऊन सृष्टीच्या एकात्मकतेचा थोडा थोडा अनुभव येत चालला, सृष्टीचीं गूढ रहस्यें व सूक्ष्म आणि कारण देहांचें स्वरूप स्पष्ट दिसूं लागलें, तर भक्तीनें पुरुषार्थद देवतेचें चिंतन अहोरात्र होऊं लागतें व सर्व सृष्टीच्या आंतबाहेर परमेश्वर दिसूं लागून त्याच भक्तीला पराभक्तीचें स्वरूप येऊं लागतें. व उपनिषदांच्या व गीतेच्या साहाय्यानें दृश्यशास्त्राचें सिद्धांतज्ञानही प्रकट होऊं लागतें आणि त्याच ग्रंथांच्या दृढ अभ्यासानें निर्गुण स्वरूपाचें परोक्षज्ञान होतें व त्यालाच अपरोक्षत्वाचा हळूहळू पोपाख चढूं लागतो. शेवटीं पूर्ण निष्कामता-कर्म करून कर्मसंन्यासपूर्ण पराभक्ति-सदैव ब्रह्मचिंतन आणि पूर्णज्ञान-( आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक शास्त्रांचें पूर्णज्ञान )-होतें व या सर्वांस एकवट करून एकरसत्व देणारें ब्रह्म-ज्ञानविधान प्रकट होतें व जीव मुक्त होतो. हा कर्मयोग होय. येथें कर्माची परिसमाप्ति व दृश्यज्ञानाचा शेवट होतो. सर्व संशय तुटतात, हृदयग्रंथी फुटतें आणि ब्रह्मसाक्षात्कार होऊन सच्चिदानंदाच्या पलीकडील-बुद्धीस अगोचर अशी-परमपदावाप्ति होते; अनंतत्व आपलेंच असतें तें प्रकट होऊन आपणच अनंत म्हणजे ब्रह्म होतों.

एवंच ब्रह्मज्ञानविज्ञान म्हणजे सांख्यशास्त्रें व योगशास्त्रें यांची एकवाक्यता करणारें, प्रत्येक शास्त्राला योग्यस्थान देणारें व अनंतांशीं तादात्म्य करून देणारें तत्वज्ञानविज्ञान आहे व तेंच गीतेंत सांगितलें आहे, असें सिद्ध झालें. मुंडकोपनिषन्मंत्र ३।४ (प्रथम मुंडक) पहा.

# भाग दुसरा.



## अध्यात्मज्ञानाची व्याप्ति.

अध्यात्मिक शास्त्र किंवा अध्यात्मिक ज्ञान (Metaphysics) हें भौतिक शास्त्रें, मानसिकशास्त्रें, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान, यांपासून निराळें केलें पाहिजे. हीं सर्व शास्त्रें व्यवहारकाळीं सद्वस्तूंचा कांहीं ठराविक पद्धतीनें विचार करणारीं आहेत. पण अध्यात्मच सद्वस्तूंचा विचार परमार्थतः करितें व बाकीचीं शास्त्रें करीत नाहींत, असा भाग नाहीं. आतां अध्यात्मज्ञान खेरीज करून बाकीचीं सर्व शास्त्रें व त्यांतील सिद्धांत हीं तयार होत असतां सिद्धीची ह्मणून जीं प्रमाणें पुढें येतात, तेथें इंद्रियांनीं पाहणें, वजन करणें, मोजमाप करणें, निदान भिन्न स्वरूप कसें काय होत आहे याचें साक्षित्वानें अवलोकन करणें, हें सर्व शक्य आहे, ह्मणजे सर्व शास्त्रांतील सिद्धांत अनुमितिपद्धतीनें, प्रयोगपद्धतीनें, निरीक्षणपद्धतीनें, (कोणत्या तरी एका विशिष्ट व प्रयोग करून पाहिलेल्या पद्धतीनें) सिद्ध करितां येतात. अध्यात्मशास्त्राची मात्र तशी गोष्ट नाहीं. अध्यात्मशास्त्राचे सिद्धांत सिद्ध करण्याची पद्धति वेगळीच आहे. 'जीव उपाधियुक्त आहे' असें म्हटल्याबरोबर उपाधिशून्य आणि म्हणून केवल अशी कांहीं तरी वस्तु आहे असें एक नवीनच ज्ञान उद्भूत होतें. आतां या नूतन ज्ञानाला प्रमाण काय? उपाधिशून्य अथवा पूर्ण वस्तु तर मनोबुद्ध्यादि इंद्रियांस कधींही गोचर व्हावयाची नाहीं. इंद्रियातीत वस्तूला कोणतेंच प्रमाण लावितां येत नाहीं. तथापि आपला निश्चय असतो कीं, आपल्यास खात्री असते कीं, हा नवीन उद्भूत सिद्धांत खरा आहे. सारांश प्रमाणातीत परंतु विचारपद्धतीला अवश्य असे सिद्धांत ज्या शास्त्रांत प्रणीत होतात, त्याला अध्यात्मशास्त्र म्हणावयाचें: असें हें तात्पुरतें लक्षण ठेऊन आपला मार्ग कंठूं.

[अ] गुरुत्वाकर्षण, प्रकृतीचें (व्यक्त प्रकृतीचें, Matter) वजनमाप व त्या वजनमापाचा नित्यपणा, गुणत्रयाचें एकराशित्व (Conservation) इत्यादि भौतिक शास्त्राचे सर्वगामी सिद्धांत इंद्रियविरचित साधनांनीं सिद्ध करितां येतील: **डिमोक्रॉटिस्च्या** किंवा **कणादाच्या** अणूंचीही संख्या करितां येईल: अलीकडे 'The scientific Ideas of today' असा एक अभियुक्त ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे त्यांत 'अणु' पलीकडे जाऊन व electron या नांवाचा सूक्ष्मतम पदार्थ सिद्ध करून त्याचें वजनमापही दिलेंआहे! असो, या सर्व ज्ञानांचा अंतर्भाव इंद्रियगोचर शास्त्रांत होतो. पण सर्व आकाशभर (Space) विश्वच पसरिलें आहे कीं काय? 'वेळेला प्रारंभ कधीं झाला कीं नाहीं?' इत्यादि प्रश्नास प्रयोगसिद्ध अशीं उत्तरें, प्रतिवचनें, कधींच देतां येणार नाहींत. ह्या प्रश्नास उत्तरें देतां आलींच तर तीं अध्यात्मशास्त्रद्वाराच होत. उदाहरणार्थ श्रीभगवंतांनीं अर्जुनास जें विश्वरूप दाखविलें त्यांत असें दाखविलें कीं, सर्व विश्वाकाशांत ब्रह्म हें कोणत्या तरी व्यक्त

किंवा अव्यक्त स्वरूपानें सर्वत्र पसरलेलें आहे. हें अर्जुनास दिव्य दृष्टीनें, अंतर्दृष्टीनें, ज्ञान-दृष्टीनें दिसलें; म्हणजे हा सर्व अध्यात्मज्ञानाचा व्यापार होय. दुसरें; कालाच्या प्रारंभासंबंधीं पाहिलें असतां आकाशाप्रमाणेंच कालाचा आरंभही 'हा मी आहें' या ज्ञानाबरोबरच होतो. पण तर्कदृष्टया काल पूर्ववृत्त असतो. पहा कीं 'मी आहें' असें भान असतें तेव्हांच कालाकाशांचें व कार्यकारणादिकांचें ज्ञान असतें; 'मी आहें' हें भान नसलें म्हणजे वरील ज्ञान असत नाहीं. सुषुप्ति स्थितींत कालादिकांचें ज्ञानच नाहीं. असो; पण हें जरी खरें आहे, तरी आपला निश्चय असा असतो कीं काल, स्थल, आकाश, कार्यकारण संबंध हे सर्व माझ्या पूर्वींचे आहेत. एवंच हा निश्चय अध्यात्मिक पद्धतीनें तयार होतो. असो; या ज्ञानाच्या साहाय्यानें जोंपर्यंत विचार करावयाचा आहे, तोंपर्यंत कालाला आरंभ नाहीं, असेंच धरून चाललें पाहिजे; म्हणजे काल अनादि आहे, असें समजलें पाहिजे. ब्रह्मस्थितींत मात्र कालाकाशांचें भान नसतें, कारण तेथें द्वैताचा गंधही नसतो. असो; तेव्हां अध्यात्मदृष्टीनें कालाचा आरंभ पहावयाचा म्हणजे ज्ञानोदया-बरोबर कालोदय झाला असें म्हणावें लागतें; पण व्यावहारिक दृष्टीनें 'कालाचा आरंभ झाला, त्याच्या **अगोदर** काय होतें ?' किंवा या विश्वाकाशापलीकडे काय आहे ? असले प्रश्नाला उत्तर देतां येणें शक्यच नाहीं.

[ **आ** ] मानसिक शास्त्रांतही निरीक्षण [ Observation ] प्रयोग [ Experiments], व अनुगम [ Induction ], त्याचप्रमाणें अंतर्निरीक्षण [ Introspection ] इत्यादि प्रकार आहेतच. इतकेंच कीं, बुद्धि आणि मन ह्यांमध्यें व यांच्या वृत्तींत जो फरक होत असतो, तो वरील प्रकारांच्या साहाय्यानें पाहण्याचें व त्यापासून सिद्धांत काढ-ण्याचें काम प्रयोगसिद्ध [ Empirical ] मानसशास्त्राचें आहे. पण मनाच्या व बुद्धीच्या उपाधींचा जो निश्चय करावयाचा तो अध्यात्मिक शास्त्रावरूनच होय. उदाहरणार्थ कार्य-कारणसंबंधाची उपाधि ही बुद्धीच्या राज्यांत अनुभव शिरूं लागतांक्षणीं चिकटते. ह्या चिकटण्याचा अनुभव घेईन ह्मटलें तर ती गोष्ट साध्य नाहीं. कांहीं प्रसंगीं 'जीवस्वरूपाचें, आत्मस्वरूपाचें ज्ञान साक्षात्कृत होतें,' असें जे योगी लोक ह्मणतात, त्यांच्या दृष्टीनें आत्मसाक्षा-त्काराचा विषय प्रयोगसिद्ध मानसशास्त्रांत येतो. पण आत्म्याचा अनुभव सोपाधिक आत्म्याला, जीवाला कधींच यावयाचा नाहीं, असें ज्यांस वाटतें त्यांच्या दृष्टीनें 'अनुभव नाहीं, तरी आत्मा आहे याविषयीं निश्चय आहे ह्मणून हा आत्मास्तित्वाचा विषय अध्यात्म-ज्ञानांत येतो.

[ इ ] याचप्रमाणें तत्वज्ञानांत–ब्रह्मज्ञानांत–सुद्धां कांहीं ब्रह्मज्ञान अनुभवसिद्ध होऊं शकतें; पण कांहीं अनुभवातीत असतें. पहा कीं, आमच्या आर्यशास्त्रांत 'कर्माचा नियम अव्याहत चाललाच पाहिजे' ( कर्मविपाक अप्रतिहत आहे ) हे सिद्धांत किंवा न्यूटननीं सर्व विश्वव्यापी असे गतिस्थितिशास्त्राचे नियम शोधून काढले, ते नियम सर्व प्रयोग-

सिद्ध तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत अंतर्भूत होतात. तसेंच 'जीवित्वा' चा उलगडा बुद्धि-गम्य ( Theoretical ) गतिशास्त्रांकडून केव्हांना केव्हां तरी होईल, असें पुष्कळ युरोपियन लोकांस वाटत आहे व जीवाचा उलगडा करणाऱ्या 'सिद्धि व ज्ञान' हीं योग-बळानें मिळवीत असत व आतांही मिळवितां येतील, असें आमचे लोक म्हणतात; तेव्हां हा विषय प्रयोगसिद्ध ब्रह्मज्ञानामध्यें जावयाचा. पण 'हेगेल' साहेबांनीं सुचविल्याप्रमाणें भरतीओहोटीचें लक्षण ( त्यांचें लक्षण खरें मानिलें तर ) अध्यात्मशास्त्राखालीं येतें. 'चंद्र ही निर्जल वस्तु आहे, तेव्हां पाणी घेण्यासाठीं–आपलें स्वरूप पूर्ण करण्यासाठीं, व आपली तृषा भागविण्यासाठीं, हा चंद्र समुद्राचें पाणी आपल्याकडे ओढितो आणि भरती ओहोटी निर्माण करितो.' हा वृत्तांत खरा मानिला तरी याचा अनुभव येणें अशक्यच आहे. आमच्या इकडे 'ब्रह्म' हें सर्वव्यापी आहे. [ अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततं ॥ ] असें म्हणतात. कशावरून? जेथें जेथें मन किंवा बुद्धि जातात, तेथें तेथें त्यांस आत्मा अथवा ब्रह्म असतें म्हणून. हें ठीक; पण तें विश्वव्यापी आहे, याला पुरावा मिळणें शक्य नाहीं; कारण पुरावा सांत असणार आणि ब्रह्म अनंत असणार; तेव्हां अनुभव येणें शक्यच नाहीं. ही व्यावहारिक ब्रह्मदृष्टि झाली. 'ब्रह्म झाल्यावर सर्वच एकरस झाल्यामुळें भेदाभेद, शास्त्राशास्त्र इत्यादि सर्व संपतें.' हा विषय सुद्धां आध्यात्मिकच होय. कारण एकरसाचा **अनुभव येणें व तो सांगतां येणें** या गोष्टी अशक्यच होत. विचारव्यवस्थेला हे सिद्धांत अवश्य ह्मणून घ्यावयाचे असतात. हे सिद्धांत अनुभवाचे घटक असतात; यामुळें अर्थातच एकदेशी व विशेष अनुभवानें सिद्ध होणारे हे सिद्धांत नव्हेत.

यांप्रमाणें अध्यात्मशास्त्राचे सिद्धांत कशा प्रकारचे असतात व त्यांचीं प्रमाणें कसलीं असतात हें एक तर्कशास्त्रांतील उदाहरणांशिवाय, बाकीच्या शास्त्रान्वयें आपण पाहिलें. तर्कशास्त्र विचारांत घेण्याचे अगोदर एक दोन गोष्टींचा विचार करून पुढें जाऊं. धर्म-मीमांसेसारखे जे ग्रंथ व पतंजलीऋषीसारखे जे ग्रंथकार आहेत त्या सर्वांचें मत आहे कीं, ईश्वर हा सर्वसाक्षी आहे. आतां 'ईश्वराचें ज्ञान होणें अनुभवानें ह्मणा [ निरीक्षण किंवा प्रयोग ], किंवा अंतर्निरीक्षणानें ह्मणा, कोणत्याही पद्धतीनें हें ज्ञान होणें शक्यच नाहीं' असें कांहीं युरोपियन तात्विकधर्ममीमांसक म्हणतात. तस्मात् हें ईश्वरविषयकज्ञान धर्म-ग्रंथांमधून [ वेद, धम्मपद, बायबल, कुराण इत्यादि ] च घेतलें पाहिजे. हे अपौरुषेयग्रंथ होत. हीं आप्तवाक्यें आहेत, म्हणून प्रमाण आहेत. आणि पुनः सर्व ज्ञानांचा व सर्व कर्मांचा नियामक, सर्वांचें अखिलपर्यवसान व सर्वांचा अंतिम हेतु जो परमेश्वर, सद्गुणगण-मंडित श्रीपरमात्मा, त्याच्या मंगल सत्स्वरूपाचें पुण्यदज्ञान देणारें हे ग्रंथ आहेत, ह्मणून त्यांच्याविषयीं मोठी आदरबुद्धि हवी असते. आमच्याकडे ज्ञानाची परमावधि होऊन भक्तीला पराकाष्ठेचें 'परा स्वरूप प्राप्त झालें म्हणजे ईश्वरी स्वरूपाचा साक्षात्कार होतो,' 'भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्वतः। ततो मां तत्वतो ज्ञात्वा, विशते तदनंतरम् ॥' या श्लोकांत वरील विधान स्पष्ट उल्लेखिलें आहे. तेव्हां धर्ममीमांसेंत 'ईश्वरदर्शनाविषयक' प्रश्न

आमच्या इकडे प्रयोगसिद्ध धर्ममीमांसेमध्यें जाईल. निकडील तत्त्वज्ञ म्हणतात कां, 'सद्वस्तु' याचा अर्थ येथील 'सुखदुःख, शुभाशुभ, इष्टानिष्ट' इतकाच केला तर जीवनशास्त्र, मानसशास्त्र, समाजशास्त्र व तत्त्वज्ञान ह्या शास्त्रांचें व नीतिमीमांसा, शासनमीमांसा यांचें उद्घाटन केलें असतां 'सद्वस्तु' कळेल. हें कळण्याला धर्ममीमांसेची अथवा अध्यात्माची अवश्यकता नाहीं. पुनः सारांशः अध्यात्मशास्त्र हें सद्वस्तूच्या, दृश्याच्या पलीकडे ( त्याच्या अंतर्यामीं ) जी सद्वस्तु आहे तिचा विचार करणारें, त्या 'केवला' ची मीमांसा करणारें शास्त्र आहे, हें ह्याचें लक्षण होय. 'केवलाचें ज्ञान' होणें अशक्य आहे असें कँट् व स्पेन्सर प्रमाणें माना, किंवा निसर्गाच्या, प्रकृतीच्या, सृष्टीच्या, अंतर्यामी 'स्वतःस जाणणारी अशी जाणीव म्हणजे ज्ञानस्वरूप आत्मा आहे, त्याचें अपरोक्ष ज्ञान होणें शक्य आहे' असें श्रीमच्छंकराचार्यांप्रमाणें किंवा प्रो० ग्रीन साहेबाप्रमाणें माना, तात्पर्य एकच आहे कीं, 'केवलाची मीमांसा करणारें तें अध्यात्मशास्त्र होय.' 'केवल' म्हणजे निरपेक्ष असें आम्ही म्हणतों. निरुपाधिक हाही अर्थ आमचाच आहे, तेव्हां 'केवलाचा' विचार अध्यात्मानें करावयाचा असें लक्षण बांधिलें तर व विचार म्हणजे एक प्रकारची उपाधि, एक प्रकारचा संस्कार आहे असें धरिलें, तर 'केवलाचा' किंवा निरुपाधिकाचा-विचार हे शब्दच विप्रतिसिद्ध आहेत असें होईल! 'वन्हिना सिंचति [अग्नीनें शीतल करितो], असें म्हणण्यासारखें हें व्याघातक होईल. तेव्हां ज्याला आपण व्यावहारिक सत्ता देतों ते सर्व पदार्थ म्हणजे सर्व सृष्टि व सृष्टिगत पदार्थ यांचा अनुभवविलक्षण [ अनुभवातीत ] पद्धतीनें विचार करणारें तें अध्यात्मशास्त्र असें म्हणावें व अध्यात्माचें लक्षण 'केवलमीमांसा' हेंच ठेवावयाचें असेल तर केवलाचा अर्थ व्यावहारिक सत्ता असा करावा! आमचे लोक यालाच मायिक सत्ता म्हणतील. आतां या व्यावहारिक सत्तेचा अनुभव घेतां येतो व कित्येक वेळां घेतां येत नाहीं. पहा कीं 'किं स्विदासीत्?' असा ऋग्वेदांत प्रश्न विचारला आहे. सृष्टीच्या पूर्वी काय होतें, सृष्टीच्या बाळपणीं येथें काय होतें? इत्यादि प्रश्नांस आपण म्हणजे तत्त्वद्वियाप्रधान शास्त्री उत्तर देतों. पण हीं उत्तरें खरीं आहेत कीं नाहींत हे कळण्याला मार्ग कांहीं नाहीं. तेव्हां असल्या गोष्टी अध्यात्मांत घालावयाच्या किंवा तर्कशास्त्रांत घालावयाच्या हे पाहूं. तसेंच शब्द हा गुण पदार्थांचा कीं माझ्या डोक्यांतील मज्जातंतूंचा? रंग पदार्थाचा कीं माझ्या डोळ्यांचा कीं मज्जातंतूंचा! इत्यादि प्रश्नांचा विचार, तसेंच मनःस्वरूपाचा व ईश्वरी स्वरूपाचा विचार हे सर्व अध्यात्मशास्त्रांतील 'वस्तूमीमांसा' ( Ontology ) या भागांत घालावे. हें वस्तुमीमांसाशास्त्र व्यावहारिकसत्तेच्या दृष्टीनें करितां येईल कीं नाहीं, हा संशयच आहे. असो; तात्पर्य हें कीं, अध्यात्मशास्त्राच्या वस्तु निराळ्या व त्यांचें ज्ञान समजून घेण्याची पद्धतीही निराळी.

[ ६ ] आतां तर्कशास्त्रांत [ प्रमाणशास्त्रांत ] अध्यात्माचा कांहीं प्रवेश होत असतो कीं काय हें पाहूं. विधान खरें आहे किंवा नाहीं, तें अजमावण्याची साधनें काय? तसेंच अनुमितीचे नियम कोणते, उपमिति कोणत्या प्रसंगीं ग्राह्य आहे, शाब्दप्रमाणाला केव्हां

महत्व द्यावयाचें, इत्यादि विचार तर्कशास्त्रांत अथवा प्रमाणशास्त्रांत केले असतात. हें प्रमाणशास्त्र सर्व शास्त्रांतील सिद्धांत सिद्ध करण्याचें एक अवश्य उपकरण आहे. याच्या-शिवाय एक क्षणभरही चालावयाचें नाहीं. नीतिशास्त्र, व शासनशास्त्र हीं दोन्ही तर्क-शास्त्राच्या उपजीवनाव्यतिरिक्त एक क्षणभरही जिवंत राहूं शकणार नाहींत. धर्मशास्त्रांचाही तोच मासला आहे.

ह्या तीन मीमांसांमध्यें [ नीति, शासन व धर्म ] 'आपण वागतों, आपण विश्वास ठेवतों, तेंच खरें आहे: बाकी सर्व असत्यरूपी सैतानाचें साम्राज्य आहे.' अशी प्रायः प्रत्येकाची समजूत होण्याचा संभव असतो. तेव्हां प्रमाणशास्त्राचें प्रामाणिक अंजन डोळ्यांत पडल्याशिवाय कोणत्याही पुरुषाची निष्पाप प्रामाणिक बुद्धि जागृत होत नाहीं. इतर शास्त्रांच्या अनुभवसिद्ध प्रमेयाची गोष्ट एका बाजूला करून जर आपण किरकोळ सिद्धांताकडे गेलों किंवा एका शास्त्राचा दुसऱ्या शास्त्राशीं वाद सुरू झाला, कीं प्रमाण शास्त्राची आवश्यकता मूर्तिमंत उभी राहते. 'मानसशास्त्रांतील प्रमेयें अंतर्निरीक्षण पद्धतीनें ( Introspection ) शोधून काढणें हें 'मूर्खाचें हृदय धरण्यासारखेंच असाध्य आहे' असें कित्येक शरीररचनाकोविदास वाटत असे व त्यांनीं ह्या प्रश्नासंबंधें बरेंच मोठें काहूर उत्पन्न करून पंडितसमाजांत घोंटाळा उपजविला होता. आमच्या इकडे 'कर्मवादी, कर्मानेंच मोक्ष मिळणार,' 'योगी, योगानें मात्र मिळणार,' 'वैष्णव, विष्णुभक्तानेंच मिळणार' असे भांडत होते व अद्यापिही भांडत आहेत. हें विश्व अत्यंत सूक्ष्म परिमाणूंपासून आरब्ध झालें, असें कणादादिक ह्मणणार व अव्यक्त प्रकृतीपासून ते परिणत झालें असें कपिल शिष्य ह्मणणार! **देहसुखासाठीं** श्रम करावे असें बृहस्पतीसारखा नास्तिक ह्मणणार व **लोकसंग्रहासाठीं** आपण कर्म केलें पाहिजे, असें श्रीकृष्णशिष्य म्हणणार! तेव्हां या सर्वांत तारतम्य काय आहे हें एका प्रमाण शास्त्रानें मात्र पाहतां येतें. पुनः; मतांमध्यें इतका विरोध आहे हें पाहून व कित्येक प्रमाणभूत सिद्धांत सरशेवटीं खोटे ठरले, असें पाहून सामान्यतः असा एक समज उत्पन्न होतो कीं, इतके समज खोटे निघाले तर आपला हा समज तरी खरा कशावरून असेल! याची शहानिशा करणारें जें शास्त्र त्याला ज्ञानमीमांसा असें म्हणूं. याचप्रमाणें समाजशास्त्रासारखीं अर्वाचीन युरोपियनास नवीं अशीं वाटणारीं शास्त्रें, त्याचप्रमाणें नीति, राजशासन व व्यव-हारशास्त्रें, यांतील सिद्धांत प्रामाणिक आहेत कीं नाहीं, हें पाहणारें शास्त्र म्हणजे ज्ञान-मीमांसाच होय. असो ही ज्ञानमीमांसा भगवन्मार्गानें गेली तरच सत्यासत्याचा निर्णय होणार आहे. अठराव्या अध्यायांत ज्ञानाचा गुणपरत्वें विभाग करितांना अनेकांत एकत्व पाहणें हा सात्त्विक गुण सांगून १३ व्यांत [ श्लोक ७-११ ] जो ज्ञान संशोधनाचा मार्ग व जी मनोवृत्ती सांगितली आहे, त्यांचा पूर्ण विचार केला तर प्रमाण, अप्रमाण, प्रत्यक्षादि ज्ञानावर [ तर्कशास्त्रावर ] किती विश्वास ठेवावयाचा, अध्यात्मिकावर [ Metaphysics ] किती ठेवावयाचा याचा स्पष्ट उलगडा होईल.

[ उ ] याप्रमाणें अधिभौतिक शास्त्रें [ गीता अध्याय १३ श्लोक ३–६ अध्याय ७ ], अपराप्रकृतीचें प्रथममहाभूतपंचक व द्वितीय अंतःकरणत्रय; नीति [ व्यक्तिविषयक व राजकीय–सामाजिक ]–मानसशास्त्रें व ज्ञानमीमांसा [ पहा, गुणमीमांसा अध्याय १४, १६, १७ व १८ ] अध्यात्मिकशास्त्र इत्यादि सांख्यशास्त्रें व कर्मयोग यांचा सामग्र्यानें विचार करितां असें दिसतें कीं, ब्रह्मज्ञान म्हणजे [ १ ] आत्मप्रत्यक्षशास्त्रें, [ २ ] दृश्य व कर्तव्य शास्त्रांचीं मूलतत्वें, [ ३ ] त्यांच्या पद्धति आणि त्यांचे सिद्धांत, या सर्वांची मीमांसा शुद्ध व स्वच्छ अशा श्रुतिप्रणीत मार्गानें करून त्यांस एकरसात्मक करणारें तत्त्वज्ञान होय. ह्या तत्त्वज्ञानाचा परमार्थज्ञानास जितका आश्रय हवा आहे तितकाच व्यावहारिक व धार्मिक कर्मास हवा आहे; आणि श्रीव्यास मुनींनीं परमार्थज्ञानाचा व सांख्यशास्त्रांचा विचार ब्रह्मसूत्रांमध्यें प्रधानत्वानें केला आहे, तसाच भगवंतांनीं व्यावहारिक व धार्मिक कर्माचा विचार गीतेमध्यें प्रधानत्वानें केला आहे. उभयतांसही ब्रह्मज्ञानाची मुख्य अपेक्षा आहे; अतएव ब्रह्मज्ञानाचा विचार उपनिषदोपजीवी दोन्ही प्रासादिक ग्रंथांतून आला आहे. तथापि ब्रह्मसूत्रांत जसा कर्माचा विचार—गौणत्वानें कां होईना, पण आला आहे, त्याचप्राणें गीतेंतही सांख्यशास्त्रांचा विचार गौणत्वानें आला आहे. पण सर्वत्र पर्यवसान एकच आहे. तें हें कीं, "कर्म करून चित्त शुद्धि करा, भक्ति करून सगुणस्वरूपाचें संपादन करा, आणि ज्ञानसंपादन हवें आहे तें निष्काम कर्माच्या सहाय्यानें व पराभक्तीच्या आश्रयानें घट्ट करून योगमार्गानें अद्वैतसुखाच्या, केवळ ज्ञानाच्या आणि अव्यय, अविकारी अशा सत्तेच्या परमपदाला जाऊन पोहोंचा."

अलीकडील उत्क्रांतिवादानें मनाचा अवतार जडापासून होतो, असें ठरविण्याचा प्रयत्न चालविला आहे व तो कदाचित् सिद्धीसही जाईल. आमच्या इकडे मन व अहंकार आणि बुद्धि ह्यांचा अंतर्भाव भगवंतांनीं अपराप्रकृतींतच केला आहे, तेव्हां आमच्या शास्त्रांस वरील शोधांमुळें कोणताही कमीपणा येणार नाहीं, हें खरें; तथापि शरीरपाताबरोबरच मनादिकांचा नाश होतो असें जें यूरोपियन अधिभौतिक चार्वाकांनीं आपलें मत प्रगट केलें आहे व ज्यामुळें युरोपियन धार्मिकांस अत्यंत भीति उत्पन्न झाली आहे, तें मत मात्र अवास्तव आहे; निदान आमच्या उपनिषदांस, ब्रह्मसूत्रांस व भगवद्गीतेस हें मत संमत नाहीं. कारण मन जरी अपराप्रकृतिजन्य आहे, तथापि तें आकाशापेक्षांही जास्त पातळ असल्याकारणानें त्याचा नाश देहपाताबरोबर होत नाहीं, अशी महंतांची खातरी झाली आहे. अलीकडे बाल्फर साहेबांनीं जें मानसिक शोध चालविले आहेत त्यांवरूनही हेंच सिद्ध होत आहे. पुनः; शरीर पडलें तरी जीवनाश होत नाहीं, पडलेल्या शरीरांतील जीव कारणशरीरांत राहतो व येथें केलेल्या सर्व कर्मांचा व कर्मफलांचा अनुभव घेत असतो व येथें आलेला जो अनुभवसंचय असतो, त्यासहवर्तमान तो अन्यजन्म घेण्याच्या तयारीला लागलेला असतो; हें पुनर्जन्माचें प्रकरण आमच्या दिव्यानुभव-

दृष्टीनें सिद्ध होणाऱ्या ग्रंथांत उत्तम रीतीनें प्रतिपादिलेलें आहे; तेव्हां त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, युरोपियन धार्मिकांस उत्पन्न झालेली भीति बाळगण्याचें आम्हांस मुळींच कारण नाहीं.

असो; तेव्हां अध्यात्मशास्त्राचा, आत्मप्रत्यक्षज्ञानानें सिद्ध झालेल्या शास्त्राचा अंतर्भाव तत्त्वज्ञानांत होतो, हें समजून घेतलें व त्याची पद्धति समजली म्हणजे कित्येक गूढ प्रश्नांचा उलगडा होतो व ब्रह्मज्ञानाचें काम सुकर होतें, हें सिद्ध झालें.



# भाग तिसरा.

## सांख्ययोग आणि कर्मयोग यांचा संबंध.

जें ज्ञान आजमितीस उपलब्ध आहे व ज्याला शास्त्रीयस्वरूप आलेलें आहे, असें ज्ञान अथवा निरनिराळीं शास्त्रें घेतलीं तर त्यांत म्हणजे त्या त्या शास्त्रांच्या सिद्धांतांत ज्या कांहीं सर्वमान्य गोष्टी सर्व सत्‌शास्त्रांचें, ज्ञानशास्त्रांचें व आनंदशास्त्रांचें नियमन करितात असें दृष्टोपत्तीस येतें. म्हणजे असें; भूगर्भशास्त्र, ज्योतिष, जीवनशास्त्र, इत्यादि जीं अनेक-अनंतच-कां म्हणाना? इंदप्रत्ययशास्त्रें [ Objective Sciences ] आहेत, त्या सर्वांत 'अस्ति' हा नित्यभाग आढळून येतोच येतो. या अस्तित्वाच्या साहाय्यानें आणखी कांहीं सिद्धांत, सामान्य सिद्धांत सांगतां येतील, ही गोष्ट निराळी; पण 'अस्ति' ही गोष्ट सर्वत्र आहे व तिच्याच योगानें त्या त्या शास्त्रांतील सिद्धांतांचें समर्थन होत आहे. याचप्रमाणें अहंप्रत्ययशास्त्रें [ Subjectve Sciences ] म्हणून ज्या शास्त्रांस म्हणतात, त्या सर्वांत 'चित्' ही सर्व साधारण गोष्ट आहे व तिच्याच योगानें त्या त्या शास्त्रांतील गोष्टींचें नियमन होत आहे. शेवटीं इच्छाप्रधानशास्त्रांमध्यें [ Moral sciences ] आनंद ही वस्तु सर्वमान्य आहे व तीच वस्तु सर्व इच्छाप्रधानात्मक. शास्त्रीय सिद्धांतांचें नियमन करीत आहे. पुढें या सत्-चित्-आनंदाचा विचार यथास्थित केला असतां ते तिन्ही पदार्थ एकस्वरूपच आहेत आणि ते स्वरूप शब्दातीत असल्यामुळें केवळ 'ब्रह्म' या संज्ञेनें लक्षित करावयाचें आहे; हें ब्रह्म केवळ म्हणजे निर्विकार म्हणजे अनंत म्हणजे नित्य म्हणजे एकरस आहे. हा सांख्ययोग अथवा तत्त्वज्ञान होय.

कर्मयोग [ Practical Philosophy ] ही तत्त्वज्ञानाची दुसरी बाजू आहे, किंवा योगवासिष्ठांत म्हटल्याप्रमाणें 'उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः । तथैव ज्ञानकर्माभ्यां जायते परमं पदम्' [ ज्याप्रमाणें पक्षी आकाशांत आपल्या दोन बाजूंच्या पक्षांनीं भ्रमण करितो, त्याचप्रमाणें परमपदाला जाणारा पुरुष ज्ञान आणि कर्म या उभयतांच्या साहाय्यानें आपला मार्ग क्रमीत असतो ] कर्म (practical) आणि ज्ञान (Theoretical) हे दोन पक्ष आहेत. असो; या कर्मयोगांत पुरुषार्थाचा मार्ग सांगितलेला असतो. तसेंच कर्मयोगांत स्वतःच्या कल्याणाचें कर्म (Morality, promoting Individual good) देवता इत्यादि प्रसन्न करून घेण्याचें कर्म (Religion, satisfying minor Deities &c.) लोकसंग्राहक कर्म (Disinterested morality) आणि उपासना (Selfish and selfless devotion) इत्यादिकांचा संग्रह होतो. म्हणजे धर्मादि चार पुरुषार्थ सांगितले आहेत त्यांचा क्रमविपर्यय करून अर्थ, काम, धर्म आणि मोक्ष अशा ओळीनें त्यास बसविले म्हणजे या पुरुषार्थास अवश्य अस-

करणें म्हणजे मानसशास्त्र आणि कर्मयोग यांचा परस्पर गोंधळ उडवून देण्यासारखें आहे; मला माझ्या स्वभावानुरूप एक गोष्ट [उदाहरणार्थ परनिंदा] **चांगली 'वाटते' म्हणून** ती **चांगली 'आहे'** असें म्हणण्याप्रमाणें आहे. असो; हें म्हणणें भ्रांतिमूलक आहे हें सांगण्यास नकोच. पुनः; उत्क्रांतीच्या नियमानुसार मनुष्याची व समाजाची उन्नति चाललीच आहे; तेव्हां या उन्नतीस अनुकूल जें वर्तन तें सद्वर्तन असें धरिलें तरी, अमुक एक परिणाम होणार असें शास्त्रानें सांगितलें असतांही तो 'चांगलाच' आहे असें आपण म्हणत नाहीं. प्लेगनें आजारी पडलेला मनुष्य मरणार असें डाक्टरानें सांगितलें व ज्योतिषानेंही सांगितलें, तरी त्याला आपण 'मरण जवळ करणारीं औषधें' देणार नाहीं! सारांश, जें वस्तुगत नियमांनीं व्हावयाचें त्यालाच आपण 'चांगलें' म्हणतों, असा नियम नाहीं. तात्पर्य, 'चांगलें, ही कांहीं निराळीच वस्तु आहे.

याप्रमाणें मानसशास्त्रानुसार किंवा समाजशास्त्रानुसार, तसेंच उत्क्रांतिशास्त्रांतर्गत जीवनशास्त्रानुसार विचार झाला. यासंबंधें आमचा नीतिशास्त्रज्ञ इतकेंच ह्मणेल कीं, मानसशास्त्र अथवा समाजशास्त्र कोणतेंही कर्म उत्पन्न करो, तें कर्म करीत असतां 'अहंता' नष्ट करणें, 'रागद्वेषांस रजा देणें' हें कर्त्याच्या स्वाधीन असतें. याचप्रमाणें प्रकृतीला ज्ञानानें क्रमशः ताब्यांत आणणें हेंही त्याच्या स्वाधीन होतें: हें जर त्यानें केलें नाहीं, तर तो अर्थातच गुन्हेगार झाला.

आतां धर्ममीमांसेच्या दृष्टीनें एकादा ख्रिस्त विचार करूं लागल्यास तो ह्मणेल कीं, भगवान् सत्यसंकल्प आहे. म्हणजे त्याचे संकल्प सत्यास, सद्भावास व साधुभावास अनुसरूनच असतात. तेव्हां त्यानें हें जें जड जगत् निर्माण केलें आहे, तें त्याच्या सर्वशक्तित्वाचें **प्रकट स्वरूप** व ह्या जगताच्या निरीक्षणावरून जे वस्तुनियम मनुष्यास समजतात, ते **नियम**-( अर्थातच हे समजलेले नियम थोडे असावयाचे! कारण जगतांतील सर्व वस्तूंचे सर्व नियम मनुष्यास समजणें शक्य नाहीं. )—हे ईश्वरीआज्ञांचा आविर्भाव होत. आणि भगवद्धेतु जितका आपल्यास अनावृत झाला, समजला, त्याप्रमाणें वागणें हें आपलें कर्तव्य-कर्म व परमेश्वरी सेवा होईल. सारांश, येथें म्हणजे धर्मदृष्टीनें ज्ञान आणि कर्म यांचा संबंध आपल्यास समजून घेतां येतो. तथापि ज्ञान अनंत व पाहणारा जीव सांत असल्या-मुळें ज्ञान आणि कर्म यांत अपौरुषेय ज्ञानाशिवाय एकरसता येणें शक्यच नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

पण हेंही जुळत नाहीं. धर्मपुस्तकांत सांगितलेल्या आज्ञा ईश्वरकृत असें मानिलें तर या आज्ञेंत इच्छा आणि शिक्षेची भीति या उभयतांचा समावेश होतो. आतां ईश्वर जर सत्य-संकल्प आहे, तर त्याचा आज्ञाभंग होण्याचा संभवच मुळीं नाहीं. नुसती 'भीति' आहे असें ह्मटलें तर सर्वसद्गुणसंपन्न परमेश्वर विनाकारण भीति घालील असेंही होणार नाहीं. शिवाय, परमेश्वर सर्वशक्तिमान् व सर्वदयाघन असतांनाही या जगांत 'वाईटाचा' उद्भव कसा झाला ?

इच्छास्वातंत्र्यामुळें ( कामादि रजोत्पाद्य विकारांमुळें ) 'पापांचा' उद्भव झाला असेंही ह्मणणें जुळत नाहीं. कारण मनुष्यकृत पापाखेरीज आधिभौतिक व आधिदैविक दुःखें काय थोडीं आहेत? तेव्हां हीं दुःखें, या आपत्ति, कोठून आल्या? दयाघन ईश्वर या आपत्ति उत्पन्न करणार नाहींच. तेव्हां या आपत्तींचें कारण ईश्वराहून निराळें हवें. एवंच निराळीच उपाधि आली. तेव्हां अर्थातच सत्यसंकल्प ईश्वर आहे व तो सर्वशक्ति आहे, हें ह्मणणें लटिकें पडलें; कारण उपाधींचा विचार केला असतां ईश्वराला आपलें सत्यसंकल्पत्व सोडून देणें व आपलें अशक्तित्व कबूल करणें भाग आहे, असें ठरलें! पुनः या दैवी जगद्राज्यांत नीतीचा अधिकार सर्वगामी आहे कीं नाहीं? प्रत्यक्ष अनुभवावरून तर नीतीचें साम्राज्य आहे असें दिसत नाहीं. आतां ज्या परमेश्वरानें हें विश्व घडविलें, त्यानें या विश्वाचा नकाशा आधीं आपल्या मनांत काढिलाच असेल, व नकाशाबरहुकूमच विश्वरचना उद्भूत झाली असेल. आतां प्रकट झालेल्या विश्वांत जर नीतिसाम्राज्य नाहीं, तर ईश्वराच्या घरींही तें नाहीं असेंच ह्मणणें भाग आहे. सारांश, मनुष्यज्ञानानें या प्रश्नांचा छडा लागणें असाध्यच आहे.

आतां, शेवटी ज्ञान आणि कर्म हे दोन्ही एकाच विचाराचे पुत्र आहेत, असें मानिलें तर या दोघांत बंधुत्वाचें नातें होईल; म्हणजे ब्रह्म याचे हे दोन मुलगे आहेत असें मानलें तर कोणत्याही निरनिराळ्या मार्गानें त्यास जाऊंद्या, ते शेवटीं ब्रह्मपदालाच येतील. पुनः ईश्वर सत्यसंकल्प आहे, हें खरें आहे: आणि विवर्तवादानुसार हें विश्वचक्रही अनादिकालांत सुरू होऊन अनंत कालपर्यंत चालणार हेंही खरें आहे. तेव्हां जीवांच्या हातून जीं काय बरीवाईट कृत्यें होतात, त्यांचा कर्मविपाक त्या त्या जीवास भोगलाच पाहिजे. ईश्वर दयाघन आहे, तितकाच न्यायीही आहे. त्याच्या न्यायांत दया आहे व दयेंत न्याय आहे. तेव्हां 'चांगला वाईट भाग' जो येथें दिसतो, तो मनुष्यकृत, जीवकृतच असतो. आतां प्लेग, पटकी अथवा जरीमरी इत्यादि जीवसंहारक रोग उत्पन्न होतात, ते जीवांच्या अयुक्त आचरणापासून उत्पन्न होतात. 'यांत केशाचें प्रायःश्चित्त नान्यास' मिळतें हें खरें, पण नान्याचा जन्मच पूर्वसंचितानें असल्या प्रकारचीं संकटें भोगण्याकरितां झाला होता, झाला असला पाहिजे! भूकंप, अनावृष्टि या अनर्थपरंपरा पूर्वकालांत उत्पन्न झालेल्या कारणांचीं कार्यें होत. शिवाय धर्मशास्त्राअन्वयें पाहिलें तर आलेल्या प्रसंगासंबंधें सुख किंवा दुःख मानणें हें प्रत्येकाचे मनोघटनेवर अवलंबून आहे. प्लेग आला म्हणजे सर्वत्र हाकाटी सुरू होते, पण नदीवरील काटी आनंदांत असतो. सारांश, तात्कालिक सुख मिळणें सुख नव्हे, व (२) अनेक सुखदुःखांचे प्रसंग आणून व त्यांत समाधानानें राहणें श्रेयस्कर आहे, हें जीवास शिकवून त्याचा उद्धार करावयाचा, हा परमेश्वरी हेतु आहे. तो आपल्यास व्यवहारकाळीं समजत नाहीं म्हणून याच्या नांवानें हांका मारणें यासारखा वेडेपणा नाहीं. एवंच सुखदुःखें मायीक आहेत, अद्वैतज्ञान मात्र सत्य आहे, हें मानल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

सारांशरूपानें सांगावयाचें म्हणजे ज्ञान आणि कर्म, ज्ञान आणि विज्ञान, यांचें लग्न शुभमुहूर्तावर लागून पुनः ताडातोड होण्याची भीति नाहींशी झाली ह्मणजे ब्रह्मज्ञान होतें. युरोपियन लोकांचा प्रकार मला ठाऊक नाहीं; पण आमच्याइकडे ब्रह्मज्ञानविज्ञान झालें कीं, पुरुष मुक्तच होतो, असें श्रुति सांगते. ' याप्रमाणें पूर्वी पुष्कळांस अनुभव आहे, व पुढें ही येईल. विद्याभ्यासाच्या साहाय्यानें व अध्यात्माभ्यासाच्या सहाय्यानें, तसेंच मानसशास्त्राभ्यासानें, ' जें आहे ' म्हणून श्रुतिलक्षित वस्तूचा निश्चय झाला, व तीच वस्तु ' असावी ' असा नीतीचा, धर्माचा, राजशासनाचा, कायद्याचा अभिप्राय निश्चयानें पडला म्हणजे सांख्य व योग (Philosophy. Theoretical and Practical) यांचा शुभकारी संगम होतो; व श्रुतिप्रणीत मार्गानें गेलें असतां व परोक्ष ब्रह्मज्ञानाला विज्ञानाचें (स्वानुभवाचें) स्वरूप दिलें असतां मुक्ति मिळते. हाच ज्ञानाचा, तत्त्वज्ञानविज्ञानाचा, ब्रह्मविद्येचा शेवट, हेंच पर्यवसान आहे. ' ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ' . हें गीतावाक्य हाच अर्थ कंठरवानें प्रतिपादित आहे.

## सिद्धांत.

याप्रमाणें सांख्य, योग, मीमांसाद्वय न्यायतर्क इत्यादिकांचे सिद्धांत पाहून, माध्वादिकांचे सिद्धातांचा विचार करून, युरोपियन ज्ञानवाद्यांचें ह्मणणें ऐकून घेतल्यानंतर मला तरी निदान असें वाटतें कीं, श्रीमद्भगवद्गीतेमध्यें जें सांख्यज्ञान आहे व जो कर्मयोग आहे त्याची एकवाक्यता, ह्याचप्रमाणें सर्व प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांची, पंथांची, धर्मांची, राजशासनांची व ललितकलांची एकवाक्यता 'केवळ अद्वैतसिद्धांतानें ' मात्र होणार आहे. प्रत्येक जीवाला, प्रत्येक प्रसंगीं 'काय आहे तें पाहून व काय असावें तें ठरवून त्याप्रमाणें वर्तन करावयाचें ' ह्मणजे त्या त्या जीवानें,-अपौरुषेय उपनिषदांचें उत्तम मंथन श्रीमद्भगवन्मुखानें होऊन जें गीतामृतदुग्ध प्रकट झालें आहे,-त्याचा अधिकारपरत्वें सद्गुरूकडून आस्वाद घ्यावा, आणि ज्ञानोन्मुख व कर्तव्योन्मुख होऊन आत्मोद्धार करण्याचा व करविण्याचा अखंड प्रयत्न चालू ठेवावा. जर आपल्यास शुद्ध विचार हवा आहे, जर आपल्यास अभंग सुखशांति हवी आहे, तर आपण सर्वजणांनीं गीतांतर्गत सर्वशास्त्रप्रमेयांचा व पंथांचा अधिकारानुसार आक्रम करून प्रत्येकानें ' उद्योगी ' ( वर नेणारा जो योग त्याचे भक्त ) झालें पाहिजे; ह्मणजे ज्ञानार्जनासंबंधानें, उपासनेसंबंधानें किंवा आत्मोद्धारक अथवा विश्वोद्धारक कर्तव्य करण्याचे संबंधानें आपल्यास कोणाच्याही तोंडाकडे बघण्याचें कारण उरणार नाहीं. श्रीपरमेश्वर ही माझी इच्छा आपल्या सत्यसंकल्पानुसार प्रसिद्ध करो, अशी प्रार्थना करून व '**सर्व जगाची आत्मिक उन्नति करण्यासाठीं मात्र** आम्हांस त्या विश्वाधिप परमेश्वरानें निर्माण करून आजपर्यंत जिवंत ठेविलें आहे व आमच्याचपाशीं त्यानें ब्रह्मज्ञानाचा अतीव तेजस्वी ग्रंथसमूह ठेविला आहे, हें प्रत्येक आर्यबंधूनें लक्ष्यांत ठेवावें ' अशी प्रेमपूर्वक सूचना करून सहनाववतु, सहनौ भुनक्तु, सहवीर्यंकरवावहै। तेजस्विनावधीतमस्तु, मा विद्विषावहै ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः असा शांतिपाठ करितों.

**शिवा नः संतु पन्थानः श्रीकृष्णार्पणमस्तु. मंगलमूर्ति मोरया,**

# भाग चवथा.



## सामान्य विचार.

पुढें अद्वैताच्या—कैवलाद्वैताच्या—विरोध करणारीं व 'माया नाहीं' असें एककंठानें म्हणणारीं तीन मतें दिली आहेत. श्रीमद्वल्लभाचार्य हे शुद्धाद्वैतवादी आहेत; श्रीरामानुजाचार्य हे विशिष्टाद्वैतवादाचे पुरस्कर्ते आहेत आणि श्रीमदानंदतीर्थ हे माध्व मताचे प्रणेते आहेत. या सर्वांसही मायावाद संमत नाहीं, इतकेंच नव्हे, तर हा मायावाद प्रस्थानत्रयांत (उपनिषदें, ब्रह्मसूत्रें व श्रीमद्भगवद्गीता या ग्रंथांत) नाहीं, असें या सर्वांचें आग्रहपुरःसर सांगणें आहे. मायावादाचा आतां इतक्यांतच मी खाला विचार करितों आहे; पण त्याच्या आधीं, या वादाच्या मुळाशीं काय आहे, हे पाहून हे प्रकरण आटोपतों.

आचार्यांचा काल फार फार अलीकडे ओढला, तरी त्यांस खि० शकाच्या आठव्या शतकाच्या पुढें आणितां येत नाहीं. श्रीरामानुजाचार्य १२ व्या शतकांत अवतीर्ण झाले. श्रीमदानंदतीर्थ १३ व्या शतकांत—निदान श्रीमद्भागवतग्रंथ प्रकट झाल्यावर--झाले; आणि श्रीमद्वल्लभाचार्य हे १६ व्या शतकांत प्रकट झाले, ही गोष्ट विसरतां कामाची नाहीं.

श्रीरामानुज हे परिणामवादाचा ( Evolution ) आश्रय घेऊन वाद करितात. दुधाचें दहीं होणे हा **परिणाम** होयः आणि हा परिणाम होत असतां कारणच कार्यरूपी होतें, असा यांचा अर्थ आहे. श्रीमन्माध्व हे नैयायिकांचे अभिमानी असल्यामुळें 'आरंभवादाचा' स्वीकार करितात. अत्यंत सूक्ष्म अणुद्वारां परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलें, असा यांचा पक्ष आहे. श्रीमद्वल्लभाचार्य हे 'अविकृत परिणामवादाचा' आश्रय करितात; म्हणजे कारणाचे कार्य होतें, तेव्हां कारणच कार्याचें स्वरूप घेतें हा परिणामवाद त्यांस सामान्यतः संमत आहे; तथापि कारणाचे स्वरूपांत यत्किंचितही भिन्नता उत्पन्न होत नाहीं, असें यांचें जास्त म्हणणें आहे. सारांश, या विविध रचनात्मक सृष्टीचें उपादानकारण व निमित्तकारण प्रत्यक्ष सर्व-सद्गुणाश्रय व सर्व जडाजड शरीरी श्रीभगवान् असून त्याच्या अमोघ इच्छेचा सृष्टि हा परिणाम आहे व सुखदुःख मिळावयाचें तें प्रत्येक 'अणु' जीवाच्या कर्माकर्मावर अवलंबून आहे हा श्रीरामानुजांचा परिणामवादी पक्ष होय. श्रीपरमेश्वरासारखेच नित्य अस्तित्वांत असणारे जे जड परमाणु ते घेऊन त्यांच्या साहाय्यानें (ते अणु उपादानकारण करून) श्रीभगवान् सृष्टीचे निमित्तकारण होतात. तसेंच ही सृष्टि झाल्यानंतर त्या परमात्म्याच्या इच्छेनें आरंभीं समसमान असलेले जीव परमाणु, सृष्टींत प्रवेश करून तिच्या सान्निध्यानें कर्में करितात आणि सुखदुःखभागी होतात, हा श्रीमन्माध्वाचार्यांचा आरंभवादी पक्ष होय. आणि सर्वाभिन्न असणारें जें ब्रह्म तेंच लीलाविग्रहार्थ

सृष्टीचें अभिन्न–निमित्तोपादान–कारण होऊन विविध रचनात्मक परंतु ब्रह्मस्वरूप असलेली सृष्टि उत्पन्न करितें, ठेवितें, आणि लयाला नेतें. तेथें ब्रह्माच्या कारणस्वरूपांत व कार्य-स्वरूपांत भेदभाव मुळींच नसतो. जीवाणूंस सुखदुःख होतें तें केवळ भिन्नानुभव घेण्यासाठीं श्रीपरमेश्वरानें केलेला लीलाविग्रह होय. हा श्रीमद्वल्लभांचा अविकृत परिणामवाद होय.

हे तिघेही आचार्य मायावादाचे कट्टे विरोधी आहेत. शिवाय हे तिघेही भक्तीचे अतिरिक्त अभिमानी असून **भक्तीनें मात्र मोक्ष मिळणार असें** म्हणणारे आहेत. शिवाय परमेश्वरी प्रसाद झाल्याविना मोक्ष मिळणें नाहीं आणि प्रसाद भक्त्यैकलभ्य आहे असें हे सर्वजण म्हणतात. ईश्वरीस्वरूपाचें, जीवस्वरूपाचें व जडस्वरूपाचें ज्ञान अवश्य आहे, असें कमी अधिक प्रमाणानें सर्वही म्हणतात; पण भक्ति अवश्य आहे व ज्ञानापेक्षां भक्तीचें माहात्म्य विशेष आहे असें सांगण्याचा या सर्वांचा कटाक्ष आहे. कर्मांची, वेदविहित व शास्त्रोक्त कर्मांची आवश्यकता सर्वांस सारखीच भासते व तें कर्म निष्काम-बुद्धीनें परमेश्वराला अर्पण केलें असतां चित्तशुद्धि होते व ज्ञान मिळविण्याचा मार्ग सोपा होतो आणि तेथून पुढें भक्तीचा पंथही सुलभ होतो असें सर्वजण म्हणतात. एवंच ( १ ) कर्म, ( २ ) ज्ञान आणि ( ३ ) उपासना असा या तीनही आचार्यांचा आत्मोन्नतिविषयक सोपानमार्ग आहे.

देहाच्या उपभोगाप्रीत्यर्थ उत्पन्न होणारी विषयवासना व विषयाभिमान हे दोन्ही अज्ञानजन्य आहेत हें सर्वांस संमत आहे. तसेच ज्ञानानें व भक्तीनें मात्र स्वस्वरूपाचें व परमेश्वरी स्वरूपाचें ज्ञान होऊन व भक्ति वाढून मोक्ष मिळतो येथेही संप्रतिपत्ति किंवा मतैक्य आहे. जीव ‘अणु’ परिमाणाचा व ईश्वर ‘विभु’ परिमाणाचा असा उभयतांत भेद आहे, हें तिघाही आचार्यांस सर्वमान्य आहे. तथापि रामानुजांच्या मतें ‘जीव हा ज्ञानस्वरूपी व आनंदस्वरूपी असतो,’ व जीवाची व्याप्ति ‘अणु’ असली तरी त्याचें ज्ञान व आनंद ‘विभु’ म्हणजे अमर्याद असतात; श्रीमन्माध्वांच्या मतें जीव हा नित्य पण ‘अणु’, अल्पज्ञ व दुःखी असतो, आणि श्रीमद्वल्लभाचार्यांच्या मतें जीव हा ‘अणु’ आहे तरी तो सर्वव्यापनशील व सर्वज्ञानशील असून तो ‘गुप्तानंदी’ असतो, म्हणजे त्याचा–प्रत्येक जीवाचा–आनंद लुप्त झालेला असतो, असें ह्मणतात. पण सर्वत्र ‘जीवास अज्ञानानें दुःख होतें’ या सिद्धांताच्या संबंधें ऐक्यमत आहे.

आतां ‘मायावादाचा’ विचार करून हें प्रकरण आटपतों. ‘माया’ म्हणजे अज्ञान होय. एक वस्तु असतां तिला दुसरें नांव देणें व **ती स्वेतर वस्तु आहे, असें सम-जून** व्यवहार करणें याचें नांव माया होय. आतां ‘माया’ कशी उत्पन्न होते, याचा विचार करण्यापूर्वी मनुष्यप्राणी आणि त्याचें स्वरूप सृष्टीवर प्रगट झाल्यानंतर काय काय प्रकार होतात, तें थोडक्यांत पाहूं.

अलीकडच्या युरोपियन शास्त्रज्ञांनीं आज सुमारें हजार वर्षेपर्यंत जे परिश्रम ज्ञानमार्ग वाढविण्यासाठीं केले, ज्या परिश्रमाला १५ वे शतकापासून उदात्त भरतीची उसळी येऊन सृष्टिविषयक तपश्चर्येच्या योगानें अनंतविध चमत्कारांपैकीं त्यांस अनेकविध चमत्कार प्रकट झाले आहेत, त्या त्यांच्या बुद्धिपूर्वक परिश्रमांवरून व प्रत्यक्ष अनुभवांवरून असें ठरलें आहे कीं; सृष्टींचें पंचीकरण होण्याचे आधीं ही सर्व सृष्टि अव्यक्त व अत्यंत विरलतम अशा बाष्पमय स्थितींत होती. या बाष्पमय स्थितीला आधुनिक पाश्चात्य लोक Ether व आमचे ऋषी आकाश असें म्हणतात. ईश्वरी नियमाप्रमाणें ही आकाशामधील नैसर्गिक गुणसाम्यावस्था (सत्त्व, रज व तम यांची समान अवस्था; चवदाव्या अध्यायाच्या उपसंहार पहा) मोडून जेव्हां पूर्वकल्पजन्य रजोगुणाचा उत्कर्ष होतो, तेव्हां सर्वत्र चक्राकार परिभ्रमण सुरू होऊन सूर्यमालेसारख्या अनेक तारामालांची उत्क्रांति (आमचा आर्य-शब्द म्हणजे विसृष्टि होय; असो) होते व आपल्या सूर्य-गोलांतून पृथ्वी ही पूर्वोक्त चक्राकार परिभ्रमणानें निराळी होते. तरी सूर्याभोंवतीं फिरण्याचें आपलें ब्रीद तिनें कायमच ठेविते. असो; पृथ्वी प्रथमतः अत्यंत तप्त होती व ती कालमानानें आपल्या मधील उष्णतेचें विसर्जन करीत करीत आजच्या स्थितीला येऊन पोंहोंचली आहे. जसजसी ती निवत चालली, तसतसें तिच्या पृष्ठभागावर क्रमाक्रमानें खडक विसृष्ट झाले, तिला आधार देण्याकरितांच जणु काय मोठमोठाले व धाकटेधाकटे पर्वत झाले; बाष्पावस्थेंतून जलावस्थेंत येत असतांना उत्पन्न झालेलें येथील जल सूर्यप्रतापानें वर जाऊन मेघमंडलें बनलीं व हवेच्या अनुकूलस्थितीनें पर्जन्य पडून नद्यांचे प्रवाह सुरू झाले, वृक्षसृष्टीचा उद्भव होऊं लागला; पुढें 'जीवांची' प्रकटता होऊन हजारों वर्षेपर्यंत उत्क्रमण होतां होतां मनुष्यदेहाची घटना सिद्ध झाली. मनुष्यदेहाची प्रकटता बाकीच्या जीवांच्या नंतर झाली ह्मणून कित्येक वरिष्ठ प्रकारच्या जीवांचें मन, त्यांची बुद्धि व त्यांची अस्मिता-बुद्धि मनुष्याला आयतींच मिळाली. युरोपियन मताप्रमाणें माकडानंतर मनुष्याची घटना झाली व आमच्या इकडे केव्हां अश्वानंतर व केव्हां धेनूनंतर घटना झाली असें म्हणतात. (पहा ऐतरेय उपनिषत् व पुरुषसूक्त). असो; पुष्कळ हजार वर्षे गेल्यानंतर जगण्यासाठीं सृष्टिनियमांचे अनुरोधानें वागणें व सृष्टीस स्वानुकूल वागावयास लावणें इत्यादि कर्मे व सृष्टीचें अवलोकन यथाशक्ति व यथाबुद्धि करून ती सृष्टि आपल्या उपयोगीं पडेल असें करणें हें सर्व कर्म व हें ज्ञान मनुष्याला आनुवंशीकसंस्कारांनी व शिक्षणसंस्कारांनीं प्राप्त झालीं आहेत. सर्वत्र कार्यकारणाचा नियम अबाधित आहे व सृष्टीचें वर्तन एकाकार आहे, हे नियमही स्थूलरूपानें प्राङ्मानवी जीवापासूनच मनुष्यास प्राप्त झाले आहेत.

असो; मनुष्यजीवाची वसति ठाम झाल्यानंतर तो चोहींकडे पाहूं लागला तेव्हां आपल्यासारखेच सर्व जगत्पदार्थ जिवंत आहेत, असें त्यास वाटलें आणि सूर्य, अग्नि, वरुण, उषस् इत्यादि देवता जिवंत असून आपल्यासारख्याच त्या कामक्रोधवश व दयानुग्रहवृत्तीच्या आहेत, पण आपल्यापेक्षां त्यांचें सामर्थ्य अनेकपटीनें मोठें आहे, अशी कल्पना करून

स्वकल्याणासाठीं त्यानें त्यांचें भजनपूजन करण्यास आरंभ केला. अनेक देवता वेदांत आहेत, तशाच इतर प्राचीन व अर्वाचीन धर्मांच्या मूलस्वरूपांतही आहेत. पुढें सृष्टीचा व्यापार अव्याहतपणानें एकाकारच चालला आहे असे विचार करितां करितां मनुष्याला दिसून आल्यानंतर सर्व देवतार्धांश असा एक सर्वशक्तिमंत परमेश्वर असून त्यानें प्रकृति-नामक मूलद्रव्यापासून ही सृष्टि निर्माण केली असावी, असा त्याचा ग्रह झाला. वेद-ग्रंथांत व विशेषतः ऋग्वेदांत 'एक देव' च असला पाहिजे व त्याच्या हाताखालीं व त्याच्या तंत्रानें वागणाऱ्या इतर देवता असल्या पाहिजेत, असा ध्वनि काढणाऱ्या ऋचा सांपडतात. इजिप्त, पर्शिआ (इराण) असीरिआ येथेंही असा उपक्रम झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. असो; कुंभार माती घेऊन दंडाच्या साहाय्यानें घट उत्पन्न करितो, त्याप्रमाणें देवानें प्रकृति घेऊन तिच्या साहाय्यानें हें विश्व निर्माण केलें असावें, अशी जी प्रतिज्ञा तिला 'आरंभवादात्मक' प्रतिज्ञा (Hypothesis) म्हणावें; सर्व द्वैतवादी (माध्व, ख्रिश्चियन, इस्लाम इत्यादि व नैयायिक) या मताचे पुरस्कर्ते आहेत. या मतान्वयें ईश्वर निराळा, प्रकृति निराळी व सुखदुःख भोगणारा व कर्म करणारा जीवही निराळा, असा सिद्धांत होतो. श्रीपरमेश्वर सर्व विश्वाच्या बाहेर उभा राहून प्रत्येक वेळी सृष्टीची व तेथील पदार्थांची उत्पत्ति करितो, असें यांच्या ह्मणण्याचें रहस्य आहे. पण दुधाचें दहीं करण्याला प्रत्येक घरीं सर्वशक्तिमान् ईश्वर जातो किंवा स्वर्गांत बसून तो तसें करितो, किंवा आपल्या हाताखालच्या देवदेवतांस प्रेषितो हें आरंभवादी (creation in Time) मत उपनिषत्कालांतील कित्येक ऋषींस जसें संमत झालें नाहीं, त्याचप्रमाणें १५।१६ व्या शतकांतील विचारी युरोपियन पुरुषांस वरील ख्रिस्ती मत पसंत पडेना. पण आरंभवादी धर्मगुरूंच्या पुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. उघडच आहे कीं, ईश्वर विश्वबाह्य असून तो आपल्या **इच्छेस येईल तेव्हां** आपल्यास योग्य वाटतील ते पदार्थ उत्पन्न करितो, असें मत धर्मानें दृढ केलें कीं, शास्त्रांची व तत्त्वविचारांची गति खुंटलीच ह्मणून समजावें. ख्रिस्ती जगांत व मुसलमानी जगांत 'धर्माचें व विचाराचें' (भक्तीचें व ज्ञानाचें) नित्य उभें खडाष्टक चालू राहतें. आज मित्तीसही आपण तेंच पहात आहों. तरी पण विशेष प्ररूढ ह्मणजे सामान्यतः जीर्ण झालेल्या बिचाऱ्या कांहीं धर्म समजुतींचें नित्य वृद्धिंगत होत. जाणाऱ्या विचारसामर्थ्यापुढें काय चालणार ? त्यांनीं कांहीं वेळ विचाराचा ओघ थांबविण्याची खटपट केली. परंतु नित्य जिवंत असणाऱ्या नदीला जसा सर्व बाजूंनीं पर्वतप्राय बंधारा घातला, तरी तो फोडून–निदान त्याच्या माथ्यावरून तरी–ती जिवंत नदी आपला मार्ग काढते, त्याचप्रमाणें विचारानें धर्ममतांचें अतिक्रमण करून आपला मार्ग शोधून काढिला; अशीच स्थिति वेदकालांत आमच्या इकडे झाली असली पाहिजे. आरंभवादानें समाधान होईना तेव्हां त्यांनीं परिणामवादाचा आश्रय केला. परिणामवाद ह्मणजेच युरोपियन उत्क्रांति (Evolution) होय. कांहींएक निराळा पदार्थ आंत न टाकितां दुधाचें दहीं होतें, अशाच प्रकारचे विविध अनुभव त्यांस आल्यावरून त्यांनीं असा सिद्धांत काढिला कीं, परिस्थित्यनुसार **कारणच कार्यस्वरूप** होतें. कार्यांतील सर्व गुणधर्म

कारणावस्थेंत सूक्ष्मरूपानें असतात आणि योग्य वेळ आली ह्मणजे ते प्रकट होतात. शिवाय दुसरें असेंही नित्य सत्यशील तत्त्व त्यांनीं शोधून काढिलें अथवा अंतर्यामीं परमेश्वरानें ऋषींच्या ज्ञानयोग्यतेनुसार त्यांच्या मनांत प्रेरिलें कीं, शून्यापासून अथवा अभावापासून भावरूपी पदार्थ अस्तित्वांत येत नाहीं. ( कथं असतः सत् जायेत ? ) आरंभवादांत हीच तर अडचण होती. परमेश्वर जर सर्वांच्या आधीं एकटा होता, तर त्यानें स्वभिन्न मूळप्रकृति कोठून व कशी उत्पन्न केली ? शून्यत्वापासून-अभावापासून भावरूपी-अस्तित्वरूपी-पदार्थ उत्पन्न करणें प्रत्यक्ष परमेश्वरालासुद्धां शक्य नाहीं. बरें! ईश्वराबरोबरच मूळप्रकृति स्वयंभू मानावी तर तिकडूनही पंचाईतच. तेव्हां आरंभवादाचा त्याग करून परिणामवादाचा स्वीकार आमच्या इकडील ऋषींनीं-ईश्वरीप्रेरणेनें-केला. यूरोपांत जसें धार्मिक पंडितांचें व विचारी पुरुषांचें १६, १७ शतकांत रण माजलें, तसा इकडे प्रकार झाला किंवा कसें हें सांगतां येत नाहीं. पण जो परिणामवाद यूरोपांत आजमित्तीस प्रचलित झालासा दिसतो, तो आमच्या इकडे कैक हजारों वर्षांपूर्वीं प्रचलित झाला होता. असो; भूस्तरांचा, वनस्पतींचा, प्राण्यांचा व मनुष्यांचा विचार ज्ञानदृष्टीनें करितां करितां एका आकाशापासून ही विसृष्टि झाली, असें कांहीं यूरोपियन पंडित आजमित्तीस ह्मणूं लागले आहेत, व नुकत्याच लागलेल्या रेडियमच्या शोधांवरून हेंच ह्मणणें सत्य आहे अशी शास्त्री मंडळींची खातरी होत चालली आहे. आतां आमच्या इकडे परिणामवादाचें पुरस्कर्तृत्व कपिल महामुनींकडे आहे. त्यांनीं विचार करून व अनुभव घेऊन असें ठरविलें कीं, मूलप्रकृति, महत् (बुद्धि), अहंकार ( Consciousness), मन, पंचतन्मात्रा (शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध), पंचज्ञानेंद्रियें, व पंचमहाभूतें ह्या चोवीस तत्त्वांपैकीं महदादि २३ तत्त्वें प्रकृतीपासून विसृष्ट झालीं. म्हणजे अर्थातच प्रथमतः प्रकृति आणि पंचविसावें तत्त्व पुरुष, हेच काय ते दोन पदार्थ होते, असें कपिलाचार्यांचें मत आहे. पुरुष नुसता भोक्ता आहे आणि प्रकृतीच्या संसर्गानें त्याला भोक्तृत्व प्राप्त होतें. प्रकृतीकडे सर्व कर्तृत्व आहे आणि तेंही सत्त्वरजादिकांच्या समविषमप्रमाणानें प्रकट होतें. हें उत्पन्न होणें याचेंच नांव परिणाम होय. कारण हें स्वरूपभिन्न कार्यस्वरूपानें प्रकट होणें हा परिणाम सृष्टीच्या आविर्भावांत (सृष्टिस्थितींत) दृश्य होतो आणि कार्याची कारणांत लीनता होणें, तिरोभवन होणें आणि पुनः प्रकृतिस्थितींत म्हणजे गुणसाम्यांत जाणें याचें नांव प्रलय होय. सारांश, सृष्टींत दोनच द्रव्यें आहेत तीं पुरुष आणि प्रकृति (प्रधान) ही होत. 'पुरुष हा भोक्ता व प्रधान कर्ता.' ह्या सिद्धांतानें पुरुषाचें कर्मपारतंत्र्य सिद्ध होतें व तो केवळ प्रकृतीचा एक पादकंदुक होतो. हें कपिलाचार्यांचें मत होय.

हें अनुभवविरुद्ध असल्यामुळें श्रीकृष्ण भगवान् व पतंजलि यांनीं उपनिषदांच्या आधारानें असें सिद्ध केलें कीं, आत्मस्वरूपाकडे ज्ञात असतां पुरुषाचें स्वातंत्र्य अप्रतिहत आहे. (पहा, तिसऱ्या व चवथ्या अध्यायांचे उपसंहार). असो; या परिणामवादाचा स्वीकार श्रीरामानुजाचार्यांनीं केला. पुरुष हा (जीव Soul) संसारस्थितींत अल्पज्ञ,

अल्पानंदी व अल्पसत्ताक असतो व स्वस्वरूपाला पावला म्हणजे तो पूर्णज्ञानी व पूर्णानंदी होतो, असें त्यांचें मत आहे. अनंत जीव आणि परिणत होणारी प्रकृति, हीं दोन मिळून परमेश्वराचें शरीर होतें. परमेश्वर या दोघांचा नियामक आहे व तो सर्वसद्गुणसंपन्न, सर्वज्ञ, आनंदस्वरूपी व सर्वशक्ति आहे, म्हणून त्याच्या आज्ञेनुसार हें जगत् विसृष्ट होऊन राहिलें आहे, व त्याच्या इच्छेनुसार तें प्रकृतीत लीन होईल. एवंच आज्ञा व इच्छा करणारा परमेश्वर सृष्टीच्या व जीवांच्या पलीकडे असून तो उभयतांसही अंतर्बाह्य व्यापणारा आहे. सृष्टि-नियम व मोक्षमार्ग हे त्यानें उत्पन्न केले आहेत. त्यानें असेच नियम कां केले व त्यानें असाच मोक्षमार्ग कां घालून दिला, याला या परिणामवाद्यांपाशीं कांहीं समाधानकारक उत्तर नाहीं.

'अविकृतपरिणामवाद' असा एक वाद आहे, त्याचा असा अर्थ कीं, कारण कार्य-रूप झालें तरी कारणाचें स्वरूप अविकृत राहतें; तेव्हां उत्क्रांत झालेली ही सृष्टि (कार्य) आणि ब्रह्म (मूलस्वरूप) हीं दोन्ही एकच असून ही विसृष्टि परमेश्वरानें केवळ लीलेकरि-तांच अविर्भूत केली आहे. पण परमेश्वराची लीला अशाच स्वरूपाची कां, असें या श्रीवल्लभाचार्यप्रणीतपंथास विचारलें तर त्यांच्यापाशींही कांहीं उत्तर नाहीं. एवंच आमच्या इकडे जे तत्त्वज्ञ झाले त्यांनीं आरंभवादानें कांहीं व परिणामवादानें पुष्कळशी सृष्टीची व्यवस्था लाविली. पण शंकानिरसनाचा सर्व भाग त्यांस उकलितां येईना. युरोपांतही डेकार्ट, स्पायनोझा, लायब्निटस, इत्यादि मंडळी झाली, पण त्यांच्यानेंही हा कार्यभाग उरकला नाहीं.

असो; आमच्याइकडे श्रीगौडपादाचार्य, श्रीगोविंदभगवान्, श्रीशंकराचार्य इत्यादि महातत्त्वज्ञांनीं पुनः एकवार नित्यशुद्ध अशा उपनिषदांचें व ब्रह्मसूत्रांचें आणि श्रीमद्भगवद्गी-तेचें पर्यालोचन केलें, तेव्हां त्यांस शेवटच्या अथवा अंतिम वादाची, विवर्तवादाची प्रेरणा झाली व तो वाद त्यांनीं प्रकट केला; त्याचेंच नांव 'विवर्तवाद' 'मायावाद' होय. युरो-पियन भाषेंत बोलावयाचें झालें म्हणजे या वादाला (Relativity of knowledge=सापेक्ष ज्ञानवाद) असें म्हणावें. विवर्तवाद म्हणजे काय तें आतां आपण पाहूं. थोडा अंधेर असून एकादी लांबशी दोरी पडलेली असली, म्हणजे आपल्यास सर्पाचा भास होतो; हें रज्जुसर्पभासाचें उदाहरण आपल्याकडे अगदीं बायकांमुलांच्यासुद्धां तोंडीं आहे. तें न घेतां दुसरें एक उदाहरण घेतों. माझ्या लिहिण्याच्या पेटीवर जी दौत आहे, त्या दौतीचें नांव, दौतीचें रूप (आकार, रंग, इत्यादि) यागुणांशिवाय मला दौतीचें कांहीं ज्ञान नाहीं; म्हणजे माझ्या ज्ञानेंद्रियांस जितके गुण प्रकट होतात, किंवा ज्ञानेंद्रियांनीं प्रकट केलेल्या गुणांवरून जें मी अनुमानितों त्यापेक्षां त्या दौतीचें जास्त स्वरूप मला कांहीं कळत नाहीं; म्हणजे दौतीच्या गुणकर्मांपलीकडे मला कांहीं एक माहीत नाहीं. दौत मूलस्वरूपांत कशी आहे, हें गुणकर्मांशिवाय व कार्यकारणांशिवाय सांगा असें विचारिलें

तर मला कांहीं सांगतां येणार नाहीं. गुणकर्मे एके ठिकाणीं जमून ही दौत झाली आहे असें म्हटलें तरी हे गुण द्रव्याशिवाय राहूं शकत नाहींत, गुणांस कांहीं तरी अधिष्ठान पाहिजे म्हणून द्रव्य तर असलें पाहिजे असें ठरतें. आतां गुणकर्मव्यतिरिक्त जें हें द्रव्य त्याचें माझ्या इंद्रियांस कांहीं भान होत नाहीं. कारण इंद्रियें गुणकर्म मात्र पाहूं शकणार! पुनः, माझीं इंद्रियें ज्या स्वरूपानें घटलीं आहेत, त्यापेक्षां त्यांची घटना निराळी असती तर ही दौत मला निराळ्याच स्वरूपानें दिसली असती. पहा कीं, कावीळ झालेल्या पुरुषास सर्व पिंवळेंच दिसतें; सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिल्यास प्रत्येक पदार्थ मोठाच दिसतो व दुर्बिणीनें पाहिल्यास लांबचे पदार्थ जवळसे भासतात. एवंच दौतीचें दृश्य स्वरूपज्ञान किंवा पदार्थांच्या आकारमानाचें ज्ञान माझ्या **इंद्रियांच्या घटनेवर अवलंबून आहे. तिचें मूलस्वरूप मला दिसतच नाहीं व जें गुणकर्मरूप दिसतें तें तीं इंद्रियें असें दाखवितील तसें दिसतें.** अर्थात मूळस्वरूपाचें मला इंद्रियद्वारा ज्ञान होत नाहीं; होतें तें अपूर्ण होतें; व कधीं कधीं मिथ्या ज्ञानही होतें. हें जें अज्ञान, अपूर्ण ज्ञान, किंवा मिथ्याज्ञान याचेंच नांव माया होय. इंद्रियजन्य ज्ञान तें सापेक्षज्ञान आणि मूळस्वरूपाचे ज्ञानाचा अभाव तें अज्ञान होय. जें जें म्हणून आपल्याला ज्ञान वाटत असतें तें अपूर्ण तरी असतें किंवा मिथ्या तरी असतें. माझ्या इंद्रियांस (म्हणजे मलाच! हीच माया!) तें ज्ञानपूर्ण व सत्य वाटतें हीही मायाच होय. तेव्हां दौतीचें जें **केवलस्वरूप** आहे, त्या स्वरूपाच्या अधिष्टानावर दौतीच्या गुणकर्मांचा, नामरूपाचा जो भास इंद्रियद्वारां मला होतो, तो **भास आहे, ज्ञान नव्हे** असें ज्यावरून मला कळतें तो **विवर्तवाद** होय. आतां ह्या वादानें जीवाची, सृष्टीची व ब्रह्मांची फोड आपल्यास कशी काय करितां येते तें आपण पाहूं. युरोपमध्यें जे ज्ञानदृष्टीनें कांट, हेगेल इत्यादि तत्त्वज्ञानी व भासदृष्टीनें मिल, स्पेन्सर, हक्सले इत्यादि ज्ञानी व तत्त्वदर्शी पुरुषांनीं **केवलाचें ज्ञान होणें अशक्य आहे, केवल** (Absolute) हें सदैव अज्ञेयस्थितींत राहणार; तसेंच मूलप्रकृति, शक्तिरूप, काल, आकाश, जीव ह्यांचें मूलस्वरूपही आपल्यास समजणें अशक्यच आहे; ह्यांचीं कार्यें आपल्यास दिसतील व यांच्या स्वरूपांत होणारे विकारही दृश्य होतील; **पण मूलप्रकृत्यादिक आहेत** यांच्यापेक्षां जास्त स्वरूपज्ञान आपल्यास होणार नाहीं; त्याचें रूप तर बदलतच असतें; तेव्हां (१) त्यांचे कांहीं विकार मात्र आपल्या इंद्रियांस गोचर होतात, व (२) इंद्रियांस गोचर होतात म्हणून त्या मूलप्रकृतिक विकाराचें **ज्ञान सापेक्ष असतें,** असें ठरविलें. पण अद्वैतवाद्याप्रमाणेंच कांट, हेगेल, शोपेनहार इत्यादि तत्त्वज्ञानी म्हणतात कीं, ज्याच्या सत्तेनें आपण प्रकृतिविकार पाहतों, सुखदुःख अनुभवितों व 'मी आहें' असें म्हणतों, तो सर्वसाक्षी आत्मा निर्विकार असून ज्ञेय आणि ज्ञाता, तोच आहे. तथापि अद्वैती ह्या सर्वांच्या पुढें जाऊन म्हणतात कीं, तो आत्मा आणि सत्ता, ज्ञान व आनंद हे एकार्थवाची शब्द असून, 'तो आहे, आत्मा आहे' हें ज्ञान प्रत्येकास प्रत्येक अवस्थेंत व प्रत्येक प्रसंगीं अनुभवप्रत्यक्ष आहे. जागृति, स्वप्न व सुषुप्ति—आणि तुर्या—यांचा तो निर्विकार साक्षी आहे हा अनुभव प्रत्येकास असतो

आहे. 'यावरून प्रत्येकास त्याचें भान असावें पण तें नाहीं' अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण आपलें चित्तशुद्ध नसते म्हणून आत्मज्ञान प्रत्यक्ष असूनही गोचर होत नाहीं. आतां हें ब्रह्म-हें ज्ञानस्वरूप-हेंच **केवल** होय. याचें ज्ञान सापेक्ष नाहीं. निरपेक्ष आहे. याचें प्रत्यक्षत्व नित्यसिद्ध आहे. मात्र तें अनुभवण्याच्या भूमिकेंत आपण असलें पाहिजे. म्हणजे आपण खरा अधिकार प्राप्त करून घेतला असला पाहिजे. असो; ज्ञातृत्व, ज्ञेयत्व यांस अंतर्भूत करणारें जें तत्त्व तेंच तें ब्रह्म होय. 'साखरेची गोडी म्हणजे काय?' हें जसें साखरेची चव प्रत्यक्ष व निरोगी स्थितींत घेतल्याशिवाय कळणें नाहीं, त्याचप्रमाणें वासनानिर्मूलत्व, अहंकारनाश इत्यादि संस्कार होऊन गुरुमुखानें शास्त्रग्रंथ वाचल्याशिवाय व विश्वरूपीं असून विश्वनियामक जो सगुण परमेश्वर सृष्टीची व्यवस्था करितो, त्याचें आकलन योगप्रणीत भक्तीनें केल्याशिवाय कळणार नाहीं, अनुभवास येणार नाहीं, किंवा प्रत्यक्षही होणार नाहीं. तथापि तें स्वरूप आपणच आहों, व तें स्वरूप निर्विकार व निरंजन आहे, यांत मात्र शंका नाहीं. हे सिद्धांत अर्थातच युरोपियन सिद्धांताच्या पुढचे आहेत. हल्लींची ज्ञानपतश्चर्या कायम टेविली तर मात्र युरोपियन तत्त्वज्ञानी शेवटीं ब्रह्मतत्त्वाकडे येतील, व ते ब्रह्मरूपास ओळखतील, अन्यथा नाहीं, हें सांगावयास नकोच. आतां, अहंकारापासून तों अत्यंत सूक्ष्म परिमाणु व स्थूल पदार्थ यापर्यंत जी ज्ञेयसृष्टि आहे, तिचें यथार्थमूलस्वरूप समजणें अशक्यच आहे. ( पहा गीता अ० १५ श्लोक ३ ). ती आहे हें आपल्यास समजतें, पण ती कशी आहे हें समजत नाहीं व केव्हांही समजणार नाहीं. म्हणून 'ती खरी आहे' असेंही म्हणतां येत नाहीं, व दिसते म्हणून 'खरी नाहीं' असेंही म्हणतां येत नाहीं. ती विकारशील आहे म्हणून तिला 'खरी' असें नांव देतां येत नाहीं व विकारांचें अधिष्ठान ती आहे म्हणून ती 'खोटी आहे' असेंही म्हणवत नाहीं. हेंच मायेचें स्वरूप होय. 'काय आहे' हें ज्ञानदृष्टीला न सांगतां येणें पण 'ठाऊक आहे' असें वाटणें, याचें नांव माया आहे. हा ज्ञानदृष्टीनें विचार झाला. या विचाराचा आपल्या देशांत एक अनिष्ट परिणाम झाला असें मला वाटतें. महाभारतकालापर्यंत तत्त्वज्ञानी लोक 'ही सृष्टि, तिचें स्वरूप व तिचा कार्यकारणसंबंध आणि तिची विसृष्टि, हीं सर्व अगम्य आहेत' हें ठाऊक असूनही विश्वाचा शोध करून प्रत्यहीं सृष्टीचे नवे नवे चमत्कार हुडकून काढीत व उपनिषदांतील सिद्धांतांची सत्यता अजमावून पहात. पण पुढें कांहीं कारणांनीं बुद्धिमांद्याचा अवतार होऊन 'ठाऊक होणारच नाहीं, मग खटपट तरी कशाला?' असा बायकी आळस व नेभळा विश्वास उत्पन्न होऊन विश्वावलोकन राहिलें, उपनिषत्सिद्धांतांचें प्रत्यक्षत्व संपलें, आणि कसा तरी संसार कंठावयाचा, इतकें मात्र कर्मज्ञान शिलक उरलें! पहा कीं आयुष्य संपणार, आतां जगणें शक्य नाहीं, अशी रोग्याची स्थिति झाली असतांही ज्याप्रमाणें आपण औषधयोजना करीतच असतों, त्याप्रमाणें विश्वरूपज्ञान यथार्थ होणार नाहीं, असें समजलें तरी विश्वविकारांच्या कायकारणांचा शोध व पदार्थांच्या गुणधर्मांचें अवलोकन जितकें शक्य असेल तितकें करणें व विश्वज्ञानमर्यादा वाढविण्यासाठीं प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य

होतें. पण हें कर्तव्य सोडून देऊन आणि आपल्या पूर्वजांनीं जें ज्ञानभांडार आपल्यासाठीं संपादन करून ठेविलें होतें, त्यावर निवळ अंधळा विश्वास ठेवून वागण्याची –आपल्या बुद्धिमांद्याच्या काळांत आपल्यास–संवय लागली हेंच आमच्या ऱ्हासाचें मुख्य कारण आहे, असें मला वाटतें. सुखदुःखाच्या दृष्टीनें व कर्मदृष्टीनें विचार केला असतां 'विषयसुख" हें विकारशील असतांही तेंच खरें सुख वाटणें हीच माया होय. आत्मस्वरूपांत जो निष्कल आनंद आहे त्याचा एक लेस सुद्धां विषयानंदांत नाहीं, याचा प्रत्यक्ष अनुभव येत असतांही विषयसुखाकडेच धांव घेणें, अनेक प्रकारच्या विषयवासनांचा अवलंब करून रात्रंदिवस चिंतामग्न असणें याचेंच नांव माया, हें खरें. पण याचा अर्थ असा नाहीं कीं, आपलें शमदमादि स्वोपकारक व दया, शांति, क्षमा इत्यादि परोपकारक कर्मांचा आपण सर्वथा त्याग करावा. ह्यांचा त्याग सर्वथा वर्ज्य होय. तसेंच शास्त्रोक्त कर्में चित्तशोधक आहेत, म्हणून करावयाचीं, विषयसुखासाठीं करावयाचीं नाहींत, असें समजून विहित कर्म करणें, हें आपलें कर्तव्य आहे. (पहा अ. १८ श्लो. ५). असो; तेव्हां 'मी देहादिक नसतांना मी देहादि आहें,' असें मानणें ही अभिमानजन्य माया, आणि 'विषयसुख हें खरें सुख नसतांना' विषयसुखासाठीं धडपड करणें ही वासनाजन्य माया, या दोघींचा उगम अज्ञानापासून आहे. एकाचा आरोप दुसऱ्या भलत्यावर केला आहे, हा अध्यास होय. या अध्यासाचा विचार जेथें होतो, तो अध्यासवाद अथवा विवर्तवाद होय. आतां या वादांत जीवस्वरूप व जडस्वरूप परमार्थतः ब्रह्मस्वरूपच आहेत, अस्ति-भाति-प्रियत्त्व ही त्रयी सर्वत्र ओतप्रोत भरलेली आहे. कार्यकारण, कालाकाश इत्यादिकांचें पारमार्थिक वास्तव्य पारमार्थिक स्वरूपांत नाहीं, एकच एक अद्वितीयत्वानें पूर्ण आहे, असा मुख्य सिद्धांत आहे. 'सर्वच एक, एकरस, एकस्वरूप आहे, तर विविधत्व विचित्रत्व, व विकारशीलत्व आलें कोठून? असें विचारणें बरोबर नाहीं. पहा कीं, विचार करणारी जी आपली बुद्धि तीच मुळीं प्रकृत्यात्मक आहे, तेव्हां प्रकृतिजन्य जी बुद्धि, तिला प्रकृतीच्या अधिष्ठानाचें ज्ञान होईल, अशी कल्पना करणें म्हणजे आपल्या खांद्यावर आपण उडी मारण्यासारखें आहे! सांतानें अनंताचा शोध लावणें, परिच्छिन्न बुद्धीनें अनादिमायेचा शोध करणें, अशक्यच होय. तेव्हां विवर्तवाद या विविधतेसंबंधें असें म्हणतो कीं, परमार्थतः विविधता नाहीं. विविधतेचा व्यवहारकालांत जो भास होतो, तो अज्ञानामुळें आहे. हें अज्ञान अनादि आहे, ज्ञानाचा उद्भव होतो त्याचवेळीं या अज्ञानाचा उद्भव होतो. आणि जसजसें ज्ञान–विषयज्ञान–वाढत जातें, तसतसें अथवा त्याच्या अनेक पटीनें अज्ञान वाढत जातें. पहा कीं: गुरुत्वाकर्षणानें निराश्रित पदार्थ खालीं पडतो असें समजलें कीं, 'गुरुत्वाकर्षण आलें कोठून' हा अज्ञानप्रेरित प्रश्न दत्त म्हणून उभा आहेच! तेव्हां 'ज्ञेय' पदार्थ आहे, असें परिछिन्न ज्ञान झालें कीं, त्याच बरोबर अज्ञान येतें. आतां ज्ञानाचा उगम जसा ज्ञानाला सांगतां येत नाहीं, तसाच अज्ञानाचा उगम ज्ञानाला सांगतां येणार नाहीं. व्यवहारकालांत ज्ञान अनादि आहे तसेंच अज्ञानही अनादि आहे. पण हीं दोन्हीं सांत आहेत. ब्रह्मज्ञानाच्या साक्षात्कारं

झाला आणि जीवाचें जीवत्व (म्हणजे परिछिन्न ज्ञानस्वरूप) जाऊन अपरिछिन्नत्व प्राप्त झालें, म्हणजे भेदज्ञानाचा व भेदमूलक अज्ञानाचा अंत होतो व अनंतत्व प्राप्त होतें. जसें कालाची गणना करू लागलो म्हणजे काल अनंत आहे असें व्यवहारकालांत आपल्यास निश्चितज्ञान होतें, तरी परिछिन्न बुद्धीच्या सोईकरितां आपण विपळ, पळ, घटका, प्रहर, दिवस, पक्ष, मास, वर्ष, पिढी, शतक, युग, महायुग, कल्प इत्यादि विभाग करितों आणि सांत विपळादिकांनी आपला व्यवहार चालवितो; त्याचप्रमाणे व्यवहारकालांत सुद्धां जें ब्रह्म अनंत आहे, त्याचे जीव व जड असे विभाग कल्पून आपला व्यवहार, चालवितों; पण खरा, चिरंतन राहणारा, भेद व्यवहारकालांत सुद्धां नाहीं, मग परमार्थांत कोठून असणार? तेव्हां जीव व जड इत्यादिकांची उत्पत्ति, स्थिति, प्रलय, यांचा विचार कधी कधी आपला परमार्थपूर्ण विवर्तवाद, श्रुतियुक्ति अनुभवांस अनुकूल अशा आरंभवादानें करितो, कधी परिणामवादानें करितो व कधी अविकृत परिणामवादानें करितो. मात्र भेद इतकाच की, नैयायिकपक्षाला आश्रय देणारे आरंभवादी शुद्धद्वैती, सांख्यांच्या परिणामवादाचा अवलंब करून सर्व सृष्टीचा उलगडा करणारे विशिष्टाद्वैतवादी, अविकृत परिणामवादाचा आश्रय करून सिद्धांत ठोकणारे शुद्धाद्वैतवादी, हे लोक जसे बाहेरील निमित्तकारणाचा आधार धारिला तरच मोक्ष मिळेल असे म्हणतात, ( ईश्वरी कृपा, ईश्वरी अनुग्रह व ईश्वरी लीला. ही बाहेरील निमित्तकारणे होत. ) तसे मात्र विवर्तवाद कधींही म्हणत नाहीं. मोक्ष मिळवावयाचा असेल त्याने स्वतःच्या आत्म्याच्या मात्र सहाय्यानें खटपट, तपश्चर्या, भक्ति इत्यादि करून जसजसा आपला सोपाधिक आत्मा उपाधिविन्मुख करीत जाऊं तसतसें वरिष्ठ प्रकारचे ज्ञान व वरिष्ठ प्रकारचे कर्म संपादन करून जीवानें आपली जीवयात्रा संस्कृत व संस्कृततर करून आपणच संपविली पाहिजे. हा अंतिम विचार व हें अंतिम कर्म आहे. प्रथमतः म्हणजे व्यक्तीच्या अगर समाजाच्या बालपणांत–'सर्व पदार्थ परस्परांहून भिन्न व आपल्यासारखेच सजीव आहेत' असें प्राथमिक ज्ञान असते, तेव्हां–अनंत देव आहेत, अनंत कारणे आहेत, देह हाच मी आहे, असे तत्त्वज्ञान असतें व अनेकविध उपासना ही भक्ति, स्वदेहसंरक्षण ही नीति आणि स्वोपभोगाचे कर्म हें कर्तव्य असतें. पुढे ज्ञान वाढत जाते, तसे पदार्थ अनंत पण त्यांच्या जाति नियमित आहेत, सजीव निर्जीव असे भेद आहेत, असा निश्चय होऊन देवांच्या जाति व कारणांच्या जाति आहेत, हें तत्त्वज्ञान उत्पन्न होते. उपासना नवविध होतात, स्वजातिसंरक्षण ही नीति होते आणि जातिमात्र—विषयक कर्तव्यकर्म होतें. येथे आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक शास्त्रांस ( Physical, Mental and Divine) आरंभ होतो. पुढें, अनेक आधिभौतिक शास्त्रांचे सिद्धांत एका सामान्य शास्त्रांत अंतर्भूत होतात व त्या शास्त्रांतील सिद्धांताच्या अनुरोधानें बाकीचीं शास्त्रे चालतात, त्याचप्रमाणें अनेक जातींच्या देवांत एक देव मुख्य होतो, प्राण्यांचे वर्गीकरण होऊन प्रती ठरतात आणि वर्तनाचे नियम ठरून त्यांचा हेतुही ठरतो. तसेंच शास्त्रांतील कार्यकारणसंबंध व साहचर्यसंबंध, यांचें बरेंच ज्ञान झालें असतें, म्हणून तत्त्वज्ञानास सुरवात होऊन

या. विश्वाचा सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ व सर्वसाक्षी असा एक कर्ता असला पाहिजे असा आरंभवादात्मक तात्त्विक सिद्धांत प्रचलित होतो: व त्या ईश्वरानें मानवीनियमनार्थ केलेला ह्मणून जो ग्रंथ असेल त्याप्रमाणें वागणें ही नीति होते. या मंडळीचे धर्मशास्त्र सांगतें कीं, 'देव सर्वगुणसंपन्न आहे, त्यानें विश्व केले व मनुष्यप्राण्याच्या उन्नतिप्रीत्यर्थ सुंदर नियम केले; या देवाची उपासना तत्प्रणीत ग्रंथानुसार करावी, म्हणजे दुःखनिवृत्ति होऊन मोक्ष मिळतो.' यावेळीं विश्व, विश्वपति आणि विश्वभोक्ता, सृष्टि, ईश्वर व जीव (Nature, God, Man) हें पृथक् आहेत, हें त्यांचें तत्त्वज्ञान, ईश्वराची भक्ति हा धर्म आणि ईश्वरानें सांगितलेल्या नियमांप्रमाणें वागणें, ही नीति अशा प्रकारचे त्यांचे नियम असतात. याही पुढें ज्ञानाची प्रगति झाली म्हणजे सृष्टींत व मनुष्यांत ईश्वर शरीरी म्हणून राहतो, अथवा जड व जीव मिळून ईश्वराचें शरीर होतें; हें विश्व व्यापून पुनः ईश्वर निराळा आहे व अप्राकृत आहे, तो सर्वकर्ता व नियंता आहे, ह्मणजे प्रकृति हा एक त्याच्या शरीराचा एक भाग व जीव हा दुसरा भाग: शरीराला ईश्वराच्या अंतर्यामित्वानें विकार उत्पन्न होऊन ती प्रकृति विसृष्ट होते ह्मणजे उत्क्रांति होत जाऊन नानाविध विचित्र विश्व प्रकट होतें व जीव उन्नत होतो ह्मणजे तो अधिक ज्ञानी व अधिक कार्यक्षम होतो. अर्थातच येथें परिणामवादाचे प्राबल्य होऊन एका प्रकृतीपासून उत्पन्न झालेलीं अनंत जगतें विचित्र स्वरूपानें प्रकट झाली आहेत, असा निश्चय विश्वांतील आधिभौतिक व आध्यात्मिक नियमांच्या उत्क्रांतीवरून दिसतो. ह्मणजे 'जड, शक्ति, काल, आकाश' (Matter, force, time and space) या मूलतत्त्वांपासून सर्व पदार्थ, त्यांच्या जाति, त्यांचे गुणधर्म व त्यांचे संयोगवियोगांचे नियम परिणत, उत्क्रांत, विसृष्ट झाले आहेत, असे स्पेन्सरादि पाश्चात्य तत्त्वज्ञांचे साधार व सयुक्तिक ह्मणणें असतें; त्याचप्रमाणें 'जड व जीव' ही ईश्वराचीं घटक शरीरें असून ते नित्य उत्क्रांत होत आहेत असें परिणामवादी विशिष्टाद्वैती ह्मणतात. सर्व विश्वांत पदार्थ एकच आणि तो परमेश्वर होय. ह्या परमेश्वराचे शरीर-घटक जड आणि जीव हे दोन पृथक् पदार्थ होत. साधारण जीवशरीराचा जसा जीव हा नियंता, तसा विश्व व विश्वस्थ जीवांचा परमेश्वर नियंता आहे. हेंच त्याचें म्हणजे विशिष्टाद्वैत्यांचें तत्त्वज्ञान; वेद, उपनिषदें, गीता हे त्यांचे धर्मविषयक ग्रंथ; ज्ञानसहित उपासना हा त्यांचा धर्म आणि वेदोक्त आचरण ही त्यांची नीति होय. जीवांचा उद्धार म्हणजे मोक्ष म्हणजे ईश्वराच्या वैकुंठांत अखंडज्ञानाचा व अखंडानंदाचा जीवानें उपभोग घेऊन ईश्वराची भक्ति करीत राहणें हा होय. याच्याही पलीकडे ज्ञानसीमा वाढली म्हणजे 'जें विश्व दिसतें व जें असतें हीं दोन्हीं परब्रह्मच आहेत, ईश्वराभिन्न आहेत, जीवही ब्रह्मस्वरूपच आहे, म्हणजे तो सच्चित्स्वरूप आहे, मात्र जीवाचा आनंद गुप्त आहे' असें अविकृत परिणामवादी बोलूं लागतात. हे वल्लभाचार्यानुयायी युरोपियन स्पेन्सरादि तत्त्वज्ञांच्या पुढें जाऊन 'कार्य प्रकट झालें तरी आदिकारण स्वस्वरूप न सोडितां अविकृतच राहतें असें म्हणतात: सर्व दृश्यादृश्य हें शुद्ध ब्रह्मात्मक आहे, विश्व व त्याचे विकृत परिणामही ब्रह्मच आणि

जीव ही ब्रह्मच आहेत, हें शुद्धाद्वैतवाद्यांचें तत्त्वज्ञान होय. प्रामाणिक ग्रंथ हे त्यांचे धर्मग्रंथ, शुद्ध ब्रह्मस्वरूपी भगवान् श्रीकृष्ण त्याची अथवा त्याच्या गादीवर असणाऱ्या आचार्यांची तनमनधनांचा विनियोग करून होणारी उपासना ही भक्ति आणि ईश्वराला प्रिय होणारें आचरण करणें ही नीति होय. याच्याही पलीकडे मानवी ज्ञान गेलें म्हणजे "सच्चिदानंद स्वरूपानें सर्वच ब्रह्म आहे, तेंच सर्वत्र ओतप्रोत घनदाट भरलेलें आहे. परमार्थतः विश्व, विश्वगत पदार्थ सर्व ब्रह्मच व सर्व जीवही ब्रह्मच होत" असें पूर्णज्ञान विज्ञान झालें म्हणजे ज्ञानसीमा संपते, सर्वज्ञत्व येतें आणि सर्व शंकांचें निरसन होऊन सर्व ब्रह्मच ब्रह्म होतें. हा केवलाद्वैत सिद्धांत होय. सर्व ज्ञानशास्त्रांस व कर्मशास्त्रांस अंतर्भूत करून सर्वांचें नियमन करणारें, सर्वांस एकस्वरूप देणारें जें ज्ञानविज्ञान तेंच खरें तत्त्वज्ञान असें श्रीभगवंताप्रमाणेंच श्रीमच्छंकराचार्य, त्यांचे अनुयायी व प्रो. सिज्विक म्हणतात. हेंच सर्वश्रेष्ठ ज्ञान होय. हाच सर्व श्रेष्ठ आनंद होय. या आनंदाच्या व ज्ञानाच्या पासंगास सुद्धां विषयज्ञान व विषयानंद केव्हांही असत नाहींत; शिवाय विषयांचें पूर्णज्ञान व पूर्णानंद परिछिन्न जीवास कधींही संपादितां येत नाहीं, म्हणून विषयोपभोग व विषयोपभोगाच्या हेतूनें उत्पन्न झालेलें ज्ञान अत्यंत मायिक, मिथ्या, अपूर्ण असें अद्वैतवादी म्हणतात. जीव म्हणजे सोपाधिक आत्मा होय. हा जीवात्मा जावत्कालपर्यंत उपाधिग्रस्त आहे, पूर्ण स्वस्वरूपाच्या **अभानांत** आहे, तोंपर्यंत याचें ज्ञान मायिक व याचा आनंदही मायिकच असणार. अपूर्ण ज्ञानानें पूर्णज्ञान व पूर्णानंद होणें शक्यच नाहीं. पण प्रत्येक अणुरेणूमध्यें व जीवांसह ब्रह्मांडामध्यें पूर्णब्रह्म ओतप्रोत व एकरसानें घनदाट भरलें असल्यामुळें ज्ञानी जीवास ज्ञानस्वरूप–जिज्ञासा उद्‌भूत होते, 'कांहीं तरी जाणण्यासारखें' निराळें आहे, 'कोणता तरी' शुद्धानंद विषयानंदाहून विलक्षण स्वरूपाचा आहे, अशी प्रतिभा जागृत झाली म्हणजे तो दुःखी होतो व शुद्धज्ञान व शुद्धानंद शोधण्याच्या व प्राप्त करून घेण्याच्या उद्योगास लागतो. नरदेह सर्वश्रेष्ठ आहे, असें म्हणण्याचें तरी कारण हेंच कीं, या देहांत जीवाला निरतिशय ज्ञानाची व निर्विशेष आनंदाची कल्पना करितां येते व ती कल्पना सार्थ करण्याचें सामर्थ्यही त्याच्या अंगांत असते. शिवाय पूर्वकालीन अनुभवाचा व ग्रंथांचाही लाभ त्यास मिळतो. कारण पूर्वीचें ज्ञान संपादन करून घेऊन तें वाढविण्याची शक्ति त्यासच आहे. त्याला प्राप्त झालेली आशा विषयानंद सोडून देऊन जर विश्वज्ञानाच्या व आत्मज्ञानाच्या पाठीस लागली तर तो नराचा नारायण होऊं शकतो; सारांश, जीवाला शिवाचें स्वरूप देण्याचें, सांताला अनंत करण्याचें जें त्याला स्वस्वरूपतःच सामर्थ्य प्राप्त झालें आहे, तें नरदेहांत जीवाचे ज्ञानस्वरूप उत्कटत्वानें प्रकट होतें म्हणूनच होय. या सामर्थ्याच्या जोरावर तो सर्व चराचरांस शास्त्रतः व स्वस्वरूपानें ओळखूं लागतो आणि संसारकार्यांस, राष्ट्रकार्यांस, धर्मकार्यांस निवृत्तिमूलक प्रवृत्तीचें स्वरूप देऊन विहितकर्म निर्विकार मनानें करूं शकतो. एवंच स्वस्वरूप समजून घेऊन, व स्वस्वरूपांत जाऊन आपलें असलेलें ब्रह्मस्वरूप जर पुनः प्राप्त करून घेणें असेल, तर उपलब्धशास्त्रांचें ज्ञान संपादणें आणि

चित्तशोधक कर्मे करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे, हें उघड झालें. श्रीमद्भगवद्गीतेचा अवतारही अशासाठींच आहे. तो प्रकार कसकसा आहे तें आपण पाहूं. मात्र हें लक्ष्यांत ठेवावयाचें कीं, गीता काय, उपनिषदें काय, कोणताही प्रामाणिक तत्त्वग्रंथ काय, विशिष्ट तत्त्वग्रंथांच्या, विशिष्ट शास्त्रग्रंथांच्या अगर विशिष्ट कर्तव्यग्रंथांच्या विरुद्ध केव्हांही नसतो व नसावयाचाच! प्रत्यक्ष माध्वमताचे, विशिष्टाद्वैताचे किंवा शुद्धाद्वैताचे ग्रंथांत जसा एक प्रकारचा आग्रहाचा व दुराग्रहाचा कटाक्ष आढळतो, तसा येथें कोणाही विरुद्ध कटाक्ष नसतो. अधिकारानुसार प्रत्येक विशिष्टतत्त्व चांगलेंच आहे, अधिकार वाढला ह्मणजे पूर्वील तत्त्व कमी प्रतीचें ठरून श्रेष्ठ तत्त्व अंगीकर्तव्य होतें, आणि शेवटचा अधिकार आला ह्मणजे निर्विशेष तत्त्वांचें आकलन होतें, असा केवलाद्वैताचा क्रम आहे. हा क्रम सुटला तर घात होण्याचा संभव असतो; पहा कीं, केवलाद्वैताचा अभिमान बाळगणारे अलीकडील जुने पंडित 'विषय मायिक आहेत' या शास्त्रोक्त आणि ह्मणून सार्थ वचनावर अंधळा व अविचारी विश्वास ठेवून 'विषयज्ञानाला' बिचारे पारखे होतात; आणि विषयज्ञानाच्या द्वारें होणारें जें आत्मशुद्धीकरण त्यास आंचवल्यामुळें आत्मस्वरूपाविषयीं साशंक होतात आणि फसतात! तसेंच 'कर्म बद्धक आहे' हा उत्तमोत्तम मंत्र अज्ञानाने घोकल्यामुळें हे पंडित सर्वच कर्मे टाकून देतात आणि फशीं पडतात. ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, केवळ विषयोपभोग वाढवून विषयस्वरूपीं नेणारें जें ज्ञान आहे, तें मायिक व घातुक आहे, विषयज्ञान स्वतः घातुक नाहीं; तसेंच स्वोपभोग वाढविणारें व **स्वोपभोगात्मक कामक्रोध वाढविणारें कर्म बद्धक आहे, निष्कामकर्म बद्धक नाहीं,** हें विसरावयाचें नाहीं. असो; आतां गीतेकडे आपण वळूं या.

---

## गीतेंत काय सांगितलें आहे?

श्रीमद्भगवद्गीतेंत केवलाद्वैताचें मात्र प्रणयन आहे. 'सर्व ब्रह्म आहे.' 'तें अभिन्न, अव्यय, निर्विकार, निर्विकल्प आहे.' 'तें सर्वव्यापी, सर्वसाक्षी आहे' इत्यादि अद्वैतसिद्धांतांचें ज्या दशोपनिषदांत विवरण केले आहे, त्या उपनिषदांच्या आश्रयानेंच गीतेचा उपक्रमोपसंहार आहे हें **'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः,'** या प्राचीन वाक्यावरून स्पष्ट होतें. पुनः अर्जुनाचा प्रश्नही '*यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे*' (मला श्रेय सांग, प्रमाणसिद्ध श्रेयोमार्ग सांग)' असाच आहे. सारांश, ज्या ज्ञानानें व ज्ञानाचा उपक्रम करून देण्याला उपयोगीं पडणाऱ्या ज्या कर्मानें अर्जुनास निःश्रेयस् मिळेल, सुखदुःखातीत स्वरूप मिळेल, तें त्याला हवें आहे, असा बोध त्याचे निरनिराळ्या प्रश्नांवरून होतो. भगवंतांनींही 'देहनाश हा आत्मविनाश नव्हे' असा उपक्रम करून 'सद्वस्तूचा नाश होत नाहीं, मायिक वस्तूंचा नाश ह्मणजे वस्तूंचें

रूपांतर होतें' असा आशय दुसऱ्या अध्यायाचे १६ व्या श्लोकांत सांगितला व १७ व्यांत तें आत्मतत्त्व सर्वव्यापी आहे, अविकार्य आहे, अज, नित्य, शाश्वत व पुराण आहे, पंचमहाभूतातीत आहे, अव्यक्त आहे, बुद्धि इत्यादिकांस अग्राह्य आहे, इत्यादि आत्मस्वरूपाचें आविष्करण तिसाव्या श्लोकापर्यंत केलें आहे. ह्यावरून ब्रह्माचें स्वरूप दिग्दर्शन करणारीं जीं लक्षणें उपनिषदांत सांगितलीं आहेत, तींच प्रत्येक जीवात्म्याचींही आहेत, असा सहजच सिद्धांत ठरतो. वस्तुतः जीव ब्रह्मानन्य आहे, पण ब्रह्माभिन्नही आहे, असें सांगणें हेंच केवळ अद्वैत होय. नंतर पुढें कर्मकांडांत कर्ममीमांसा चालली असतां आत्म्याचें पूर्णत्व व अविकार्यत्व तिसऱ्या अध्यायाच्या १६ व १७ श्लोकांत निर्दिष्ट केलें, व त्याचें अविकार्यत्व पुनः ४२, ४३ श्लोकांत सिद्ध केलें; चवथ्या अध्यायांतील ३५ व्या श्लोकांत जो अभिन्नभाव स्पष्ट व निश्चित रीतीनें सांगितला, तोच पुनः पांचव्याच्या सातव्या, अठराव्या, एकोणिसाव्या श्लोकांत दृढ करून पुनः सहाव्याच्या नवव्या, एकुणतिसाव्या, तिसाव्या, एकतिसाव्या व बतिसाव्या श्लोकांत दृढतर केला आहे. पुनः उपासनाकांडांतही ब्रह्माचें व आत्म्याचें एकत्व सातव्या अध्यायाच्या १८ व्या श्लोकांत व १९ व्या श्लोकांत प्रकट केलें आहे. बाविसाव्या श्लोकांत ब्रह्माचें सर्वव्यापित्व सांगितलें, तेंच नवव्या अध्यायाच्या ४, ५, ६, श्लोकांत दृढतर करून विभूतियोगाच्या शेवटच्या श्लोकांत विशद केलें आहे. विश्वरूपदर्शनाचा हेतुही तोच आहे. ह्याचप्रमाणें ज्ञानकांडांतील तेराव्या अध्यायाचा दुसरा श्लोक सर्वसाक्षित्व, सोळा, सत्तावीस, अठ्ठावीस, व तीस हे श्लोक जीवशिवांचें अभिन्नत्व, तसेंच अठराव्या अध्यायांतील विसावा, चोपन्नावा हेही उभयतांचें अभिन्नत्व प्रतिपादितात. सारांश, उपक्रम-उपसंहार हे अद्वैतपरच आहेत व जेथें जेथें प्रसंग प्राप्त झाला तेथें तेथें अद्वैताचा स्पष्ट उच्चार आहे. तसेंच अद्वैतास अवश्य असणारा जो मायावाद किंवा विवर्तवाद याचा उल्लेख अनेक ठिकाणीं आहेच. त्यांतील थोड्यांचें मात्र नामकरण करितों. सातव्यांतील १३, १४, ५, २५, २७, तसेंच पांचव्यांतील १५, नवव्यांतील १० ( येथेंच विवर्तवादाचा स्पष्ट उल्लेख आहे ) अध्याय दहांतील ११ श्लोकांत मायेचा स्पष्ट उच्चार आहे, व सर्वत्र माया म्हणजे ज्ञानविद्वेषी अज्ञान असाच अर्थ आहे. मायेचे-प्रकृतीचे-जे सत्वरजादि गुण व कामक्रोध-प्रेरित कर्में यांचा व यांच्यामुळें होणाऱ्या मोक्षविघाताचा उल्लेख सामान्यतः प्रत्येक अध्यायांत असून, प्रकृति, तिचीं गुणकर्में, यांच्यापासून अलिप्त राहण्यास अर्जुनास वेळोवेळी उपदेश केला आहे. सारांश, दिसतें हें खरें ( नित्यत्वानें असणारें ) नाहीं; स्वतःच्या आत्मवृत्तीनें बाहेरील ब्रह्मवृत्ति पाहून अनुभवावयाची हा जो अद्वैतक्रम, त्याचाच अंगीकार केला आहे. व्यावहारिक सत्तेमध्यें सुद्धां जसें आहे, तसें आपल्यास दिसत नाहीं, ही युरोपियन पद्धतीची ज्ञानसापेक्षता १५ वे अध्यायामध्यें उल्लेखिली आहे; व विवर्त तेथेंही असतो, असा ध्वनि केला आहे. पण सामान्यतः व्यावहारिक सत्तेंत परिणामवादाचा आश्रय दुय्यम प्रतीच्या ज्ञानी लोकांसाठीं सातव्या अध्यायांत केला व सामान्य ज्ञानी लोकांस कळेल असा आरंभवादही कोठें कोठें अंगीकृत केल्याचा भास होतो. म्हणजे

ज्ञानमर्यादानुसार कोठें शुद्ध, कोठें विशिष्टाद्वैत व कोठें शुद्धाद्वैत इत्यादि प्रचलित व कल्पनागम्य मतांचा कारणापुरता अवलंब करून भगवान् अद्वैतसिद्धांताचें प्रकाशन करितात, असें निष्पाप बुद्धीच्या पुरुषास सहज कळून चुकणार आहे. ज्ञानाचा परिपोष करणारी जी उपासना, तिचें रहस्य प्रत्येक अध्यायांत सूत्ररूपानें व द्वितीय षडध्यायींत विस्तृत पद्धतीनें प्रकट करून अठराव्या म्हणजे उपसंहारात्मक अध्यायांत, ' भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः । ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ' असें, म्हणजे पराभक्तीची पराकाष्ठा झाली म्हणजे परमेश्वरी स्वरूपाचा तात्त्विक बोध होतो, आणि बोधाचें ज्ञानविज्ञान झालें म्हणजे मुक्त होतो, असें सांगितलें. एतावता परोक्षज्ञानानें भक्ति उत्पन्न होऊन तिची पराकाष्ठा झाली म्हणजे साक्षात्कार होतो व मोक्ष मिळतो, हा भावार्थ आहे. जीवाचें जीवत्व नाहींसें होऊन जें अनंतत्व मिळतें, तें परमेश्वर भक्तीची पराकाष्ठा होऊन सर्वत्र परमेश्वरच भरला आहे अशी दृष्टि झाली म्हणजे मिळतें. अद्वैतसिद्धांत प्रकट करणाऱ्या शंकराचार्यांशिवाय बाकीचे सर्व मतवादी आचार्य, जीवास अनंतत्व देण्याला नाखुष आहेत; कारण जीव हा अणुपरिमाणचा आहे, असें सर्वांचें मत आहे. अद्वैतसिद्धांतान्वयें आत्म्यास जडलेली उपाधि मोक्ष साधनांनीं (कर्म, उपासना व ज्ञान) नष्ट केली म्हणजे तो होता तसा अनंतच असतो व होतो. मायाजन्य उपाधींनीं त्याला ' आपण अमुक आहों ' असा भास झाला होता, तो ती माया व उपाधि नष्ट झाल्याबरोबर स्वस्वरूपाचा अनुभवच-ब्रह्मच-झाला! तेव्हां ज्ञानाचें कार्य उपाधींचा नाश करणें व ज्ञानपूर्वक भक्तीचें व भक्तीपूर्वक ज्ञानाचें कार्य अपरोक्ष साक्षात्कार करून देणें हें आहे. कर्माचेंही तेंच कार्य आहे, म्हणजे चित्तशोधन करावयाचें काम कर्माकडे आहे. प्रामाणिक शास्त्रांनीं जीं कर्में ' अवश्य केलींच पाहिजेत, ' असें ठरविलें आहे अथवा ते ते ग्रंथ ठरवितील, तीं तीं कर्में फलवासनारहित व कर्तृत्वाभिमानरहित केलीं तरच चित्तशुद्धि होते व ज्ञानसंपादनाचा अधिकार प्राप्त होतो. हा अधिकार प्राप्त होत असतांना जीवाचें, आत्मिक उन्नतीचें, मार्गक्रमण क्रमशः होत असतें. पहा कीं अद्वैतानें राहणारें जें अद्वितीय आनंत्य, त्याचें आकलन करितां येणें दुर्घट म्हणून प्रथम साकार आणि सगुण मूर्तीचें आराधन, पुढें सगुणमूर्तीचें मानसिक आराधन, पुढें ओंकारोपासना इत्यादि तालमींतून जाऊन जेव्हां ' विष्णुमय जग ' असा ' वैष्णवांचा धर्म ' सारांश ही स्थिति होते, ईश्वराचे ठिकाणीं अनन्यभक्ति राहून सदैव ईश्वरी ध्यानाची समाधि लागूं लागते, व ईश्वराव्यतिरिक्त दुसरें भानच असत नाहीं, तेव्हां ईश्वरीप्रसाद होऊन आनंत्याचा साक्षात्कार होतो व मुक्ति मिळते. तेव्हां कर्मानंतर उपासना व उपासनेनंतर ज्ञान, असा क्रम आहे. तरी कर्में करितांना श्रद्धा व कर्मस्वरूपाचें ज्ञान हवें असतें. भक्तींत ईश्वरी स्वरूपाचें ज्ञान व त्यास आवडेल तें ज्ञानपोषक कर्म हवें असतें. आणि ज्ञानावरही अभंग श्रद्धा व लोकसंग्रहात्मक कर्में ज्ञानस्थितींत अवश्य असतात. तेव्हां हीं तीन साधनें तीन विशिष्ट कालीं पृथक्त्वानें असतात, असा अर्थ नव्हे, तर ज्ञानमार्गाचे वेळीं कर्मप्रधानस्थिति पुढें उपासनाप्रधान स्थिति आणि शेवटीं ज्ञानप्रधानस्थिति व पुढें मोक्ष असा हा क्रम आहे. जीवात्मा

अनंत, सर्वव्यापी, सर्वज्ञ, मुक्त व शुद्ध आहे, हें इतर वाद्यांस असंमत आहे. पण तो अनादि व अमर आहे, हें मात्र त्यांस सम्मत आहे. आतां मुक्तीच्या दृष्टीनें पाहिलें तर अनादि व अमर वस्तु सदैव स्वस्वरूपांत रहावयाची असेल तर ती अविकार्य असली पाहिजे. अविकार्य वस्तु सर्वव्यापी असते. सर्वव्यापित्वाचे ठिकाणींच सर्वसाक्षित्व, सर्वज्ञत्व हे धर्म असतात. सारांश, जीव ( आत्मा ) अजरामर असून ज्ञानस्वरूप आहे, असें मानिलें कीं मग अद्वैतच पत्करावें लागतें; दुसरी तोड नाहीं. जीव जर जडविलक्षण आहे, व तो जर ईश्वरांश आहे, तर तो अणुपरिमाण असणें शक्यच नाहीं. पहा कीं, जडामध्यें परिमाणाचा ( लांबीरुंदीचा ), म्हणजे आकाशा ( space ) चा जर अंतर्भाव होतो आणि जीव जर जडविलक्षण आहे, तर अर्थातच तो जीव–उपाधिशून्य जीव व अंतरात्मा हीं सर्व–आकाशातीतच असलीं पाहिजेत. 'खं मनो बुद्धिरेवच' हें वाक्य स्पष्ट सांगतें कीं, आकाश, मन आणि बुद्धि यांचा सुद्धां अंतर्भाव अपराप्रकृतींत म्हणजे जडांत होतो. जड हें क्षर आहे, जीव–ज्ञानस्वरूपी जीव–क्षर नाहीं. शिवाय '**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः** । मनःषष्ठानींद्रियाणि **प्रकृतिस्थानि** कर्षति ॥' यांतही स्वरूपतः जीव परमेश्वराचा अंश ( अजड, जडविलक्षण ) आहे, असें सांगितलें आहे. पुनः 'अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततं' यांतही तो आत्मस्वरूपानें सर्वव्यापि व जीवस्वरूपानेंही सर्वव्यापनशील असा सांगितला आहे. आतां आत्मा जर सर्वव्यापी आहे, आणि सर्वव्यापी अशी एकच वस्तु शक्य आहे, तर ती वस्तु 'सत्' स्वरूपी असली पाहिजे. ज्ञानरूप व सद्रूप एकच आहे, असें अध्यात्मशास्त्राच्या सिद्धांतानुसार ब्रह्मज्ञान म्हणत असतें. तेव्हां ज्ञानकाळीं आत्मस्वरूपाव्यतिरिक्त दुसरी वस्तु असणें शक्यच नाहीं. दुसऱ्या वस्तूचा भास होतो हें अज्ञान आहे, तीन गुणांनीं विश्व व्याप्त असल्यामुळें अतज्ज्ञांस तेथें–ब्रह्मस्वरूपी विश्वांत–विविधता दिसते, असें प्रत्यक्ष भगवानच सांगत आहेत. मानवी ज्ञानांतून व दृश्य विश्वांतून या त्रैगुण्याचा अज्ञानजन्य पडदा दूर केला म्हणजे एकच एक शुद्ध व निर्मळ ब्रह्म विचाराला परोक्षतः दिसेल, अनुभवाला भासेल, पण ज्ञानविज्ञान पूर्ण झालें कीं पाहणारा, पाहणें व पाहण्याचा विषय नष्ट होऊन एकच ब्रह्म राहील. असो; या विचारसरणीनें आत्म्यास अनंतत्व, सर्वव्यापित्व, सर्वज्ञत्व, मुक्तत्व व शुद्धत्व हीं सहजच आहेत, असें स्पष्ट दिसतें.

जीवास्थितींत परमेश्वर सेव्य आहे. या स्थितींत कर्माची व उपासनेची आवश्यकता आहे. पण जीव जसजसा संसारगत अज्ञानाचा उच्छेद करीत जातो, जसजसा जास्त सात्त्विक म्हणजे जास्त ज्ञानी व जास्त सत्कर्म करणारा होतो, त्याचा देहात्मस्वार्थ व तद्गत दोष जसजसे कमी होत जातात, त्या मानानें तो पराभक्तीच्या साम्राज्यांत शिरत जातो आणि तेथें भक्तिजन्य आनंदांतच न थांबतां पुढें स्थितप्रज्ञाच्या म्हणजे जीवन्मुक्ताच्या भूमिकेंत प्रवेश करितो. योगाभ्यासानें त्याला अष्टसिद्धि प्राप्त होऊन विश्वांतील

चराचर पदार्थांचें अंतर्बाह्य व स्थूलसूक्ष्मज्ञान होतें व तो सर्वज्ञत्वाच्या व सर्वशक्तिमत्त्वाच्या उंबरठ्यावर जाऊन पोहोंचतो; आणि येथें त्याच्या तपश्चर्येनुसार ईश्वरी अनुग्रह होऊन तो ईश्वरमय, ईश्वरच होतो. सारांश, व्यवहारास्थितींत भासमान होणारें द्वैत, सेव्यसेवकभाव, जीवाचें अल्पत्व इत्यादि सर्व उपाधिजन्य दोष एका अद्वैतसिद्धांतानें मात्र नष्ट होतात.

जडाचें अधिष्ठान ब्रह्मच आहे. जडावर भासमान होणारें त्रैगुण्य हें विश्वज्ञानाच्या मानसशास्त्राच्या, अध्यात्मज्ञानाच्या साहाय्यानें आपण अस्तंगत करीत चाललों म्हणजे शेवटीं तळावर ब्रह्मच शिल्लक उरतें. शिवाय, जडावर उत्क्रांतिनियमांचें जें एक भव्य संस्कारमय **मायाजाल** पसरलेलें आहे, व ज्यायोगें जडांत अंतर्भूत होणारीं जीवसामर्थ्यें काल-स्थलानुसार प्रकट होत आहेत, त्यावरूनही असाच सिद्धांत निघतो कीं, जड व जीव यांत जो आपण विशेष काढतों, तो स्वरूपतः तेथे नसून केवळ **त्रैगुण्यानें** जडांत जडत्व शिरलें आहे व त्रैगुण्यानेंच तें आपल्यास भासमान होत आहे, ही गोष्ट डा. बोस, प्रो. हक्स्ले यांनीं प्रमाणतः सिद्धच केली आहे. कालस्थलांचा जसा जडावर संस्कार होत जाईल व जडांतून जीवस्थिति प्रकट झाल्यावर इच्छास्वातंत्र्याचा जसा अंमल बसत जाईल, तसतसा मूळांत दिसणारा जड पदार्थही जीवदशा पावून शेवटीं मुक्त होईल. जड–जीव वस्तुतः एकच आहेत. उभयतांच्या उपाधि निराळया झाल्या म्हणून एक भोग्य व दुसरा भोक्ता झाला! पण भोग्य वस्तूसच योग्य प्रागतिक प्रसंग त्यांच्या त्यांच्या पूर्व-कर्मानुसार प्राप्त झाले म्हणजे त्यांसच भोक्तृत्वाचा अधिकार येऊन शेवटीं ते मुक्त होतात, म्हणजे ब्रह्मस्वरूप होतात; आणि हे वस्तुतःच ब्रह्मस्वरूप असतात म्हणून ब्रह्मस्वरूपाप्रत पावतात. एवंच येथेंही ब्रह्मस्वरूपच आहे, असें सिद्ध होतें. याप्रमाणें अनुभवाला विचाराची जोड देऊन उपनिषदांच्या साहाय्यानें तत्त्वमीमांसा करीत गेलें म्हणजे अद्वैता-शिवाय दुसरा सिद्धांतच सिद्ध होऊं शकत नाहीं.

आतां 'पूर्वी जर निर्विकार, सर्वव्यापी, एकरसात्मक एकच ब्रह्म सर्वज्ञत्वानें वास्तव्य करीत होतें, तर ऐतिहासिक व प्रागैतिहासिक कालांत दृश्यमान होणारी, विकार्य, परि-च्छिन्न, विविध जीवसृष्टि व जडसृष्टि अल्पज्ञत्वानें अथवा अज्ञत्वानें कां विराजमान होत आहे? व सर्व विश्वच मुक्त झालें म्हणजे सृष्टिस्थितिलयाचा व्यापार बंद राहणार कीं काय? बंद राहणार असेल तर आम्हांला तुमच्या ब्रह्मज्ञानाची गरज नाहीं व बंद राहणार नसेल तर मुक्त झालेले जीवच पुनः प्रपंचांत पडणार असतील तरीही तुमच्या ब्रह्मज्ञानाची आम्हांस आवश्यता नाहीं. एवंच ब्रह्मज्ञान अनवश्यक आहे.' अशा शंका घेण्याचें माझ्या मतें कांहीं कारणच नाहीं. कारण (१) पूर्वी स्वरूपानें वास्तव्य करीत असणारें ब्रह्म आतांही विद्यमान आहे व प्रलयानंतरही तें जसें आहे, तसेंच राहील. पूर्ण वस्तूला अपूर्णत्व येणें केव्हांही शक्य नाहीं. गोत्व प्रकट करणाऱ्या सर्व धेनु वृषभवत्सांसहित नाहींतशा झाल्या म्हणून गोत्व नष्ट होईल असें नाहीं. तें फार तर कांहीं काल लुप्त होईल;

पण धेनु आलीरे आली कीं तें प्रकट होईल. गुणकर्मावरून ठरविलेल्या या जीवकृत नामकरणविधींत व्यवहारकालीं सुद्धां जर येवढें सत्य सांठविलेलें आहे, तर स्वरूपतः जी सत्यरूप ब्रह्मवस्तु परिपूर्ण आहे व जी कार्यकारणातीत असल्यामुळें बुद्धीला व विकारास अगोचर आहे, त्या वस्तूच्या अस्तिनास्तित्वाविषयीं बिचारी बुद्धि काय बोलणार? (२) हल्लीं बुद्धीला जें वैचित्र्य दिसत आहे, त्यांत सुद्धां एकरसात्मकता प्रकट होत नाहीं काय? ही एकरसात्मकता नसती तर आपला पुष्कळसा व्यवहारच बंद झाला असता. एकत्ववाचक सामान्य नामें भाषेचा आत्मा आहे, हें कोणास ठाऊक नाहीं? जितकीं सामान्य नामें कमी, तितकी ती भाषाही असंस्कृत व ती बोलणारे लोकहीं अनभियुक्त असें आपल्या नित्य अनुभवास येत आहे; व ज्ञान वाढत जातें, तसतसें एकरसात्मकत्वही जास्तच वाढत जातें, हाही आपला अनुभव आहे. अनेकत्वांत एकत्व पाहून विशेषांचा नामनिर्देश करणें व त्या विशेषांचीं व तद्गत विशेषणांचीं कारणें शोधून काढणें व एकत्वानें सर्व विशेषांचें नियमन करणें हा तर ब्रह्मज्ञानविज्ञानाचा मुख्य कर्तव्यभाग आहे. तेव्हां ज्याला वैचित्र्य दिसतें व हें वैचित्र्य कालाच्या व ज्ञानाच्या आनंत्यांत स्वस्वरूपानें कायम राहील असें वाटतें, त्याला तत्त्वज्ञानाची महती अद्यापि कळली नाहीं, कारण आत्मस्वरूपाकडे त्याची मति अद्यापि वळली नाहीं असें मोठ्या कष्टानें मला म्हणावें लागत आहे. (३) ब्रह्मज्ञान हवें कीं नको, हा प्रश्नच अप्रस्तुत आहे; कारण प्रत्येक जीव ( वस्तुतः ब्रह्मच असल्यामुळें ) तिकडेच धांव घेत आहे. शास्त्रपद्धतीनें ज्ञानपूर्वक तो जात नाहीं, म्हणून त्याचा मार्ग चुकतो, तो फसतो व दुःखही भोगितो, हें निराळें; तथापि, इतकें झालें तरी त्याची अविकारी सुखाकडील धांव, त्याची पूर्ण ज्ञान मिळविण्याची हौस व अजरामर होण्याची इच्छा, सारांश, ब्रह्म होण्याची इच्छा केव्हांही कमी होत नाहीं. तेव्हां ब्रह्म होणें न होणें हें ऐच्छिक नाहीं. (४) हें विश्व अनंत आहे; एक जीव मुक्त होण्याला जर अनेक हजार जन्म घ्यावे लागतात, तर अनंत विश्वाचा उद्धार होण्याला अनंत कालाचीच अपेक्षा आहे. शिवाय सर्व विश्व मुक्त झालें तर यांत बिघडलें काय? एक मधुर व स्वादिष्ट जलानें तुडुंब भरलेला महासागर सर्व तृषितांस प्राप्त झाला व ते तेथें वितृष्णेच्या सुखांत आनंदानें बसले तर, आमच्या घरांतील खारट आडाचें मिष्ट जल व आमच्या येथील वृक्षसौंदर्यदर्शन आपल्यास मिळणार नाहीं, असें वाटून रडत बसणाऱ्या वृषलाप्रमाणेंच वरील आक्षेपकाचा आक्रोश होय! सुखरूपच झाल्यावर विषयसुखाची अपेक्षा कशाला? आपण स्वतःच साखर झाल्यावर करंजी, लाडू मिळत नाहींत, हा शोक राहत नाहीं. आपण स्वतःच घरची यजमानीण झाल्यानंतर बाहुलाबाहुलीच्या भातुकलींत आनंद वाटत नाहीं, हा प्रत्यक्ष अनुभव आहे. रणांगणावर मुलुखमैदानी तोफांच्या व भैरवी भवानीतुल्य तरवारींच्या साहाय्यानें रणगंभीर शत्रूशीं रोमहर्षण संग्राम करणाऱ्या भीमकर्म्या महावीराला बुद्धिबळांतील लांकडी प्यादी मारण्यास सांपडत नाहींत म्हणून कधीं वाईट वाटेल काय? अशीच गोष्ट ब्रह्मज्ञानाची आहे. तेव्हां सर्व विश्व अनंतकालांत ब्रह्मरूप झालें तर कसें होईल, असा विषाद मानण्याचें कारण

नाहीं. (५) आतां मुख्य प्रश्नांतील प्रश्न असा आहे कीं, ब्रह्माला जर कालचक्रानें विविधता (?) येते, तर मुक्त जीवाला ती कां येणार नाहीं! थोडयाशा शास्त्रयुक्त काळजीनें या प्रश्नाचा विचार केला तर ह्याचें प्रश्नत्वच नाहींसें होईल. ब्रह्म हें पूर्ण आहे, कालस्थलप्रसंगातीत आहे, तें केवल सच्चिदानंदाच्याही पलीकडचें आहे, हें जर ब्रह्माचें श्रुतिविगीत स्वरूप खरें मानिलें, तर मुक्त म्हणजे पूर्ण, अनंत, ब्रह्म झालेल्याला बिचारा काल, स्थल किंवा प्रसंग काय करणार? ज्ञानाच्याही पलीकडे जो गेला, त्याला ज्ञानानंतर उत्पन्न होणारे कालस्थलप्रसंग भेटूं शकतील तरी कसे? जो स्वरूपानें काळाचा काळ झाला, त्याच्या सत्तेनें क्रीडा करणारा बिचारा काळ आपल्या अधिष्ठानाला शिवूंही शकत नाहीं. पुनः; ब्रह्मरूप म्हणजे कालातीत झालेल्या पूर्णाची कल्पना सुद्धां, त्या पूर्णाला स्पर्श करूं न शकणाऱ्या काळांतच व्हावयाची, ती तरी बरोबर आहे कशावरून? काळाचीच गति जेथें नाहीं, तेथें प्रसंग किंवा कार्यकारणभाव तरी पंगूच व्हावयाचे. एकच एक असल्यानंतर तेथें काळ नाहीं, स्थळ नाहीं, कार्यकारणभाव नाहीं, साहचर्य नाहीं, समत्व (सारखेपणा) नाहीं. दोन झाल्याबरोबर, द्वैत होतां क्षणीं, काळस्थळादिकांचें साम्राज्य सुरू होतें. पण प्रथम तरी द्वैत कसें येतें? किंवा आलें आहे कसें?' याला उत्तर इतकेंच आहे कीं, वस्तुतः द्वैत नाहीं. द्वैत दिसत आहे ही माया म्हणजे अपूर्ण ज्ञान म्हणजे दृश्य ज्ञान म्हणजे इंद्रियजन्य ज्ञान व त्याचे विलास आहेत. आतां मायेचा आभासिक उद्भव जो दृश्यमान आहे, तो अनादि आहे. 'अनादित्वात्संसारस्य' असें श्रीमच्छंकराचार्य म्हणतात, तेंच श्रुतिसंमत आहे. कालाच्या म्हणजे जीवज्ञानाच्या मर्यादा सांभाळून बोलावयाचें म्हणजे अल्पज्ञ जीवाला मायेचा अंत केव्हांही लागणार नाहीं. कारण जीव नेहमीं कालदृष्टीनें म्हणजे **कार्यकारणदृष्टीनें पाहणार. पाहणें** हें अल्पज्ञासच शक्य आहे. सर्व असणारा मात्र सर्वज्ञ असतो, तेथें पाहणें संपतें. तेव्हां पाहण्यानेंच अल्पज्ञत्व सिद्ध होतें. हा अल्पज्ञ आपली ज्ञानमर्यादा जसजशी वाढवितो, म्हणजे वैचित्र्यांत एकत्व पाहूं लागतो, तसतसा तो बहुज्ञ होत जातो. असो; कार्यकारणभाव म्हणजे संस्काराचें किंवा विकाराचें पौर्वापर्य होय. तेव्हां संस्कृत किंवा विकृत होणारा पदार्थही अल्पच असला पाहिजे; अल्प पदार्थ, परिछिन्न पदार्थ, मात्र विकार्य असणार. ब्रह्म हें अविकार्य आहे, कारण त्याचा मोठेपणा निःसीम आहे. अर्थातच ब्रह्मदृष्टीनें सर्व दृश्यादृश्य पदार्थ-एक असोत वा संघटित असोत-अल्प आणि विकार्य आहेत. दोन पदार्थ असले म्हणजे संस्कार किंवा विकार होणार. आणि हें विकृतीचें किंवा संस्कृतीचें जाळें जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत कार्यकारणाची शृंखला अभंगच असावयाची. व कार्यकारण जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत माया ही जिवंतच रहावयाची. तेव्हां निष्कर्ष असा निघतो कीं, जोंपर्यंत अल्पज्ञत्व आहे, तोंपर्यंत माया आहे; अल्पज्ञत्वाबरोबरच माया आली, द्वैत झालें; आणि अल्पत्वाचा लय झाला म्हणजे मायेचाही लय होणार. तसेंच 'माया कोठून आली' असें विचारणाराही माया पाहणारा. म्हणजे द्वैत पाहणारा म्हणजे अल्पज्ञ असणारा असतो. त्याला हा मायेच्या पलीकडील प्रश्न सुटणें म्हणजे जीवास स्वतःच्या खांद्यावर उडून बसतां येण्यासारखें आहे! हा प्रश्न-

त्याला खरोखरीच सोडवावयाचा असेल, तर त्यानें स्वरूपज्ञान, त्याच्या अंतर्यामीं जो आत्माराम आहे, त्याचें ज्ञान, शास्त्रतः करून घ्यावें. हें परोक्षज्ञान होईल. नंतर शास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें स्वार्थत्याग व स्वरूपध्यान अधिकारानुसार करीत जावें; त्याला अपरोक्षज्ञान होऊं लागेल. शास्त्रज्ञान फारसें कठीण नाहीं, पण त्या ज्ञानाचा अनुभव घेणें कठीण काम आहे. हें काम सोपें व्हावें म्हणून कुटुंबव्यवस्था, वैश्वदेवादि पंचमहायज्ञ, समाजसंस्था, यज्ञयागादि व दानअध्यापनादि संस्था, राष्ट्रसंस्थानें, अश्वमेधादि यज्ञ, तपश्चर्या इत्यादि उत्तरोत्तर श्रेष्ठ साधनें सांगून पुनः सर्व विश्वाचा जनक जो सर्वशक्ति, सर्वज्ञ, सर्वदयाघन श्रीपरमेश्वर त्याची नवविध उपासना सांगितली आहे. 'शांतिः शांतिः शांतिः' असें जें आपण प्रत्येक धार्मिक कृत्याच्या शेवटीं औपचारिक रीतीनें म्हणतों, तें सर्व व्यवहारांच्या शेवटीं जर सार्थ म्हणूं लागलों (म्हणजे 'माझे कामक्रोधादि षड्रिपु उच्छेदून जाऊन माझ्या अंतःकरणास शांति मिळो व याचप्रमाणें सर्व सृष्टीसही शांति मिळवून देण्याचें सामर्थ्य असो' अशी जर अखंड प्रार्थना अभंगप्रयत्नपूर्वक चालेल,) तर आपला देहस्वार्थ हळू हळू पंचकोश फोडून विस्तीर्ण होत जाईल व आपल्यास ब्रह्मस्वरूपाचें विज्ञान होईल. सारांश, मायेच्या अस्तित्वाचा प्रश्न मायेंत राहून सुटावयाचा नाहीं. दंडाच्या साहाय्यानें पृथ्वी उचलूं पाहणाऱ्या अर्किमेडीजनें जशी आपल्या जवळच्या लोकांस अत्यंत बळकट दंडाची (Lever) व उभें राहावयासाठीं पृथ्वीबाह्यस्थलाची मागणी केली, त्याचप्रमाणें मायेचा उलगडा करूं पाहणाऱ्या जिज्ञासु मुमुक्षूलाही मायेच्या बाहेरील ज्ञानाची व कर्माची अपेक्षा आहे. तर्कवितर्कांनीं हा प्रश्न सुटणार नाहीं; कारण ते तरी मायेच्या राज्यांतीलच असणार. असो; तेव्हां आग लागलेल्या घराचीं आढीं तोडण्याला जशा बाहेरच्या लोखंडी कुऱ्हाडींची अपेक्षा आहे, त्याचप्रमाणें मायेचा चक्रव्यूह फोडण्याला अपौरुषेय ज्ञानाचीच अपेक्षा सुतराम् आहे.

याप्रमाणें सामान्य विचार सुचले ते येथें नमूद केले आहेत. योग्य वाटल्यास यांचा विचार मुमुक्षूंनीं करावा, अशी विज्ञप्ति करून आणि 'प्रामाणिक शास्त्रांनीं व ब्रह्मलक्षक अपौरुषेय ग्रंथांनीं एककंठानें व दीनदयालुत्वानें प्रेरिलेलें ज्ञान व विधिपूर्वक सांगितलेलें मोक्षदायक आचरण हळू हळू आपलेंसें करून आपली, आपल्या कुटुंबाची, आपल्या समाजाची, आपल्या राष्ट्राची व आपल्या जगताची उन्नति होईल. आपल्यास व आपल्या निकटतर संगतीनें राहणाऱ्या बंधुबांधवांस आणि पुत्रकलत्रांस अधिकारानुसार पंचकोश उकलण्याचें ज्ञानसामर्थ्य व कर्मसामर्थ्य स्वोद्धारक व समाजपोषक होत जाईल, असें करणें हें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्य आहे,' असें समजून घ्यावयाची भिक्षा मला घाला, असें मागणें मागून या मोहक विषयाची रजा घेतों.

---

## मुख्य ज्ञानवाद्यांच्या संबंधें दोन शब्द.

आस्तिक तत्त्ववाद्यांपैकीं तिघांच्या मतांचें वर अत्यंत त्रुटित दिग्दर्शन झालें. मायेच्या संबंधानें मला काय म्हणावयाचें होतें तें मागील भागांत सांगितलेंच आहे. पण ही गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची आहे कीं, मायेचा सर्वथा धिक्कार करणारे व मायेला योग्य स्थान देऊन विचाराची मर्यादा ठरविणाऱ्या श्रीमच्छंकराचार्यांस व त्यांच्या अनुयायांस 'राक्षसी' ही पदवी देऊन ह्या सर्वांस अंधतमसांत पाठविणारे **शुद्धाद्वैती, विशिष्टाद्वैती व द्वैती यां सर्वांस कमी अधिक प्रमाणानें मायेचा अंगिकार करावा लागला आहे!** 'वासना व अहंकार' ही दुकूल मायेला उत्पन्न करून जीवाला दुःखांत घालिते हें कोणासही नाकबूल करितां येत नाहीं. वासना म्हणजे बाह्य विषयप्राप्तीची जबरदस्त आकांक्षा होय. ही बया असली म्हणजे पदार्थाचें पारमार्थिक ज्ञान होत नाहीं. अहंकारानें स्वतःचें ज्ञान पूर्ण वाटतें! एवंच या दुकूलीनें ज्ञान लुप्त होऊन अज्ञान वाढतें. असो; उपभोगासंबंधानें या वरील तीन महापुरुषांनीं जो सद्विचार केला व मायेचें अस्तित्व उपभोगापुरतें तरी निश्चित केलें, त्यांनीच श्रीमच्छंकराचार्यांचे ह्मणण्याचा निःपक्षपातपणानें विचार पुढें केला असतां तर इन्द्रियादिकांनीं उत्पन्न झालेलें ह्या जन्मांतील अथवा पूर्वजन्मस्थ सर्व ज्ञान अपूर्ण म्हणून मिथ्या आहे, अशीच त्यांची खात्री झाली असती. चमत्कार हा आहे कीं, उपनिषदांच्या अभावीं विषयमिथ्यात्वाचें व इन्द्रियादिकांच्या उपाधिग्रस्ततत्वाचें ज्ञान–अंधुक अंधुकच कां होईना–यूरोपखंडांतील तत्त्वज्ञांस झालें, तेंच ज्ञान उपनिषदांत व गीतेंत स्पष्ट तऱ्हेनें उल्लेखिलें असतांही आमच्या येथील संप्रदाय जाणणाऱ्या लोकोत्तर महापुरुषांसही होऊं नये! मायावाद ह्या लोकसंग्राहक पुरुषांच्या पुढें स्पष्ट असतांही त्यांनीं तो झिडकारून देऊन उपनिषदांची एकवाक्यता 'विरुद्ध–धर्मत्व स्वीकारून' 'अतत्त्वमसि' असे मनःकल्पित प्रयोग निर्माण करून, प्रतिपादण्याचा निश्चय केला, यांतलें रहस्य मला इतकेंच दिसतें कीं, मायावाद स्वीकारला असतां दृश्याच्या शास्त्रामध्यें व विधींमध्यें, अनवस्था उत्पन्न होतील, अशी त्यांस भीति वाटली असावी. कर्म संपेल, ज्ञान थांबेल, भक्ति गारठेल, योग नष्ट होईल, या भीतीनें–या उदार भीतीनें–त्यांनीं मायावादाला हरताळ लावण्याचा प्रयत्न केला असावा. मी ह्मणतों हें जर खरें असेल, तर या पुरुषांचें लोकसंग्राहकत्व व भक्तिशीलत्व मात्र, या भीतीनें प्रकट होण्याची संधी आली; पण त्याचबरोबर त्यांचें बुद्धिमांद्यही आविर्भूत झालें! असो; श्रीमच्छंकराचार्यांच्या ग्रंथांचें ज्यानें विचारपूर्वक परिशीलन केलें आहे व त्यालाच पाश्चात्य तत्त्वेतिहासाची जोड लाविली आहे, विवेकानंदस्वामींचीं व अनिबिझांट बाईची व्याख्यानें ज्यानें ऐकिलीं आहेत किंवा निदान वाचिलीं तरी आहेत आणि ज्ञानेश्वरादि व कबीर प्रमुख महासाधुसंतांचे प्रासादिक आलाप सांप्रदायिक पद्धतीनें ज्यांच्या कर्णपथावर येऊन आदळले आहेत, त्याला तरी 'इंद्रियांस जसें दिसतें, तसें हें विश्व निश्चयानें असत नाहीं' हें पूर्णत्वानें कळून चुकलें आहे. एकदेशी पाहणाऱ्याला मात्र, पृथ्वी जशी अयथार्थ स्वरूपानें दिसतें, त्याचप्रमाणें आपल्या परि-

च्छिन्न इंद्रियादिकांनीं दिलेलें समर्याद ज्ञान परिच्छिन्न, अपूर्ण व मिथ्याकल्पच असावयाचें, यांत लवमात्रही संदेह नाहीं. आतां पाश्चात्य तत्त्वज्ञांसही आत्मस्वरूप पूर्णत्वानें न कळल्यामुळें, त्यांच्या तत्त्वज्ञानांत घोंटाळा झाला, तो तेथें आमच्या देशांत होण्याचें कारण नव्हते; कारण उघडच आहे कीं, इंद्रियज्ञानापलीकडील 'अस्मितेचा' जो अखंड अनुभव प्रत्येक जीवास तिन्हीचान्ही अवस्थामध्यें येतो, त्याचा उपयोग आमच्या प्राच्य व अर्वाचीन तत्त्वदर्शी ज्ञानी पंडितांनीं करून घेतला होता, आणि ब्रह्मज्ञानाची पूर्णता दिग्दर्शनतः करून व्यावहारिक सत्तेमध्यें ब्रह्माच्या अधिष्ठानामुळें जें सत्यत्व आलें आहे, त्याचा परिशोध उपनिषदांच्या आधारभूमिका घेऊन तात्त्विकदृष्टीनें, प्रयोगशः, प्रमाण प्रमेयादि अनुमानपद्धतीनें, प्रत्यक्ष दर्शनानें, अंतर्निरीक्षणानें आणि आन्विक्षिकी पद्धतीनें करून दृश्यांतील शास्त्रांचें सिद्धांत प्रकट केले होतें आणि पुरुषार्थसिद्धीस योग्य असे कर्मयोगाचे विधि, सनातन वैदिकधर्माच्या आधारानें, ठरविले होते. असो; सांगावयाचें तात्पर्य हें आहे कीं, 'मायां तु प्रकृतिं विद्यात्' हा श्वेताश्वतर मंत्र घ्या किंवा 'मम माया दुरत्यया' हें श्रीमद्भगवद्वाक्य घ्या, तात्पर्य एकच आहे तें हें: प्रकृतीसकट सर्व जीव मायामय आहेत. आपला आनंद मायिक आहे, इतकेंच नव्हे, तर आपलें **ज्ञानही मायिकच आहे.** दृश्यद्रष्टा ही दुकल आहे, तोंपर्यंत माया कमीअधिक प्रमाणानें कायम असावयाची. परमार्थ दृष्टि झाली, अद्वैतज्ञानविज्ञान झालें ह्मणजे माया नष्ट होते, व त्याबरोबरच जीव व प्रकृति या दृश्यांतील अनाद्यनंत वस्तूंचाही लय होतो. परमार्थतः माया नाहीं व दृश्यविश्वांत तिचे भान नाहीं, हें खरें; पण जीवाजवळ आत्मानुभव व इंद्रियजन्य ज्ञान या दोहींचें वास्तव्य एक कालींच असल्यामुळें, सारांश तो अल्पज्ञ म्हणजे उपाधिद्वारा बाह्यज्ञान करून घेणारा पण 'मी अज्ञानी आहें' असें समजणारा असल्यामुळें त्याला 'माया आहे' असेंही वाटतें व 'नाहीं' असेंही वाटतें. सुंदर असल्यामुळें हवीशी वाटणारी वसंतसेना ज्याप्रमाणें शकारशालकमहाराजास ती चारुदत्तावर प्रेम करिते व आपल्यास धीक्कृत करिते म्हणून नकोशीही वाटत होती, त्याचप्रमाणें आमच्या बिचाऱ्या जीवाची स्थिति होते. पण लक्षांत ठेवा कीं ही मायाही जीवांच्या प्रथम प्रथम भूमिकांत विशेष उपयोगाची असते. मोक्षाच्या पहिल्या पायऱ्या चढत असतांना **प्राणाकरितां** देहसंरक्षण करावयास लावणारी, **मनाकरितां** प्राणांचें जतन करणारी, **बुद्धिविज्ञानाप्रीत्यर्थ** मनाचें योगक्षेमात्मक व्रत चालविणारी व **शुद्धानंदास्तव** बुद्धीचा अभिनिवेश धरणारी माया नसती, तर वेदोक्त मुक्तिसोपानपरंपरा चढणें फार कठिण झालें असतें; तात्पर्य, सर्व दृश्यज्ञान मायिक, मायोपाधिकृत व मायासाहाय्यानें मिळालेलें असतें. त्याचप्रमाणें सर्व अंतर्बाह्य कर्में, विषयवासना, इच्छा, याही सर्व मायासंवलित आहेत. त्यांचा उपयोग प्रथम होतो खरा, पण ते मायिक आहेत हें विसरता नये. असा वास्तविक प्रकार आहे ह्मणून वेदोक्ताच्या आश्रयानें कां होईना, पण बुद्धीच्या व इतर इंद्रियांच्या द्वारानें झालेलें सर्व ज्ञान व सर्व कर्म मायामयच असणार; अर्थातच केवलाद्वैतसिद्धांताव्यतिरिक्त इतर सिद्धांत मायामय असणार.

ही माया कबूल करून बुद्धिमात्रजन्य ज्ञान व विषय-इच्छाजन्य कर्म मायिक आहे, असें समजलें ह्मणजे इतर सिद्धांतांत व आचार्यांच्या तत्त्वज्ञानांत व कर्ममार्गांत फारसा विसंवाद राहत नाहीं; मुख्य सिद्धांतांत सुसंवादच असतो. पहा कीं, निर्गुणाची अभिव्यक्ति सगुणांत होते असें आचार्य म्हणतात व आपण आन्विक्षिकी पद्धतीनें ( Dialectic ) स्वरूपाचा शोध केला असतां आपल्या निर्गुणी आत्म-स्वरूपाची अभिव्यक्ति अहंकार, बुद्धि, मन, प्राण, इंद्रियें ज्ञानात्मक व वासनात्मक ( Knowing and willing ) यांच्या द्वारानें अभिमानी, बुद्धिमान् पाहणारा, करणारा ( कर्ता ), भोक्ता व आनंदी इत्यादि प्रकारची होते. हे आत्म्याचे अभिव्यक्त झालेले गुण जसे जसे इतर आचार्यांस मान्य आहेत, तसेच शंकराचार्यांसही मान्य आहेत. आचार्यांचा ' जीव ' ह्मणजे इतर वाद्यांचा आत्मा व त्यांचा जो सगुण ईश्वर, तोच इतर आचार्यांचा परमात्मा आहे. मात्र मध्वाचार्य सत् ( जड ) चित् ( जीव, आत्मा ) अनंत ( परब्रह्म ) असा विभाग कल्पून ह्या तीन स्वतंत्र वस्तु आहेत, परस्परैविलक्षण आहेत आणि अनंताची सत्सांतावर व चित्सांतावर अखंड सत्ता आहे व तोच अनंत जडसृष्टीचें निमित्तकारण आहे, असें ह्मणतात. हें मत अर्थात् शंकराचार्यांस संमत नाहीं. पण अनंत हा अप्राकृत शरीरी, अनंत गुणवान्, स्वतंत्र, अव्यय, अविकारी, सर्वसाक्षी, सर्वदयाघन व एकच स्वामी आहे, असें जें माध्व ह्मणतात, तें शंकराचार्यांस असंमत नाहीं. श्रीरामानुजही हीं सर्व विशेषणें घेऊन आणखी जास्त असें सांगतात कीं, परमेश्वर हा उपादानकारण असून चित् व अचित् हें द्वय त्याचें शरीर घटवितें. तसेंच तो ज्ञानरूप व सुखरूप असून ज्ञानी व आनंदी आहे, असें ह्मणतात. हें म्हणणें श्रीशंकराचार्यांस संमत आहे. इतकेंच कीं मध्वाचें व रामानुजाचें जें परब्रह्म, तें आचार्यांचें सगुणब्रह्म आहे. मध्वांमध्यें मन प्रधान असून बुद्धीचे विलास गौण आहेत, तर रामानुजांमध्यें बुद्धि प्रधान आहे. आतां श्रीवल्लभाचार्य सगुण-निर्गुणाचा संघ करून व परमेश्वरास श्रुतिप्रणीत सर्व सद्गुण आहेत असें सांगून पुनः तेथें जीवज्ञान व जीवज्ञेय सर्व गुण आहेत, असें म्हणतात; तसेंच ब्रह्म सर्वांशानें निर्गुण आहे, असेंही म्हणतात. एवंच वल्लभांस निर्गुणब्रह्म संमत आहे व तेंच आचार्यांचें म्हणणें आहे. प्रकटस्थितींत, दृश्यस्थितींत, मायेंत सगुण, पण वस्तुतः निर्गुण हा सिद्धांत शंकराचार्यांसही मान्य आहे. इतकेंच नव्हे, तो त्यांचाच उपनिषत्प्रणीत-सिद्धांत आहे; युक्तीनें तसेंच ठरतें आणि अनुभवही तसाच येतो. ( पहा गीता अ० १३ श्लोक १२ ते १५ ) तात्पर्य, सगुणब्रह्माच्या स्वरूपांत सर्वत्र ऐकमत्य आहे; मात्र मध्वशास्त्री ब्रह्माकडे निमित्तकारण मात्र ठेवितात, बाकीचे आचार्य सर्व कारणपरत्वाचें अधिष्ठान ( परमार्थतः किंवा विवर्तद्वारांत ) ब्रह्म आहे, असें म्हणतात.

परमार्थदृष्टीनें जीव हा ब्रह्मच आहे, असा शांकरसिद्धांत श्रुतियुक्तिअनुभवानें ठरलेला आहे. बाकीचे तीन आचार्य जीवाला 'अणु' परमाणाचा, ज्ञाता, कर्ता, भोक्ता,

अहंममतेनें मायावश असा व अनाद्यनंत असा ठरवितात; हें मत दृश्यस्थितींत मायेंत, शंकराचार्यांसही असंमत नाहीं. परमार्थस्थितींत मात्र जीवात्म्याला, आत्मारामाला, हे वरील परिच्छेदकगुण लावितां येत नाहींत. तो परमार्थतः ब्रह्म आहे असें शंकराचार्यांचें म्हणणें गीतेंतील अ० २ श्लोक २३–२५ प्रमाणें विहितच आहे. जीवस्थितींत इच्छेचा कर्ता व कांहीं अंशानें प्रकृतीचा नियंता जीव आहे व विषयसुखदुःखाचा भोक्ता जीव आहे, त्याला विवेक झाला म्हणजे परमेश्वराकडे जावेंसें वाटतें, व तिकडे जाण्याला निष्कामकर्म, सगुणभक्ति, योग, पराभक्ति, व गुरुसेवेनें झालेलें परोक्षज्ञान हीं साधनें आहेत, असें जितक्या जोरानें माध्व, रामानुज व वल्लभ म्हणतात, तितक्याच जोरानें आचार्यही निष्कामकर्माचें, योगाचें, भक्तीचें व ज्ञानाचें स्तुतिस्तोत्र गाऊन पुनः हीं साधनें घेतल्याशिवाय परमपदाची प्राप्ति होणार नाहीं, असें आग्रहानें सांगतात. सारांश, इतर वाद्यांनीं जें जीवाचें, आत्मारामाचें मूळस्वरूप ठरविलें, तेंच आचार्यांनीं जीवाचें, मायोपाधिक आत्मारामाचें लक्षण केलें आहे, साधनेंही तींच सांगितलीं आहेत व भक्तीचें स्तोत्र तितक्याच भक्तिपुरःसर गायिलें आहे. सारांश, येथें ऐकमत्यच आहे. आतां जीवाचें अधिष्ठान, मूळस्वरूप, ब्रह्म असें आचार्य म्हणतात (पहा गीता अ० २ श्लोक २०) व जीवाचें 'अणुपरिणामत्वादि' लक्षण तेंच आत्म्याचें मूळस्वरूप असें इतर वादी म्हणतात. आत्माराम (Spirit) प्रकट झाला म्हणजे तो जीव (Soul) किंवा शिव (God) या स्वरूपानें आविर्भूत होतो, असें आचार्य म्हणणार व तींच जीवांचीं व ब्रह्माचीं परमार्थ स्वरूपें आहेत, असें इतर वादी म्हणणार. दृश्यस्वरूप व बुद्धिगम्यस्वरूप अनित्य, विकारी असल्यामुळें मायिक आहे, असें आचार्य प्रतिपादितात व दृश्य व कल्प्य स्वरूप तेंच आत्मस्वरूप असें इतर वादी म्हणतात. पण जीवस्वरूपांत व त्याच्या सांसारिक स्वरूपांत सर्वत्र सुसंवादच आहे, साधनांत भक्ति प्रधान असें इतर वादी म्हणणार व साधनांत ज्ञान प्रधान असें आचार्य म्हणणार; तथापि भक्तीची पराकाष्ठा झाली म्हणजे मुक्ति मिळते असें इतर वादी म्हणतात, आणि आचार्य परोक्षज्ञान होऊन भक्तीची पराकाष्ठा झाली म्हणजे अपरोक्षज्ञान होऊन मग लागलीच मुक्ति मिळते असें म्हणतात. (पहा गीता अ० १८ श्लोक ५३–५५).

जगत् सत्स्वरूप आहे असें इतर वादी म्हणतात व तें दृश्य म्हणून मिथ्या असें शंकराचार्य म्हणतात. (पहा गीता अ० ८ श्लोक ४ व अ० १३ श्लोक ३) पण दृश्यस्थितींत त्याची व्यावहारिक सत्ता अनाद्यनंत आहे असें शंकराचार्य म्हणतात. (पहा अ० १३ श्लोक १९) पण दृश्यस्थिति तीच पारमार्थिक स्थिति असें इतर वादी म्हणतात. आतां जगताचा निमित्तकर्ता परमेश्वर आहे असें माध्व, जगताचें निमित्तोपादन कारण परमेश्वर आहे असें रामानुज आणि जगाचें निमित्तोपादन कारण असूनही पुनः अविकृत राहणारा परमेश्वर आहे, असें वल्लभ म्हणतात, हें त्यांच्या त्यांच्या दृष्टीनें ठीकच आहे व उत्तरोत्तर श्रेष्ठ, श्रेष्ठतर भूमिकांचा आश्रय झाला आहे. पाहणाऱ्याच्या

अधिकारानुसार हीं कारणें युक्तीला व अनुभवालाही रुचतात. शंकराचार्यांनी मात्र दृश्य स्थितींत परिणामवादाचा अंगिकार व परमार्थ स्थितींत विवर्तवादाचा आश्रय केला आहे व तो श्रुतीस व गीतेला संमतच आहे ( पहा गीता अ० ९ श्लोक १० ). जीव ज्ञानमार्गानें मेला असतां हें विश्व त्याच्या उद्धारी कर्माकरितां आहे, असें इतर आचार्य म्हणतात, त्याचप्रमाणें आचार्यही सोपाधिक जीवांच्या कर्तृत्वभोक्तृत्वासाठीं व विशेषतः भोक्तृत्वासाठीं व ज्ञानप्राप्तीसाठीं हें जगत् आहे, असें म्हणतात. एवंच दृश्य विश्वासंबंधें सामान्यतः एकवाक्यताच आहे. 'दृश्यापलीकडे अव्यक्त पण ईश्वरास व्यक्त असें प्रकृतीशिवाय कांहीं नाहीं' असें माध्वमत, प्रकृति हें ईश्वराचें एक अंग आहे असें रामानुजमत आणि प्रकृति हें सर्वथा ( दृश्यगुणासह ) परब्रह्मच आहे, हें वल्लभमत मात्र शंकराचार्यांस संमत नाहीं. प्रकृतिस्वरूपाचें मूल अधिष्ठान ब्रह्म आहे, पण तिचें दृश्य स्वरूप हा ब्रह्मावर विवर्त आहे ( पहा, गीता अ० ७ व अ० १३ ) असें आचार्यमत आहे. तथापि आचार्यांचें दृश्य विश्व व इतर वाद्यांचें पारमार्थिक विश्व यांत एकवाक्यता सामान्यत्वानें आहे.

याप्रमाणें सामान्यविशेषांचा विचार झाला. श्रुतिप्रणीत नित्यनैमित्तिकांमध्यें व स्मृतिप्रणीत व गीताप्रणीत व्यक्तिविषयक व सामाजिक नीतींत मुळींच भेद नाहीं. सर्वांस वरील ग्रंथ मान्य असल्यामुळें प्रत्यक्ष कर्तव्यांत भेद पडत नाहीं. कारणांचा व कारणकारणांचा विचार करितांना व नीतिशास्त्राच्या नियमांची मीमांसा करितांना मात्र भेद असतो व म्हणून तो विचारी पुरुषांस दिसतो. हा भेद असतो व दिसतो म्हणूनच ज्ञानाची, सांख्य व योग शास्त्रांची, तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे. शिवाय जावत्कालपर्यंत जीवास प्राप्त झालेल्या ज्ञानाची धांव अखंड कायम राहील, जोंपर्यंत आम्हांस प्राप्त झालेला, विद्यमान असलेला व प्राप्त होणारा इंद्रियगण मनोबुद्धीसह ज्ञानासाठीं अविश्रांत श्रम करणारा आहे, तोंपर्यंत जिज्ञासेला 'येथेंच थांब, याच्यापुढें जाऊं नको' असा बंधारा प्रत्यक्ष परमेश्वराच्या हातूनही घातला जाणार नाहीं मग इतरांची वार्ता कशाला ? ज्ञानी पुरुषाच्या उपाधि तुटून तो सुखरूप होईल व अमर असणारा जीव जेव्हां अविकार्य व अविकारी होईल, तेव्हां मात्र म्हणजे जीव सच्चिदानंदरूप होईल तेव्हां मात्र ज्ञानविज्ञानाची, शास्त्राची व तत्त्वज्ञानाची मर्यादा अस्तंगत होऊन ब्रह्मीं ब्रह्म होऊन राहील. या सर्व विज्ञानवाद्यांचा उपयोग आहे व ते सर्व अद्वैतवादाचे पोषकच आहेत. अद्वैतवादांत मात्र या सर्वांचा अंतर्भाव होतो व सर्वत्र म्हणजे सांख्याच्या व योगाच्या ( Theoretical and Pratical Philosophy ) साम्राज्यांत 'ठाकसे ठीक' व्यवस्था लागते.

---

## निरनिराळ्या ज्ञानवाद्यांची एकवाक्यता.

[अ] आत्मा हा स्वयंभू, स्वज्ञ व सर्वज्ञ आहे हें तत्त्व अद्वैतसिद्धांताप्रमाणें शैव व सांख्य यांस संमत आहे. तसेंच तो स्वानंदी नाहीं असेंही त्यांचें मत नाहीं. सारांश, सांख्यांच्या मतें तो स्वानंदी आहे. **नैयायिकांनाही** असें कबूल केले पाहिजे कीं, 'आत्मा हा स्वानंदी आहे.' कारण, इंद्रब्रह्मदेवांची दैवी स्थिति प्राप्त होण्यापेक्षां *आत्मस्थिति प्राप्त होणें अत्यंत सुखदायक आहे, असें त्यांचें मत आहे. 'मुक्त झाल्यानंतर* आत्मा हा वृक्षपाषाणाप्रमाणें अज्ञ असतो' याचा इतकाच अर्थ घ्यावयाचा कीं, शरीर व इंद्रियें या उपाधींपासून मुक्त होऊन केवलस्थितींत असणारा आत्मा हा विषयोपाधींनीं ग्रस्त झालेल्या संसारी आत्म्याहून अत्यंत विलक्षण आहे. तेव्हां येथील व्यावहारिक जाणीव, व्यावहारिक सुख यांहून अत्यंत विलक्षण अशी जाणीव व सुख त्या मुक्त आत्म्याला असलें पाहिजे, नव्हे! आत्मारामच स्वतः जाणीवरूप म्हणजे ज्ञानरूप, सुखरूप व सद्रूप असतो हें ध्यानांत ठेवावें. ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत राहत नाहीं म्हणून मुक्त आत्मा **अज्ञ व सुख-दुःख विरहित** असें म्हणावयाचें. ही **अज्ञत्वाची व विकारविरहित्वाची** स्थिति मुक्त स्थितींत असते म्हणूनच **शून्यवादी बौद्ध** म्हणतात कीं, आत्मा शून्य होतो. सर्वच क्षणभंगूर आहे हा सिद्धांत गृहीत घेतला म्हणून **विज्ञानवादी बौद्ध** ह्मणतात कीं, आत्मा हा नित्य, अव्यय व निर्विकार नसून तो केवळ 'क्षणं ज्ञानं' स्वरूपाचा आहे. तेव्हां सत्यज्ञान होऊन आत्मा मुक्त झाला म्हणजे त्याचें अज्ञान नष्ट होऊन तो केवळ शुद्धज्ञानाचें अधिष्ठान होतो. विज्ञानवाद्यांचें 'दृश्य विश्व हें वास्तविक नसून आपल्यास भासतें, तो निवळ स्वयंभू कल्पनांचा खेळ आहे' हें खोडून काढण्याच्या आवेशांत भट्टानुयायी मीमांसक ह्मणतात कीं, आपल्या कल्पना स्वयंभू नसून त्या दृश्य पदार्थांपासून उत्पन्न होतात.

पण **आत्मा प्रत्यक्ष आहे व तो संतत आहे** हें मत कमी अधिक प्रमाणानें सर्व वाद्यांस संमत आहे. 'आत्मा कर्ता, भोक्ता आहे' असें **कर्मठ** ह्मणतात. 'उपाधींशीं संयुक्त झाला ह्मणजे आत्म्यास कर्तृत्वभोक्तृत्व प्राप्त होतें. वस्तुतः तो कर्तृत्वभोक्तृत्व-शून्य आहे' असें **वेदांती** म्हणतो. तथापि **आत्मा हा देहातिरिक्त व देहविलक्षण आहे** हें मत सर्वांस मान्य आहे. आतां नास्तिक वादाचें खंडन करण्यासाठीं मीमांसक-वादी वेदाचें सत्यत्व व अविनाशित्व प्रतिपादन करून वेदाज्ञेप्रमाणें सर्व जीवांनीं चाललें पाहिजे असें ह्मणतात. आत्मा शुद्ध आहे असें म्हणणें त्यांस वेदविरुद्ध वाटतें. वेदाचें प्रामाण्य स्थापित झाल्यावर मग 'आत्मा' हा शुद्ध, निर्विकार व सच्चिदानंद स्वरूप आहे, असें कबूल करण्यांत ते अमान्यता दाखविणार नाहींत हें स्पष्टच आहे.

**[आ] आत्म्याचें एकत्व व विश्वाचें असत्यत्व**–आत्मे अनंत आहेत व विश्व सत्य आहे असें **नैयायिक** व **सांख्य** ह्मणतात. पण तोच आत्मा मुक्त झाला म्हणजे तो स्वयंज्योति, स्वयंभू आणि एकाकी असतो, असें त्यांचें मत आहे. तसेंच सत्याचें ज्ञान झालें

व जगत् आणि जीव यांचें खरें तारतम्य समजलें म्हणजे तो मुक्त होतो, असेंही म्हणतात. आतां विश्व आणि विश्वगत पदार्थ आत्म्याच्या मुक्तस्थितींत नष्ट होतात व तो एकाकी असतो, हें जर ह्या वाद्यांचें मत खरें आहे, असें आपण समजलों, तर मग विश्वाचें अखंड नित्यत्व व सत्यत्व कोठें राहिलें ? ब्रह्मज्ञानानें अज्ञान नाहींसें होतें, हें जर खरें आहे, व ज्ञानस्थितींत पूर्ण विश्वाचा आभास नष्ट होतो, हेंही जर खरें आहे, तर विश्व हें अज्ञान-विजृंभण आहे, असेंच नाहीं कां ठरत? दोरी कळली म्हणजे सर्पाचा आभास नाहींसा होतो, म्हणून जसा दोरीवरील भासलेला सर्प खोटा, त्याचप्रमाणें पूर्ण ज्ञान झाल्यानंतर विश्व नष्ट होतें, म्हणून विश्वाचा आभासही मिथ्याच होय. 'मुक्ताचें विश्व नष्ट झालें तरी व्यवहारांत विश्व असतेंच असतें' हें पतंजलीचें म्हणणेंच असें सांगतें कीं, परमार्थतः **विश्व जसें आहे, तसें दिसत नाहीं;** म्हणजे तें आभासिक आहे. खऱ्याचें ज्ञान सर्वांस सर्व प्रसंगीं सारखें झालें पाहिजे. विश्वाचें किंवा सुखःदुखाचें ज्ञान सारखें नसतें, म्हणूनच विश्व मिथ्या आहे. शिंपल्यावर रुप्याचा आभास एखाद्यास अज्ञानामुळें होतो; म्हणून तें जसें रुपें नव्हे, त्याचप्रमाणें अज्ञानांत भासणारें आणि ज्ञानस्थितींत नसणारें विश्वही असत् असेंच ह्मटलें पाहिजे. एकाच वस्तूनें एकाला सुख होतें व दुसऱ्यास दुःख होतें, हा अनुभव प्रत्यक्ष आहे. यावरूनच सुखदुःख हें मानीव आहे, असें ठरत नाहीं काय? विचारव्यवस्थेसाठीं कांहीं वेळ विश्वास सत्य माना, पण दृश्यविश्वाला नित्यसत्यत्व कधींही येणार नाहीं. पुनः; 'अनेक आत्मे आहेत, किंवा ईश्वर व जीव यांत विशेष आहे' असेंही मुक्त जीवाला दिसत नाहीं. मुक्तस्थितींत आत्मा मात्र प्रकाशतो हेंही त्यांस संमत आहे, अर्थात् 'एकमेवाऽद्वितीयम्' हें तत्त्व त्यांस कबूल आहे, असें झालें. मग तंटा कशाला? सर्वत्र एकवाक्यताच आहे. एवंच अद्वैतामध्यें सर्व विरोधांचा लय होऊन प्रत्येक पंथाचें व दर्शनाचें अस्तित्व नियमित कार्यापुरतें आहे, बाकी सर्वत्र एकात्मकता आहे, हें ठरतें.

पुढें आणखी एकदां सर्व आचार्यांच्या मतांत एकवाक्यता कशी आहे, हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्या प्रयत्नाच्या अनुरोधानें जिज्ञासु वाचकांची जिज्ञासा कांहीं अंशानें तृप्त होईल, अशी मला बळकट आशा आहे. विषयकाठिण्यामुळें व माझ्या अक्षम्य अज्ञानामुळें केव्हां केव्हां माझ्या लिहिण्यांत कठिणपणा येतो हें मला ठाऊक आहे, पण या गोष्टी सध्यां तरी नाइलाजाच्या आहेत.



रूप कायम ठेवून होतो. इतर वस्तूंच्या अपेक्षेनें लक्ष्मीचे गुण अनंत आहेत, पण परमेश्वराच्या अनंतानंत गुणांच्या दृष्टीनें लक्ष्मीचे गुण सांतच होत.

## इतर देवता.

३. ह्या कमीअधिक प्रमाणानें मुक्तावस्थेंत असतात व परमेश्वराच्या आज्ञेनें जगद्व्यवस्थेमध्यें परमेश्वरास अनुकूल असे नियतकर्म करीत असतात.

## जगत् ( विश्व. )

४. जगतांची उत्पत्ति परमेश्वराच्या इच्छामात्रेंकरून होते. घटाचें उपादान कारण जशी मृत्तिका, त्याप्रमाणें जगताचें उपादान कारण त्रिगुणात्मक जडप्रकृति आहे, व निमित्त कारण श्रीभगवान् आहे. या प्रकृतीपासून जगतांची उत्पत्ति म्हणजे प्रकाशन होतें; पण प्रकृति सर्वथा जडस्वरूपी असल्याकारणानें–कोणतीही गोष्ट स्वातंत्र्यानें करण्यास असमर्थ असल्यामुळें–परमेश्वरच निमित्तकारण आहे; त्यालाच सर्वकर्ता व सर्वकारण असें ह्मणतात. परमेश्वरास 'पुष्कळ व्हावे' अशी इच्छा झाली, तेव्हां तो जडप्रकृतींत शिरल्यासारखें करून हें विचित्र व नानाविध ब्रह्मांड उत्पन्न करिता झाला. प्रकृति अनादि, अनंत, सूक्ष्मस्थितींत अविकारी पण स्थूलस्थितींत विकारी आहे. **प्रकृति सत्य आहे, नित्य आहे, असत्य किंवा असत् नाहीं.** लक्ष्मी ही तिची शक्ति हे वर सांगितलेच आहे. जीवाचें शरीर प्रकृतीकडूनच प्राप्त होते. व जीवाला शरीरत्व प्राप्त झाल्यावर प्रकृतीचे सत्त्वरजादि गुण प्रकट होतात.

## जीव.

५. प्रत्येक जीव निरनिराळा म्हणजे दुसऱ्या जीवाहून विलक्षण असून ते सर्व प्रकृति व परमेश्वर यांहून अत्यंत विलक्षण आहेत. **तो एक वस्तुच आहे,** तो मिथ्या नाहीं, तो नित्य, ज्ञाता, अणु, कर्ता, भोक्ता, ब्रह्मांचा अंश (आणि म्हणूनच ब्रह्माहून विलक्षण), तसेंच ज्ञाता म्हणून प्रकृतीहून अत्यंत विलक्षण आहे. तो परमेश्वराधीन आहे. प्रकृतीशीं संबंध झाल्यावर तो सत्त्वादि गुणांनीं युक्त होतो, व अज्ञानी, दुःखी व संसारी होतो. मुक्तियोग्य, नित्यसंसारी व तमोयोग्य अशा तीन जातीचे जीव असतात. देव, ऋषि, पितर, चक्रवर्ती राजा व मनुष्योत्तम पुरुष हे मुक्तियोग्य होत. सुखदुःखमिश्रणानें संबद्ध झालेले नित्यसंसारी होत; आणि दैत्य, राक्षस, पिशाचें आणि नराधम लोक हे तमोयोग्य पुरुष होत. या तमोयोग्यांस कधीही मुक्ति मिळण्याचा संभव नाहीं. कारण हे अज्ञानांत ह्मणजे मायेंत असतात. हे जीव परस्पराहून निराळे असतात, हें सांगावयास नकोच. पण लक्षांत हें ठेवावयाचें कीं, संसारांत काय आणि मुक्तस्थितींत काय, हे लोक तेथें

तेथेंही भिन्न स्वरूपी असतात. सारांश, संसारांत जसें सुखदुःखाचें तारतम्य दिसतें, तसेंच मुक्तस्थितींतही आहे.

६. सारांश ईश्वर सत्य, त्याचे गुण सत्य, जीव सत्य, जड प्रकृति सत्य आणि जीव व ईश्वर, जड व ईश्वर, जीवजीव, जड व जीव आणि जडजड यांमधील भेदही सत्य आहेत, यालाच पंचभेदवाद असें ह्मणतात.

## मोक्ष.

७. मोक्ष ( मुक्ति ) ह्मणजे प्रकृतीच्या बंधापासून सुटका व ईश्वरप्राप्ति होय. ही मुक्ति नित्य आहे; ह्मणजे मुक्त झालेला जीव पुनः जन्ममरणाचे चक्रांत सांपडत नाहीं. कर्मक्षय, उत्क्रांति व अर्चिरादिमार्ग हीं साध्य झालीं ह्मणजे मोक्ष मिळतो. कर्म ( कायिक, वाचिक व मानसिक ) व तत्फल यांच्या योगानें जीव बद्ध होतो. हें कर्म प्रकृतीशीं संबंध आल्यावर उत्पन्न होतें व या संगतीनें जीवास प्रकृतीचे गुण लागतात; ह्या गुणांमुळें जीव कर्म करितो आणि सकाम कर्म होत असलें अगर शास्त्रनिषिद्ध कर्म होत असलें ह्मणजे तो बद्ध होतो, व जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो. तेव्हां या कर्माच्या चक्रांतून सुटणें हाच कर्मक्षय होय. ह्या कर्मक्षयावर उत्कृष्ट रामबाण औषध ह्मणजे श्रीपरमेश्वराची अनन्यभक्ति व त्याची कृपा व प्रसाद हेंच आहे. ( १ ) ईश्वराचीं शंख, चक्र, गदादि चिन्हें आपल्या शरीरावर गोंदून घेऊन त्यांचें सदैव चिंतन करणें. ( २ ) मुलांबाळांचीं ईश्वरपर नांवें ठेवून नामसंकीर्तन करणें आणि श्रीपरमेश्वरावर पूर्ण श्रद्धा ठेवून व सर्व प्राणिमात्रांशीं न्यायानें व दयेनें वागून त्यांची पूजा करणें आणि सत्य, दया, ममत्व, नित्यकर्मानुष्ठान ( स्वाध्याय ) अगर स्तोत्रपाठ-( गीतादि भागवत ग्रंथांचें पठण ), दान, अनाथसंरक्षण, अहिंसा, अनुग्रह, समाधान, विषयनिवृत्ति, आणि श्रद्धा ही सर्व भजनात्मकच होत. हीं सर्व श्रीशाला ( लक्ष्मीपतीला ) सर्वथा अर्पण करणें हीच देवाची पूजा होय. ह्याचप्रमाणें केवलाद्वैताचे किंवा इतर मतांचे सर्व सिद्धांत सर्व प्रकारें सोडून देणें हा एक भक्तिपोषक मार्ग आहे. असो; अशी एकनिष्ठ भक्ति दृढ झाली ह्मणजे अन्नमयादि पंचकोशांचीं वस्त्रें टाकून देऊन जीव हा सुषुम्नेच्या मार्गावर येतो. हाच उत्क्रांतिमार्ग आहे. येथून गीतांतर्गत आठव्या अध्यायांत सांगितलेल्या अर्चिरादि मार्गानें जाऊन जीव देवाच्या प्रसादानें मोक्ष मिळवितो. मग यास येथें अप्राकृत शरीर प्राप्त होऊन तो आनंदातिशयांत निमग्न होतो. अप्राकृत शरीर म्हणजे **चिन्मात्र देह** होय. सालोक्य, सारूप्य, सामीप्य व सायुज्य या चार मोक्षावस्थांपैकीं एक अवस्था त्यास प्राप्त होते. सायुज्य मुक्तींत तादात्म्य मिळत नाहीं, तर सायुज्य मुक्ति मिळाली असतां जीव परमात्म्यामध्यें शिरतो, पण व्यक्तित्वानें निराळाच राहतो. सर्वांची मुक्तावस्था सारखी नाहीं हें वर सांगितलेंच आहे. मोक्षावस्थेंतही ईश्वरी दास्य सुटत नाहीं. या वादांत ज्ञानाची मातब्बरी नाहीं; भक्तीची आहे.

## विशिष्टाद्वैतमत.

ह्या मताचे शेवटचे प्रस्थापक श्रीरामानुजाचार्य होत. यांचा उदय अकराव्या शतकांत झाला. यांनीं विशिष्टाद्वैतमताची प्रतिस्थापना केली. यांच्या मतांतील मुख्य सिद्धांत थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न करितों.

### ब्रह्मस्वरूप.

१. परब्रह्म वस्तु एक, अद्वितीय, सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी, ज्ञानानंदस्वरूप, सर्व अनंत कल्याणगुणांचा उत्कृष्ट रत्नसागर, सर्व दोषविरहित, सर्वशक्ति, सर्व म्हणजे अनंत विश्वांचें उपादानकारण, निमित्तकारण आणि सहकारी कारण, सर्व दयाघन, सर्व वेदांतवेद्य, पुरुषोत्तम, सर्वमंगलस्वरूप, सर्व शरीरी इत्यादि अनेक अनंत सद्गुणांचें माहेरघर आहे. तो सर्वबाह्यसाधननिरपेक्ष आहे. तो अनंत ज्ञान व अनंत ज्ञानी आहे, अर्थातच परब्रह्म गुणशून्य नसून सगुण आहे. वेदांतासारख्या प्रामाणिक ग्रंथांत त्याला सत्, आत्मा, ब्रह्म, ईश, विष्णु, ईश्वर, वासुदेव इत्यादि नांवें उपलब्ध आहेत; व अनंत नामें देतां येतील. चित् आणि अचित् म्हणजे सर्व चराचर वस्तु त्याचे शरीराचे दोन प्रकार आहेत. जसें आपल्या शरीरांत जीव आणि देह असे दोन प्रकार दिसतात, त्याचप्रमाणें परमेश्वराचे शरीरांत जीव आणि शरीर हे दोन प्रकार आहेत. सजीव आणि निर्जीव ह्या खऱ्या वस्तु आहेत, हें खरें; पण परब्रह्मामध्यें जी स्वतंत्र सत्ता आहे, ती या प्रकारांत नाहीं. तसेंच हे दोन प्रकार विकार्य आहेत, पण त्यांचें कारण व त्यांचा शरीरी जो परमात्मांश तो अविकारी असतो. परब्रह्माचे चित् व अचित् हे दोन गुण आहेत आणि म्हणून ते परमेश्वरोपजीवी आहेत. पदार्थनिष्ठ गुणधर्म असतात, त्याप्रमाणें हे प्रकार आहेत; म्हणून ते परमेश्वराशीं नित्य साहचर्यानें राहतात; आणि म्हणूनच तो एक, अद्वितीय आहे, तथापि त्याच्या स्वरूपांत विशिष्टपणा आला आहे. परमेश्वर सर्वव्यापी आहे म्हणून तो विशिष्ट आकाराचा, विशिष्ट परिमाणाचा व विशिष्ट रंगारूपाचा नाहीं, हें खरें; पण लीलेकरितां व जगदुद्धारास्तव त्याला हवें तसलें योग्यस्वरूप ( शुद्धसत्त्वात्मकस्वरूप ) घेतां येतें. त्याचें खरें शरीर म्हणजे चित् ( आत्मा, जीव ) व अचित् म्हणजे प्रकृत्यात्मक अथवा अनात्मक वस्तु होत. हा शरीरी आहे व सजीव आणि निर्जीव वस्तूंचा अंतर्यामी व नियामक आहे. अवताराचे वेळीं तो जें शरीर घेतो किंवा भक्त, योगी इत्यादिकांचे ध्यानास गोचर होण्यासाठीं जें स्वरूप धारण करितो, तें शुद्धसत्त्वात्मक असतें.

### अचित्स्वरूप. (जड सृष्टि)

२. अनंत ब्रह्मांडें एकाच सर्वशक्ति व सर्वसाक्षी ईश्वराच्या स्वाधीन असतात. त्यांत दृश्य व अदृश्य जातीचें अचित्, अनादि अनंत असून तीन प्रकारचें आहे. काल, शुद्ध-

प्रकृति आणि शुद्धसत्त्व हे ते तीन प्रकार होत. (अ) काल हा सर्व सृष्टीचें सहकारी कारण असून जड आहे. सर्व सृष्टि आणि विसृष्टि कालांत उत्पन्न होऊन, कालांतच स्थिति होतात आणि कालांतच प्रलय पावतात. सृष्टीच्या आरंभाच्या आधीं व सृष्टिप्रलयानंतर काल ही वस्तु असतेच. (आ) सृष्टीच्या आदौ मूलप्रकृति ही अव्यक्त आणि अज्ञेय स्थितींत असते. सत्त्वरजादि प्राकृतिक गुण या वेळीं साम्यावस्थेंत असतात. या वेळीं मूलप्रकृति (महत्, अहंकार व अपंचीकृत पंचभूतें) अण्वात्मक स्थितींत असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. (इ) शुद्धसत्त्व ही अप्राकृत वस्तु आहे. वैकुंठ, श्रीपरमेश्वराचीं अवतारशरीरें व मुक्तांस कर्मभूमीवर येतांना प्राप्त होणारीं शरीरें शुद्धसत्त्वात्मक असतात. शुद्धसत्त्व हें बौद्धिक तत्त्व आहे खरें, पण तेथें चैतन्यांश नाहीं, म्हणून शुद्धसत्त्वात्मक प्रकृतीस 'अचित्' वर्गामध्येंच ठेवणें न्याय्य आहे. महत् म्हणजे बुद्धि नव्हे व अहंकार म्हणजे मीपणा नव्हे, तर महत् म्हणजे सत्त्वादिकांनी साम्यावस्था सोडून दिल्यावर ज्या सत्त्वाधिक्य, रजोधिक्य इत्यादि अवस्था होतात तें महत् होय. ही प्रकृतीची दुसरी अवस्था आहे. अहंकार म्हणजे अंतःकरण, ६ वें इंद्रियाचें शरीर, प्रकृतीच होय.

## चित्स्वरूप.

३ चित्स्वरूप म्हणजे जीवात्मा होय. यांत प्रकृतीचा अंश मुळींच नसतो. जीवात्मा हा नित्य असून, 'अचित्' व परमेश्वर यांहून विलक्षण आहे. तो शुद्ध, आनंदस्वरूप, ज्ञानस्वरूप, अणु परिमाणाचा, ज्ञानी व आनंदी असून परमेश्वराच्या आधीन असतो. तो स्वरूपानें अविकार्य आहे, पण अनादिप्रकृत्यात्मक कर्माला वश होणारा व बद्ध होणारा आहे. त्याचें ज्ञान अनंत व नित्य आहे, तथापि त्या ज्ञानाच्या विचार, निश्चय, संशय, अनुमान इत्यादि अवस्था अनित्य आहेत. जीवाचें ज्ञान प्रकट होण्यास इतर साधनाची अपेक्षा असते, कारण तो बद्ध असतो. असो; मोक्ष मिळाला म्हणजे जीव प्रकृतीच्या तंत्रांतून सुटतो. अर्थातच मोक्ष मिळेपर्यंत तो प्रकृतीशीं संबद्ध असतो. प्रत्येक प्रकृतिपरमाणूंत गुप्त अथवा प्रकट जीवात्मा आहे. अथवा प्रत्येक परमाणु हा जीवाचें शरीर आहे. या जीवाचा व प्रत्येक परमाणूचा अंतर्यामी परमात्मा होय. या प्रत्येकास तो अंतर्बाह्य व्यापून असतो. या स्थितींत त्याचें ज्ञान कर्मवशत्वानें संकुचित झालेलें असतें. ही बद्धस्थिति होय. जीव तीन प्रकारचे असतात. (१) नित्य जीव (२) मुक्त जीव आणि (३) बद्ध जीव हे तीन प्रकार होत. **नित्य-जीव** (अनंत, गरुड, विष्वक्सेन इत्यादि) हे निरतिशय आनंदाचा उपभोग घेत असतात. त्यांस प्रकृतीची अगर कर्माची वशता (बद्धकता) नाहीं. ते सर्वज्ञ असून वैकुंठांत राहणारे असतात. (१) मुक्त जीव म्हणजे ज्या जीवास मोक्ष मिळालेला आहे व जे त्रिविध तापांतून व प्रकृतीच्या दास्यांतून मुक्त होऊन सर्वज्ञ झाले आहेत. (२) प्रकृतिवश व दुःखवश आणि कर्मवश असल्यामुळे जे जीव ते बद्ध जीव होत. ब्रह्मदेवांपासून तों स्तंबापर्यंतचे सगळे जीव व जीवजंतु.

वस्तु याच वर्गांत येतात. कर्मानुसार या जीवांस ईश्वरी तंत्रानें ब्रह्मादिकांचीं स्थानें मिळून ते जगद्व्यवस्था चालविणारे होतात व पुढें त्यांस मुक्ति मिळते.

## जगदुत्पत्ति.

४ जडप्रकृति परमेश्वराचें शरीर आहे व तो परमेश्वर चिज्जीवाप्रमाणेंच प्रत्येक जड परमाणूंत असतो, हें वर सांगितलेंच आहे. सूक्ष्म आणि स्थूल हीं दोन जडस्वरूपें आहेत. अथवा जडस्वरूपाच्या या दोन अवस्था आहेत. सूक्ष्म म्हणजे अव्यक्त आणि स्थूल म्हणजे व्यक्त अवस्था. सूक्ष्म (अव्यक्त) हें स्थूलाचें कारण होय. अव्यक्तापासूनच जगतांची उत्पत्ति परमेश्वराचे इच्छेनुरूप होते. परमेश्वर शरीरी, म्हणून उपादानकारण, इच्छामात्रेंकरून जगदुत्पत्ति करणारा म्हणून निमित्तकारण आणि कालाचा अंतर्यामी तो असतो म्हणून, कालसहकारीकारण आहे तसाच, परमेश्वरही सहकारीकारण आहे. जगत् उत्पन्न होतें असें म्हणणें ठीक नाहीं; तें प्रकट होतें. परमेश्वराचें शरीरभूत जें त्रिगुणात्मक सूक्ष्म प्रकृतितत्त्व अव्यक्त असतें, तेंच परमेश्वरी इच्छेनें कालवशातः प्रकट होतें; म्हणजे 'अडाणी भाषेंत' उत्पन्न होतें. प्रथमतः महत्, अहंकार इत्यादि परमेश्वरी इच्छेनें प्रकट होतात आणि नंतर पंचमहाभूतें प्रकट होऊन पंचीकरणद्वारा विविध रचनात्मक सृष्टि होते. पुढें कर्मफल भोगण्यास योग्य अशीं सुर, नर, तिर्यक् आणि स्थवीर अशीं व्यक्तिनिष्ठ शरीरें उत्पन्न होतात. या शरीराचें रूप नष्ट होईल म्हणजे रूपांतर होईल, पण शरीरघटक परिमाणु नष्ट होत नाहींत. ते सूक्ष्मस्वरूप असून नित्य, अनादि व अनंत आणि अज्ञेय असतात. अव्यक्तस्थितींत सत्त्वादि गुण स्तब्ध असतात हें वर सांगितलेंच आहे. उत्पत्तीच्या उलट प्रलयांचा क्रम आहे.

हीं शरीरें जीवाला कर्मफल भोगण्यासाठीं व कर्म करण्यासाठीं उत्पन्न होतात. जीवाला जन्म, मरण, पुनर्जन्म इत्यादि विकार स्वरूपतः नाहींत. कर्मानें मात्र तो प्रकृतीशीं संगत होतो आणि सुखदुःखाचा व जन्ममरणाचा अधिकारी होतो.

## कर्म.

५ विचारपूर्वक घडलेली क्रिया तिचें नांव कर्म. ईश्वरास आवडणारें तें सत्कर्म, आणि आवडणार नाहीं तें दुष्कर्म होय. अज्ञानानें कर्म, कर्मानें वासना, वासनेनें रुचि, रुचीनें प्रकृतिसंबंध, **प्रकृतिसंबंधानें अविद्या** (अन्यथाज्ञान व विपरीत ज्ञान) असें रहाटगाडगें मोक्ष मिळेपर्यंत चालतें. सत्कर्मानें मोक्ष मिळतो, हें मागें सांगितलेंच आहे. अविद्या संपली व ज्ञान–भक्ति–कर्मपूर्वक स्वरूपज्ञान आणि ईश्वरी स्वरूपज्ञान झालें म्हणजे मोक्ष मिळतो, अथवा प्रकृतिसंबंध तुटून निरतिशयानंदामध्यें सर्वज्ञस्थितीनें अनंतकालपर्यंत राहतां येतें. सर्वकारण ईश्वर आहे, तथापि कालाप्रमाणेंच तो सामान्यकारण आहे,

विशेष कारण नव्हे; म्हणून जीवाचें दुष्कर्म ईश्वराला बंद करितां येत नाहीं. सत्कर्मानें स्वर्ग आणि दुष्कर्मानें नरक हे कर्मानुसार मिळतात. उत्तम कर्म असेल तर महाकल्पाच्या प्रारंभीं ब्रह्मदेव, रुद्र, अग्नि इत्यादि देवतांचीं स्थानें व कार्यें त्या त्या जीवांस मिळून ईश्वराच्या तंत्रानें ते आपापलीं कर्में करून अंतीं मुक्त होतात.

## मोक्ष ( बंधविमोचन )

कैवल्य व ब्रह्मानंद अशा प्रकारचे दोन मोक्ष आहेत. कैवल्यमोक्षांत जीवांस स्वरूप ( ज्ञानस्वरूप व आनंदस्वरूप ) मिळून त्या जीवस्थितींतील पराकाष्ठेचा आनंद मिळतो. ब्रह्मानंदांत ब्रह्माचा-परब्रह्माचा-निरतिशय आनंद प्राप्त होतो. सायुज्य मुक्ति ती हीच होय. येथें परब्रह्मतादात्म्य नाहीं, तर समानत्व आहे. येथें जन्ममरण नाहीं, कारण प्रकृतीशीं संबंध नाही. वाटेल तर हा सायुज्य मुक्तींतील जीव परोपकारार्थ पृथ्वीवर जन्म घेऊं शकतो; पण असल्या जन्मांत तो प्रकृतिवश असत नाहीं. सालोक्य व सायुज्य मुक्ति व त्यांचे अर्थ वाचकांस विदितच आहेत. मोक्ष मिळाल्यानंतर जीव वैकुंठांत राहतात व योग्यतेप्रमाणें त्यांचीं स्थानेंही निरनिराळीं असतात. असो; मोक्षमार्ग ४ आहेत ते येणेंप्रमाणें: कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग आणि प्रपत्तियोग. ( १ ) कर्मयोगानें निष्कामकर्म करून चित्तशुद्धि झाली आणि तत्त्वज्ञान (चित्, अचित्, आणि ईश्वर या तीन स्वतंत्र वस्तु असून ईश्वर मात्र तदितर वस्तूंचा अंतर्यामी, मंगल, गुणसंपन्न, सर्वज्ञ, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान् आहे हें शास्त्रीयज्ञान) झालें व यज्ञ, दान, तप, जप, होम इत्यादि कर्मांमध्यें परमेश्वरी चिंतन अखंड राहिलें म्हणजे मोक्ष मिळतो. (२) अष्टांगसहितयोगानें चित्तवृत्ति स्थिर होऊन जीवाचें स्वरूप व परमेश्वरी स्वरूप सार्थ समजलें व अनुभवास आलें म्हणजे ज्ञानयोग सिद्ध होऊन कैवल्य अथवा ब्रह्मानंद मोक्ष मिळतो. (३) भक्तियोग (उपासना) म्हणजे यावज्जीव अखंड, अष्टौप्रहर, परमेश्वराचें व त्याच्या अनंत गुणांचें एकनिष्ठ चिंतन आणि वेदविहित कर्मांचें सांग अनुष्ठान होय. भक्तियोगाला ज्ञानयोगाचें साहाय्य मिळाल्यास कैवल्य अथवा ब्रह्मानंदप्राप्ति होते. 'मी म्हणजे परब्रह्म आहें म्हणजे मी परमेश्वराचें शरीर आहें व तो माझा नियामक असून तो माझ्यापेक्षां गुणांनीं व सामर्थ्यानें अनंत पटीनें श्रेष्ठ आहे' हें चिंतन भक्तियोगांत असावें. दहर विद्या, अन्तराविद्या, प्राणविद्या इत्यादि ३२ विद्या (उपासना) वेदांत ग्रंथांत सांगितल्या आहेत. कोणत्याही उपासनेचा आश्रय केला तरी फलप्राप्ति एकच असते. (४) प्रपत्तियोगांत आपली म्हणजे जीवाची दुर्बलता, ईश्वराचें अनंतगुणांसहवर्तमान अमोघ दयाळुत्व व मोक्षदत्व, यांचें अखंड व श्रद्धापूर्वक चिंतन आणि ईश्वरास प्रिय होईल असें वर्तन अवश्य आहे. ईश्वराचें लक्ष्मीसाहचार्यानें होणारें अनेक अवतारांचें व तद्गत कृत्यांचेंही अखंड स्मरण असावें. पहिले तीन योग श्रेष्ठप्रतीच्या जीवांकरितां आहेत; आणि चवथा योग अडाणी, दुबळे, मतिमंद अशा सर्वांकरितां आहे. ह्या चवथ्या योगाचा

ज्ञेता आहे. तो नित्य आहे, ज्ञाता आहे. तो इंद्रियद्वारा समजण्यासारखा नाहीं. योगदृष्टि, ज्ञानदृष्टि व दिव्यदृष्टि यांनीं मात्र त्याचें स्वरूप समजेल. जीवस्वरूप 'अणु' असतें. येथें ज्ञान व सत्ता आहे. पूर्णानंद प्रकट झाला म्हणजे तो 'विभु' (सर्वव्यापी) होतो. जीवही ब्रह्मा-प्रमाणेंच 'कर्ता' व 'भोक्ता' आहे. तो ब्रह्माचा **अंश** आहे. 'सत् आणि चित्' या दोन ब्रह्मधर्मांचे अंश घेऊन जीव प्रकट होतो. जीवरचनेंत **आनंदांश नसतो.**

## जगत्.

७ जडांत (प्रकृतीमध्यें) सदंशच मात्र असतो; म्हणून जगत् **सत्य आहे. अव्यक्त जगत्** परब्रह्माचे इच्छेनें आविर्भूत (प्रकट) होतें. जीवाला चतुर्विधा पुरुषार्थ प्राप्त व्हावे, एतदर्थ परब्रह्म जगताला प्रकट करितें. जगत् हेही ब्रह्मस्वरूपच आहे. जगत् हा संसार नव्हे. अहंममता बुद्धीच्या योगानें जें द्वैतज्ञान होतें, **तो संसार, ती माया होय.** सर्वत्र ब्रह्मरूप अद्वैत आहे; पण परमार्थतः द्वैत **आहे**, हें ज्ञान अविद्यात्मक, संसारी, बंधात्मक आहे. संसार संपला म्हणजे जगत् संपतें असे नाहीं. **जगत् सत्य आहे, संसार मिथ्या आहे. मोक्षसाधनें** ह्या संसाराची निवृत्ति अहंममतेच्या निवृत्तीनें होते. "मी कर्ता, हें माझ्या कर्माचें फल व मी याचा भोक्ता" हें अज्ञान होय. हें अज्ञान पांच प्रकारचें आहे. स्वरूपाज्ञान, देहाध्यास, इंद्रियाध्यास, प्राणाध्यास आणि अंतःकरणाध्यास हे ते पांच प्रकार होत. 'मी आनंदाकार, आनंदस्वरूप आहे' असें भक्तिद्वारा ज्ञान होऊन बाकीचे अध्यास निवृत्त झाले म्हणजे संसार संपला. स्वरूपज्ञानानें आत्मलाभ होतो व त्याच्या अज्ञानानें देहलाभ होतो. स्वरूपज्ञान होण्यास वैराग्य, सांख्य, योग, तप, आणि प्रेम यांची (ह्या पंचपर्वात्मक साधनांची) आवश्यकता आहे. ह्या साधनांनीं अध्यास निवृत्त होतो. देह, प्राण, अंतःकरण, इत्यादि राहतात, पण त्यांवरील अध्यास नाहींसा होतो. हा अध्यास संपला म्हणजे जीवन्मुक्त स्थिति मिळते; कारण, अहंममताजन्य सुखदुःखांचा नाश होतो आणि जगतासच ब्रह्मस्वरूप मिळतें.

ब्रह्म हें जीवजगतांचें निमित्त व उपादान कारण आहे, तथापि तें स्वतः अविकृत असतें. ह्याला अविकृतपरिणामवाद म्हणतात. उत्पत्ति, स्थिति आणि लय या ज्या तीन कार्याच्या अवस्था त्या तिन्ही अवस्थांमध्यें तें नित्य कारणरूपच असणें याचें नांव अविकृत परिणाम होय. कार्य हा धर्म आणि कारण धर्मी होत.

## तात्पर्य.

सारांश, ब्रह्म हें एक अव्यय, अविकृत, सर्वधर्मविशिष्ट, सर्वज्ञ, सर्वशक्तिमंत व पूर्ण असून स्वतंत्र आणि लीलाप्रिय आहे. आपल्यामध्यें असणाऱ्या आविर्भाव व तिरो-

भाव (प्रकटनशक्ति, प्रलोपनशक्ति. Evolution and Involution) शक्तींच्या द्वारें जीव, जगत् इत्यादि रूपांनीं लीला करितें; अहंममता अज्ञानजन्य असून बद्धकर, अतएव अज्ञानजन्य आहे. सत्, चित् व आनंद हें ब्रह्मस्वरूप, सत्, चित् व गुप्तानंद हे जीवस्वरूप आणि सत् आणि गुप्तचित् व गुप्तानंद हें जगत्स्वरूप आहे. म्हणजे आधिदैविक (पुरुषोत्तम) आध्यात्मिक (अक्षर) आणि आधिभौतिक (जगत्) अशीं त्याचीं स्वरूपें आहेत. कर्मानें आधिभौतिक, ज्ञानानें आध्यात्मिक व प्रेमानें आधिदैविक स्वरूपें प्राप्त होतात. या वादांत मायेचें अवलंबन कोठेंही केलें नाहीं, म्हणून ह्या मताला **शुद्धाद्वैत** ह्मणतात.

कर्म करून पुनः पुनः जन्म येतो व विषयानंद प्राप्त होतो. अज्ञानानें अक्षरस्वरूप प्राप्त होतें; व पुनः जन्म येत नाहीं. ही ज्ञानोपासना आहे. ह्यानंतर म्हणजे अक्षरब्रह्मस्वरूप प्राप्त झाल्यावर जो अल्पानंद प्राप्त होतो, त्याचा पुढील उत्क्रम म्हणजे प्रेमपूर्वक पराभक्तीच्या द्वारा पुरुषोत्तम स्वरूपाशीं त्याच्या कृपानंदानें प्राप्त होणें हा होय. कर्म, ज्ञान आणि उपासना असा हा क्रममुक्तिमार्ग आहे. श्रीहरीच स्वेच्छेनें सर्वकर्ता-करविता आहे, हा विवेक प्राप्त करून घेऊन चित्त प्रसन्न ठेवून कर्म करणें हा कर्ममार्ग, उत्तम प्रकारचें धैर्य धरून त्रिविध दुःखें मरणपर्यंत आनंदानें सहन करणें आणि सर्वत्र शुद्धाद्वैताचा अनुभव घेणें हा ज्ञानमार्ग, आणि ऐहिक व पारलौकिक कर्म, वाणी आणि मन श्रीपरमेश्वर चरणीं समर्पण करून व त्याला अनन्यभावानें शरण जाऊन त्याचा प्रसाद संपादन करणें हा भक्तिमार्ग होय. ज्ञानानें दुःखनिवृत्ति होते. पण ज्ञानपूर्वक भक्तीनें दुःखनिवृत्ति होऊन निःसीमानंदावाप्ति होते. आत्यंतिक भक्ति म्हणजे श्रीपरमेश्वराचा विरह झाल्यामुळें विषयसर्वस्वाचा त्याग होऊन, उत्तम वैराग्य प्राप्त होऊन अहर्निश जें मनश्चिंतन व मनोध्यान चालतें तो होय. गोपीविरहाचें जें श्रीमद्भागवतांत चित्र काढिलें आहे तें भक्तीचें उत्तमोत्तम स्वरूप होय.

याप्रमाणें ब्रह्मस्वरूप, जीवजगत्स्वरूप व साधनमार्ग याचें विवेचन झालें.

ह्या मताचे पुरस्कर्ते **श्रीमद्वल्लभाचार्य** होत. ह्यांचा उदय १६ वे शतकांत झाला. हे पराकाष्ठेचे भक्तश्रेष्ठ होते.



# भाग सहावा.



# श्रीमद्भगवद्गीतेचा अभ्यास.

## परिच्छेद पहिला.

या तत्त्वज्ञानात्मक (सांख्यज्ञानात्मक व योगज्ञानात्मक) ग्रंथाचा अभ्यास करूं इच्छिणारे जिज्ञासु मुमुक्षूंनीं कांहीं विशेष गोष्टी लक्षांत ठेवून मग गीताभ्यासाचा उपक्रम करावा. नुसतें ह्मणजे अर्थशून्य पठण फारसें लाभदायक नाहीं; हा वाग्यज्ञ प्रतिदिवशीं होणें असेल तर तो •सार्थ व्हावा व शुद्ध बुद्धीनें व्हावा. न्यासपूर्वक आरंभ करून पाठ सुरू करावा. शुचिर्भूत होऊन शांत वेळीं एकनिष्ठचित्तानें पाठ केला तर उत्तमच आहे. एकंदर अर्थ समजून घेतल्यानंतर खालीं लिहिलेल्या गोष्टी ध्यानांत ठेवाव्या.

१ हा गीतोपदेश केवळ कुरुकुलोत्पन्न अर्जुनासच भगवंतांनीं केला आहे असें नव्हे, तर प्रत्येक स्थळीं, प्रत्येक कालीं आणि प्रत्येक प्रसंगीं आपणास जी 'कर्तव्यपराङ्मुख व्हावें' अशी मायासमुद्रजन्य लहर येत असते, ती घालविण्यासाठीं व उत्तमोत्तम पुरुषार्थ सांगून तत्प्रीत्यर्थ अवश्य असणारें कर्तव्य सर्व मनुष्यजातीस कळावें, एतदर्थ, हा भगवद्गीतेचा अवतार आहे. ज्ञानसीमा कितीही वाढली, कर्तृत्वशक्ति कितीही जोरावर झाली, प्रसंग-वैचित्र्य कितीही अश्रुतपूर्व असले तरी, त्या त्या प्रसंगीं भाविक व कर्तव्योन्मुख पुरुषास पुरुषार्थ दाखविणारा व कर्तव्यमार्गाची दिशा दाखवून कर्तव्योन्मुखतेस प्रोत्साहन देणारा हा ग्रंथ असेल, यांत संशय नाहीं. हा ग्रंथ सर्वकालीन व सर्वस्थलीन असून पुनः काम-धेनूप्रमाणें इच्छित मनोरथ पूर्ण करणारा आहे. या दृष्टीनें या ग्रंथाचें पारायण झालें असतां आपलें ज्ञान विस्तीर्ण होईल, आपले कर्तव्य शुद्ध मनानें होईल, आपली उपा-सना एकनिष्ठ होईल, आणि सर्व दिशांनीं आपला उद्धार होईल.

२ दुसरी गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही होयः या विश्वांत, विश्वाच्या पूर्वीं आणि विश्वप्रलयानंतर म्हणजे सर्वदा व सर्वस्थलीं 'परब्रह्म' या नांवाचें एक तत्त्व अभंग, अव्यय, अक्षर स्वरूपानें विराजमान असतें. यालाच 'आदिकारण,' 'मूलप्रकृति' 'परमेश्वर' इत्यादि अनंत नामें अनंत प्रकारचे विचारी ग्रहस्थ देत असतात. 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' असो; वाटेल तें नांव दिलें तरी चिंता नाहीं, पण एक गोष्ट सर्वसंमत ही आहे कीं, 'अशी ब्रह्म नांवाची वस्तु आहे.' या वस्तूचे गुण व्यावहारिक सत्तेच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे ती सर्वसाक्षी व नित्य आहे. तसेंच व्यावहारिक दृष्टीनें पहा-

घयाचें म्हणजे ही विश्वनियामक सत्ता केव्हां केव्हां अक्षर–अव्यक्तामध्यें लीन असते व इतर वेळीं प्रकट असते. प्रलय व सृष्टि हीं अवस्थांतरें व्यवहारकालांतील आहेत. आतां हें स्वरूप व लक्षण व्यावहारिक पद्धतीनें झालें. पारमार्थिक दृष्ट्या 'परब्रह्म' हें काय आहे, हें सांगतांच येणार नाहीं. 'अचिंत्य, अप्रमेय,' इत्यादि विशेषणें भगवंतांनींच दिलीं आहेत. तें क्षराक्षरातीत आहे, देवादिकांस अगम्य आहे, 'ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान' यांहून विलक्षण असून, 'ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान' याचें अधिष्ठान आहे, इतकेंच फार तर म्हणतां येईल! 'अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्' या वाक्यावरूनच सिद्ध होतें कीं, परब्रह्म हें सर्वाधिष्ठान आहे. तसेंच हें निर्गुण असून गुणपोषक आहे. असो; हें सत्तेचें अधिष्ठान जें ब्रह्म, **तें आहे** असें समजून घेऊन नंतर परमात्मा, ईश्वर, इत्यादि शब्दांनीं लक्षित जी अनाद्यनंत ज्ञातृशक्ति (सगुण परमेश्वर, शबल ब्रह्म) तिचें स्वरूप समजून घेणें अत्यंत इष्ट आहे. ही ज्ञातृशक्ति म्हणजे सर्व आत्मिकज्ञानविज्ञानाचें केंद्रस्थान होय. 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः' या म्हणण्याप्रमाणें सर्व जीव हे या महातेजाचे अंश आहेत. 'वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः' या भगवदुक्त्यनुसार श्रीपरमेश्वराचें सगुणस्वरूप समजून घ्यावयाचें ही ज्ञानाची सीमा आहे व सर्व जीवांची ज्ञानतपश्चर्या यासाठींच चालली आहे. परब्रह्मस्वरूप आणि परमात्मस्वरूप परमार्थतःच एकच खरें, पण दोहोंत विशेष इतकाच आहे की, परब्रह्म हें निरुपाधिक म्हणून गुणातीत, मायातीत आहे, व परमात्मस्वरूप हें मायासंवलित, सगुण (सर्व मंगल सद्गुणाचें अधिष्ठान) आहे. सच्चिदानंद हें परमात्मस्वरूप होय. याचें स्वरूप प्रकृत्यात्मक नसतें, ज्ञानात्मक असतें, हें सांगावयास नकोच आहे. येथून सर्व सृष्टीची उत्पत्ति (प्रकटन, आविर्भवन) होतें व सर्व विसृष्टीचें, उत्क्रांतीचें पर्यवसान हेंच आहे. हा सगुण परमेश्वर म्हणजे मुख्य क्षेत्रज्ञ, प्रकृति व्यापारांचा अध्यक्ष व नियंता, शास्त्रशाखांचा कर्ता (वेदांतकृद्वेदविदेव चाहम्) आणि चैतन्याचा गाभा आहे. हाच महापुरुष अथवा पुरुषोत्तम होय. हा अहंवृत्तीचा केंद्र जो सगुण परमेश्वर, तो प्रकट झाला म्हणजे त्याच क्षणीं काल, स्थल व पूर्वस्थित सर्व कार्य-कारणादि संबंधांसह 'प्रकृति' प्रगट होते व व्यवहारास सुरुवात होते. पण तें ब्रह्म स्वतः काय आहे? या प्रश्नाला उत्तर देतां येत नाहीं. त्याला जाणीव म्हणतां येत नाहीं; कारण, जाणीव आली कीं, तेथें कालाकाशादि कार्यकारणात्मक उपाधि आल्याच पाहिजेत. तें आत्माही नव्हे अनात्मा नव्हे, नेणीवही नव्हे; तात्पर्य ज्ञाता, ज्ञेय अगर ज्ञान यांपैकीं तें कांहींच नाहीं. पण तें या सर्वांचें अधिष्ठान, प्रभव, व प्रलय आहे. **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** याचा व 'मयि सर्वमिदं प्रोतं, सूत्रे मणिगणा इव' याचा तरी अर्थ हाच कीं, त्याच्या सत्तेनें सर्वांचें अस्तित्व शक्य आहे. जें जें **दिसतें** तें ब्रह्म नव्हे, कारण पदार्थांचे गुणधर्म प्रकृतिनिर्मित जीवनिर्मित असतात. तसेंच ब्रह्म हें विश्वाचें उपादान कारणही नव्हे. तें ज्ञेय नाहीं, पण ज्ञेय वस्तूंचें अधिष्ठान आहे. एवं गुणविशिष्ट म्हणजे **निर्गुणस्वरूपी ब्रह्म हें चराचर, जडाजड, विश्वाच्या मूलाशीं आहे हें गीताग्रंथांतील पहिलें सिद्धांतकृत्य आहे.** म्हणजे **'परब्रह्म आहे' असें म्हटलें आहे;** तें सिद्ध केलें

नाहीं. कारण उघड आहे कीं, प्रमाणमात्राला निर्माण करणाऱ्या ब्रह्माची सिद्धि हीं तर्के प्रतिष्ठित प्रमाणें करूं शकत नाहींत. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत प्रत्यक्षादि प्रमाणें दिली आहेत, शाब्दप्रमाणही उपयोजिलें आहे. पण हीं सर्व सहकारीप्रमाणें होत. 'ब्रह्म आहे' असें ठरल्यावर मग यांचा उपयोग. सारांश ब्रह्म आहे हें पहिलें गृहीत कृत्य होय. खरेंच आहे कीं, ज्याच्यामुळें सर्व प्रमाणांस प्रामाणिकपणा येणार, त्या ब्रह्माचें अस्तित्व ह्या ब्रह्मोपजीवी प्रमाणांनीं कसें सिद्ध होणार? 'मी आहें' याची सिद्धि जशी केव्हांही करण्याचें कारण नाहीं व सिद्धि करितांही येणार नाहीं, त्याचप्रमाणें ब्रह्माचे अस्तित्वाचीही सिद्धि करण्याचें कारण नाहीं. तें स्वयंभु व स्वयंप्रमाण आहे, व त्याचप्रमाणें तें आत्मप्रत्यक्ष आहे.

३ असो; या निर्गुण पण सर्वांचें अधिष्ठान असणाऱ्या ब्रह्मापासून एक 'ईश्वर', 'सगुण परब्रह्म' सच्चिदानंस्वरूपी दिव्यतेजोगोलक प्रकट होतो. ब्रह्मामध्यें लीन झालेल्या, पण उपाधिसत्ता जिवंत ठेवलेल्या, सारांश मायापाशापासून मुक्त न झालेल्या अव्यक्त भूतांस व्यक्तता प्राप्त होण्याचा ईश्वरी इच्छेनें (तत्तत्कर्मानुसार) जेव्हां समय येतो, म्हणजे सृष्टिकालास जेव्हां आरंभ व्हावयाचा असतो, तेव्हां पूर्वोक्त ब्रह्माचे ठायीं गुप्तरूपानें राहिलेली सच्चिदानंदस्वरूपी तेजोमूर्ति स्वतेजानें प्रकट होते. व्यवहारकालांतील हें सगुणस्वरूप, हा ईश्वर, अनादि व अनंत आहे. हा **पहिला ज्ञाता होय.** परब्रह्म जसें सर्वथा 'अज्ञेय' आहे, तसा हा भगवान नाहीं. हा सत्कर्मरूपी व एकनिष्ठ ज्ञान-स्वरूपी भक्तीनें मिळतो, आकळितां येतो, (भक्त्या त्वनन्यया इत्यादि) ह्याचें स्वरूप सर्व ग्रंथांत निरूपिलें आहेच. हा ईश्वर जड नाहीं, इंद्रियगोचर नाहीं, तो परब्रह्माहून भिन्नही नाहीं. केवळ तेथें 'केवलत्व' आहे, येथें म्हणजे ईश्वराच्या ठिकाणीं सगुणत्व आहे, तो सच्चिदानंद आहे, हें आतांच सांगितलें. हाच ईश्वर होय. हाच पिता, माता, धाता इत्यादि आहे. **जीवानें याचीच ज्ञानपूर्वक आराधना करून मुक्त व्हावयाचें आहे. हें गीतेंतील दुसरें गृहीतकृत्य आहे;** म्हणजे ईश्वराचें अस्तित्व सर्वधर्मसंमत आहे, हें गृहीत करूनच विषयाची मांडणी केली आहे. सृष्टीचें आरंभस्थान, तिची स्थिति व विसृष्टीचें पर्यवसान म्हणजे हा सगुण परमेश्वर आहे. विश्वांतील गतींचा उगम येथून होतो व सर्व प्रकारच्या ज्ञानाचें अधिष्ठान हाच 'भगवान्' आहे; सारांश, हा चैतन्यवृक्ष होय.

४ हा चैतन्याचा गाभा शुद्ध मायेच्या साहाय्यानें प्रकट झाला व परब्रह्माकडे (स्वतःकडे) ज्ञानदृष्टीनें पाहूं लागला म्हणजे त्या केवळ आणि उपाधिशून्य ब्रह्मावर एक मायेचा पडदा येऊन मूलप्रकृतीचें स्वरूप सिद्ध होतें. पहा कीं कोणत्याही वस्तूकडे जीव पाहूं लागला असतां ज्याप्रमाणें त्या जीवाच्या बुद्धिमनइंद्रियानुसार पदार्थांचें स्वरूप दिसतें, त्याचप्रमाणें परब्रह्माला पाहणारा परमात्मा सिद्ध झाला कीं परमात्म्याच्या गुणानुसार परब्रह्माचें

स्वरूपावर विवर्त होऊन एक जड स्वरूप दिसूं लागतें. **परब्रह्म म्हणजे मूल-प्रकृति नव्हे,** तर परमात्मस्वरूप प्रकट झाल्यानंतर, हें ज्ञातृस्वरूप प्रकट होतां-क्षणींच, एक ज्ञेयस्वरूप प्रकट होतें. तें **हें ज्ञेयस्वरूप म्हणजे त्रैगुण्यात्मक प्रकृति होय.** ही सर्वथा ज्ञानशून्य असतें. व्यावहारिकतः हीही अनादिच आहे ( प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ). कारण, कालादिकांची प्रकटताही याच वेळीं होणार ! तेव्हां, काल केव्हां उत्पन्न झाला, हें जसें सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें ही प्रकृतिपुरुषाची जोडी केव्हां प्रकट झाली हें कांहीच सांगतां यावयाचें नाहीं. असो; ही प्रकृति म्हणजे विश्वगत 'अधिभूतं क्षरो भावः' ची ( जडात्मक वस्तूंची ) जननी होय. प्रकृति आणि पुरुष ही दोन्ही ब्रह्मात्मक, ब्रह्मजनित आहेत, हें आतां सांगावयास नकोच आहे. आतां, पुरुषामध्यें, ईश्वरामध्यें, जी तेजःशक्ति आहे, जें चैतन्यमंडल आहे, तेंही ब्रह्मस्वरूपच आहे. तेव्हां प्रकृति, पुरुष व पुरुषचैतन्य, ही एक सर्वव्यापी त्रयीच झाली ! मूळ प्रकृतीला 'अव्यक्त, कूटस्थ' अशीं गीतेंत नांवें दिलीं आहेत. 'दैवीप्रकृति' या नांवाची जी वस्तु ( दैवीसंपत् ) आली आहे तीच परब्रह्मात्मक तेजःशक्ति होय. श्रीकृष्ण म्हणजे परमात्मस्वरूप आहे. **याप्रमाणें परब्रह्म, परमात्मा, दैवीप्रकृति आणि मूलप्रकृति अशीं चार तत्त्वें गीतेमध्यें गृहीत घेतलीं आहेत.** सर्वव्यावहारिक ( Phenomenal ) शास्त्रांची प्रवृत्ति ही आत्मप्रत्यक्ष गृहीतकृत्ये घेऊनच होते. असो; ब्रह्म-लीन परमात्म्याची दैवीप्रकृति ( तेजःशक्ति ) जागृत होऊन एकदां कार्यप्रवृत्त झाली म्हणजे मूल-प्रकृतीवर त्या दैवीप्रकृतीचे आघात होतात व हें व्यवस्थित, नियमबद्ध व उत्क्रांतिपूर्ण विश्व क्रमशः विसृष्ट होतें. ईश्वराच्या ज्ञानस्वरूपांत असणारी चित्कल्पना ( Idea ) आणि विश्वांत भविष्यकालीं दृश्य होणारें मूलप्रकृतीचें स्वरूप या उभयतांत जें सभीकरण असतें, तें या दैवीप्रकृतीमुळेंच होय. **अथवा दैवीप्रकृतीमुळें सत्यसंकल्पी ईश्वराच्या कल्पनांस सृष्टीमध्यें सार्थ स्वरूप येतें.** म्हणजे ईश्वर सत्यसंकल्प आहे, कां ? तर त्याची तेजःशक्ति जी कल्पना प्रकट करिते तीच कल्पना विश्वांत मूर्त स्वरूपानें दिसते व ईश्वराचे मनांत आलेल्या संकल्पाचें बिंब दैवीप्रकृति ग्रहण करिते आणि त्याचा ठसा, व्यक्त झालेल्या मूलप्रकृतीवर उठविते. ही सूर्यमाला म्हणजे स्थूलशरीर असें मानलें तर दैवीप्रकृति हें सूक्ष्मशरीर होईल व परमेश्वर कीं--ज्याच्या ज्ञानस्वरूपांत जगाच्या भावी उत्क्रांतीचा संकल्प असतो--हा कारणशरीर आणि परब्रह्म आत्मा होतील; म्हणजे परब्रह्म आत्मा, परमेश्वर कारणशरीर, दैवी प्रकृति सूक्ष्मशरीर ( लिंगशरीर ) आणि ही सूर्यमाला हें स्थूलशरीर असें कल्पिलें म्हणजे जीवशरीराच्या संबंधाप्रमाणेंच परब्रह्माचें व्यवहारिक शरीर आहे हें समजेल व या दृष्टांतानें परब्रह्मादि जीं चार तत्त्वें सांगितलीं त्यांचें बरेंच स्पष्टीकरण होईल. या सूर्यमालेचें जें स्थूलशरीर तोच मुंडकोपनिषदांतलि वैश्वानर, सूक्ष्मशरीर तो हिरण्यगर्भ, कारणशरीर तो ईश्वर ( सूत्रात्मा ) आणि आत्मा तो परब्रह्म होय. जीवात्मा ( अहंकारविशिष्ट आत्मा ) मिथ्या आहे, मायिक आहे. परमेश्वर

हा खरा आत्मा आहे (क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु भारत). जीव अमर आहे, त्याचें तरी तात्पर्य हें कीं, जीवात्मा परमार्थतः परमात्माच आहे.

५ या विश्वांत तीन लोक आहेत, ते भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्गलोक होत. या तीन लोकांस अनुरूप अशीं तीन शरीरें जीवास आहेत, तां स्थूल, सूक्ष्म आणि कारण-शरीर हीं होत. कारणशरीर हें नित्य आहे. या शरीरांतच जीवात्मा राहतो. प्रत्येक जन्मांत निराळें स्थूलशरीर असतें (तथा देहान्तरप्राप्तिः) तें मरतांक्षणींच संपतें; त्याचा नाश होतो. सूक्ष्मशरीरही लवकरच लयास जातें. परंतु कारणशरीराचा मात्र मुक्ति मिळेपर्यंत नाश होत नाहीं. प्रलयकालीं तें परब्रह्मांत लीन होईल, पण सृष्टिकालीं पुनः प्रकट होईल. त्याचा–कारणशरीराचा–नाश होत नाहीं. निरनिराळे स्थूलसूक्ष्म-देह प्राप्त होतात, ते याळाच होत; आणि प्रत्येक जन्मांत जीव जें श्रेष्ठ प्रकारचें ज्ञान संपादितो व सद्भाव मिळवितो, ते व त्यांचे संस्कार, कारणशरीरांत शिरून त्या शरीराचे घटक होतात व त्या शरीराचें स्वरूप फिरवितात. सारांश, कारणशरीरच जीव अथवा जीवात्मा याचें वास्तव्यस्थान आहे, व याचाच उद्धार (नाश!) करावयाचा आहे. हें कारणशरीर म्हणजे पूर्वजन्मीं संपादन केलेल्या ज्ञानाचा व सद्भावांचा-(अगर दुष्ट भावांचा) संग्रह होय. ज्ञान आणि सद्भाव हे ईश्वराच्या तेजोमयशक्तीपासून उत्पन्न होतात, व विवेकही तेथेंच उत्पन्न होतो, हें मागें सांगितलें आहे. आतांच सांगितलें कीं, परब्रह्माच्या सत्तेनें सृष्टीच्या आरंभीं एक ज्ञानाचा तेजोगोल, (प्राणाचा एक सर्वगामी ओघ,) परब्रह्मापासून प्रकट झालेल्या परमात्म्यापासून निघतो (बहुस्यां, प्रजायेय) आणि हा प्रवाह मूलप्रकृतीवर आघात करूं लागला म्हणजे त्रिगुणात्मक प्रकृतीचे सत्वरजादि गुण कार्योन्मुख होऊन विसृष्टीला (उत्क्रांतीला) आरंभ करितात आणि चतुर्विध सृष्टि निर्माण होऊं लागते. शेवटीं मानवीसृष्टींत मात्र ज्ञानसंवलित व्यक्तित्व प्रकट होतें; म्हणजे 'मी आहें, मी पुरुषार्थी आहें' हें ज्ञान मानवव्यक्ति जसें प्रकट करिते, तसें इतर व्यक्ति करीत नाहींत. असो; मनुष्याच्या पुढच्या कोटी स्वर्गांत आहेत व त्यांचा अवतार योग्य वेळीं येथेंही होणार आहे. हा उत्क्रांतीचा प्रभाव होय. निसर्गतः उत्क्रांतीचा ओघ प्रकृतीला अनुकूल अशा नियमित दिशेनें अज्ञाना-कडे, द्वैताकडे वाहत असतो; पण मानवी व अति मानवी कर्मांच्या संस्कारानें उत्क्रांतीचा नैस-र्गिक ओघ बदलून तो अभेदाच्या, अद्वैताच्या मार्गाला जातो. म्हणून सत्कर्म करणें हें आपलें कर्तव्य आहे. जसें आपलें कर्म असेल, तशी जीवाला व समाजाला गति प्राप्त होते. देवांस संतुष्ट करणारें कर्म असेल तर कर्ता देवलोकास जातो, पितरांचा भक्त पितरांकडे जातो, भूतांचा सेवक भूतलोकांत मिसळतो आणि माझा, परमेश्वराचा भक्त, माझ्या लोकीं म्हणजे वैकुंठांत येतो (यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यांति पितृव्रताः। भूतानि यांति भूतेज्या यान्ति-मद्याजिनोऽपि मां॥) ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून गीतेचें सार्थ पठण करावें.

६ **पहिला अध्याय** तर नुसता **परिचय प्रवेश करून देणारा** जयविजयस्वरूपी द्वारपाल आहे. कर्तव्यदक्ष असणाऱ्या अर्जुनाची कर्मबुद्धि मंदतेज कां झाली, याचें

कारण या अध्यायांत दिलें आहे. तसेंच भाविक–जास्त भाविक–बुद्धि झाली तर परंपरागत कुलाचारांचा व जातिधर्मांचा मुख्य हेतु नाहींसा होऊन गौणवस्तूंस कसें महत्व येतें, त्याचेंही दिग्दर्शन या अध्यायांत आहे. शेवटीं अर्जुनास जो विषाद झाला, तो जो कर्तव्य-पराङ्मुख झाला, तो आधिभौतिक भीतीनें नव्हे, तर आत्मिक विचार अंतःकरणांत शिरून रूढ होण्याच्या आधीं जी कांहीं अवाच्य–गूढ–भीति उत्पन्न होते, या भीतीनें अर्जुन ग्रस्त झाला आहे, असें स्पष्ट दिसतें. पहा कीं, कुलाचार व जातिधर्म यांचा हेतु एकत्व उत्पन्न करणाऱ्या मनोवृत्ति जागृत करण्याचा आहे. या दृश्य संसारांत अज्ञानानें जीं सुखदुःखें उत्पन्न होतात, त्यांचा कांहीं तरी निरास योग्य कुलाचारांनीं व जातिधर्मांनीं व्हावा हा त्या त्या आचारांचा व धर्मांचा मुख्य हेतु आहे. आतां, कौरव हे सर्वथा दुष्ट असल्या कारणानें त्यांच्या हातून वरील एकत्व साधण्याचें कार्य प्रायः दुष्करच झालें होतें, हें, त्यांनीं पंडुपुत्रांस कोणत्या रीतीनें वागविलें, यावरून स्पष्ट होत आहे. जेथें एकत्व नाहीं, किंवा एकत्व उत्पन्न होऊं शकत नाहीं, असें कुल किंवा अशी जाति जगवून काय करावयाचें आहे? निसर्गाच्या निर्घृण प्रवाहांत एकत्वाशीं एकरसत्वानें कांहीं अंशीं तरी वागणाऱ्या जाति किंवा कुलें मात्र कडेला म्हणजे उन्नतिकारक सुधारणेच्या मार्गाला लागतात, त्यांस राष्ट्रीयत्व येतें, राष्ट्रीय धार्मिकत्व येऊन पुनः धार्मिक राष्ट्रीयत्व प्राप्त होतें. पण जेथें जुने कुलाचारासाठीं जुने म्हणजे निरुपयोगी झालेले अथवा भिन्न कालदेशवर्तमानानें प्राप्त झालेलें भिन्नाचरण करून देणाऱ्या कुलाचारासाठीं मात्र तामसी किंवा तामसराजसी कुलें जिवंत राखावयाचीं असतात, व राहतात, तीं कुलें व त्या जाती निसर्गाच्या तडाक्यांत सांपडून नष्ट होण्याच्या पंथास लागतात. अर्जुनास हें तत्त्व ठाऊक नव्हतें; म्हणून दुष्ट कुलबंधूसंबंधें त्याच्या मनांत बावळी अनुकंपा उत्पन्न झाली व कौरव-कुलाच्या नाशासंबंधें त्याच्या मनांत भीति प्रादुर्भूत झाली, ती अशी कीं जातिधर्मांचा व कुलधर्मांचा नाश झाला तर संसारवृक्ष वठून जाऊन राष्ट्रक्षयाचा प्रसंग येईल व सर्वत्र शून्यावस्था येईल. या दोहींचा परिणाम असा झाला कीं, तो स्वतःचा क्षात्रधर्म सोडून देण्याच्या बेतांत आला व भिक्षावृत्तीनें उपजीविका चालविणाऱ्या ब्राह्मणांचा धर्म स्वीकारावा, अशी त्याला दुष्टबुद्धि झाली. पुनः, दुष्ट व दुष्टत्वप्रचारक दुर्योधनादिकांचीं कुलें जिवंत राहण्याचा प्रसंग प्राप्त होऊन अनाचार व अधार्मिक तत्त्वज्ञान वृद्धिंगत होण्याचा संभव उत्पन्न झाला. एवंच सद्धर्माची अवनति व दुर्धर्माची उन्नति होण्याचा प्रसंग येऊन ओढवला, तेव्हां विश्वसंतारण्यासाठीं ज्ञानस्वरूपी श्रीभगवान् श्रीकृष्ण यांनीं अर्जुनासारख्या कर्त्या पुरुषपुंगवाच्या अंतःकरणांत अखंड व अभंग नीतीचें प्रस्थापन करणारा धर्म व शास्त्रज्ञान ( Sciences and Religion ) व त्याचप्रमाणें कालस्थलांनीं व परिस्थितीनें अबाधित असून विश्वाच्या सृष्टिस्थितिप्रलयाचें उद्घाटन सर्वोत्तमप्रकारें करणारें तत्त्वज्ञान, या उभयतांचा अमृतवर्षाव केला. हा वर्षाव म्हणजे प्रस्तुतकालीं प्रचलित असणारी 'अठरा अध्यायी' श्रीमद्भगवद्गीता होय. म्हणून हा प्रवेश करून देणारा प्रथमाध्याय जयविजयस्वरूपीं द्वारपाल होय.

७ येथील **दुसऱ्या उपक्रमाध्यायांत** श्रीभगवंतांनीं पुढील १६ **व्याख्यानांत** येणाऱ्या विषयाचें सूक्ष्म व कोठें स्थूल दिग्दर्शन करून **सांख्य** ( Speculative Philosophy ) व **योग** (Practical Philosophy) **यांचा विचार मुख्यतः केला आहे.** या शास्त्रांत सर्व अध्यायांच्या शेवटीं प्रत्येक अध्यायाचें नामकरण करितांना 'योग' शब्दाचा प्रत्येक वेळीं अनुवाद केला आहे तसाच ब्रह्मविद्येचा उल्लेख केला आहे. हें विसरतां कामा नये. योग म्हणजे कर्मकौशल्य, विज्ञान ( Realization ) होय. असो; सांख्यज्ञानविज्ञानाचा विचार म्हणजे सर्व ज्ञानाचा अंतर्भाव करणारें तत्त्वज्ञान 'एषातेऽभिहिता सांख्ये बुद्धियोगेत्विमां श्रुणु' येथपर्यंत सांगितलें आहे, तें सर्वांस पटेल व सर्वांच्या अनुभवास येईल अशा प्रत्यक्स्वरूपाचा 'त्वं स्वरूपाचा' अवतार करूनच, प्रतिपादित केलें आहे. हें 'अज, पुराण, अनंत, शाश्वत, निरंजन, निर्विकल्प सर्वव्यापी, सर्वाधार' असें आपलें मूळचें स्वरूप आहे, असें एकदां समजलें किंवा क्रमशः समजूं लागलें म्हणजे क्रमशः व सामान्यतः कोणत्या वृत्तींनीं आपलें ( सोपाधिक जीवाचें ) कर्म करून आपलें मूळचें स्वरूप प्राप्त करून घ्यावयाचें, हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे तें समजून घ्यावें; म्हणजे या अध्यायांत तात्त्विक ज्ञान ( Speculattve Philosophy ) व तात्त्विक कर्म ( Practical Philosophy ) यांचा स्पष्ट नकाशा ( चित्रपट ) तयार केला आहे. अर्थातच आतां हें सांगावयास नको आहे कीं, या अध्यायांत सर्व व्यावहारिक शास्त्रांचा ( Phenomenal Sciences ) अंतर्भाव करणाऱ्या व सर्वांचें अधिष्ठान असणाऱ्या सर्व नियामक ब्रह्माचा ( Nomena-Things-in-them selves ) विचार होऊन पुनः सर्वधर्म, सर्वकर्म, सर्वकला, इत्यादिकांचें अंतर्बाह्य नियमन करून ब्रह्मपदाला पोहोंचविणाऱ्या कर्माचा—निष्कामकर्माचा—( Action ) ही विचार येथें झाला आहे. हा विचार यथासांग समजून उमजला असतां 'मी इतर कोणी सांत पदार्थ नसून ब्रह्मच आहे;' पण "अज्ञानानें 'मी' सांत आहें, असें सांतस्थितींतील अज्ञानमिश्रित ज्ञानानें वाटत आहे, तें अज्ञान **ज्ञानानें** व ती अज्ञानाची मायिकस्थिति **निष्कामकर्मानें** नाहींशी झाली असतां माझा 'अनंत मी' पूर्वस्वरूपाला जाऊन पोहोंचेन" हें ज्ञानविज्ञान समजून देणारा हा सांख्ययोगी अध्याय होय.

एवंच सांख्यज्ञान आणि सांख्यज्ञानपोषक ( विज्ञापक ) कर्म हीं सिद्ध असलीं म्हणजे विषाद उत्पन्न होत नाहीं, कर्तव्यकर्म करण्यास स्फुरण येतें; म्हणून 'तूं ज्ञानपूर्वक कर्तव्य-बुद्धीनें कर्म कर.' हें येथें सांगितलें; हें अभ्यासूनें ध्यानांत ठेवावें. हा 'सांख्ययोग' नामक द्वितीय अध्याय होय.

८ **तिसरा अध्याय कर्मयोगाचा आहे.** या अध्यायाचा जो विस्तृत उप-संहार लिहिला त्यांत या अध्यायांत अंतर्गत झालेल्या विषयांचा विचार यथामति केला

आहे. येथें केवळ सर्व गीताग्रंथाशीं या अध्यायाचा काय संबंध आहे, हें दाखवायाचें आहे. अनंत ब्रह्मस्वरूपाचें ध्यान अखंड ठेऊन सांत उपाधींचा, सांत अज्ञानाचा, सांत प्राणेंद्रिय-मनोबुद्धींचा कायमचा लय कर्मानें करावयाचा, विहित कर्मानें करावयाचा, वासना व अहंकार हे अज्ञानजन्य विकार टाकून देऊन विहितकर्म करावयाचें आणि उपाधींचा नाश करावयाचा, हा कर्म करण्याचा उद्देश आहे. अपौरुषेय शास्त्रांनीं कर्म विहित केलें आहे, तें याच उद्देशानें होय. असो; गुणवैषम्यामुळें चंचलत्व प्रादुर्भूत करणारी प्रकृति ही कथा विषय पुढें आणून प्राणांपासून तों अहंकारबुद्धीपर्यंतच्या सर्व चैतन्ययुक्त उपाधींस व आभासिक आत्म्यास सुखदुःखाचे, शोकमोहाचे प्रसंग सिद्ध करून ठेविते. ह्या सुखदुःखादिकाला आपण डगमगलों नाहीं व आपला ज्ञानविस्तार अखंड वाढवून आपल्यामध्यें साधुस्वभाव प्रकट करतील अशा कर्मसंतति आपण अधिकारानुरूप स्वीकृत केल्या म्हणजे आपला कार्यभाग सिद्ध होतो. प्रकृति आणि जीव ( पुरुष ) यांमध्यें युद्ध चाललेलें आहे. आपले सद्भाव ( Right knowledg ) व साधुभाव ( Right will ) वृद्धिंगत होऊन आपलें प्रशस्त कर्म ( Right acts ) अधिकाधिक होत जातीलें असें करणें जीवाचें कर्तव्य आहे; कारण त्याला ज्ञान आहे. मनुष्यानें कांहींच केलें नाहीं तर प्रकृति सर्वत्र अव्यवस्था उत्पन्न करील असेंच नाही असें कँट साहेब म्हणतात, तें खोटें नाहीं हें खरें; पण त्या स्थितींत मनुष्याचें मनुष्यत्व जाऊन जीवत्व, पशुत्व, तिर्यग्योनित्व मात्र शिलक राहील. सर्वज्ञ ईश्वराच्या धार्मिक राज्यांत हा असला विसृष्टिविरोधन ( opposition to Evolution ) प्रकार उपयोगी नाहीं; आणि म्हणूनच विसृष्टीच्या साम्राज्यांत मानवी प्राणी उत्पन्न झाला आहे. पहा कीं, पूर्ण एकतंत्री राज्य ( Despotism; Autocracy ) असलें म्हणजे सर्वत्र झोटिंग बाच्छाईच चालते असा नियम नाहीं; तथापि प्रत्येक पुरुषास परमेश्वरदत्त म्हणून जें एक जबाबदारीचें इंद्रिय ( मनोवृत्ती ) उत्पन्न झालें आहे व जी स्वातंत्र्यबुद्धि निर्माण झाली आहे, त्या स्वतंत्र बुद्धीचा व जबाबदारीचा जागृत ठेवणाऱ्या वृत्तीचा तेथें उपयोग न झाल्यामुळें ते ते गुण लुप्त होतात आणि मानवी प्रजा पुनः बाल्यावस्थेंत शिरते. जगाचा इतिहास आपल्यास स्पष्टपणें सांगतो कीं, 'प्रकृतीला जितकी आपल्या स्वाधीन करून घ्याल तितकें तुमच्यामधील मानवी तत्त्व अधिक उद्भूत होऊन तुह्मी परमेश्वराच्या जवळ जवळ जाऊं लागाल.' याकरितां प्रकृतीनें दिलेला खाऊ ( सुखदुःख ) यांचा स्वीकार करण्याची अधिकारानुरूप निवृत्ति आपण क्रमाक्रमानें साधावयाची इतकेंच नव्हे, तर प्रकृतीचे गुणधर्म समजून घेऊन ती मनुष्याच्या ज्ञानामुळें ज्ञानी तंत्रानें वागूं लागेल असें करावयाचें, हेंही एक कर्तव्यच आहे. परमेश्वराच्या स्वाधीन प्रकृती आहे, तशीच ती आपल्या बुद्ध्यानुरूप आपल्या स्वाधीन करून घेतली पाहिजे. असें झालें तर मात्र ज्ञानी व अज्ञानी लोकांचा संग्रह ( Social advancement ) सुकर व सुखकर होऊन, त्यांच्या आत्मिक उन्नतीचा 'ओनामा' प्रारंभिलासें होईल. भगवंतांनीं इंद्रियनिग्रह करून कर्म करण्याची परंपरा सांगितली ती अशीच आहे. प्रथम शरीररक्षणार्थ कर्म, नंतर याज्ञिक कर्म ( पंचमहायज्ञ-

पंचसूनु यज्ञ इत्यादि; हे सर्व ज्यां देवांनीं उपकार केले त्यांच्याप्रीत्यर्थ कृतज्ञतेनें कर्म करून व त्या त्या उपकारकर्त्यांस योग्य कर्मफल देऊन पुनः आपण दुसऱ्यावर-स्त्रीपुत्रमित्र इष्ट गणगोत इत्यादिकांवर-उपकार करून ठेवावयाचे व याप्रमाणें विश्वचक्र चालावयाचें; हेंच या यज्ञाचें स्वरूप आहे इत्यादि.)-याज्ञिक कर्म सांगितलें. पुढें असक्तत्वानें कर्म करण्याचा उपदेश केला व कर्मे करूनही जनकासारखे ज्ञानी राजे मुक्त झाले, असें सांगितलें. पुढें लोकसंग्राहक कर्माचें आवश्यकत्व, लोकसंग्राहककर्माचे मार्ग इत्यादि सांगून कर्ममीमांसेची परिसमाप्ति केली. अर्थातच या कर्मसंततीचा योग्य विचार केला असतां कर्त्या जीवाला मोहाचें कांहींच कारण उरत नाहीं. हेंच स्पष्ट करण्यासाठीं २७-२९ श्लोक अवतारिले आहेत. प्रकृतीच्या गुणवैषम्यानें सर्व कार्यें होत असतात. शुद्ध आत्म्याचा त्यांत कांहीं संबंध नाहीं. सामान्य जीवांस ' आपल्याकडे कर्तृत्व आहेसें वाटतें; याचें कारण त्यांचें सोपाधिकत्व हें होय. आत्म्याकडे कर्तृत्व आणणें ही भ्रांति आहे, असें ज्ञानी पुरुषास मात्र कळतें. अज्ञानी लोकांस हें ज्ञान नसतें म्हणून ते शोकमोहाच्या अथवा अभिमानाच्या स्वाधीन होतात. आतां या अज्ञानी लोकांस जर ज्ञानमार्गाकडे न्यावयाचें आहे तर त्यांचे कर्तृत्व-बुद्धीचा नाश सर्वथा न करितां हळूहळू त्यांस निष्काम व निरभिमानी कर्म शिकवावयास लावून सर्व सृष्टिचक्र परमेश्वरी नियमानें चालत आहे हें स्पष्ट करून दाखवावें. हें त्यांस जसजसें पटेल तसतसें त्यांचें-शुद्ध होत जाणाऱ्या बुद्धिवंत पुरुषाचें-कर्तृत्व श्रेष्ठ प्रतीचें म्हणजे प्रकृतिनियामक होत जाईल व सिद्ध्यसिद्धीविषयीं तो उदासीनही होईल. अशा दृष्टीनें वर्तन झालें म्हणजे कर्मबाधा होत नाहीं; एवंच शोकमोह नष्ट करण्यासाठीं व शुद्धज्ञान होण्यासाठीं कर्तृत्वाचा अभिमान सोडावयाचा व फलाची वासना टाकून द्यावयाची आणि इंद्रियांस त्या त्या विषयासाठीं होणाऱ्या रागद्वेषाप्रीत्यर्थ आपण स्वतंत्र-आत्म्याचे ठिकाणीं रागद्वेष होऊं द्यावयाचा नाहीं, इतकेंच नव्हे तर इंद्रियांस स्वाधीन करून घेऊन त्यांसही शुद्ध करावयाचें: हें शुद्धीकरण ३७-४२ पर्यंत सांगून तेथें असा उपदेश केला कीं, शुद्ध-ज्ञानस्वरूपी आत्म्याला-रागद्वेषाचा संपर्कच होऊं शकत नाहीं. कारण कामक्रोधाची स्वारी फार तर बुद्धीपर्यंतच होते. एवंच आत्मारामाच्या स्वाधीन असणाऱ्या इंद्रियादिकांकरवीं कर्म झालें असतां तें बद्धक होत नाहीं: सारांश, अर्जुनरूपी जीवाचें धर्म्य-कर्म कर्तव्यच असून तें अनासक्त बुद्धीनें केलें असतां विषाद होण्याचेंही कांहीं कारण उरत नाहीं, हें ठरलें. यास्तव ' कर्मयोग ' हें या अध्यायाला सार्थ नांव मिळालें.

९. **चवथ्या अध्यायांत ज्ञानकर्मसंन्यासयोग आहे.** आचार्यांनीं या अध्यायाला ब्रह्मयज्ञप्रशंसा असें नांव दिलें आहे. तात्पर्य एकच आहे. अंतर्ज्ञान झाल्यामुळें आपल्या हातून होणारें जें वरिष्ठ प्रकारचें कर्म याचा संन्यास म्हणजे ब्रह्मयज्ञच होय. हा कसा व यानें कर्तव्यकर्म करण्याची प्रेरणा कशी होते तें पाहूं. (१) भगवंतांनीं ६ व्या श्लोकांत मायेचा स्पष्ट उल्लेख करून **आपण केवळ धर्मसंस्थापनेकरितां अवतार**

**घेत असतो,** असें उघड रीतीनें सांगितलें आहे. सर्वशुद्ध व सर्वज्ञानी भगवान् जर कर्म करितात, तर सामान्य मानवी जीवांनीं विहितकर्म केलें पाहिजे हें उघड आहे. विहितकर्माचरणानें निर्विकार होऊन परमेश्वराला प्रसन्न करण्यासाठीं परमेश्वराची उपासना करणारे **भक्त** व ज्ञानानें शुद्ध झालेले **संत** भगवत्स्वरूपाला जातात. कर्माप्रमाणें फल मिळतें, ह्याचा विस्तार उपसंहारांत केलाच आहे. तसेंच परमेश्वर हा कर्माच्या अभिमानापासून अलिप्त व फलाविषयीं निरिच्छ असतो; आपल्यास परमेश्वरस्वरूपच व्हावयाचें आहे, तर आपलें कर्म परमेश्वरी कर्मासारखेंच असलें पाहिजे. हें ज्ञान करून घेतल्यावर व तसें आचरण केल्यावर पूर्वींचे मुमुक्षु लोकांस सद्गति मिळाली, हें अनुरूपच झालें. एवंच चित्तशुद्धीसाठीं किंवा लोकसंग्रहार्थप्रीत्यर्थ कर्म केलेंच पाहिजे. पुढें ३३ श्लोकांत कर्मलक्षणी मीमांसा आहे. नैष्कर्म्यमीमांसा १९-२४ श्लोकांत आहे. विहित **कर्म करून पुनः** अकर्म व्हावयाचें असल्यास कामसंकल्पाचा संन्यास हवा व अद्वैतज्ञानही हवें. येथें कर्ता, करण, कर्म, फल, कर्मांगें, कर्मार्पण ही सर्व ब्रह्मच असतात! हेंच नैष्कर्म्य शोकमोहांचा नाश करितें. हाच ब्रह्मयज्ञ होय. हा प्रत्येक मुमुक्षूच्या हातून झाला पाहिजे. या यज्ञाशिवाय दुसरे यज्ञ कर्मजन्य म्हणून दुय्यम प्रतीचे होत; कारण येथें कर्तृत्वाभिमान असून **आपलें कर्म आपण वरिष्ठ** देवतेला कांहीं फलार्थ अर्पण करीत आहों ही भावना आहे. येथें जरी कांहीं अकर्म आहे, तथापि त्या अकर्माचा अभिमान असल्यामुळें तें कर्मच होतें. हे १२ प्रकारचे यज्ञ आहेत. यांत दैवयज्ञ, ब्रह्मयज्ञ, संयमयज्ञ, इंद्रिययज्ञ, आत्मसंयमयज्ञ, द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, स्वाध्याययज्ञ, ज्ञानयज्ञ, प्राणायामयज्ञ, व प्राणयज्ञ यांचा अंतर्भाव होतो. हे सर्व यज्ञ चांगले आहेत व चित्तशोधकही आहेत; तथापि या सर्वांत कर्माचा ( कर्तृत्वाभिमान व फलवासना यांचा ) थोडाबहुत अंश असतो आणि म्हणून ब्रह्मयज्ञाची योग्यता यांस नाहीं; पुनः येथें भेदभावही जिवंत असतो. म्हणून अकर्म करितां करितां कर्म होते! पण कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अधिकरण हीं सर्वच जेथें ब्रह्ममय होतात, तेथें खरा ब्रह्मयज्ञ होतो. ब्रह्मप्रेरणेनें ब्रह्माप्रीत्यर्थ ब्रह्मस्वरूपी कर्म होत आहे, अशी भावना अंतर्बाह्य होणें याचें नांव ब्रह्मयज्ञ होय. इतर सर्व यज्ञ चित्तशोधक तर खरेंच, पण ब्रह्मयज्ञ नव्हेत. कारण येथें ज्ञानविज्ञानाला ब्रह्मस्वरूप आलेलें नसतें. तथापि ज्ञानविज्ञान झालें म्हणजे कर्म, कर्तृत्व, कर्मफल इत्यादि कारक विचार अस्तंगतच होतो ( पहा श्लो. ३३ ). हाच ज्ञानकर्मसंन्यास होय. आणि ज्ञान म्हणजे सर्वभूतें स्वात्मारामामध्यें व परमात्म्यामध्यें आहेत असें परोक्षापरोक्ष केवलाद्वैत ज्ञान होणें होय. हें ज्ञान तत्त्वदर्शी ज्ञानी गुरूपासून मात्र मिळणारें आहे. तसेंच या ज्ञानानें मोहनिरसन आणि पापभंजन होतें. गुरुसेवा आणि निःसीम श्रद्धा हीं ब्रह्मज्ञानसाधनें होत. अशा प्रकारें निःसंशय ज्ञान झालें म्हणजे कर्मबाधा होत नाहीं, कारण विध्युक्त कर्मसंन्यास ज्ञानपूर्वक झालेला असतो. अतएव ज्ञानपूर्वक व संन्यासपूर्वक स्वकर्तव्य करावें, तें बद्धक होणार नाहीं.

१० **पांचव्या अध्यायांत सांख्ययोग व कर्मयोग मूलतः, वस्तुतः व फलतः एकच आहेत,** असें सांगून ज्ञानपूर्वक ब्रह्मार्पित निःसंग कर्म विमोचक होतें, बद्धक होत नाहीं, असें पुनः सांगितलें आणि योगयुक्त, विशुद्धात्मा ( निर्मळचित्त ) विजितात्मा ( मनःसंयमी ), जितेंद्रिय आणि सर्वत्र अद्वैत अनुभवणाऱ्या पुरुषाचें कर्म-बद्धक कसें होत नाहीं, याचा सर्व अध्यायभर विस्तार केला आहे. आत्मा कर्म करीत नाहीं व पापपुण्याचा फलभागी होत नाहीं; सर्व सकाम कर्मे, सर्व कर्तृत्व व सर्व कर्मफलें पूर्वसंचितकर्मानें उत्पन्न झालेल्या स्वभावानें, अज्ञानानें ( ब्रह्मस्वरूपाच्या अज्ञानानें ) निर्माण होतात, आपला त्यांत कांहीं संबंध नाहीं; संबंध, असेल तर तो सुविहितकर्म वेदोक्तमार्गानें व निष्कामबुद्धीनें नष्ट करण्याचा मात्र आहे. हाच **सर्व-कर्मसंन्यास होय.** हा ज्याला पूर्णपणें अधिगत झाला, कर्तृत्वभोक्तृत्व सर्व दयाघन परमेश्वराचें आहे, असें समजून व उमजून ज्यानें द्वैताची मुळी सकारण उखडून टाकिली आणि लोकांच्या निःश्रेयस हिताकरितां जो झटूं लागला, निर्मळ चित्ताचा व आत्मसंयमी असून जो ज्ञानपूर्ण झाला, त्यांचें साहजिक लोकहितात्मक कर्तव्यकर्म बद्धक न होतां विमोचन देणारें होतें. एवंच सांख्य-योग व कर्मयोग यांत काडीमात्रही फरक राहत नाहीं. असो; याप्रमाणें तिसरे अध्यायांत ( १ ) दृश्य विश्वांत आपण परिच्छिन्नरूपाभिमानी आहों, तोंपर्यंत कर्म करणें थांबत नाहीं असें मुमुक्षूला ४–७ श्लोकांत सांगून ( २ ) **परिच्छिन्नस्वरूपाचा निरास करण्यासाठीं** देहधारणा करावी व वेदोक्त कर्म मात्र करावें, हें स्वार्थीकर्म ८ वे श्लोकांत निरूपिलें; ( ३ ) नंतर याज्ञिक कर्मानें विश्वचक्र कसें चालूं लागतें, हें १०–१६ श्लोकांत दिग्दर्शवून यज्ञकर्माचा विस्तार चवथ्या अध्यायांत केला आणि तेथेंच कर्मास नैष्कर्मत्व देण्याचें रहस्य सांगितलें. या नैष्कर्म्याला ज्ञानाची, अद्वैतज्ञानाची आवश्यकता कशी असते, तें ज्ञान गुरूपासून कसें संपादावें, श्रद्धा कां ठेवावी, इत्यादि मुख्य गोष्टी उल्लेखून नैष्कर्म्यकारी यज्ञकर्माची परिसमाप्ति केली. ( ४ ) तिसऱ्या अध्यायांत पुनः १७–१८ श्लोकांत आत्मज्ञानाला नैष्कर्म्य सहज आहे, असें सुचवून अनासक्त कर्माची आवश्यकता व ज्ञानी पुरुषाच्या कर्मशून्यतेचा परिणाम व कर्तव्याचें स्वरूप, हें सर्व १७–२६ मध्यें विस्तारून पुनः याच विषयाचा विस्तार पांचव्या अध्यायामध्यें यथास्थित केला आहे. येथें व तेथें लोकसंग्राहक अस्वार्थी कर्मानें ( हें अर्थात ज्ञानी पुरुषास सहज आहे ) ब्रह्मभूतत्व कसें प्राप्त होतें हेंही सांगितलें आहे. ही संगति समजली असतां तिसऱ्या, चवथ्या व पांचव्या अध्यायाचें रहस्य समजेल असें वाटतें.

११ **सहाव्या अध्यायाचा विषय** उपन्यासांत आला आहे. येथें सांख्य व योग यांस अवश्य असणारा **राजयोग** सांगितला आहे. दुसऱ्या अध्यायांतील सूत्ररूपी श्लोक मागें उल्लेखिलाच आहे. येथें कर्मविचार आहे म्हणून सहाव्या अध्यायाची संगति तिसऱ्याच्या ३० व्या श्लोकांशीं करावी. असो; या योगाध्यायांतही सांख्य व योग एकफलपर्य-

वसायी आहेत. असें सांगून योगारुरुक्षु, योगारूढ, युक्त या पारिभाषिक शब्दांचीं स्पष्ट लक्षणें दिलीं, **आपला उद्धार आपणच केला पाहिजे** हें सुविशद रीतीनें सांगितलें; योगाचें आसन, आहार, विहार इत्यादि उल्लेखून एकाग्रचित्तानें आत्मानंद कसा होतो हें सुचविलें. तसेंच योगमार्गांतील जीवानें अभ्यासवैराग्यादि धारण करून परमेश्वरपद प्राप्त करून घेण्याचा दृढनिश्चय केला तर तो सिद्धीला अवश्य मिळवितो, असा सिद्धांत सांगून ब्रह्मस्वरूपाची अथवा सगुणस्वरूपाची भक्ति ही योगसिद्धीला, परमात्मस्वरूप प्राप्त करून घेण्याला आणि युक्त कर्मास नैष्कर्म्य देण्याला, उत्तमोत्तम साधन आहे हेंही स्पष्ट केलें. यांतच पूर्वाभ्यासानें उत्पन्न झालेली बुद्धि सुसंस्कृत असते, हेंही जातां जातां सांगून पुनर्जन्माची गोष्ट प्रकट केली आहे. असो; तेव्हां पूर्णत्वानें नित्य, बुद्ध, शुद्ध व मुक्त असणारा आत्मा हेंच सोपाधिक जीवाचें मूलस्वरूप, अंतःस्वरूप व पर्यवसायीस्वरूप आहे, हें तत्त्वज्ञान प्रथम दुसऱ्या अध्यायांत सांगून 'त्वंत्व' (जीवत्व) जें प्राप्त झालेंसें दिसत आहे, तो आभास नाहींसा करण्यासाठीं (पूर्ण अज्ञानांत हा आभास सुद्धां असत नाहीं; जीव मूळचा ज्ञानी, पण अज्ञानवशात् 'आपल्यास परिच्छिन्नत्व प्राप्त झालें व तें दुःखद आहे, असें मानितो' व तें दुःख कमी करण्यासाठीं प्रयत्न करितो; जडास हें दुःखज्ञान नाहीं व त्याचप्रमाणें शुद्धसुखाचीही तेथें कल्पना नाहीं.) श्रुतिप्रणीत ज्ञान व श्रुतिविहित कर्म याचा अंगीकार–आपली परिच्छिन्न स्थिति आहेसें वाटतें म्हणून मात्र–करावयाचा आहे, असें भगवंतांनीं सांगितलें. श्रुतिप्रणीत ज्ञान सांगतां सांगतां आधिभौतिकादि दृश्य शास्त्रांचा व त्यांचें ज्ञानाचे अवश्यकतेचा भगवंतांनीं उल्लेख करून 'आहे तें नष्ट होणार नाहीं व नाहीं तें अस्तित्वांत येणार नाहीं' हा तात्त्विक नियम व आत्मारामाचें सर्वव्यापी, निर्विकार, अजरामर, सर्वज्ञाननियामक अचिंतनीय व अव्यक्ताक्षरस्वरूपही सांगितलें. नंतर हा अनादि परंतु सांत आभास (माया) निर्मूळ करणारें कर्म तिसऱ्या अध्यायांत प्रस्तावून चवथ्यापासून तें सहाव्या अध्यायांत व्यावहारिक कर्माची शास्त्रीय मीमांसा केली आणि कर्मास नैष्कर्म्य कसें येतें तें सांगितलें आणि नैष्कर्म्यसिद्धि झाल्यावर मूळचें शुद्धस्वरूप भक्तिसाहाय्यानें कसें प्रकट होतें तें दिव्याच्या दृष्टांतानें स्पष्ट केलें. तात्पर्य, आडरानांत शिरल्यामुळें पायांत कांटा शिरला आहे तो काढण्यासाठीं दुसऱ्या खंबीर कांटयाचाच सादरस्वीकार करून निघालेला व काढणारा हे दोन्ही कांटे पाय स्वच्छ झाल्यावर टाकून द्यावयाचे आहेत. त्याचप्रमाणें 'मी परिछिन्न आहे' व 'मी अपरिछिन्न व्हावें' असा ज्ञानोद्भव स्वयंभू असल्यामुळें म्हणजे अज्ञान–ज्ञान उत्पन्न झाल्यामुळें त्याचा (अज्ञानाचा) निरास करण्यासाठीं आपल्यास कर्मच केलें पाहिजे. मात्र कर्म अभिमानवासनांनीं संवलित झालेलें नसावें; म्हणजे ज्या अज्ञानानें आपली इंद्रियगणमनोबुद्धि इत्यादि प्रकट केलीं, त्याचा व या इंद्रियादिक उपाधींचा निरास करण्यासाठीं, श्रुतिप्रणीत, ज्ञान सार्थ करण्याठीं व स्पष्ट समजण्यासाठीं विश्वाचें अंतर्बाह्य शास्त्रीयज्ञान–संपादन करून व ज्या परिच्छिन्न स्थितीनें इंद्रियादिकांची उपाधि आपल्यामागें लागली, ती परिच्छिन्नता नष्ट करण्यासाठीं इंद्रियादिक उपाधि निष्कामकर्म करितां करितां झिजून जातील असें श्रुतिविहित कर्म करण्याचा–सारांश कांट्यानें कांटा

काढून टाकण्याचा–प्रयत्न केला पाहिजे. हा मार्ग सांगण्यासाठीं पहिल्या सहा अध्यायाची योजना आहे. यांत आत्मस्वरूपानें परोक्ष दर्शन आणि परिच्छिन्न स्वरूपाचा ज्ञानपूर्वक निष्कामकर्मानें नाश, असे दोन मुख्य विषय असून ओघाओघानें इतर शास्त्रीय ज्ञानांचा व शास्त्रीय कर्मांचा अंतर्भाव झाला आहे. हें 'त्वं' स्वरूपात्मक निदर्शन होय. गीतेचा अभ्यास या दृष्टीनें केल्यास फलप्रद होईल अशी आशा आहे.

१२ **द्वितीय षट्कांत 'तत्' पदार्थाचा विचार आहे.** सातव्या अध्यायांत 'विज्ञानयोग' आहे. या अध्यायांतील मुख्य प्रश्नांचा विचार उपसंहारांत केला आहे. येथें केवळ अभ्यासाची दिशा दाखवीत आहे. आपल्या इंद्रियादिकांचें अधिष्ठान आत्मस्वरूप आहे, असें प्रथम षट्कांत प्रतिपादिलें, त्याचप्रमाणें सर्व पंचमहाभूतांचें अधिष्ठान तेंच ब्रह्मस्वरूप आहे, हे सातव्या अध्यायांत स्पष्ट केलें आहे. अव्यक्तापासून अत्यंत स्थूल विषयापर्यंतची सर्व जडप्रकृति, चलन उत्पन्न करणारीं सर्व सामर्थ्यें, या सर्वांचा अधिष्ठाता, नियंता, उत्पन्नकर्ता व प्रलयकर्ता एक परमेश्वर सगुणस्वरूपानें आहे, या परमेश्वरा पलीकडे शुद्धबुद्धीस मात्र गोचर होणारें दुसरें कांहीं नाहीं आणि सर्व विश्व व तद्गत स्थूलसूक्ष्म पदार्थ या परमेश्वरीस्वरूपांतच आपआपले विलास करीत आहेत, हें ४–१२ श्लोकांत कथन केलें आहे. तसेंच १३–१४ श्लोकांत दृश्य विश्व मायासमुद्रांत पोहत आहे व सर्व चराचर पदार्थ मायेला म्हणजे अज्ञानाला मोहित झाले आहेत, असें स्पष्ट सांगून, मायासमुद्रांतून तरून जावयाचें असेल तर एका सगुण परमेश्वरास पराभक्तानें व नंतर निर्गुण परब्रह्मस्वरूपास ज्ञानविज्ञानाच्या साहाय्यानें शरण गेलें पाहिजे असें सांगितलें. सगुण परमेश्वर व निर्गुण ब्रह्म दृश्य विश्वांत कसें पारखून घ्यावें, दृश्य विश्वाचें व विश्वनियमाचें ज्ञान किती आवश्यक आहे, याचा उल्लेख सूत्ररूपानें ८–१२ श्लोकांत केला आहे; यांतच सर्व भौतिक, मानसिक व ललितशास्त्रांचा अभ्यास किती आवश्यक आहे, हें सुचविलें आहे. 'ईश्वर मोठा आहे' असा सामान्य सिद्धांत घोकून पोकळ भक्ति अथवा निःसार ज्ञान, यांचा आश्रय करण्यापेक्षां तो पंचमहाभूतांत स्वगुणधर्मानें कसा प्रकट होतो, जीवांच्या अंतःकरणांत तो कसा बुद्धिगोचर होतो आणि मनोवृत्तींचे जे सुखदायी ललितविषय आहेत, त्यांतही कसा आविर्भूत होतो, हें शास्त्रतः पाहिलें व प्रत्यक्ष अनुभविलें म्हणजे जो आनंद होतो, वृत्तीला जें औदार्य येतें व जें विज्ञान प्राप्त होतें, तो मनःसंस्कार अपूर्व, उन्नतकारी, ज्ञानपोषक, भक्तिवर्धक आणि सर्वथा लोभनीय होय. एकच उदाहरण घेतों. '*अप्सुमे सोमोऽब्रवीदंतर्विश्वानि भेषजा*' ही ऋचा स्नानमार्जनाचे वेळीं आपण आजपर्यंत म्हणत आलों आहोंत व स्नानमार्जनानें शरीरशुद्धि व मनःशुद्धि होते असा श्रद्धायुक्त विश्वासही आपण धारण करितों. पण आपल्या सुश्रुतादि भिषग्वर्यांनीं जें काय पाण्याचे गुणधर्म सांगितले होते, तिकडे दुर्लक्ष्य होऊन गेल्यामुळें आमचे स्नानमार्जनादि विधि केवळ तांत्रिकतः होऊं लागले. आतां, या गेल्या शतकांत, कुन्हे साहेबांचे जलप्रयोग प्रसिद्ध होऊन स्नानविधींचें केवढें थोरलें माहात्म्य आहे, हें पश्चिमज्ञान-

सूर्यानें आम्हांस दाखविल्यानंतर पाण्याची योग्यता व आचमनाची महती आपल्या लक्षांत येत चालली आहे व पूर्वोक्त मंत्राचें स्वारस्य कळूं लागून तेथेंच सर्व रोगापहारक औषधी मिळणें शक्य आहे, असें वाटूं लागलें आहे. तसेंच आपण शब्द बोलतों त्याच्यायोगानें आकाशांत कांहीं विशिष्टरूपें ( Forms ) तयार होऊन ते कांहीं विशिष्ट कार्यें नियमानें करितात हें ध्वनिशास्त्रानें ( Science of Sound ) जेव्हां सप्रमाण सिद्ध केलें, तेव्हां मात्र 'आमचे अथर्वणवेदोक्त मंत्र खरे असतील, असावेत, असलेच पाहिजेत' असें आपण बोलूं लागलों आहोंत; व त्या मंत्रांचा अनुभव येण्यास योग्य अशी जिज्ञासु श्रद्धाही आपल्यामध्यें लवकरच अवतीर्ण होऊन आपण त्यांचा प्रत्यय घ्यावयास लागूं, असा मुमार दिसूं लागला आहे. असो; याप्रमाणें जर जडाच्या गुणधर्मांची व मंत्रांच्या सिद्धीची प्रतीति येण्यासही ज्ञानाची आवश्यकता आहे, तर सर्व चराचराचा अधिष्ठाता, सर्वनियंता, सर्वज्ञ, सर्वज्ञेय, सर्वसाक्षी, सर्वदयाघन जो परमेश्वर त्याचे गुणधर्म समजण्यासाठीं त्यानें जें विश्व निर्माण केलें आहे व आपल्यास बुद्धिप्रमुख इंद्रियें दिलीं आहेत, त्यांचा उपयोग करून घेऊन आपली ज्ञानवृद्धि करावयास नको, असें धाडसी मनुष्याशिवाय कोण ह्मणेल? (१) नुसत्या महावाक्याच्या पोकळ प्रवचनांनीं मुक्ति मिळावी इतका सोपा जर ज्ञानपंथ असता, तर इतके ग्रंथ इतक्या पाल्हाळानें लिहिण्याची जरूरीच नव्हती. (२) तसेंच हें अद्वितीय ब्रह्मज्ञान समजण्यापुरतें असंस्कृत बुद्धीला सामर्थ्य असतें, तर वैराग्यादि साधनचतुष्टय सांगितलें आहे तेंही सांगण्याची अपेक्षा न होती. (३) त्याचप्रमाणें हें मायामय विश्व असंस्कृत बुद्धीच्याही मनुष्यास-जीवास-आपोआप समजलें असतें तर ज्या विश्वांतच परमात्मा सर्व विश्व अंतर्बाह्य व्यापून पुनः दशांगुलें उरला आहे, तें विश्वही निर्माण करण्याची-प्रकट करण्याची-आवश्यकता नव्हती. पण आपली बुद्धि असंस्कृत आहे, तिला संस्कार देण्याला, नित्यानित्य शोधून काढण्याला, दृश्य विश्व व नित्य ब्रह्म या उभयतांच्या अस्तित्वाचें योग्य प्रकटन झालें आहे व म्हणूनच त्यांच्या स्वरूपज्ञानाची व गुणधर्मांची ओळख करून घेणें आपल्यास अवश्य आहे. युरोपियन लोकांनीं दृश्य व दृश्यगुण यांचीच कांस धरून नित्य वस्तूवर पाणी सोडिलें आणि चार्वाकवादी झाले, असें जें आपण म्हणतों, त्या आपणांसच जर कोणी म्हटलें, 'बाबांनों! नित्य परब्रह्माचे सिद्धांत निःसारतः व शब्दलाघवानें मात्र घोकल्यामुळें तुमच्या बुद्धीला प्रखर मांद्य येऊन ती बुद्धि दृश्यरूप समजून घेण्यास सुद्धां नालायक होत चालली आहे, मग परब्रह्मस्वरूपाचें नांव तरी कशाला घेतां?' असें जर विचारलें-तर आपण काय उत्तर देऊं बरें? अनेकांत एक पाहणें, दृश्यांत केवल पाहणें, विभक्तांत अविभक्त पाहणें, अनित्यांत नित्य पाहणें हा जो ईशमान्य ज्ञानमार्ग (To go from the known to the unknown ) तो सोडून देऊन आम्हीं घोकंपट्टीच करीत राहिलों, आपल्या सुदैवानें जी ५२ वर्णांची माला आपल्यास लाधली आहे, त्या मालेच्या अधारानेंच अक्षरांचे, शब्दांचे व वाक्यांचे मनास येतील तसे जोड करून आपलें ज्ञान वाढत जातें किंवा तर्कसंग्रहासारखा एकादा मूलग्रंथ शिकून आपली वादपद्धति पूर्ण होते,

असें समजतों. सारांश, आमच्या पूर्वजांनीं आमच्याकरितां सर्व कांहीं करून ठेविलें आहे, आपल्याला त्यांत यत्किंचितही भर टाकावयास नको, अशी जर आपण आपली नेभळी समजूत करून घेतली, तर आमच्यासारखे अद्वितीय शहाणे आम्हीच, अशी आपली अस्पृहणीय कीर्ति होऊन मागील व पुढील लोकांस तिरस्काराच्या बोटानें दाखविलें जाणारें आपण एक अद्वितीय पात्र होऊन बसूं ! ! मुमुक्षुदेशबंधूंनो ! हा आळसाचा नेभळा, तामसी, अज्ञानपूर्ण मार्ग सोडून द्या आणि आपल्या पूर्वजांनीं जें ज्ञानभांडार व कर्मभांडार आपल्या स्वाधीन केलें आहे, तें उघडून त्या ज्ञानकर्मरत्नदीपांच्या साहाय्यानें आपल्या सभोवतालचें विश्व, विश्वरूप व सामान्य आणि विशेष विश्वनियम पाहावयास लागूं या; तेथेंच आपल्या एकनिष्ठभक्तीनें व निष्काम सात्त्विक आचरणानें प्रसन्न झालेला ईश्वर आपल्यास प्रकट होईल, तेथेंच नीतीचे, राज्यशासनाचे, न्यायाचे व धर्माचे नियम अजमावले जाऊन स्वार्थत्याग-पूर्ण-प्रेमाचें-रहस्य-आपल्यास विज्ञात होईल, कर्म निर्मळ होईल, भक्ति अखंड राहील, ज्ञान पूर्ण होईल आणि परमेश्वरांत अंतर्भूत होणारें व परमेश्वराच्याही पलीकडे असणारें जें नित्य ब्रह्म त्याचा अनुभव येऊन सर्व अनित्याचा, सर्व अज्ञानाचा व सर्व दुःखाचा उच्छेद होईल व आपणच सच्चिदानंदस्वरूपाचे अधिष्ठाते होऊं. हा आमच्या पूर्वजांचा मार्ग आहे, हा संतांचा मार्ग आहे, हाच धर्ममार्ग होय; ईश्वर-प्रणीत व धर्मप्रणीत व श्रुतिप्रणीत मार्ग हेंच सांगतो, हाच ब्रह्ममार्ग आहे; याकरितां उठा, जागे व्हा, ज्ञानसंपादनाच्या मार्गाला लागा, स्वतः विज्ञान मिळविण्याची खटपट करा, परावलंब सोडा आणि मोक्षाची वाट धरा. हाच गीताप्रणीत मार्ग आहे, हें ७-१२ श्लोक वाचून समजून घ्या, भगवंतावर व गीतेवर तुमची भक्ति आहे म्हणून तरी हें समजून घ्या, आचरणांत आणा; म्हणजे तुमचें ज्ञान, तुमचें बल व तुमची नीति वृद्धिंगत होऊन तुमच्या इच्छा सत्यसंकल्पी होतील व तुमचीं सर्व संकटें लयाला जातील आणि तुम्हीं स्वतः मोक्षाचे अधिकारी व्हाल, इतकेंच नव्हे, तर इतर जनास सात्त्विक धर्ममार्गाचे दीपस्तंभ व्हाल, आणि तुमचीं कुटुंबें, तुमच्या जाति (तुमचे वर्ण), तुमचे समाज, तुमचीं राष्ट्रें व तुमचीं जगतें, प्रेमबद्ध, शुद्धप्रेमबद्ध ज्ञानपूर्णशुद्धप्रेमबद्ध, नित्यज्ञान-पूर्णशुद्धप्रेमबद्ध होऊन तुम्हीच पुनः सत्ययुगांतील पुरुषांचे पूर्वज होण्याचा सन्मान्य स्पृह-णीय अधिकार प्राप्त करून घ्याल!

हें विषयांतर झालें; पण हल्लींच्या आमच्या देहस्वार्थी राष्ट्राला पथ्यकर आहे, असें समजून तें केलें आहे. असो; वर सांगितल्याप्रमाणें शास्त्रानें व अनुभवानें (हें शास्त्रज्ञान व अनुभव दृश्यस्वरूपज्ञानानें व ज्ञानमूलक कर्मानें व त्याचप्रमाणें नित्यस्वरूपाच्या परोक्ष ज्ञानानें व शास्त्रविहित कर्मानें प्राप्त होतात.) सिद्ध झालेला यति व त्याची निःसीम व अखंड ज्ञानभक्ति हींच परमेश्वराला स्वात्मारामाइतकीं प्रिय असतात, असें १८ व्या श्लोकांत दर्शवून बाकीचे दुःखार्त, जिज्ञासु व आर्थिक भक्तांचा गौणपक्षांत अंतर्भाव होतो, असें सुचविलें. हे सर्व लोक महेश्वराचेच भक्त होत; यांच्या खालच्या प्रतीचे लोक सर्वदेव-देवेश्वराच्या तंत्रानें वागणाऱ्या दुसऱ्या तिसऱ्या प्रतीच्या देवदेवतांचें सकाम आराधन

करितात. हें आराधनही त्या लोकांच्या ज्ञानविज्ञानसीमेनुसार विहितच आहे. मात्र या लोकांची सकामभक्तिप्रवृति निष्कामत्वाकडे वळविण्याचें काम साधुसंतांकडे असतें. निष्कामत्वानें ज्ञान वाढेल, कर्मसात्त्विकतर होईल आणि संसारिक सुखदुःखाचें प्रशमन करण्यासाठीं, मोक्ष मागण्यासाठीं, मोक्षाचें व परमेश्वराचें स्वरूप कळण्यासाठीं, त्या सर्वव्यापी, सर्वज्ञत्वादि गुणविशिष्ट परमेश्वराचें आराधन करावेंसें या लोकांसच वाटेल आणि या भक्तीलाही निष्कामत्व येऊन वरील दृढनिश्चयी मुमुक्षूंस पूर्णस्वरूपाचें परोक्ष व अपरोक्ष ज्ञान होऊन ते ईश्वरतादात्म्य पावतील आणि शेवटीं मुक्त होतील. हा विषय १५-३० श्लोकांत समजून घेण्याचा आहे. येथेंही इष्ट देवतांचें अनेकत्व दिग्दर्शवून असें सुचविलें आहे कीं, स्वतःच्या अधिकारानुसार इष्टदेवतेची योजना करावी, भक्ति चालवावी, ज्ञान मिळवावें व ती देवता संतुष्ट होईल असें शास्त्रोक्त वर्तन ठेवावें. 'टक्का शेर भाज्या और टक्का शेर खाज्या' असा आर्यधर्माचा, आर्यकर्माचा, आर्यज्ञानाचा अथवा आर्यतत्त्वज्ञानाचा व ब्रह्मज्ञानाचा प्रकार नाहीं. प्रत्येकास गुणस्वभावानुसार योग्य असा मार्ग शास्त्रतः ठरवून पुनः प्रत्येकाला पुढें जाण्याची स्वतंत्रता देणारा आमचा आर्यपंथ आहे. तेव्हां आमच्या अनेक देवतात्मक धर्मास हंसणाऱ्यांनीं माझ्या आग्रहास्तव आपलें हंसणें क्षणभर आंवरून धरून व्यक्तिभेदानुसार कर्माचे, धर्माचे, ज्ञानाचे व ज्ञानसंग्रहाचे निरनिराळे मार्ग असणें इष्ट आहे कीं नाहीं याचा म्हणजे तुकारामाची निःसीम भक्ति रस्त्यावरील धोंडू चांभारास कितपत उपयोगीं पडेल, याचा विचार करावा; पुढें जाण्याला प्रत्येकाला मोकळीक आहे, हें ध्यानांत ठेवावें; व सरतेशेवटीं सर्वच एकरसात्मक करणारें तत्त्वज्ञान **आर्य पुस्तकांमध्यें तरी** अद्यापि जिवंत आहे, हें विसरूं नये; इतकें करूनही त्यांचा हास्यरस आंवरिला गेला नाहीं तर मात्र 'मीच दुर्दैवी, मलाच आर्यसिद्धांत सप्रमाण रीतीनें सिद्ध करितां येत नाहींत, म्हणून व दुसरा कोणी महात्मा हें सिद्ध करणारा ह्या हास्यकारांस मिळेल, असें, दुबळें, पण निश्चित समाधान मानून, मी गप्प बसेन.' असो; मायेचा उल्लेख पुनः २५ व २७ श्लोकांत आहे; त्याचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां सर्व चराचर भूतें मायासागरांत पडलेलीं आहेत, ईश्वरी स्वरूप आपल्यास मायेमुळेंच प्रकट होत नाहीं. सारांश, माया व्यक्त जीवापुरतीच असते असें नाहीं, तर प्रत्येक पदार्थ व प्रकट विश्व हीं सर्व मायेच्या साम्राज्यांत असतात, असें सांगून लीलेनेंच माध्वादिकांच्या मताचें खंडन करणारें सूत्र ( पहा श्लो. २७ ) प्रकट केलें आहे; तसेंच मोक्ष मिळण्यास अवश्य असणाऱ्या सात गोष्टी ( ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ परमेश्वर, आणि परमेश्वराचें अखंड ध्यान ) उपक्रमून त्यांचें रहस्य पुढील अध्यायांत सांगितलें आहे. एवंच पूर्णज्ञान व पराभक्ति हें 'तत्' स्वरूप समजण्याचें साधन आहे व परब्रह्म सर्वांस अंतर्बाह्यतः व्यापून एकत्वानें राहणारें आहे, हें या **विज्ञानयोगांत सांगितलें** आहे. या अध्यायास 'विज्ञानयोग' म्हटलें, त्याचें रहस्य हें कीं, या अध्यायांत परब्रह्माचें स्वरूप परोक्षतः सांगून पुनः अपरोक्षत्वानें म्हणजे 'पृथ्वीतील गंध मी, बुद्धिमतांची बुद्धि मी,' इत्यादि पद्धतीनें सांगितलें आहे. हाच अनुभव होय. हेंच विज्ञान होय.

१३ आठव्या अध्यायाला तारकब्रह्मयोग अथवा अक्षरब्रह्मयोग असें म्हणतात. यांत वर उल्लेखिलेल्या प्रथम सात प्रश्नांचीं उत्तरें दिलीं आहेत. (१) ब्रह्म म्हणजे सद्वस्तु. ही अव्यय असून सर्वश्रेष्ठ व सर्वसत्ताक आहे. हिचें स्वरूप केवळ तत्त्वज्ञानानें व भक्तिपूर्वक योगाभ्यासानें विज्ञात व्हावयाचें. ज्याला तत्त्वज्ञान, ब्रह्मज्ञान, (philosophy) म्हणतात, त्या ज्ञानानें व कर्मयोग-कर्म-धर्म-भक्तियोग (Practical Philosophy) व त्याचें ज्ञान व अभ्यास ह्यांनींच ब्रह्मपदाची प्राप्ति होते, अथवा अज्ञानाची निवृत्ति होते. (२) अध्यात्म म्हणजे ब्रह्मप्रभाव, प्रत्यगात्मा; याचें ज्ञान अध्यात्मशास्त्रानें (metaphysics) व वस्तुशास्त्रानें (Ontology) होतें. (३) कर्म म्हणजे साधुकर्म म्हणजे यज्ञगर्भकर्म होय. हेंच कर्म ईश्वरी नियमानें भूतमात्रास उत्पन्न करितें. ह्या ईश्वरी विश्वनियमांचें ज्ञान विश्वाभ्यासानें व्हावयाचें व यज्ञगर्भकर्मांचें ज्ञान नीति, धर्म, व्यवहार, राजशासन इत्यादिकांच्या नियमज्ञानांनीं व्हावयाचें. आतां भूतभावांपैकीं एक विकारी भाव आहे, तो (४) अधिभूत होय. यांत प्रकृतीच्या अव्यक्त स्वरूपापासून तों बुद्धिप्रमुख इंद्रियांसह स्थूल जडापर्यंतच्या सर्व विकारी म्हणजे दृश्य स्वरूपांचा व त्यांच्या कार्यकारणात्मक नियमांचा अंतर्भाव होतो. अर्थातच मोक्ष मिळविणाऱ्या पुरुषाला ह्या क्षराचे व क्षरनियमांचें ज्ञान असलें पाहिजे. तसेंच (५) आधिदैवत म्हणजे अपरिच्छिन्न वस्तूला, ज्ञानकलेला, जें परिच्छिन्नत्व आलेलें दिसत आहे, परिच्छिन्नत्वाचा ज्याला भास होत आहे, तो जीव होय. ही वस्तु कारणशरीरात्मक असून स्थूल सूक्ष्मावर सत्ता ठेविते व त्यांस पूर्णत्व देते. ही अज्ञानसंवलित ज्ञानकला आहे; अर्थातच येथें सर्व मानसशास्त्रांचा व पुरुषार्थकर्मशास्त्रांचा अभ्यास करून ज्ञानविज्ञान मिळविणें जरूरीचें, अनिर्वाहपक्षाचें झालें. ह्याला अधिदैवत, (soul) म्हणावें. ह्याचप्रमाणें सर्व ज्ञान व सर्व कर्म परमेश्वरास अर्पण करण्याचा जो यज्ञ त्याचा भोक्ता श्रीविष्णु म्हणजे (६) अधियज्ञपुरुष (spirit) होय. येथें सर्व निवृत्तिमूलक शास्त्रांचा अभ्यास इष्ट आहे. याप्रमाणें सर्व क्षर, सर्व अक्षर वस्तूंचा व सर्व भोक्तृत्वाचा अधिष्ठाता, व नियामक, जो श्रीपरमेश्वर, सगुणब्रह्म, त्याच्या स्वरूपाचें ज्ञानविज्ञान अवश्य आहे, असें सिद्ध होतें. (७) शेवटीं हें ज्ञान झाल्यावर त्याचें अखंड निदिध्यासन ठेवणारा पुरुष ब्रह्मभावाला जातो, असें सांगून भक्त्यात्मक सर्व विधिशास्त्रांचा व शास्त्रविधींचा अभ्यास इष्ट आहे, हें सुचविलें. असो; याप्रमाणें मोक्ष मिळविणाऱ्या पुरुषाला आधिभौतिक शास्त्रापासून तों अध्यात्मशास्त्रापर्यंतच्या सर्व शास्त्रांच्या मूलतत्त्वांचें व प्रमुख सिद्धांतांचें ज्ञान (हाच सांख्ययोगाचा पाया आहे) व्यावहारिक व कर्मापासून तों स्वार्पणापर्यंतच्या सर्व कर्मशास्त्रविधींचें मूलतात्त्विक ज्ञान (हाच कर्मयोगाचा पाया आहे) संपादन करणें अत्यंत इष्ट आहे असें ठरलें. तत्त्वज्ञान व तत्त्वविज्ञान झालें म्हणजे (Theoretical philosophy) व (practical philosophy) पूर्ण होऊन आभासिक जीवाचें अज्ञान नष्ट होतें, त्याचें दुःखप्रशमन होतें व विकार्यत्व संपतें; आणि तो अनंतस्वरूपाशीं तादात्म्य पावतो. हें अनंत स्वरूप कसें आहे हें 'परमअक्षर' या शब्दद्वयानें स्पष्ट

केलेंच आहे. गीतेच्या विद्यार्थ्यानें ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून अभ्यास केल्यास तो आधुनिक हिंदु म्हणजे दुबळ्या वेदांत्याप्रमाणें विचारांत दृश्यविन्मुख व आचारांत नित्यविन्मुख होणार नाहीं; व त्याचप्रमाणें युरोपियन प्रवर्तकांप्रमाणें सदैव दृश्यसन्मुख आचारविचारांत गुरफटून राहणार नाहीं. या म्हणण्याचा असा अर्थ नव्हे कीं, आमचे सगळेच लोक पुरुषार्थ–विन्मुख आहेत, किंवा सर्वच युरोपियन लोक दृश्यसन्मुख आहेत. आम्ही देवभक्त आहोंत, पण आमचें ज्ञान प्रायः लुप्तप्राय झाल्यामुळें आमचा धर्माचार तंत्रप्रेरित, व्यवहाराचार स्वार्थप्रेरित पण विचार मात्र आलस्योत्पादक व शब्दैकवेदांतप्रेरित असतात; म्हणून आम्ही आळस सोडून दृश्यनित्य समजाविणारा ज्ञानमार्ग उज्वल होईल असें निष्काम कर्म केलें पाहिजे. याचप्रमाणें युरोपियन धर्म ठीक आहे, चांगला आहे, तरी तो सगुणात्मक आहे; तसेंच त्या तरुण लोकांचें आचरण व त्यांचीं शास्त्रें व त्यांचें तात्त्विक विचार हे प्रायः दृश्य विश्वाला, सामान्यतः व्यक्तिस्वार्थाला, राष्ट्रस्वार्थाला, चिकटलेले असतात. आपल्यास युरोपियन लोकांइतकें व्यक्तिशः, अथवा राष्ट्रशः देहस्वार्थी व्हावयाचें नाहीं; पण त्यांची जिज्ञासा, त्यांचा दृढ निश्चय त्यांची अखंड उद्योगशीलता, त्यांची राष्ट्रभक्ति इत्यादि अनेक सद्गुणांचा मात्र आपल्यास अंगीकार करावयाचा आहे. सारांश, आपल्या पूर्वीच्या आर्य लोकांचें 'असल्या पदार्थांत समाधान व युरोपियन लोकांची औद्योगिक राक्षसी हौस' या उभयतांस एकत्र करून जर गीताविद्यार्थी अभ्यासास सुरुवात करील, तर मात्र भगवदुद्देश सिद्धीस जाऊन आपलें, आपल्या राष्ट्राचें व पृथ्वीचें कोटकल्याण होऊन सनातन वैदिक धर्माचें सनातनत्व पुनः स्थापित करण्याचें श्रेय आमचा विद्यार्थीवर्ग अंशतः तरी घेईल.

या पुढें ओंकाररूपी तारकस्वरूपाची मीमांसा, त्याचें महत्त्व व त्याचें कार्य सांगून व ब्रह्मदेवादि स्थावरांत सर्व वस्तूंच्यामागें पुनरावर्तनाचा लकडा लागला आहे, हें सुचवून त्याची दिशा सांगितली आहे. पहाः गणितशास्त्रांत दोन किंवा दोहोंचा कोणताही घात अथवा पांच किंवा पांचाचा कोणताही घात यानें मात्र कोणत्याही संख्येस हल्लींच्या दशांश गणित पद्धतीनें भागिलें असतां केव्हांतरी भाग तुटून बाकी शून्य होण्याची आशा असते. पण इतर कोणत्याही संख्येनें, दुसऱ्या कोणत्याही संख्येनें, भाग न तुटतां उलट त्या त्याच भागाकारांतील सर्व किंवा कांहीं आंकड्यांची पुनरावृत्ति होण्याचा निश्चय असतो; व भाग केव्हांही तुटत नाहीं. या उदाहरणावरून स्पष्ट होतें कीं, अभिमानवासनारूपी दुकलीस सर्वथा निवृत्त करून पंचकोश जोंपर्यंत आपण फोडिले नाहींत, तोंपर्यंत पुनरावृत्तीचा प्रसंग आपल्यावर येऊन संसारांतील अज्ञान, त्यांतील दुःखें व त्यांतील अनित्यता हीं आपल्यास ताप देणार यांत शंका नाहीं. हें भगवंतांनीं विशद करून दाखविलें आहे, तें काळजीपूर्वक पहावें, आणि आपल्या व इतर जीवाच्या सोडवणुकेस लागावें. विद्वान् लोक ज्ञानपूर्वक निष्कामकर्म परमेश्वरास अर्पण करून ज्ञानसंपादन करित असतील तर ते अर्चिरादि मार्गानें हळूहळू सत्यलोकाप्रत जातात व अविद्वान् म्हणजे सकामकर्म करणारें लोक आपलें कर्म विष-

यास व स्वतःच्या देहादिकांस अर्पण करून धूममार्गानें जातात व पुनः जन्मास येतात, हा श्रुतिप्रणीत सिद्धांत आहे.

'अग्निर्ज्योतिः' असा पाठ सर्वत्र आहे त्याच्या ऐवजीं 'अग्निज्योतिः' असा पाठ असता तर ठीक झालें असतें व

| | |
|---|---|
| अग्निज्योतिः | धूमः |
| अहः | रात्रिः |
| शुक्लः | कृष्णः |
| उत्तरायण | दक्षिणायन |

अशा जोड्या समजण्यास ठीक पडलें असतें. मी म्हणतों याला श्रुतीचा आधार आहे. बृहदारण्यकांत अर्चि हा ज्योतिर्वाचक शब्द आहे; पुढील क्रम ठीक आहे. (बृ० अ० ६ ब्रा. २ मंत्र १६). याचा विचार पंडितजन करोत.

१४ **नवव्या अध्यायांत राजयोग आहे.** येथें पुनः ब्रह्मस्वरूप ४ व ५ श्लोकांत स्पष्ट सांगून परमेश्वराचें कर्म नैष्कर्म्यस्वरूपी असतें हें कसें, तें ९ व्यांत सांगितलें व १० व्या श्लोकांत विवर्तवादाचा स्पष्ट उच्चार केला. तसेच आपलें एकत्व असून अनेकत्व कसें भासतें हे १६–१९ श्लोकांत सांगितलें. अर्थी भक्तांस पुनरावृत्ति आहे व ज्ञानी भक्तांस नाहीं हें पुनः सांगून ज्ञानपूर्वक ऐकांतिक भक्तियोगच तारक आहे, असा विषय विशद करून कोणत्याही अधम पुरुषानें केव्हांही परमेश्वराची निष्काम सेवा ज्ञानपूर्वक करण्यास आरंभ केला व आपले सर्व व्यवहार तो परमेश्वर साक्षित्वाने करूं लागला म्हणजे तो पुढें कोणत्या तरी जन्मांत खास मुक्त होतो, असें जें परमेश्वरांनीं ३०–३१ आदि श्लोकांत आश्वासन दिलें आहे, तें सर्वथा उत्साहप्रदच होय. बाकीचा विषय या अध्यायाच्या उपसंहारांत केलाच आहे. हा अध्याय मुमुक्षूनें नित्य वाचण्यासारखा आहे.

१५ **दहावा अध्याय विभूतिपर आहे.** या विभूतींचा विचार विशिष्ट उपसंहारांत करून वेदकालाच्या उत्तरभागांत गीता गायली असावी, असें ध्वनित केलेंच आहे. आतां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, या आर्यभूमींत ज्या सुंदर, उपयोगी, उज्वल आणि पूज्यभाव उत्पन्न करणाऱ्या भव्य वस्तु आहेत त्यांचा, जे अवतारी पुरुष मानवसंतारणार्थ झालें, त्यांचा व विश्वोपयोगी वस्तूंचा, ज्ञानाचा व कर्माचा उल्लेख करून भगवंतांनीं असें सांगितलें आहे कीं, जेथें संसारविमोचक कर्माचा उदय करणारे गुण प्रादुर्भूत होतात, तेथें ईश्वरी विभूति आहे, असें समजावें! प्रत्येक वस्तूचा ज्ञानमार्गानें विचार केल्यास तेथें कांहीं विशिष्ट गुणधर्म प्रकट होतात. व ईश्वरी

लीला आपल्यास उत्तम समजते, भक्ति दृढ होते, ज्ञान वाढतें आणि कर्म शास्त्रोक्त होऊं लागून परमार्थाकडे प्रवृत्ति होते. हें तत्त्व आम्हीं जाणिलें तर अवतारी पूर्वजांचा अभिमान बाळगणारे आम्ही त्यांचे वंशज, असें ज्ञान संपादन करूं कीं सर्व विश्व तोंडांत बोट घालून स्तब्ध राहील व अशी श्रेष्ठ प्रकारचीं सांत्विक कर्में करूं कीं, ज्या योगानें आम्हीं आपला उद्धार करून आमच्या बरोबर इतर लोकांचाही उद्धार करूं!

१६ **अकराव्या अध्यायांत विराटपुरुषाचें** स्पष्ट दर्शन आहे. सात, आठ, नऊ व दहा अध्यायांमध्यें परोक्षज्ञान व अस्पष्ट अपरोक्षज्ञान-विज्ञान सांगितलें, तें अपरोक्ष करून घेण्यासाठीं अर्जुनानें भगवंताची प्रार्थना केली (पहा श्लो. २-४) आणि शिष्याची जिज्ञासा उत्कट झाल्यावर गुरु जसे प्रेमानें सांगतात, त्याचप्रमाणें निःसीम भक्त जो अर्जुन त्याला स्पष्ट अपरोक्ष ज्ञानाची अनावर जिज्ञासा झाली आहे, असें पाहून त्याच्या स्थितीसच त्या प्रसंगास योग्य, असें भगवंतांनीं विश्वरूप प्रकट केलें आणि तें पाहण्यासाठीं त्याला दिव्य दृष्टिही दिली. हाच साक्षात्कार अथवा हीच समाधिस्थिति होय. येथें अर्जुनास विचित्र पण वस्तुतः एकरसात्मक विश्व हें परमेश्वरस्वरूपच आहे, असें प्रत्यक्ष दिसलें. तेव्हां भक्तिरसाचा उमाळा येऊन तो जिव्हेच्या द्वारें बाहेर स्तोत्ररूपानें प्रकट झाला आहे. हें स्तोत्र प्रत्येक भक्तानें अवश्य नित्यशः वाचून मनन करण्यासारखें आहे. त्यांतही १८ वा श्लोक तर हृत्पटिकेवर खोदूनच ठेवावा. तसेंच त्या अखंडकालस्वरूपी विश्वदर्शनांत अखंड कार्यकारण-शृंखलेनें निगडीत झालेले हजारों जीव निधनपंथाला लागलेले पाहून 'प्रकृतिं यांति भूतानि, निग्रहः किं करिष्यति' या श्लोकाची अर्जुनास खातरीसह आठवण झाली असेल आणि आधुनिक आंग्लविभूषित चौकस वाचकांस ॲडिसनकृत 'मिरझ्याचे स्वप्नाची' आठवण होईल. येथील नदीप्रवाहस्थ जळबिंदु व उज्वल प्रदीपावर झापा टाकणारे पतंग यांचे दृष्टांत समर्पक आहेत, असें भगवंतांस व अर्जुनास सर्टिफिकीट देण्याचा माझा अधिकार नाहीं; पण दृष्टांत उत्तमोत्तम आहेत हें खरें. येथें जीवाचें निमित्त-मात्रत्व, अकिंचित्करत्व लीलेनें प्रकट झालें आहे. कार्यकारणांचा नियम येथें जितक्या न्यायनिष्ठुरतेनें वर्णिला आहे, तसा अन्यत्र दुसरीकडे कोठेंही नसेल. अर्जुनाचें दुसरें स्तोत्र विश्वांतील प्रत्येक मनुष्यानें आपलेसें करून घ्यावें. ज्ञानाचा अतिरेक झाला असतां भक्ति कमी होईल या भीतीनें मध्वादिकांनीं ज्ञानप्रवाह बंद करण्याचा प्रयत्न केला व त्याचप्रमाणें अलीकडील भीतिग्रस्त कर्मठ लोकही वेदवेदांतांचा अर्थ करण्यास नाखूष असतात. त्या सर्वांला 'अर्जुनस्तोत्र' हें उत्तम उत्तर आहे. असो; भक्ति कमी होणें हा **विपरिणाम** कदाचित् ज्ञानानें उन्मत्त झालेल्या मदांध लोकांच्या **अयथार्थ आचरणाचा असेल.** पण हा ज्ञानाचा दोष नव्हे; **अपात्रीं ज्ञान देणाऱ्याचा दोष आहे.** जितकें ज्ञान वाढतें, ज्ञानमर्यादा जितकी विस्तृत होते, तितका भक्तिरस जास्त वृद्धिंगत होतो, तितकी जास्त स्वकिंकरतां स्पष्ट भासूं लागून पराभक्ति दृढ होते व ईश्वरभक्त होण्याची चिकीर्षा प्रबल होते आणि त्यायोगें भक्ताचें आचरण स्वतंत्र पण विप्युक्त होऊन

स्वस्वरूपसंपादनाचा अधिकार दुणावत जातो. ईश्वर आपल्यासारखाच कामक्रोधवश असतो, आपल्याप्रमाणेंच तो स्तुतिप्रिय असतो, ह्या आपल्या बावळ्या कल्पना त्याचें अनंतत्व पाहून विरून जातात आणि अनंतत्वसंपादनाची हौस उत्पन्न होऊन ज्ञानप्राप्ति व तद्योग्य कर्मोपसनेच्या सुदृढ नावा, नौका ह्यांचा आश्रय करून आपण अनंतस्वरूपाचे अंशभाक् होत जातो. असो; तेव्हां हें स्तोत्र महानास्तिकापासून तो अद्वैतसिद्धांताच्या परोक्षज्ञान्यापर्यंत जिवंत असणाऱ्या प्रत्येकानें प्रत्यहीं म्हणत राहून तत्प्रणीत आचरण शब्दशः व अर्थशः प्रकट करण्याचा प्रयत्न करावा, हें आतां येथें मला सांगावयाचें आहे. तसेंच ५४ श्लोकांत अवतीर्ण झालेला भगवंताचा अभिप्रायही सर्व सुधारक उद्धारकांनीं लक्ष्यांत ठेवावा. ‘अनन्यभक्तीनें मात्र ब्रह्मस्वरूप समजतें, साक्षात्कृत होतें आणि नंतर ज्ञानी भक्ताचा ब्रह्मस्वरूपांत तादात्म्यानें प्रवेश होतो. श्लोक ५५ हाही सर्व मनुष्यांस अखिल कर्तव्याचें सार सांगणारा आहे. एवंच हें विश्वरूपदर्शन अनेक दृष्टींनीं अभ्यसनीय आहे.

याप्रमाणें मी आतां ‘ज्ञानविज्ञान सांगतों, म्हणून सातव्या अध्यायांत सांगितलें, त्याचा उलगडा झाला. ब्रह्मांचें निर्गुण पण सर्वव्यापी व सर्वांतर्यामी स्वरूप सातव्यांत, तारक स्वरूप आठव्यांत, पुनः ब्रह्मस्वरूप नवव्यांत आणि सगुणस्वरूप व विभूतिस्वरूप दहाव्यांत सांगून ब्रह्म हें नित्य, अव्यय, निर्विकार, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वसाक्षी, अजरामर आहे, असें प्रतिपादून आत्मस्वरूप व ब्रह्मस्वरूप एकच आहे असें ध्वनित केलें. त्याचप्रमाणें विज्ञान प्राप्त होण्यासाठीं ज्ञानी भक्तांस योग्य अशी निर्गुणोपासना सातव्यांत, ॐकाररूपी सगुणोपासना आठव्यांत, ज्ञानोपासना नवव्यांत, सगुणमूर्त्युपासना दहाव्यांत व विश्वरूप दाखवून सर्व ब्रह्ममय आहे अशा सिद्धीनें व साक्षात्कारानें अखंडोपासना अकराव्यांत सांगितली. याप्रमाणें ज्ञानी, जिज्ञासु आर्त व अर्थार्थी असे परमेश्वरभक्त सांगितलें त्यांच्यासाठीं परापराभक्तीचे मार्ग सांगितलें. पराभक्तीनें मोक्षमार्ग सुकर होतो; अथवा भक्तीनें-येथें भक्ति थांबेल तर-अपराभक्तिमार्गांच्या पलीकडे भक्ति गेली नाहीं तर-पुनरावर्तन होतें; असें सांगितलें. विषयोपासनाच केली तर विषयत्वच प्राप्त होतें हेंही स्पष्ट केलें.

१७ **बाराव्या अध्यायाच्या** उपसंहारांत त्या अध्यायांतील विषयांचें विवेचन केलें आहे. येथें अभ्यासी पुरुषास इतकेंच सुचावयाचें कीं त्यानें प्रथम सगुणस्वरूपाची ऐकांतिक भक्ति करण्याचा संकल्प करून हा अध्याय वाचावा. कर्म करून त्याला नैष्कर्म्यस्वरूप यावयाचें हा जसा भगवन्मान्य कर्मयोग आहे, त्याचप्रमाणें सगुणोपासना करून निर्गुणाचें आराधन सिद्ध करावयाचें व आपल्यास भगवन्मान्यता संपादावयाची हा भक्तियोग होय. जीवाला शुद्ध कर्मशून्यता अशक्य तशी सामान्य जीवाला निर्गुणोपासनाही प्रायः अशक्य, निदान दुःशक्य आहे. येथील ५ व ६ श्लोक ध्यानांत ठेऊन

सर्वज्ञ परमेश्वराच्या प्रेरणनें परमेश्वरप्रेमाप्रीत्यर्थ केलेलीं कर्तव्यकर्में परमेश्वरी इच्छेनेंच आपल्या हातून होत आहेत असें परमेश्वरीध्यानानें मानून सतत जर परमेश्वरानुचिंतन जिवंत ठेविलें, तर योग्यकाळीं परमेश्वरी साक्षात्कार होऊन आपल्याला निर्गुणस्वरूपाचा अनुभव येईल व आपण मुक्त होऊं. तेव्हां सर्व संकल्पविकल्प परमेश्वरास द्यावे, निश्चयवृत्ति परमेश्वरास समर्पण करावी आणि आपण तटस्थ अशा ध्यानवृत्तींत राहावें अशा पद्धतीनें आपलें ध्यान अखंड चालेल तर प्रसंगोपात् प्राप्त होणारीं तात्कालिक अथवा भविष्यत्कालीन विध्युक्त कर्तव्यकर्में करण्याचें व विश्वज्ञान व आत्मज्ञानसंपादनाचें उत्कृष्ट सामर्थ्य जीवाला प्राप्त होऊन तो परमेश्वरालामुद्धां आपलासा करील; मग विश्वहित राष्ट्रहित, समाजहित, कुटुंबहित यांची गोष्ट कशाला पाहिजे ? असो ध्यान साध्य झालेलें नसेल तर अभ्यास, त्याच्या अभावीं ईश्वरविहित कर्माचरण व हेंही साध्य झालें नसेल तर कर्मफलें परमेश्वरास समर्पण करावयाचीं, हें तरी संसारांत वैतागून गेलेल्या ज्ञानी व जिज्ञासु पुरुषास साध्य आहे. कर्मफल ईश्वरास समर्पण करूं लागलें म्हणजे सुखदुःखाचा आवेग कमी होत जाऊन तो शून्यवत् होतो व पुढें विहित कर्में करण्याची व अविहित कर्मापासून परावृत्त होण्याची बुद्धि सहजच होते. विहित कर्माचरण निष्कामत्वानें होत चाललें म्हणजे 'मी कर्ता' हा अभिमान व 'मी भोक्ता' ही वासना मृतप्राय होऊन ज्ञानाकडे चित्तवृत्ति वळते. ह्या चित्तवृत्तीचें पुनरावर्तन म्हणजे अभ्यास होय. विश्वरूपबुद्धीचा व आत्मरूप बुद्धीचा ज्ञानदाता जो ज्ञानरूप परमेश्वर व आपला आत्मा इकडे आपली चित्तवृत्ति इंद्रियगणासकट वळली, प्रत्यग्वृत्ति झाली म्हणजे आपली प्रवृत्ति आत्मस्वरूपाची, सगुणस्वरूपाची, ब्रह्मस्वरूपाची चिंतनिका करण्यांतच दंग होईल. हेंच ध्यान होय. हें ध्यान साध्य झालें म्हणजे सगुणस्वरूप, पुढें आत्मस्वरूप व निर्गुणब्रह्मस्वरूप आत्मप्रत्यक्ष होऊन सच्चिदानंदकंद जें ब्रह्म किंवा मुक्ति किंवा आनंत्य त्याची अवाप्ति होते. १२ व्या श्लोकांत हाच अर्थ स्पष्टस्वरूपानें सांगितला आहे. पुढें १३–२० श्लोकांत पराभक्तीचें व भक्ताचें महात्म्य अनेक स्वरूपांनीं सांगून ज्ञानी भक्त म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरच असें सिद्ध केलें व ही 'तत्' स्वरूपी द्वितीय षडध्यायावली परिसमाप्त केली.

पहिल्या षडध्यायींत आत्मा=नित्य, शाश्वत, अनादि, अजरामर, सर्वज्ञ, सर्वव्यापी, कार्यकारणातीत, इंद्रियागोचर इत्यादि होय हें आत्मप्रत्यक्षत्वानें सिद्ध केलें.

दुसऱ्या षडध्यायींत ब्रह्म=नित्य, शाश्वत, अनादि, अजरामर, सर्वज्ञ, सर्वव्यापी, कार्यकारणातीत, इंद्रियागोचर इत्यादि श्रुति–युक्ति–अनुभवद्वारां सिद्ध केलें.

पहिल्या षडध्यायींत मायावश जीव विहितकर्म ज्ञानपूर्वक करून मायातीत झाला म्हणजे स्वगुणानें प्रकाशतो, हें सांगितलें.

दुसऱ्या षडध्यायींत मायास्वामी परमेश्वर अनन्यभक्तीनें ध्यायिला असतां तो भक्तांस परब्रह्माप्रत नेतो असें कथिलें.

१८ तिसऱ्या षडध्यायींत आत्मा म्हणजेच ब्रह्म हें श्रुतियुक्ति-अनुभवानें ठरवून एकवाक्यता सिद्ध करावयाची आणि दृश्य प्रकृतीचीं व स्वरूपाचीं लक्षणें सांगून उभयतांचें वैलक्षण्य दाखवावयाचें. शेवटीं बुद्धयादि ज्ञेय प्रकृति मिथ्या व तत्त्वज्ञेय अथवा तत्त्वानुभव्य ब्रह्म सत्य असें ठरवून सर्व तत्त्वज्ञानविज्ञानाचा उपसंहार करावयाचा. हे विषय येथें आहेत.

१९ **ब्रह्म=क्षेत्रज्ञ=आत्मा, हें तेराव्याच्या दुसऱ्या श्लोकांत सांगितलें** व दुसऱ्या अध्यायांत जें आत्मस्वरूप सांगितलें तेंच या अध्यायांत सगुणनिर्गुणस्वरूपानें १२–१७ श्लोकांत सांगितलें. आत्मस्वरूपप्राप्तीला जीं निवृत्तिमूलक कर्मसाधनें ३–६ अध्यायांत सांगितलीं, तींच अपरपर्याय शब्दांनीं ७–११ श्लोकांत उल्लेखिलीं आहेत, म्हणजे येथेंच एकवाक्यता सिद्ध झाली. हीच एकवाक्यता पुनः २२, २३, २४, २५ व २७–३४ श्लोकांत सदृष्टांत व सलक्षण केली आहे. दृश्य सृष्टींत म्हणजे व्यवहारदर्शेंत ( Phenomenal World ) प्रकृति व पुरुष हीं नित्य आहेत, इत्यादि विषयाचा विस्तार या अध्यायाच्या उपसंहारांत केला आहे. येथें इतकेंच सांगायाचें कीं, जीवाचें विषयभोगकर्तृत्व हें प्रकृतितंत्रानें चालत असून प्राप्त झालेले विषयांपासून सुखदुःख अनुभवावयाचें किंवा नाहीं तें व स्वस्वरूपाकडे जातांना निष्कर्मी कर्म करावयाचें हें मात्र जीवाच्या स्वाधीन आहे. सुखदुःखात्मक सृष्टि जीवकृत व गुणत्रयान्वित प्रकृति ईशनिर्मित आहेत. अतएव म्हणजे सुखदुःखांची **मानीव** जीवतंत्र आहे म्हणून, व प्रकृतीच्या राज्यांत राहून व तिला तिच्याच नियमांनीं वळणीला आणून आपण स्वतः स्वस्वरूपाकडे जावयाचें हें सामर्थ्यही जीवतंत्र आहे, म्हणून तो स्वतंत्र आहे. पण हें स्वातंत्र्य परमेश्वरी आहे व हें जसें असें अधिकाधिक मिळत जातें, तसतसा जीव ईश्वरस्वरूपाजवळ जातो. **ज्ञानानें प्रकृति व तिचे विकार वश होतात; पण प्रकृति अज्ञानाला वश करिते!** असो; तेव्हां विश्वगत गोष्टींचें सामान्य ज्ञान म्हणजे शास्त्रें जितकीं जास्त होतील, तितकी आपली (व्यक्तीची व सामाजिक) आयुष्ययात्रा सुकर व सुखकर होऊन ईशचिंतनाला व आत्मस्वरूपध्यानाला या लोकांच पुष्कळ अवसर सांपडेल आणि भीतीच्या व मत्सराच्या ऐवजीं सुखाचें व प्रेमाचें रामराज्य सुरू होईल. म्हणून आपण आर्यलोकांनीं घोकंपट्टी व आंधळा विश्वास यांस रजा देऊन ज्ञानाची आराधना करण्याला आरंभ करावा. आज तीन हजार, चार हजार वर्षें आपण आपल्या बुद्धीस विश्रांति दिली इतकी पुष्कळच झाली; नव्हे! फाजील झाली. यामुळें बुद्धीला हल्लीं स्वार्थी उपभोगाचें नीच वळण लागलें आहे; तें फारच घातुक आहे. पण बुद्धीला ज्ञानाकडे वळविण्याचा प्रसंग हल्लींच्या सर्वतोपरी दारिद्र्यानें खासा आणिला आहे! ह्या कशाचा परिणाम याची 'भवति न भवति' करण्याचें हें स्थळ नव्हे. 'आपण स्वार्थत्याग करून ज्ञानाच्या मागें लागूं या' इतकाच निश्चय करण्याचें व त्याप्रमाणें वागण्याचें आपलें काम आहे. मोक्ष हवा असला, स्वस्वरूप पाहिजे असलें तर हा ज्ञानमार्ग घ्यावा आणि ७–११ मध्यें जीं साधनें सांगितलीं आहेत, त्याचा अवलंब करून निष्कामकर्माच्या, भक्तीच्या व ज्ञानाच्या स्वरूपाकडे जाण्याचा प्रयत्न करावा.

प्रयत्न करणें आपलें काम आहे. फलदाता हरी आहे! **हाच क्षेत्रक्षेत्रज्ञ योग आहे.** क्षेत्र=अचित्=जड=प्रकृति=क्षेत्रज्ञ=चित्=ज्ञान=आत्मा असा अर्थ आहे, म्हणून या अध्यायास क्षेत्रक्षेत्रज्ञयोग असें नांव दिलें.

२० **चवदाव्या अध्यायांत प्रकृतिगुणाची मीमांसा केली आहे.** या अध्यायांतील तिसऱ्या व चवथ्या श्लोकाचें विवरण करितांना 'महद्ब्रह्म' याचा अर्थ 'व्यक्तप्रकृति' असा आचार्यसंमत अर्थ न करितां दुसराच अर्थ मी सुचविला होता, तो चुकला आहे. महाप्रलयकाल संपून प्रकृति विसृष्ट होण्याचा समय येऊन ठेपला म्हणजे परमात्मा, ज्ञानरूप-परमात्मा-**ज्ञानी** होतो व आपलें ज्ञान प्रकट करितो; आणि याच वेळीं अव्यक्त प्रकृतीला व्यक्तत्व येतें. पण ही प्रकृति परमात्म्यास मात्र व्यक्त असते, नंतर तिच्यावर ज्ञानकिरणांचा वर्षाव होऊं लागतो. अपार-दर्शक जड प्रकृतीवर हा सारखा वर्षाव सुरू झाला म्हणजे प्रकृतीची साम्यावस्था बिघडून जाते व तिचें गुणत्रय विस्फुटित होतें. तामस, राजस व सात्त्विक असे गुण याच क्रमानें बाहेर पडूं लागतात. पण याच वेळीं सनकसनंदासारखे, नारदासारखे, कश्यपासारखे, मनुसारखे पूर्ण सृष्टींतील पूर्ण ज्ञानी पुरुष अवतीर्ण होऊन-यांचीं शरीरें पूर्ण सात्त्विक असून प्रकृतिही यांच्याच स्वाधीन असते-ते लोकसंग्रहार्थ शास्त्रनियम व कर्मयोगनियम प्रकट करितात. हेच आमचे वेदद्रष्टे होत. असो; गुणत्रय प्रकट झाले म्हणजे सृष्टीला आरंभ होतो व त्या त्या सृष्टीला अनुरूप अशी जीवसृष्टि पूर्वसंचितकर्मानुसार अस्तित्वांत येते. ज्ञानाचा वर्षाव होत असतो, तदनुसार तामसी जीव, राजसी जीव व सात्त्विक जीव निर्माण होऊन पुनः हे जीव श्रेष्ठ, श्रेष्ठतर योनींत प्रवेश करितात. या सृष्टींत मनुष्याचा प्रवेश होऊन आमच्या आर्यमताप्रमाणें निदान ३८ लक्ष वर्षें झालीं. आधुनिक भूगर्भशास्त्रही अशाच प्रकारचा काळ मनुष्यजातीला देत आहे! आतां, पहिल्यांदा जी मनुष्यजाति अवतीर्ण झाली व सध्यां विद्यमान आहे, यांत पुष्कळच फरक झाला आहे; म्हणूनच मनुष्यत्व स्थापन होऊन वरील इतकीं वर्षें निदान झालींच पाहिजेत. पहा कीं, २५०० वर्षांचा जुना ग्रीशियन (ग्रीशियन घेण्याचें कारण त्यांचा इतिहास प्रामाणिक आहे, असें आधुनिकांस वाटतें!) व हल्लींचा आर्य घेतला, तर उभयतांच्या शरीरस्वरूपांत फारच थोडा फरक झाला आहे, हें दिसून येईल. अतएव युरोपियन मताप्रमाणें माकडापासून किंवा आमच्या मतानुसार घोड्यानंतर अवतीर्ण झालेल्या मनुष्यांचें जें प्रथम स्वरूप असेल, त्याचें हल्लींचे शारीरिक स्वरूपांत पर्यवसान होण्याला वरील कालही अल्पच आहे, असें वाटूं लागतें. असो.

या अध्यायांतील मुख्य विषय जो गुणत्रयविभाग, याचा विस्तार या अध्यायाच्या उपसंहारांत केलाच आहे. येथें इतकीच सूचना करावयाची कीं, या गुणत्रयाचा नाश ज्ञानानें व विज्ञानानें म्हणजे तात्त्विक ज्ञानविज्ञानानें (Philosophy, Theoretical and Practical) होतो. प्रकृतीशीं निःसंग होऊन ज्ञानाशीं संग ठेविला म्हणजे

जीवाचें ज्ञानरूप प्रकट होतें—आत्मरूप—ब्रह्मरूप—प्रकट होतें. सारांश, सात्त्विक व सात्त्विकाचा मात्र आश्रय धरून राहणारा राजसगुण हे उभयतां जोरवंत झाले तरी कार्य होत नाहीं. सात्त्विकांत सुद्धां जो ज्ञानसुखाचा संग होतो, तोही निवारण करून गुणातीत **झालें पाहिजे.** गुणतंत्र आपण आहों तें **गुणस्वामी होऊन स्वतंत्र झालें पाहिजे;** कारण स्वतंत्रता हीच आपली मूळ स्थिति आहे, आतांही तीच स्थिति आहे, पण तिचें भान, तिचा अनुभव आपल्यास नाहीं. यासाठीं आपल्यास सर्व प्रकारचें ज्ञानार्जन अत्यंत अवश्य आहे; तसेंच अज्ञानानें आपल्या आत्मस्वरूपी आदर्शावर जो विषयांचा गंज चढलेला आहे, तो काढून टाकण्यास आपल्याला श्रुतिविहित कर्म केलेंच पाहिजे. गुणत्रय जें विषयाकडे लागलेलें आहे, त्याच्या ढाला परमेश्वराकडे, ज्ञानरूपाकडे वळविल्या, विषयशत्रूंशीं लढतांना आपण आपल्या ज्ञानबाणेंवें तोंड लावलें म्हणजे ज्ञानाचा गड सर करण्याला कोणताच अडथळा राहत नाहीं. असो; येथील गुणत्रयातीत पुरुषांचीं लक्षणें, बाराव्या अध्यायांतील भक्तांचीं लक्षणें व दुसऱ्या अध्यायांतील स्थितप्रज्ञाचीं लक्षणें हीं तुकवून पाहिलीं असतां सात्त्विक व सत्त्वातीत ज्ञानाचे, सात्त्विक व सत्त्वातीत भक्तीचें आणि सात्त्विक व सत्त्वातीत कर्माचें, सारांश ज्ञान, भक्ति व कर्म या साधनांचें पर्यवसान एकच आहे, असें गीताभक्तांच्या लक्ष्यांत सहज येईल. चवदाव्या अध्यायांतील शेवटचा श्लोक सगुणब्रह्मपर-परमेश्वरपर-आहे व तोच परमेश्वर जीवाला अव्यय अमृतत्व, शाश्वत धर्म आणि पराकाष्ठेचें सुख देणारा आहे. गुणगुणांच्यापलीकडे जें ब्रह्म आहे, तें ब्रह्म, गुणातीत जें निर्गुण आत्मस्वरूप, त्यानें ओळखून अनुभवावयाचें आहे अथवा **अनुभवून ओळखावयाचें आहे;** आणि हेंच सांगण्यासाठीं येथें व १७ व्या अध्यायांत गुणत्रयाचा विस्तार केला आहे.

२१ **पंधरावा अध्याय पुरुषोत्तमस्वरूपाचें वर्णनपर आहे.** गुणत्रयातीत झाल्यानंतर प्राप्त होणारा जो पुरुषोत्तम त्याचें स्वरूप यांत निर्देशिलें आहे. गुणातीत संसार हा विलक्षण स्वरूपाचा, नित्य, अनाद्यनंत व बुद्धीला अगोचर आहे खराच; पण ज्ञानानें, निष्कामकर्मानें व ऐकांतिक उपासनेनें संसारशृंखला तोडून टाकिली तर संसाराच्या विलक्षणत्वाला, नित्यत्वाला, अगोचरत्वाला व अनाद्यनंतत्वाला लाथ मारून ज्ञानविज्ञानसंपन्न जीवाला परमात्मस्वरूपाकडे जातां येते, त्याला केव्हांही अनंतत्व मिळतें. कारण तो मूलतः ब्रह्मस्वरूपी आहे. हें वाक्य भगवद्भक्तांनीं नित्यशः लक्षांत ठेवण्याजोगें आहे. जीव हा स्वरूपतः ब्रह्मच आहे. त्याला भ्रांति झालीशी वाटून तो या परिभ्रामक संसारांत शिरला आहे. 'मी संसारांत शिरलों' अशी त्याला भ्रांति होऊन तो प्रकृतीशीं तिच्या गुणांमुळें रत झाला व जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडला. हा कां सांपडला किंवा सांपडलासा कां दिसतो, याचें विवेचन उपसंहारांत अन्यत्र केलें आहे. असो; ११ वा श्लोक काळजीपूर्वक अवलोकिला असतां असें स्पष्ट दिसेल कीं, भगवंतांच्या मनांत केवलाद्वैतच सत्य आहे, असें सांगावयाचें आहे. केवलाद्वैत हाच नित्य सिद्धांत आहे, असें

'*अभ्यासी योगी याला* (ब्रह्मांशाला, जीवाला) आत्मस्वरूपांत राहिलेला पाहतात,' या वचनावरून स्पष्ट दिसतें. याचा दुसरा अंतर्गत अर्थ-गुणातीतत्व प्राप्त झालें आहे असें गृहीत धरलें म्हणजे-असाच होतो कीं, जीवाला एकरसात्मक आत्मस्वरूपाशीं तादात्म्यानें पाहणारे ते योगी होत. पुढें १२-१५ श्लोकांत ब्रह्मस्वरूपाचीं लक्षणें दिलीं आहेत त्यावरूनही केवलाद्वैताचा मात्र बोध होणें शक्य आहे. हें ब्रह्म क्षराक्षरातीत असून पुनः सर्वव्यापी आहे. या ब्रह्माचें प्रकटस्वरूप तो सगुण परमेश्वर 'पुरुषोत्तम' होय. विश्वसृष्टिस्थितिलयादि व्यापार सुरळित चालावे आणि जीवाचा उद्धार व्हावा एतदर्थच हें सगुणस्वरूप प्रकट होत असतें. ह्या स्वरूपाच्या आश्रयानें ज्ञानप्राप्ति होते आणि भवसागर म्हणजे अज्ञानसमुद्र ओलांडितां येतो. सारांश अव्यक्त आणि व्यक्त प्रकृतीचें गुणज्ञान करून घेऊन निःसंगपणानें आपण स्वरूपज्ञानात्मक सामर्थ्याच्या जोरावर परब्रह्माचें, पुरुषोत्तमस्वरूपद्वारा आराधन केलें तर 'अस्तिभातिप्रियता' हें जें प्रकृतिविलक्षण ब्रह्मस्वरूप याचें ज्ञान होऊन व 'नामरूप' हे मिथ्या, अपूर्ण आहे, असें समजून दृश्य विश्वाविषयीं व्यावहारिक अनासक्त व निष्काम आदर पण **पारमार्थिक अनादर** उत्पन्न होईल. हें परोक्षज्ञान होय. या ज्ञानाच्या द्वारानें अन्वयपद्धतीला धरून आपल्या विश्वसृष्टीचें अवलोकन केलें तर 'नामरूप' मावळून जातें व सर्वत्र अस्तिभातिप्रियता अथवा सच्चिदानंदत्व प्रकट होतें. हेंच अद्वैत होय.

२२ **सोळाव्या अध्यायांत विमोक्षाला नेणाऱ्या दैवीसंपत्तीचें व बंध करणाऱ्या आसुरीसंपत्तीचें वर्णन आहे.** याचा विशेष विचार विशिष्ट उपसंहारांत केलाच आहे. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, ब्रह्मज्ञानविज्ञानानें प्राप्त झालेलें (१) अभय म्हणजे (अभयं वै जनक प्राप्तोऽसि), (अ), कर्मोपासनेनें झालेली चित्तशुद्धि, (आ) सांख्य (Theoretical Philosophy) आणि (इ) योग (Practical Philosophy) याचें समीकरण शास्त्रीय पद्धतीनें झालें आहे अशी अवस्था; चित्तशुद्धि सांख्य व योग, यांनीं अभय उत्पन्न होतें. हें तीन गुण अनुक्रमें अपरोक्षज्ञानी, जीवन्मुक्त आणि परोक्षज्ञानी या पुरुषामध्यें वास्तव्य करितात. पुढचे (२) दानदमादि अपैशून्यापर्यंतचे गुण सात्त्विक ब्राह्मणामध्यें असतात. येथें निर्दिष्ट केलेले गुण जेथें दृष्टीस पडतात, तोच वेदोक्त ब्राह्मण होय. या वर्णांत उत्पन्न होऊन एवंगुणविशिष्ट ब्राह्मण विहित कर्मयोग संपादून व संपादवून ज्ञानमार्गाचा विस्तार करणारा होतो. पुढील (३) दयादिधृत्यंतापर्यंतचे गुण सात्त्विक, वेदोक्त क्षत्रियामध्यें प्रकट होतात. ब्राह्मणामध्यें क्षत्रियांचे गुण असून पुनः दानदमादि सद्गुण असतात. क्षत्रियामध्यें दानदमादि गुण बीजरूपानें असावयाचेच; मात्र दयादि गुण उद्भूत झालेले असावे असा विश्वनियमहेतु दिसतो. (४) वैश्यामध्यें शौच आणि अद्रोह हे गुण असतील तर स्ववर्णविहित कर्म शास्त्रोक्त रीतीनें करण्याला तो समर्थ होतो. हे वैश्यवर्णाचे गुण त्यास प्राप्त झाले व तो आपलीं कर्में व कर्मफलें परमेश्वराला समर्पण करूं लागला म्हणजे क्षत्रिय वर्गाचे अभि-

कार प्राप्त करून घेण्याची योग्यता त्याला प्राप्त होते. (५) असो; 'नातिमानिता, विनयशीलता' हा गुण सात्त्विक शूद्राला अवश्य आहे. हा गुण संपादून त्यानें स्वसेवावृत्ति शास्त्रोक्त पद्धतीनें चालविली म्हणजे तो वरच्या वर्णांत जाण्याला योग्य होतो. असो; तेव्हां विनय हा प्रथम संपादन करितां येण्यासारखा गुण सर्वांनीं आदर करण्याला योग्य आहे. येथून उत्क्रांति सुरू होऊन ती अभयापर्यंत जाते आणि सर्व दैवीसंपत्तीचे गुण स्वाधीन होऊन आपण कृतकार्य होतों. आपण कितीही पापकर्में करीत असलों, आपलें पूर्वसंचित कितीही राक्षसी असलें तरी, जर आपल्याला कांहीं पूर्वपुण्याईनें, समाजसंस्कारानें, आनुवंशिक संस्कृतीनें किंवा येथील तापत्रयाचा तिरस्कार येऊन उत्पन्न झालेल्या मर्दानी पण वैराग्यप्रेरित मुमुक्षेनें भगवत्पदाकडे, ज्ञानमार्गाकडे जाण्याची प्रेरणा झाली, तर येथें सांगितलेले गुण क्रमशः संपादन करण्याचें सामर्थ्य जीवाला आहे हेंच 'न मे भक्तः प्रणश्यति' 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' भगवन्मत प्रकट करण्याचें दर्शक आहे. हा वर जाण्याचा, उन्नत होण्याचा, सांताकडून अनंताकडे, अपूर्णाकडून पूर्णाकडे जाण्याचा मार्ग व्यावहारिक (phenomenal) शास्त्रांनींही विहित आहे. बाकी आपण स्वरूपतः मुक्त, अनंत व पूर्णच आहोंत. केवळ मायेचा जो आभास झाल्यासारखा दिसत आहे, तो आभास नाहींसा करावयाचा आहे म्हणून वर व्यावहारिक शास्त्रें असें म्हटलें. कोणताही शास्त्रविचार व्यावहारिकच असावयाचा. एक तत्त्वज्ञान (philosophy) मात्र पारमार्थिक असतें. असो; ८-१२ मध्यें सर्वस्वी नास्तिक लोकांचा विचार केला आहे. हे लोक म्हणजे निव्वळ स्वार्थसाधु लोक होत. ह्यांची विषयेच्छा हाच यांचा पुरुषार्थ आणि ती साध्य करून देणारे मार्ग हा यांचीं साधनें होत. हे लोक नीतिविघातक, समाजविध्वंसक, शास्त्रविभंजक आणि आत्मवंचक राक्षसच होत. पूर्णज्ञानी जसे दैवीसंपत्तींतील मुकुटमणी, तसे हे आसुरी संपत्तीचे कंठमणी होत! १३ श्लोकांत आसुरी ब्राह्मण, १४ व्यांत आसुरी क्षत्रिय, १५ व्यांत आसुरी वैश्य आणि १६ व्यांत आसुरी शूद्र यांचें वर्णन आहे. सारांश प्लेटोनें ज्याप्रमाणें समाजांतील शिष्ट लोकांचें विभाजन केलें, त्याचप्रमाणें आमच्या येथें दैवीसंपत्तीच्या सज्जनांचें वर्गीकरण झालें आणि तिकडे जसे कामचारी लोकांचें गुणवर्णन आहे, तसेंच किंबहुना त्यापेक्षां जास्त हुबेहुब, आमच्या राक्षसी वर्णाचें वर्णन भगवंतांनीं केलें आहे. पुनः, १७, १८ मध्यें यांच्याच गुणांचें विशेष स्पष्टीकरण करणारीं चिन्हें सांगितलीं; आणि स्वपरविघातक कामचारी लोकांची अंतीं काय स्थिति होते हेंही स्पष्ट केलें. मुख्यतः कामानें ब्राह्मण, क्रोधानें क्षत्रिय आणि मोहानें वैश्य नष्ट होतो, हें आपण सर्वांनीं ध्यानांत ठेविलें पाहिजे. हीं तिन्ही नरकाचीं द्वारें आहेत. हीं बंद झालीं म्हणजे नरकभीति सुटली असें समजावें. जीवानें कामाच्या, असंस्कृत इच्छेच्या स्वाधीन होऊं नये म्हणून परमेश्वराच्या सदयप्रेरणेनें सांख्य व योग शास्त्रांची उत्पत्ति झाली आहे. हीं शास्त्रें सार्थ व सप्रमाण रीतीनें समजून घ्यावीं व शास्त्रविध्यनुसार निष्कामकर्म करावें. सारांश इच्छेची विषयाकडे (विषयोप-

भोगासाठीं मात्र ज्ञानाकडे ) प्रवृत्ति आहे, तिचा ओघ भोगाकडून निवृत्त करून ज्ञानाकडे व **ज्ञानसंपादनाप्रीत्यर्थ मात्र भोगाकडे प्रवृत्त असावा.** पहिला ओघ आसुरी आहे व दुसरा दैवी आहे. पहिल्यानें असलेला बंध दृढ होतो; दुसरा बंधविमोचक होतो. विषयोपभोगानें तामसी पारतंत्र्य येतें; ज्ञानार्जनानें सात्त्विक स्वतंत्रता प्राप्त होते. म्हणून प्रत्येक जावानें ज्ञान मिळवून प्रामाणिक शास्त्रानुसार वागण्याचा निश्चय करावा. हा निश्चय स्वतःचे बंध तर तोडीलच; पण ज्ञान, तपश्चर्या आणि शास्त्रोक्त यज्ञकर्म चालू झालें तर कुटुंब, जाति, राष्ट्र व विश्व यांचाही उद्धार हा निश्चयतः करील. मात्र तुकोबा महाराज म्हणतात त्याप्रमाणें ' कामक्रोध मीठ मिरचि । यांची घेऊं नये रुची ' असें पथ्य विठ्ठलमात्रा घेणारानें चालविलें पाहिजे.

२३ आतां **शास्त्रविधीचें ज्यांस साकल्यानें ज्ञान झालें नाहीं, त्यांच्या निष्ठेचें वर्गीकरण सतराव्या अध्यायांत केलें आहे.** हा वेळपर्यंत ज्ञानपूर्वक श्रद्धेचें, योग्यमार्गानें ज्ञानोपदेश झाल्यानंतर प्राप्त होणाऱ्या श्रद्धेचें,•उद्घाटन झालें. आतां साहजिक श्रद्धेचा विचार करावयाचा. साहजिक श्रद्धा ही जन्माबरोबरच पूर्वसंचितानुरूप प्राप्त होतें, व पूर्वसंचितानुरूप ती सात्त्विक, राजसी किंवा तामसी असते. श्रद्धेनुसारच त्याचें, म्हणजे असंस्कृत जीवाचें तप, यज्ञ, आहारविहार, दान इत्यादि व्यवहार असतात. सात्त्विक **ब्राह्मण** देवाप्रीत्यर्थ **यज्ञ**, आयुष्यबलादिप्रीत्यर्थ **आहार**, देवप्रसादक, समाजप्रसादक आणि मनःप्रसादक निष्काम **तपत्रितय** आणि दीनजनसंतापहारक **दान** करितात. **राजस** लोक यक्षराक्षसाप्रीत्यर्थ **यज्ञ**, आयुष्यहारक **आहार**, दंभाप्रीत्यर्थ **तप** आणि स्वोपकारासाठीं **दान** करितात आणि **तामसी लोक** भूतपिशाचें प्रसन्न करण्यासाठी **यज्ञ**, आयुष्यविघातक **आहार**, विश्वपीडेसाठीं **तप** आणि स्वपरोपकारासाठीं **दान** करितात. श्रद्धा जन्मतः प्राप्त होते. हिला बरोबर रीतीनें अजमावून ज्ञानसंस्कारांनीं शास्त्रीय मार्गाकडे लाविली, ॐ तत्सत् या मंत्राचा विनियोग सार्थ केला ( म्हणजे सर्व सांख्य व सर्व योग शास्त्रांचें अध्ययन करून आपलीं विहित कर्में परमेश्वरस्वरूपी ॐकारास समर्पण करूं लागलों ) म्हणजे सर्व श्रद्धास्वभावांस व तत्वें सर्व ज्ञानांस ( शास्त्रांस ) व कर्मांस ( योगशास्त्रांस ) विहितत्व येतें व सांख्ययोगांची एकवाक्यता करणाऱ्या ब्रह्मज्ञानविज्ञानाचा परिचय व स्वानुभव येऊन जीव मुक्त होतो.

याप्रमाणें तेराव्या अध्यायांत प्रथम जीवात्मा-परमात्म्यांस एकरसत्व देणारें जें ब्रह्मस्वरूप त्याचें सगुण-निर्गुणतः निरूपण करून नंतर भगवंतांनीं या दृश्य विश्वांत ( The universe of phenomena ) स्पष्ट दिसणारीं जीं तीन तत्त्वें पुरुषोत्तम, पुरुष आणि प्रकृति (God man and nature) यांचा अवतार केला व व्यवहारकालीं ह्या तिन्ही वस्तु अनाद्यनंत आहेत व स्वरूपविकार प्रकृतिजन्य, व वृत्तिविकार पुरुषकृत, असें सांगून सर्वकर्ता, सर्वद्रष्टा इत्यादि गुणविशिष्ट परमेश्वर अविकार्य आहे, असें सांगितलें आणि २३ व्या श्लोकांत १४ व्या अध्यायाचें सूत्ररूपानें कथन करून २४ व्यांत १५ व्यांतील योग्यांचा,

व १६ ह्यांतील दैवीसंपत्तीच्या लोकांचा आणि २५ ह्यांत १७ ह्या अध्यायांतील सात्त्विक श्रद्धावंतांचा उल्लेख केला आहे. पुनः सव्वीसाव्या श्लोकांत भूतमात्र क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगानें निर्माण होतें, भूतांचें स्वरूप प्रकृतिज, तत्स्वरूपज्ञान पुरुषज आणि स्वरूप व स्वरूपज्ञान हीं दोन्ही परमेश्वरकृत असतात, असे सामान्य सिद्धांत सांगून पुढें अध्यायसमाप्तिपर्यंत ज्ञानी पुरुषाचे ज्ञानाची व कर्माची स्थिति संक्षेपतः वर्णिली आहे. नंतर चवदाव्या अध्यायांत प्रथम उत्पत्ति प्रकार सांगून नंतर त्रिगुणमीमांसा केली आणि शेवटीं गुणमय प्रकृतीचें गुणज्ञान करून घेऊन तिच्या म्हणजे गुणमय प्रकृतीच्या पलीकडे गेलेल्या ज्ञान्याचें गुणनिदर्शन केलें आहे. पंधराव्यांत संसाराचें विचित्रत्व, जीवाचें ईश्वरत्व व सोपाधिकत्व (परंतु चिरंजीवित्व) आणि पुरुषोत्तमाचें अक्षरत्व, पुरुषातीतत्व, सर्वसाक्षित्व, सर्वव्यापकत्व व सर्वकर्तृत्व वर्णिलें आहे. सोळाव्यांत दैवीसंपत्ति व आसुरीसंपत्ति यांचे गुणधर्म अनुक्रमें सांगून शास्त्रज्ञानाची महति उल्लेखिली आहे. आणि सतराव्यामध्यें सहजन्य जी श्रद्धा व तिच्या यज्ञ, आहार, तप, दान इत्यादिकांमधील गुणसंवलित विकृति यांचा विस्तार केला आहे.

अठराव्यांतील पहिल्या ४८ श्लोकांत कर्मफलत्यागाची महति व त्यागस्वरूप, कारणमीमांसा, आत्म्याचें निष्कार्यत्व, ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति आणि सुख यांचें गुणपरत्वें स्वरूप, सांगून पुढें सर्व गीताशास्त्राच्या उपसंहारास सुरुवात केली आहे. तृतीय षडध्यायींतील विषयक्रम असा आहेः प्रकृति, जीव व शिव याचें पारमार्थिक ऐक्य, प्रकृतिस्वरूप, जीवस्वरूप ( संस्कृत व असंस्कृत ) आणि परमात्मस्वरूप इतके विषय येथें प्रामुख्यत्वानें आहेत. अर्थातच विकारवश प्रकृतीचा ( Physical and mental sciences ), विकारवश सोपाधिक जीवाचा ( Physical, mental and moral sciences ) आणि निर्विकार परमेश्वरी स्वरूपाचा ( Metaphysical sciences ) येथें उल्लेख होऊन शेवटीं सर्वांस एकमय, एकरस, करणारें तात्त्विकज्ञानविज्ञान ( Philosophy, theoretical and practical ) म्हणजे ब्रह्मज्ञानाचा उल्लेख येथें झाला. ज्ञानमार्गांतील भूत, वर्तमान व भावी तत्त्वज्ञांच्या शक्य कल्पनांचाही विचार येथें झाला आहे. आणि रहस्य हें काढलें आहे कीं, पारमार्थिकतः सर्व 'एकच एक आहे' व दृश्यांतही बाह्यतः जरी द्वैताभास होतो तथापि अंतर्यामीं एकच तत्त्व 'सच्चिदानंदस्वरूपानें' विराजमान होत आहे. तेव्हां जीवाचें कर्तव्य हें आहे कीं, शास्त्राभ्यासानें स्वस्वरूप व विश्वस्वरूप प्रयोगशः, अनुमानशः, इत्यादि अनेक वर्तमान व भावी पद्धतिद्वारा-स्वस्वरूप व विश्वस्वरूप आणि परमेश्वरस्वरूप-समजून घ्यावें आणि निष्कामत्वानें व निरभिमानानें प्राप्त कर्तव्य आनंदानें व कर्तव्य म्हणून करीत रहावें. एकूनएक आभासिक उपाधि सुटून स्वस्वरूपाकडे जाण्याची जी त्याची सदैव इच्छा असते व तदनुसार तो स्वज्ञानाच्या मगदुराप्रमाणें वागतही असतो ( मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ) ती इच्छा व तें तें कर्म फलद्रूप म्हणजे नष्ट करून टाकावयाचीं असतील, तर त्यानें अद्वैतशास्त्रप्रणीत मार्गाचाच

अवलंबन केला पाहिजे. हें अवलंबन म्हणजे सामाजिक व्यवहाराची नीति, राजकीय व्यवहारांची राजनिष्ठा, ईश्वरदर्शक धर्म आणि स्वस्वरूप व विश्वस्वरूप समजून देणारें ज्ञान होय.

२३ अठरा अध्यायांचे उपसंहार पुढें येणारच आहेत, म्हणून त्यांविषयीं फारसें लिहिण्याचें कारणच नाहीं. आनंदानें स्वकर्मफलत्याग करणें हीच नीति व हाच ज्ञानसंपादनाचा मार्ग होय. खरोखरच पाहिलें असतां आपण कर्म करितों म्हणजे कर्म करण्याची इच्छा धरून आपल्या कर्मेंद्रियांवर हुकूम चालवितों. त्यांनीं कांहीं कारणांनीं (पक्षघात वगैरे झाला असतां) आपलें ऐकिलें नाहीं, म्हणजे आपलें कर्म इच्छामात्रच होतें. कर्माला जेव्हां शरीरादि कारणपंचक स्वानुकूल असेल तेव्हां आपल्या हातून कर्म होतें; तसेंच 'फल मिळावें,' हीही इच्छाच होय. पहिली इच्छा आपल्याबरोबरच जन्मास येते आणि दुसरी इच्छा अनुभवानें जागृत होते. पहिली इच्छा टाकून देणें प्रायः दुष्करच आहे. तिचा विपर्यैकओघ ज्ञानसाहाय्यानें बदलून त्याला परमात्मस्वरूपाकडे वळवितां येईल; पण तिचा समूळ नाश जीवन्मुक्तस्थिति झाल्याशिवाय होणार नाहीं. शिवाय, ज्ञानानें प्रकृतीला आपण वश करूं शकतों व आपलें संकल्पसत्यत्व ज्ञानसंपादनानें सार्थही होत जातें हें खरें, पण व्यवहारांत प्रकृतीचा सर्वथा अंत आपल्यास करितां येणार नाहीं. सुखदुःखाच्या इच्छेचा किंवा आशेचा प्रकार तसा नाहीं. तें सुखदुःख मानीव म्हणजे स्वस्वाधीन आहे. सुखदुःखांची मनोवृत्ति नष्ट करणें दुःसाध्य आहे, तरी असाध्य नाहीं. म्हणून शास्त्रानें सांगितलें आहे कीं, ज्ञानाचा आश्रय करून सुखदुःखाची इच्छा ही राक्षसी मारावी. ह्या राक्षसीचा प्रवेश बुद्धीपर्यंतच आहे. आत्मारामाला तिचा स्पर्श नाहीं; ह्मणून तिचा नाश करणें साध्य आहे. परोक्षज्ञान झालें ह्मणजे विषयजन्य सुखदुःखाची सत्ता संपते. इकडे अपरोक्षज्ञान झाल्याखेरीज प्रकृतीस आपल्या तंत्रानें वागविण्याची ज्ञानी पुरुषाची ही इच्छा नष्ट होत नाहीं; कारण ती सहजन्य आहे. कारणदेहाच्या पलीकडे आत्मस्वरूपांत मिसळून जेव्हां जीवच (परिच्छिन्नस्वरूप) नष्ट होईल, तेव्हां कर्मेच्छा संपेल. असो; पण सुखदुःखाची स्वार्थी इच्छा संपली ह्मणजे ज्ञानी पुरुषाच्या कर्मेच्छेची प्रवृत्ति परोपकारक होते आणि विश्वामध्यें प्रेमसंचय वाढवून कुटुंबसमाजादि जीवसंस्था संघटित करिते. 'कर्म टाकूं नका (कारण तें शक्यच नाहीं) पण कर्मफलाचा त्याग करा' हें जें भगवंतांचें वारंवार कळवळ्याचें सांगणें आहे, त्याचा उद्देश हाच कीं, समाजांत परोपकारव्रत वाढून स्वार्थी कर्माचा लोप व्हावा आणि ज्ञानमार्गाची पुष्टि व्हावी. सर्व सांख्ययोगशास्त्रांचा हाच हेतु आहे. येथें केवळ नीतीचाच उद्धार व्हावा, अशी इच्छा नाहीं: तर सर्व प्रकारचे ज्ञानांकडे व सर्व प्रकारच्या सामाजिक, राष्ट्रीय व धार्मिक व्यवहारांच्या उन्नतीकडे प्रत्येक ज्ञानी व अज्ञानी जीवाचें लक्ष्य लागावें, असा भगवद्धेतु आहे. इच्छा व श्रद्धा जशा सहजन्य आहेत, त्याचप्रमाणें ज्ञानादिही पूर्वसंचितानुसारच उत्पन्न होतात. ज्ञान, कर्तृत्व, बुद्धि इत्यादि मनोभाव उन्नत करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आपल्यास आहे हें अभ्यासूनें लक्ष्यांत ठेवावें. जीव स्वतः जर ज्ञानरूप व सुखरूप आहे, तर त्याचा व

जड प्रकृतीचा ( अचिताचा ) संयोग कसा झाला ? हा तात्त्विक प्रश्न आहे व मायेचें चक्र युरोपियन लोकांस समजलें नाहीं म्हणून त्यांस हा प्रश्न सोडवितांही आला नाहीं. अघटितघटनापटीयसी हें मायेचें स्वरूप आहे. आतां चिताचा ( Knowledge ) व अचिताचा संयोग झालासें आपल्यास व्यवहारांत मात्र वाटतें. बाकी वस्तुतः तो झालाच नाहीं व हा संयोग होण्याचा संभवही नाहीं. कारण ब्रह्मस्वरूप जर एकरसमय आहे, 'अस्ति तेंच भाति' असा जर आपल्यास प्रत्यक्ष अनुभव येत आहे, दोनच जर नाहीं तर संयोग होणार कोणाचा ? आपल्यास ( मायेंत असतों तोंपर्यंत ) मात्र संयोग झालासें वाटतें, हें आपलें अज्ञान आहे व हें मायिक अज्ञानच आपल्यास नाहीसें करावयाचे आहे. 'मी अज्ञानी, परिच्छिन्नज्ञानी, अपूर्ण ज्ञानी आहे' असें ज्या ज्ञानस्वरूपानें आपल्यास समजतें, तेंच आपलें स्वस्वरूप होय. हें स्वरूप नित्यजागृत आहे; स्वरूपसुखाची आठवण आहे, म्हणून तर विषयज्ञान पुरेसें होत नाहीं, व विषय-सुखाचा वीट येतो; आणि स्वात्मज्ञानाकडे व निजसुखाकडे होरपळलेला जीव धांवत सुटतो. तसेंच आपल्या ज्ञानस्वरूपाला मर्यादा नाहीं म्हणूनच जीवस्थितींत विषयज्ञान करून देणारीं इंद्रियादि साधनें सुसंस्कृत केलीं असतां वाटेल तो विषय (एक आत्मस्वरूपाखेरीज) ग्रहण करण्याचें सामर्थ्य आपल्यास असतें. आत्मस्वरूपाचें ज्ञान ( अनुभव ) आत्मसाक्षानेंच व्हावयाचें. येथें दुसऱ्याची किंवा दुसऱ्या साधनाची मातब्बरी नाहीं. 'हा तूं' म्हणून तें बोटानें फार दाखवितां येईल; पण अनुभव घेणें ज्याचें त्याकडेच आहे. असो; तेव्हां हें आपलें स्वरूप आपण पूर्ण अनुभविलें म्हणजे 'आपणत्व, मीपणा, परिच्छिन्नत्व,' विरून जाऊन एकच एक उरतें. मग येथें माध्ववाद, विशिष्टाद्वैतवाद, शुद्धाद्वैतवाद व ह्याचप्रमाणें इतर सर्व द्वैतीधर्मांचे वाद मावळून जातात. सर्व विषयजिज्ञासा, विषयसुखाशा, जरामरणादिकांची भीति ठार होऊन एकच अंतर्बाह्य अनंत (नामरूपातीत, अस्तिभातिप्रियतेच्या पलीकडे असून सर्व विश्वंभर असणारें ) ब्रह्मतत्त्व मात्र राहतें. विश्व गेलें, विश्व दाखविणारीं इंद्रियेंही मावळलीं, तेव्हां विचारी माया तरी कशी जगणार ? तिचाही सर्वकालीन अस्त होतो व जडजीवांच्या संयोगाचा प्रश्न आपलें प्रश्नत्व सोडून देतो ! तात्पर्य वस्तुतः जडजीवच नाहींत तर संयोगही नाहीं. संयोग दिसतो हा मायिक आहे. मायासंवलित जीवाचें जें अज्ञानगर्भ ज्ञान आहे, त्यानें हा संयोग दृश्यसा होतो. पुनः व्यावहारिक स्थितींत अहंकारापर्यंत सर्व अपराप्रकृति ( जड ) आहे, असें आमचें तत्त्वज्ञान म्हणतें म्हणूनही हा संयोग नाहीं; ब्रह्म एकस्वरूपच आहे. या जड स्वरूपांत परमेश्वरज्ञानगभस्तीचें किरण प्रवेश करूं लागले म्हणजे हालचालीस आरंभ होऊन बुद्धीपर्यंत त्या हालचालींची उत्क्रांति प्रसंगवशात् होत असते आणि मानवी बुद्धीचा उदय झाला म्हणजे त्यांतून नित्य जागृत असलेलें ब्रह्मस्वरूपी ज्ञानकिरण बाहेर पडूं लागून विषयज्ञानरूपानें ते प्रथम परत येतात; व पुढें संकल्पविचारादि स्वरूपें घेऊन, तेच आत्मज्ञान ग्रहण करण्याचे योग्यतेचे होतात. असो; तेव्हां इकडूनही संयोग आहे, असें म्हणण्यास जागा नाहीं. 'आतां मायाच कोठून आली' ह्या प्रश्नास उत्तर द्याव-

याचें, पण तें इतर ठिकाणीं दिलें आहे, म्हणून त्याची पुनरावृत्ति करीत नाहीं. येथील ४९ ते ६६ श्लोकांत म्हणजे १८ श्लोकांत १८ अध्यायांतील सर्व विषयाचा उपसंहार केला आहे. ज्ञाननिष्ठेला चित्त निर्मल, एकाग्र व स्वाधीन पाहिजे, विषयोपभोगवासना सोडून देऊन परमेश्वरी भक्तीनें विश्वंभराचें दृश्यस्वरूप ( जें जीव व जड यांनीं भरलेलें दिसतें ) व परमात्मस्वरूप यांचें ज्ञानविज्ञान करून घेतलें पाहिजे, आणि हें ज्ञानविज्ञान झाल्यावर परमेश्वराचें पराभक्तीनें आराधन करून ( याच्यापूर्वीच शोकमोहत्याग व सर्व-भूतीं समवृत्ति-संपादन यांस मिळविलें पाहिजे ) साक्षात्कार करून घेतला पाहिजे. हा साक्षात्कार झाला म्हणजे ५५ वे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मज्ञानविज्ञान् नामक मोक्ष मिळतो. परमेश्वराप्रीत्यर्थ सर्व शास्त्रोक्त कर्में निष्कामत्वानें करणारा पुरुष परमे-श्वरी प्रसादानें व गुरुमुखानें ज्ञानविज्ञान प्राप्त करून घेऊन शेवटीं शाश्वत पदाला जातो. मुख्य गोष्ट अहंकार सोडून कर्तव्य केलेंच पाहिजे. जीवाचें कर्म जर चुकत नाहीं तर त्यानें सर्वभावानें ईश्वरास ज्ञानपूर्वक शरण जाऊन कर्म करावें म्हणजे त्या सर्वज्ञ व लोक-संग्राहक प्रभूच्या प्रसादानें स्वकर्माला कर्तव्याचें स्वरूप येऊन शेवटीं नैष्कर्म्यसिद्धि होते. सच्चिदानंदस्वरूपी जो सत्यप्रिय परमेश्वर त्यालाच ज्ञानानें, भक्तीनें व कर्मानें प्रसन्न-कर-णारें कर्म तोच धर्म, तोच भागवत धर्म, स्वीकृत करावयाचा व इतर परिच्छिन्न धर्मांचा, ज्ञानाचा, भक्तीचा व कर्माचा अधिकारानुसार त्याग करून त्या सर्गस्थितिलयकारी परमे-श्वरास मात्र शरण जावयाचें, असा ज्ञानपूर्वक संकल्प करून त्याप्रमाणें वागलें तरच सर्व पापांचा व पापकारणांचा उच्छेद होऊन परिच्छिन्न वस्तूंविषयीं शोकमोह उत्पन्न होण्याचें कारण राहत नाहीं. असो; 'अशोच्यान्' येथून दुसऱ्याच्या अकराव्या श्लोकांत आरं-भिलेले अज्ञानभंजक गीताशास्त्राची, ब्रह्मज्ञानाची, तात्त्विकज्ञानविज्ञानाची परिसमाप्ति 'मा शुचः' या ज्ञानविज्ञानसूचक शब्दांनीं केली आहे. पुढें फलश्रुति व ज्ञानमहात्म्य सांगून अर्जुनास 'अज्ञानमोह नष्ट झाला काय?' असा-('हें ज्ञानविज्ञान स्तोत्र समजून घेतलें आहेस, आतां तुला वाटेल तसें तूं कर' असें सांगितल्यानंतर तो निरुत्तर होऊन स्तब्ध बसला आहे असें पाहून-) भगवंतांनीं प्रश्न विचारला. ज्ञानी अर्जुनानें आपलें इच्छास्वातंत्र्य भगवंतांच्या शास्त्रोक्त वचनांच्या अभिप्रायानुसारच विनियोजिलें व स्वक-र्तव्य निर्मळचित्तानें करण्यास तो सिद्ध झाला. सारांश, हें ध्यानांत ठेवावयाचें कीं, ज्ञानी पुरुषाची इच्छा शास्त्रोक्तच कर्म करण्याचा संकल्प करिते. संजयाचा सिद्धांत तर अखंड संस्मरणीय आहे. "जेथें सांख्यादि सर्व योगांचा स्वामी श्रीकृष्ण भगवान् साम्रा-ज्यकर्ता आहे आणि स्वकर्तव्यविशारद अर्जुन कर्तव्य करण्यास तयार आहे, तेथें संपत्ति, विजय, उन्नति आणि सात्त्विक नीति, इत्यादिकांचाच काय पण प्रत्यक्ष मोक्षाचाही परिचय होऊन सर्वत्र जिकडे तिकडे ज्ञान व आनंद यांचा महापूर लोटतो.

परमेश्वर करो आणि ज्ञान मिळवून पुरुषार्थ सिद्धीसाठीं स्वकर्तव्य करण्यास आमचे गीताभक्त सज्ज होवोत. श्रीकृष्णार्पणमस्तु. शांतिः ! शांतिः !! शांतिः !!!



# भाग सातवा.

## खंड १.

### गीतेसंबंधी कांहीं विचार.

१. अर्जुन हा नर या मन्वंतरांतील मानव जातीचा एक प्रतिनिधि आहे. येथें एकंदरांत सात भूमिका आहेत, त्यांतील मन ही चवथी भूमिका आहे, हें सतराव्या अध्यायाच्या व्यवस्थेंत सांगितलेंच आहे. मन हा केंद्रस्थानापन्न मणी आहे. हा मणी वर जाणें, उन्नत होणें, अथवा खालीं जाणें किंवा अवनत होणें हें मनाच्या करणीवर आहे. देहस्वार्थ, देहाभिमान सोडिला तर देवाकडे जातां येतें व देहाभिमान ठेवून विषयोपभोग घेत बसलें तर अधोयोनीस अथवा आसुरी पदवीस पोहोचावें लागतें. सारांश, मनाच्या करणीवर सर्व स्थिति ( उद्धार किंवा अवनति ) अवलंबून असतात. देहस्वार्थाचा आश्रय केला तर कामक्रोधादिकांचा उद्भव होऊन मोह, स्मृतिभ्रंश आणि बुद्धिप्रणाश होतो. अर्थात् मनुष्यपण संपून अधोयोनी, परतंत्रता, अज्ञान इत्यादि प्राप्त होतात. आत्म्याचा अवलंब केला तर ज्ञानावाप्ति होऊन बुद्धि प्रसन्न होते, समाधान प्राप्त होतें आणि शांति मिळते. पुनः; मनुष्यपण संपतें व श्रेष्ठयोनींत प्रवेश होऊन स्वतंत्रता, ज्ञान आणि अखंड सुखशांतीचा अधिगम होतो. एवंच देहस्वार्थ अथवा आत्मा यांचा आश्रय स्वीकृत करणें हें मनरूपी नराच्या ( मनुष्य प्रतिनिधि जो अर्जुन त्याच्या ) स्वाधीन आहे. परमेश्वर हा आत्मिक आणि म्हणूनच देदीप्यमान गभस्ति आहे, तो अस्तिभातिप्रियतारूप आहे. त्याचा आश्रय करून नित्य-बुद्ध-शुद्ध-मुक्तस्वरूपांत जाऊन मिसळणें हा प्रत्येकाचा धर्म आहे. **ज्ञान, उपासना** आणि **विहित निष्कामकर्म इतक्यांचा आश्रय केला म्हणजे हा धर्म साध्य होतो.** तेव्हां ज्याला जन्ममरण चुकवावयाचें आहे, त्यानें वेदोक्त ज्ञानादि साधनांचा अवलंब करून एकनिष्ठेनें व्रतस्थ राहण्याचा आरंभ करावा.

बुद्धीचें व कामाचें लग्न लागलें म्हणजे स्वर्गसुखाची लालसा उत्पन्न होते, मनाचें व त्याचें लग्न लागलें तर पितरलोक हवेसे वाटतात, आणि इंद्रियांशीं कामानें विवाह लाविला म्हणजे भूलोकच्या विषयसुखाची वासना उत्पन्न होते. एवंच काम हा व्यक्तिव्यक्तींचा मात्र संबंध जुळविणारा आहे म्हणून त्याज्य होय. हाच पापप्रवर्तक व संसारांत ओढणारा जीवशत्रु आहे. यासाठींच शंकरांनीं त्याला जाळला व विष्णूंनीं त्याला पुत्र करून आपल्या स्वाधीन करून ठेविला. तेव्हां निःश्रेयसत्व इच्छिणाऱ्या कामापासून दूर रहावें व अधिकारानुसार त्याचा पराभव करीत जावें. अथवा श्रीविष्णूप्रमाणें त्याला स्वाधीन करून घ्यावें व विश्वोद्धाराच्या कामाला लावावें.

—१२—

जीव हा परमेश्वरी अंश आहे, हें खरें; पण त्याला मनादि सहा इंद्रियें मिळालीं म्हणजे तो विचार, इच्छा, स्मरण, इत्यादि ज्ञानांशक भाग जडात्मकप्रकृतींत उत्पन्न करितो हें ठीक आहे. पण त्याचें मरणादि ज्ञान देहांत जीव आहे, तोंपर्यंतच असतें. पण आपण आपल्या या परमेश्वरी अंशाचा विधियुक्त शोध करीत अंतर्यामीं गेलों, तर पाठीमागील जन्मांचें स्मरण होतें. कारणदेहाचें ज्ञान होत जातें, तसें सर्व जन्मं प्रत्यक्ष होऊन तो कारणदेह हें सूत्र व सर्व जन्म हे मणी असें दिसावयास लागतें. अर्थात् जन्मांचे व विश्वाचे नियम आपल्यास समजतात. हें साधावयास विषयवैराग्य पूर्ण झालें पाहिजे. ईश्वरास, सिद्धांस व ब्रह्मर्षीस स्मरण यथार्थ असतें, याचें एक कारण पूर्ण विषयवैराग्य होय.

२. आत्मानात्मविवेक हवा. मात्र याचा अर्थ असा नाहीं: आत्मवस्तु मात्र कायती सत्य आहे व सर्व दृश्य वस्तु अंतर्बाह्यतः सर्वथा असत् आहेत. असा अर्थ करणें ह्मणजे शून्यवादाचा आश्रय घेण्यासारखें आहे, व वेद, इतिहास, पुराणें, प्राचीन व अर्वाचीन अनुभवशास्त्रें हीं सर्व कुचकामाचीं म्हणून त्याग करण्यासारखें आहे. खरोखर पाहिलें असतां आत्मानात्मविवेक याचा अर्थ असा आहे कीं, आत्मा व तदितरवस्तू ( विश्व ) यांचें स्वरूपज्ञान, विश्वाच्या उत्क्रांतीचें ज्ञान आणि आत्मा व विश्व यांतील परस्परांचें ज्ञान असून त्यांत नित्य सत्य कोणतें, व्यावहारिक सत्य कोणतें व प्रातिभासिक सत्य कोणतें, यांचें तारतम्य असणें हा अर्थ होय. पहा कीं, अत्यंत सूक्ष्म मूलप्रकृति ( अव्यक्त ), इच्यापासून जन्म पावून अत्यंत स्थूल भूमिकेपर्यंत परिणत होत असतां उत्क्रांतीचे नियम, अनंत जीवयोनी, या योनींतील निरनिराळीं अधिष्ठानें, ज्ञेय व ज्ञातृत्व यांचें ज्ञान, हीं ज्ञानें सामान्यत्वानें तरी अधिगत झाल्यावांचून सर्व विश्वाचें सर्व कालीं अधिष्ठान असणाऱ्या नित्यशुद्धबुद्ध व मुक्त आत्मारामाचें ज्ञानविज्ञान व्हावें कसें? अज्ञानस्थितींत ज्याला आपण 'ज्ञातृत्वा' च्या सदरामध्यें घालितों, तेंच पुढें ज्ञानस्थितींत 'ज्ञेय' वर्गांत येत असतें. उदाहरणार्थ, बुद्धि ही सामान्यतः 'ज्ञातृत्वा' च्या सदरांत आपण ओढीत असतों. पण शास्त्रज्ञान पूर्णतेस पोहोंचत असतां हीच बुद्धि 'अपराप्रकृतींत, ज्ञेयवर्गांत' सामील होतें. तेव्हां पूर्णज्ञानकाळीं घोंटाळा होऊं नये ह्मणून बुद्धि, तिचें स्वरूप, तिचें अधिष्ठान, तिची उत्क्रांति, इत्यादिकाचें पूर्ण ज्ञान झाल्यावांचून आत्मस्वरूपाचा छडा लावणें केव्हांही असमंजस, प्रायः अशक्यच होय. पृथ्वीपासून बुद्धीपर्यंत जें अपराप्रकृतीचें व 'जीव' नामक पराप्रकृतीचें जगड्व्याळ चक्र आपल्या भोंवतीं पसरिलेलें दिसत आहे, व ज्याचें परिवर्तन कांहीं नित्य नियमांनीं-हें सापेक्ष नित्यत्व होय-चाललेलें आहे, तें चक्र व ते नियम उत्तम रीतीनें निःशंक समजल्याविना आत्मवस्तूचें यथार्थ स्वरूप व त्याचें ज्ञानविज्ञान केव्हांही संपूर्णतः अवगत होणार नाहीं. तसेंच जीवात्मा म्हणजे जाणीवेचा एक परिच्छिन्न केंद्र होय. या केंद्राभोंवतालींच ज्ञातृत्व व ज्ञेयस्थितींतील अनुभव हे गोळा होऊन व्यवस्थित स्वरूप धारण करीत असतात. या परमात्म्यांशभूत केंद्रापासूनच जाणीवेचे किरण सर्वत्र पसरून विश्व प्रकाशमान

होतें. आणि विश्वज्ञानानें पुष्ट झालेले हेच किरण परावृत्त होऊन जीवात्म्याला 'अनुभव' देत असतात. तेव्हां हा जो देही, देहाचें अधिष्ठान, देहाचा आत्मा जो जीवात्मा-याच्या आश्रयानेंच आपल्यास हळूहळू निरुपाधिक आत्मस्थितींत प्रवेश करावयाचा आहे. याप्रमाणें जीवात्म्याचें स्वरूपवर्णन करणारीं जीं जीवन व मानसशास्त्रें व त्याचप्रमाणें प्रमाणशास्त्राची यथार्थता ठरविणारें जें ज्ञानमीमांसा शास्त्र (Epistemology) याचें ज्ञान होऊन तद्विषयक नियमही आपल्यास समजले पाहिजेत. आत्मज्ञान ही शेवटची पायरी होय.

सत् म्हणजे नित्य व अविकार्य वस्तु व असत् म्हणचे अनित्य व विकारी वस्तु; नारायण, परमात्मा, ब्रह्म ही सद्वस्तु आहे. तो नारायण चिंतन करीत असतां जी छाया त्याच्या सभोंवतीं पसरलेली असते, ती असद्वस्तु आहे. अर्थातच अव्यक्तजन्य प्रकृति आणि तिचे षड्विकार असत् होत. या प्रकृतीशीं किंवा तद्विकारांशीं आसक्त होणें हेंही असत् होय; आणि ह्या आसक्तीपासूनच असद्रूपी सुखदुःख, जन्ममरण इत्यादि उद्भवतात. सर्व विश्व व्यापून त्यांला प्रकाशित करणारा परमात्मा सत् आहे हें वर सांगितलेंच आहे. ह्या उभयतांचें ज्ञान तत्त्वदर्शी पुरुष करून घेतो व मुक्त होतो.

जोंपर्यंत विषयवासना जिवंत आहे, तोंपर्यंत मोक्ष मिळणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर या वासना-भोगवासना-सर्वथा जिवंत असतां कोणत्याही प्रकारची आत्मिक उन्नति होणार नाही. पण समुद्राच्या स्वच्छ पाण्यावर आलेली घाण जशी तो समुद्र आपल्या नित्य लहरी स्वभावानें धुवून नाहीशी करितो, दीप जरा आपल्या बरोबर उत्पन्न होणारी काजळी जाळून भस्म करितो व स्वच्छ प्रकाश देतो, वायु ज्याप्रमाणें सर्व प्रकारच्या दुर्गंधी हपटून हपटून फस्त करून टाकितो, याप्रमाणें आत्माही वासनेचीं व अभिमानाचीं मुळेंपाळें खणून काढून आपलें शुद्धस्वरूप प्रकाशमान करीत असतो; म्हणजे वासना व अभिमान यांत अंतर्भूत होणारा देहस्वार्थ व आळस ह्यांस उखडून काढून, वासना व अभिमान या द्वयीसच जीवोद्धाराकडे विनियोजितो; हें सर्व कार्य तो निष्कारण हेतूनें, कर्तव्य ह्मणून, करीत असतो. या असद् वस्तूंस आत्मस्वरूपांत जागा नाहीं; इतकेंच नव्हे तर या विश्वाच्या व्यावहारिक उत्क्रांतींत त्या नष्टही व्हावयाच्या आहेत. पुढें ज्या नष्ट होणार त्यांचा नाश अगोदर करून विश्वोत्क्रांतीचा हा मार्ग आहे असें स्ववर्तनानें दाखविणारा पुरुष खरा ब्रह्मविद्यार्थी होय.

परब्रह्मामध्यें ज्याचे चित्ताची एकतानता होऊन गेली आहे, परमार्थासंबंधानें ज्यांचा पूर्ण निश्चय झाला आहे, आत्मा हा कर्ताभोक्ता नाहीं, असा निश्चय होऊन जे जन्मादारभ्य संन्यासी होतात ते सांख्य होत. आतां योगी कोण ते पहा. आत्म-दृष्टीचा पूर्णविकास न झाल्या कारणानें आत्म्याला कर्तृत्व-भोक्तृत्व आहे असें ज्याला वाटते व आपल्या स्वतःची सात्त्विक आशा सफल व्हावी म्हणून दृश्य जगाचा व आपला

संबंध सुसंगत असावा, एतदर्थ जो अहर्निश प्रयत्न करितो, तो, योगारंभी होय. आतां सांख्ययोग व कर्मयोग या दोहींचाही मेळ यथास्थित करून जो ज्ञानदृष्टीनें आत्मनात्म-विवेक करितो व योगदृष्टीनें वेळोवेळीं प्राप्त झालेलें कर्तव्य निवृत्त वृत्तीनें करितो तो भगवंताचा व श्रीशंकराचार्यांचा खरा शिष्य होय. पांचवा व सहावा, त्याचप्रमाणें दुसरा व अठरावा अध्याय काळजीपूर्वक वाचिले असतां मी ह्मणतों त्याचा परिचय निष्पापी मुमुक्षूस तेव्हांच येईल. हे खरे आचार्यशिष्य आपल्या स्वतःचा विषयमल पार धुवून काढून सांख्यांची पूर्ण ज्ञाननिष्ठा अंगीकृत करितात; व दुसऱ्यांचा, भवसागरांत गटंकळ्या खात असलेल्या पुरुषांचाही, विषयमल अंतर्बाह्य धुवून काढण्याचें लोकोत्तर काम स्वतःच्या शिरावर घेऊन मानवजातीला वरच्या श्रेष्ठ भूमिकेला नेण्याचें-कर्मयोग्यांचें-श्रेष्ठ कर्मही करितात. सारांश अदिती मातेच्या गर्भाचे ( ब्रह्मांडाचे ) मस्तक हे सांख्य योगी, हस्तपादादि अवयव हे कर्मयोगी आणि श्रीकृष्णयोगी-भागवतधर्मी-हे त्या माऊलीचे हृदय होत.

३ ज्याला आत्म्याचें परोक्षज्ञान झालें आहे, त्यानें कर्मयोग अंशासाठीं करावयाचा कीं, कोणतीही स्थिति प्राप्त झाली असतां साधकाला प्रीति किंवा भीति उत्पन्न होऊं नये व तो नवीन प्रसंगांत गोंधळून जाऊं नये. पहा कां 'अनंगशास्त्रांतील' प्रश्नाचे जबाब देण्यासाठीं प्रत्यक्ष आचार्यांस सुद्धां परकायाप्रवेशिनी विद्येच्या साहाय्यानें कामरसाचा अनुभव घ्यावा लागला. तेव्हां नुसतें शास्त्रज्ञानच नव्हे, तर अनुभवज्ञानही अवश्य हवें व येवढयाचसाठा कर्मयोगाची योजना आहे. हा कर्मयोग निष्कामतेनें, अनासक्तत्वानें चालविला व अखंड ध्यान परमात्मस्वरूपाचेंच असलें म्हणजे बुद्धियोग होतो. आत्मानात्म-विवेकानें मन प्रकाशित होऊन गेलें व मननिदिध्यासानें मायेचे धुकें पार विरून गेलें म्हणजे सत्यासत्याची निवड करितां येते व दृश्य विषयाच्या शुष्क उपभोगाची व्यर्थता स्पष्ट होऊन केवळ चित्तशोधनाचें म्हणजे अभिमान व वासना ह्या द्वयीच्या निरासाचें कार्य लीलेनें होत जातें. अर्थातच शुद्ध झालेलें चित्त परमात्मस्वरूपाकडे म्हणजे स्वस्वरूपाकडे आकर्षित होतें व त्या चित्ताला दैवीसामर्थ्यही प्राप्त होतें. असल्या स्थितप्रज्ञांस त्या दिव्य व परममंगल आत्मस्वरूपाचा प्रकाश गोचर होऊन आत्मस्वरूपावर हे त्रिगुणात्मक दृश्य विश्व विवर्त-रूपानें कसें भासमान होत आहे, याचा स्पष्ट खुलासा होतो. तसेंच ज्या भासमान विषयात्मक पिंजऱ्यामध्यें ते लोक अज्ञानवशात् सांपडले होते, त्या विषयांशीं जीवाचें लग्न लावणाऱ्या इच्छासंततीचाही त्याग स्थितप्रज्ञांस करितां येतो. तदनंतर-ह्यांच्या देहावर विषयलहरी येऊन आदळतील, पण त्यांच्या आत्मस्वरूपाला त्यांची खबरही लागणार नाहीं ! आत्मसंयमनाचें व इंद्रियदमनाचें कार्यही हे लोक उत्कृष्ट रीतीनें करूं शकतात. हें असलें दिव्य सामर्थ्य सर्व जीवांस प्राप्त होईल. पण एक अट आहे ती ही कीं, जीवांनीं आपलें सामर्थ्य विषयलोलुपतेमध्यें सांडून टाकण्याच्याऐवजीं, तें सर्व सामर्थ्य जीवाच्या श्रेष्ठ व श्रेष्ठतर भूमिका संघटित करण्यामध्यें उपयोजिलें पाहिजे. असें आपण वागलों तर मात्र आपल्यास वरील दिव्य सामर्थ्य प्राप्त होईल; आणि असें

न वागतां विषयचिंतनच करीत आपण राहिलों तर आपलें असलेलें सामर्थ्यही नष्ट होईल. ध्यानांत ठेवावयाचें हें कीं, विषयांचें चिंतन हीच आत्मविघातक राक्षसीण आहे. हिला कामक्रोधादि मुलें होऊन ती जीवात्म्याचा घात करिते. विषयध्यान, इच्छा, काम, क्रोध, (हा आत्मप्रकाशावरील एक काळाकुट्ट ढगच होय), मोह, स्मृतिभ्रंश (येथें आत्मस्वरूपाची ओळखही बुजून जाते) बुद्धिनाश, या अधोगतीस नेणाऱ्या अवनतीच्या पायऱ्या होत. बुद्धिनाश झाला म्हणजे शुद्ध पशुस्वरूप प्राप्त होतें ! ! या स्थितींतील मनुष्यें म्हणजे चालकी बोलकी प्रेतेंच होत ! ! ! जिकडे विषयांची वावटळ यांस ओढून नेईल तिकडे यांच्या देहनौका ( सुकाणूं व डोलकाठ्या नाहींशा झालेल्या नौका ! ) वाहवत जाऊन शांतिशून्यरूपी खडकावर आपटतात आणि फुटतात. हा एका विषयचिंतनाचा परिणाम होय. हा चुकविणें असेल तर–विषयस्वरूपी काळोख्या रात्रीचा आपल्यास खरा कंटाळा व वीट आला असेल तर–आपल्या मनाचें सुकाणूं आपण दिव्यप्रकाशनिधीचा उगम जो आत्मरूपी देदीप्यमान ध्रुवतारा तिकडे वळवून आत्मचिंतनाचें व निर्विषयत्वाचें शीड बुद्धिपुरःसर हातांत घेतलें पाहिजे.

४ आठव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं, कर्म ह्मणजे भूतभावोद्भव करणारा, अव्यक्ताला व्यक्तस्थितींत आणून त्यांची विसृष्टि करणारा जो व्यापार त्याला कर्म असें ह्मणावें. सारांश, सप्तभूमिकात्मक जे विश्व आहे, त्याचा सर्ग, स्थिति व विलय करण्याचा हा जो दिव्य व्यापार ते विसर्ग संज्ञित कर्म होय. एखादी क्रिया लीलेनें करणें याचें नांवही कर्मच होय. हे स्थित्यात्मक ( कर्म अथवा 'शक्ति' ) असते. लंबकाचें आंदोलन हें कर्म गत्यात्मक आहे. सूर्याचे अस्तोदय, विश्वांतील सर्व लहान मोठे व्यापार ही कर्मेंच होत. या सर्वांस नित्यनियमांनीं बद्ध करून टाकलेलें आहे. हे नियमही कर्मेंच होत. या कर्मसंततीला व तिच्या विपाकाला केव्हां प्रारंभ झाला व यांचा अस्त केव्हां होणार हे सांगतां येणें अशक्य आहे. कर्म अनादि व अनंत आहे. हें म्हणण्याचें तात्पर्यच हें आहे कीं, कर्माचें मळसूत्री ( स्क्रूसारखें ) वर्तुळ आपणांस, जीवांस-ऋषींस देखील–पूर्णत्वानें दिसत नाहीं. फारफार तर या कर्मविस्ताराचीं दोन शिंगें–वर्तुळांत अंतर्भूत होणाऱ्या कंकणाचीं दोन शिंगें–कल्पनागोचर होऊं शकतात. हीं कंकणें म्हणजे प्रभव व प्रलय होत. सृष्टीला आरंभ झाला म्हणजे कर्मप्रभव दिसतो व सृष्टिलयकालीं कर्मप्रलयही कल्पनागोचर होतो. हीं शिंगें झांकण्यास जी अभेद्य व इंद्रियागोचर जवनिका म्हणजे पडदा आहे, त्यापलीकडे अव्यक्ताचें साम्राज्य लागलें. याला **अव्यक्त** असें सांख्य ह्मणतील व इतर लोक '**नारायणरूपी आत्मिक गभस्तीचें ज्ञेयस्वरूप असें**' म्हणतील. या अव्यक्तापासून अथवा नारायणाच्या ज्ञेयस्वरूपापासून विश्वोत्पत्ति होते व येथेंच विश्वलय होतो. एवंच आत्यंतिक प्रलय असा केव्हांही नाहीं. श्वासोच्छ्वासाप्रमाणें उत्पत्तिलय ब्रह्मस्वरूपांत होतात. **ह्या ब्राह्मी आंदोलनाचें जें नियमचक्र त्याला कर्म असें ह्मणावें. हें आंदोलन समजून घेऊन त्याप्रमाणें**

**चालणें ह्याचेंच नांव धर्म होय.** हा धर्म निष्कामत्वानें आचरिला म्हणजे आपण *कर्मचक्राच्या बाहेर जातों, अर्थात् ब्रह्मस्वरूप होतों.

शरीरांत राहून '**आपण शरीरी आहों, शरीर नव्हों**' असें समजणें आपण परमात्मस्वरूप असून आपलें शुद्ध, निर्मळ, अद्वैतज्ञान व व्यवहारांत दृश्य होणारें विश्वनियम हें आपलें उद्धारक साधन आहे, असा निश्चय करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. व्यवहारांत विश्वचक्र हा यज्ञ आणि परमेश्वर हा यज्ञपुरुष, यजमान, आहे. त्याचप्रमाणें संसारांत शरीरचक्र हा यज्ञ व तेथें उपाधीनुरूप असणारा जीव हा यजमान आहे. या परिच्छिन्न यजमानानें मुख्य यजमानाचें आचरण समजून घेऊन विश्वचक्रानुसार स्वदेहांतर्गत चक्राचा निष्काम विनियोग केला ह्मणजे त्याचें व त्या यजमानाच्या सहचरांचें कल्याण होऊन तो सिद्ध पदवीला जातो. अर्थात् प्रत्येक पुरुष ईश्वराचा सेवक आहे व प्रत्येकाच्या हातून ईश्वराला प्रिय होईल अशी सेवा झाली पाहिजे. ही सेवा सेवकाच्या नात्यानें म्हणजे विनयपूर्वक झाली पाहिजे. अशी सेवा भक्तिपूर्वक झाली, ईश्वराला आवडेल असेंच व आपल्या अधिकारानुरूप ज्ञानवर्धन व निष्कामकर्तव्याचरण व परोपकार बरेच जन्मपर्यंत झाले म्हणजे तो सेवक महर्षीपदाला जातो व पुढें सेव्यसेवकभाव मावळून जाऊन तोच मुख्य यजमान ईश्वरतादात्म्यानें होतो.

आपल्या पुराणाप्रमाणें एकंदर सात भूमिका अगर सात लोक आहेत. पैकीं तीन लोक क्षर ह्मणजे विकारशील आहेत. या तिघांवर 'कामाची' सत्ता आहे. शेवटचे तीन लोक दैवी आहेत, म्हणजे तेथें पुरुषात्मकता (आत्मिकता, ज्ञातृत्वता) आहे. येथें या तीन लोकांत मन, बुद्धि आणि आत्मा हे अनुक्रमें राहतात. या सर्व क्षर लोकांवर म्हणजे स्थूल-सूक्ष्म-कारण-शरीरांवर व कामावर, मन, बुद्धि व आत्मा यांची सत्ता आहे. आणि 'यज्ञपुरुष' (अध्याय श्लोक. ४ पहा) म्हणजे सृष्टिमध्यें विसृष्टि उत्पन्न करणारा जो काम त्या **कामाची बुद्धि होय**. 'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ' हें सांगितलें आहे, त्याचें तात्पर्य हेंच आहे कीं, यज्ञपुरुष हा सात्विकपूर्ण कामाची बुद्धि आहे.

५ हें विश्व परमार्थतः एकच आहे; व्यक्त स्थितींत मात्र त्याला वैचित्र्य आलें आहे. या व्यक्त स्थितींचे आंदोलनात्मक नियम आहेत, म्हणजे संकोचविकासनात्मक असें कांहीं ठरलेले नियम आहेत. देवाकरितां यज्ञ करणें हा एक ठराविक नियमच आहे. असो; त्या नियमानुसार निष्कामवृत्तीनें जीव चालूं लागले म्हणजे सर्वत्र शांतता, आनंद व एकतानता उत्पन्न होतात. पण या नियमांविरुद्ध सकाम कर्म होऊं लागून परस्परविघातक अशीं इच्छेचीं आंदोलनें होऊं लागलीं म्हणजे घर्षण, दुःख आणि गोंधळ उत्पन्न होतात. यासाठीं सृष्टीचे नियम काय आहेत, हें समजून देणाऱ्या शास्त्रांचें अध्ययन करून त्या त्या प्रामाणिक शास्त्रांतील नित्य सिद्धांतांस, रूपनियमांस, आपली इच्छा समर्पण केली व शास्त्रनिय-

मानुसार वर्तन केलें, अर्थातच फलाकांक्षा ठेविली नाहीं, म्हणजे 'ब्राह्मणो लोकरक्षकः' हें पुराणोक्त वचन सार्थ होऊन आपण केव्हां तरी हें सृष्टीचें आंदोलन मंद करूं शकतों आणि योग व भक्ति यांच्या साहाय्यानें शमदमाचा व प्रेमाचा उत्कर्ष झाला, परमावधि झाली, म्हणजे मुक्त होतों. पण सृष्टीचे आंदोलनात्मक नियम जर आपण अधिगत केले नाहींत, तर आपलें वर्तन हातांत काठी नसणाऱ्या अंधळ्याप्रमाणें विसंगत होतें, दुःखद होतें, वैरात्मक होतें; कामक्रोधादिकांचें ठाणें आपल्या मनोभूमीवर बसल्यामुळें आपल्या मनाचें अधःपाती आंदोलन जोरानें होतें व शेवटीं आपण मनुष्ययोनींतून खालच्या योनींत जाऊन पडतों. सारांश, जन्ममरणाच्या चक्रांत जोरानें सांपडतों. तेव्हां विश्वाची उत्क्रांति हा एक यज्ञ समजून त्या यज्ञाची पूर्तता समंत्रक विधीनें (सृष्टिनियमांच्या ज्ञानानें) व आपल्या इच्छांच्या समर्पण विधीनें मात्र होणार आहे. कलियुगांत यज्ञ होतनासे झाले, म्हणून अवर्षण, जरी, मरी इत्यादि अधिभौतिक व द्वेष, मत्सर, असूया इत्यादि अध्यात्मिक विघ्नांची गर्दी होऊन, आमची व आमच्या हिंदुस्थानची दैना झाली आहे. विश्वनियमानुसार नीति नाहीं, विश्वनियमानुसार धर्म नाहीं, विश्वनियमांचें ज्ञान ज्या वेदांवरून, स्मृतींवरून, पुराणांवरून, व इतिहासांवरून होणार त्यांचें रहस्य समजून घेण्याचा कधीं प्रयत्न नाहीं, केवळ स्वतःची इच्छा पूर्ण झाली म्हणजे इतरांचें, सगळ्या विश्वाचें काय वाटेल तें होवो, असें म्हणणारे अयाज्ञिक पुरुष उत्पन्न झाले, म्हणून आज या विपत्तिचक्रांत आह्मी सांपडलों आहों. सर्वविश्व एकमूल आहे, एका ब्रह्मांतच आपल्यास व आपल्या समाजास जाणें आहे असें ज्ञानविज्ञान झालें, तरच आपला तरणोपाय आहे, 'विश्व हें व्यक्त ब्रह्म आहे, आणि ब्रह्माची खरी पूजा उन्नतीच्या (विश्वोत्क्रांतीच्या) मार्गानें जाऊन जगाचें निष्काम कल्याण करणें ही होय.' असें व्रत सुरू होईल तेव्हां समाजाची खरी सुधारणा होईल. लोककल्याण करणें हें सणासुदीचें काम नसून ईश्वराचें देणें फेडण्यासाठीं हें काम करावयाचें आहे, असा ग्रह होईल, तरच इष्ट कार्य सिद्धीस जाणार आहे. पूर्वीच्या सप्तर्षीस, ब्राह्मणांस, जें श्रेष्ठत्व मिळालें त्याचें कारण हेंच आहे कीं, 'अनाथांस सहाय्य करण्यामध्यें आपलें सर्वस्व समर्पण करणें हेंच त्यांचें व्रत होतें.' सप्तर्षींनीं वेदमंत्रांचा अर्थ समजून घेऊन त्याप्रमाणें वर्तन केलें व इतरांकडून करविलें. 'Plain living and High thinking (वागणी संन्याशाची आणि विचारणा विश्वनियमांची) अशी या महापुरुषांची स्थिति होती. त्यांच्यामध्यें पौरस्त्य आर्यांची सात्त्विकता आणि अर्वाचीन युरोपियन लोकांची कर्तृत्वशक्ति होती. वेदांचा अर्थ त्यांस बरोबर रीतीनें समजत असल्यामुळें ते योग्य वेळीं वेदमंत्र म्हणत असत व विश्वनियम त्यांस अवगत असत म्हणून ते ज्या वेळीं जी जी तपश्चर्या करणें अवश्य असे, तीं तीं कर्मे करित असत म्हणून आणि मंत्राच्या (अक्षरसमूहाच्या) नियमबद्ध व स्वरबद्ध उच्चारांनीं व ऋषींनी केलेल्या यज्ञांनीं पर्जन्याच्या कारणांवर संस्कार घडून पर्जन्य पडत असे. ही जादू नव्हे, तर उत्क्रांतीच्या संधानें येथील द्रव्यें श्रेष्ठ पदवीला नेणारे विश्वनियमांस ज्ञानभक्तिपूर्वक सहाय्य करणें होय.

६ मी परिच्छिन्न आहें असें भान आहे, तोंपर्यंत 'सृष्टि' ही 'मायिक' नसून एका अनंत व विश्वव्यापी व विश्वनियामक अस्तित्वाच्या उत्क्रांतीचें अधिष्ठान आहे, असें ज्ञान असतें. ही उत्क्रांतीची उन्नति जसजसी श्रेष्ठभूमिकेचें आक्रमण करीत जाते, तसतसें जाणीवेचेंही, ज्ञानाचेंही, उत्क्रमण होऊन कल्पनागम्य जीविताची भूमिका सिद्ध होते. म्हणजे परब्रह्म आहे, असें कळावयास लागतें. या सर्व उत्क्रांतीचा व सर्व भूतांचा नियामक जो परमेश्वर तोच यज्ञपुरुष होय, असें मागें सांगितलेंच आहे. हें न समजतां देह प्राप्त झालेले–परिच्छिन्न, परंतु ईश्वरी अंश असलेले–जीव, अहंकारयुक्त होतसाते उत्क्रांतिचक्रावरच फिरत असतात: पण सत्कर्मानें व ईश्वरी दयालुत्वानें त्यांस सदनुभव आला तर त्यांचा अहंकार एका आयुर्दायांस सुद्धां थोडासा कमी होतो आणि सत्संगतीनें निष्कामकर्माची व परमेश्वरी भक्तीची ज्ञानपूर्वक निष्ठा त्यांचे चित्तांत बाणली तर ते जेथील रहिवासी त्या सत्यलोकाकडे निवृत्त होऊं लागतात व इतर लोकांसही निवृत्त व्हावयास लावितात. विश्वज्ञानाचा, नीति, धर्म इत्यादिकांचा व आत्मज्ञानाचा प्रसार करून असले लोक विश्वाच्या उन्नतीला साहाय्य करितात आणि जन्मजन्मांतरीं पूर्णत्वानें ज्ञानविज्ञानी झालें म्हणजे मुक्त होतात. तसेच, या भासमान विश्वांतसुद्धां व्यवहारकालीं नित्यत्वानें असणारे नियम समजून घेण्यासारखें असतात; ह्या नियमांचें ज्ञानविज्ञान महर्षींस मात्र असतें. या ज्ञानविज्ञानाचा विनियोग ते महापुरुष लोकशिक्षणांत करून विश्वनियमानुसार पुढील उत्क्रांतीचा मार्ग ठरवून ठेवितात, म्हणूनच त्यांस **याज्ञिक** अशी संज्ञा देण्यांत येते. यांचा मार्ग म्हणजे निवृत्तिमूलक प्रवृत्ति व निवृत्तिपर्यवसायी प्रवृत्ति उत्पन्न करण्याचा आहे. ते स्वतः निवृत्त असून स्वतःच्या निवृत्तिमूलक प्रवृत्तीनें नित्यशः लोकसंग्रह करीत असतात. सांख्य ह्मणजे ज्ञानमार्ग व योग म्हणजे कर्ममार्ग हे दोन वस्तुतः एकच आहेत. ज्ञानोक्त कर्म केल्याखेरीज ज्ञानाला अपरोक्षत्त्व, विज्ञानत्त्व, येत नाहीं व कर्माला ज्ञानाचें अधिष्ठान असल्याविना तें ज्ञानपोषक म्हणजे चित्तशोधक होत नाहीं. दोन्हींची एकवाक्यता ज्ञानपूर्वक निष्काम कर्मामध्यें होते. याज्ञिक कर्म बद्धक नाहीं, लोकसंग्रह करणें अवश्य आहे, प्रकृतींत राहून कर्म न करणें अशक्य आहे, इत्यादि प्रकारचा उपदेश अर्जुनास केला आहे, त्याचें रहस्य हेंच आहे कीं, मुमुक्षूनें निष्काम कर्म करून आपलें चित्त शुद्ध करावें आणि नंतर शास्त्रानें उत्पन्न अथवा प्रकट झालेल्या ज्ञानाला परोक्षत्वाचा झगा काढावयास सांगून त्याला अपरोक्षत्वाचें स्वरूप अंतर्बाह्यतः द्यावें. निष्काम यज्ञकर्मानें केवळ येथील जीवांसच उन्नतीचा मार्ग सुगम होतो असें नाहीं, तर सृष्टीच्या राज्यांत अनंत कामावर देखरेख करण्यासाठीं व विश्वचक्राच्या नियमनासाठीं ज्या अनंत देवता ठेविल्या आहेत, त्यांचाही संतोष होऊन त्या देवताही ईश्वराज्ञेनें शुद्ध मनुष्याचें कायमचें हित करणाऱ्या होतात; आणि देहस्वार्थामुळें उत्पन्न होणारें जें सामाजिक घर्षण व सामाजिक अव्यवस्था या उभयतांचें चंदन करून सर्वांसच उद्धारक साहाय्य देतात. एवंच ब्रह्मज्ञान, सद्धर्म, परोपकार, विश्वज्ञान यज्ञयागादि कर्में हीं अवश्य उद्धाराचीं नित्य साधनें आहेत. श्रीकृष्णांनीं 'अक्षरापासून वेद, त्यापासून

कर्म, कर्मापासून यज्ञ, यज्ञापासून पर्जन्य, पर्जन्यापासून अन्न, अन्नापासून भूतें उत्पन्न होऊन वृद्धि पावतात ' हें जें सतत्पूरात्मक ज्ञानमंडल सांगितलें आहे, तें वस्तुतः खरें आहे हें उपनिषद्ग्रंथांस सांगावयास नको. यज्ञामध्यें जो अग्नि प्रज्वलित होत असतो, त्यानें वातावरणांत गडबड उडून पर्जन्याभिमुख मेघोदरांत अनुकूल परिस्थिति होते हें खरें; पण ज्या मंत्रादिकांनीं देवतांचें आवाहन होत असतें, त्या मंत्रांमध्यें व त्यांच्या विन्यासामध्यें अशी कांहीं चुंबकता ठेविलेली आहे कीं, जिच्या सार्थ प्रकटीकरणानें पर्जन्यदेवता आकर्षित होऊन त्या देवता आमच्या तप्तभूमीस जलसिंचनानें शांत करितात व तिला फलद्रूप करितात. मात्र वेदपठन सार्थ व सप्रयोग झालें पाहिजे. सर्व विद्येचें अधिष्ठान वेद आहेत व जसजसें विश्वज्ञान वृद्धिगत होत जाईल, तसतसें वेदांतील अभंग सिद्धांतांचें स्वरूप प्रकट होऊन हेच वेद जीवाची उन्नति करण्यास समर्थ होतील. नुसत्या वेदपठनानें कांहीं अकिंचित्कर कार्य होईल हें खरें; पण वेदांचें सांगोपांग अध्ययन सयुक्तिक व सप्रयोग पद्धतीनें होईल तर विश्वज्ञानासंबंधानें सुद्धां आपल्यास इतरांच्या तोंडाकडे पाहण्याची फारशी पाळी येणार नाहीं.

ज्याला मोक्षसुखाचा म्हणजे शुद्धज्ञान व शुद्धानंद यांचा नित्य अनुभव स्वस्वरूपानें हवा आहे त्यानें निष्काम कर्माचा अवलंब करून लोकसंग्रहाकरितां विश्वनियमानुसार उद्धारक कर्म स्वीकारलें पाहिजे. हेंच खरें याज्ञिक कर्म होय. या यज्ञांत लोकसंग्रहार्थ स्वप्राणाची आहुती व आत्मारामाप्रीत्यर्थ पंचकोशात्मक देहाची आहुति द्यावयाची असते. हा यज्ञ मात्र परमेश्वराला संमत असतो; कारण तो उद्धारक असून परमेश्वरही नित्य तोच यज्ञ चालवीत असतो. पहिली आहुति 'लोकसंग्रह' नामक यज्ञांत द्यावयाची असल्यामुळें यजमानाला मानवी दुःखाचें उपशमनासाठीं यज्ञ करावा लागतो. दुसरी आहुति म्हणजे स्वसुखाचा विधियुक्त होम होय. तिसरी ध्यानरूप आहुति अर्पण स्वरूपाची असते. हिचें फल अखंडज्ञानावाप्ति आहे. हेंच खरें वैराग्य आहे, व पुरुषार्थही तोच आहे. सर्वव्यापित्व या यज्ञानें अधिगत होतें. ब्रह्मार्पणानें परमेश्वराचें ध्यान व लोकसंग्राहक कर्म या दोन्ही परमेश्वरीसद्गुणांचा अधिलाभ होतो; समाजाची उन्नति व स्वतःचा उद्धार ब्रह्मार्पण विधीनेंच होतो. विश्वांत शांतीचा उदय करण्याला एक ब्रह्मार्पण यज्ञच समर्थ आहे. सनातन धर्मयोग तो हाच होय.

असो; गीताशास्त्रांतील 'यज्ञ' नामक कर्माचें कांहीं विवरण स्पष्ट हवें होतें, तें एका महापुरुषाचा लेख मला जसा आक्रमण करितां आला, त्या प्रेरणानुसार हें विवेचन केलें आहे.

---

## खंड २.

### आणखी कांहीं विचार.

**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥**

श्वेताश्वतर.

परमेश्वरावर ज्याची अनन्य श्रद्धा आहे व त्याचप्रमाणें स्वगुरूवरही जो निःसीम पूज्यभाव ठेवितो, त्याला ह्या खालील गोष्टी सांगावयाच्या आहेत, व त्यानें समजून घेणेच्या आहेत. हा शिरोलेखांतील उपनिपन्मंत्राचा स्थूलार्थ आहे. जो सत्यान्वेषी मुमुक्षु आहे, त्याच्यासाठीं परमेश्वरनिष्ठा व गुरुभक्ति ह्या दोन उत्तम सोपानपरंपरा आहेत. यांच्याद्वारां मात्र धर्मपंथ समजणें शक्य आहे. तेव्हां जर संसृति-चक्रांतून सुटून मोक्षाच्या स्वानंदसाम्राज्यांत जावयाचें असेल तर श्रुतिप्रणीत धर्मग्रंथ व त्यांतील अपौरुषेय श्रुतिभाग हीं आपल्यास अवश्य समजून घेतलीं पाहिजेत. श्रुति ह्या ईश्वरप्रणीत आहेत व म्हणूनच त्या प्रमाणभूत आहेत, असें आमचें लोक मानितात व तो त्यांचा समज खराही आहे. हा ग्रह अनुभवानें ठरतही चालला आहे.

२ प्रत्येक जीवाची इच्छा पाहिल्यास असें दिसेल कीं, त्याला अखंड, अद्वितीय अशा शुद्ध ( निर्मळ ) सौख्याचा लाभ व स्वस्वरूपाची जाणीव हवी आहे. पाश्चिमात्य व व्यावहारिक नीतिदृष्टीनें पाहिलें तर आपण तात्कालिक व ऐहिक सुखाकरितां धडपड करीत असतों, असें ह्मणतां येईल. पण आत्मिक दृष्टीनें पाहिलें असतां आमच्या इच्छेचें पर्यवसान एका शुद्ध, अखंड आनंदामध्यें, समाधानामध्यें मात्र होणार आहे असें दिसतें. गीतेमध्यें जो मार्ग सांगितला आहे तो अखंडानंदाचा आहे व अंतिम पुरुषार्थही ज्ञानमयच आहे. आतां तात्त्विक अथवा ब्रह्मदृष्टीनें पाहिलें असतां आत्मा हा 'अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणः ।' या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व-व्यापी, निर्विकार आणि अव्यय असा आहे; तेथें व्यवहार, प्रपंच, दुःख, उत्क्रांति, पूज्यपूजकता, इत्यादि प्रपंच मुळींच नाहीं. तो आत्मा आपल्या स्वस्वरूपानें निर्विकार स्थितींत निरंजन आहे. तो हलत, बोलत, डोलत नाहीं. तो सताच्या पलीकडे आहे व जाणीवेचा आणि आनंदाचा गाभा आहे. त्याच्या सत्तेनें व्यावहारिक प्रपंच चालतो व चालतोसा दिसतो. ही सर्व माया आहे म्हणजे हा मिथ्या, अपूर्ण अस्तित्वाचा, अपूर्ण जाणीवेचा व अपूर्ण सुखाचा भास आहे. 'मी ज्ञानी आहे' अशी जाणीव उत्पन्न झाली कीं मायेचें म्हणजे कार्यकारणादि संबंधाचें, कालस्थलाचें, गुणधर्मक्रियाचें उद्भव-ज्ञान व उत्क्रांतिज्ञान सुरू होतें. पण 'मी ज्ञानी आहें' असें ज्ञान तरी कां उत्पन्न

होतें? हा प्रश्न व्यावहारिक प्रमाणांनीं सुटावयाचा नाहीं व आत्मदृष्टीनें '**मी आहे**' हें सुद्धां ज्ञान नाहीं. एवंच हा प्रश्न अवघड तर खराच; व ब्रह्ममूलक व्यावहारिक दृष्टीनें विचार केला असतांही या प्रश्नाच्या उत्तराचा जरी पत्ता लागणार नाहीं, तथापि क्रमशः जीवजाति कसकशी उत्क्रांत होत चालली आहे व ज्ञानमर्यादा कसकशी वाढत आहे, हें पूर्वींच्या व हल्लींच्या अनुभविक शास्त्रांवरून पाहतां येईल. खनिज, वनस्पति, व जीवसृष्टीचा विचार केला, शरीररचनाशास्त्रदृष्टीनें शरीराची पूर्णता व सौन्दर्य विदित झालेलीं असलीं ( कार्यक्षमता अधिक कशी वाढत असते हें पाहिलें ) म्हणजे आत्मस्वरूप प्रकट करणाऱ्या आत्मिक मार्गाची आपली थोडीशी तरी ओळख होते आणि आत्मस्वरूप आविर्भूत करण्यासाठीं जीवशरीर उत्तरोत्तर कसें श्रेष्ठ होत जातें हेंही समजतें. अन्नमयकोश, प्राणमयकोश, मनोमयकोश, विज्ञानमयकोश व आनंदमयकोश हे या उत्क्रांतीचे मार्गावरील टप्पे आहेत. प्राथमिक जीव प्राणमयकोशापर्यंत येऊन अन्नाचा व प्राणाचा मात्र उपभोग घेतात.• यांस, या प्राथमिक जीवास, मनासह बुद्धि नसते असें नाहीं, पण ती अत्यंत सूक्ष्मावस्थेमध्यें असते. या अवस्थेंत शरीर जिवंत ठेवणाऱ्या व वाढविणाऱ्या नियमांचा उदय झाल्यास फारसें आश्चर्य नाहीं. पण मनोमयकोशाला पूर्णस्वरूव मानवी-शरीरांत येतें; ह्मणजे बाह्यसृष्टीच्या ज्ञानाचा अनुभव मनुष्ययोनींत बऱ्याच पूर्णत्वानें येतो. या अनुभवाला व्यवस्थित स्वरूप देण्याचें कामही मनुष्यच करितो. बाह्यसृष्टि पाहणें व ती दिसतें तशीच आहे, असें समजून तिचें यथादृष्ट वर्णन करणें हें मनोमयकोशांतर्गत जीवाचें काम आहे. सर्व वर्णनपर ग्रंथ, इतिहास भूगोल, वनस्पतिशास्त्रें, खजिनशास्त्रें इत्यादिकांची उत्पत्ति मनोभूमिकेवरूनच शक्य होते. असो; विज्ञानमयकोश प्रकट झाला ह्मणजे कार्यकारणादिकांचा व आपण व्यवस्था करितों त्याप्रमाणें अनुभव येण्याचा क्रम सुरू होतो व सर्व तर्क व तर्कानुजीविशास्त्रांचा व तसेच प्रयोगसिद्धशास्त्रांचा उद्गम होतो, व याच वेळीं 'मी कोण आहें!' असा प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव असतो. हा प्रश्न उत्पन्न होऊन त्याची शास्त्रविहित व्यवस्था लागली म्हणजे आनंदमयकोशाचें कपाट उघडतें, आणि जसजसा आनंद होत जाईल, तसतसें ज्ञान वाढून व बुद्धि स्थिर होऊन तादात्म्यवृत्तीचा आविर्भाव होतो. पहा कीं, पुष्कळ विषयांचा अनुभव आल्यानंतर, विषय पुष्कळ असले तरी अनुभव घेणारा एकच आहे, तो अव्यय आहे, तोच सर्व इंद्रियज्ञानाची व्यवस्था लावितो; द्रव्य, गुण, कर्म इत्यादि कल्पना तोच उत्पन्न करितो, त्यांच्यांतील परस्परसंबंधाची शहानिशा करून विश्वनियमांचा शोध तोच लावतो, असें आपल्या विचारी पुरुषास कळतें. ही ज्ञानाची प्रगति होत आहे, तिच्याबरोबरच त्याची इच्छाशक्तिही प्रबल होत जाऊन तिचें स्वातंत्र्यही दिवसानुदिवस अभिव्यक्त होत जातें. याप्रमाणें 'स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च' हे जे परमेश्वरी सद्गुण ते क्रमशः प्रकट करवून देणारी मानवी शरीररचना प्राप्त झाली ह्मणजे जिज्ञासा आणि चिकीर्षा या उभयताही अभ्यासानें वृद्धिंगत होऊन पराकाष्ठेचें अंतिमस्वरूप धारण करतील अशी बळकट आशा उत्पन्न होते. सारांश, हाच पुरुषार्थ होतो, ह्मणजे सर्वज्ञता, सर्वशक्तिमत्व व सर्वात्मकता हे जे परमात्म्याचे मुख्य गुण त्यांची

संघटना आपल्यामध्यें होऊन आपण परमात्मस्वरूपाशीं तादात्म्य वृत्तीनें एकवट होऊन जावें, सर्वत्र प्रेममेघाचा वर्षाव होऊन आपली साहजिक वृत्ति, रागद्वेषादि, सुखदुःखादि व शीतोष्णादि दुकलींच्या ताब्यांतून बाहेर काढून तिला पूर्ण स्वातंत्र्य द्यावें, मायेला जे आपण वश असतों, ते आपण मायेचें स्वामी व्हावें, आपणच सर्वांभूतीं असून निरतिशय आनंदसागराशीं एकस्वरूप झालों आहों व कालस्थलातीत व कार्यकारणातीत झालों आहों, असा अनुभव येऊन शेवटीं ब्रह्मात्मक व्हावें, असा प्रत्येकाचा अंतिम पुरुषार्थ असावा व होतो.

३ हा अद्वितीय व परममंगल पुरुषार्थ (ह्मणजे मोक्ष) सिद्ध होण्याला अर्थातच मोठ्या कालाची व दृढ अभ्यासपूर्वक वैराग्याची, तसेंच श्रद्धेची व ज्ञानाची अपेक्षा असते. परब्रह्मदृष्टीनें बंधमोक्ष हा विचार नाहीं, व कर्तव्याचाही विचार नाहीं हें सांगावयास नकोच आहे. विचार करावयाचा आहे तो व्यवहारांत सांपडलेल्या, मायेच्या स्वाधीन झालेल्या अज्ञानी पण जिज्ञासूचा आणि मुमुक्षूचा विचार कर्तव्य आहे. ज्या मायेच्या भोंवऱ्यांत जीव सांपडला आहे, तिच्या नाशाचा विचार कर्तव्य आहे. अथवा ब्रह्मज्ञांच्या भाषेनें बोलावयाचें म्हणजे ज्या असत्य मायेच्या भोंवऱ्यामध्यें जीव सांपडलासा दिसतो, त्या मायेचा म्हणजे अध्यासाचा ब्रह्मज्ञानानें बाध करावयाचा आहे. तेव्हां अनादिकालापासून संचार करणारी माया नष्ट करण्यासाठीं ज्ञानार्जन करणाऱ्या जीवाला बराच कालावधि लागेल, हें उघड आहे. याचप्रमाणें, ज्या सकाम कर्मानें ही माया उत्पन्न केली, त्याच्या तोडीचें, किंबहुना त्याहून जास्त सामर्थ्याचें निष्काम कर्म जेव्हां आपल्या हातून होईल, तेव्हां, व साहजिक ब्रह्मज्ञान आपल्यास पूर्णत्वानें प्रकट होईल तेव्हां, मायेचा व कर्माचा निरास होणार आहे. अर्थातच याला पुष्कळ कालावधि लागणार. 'अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिं' असें श्रीभगवानच स्वतः सांगत आहेत. हें आप्तवाक्य झालें, पण अनुभवही असाच आहे. रानटी लोकांस गहन विषयांचीं रहस्यें–एकदम नव्हे, तर कालांतरानें सुद्धां–कळत नाहींत. आपल्यास वाटतें कीं, 'अमुक गोष्ट' सर्वांस अमुक कारणाकरितां मान्य व्हावी; पण प्रत्येकाची विषयज्ञानशक्ति व इच्छाशक्ति ह्या दोन्ही त्या त्या मनुष्याच्या भिन्न भिन्न कर्मानें उत्पन्न झाल्या असल्यामुळें भिन्न असतात. पहा कीं, एका मनुष्यास गहन प्रमेयें एकदम समजतील व दुसऱ्याला तीं पांच चार वर्षांच्या अभ्यासानेंही समजणार नाहींत असें होतें. हा प्रकार जर एकाच वर्णांत दृष्टीस पडतो, तर पृथ्वीवर मनुष्यांची उत्पत्ति झाल्या दिवसापासून ज्यास शास्त्रीय शिक्षणाचा गंध नाहीं, असे भिल्ल लोक व अतिशूद्र लोक यांच्या बुद्धीची घटना व आज हजारों वर्षांच्या आनुवंशिक संस्कारांनीं ज्ञानशील झालेल्या आर्यलोकांच्या बुद्धीची घटना, यांत महदंतर असणार व एकास जो विषय अवगत असेल तो दुसऱ्यास अगम्य राहणार यांत काय आश्चर्य आहे? तात्पर्य सांगावयाचें हें आहे कीं, ज्ञानाचें व इच्छेचें अधिष्ठान जी बुद्धि, तिची प्रगति अत्यंत मंदत्वानें होत असते. खरा व अभिव्यक्त होण्यासारखा संस्कार होण्याला एकदोन पिढ्या पुऱ्या होत नाहींत. इतकेंच नव्हे, तर अनेक जन्महि पुरे होत

नाहींत. ही सामान्यतः व्यावहारिक विषयज्ञानाची व्यवस्था, तर यावरून पारमार्थिक ज्ञान व पुरुषार्थसिद्धि व्हावयाला किती काळ लागेल याचा अंदाज सहजच करितां येईल. 'मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसी।' असें श्रीतुकोबा महाराज म्हणतात; किंवा 'ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति' हा श्रीमद्भगवद्गीतांतर्गत मंत्र; यांचें म्हणणें खरें आहे. पण तुकोबा म्हणतात तो अनन्यनामयोग, व भगवान् म्हणतात तो ज्ञानयोग सिद्ध होण्यास किती तरी जन्म घ्यावे लागतात! जास्त दिवस लागतात, म्हणून निराश होण्याचें मात्र कारण नाहीं; कारण 'न मे भक्तः प्रणश्यति' 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' असें त्याच परमेश्वराचें अभिवचन आहे. तेव्हां कोणत्याही संकट-परंपरेला किंवा प्रतिकूल परिस्थितीला न डगमगतां श्रद्धेनें व निष्कामचित्तानें वर्णाश्रमकर्तव्य ज्ञानपूर्वक करून ता परमेश्वराला अर्पण करण्याचा पाया घातला म्हणजे शांतीचा अरुणोदय होऊं लागतो; व पुढील मार्ग क्रमण करण्याला हा शांत्युदय उपयोगीं पडतो, हें खरें आहे. तथापि पराशांतीचा मध्यान्हसूर्य डोकीवर येण्यास अनेक युगें व अनेक जन्म अवश्य आहेत. आपलें कर्तव्य इतकेंच आहे कीं, कालच्या पुढे आपण आज आत्मोन्नतीप्रीत्यर्थ कांहीं प्रयत्न निष्काम चित्तानें केला कीं नाहीं, हें पाहणेंचें आहे. याच प्रगतिमार्गानें आपल्यास गेलें पाहिजे. भोग घेण्यासाठीं म्हणून कोठेंही थांबावयाचें नाहीं. असो; हा प्रगतिसंस्कार अहर्निश सुरू असावा. तसेंच, पूर्वसंस्काराची उजळणीही अहर्निश आणि प्रत्येक जन्माच्या बालपणांत होतच असते. पहाः वैद्यशास्त्रास अवश्य असें जें शारीरिक विज्ञान त्याचा प्राचीन, अर्वाचीन व पाश्चात्य पद्धतीनें ज्यांनीं अभ्यास केला आहे, त्यांस विदित आहे कीं, आपला मनुष्यदेह गर्भावस्थेंतच अनेक योनींचीं स्वरूपें धारण करून रूपांतरें करितो, व जन्म पावल्यानंतरही पूर्वक्रमित अनेक योनींचीं आवृत्ति करीत असतो. हें शरीरसंबंधेंच रूपांतर होतें, असें नाहीं, तर अंतरिंद्रियांचें म्हणजे मनोबुद्धीचेंही रूपांतर होत असतें. 'तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्' या भगवत्सिद्धांताचें तात्पर्य तरी हेंच आहे. एवंच, पाठीमागील सर्व उजळणी झपदिशीं आटपून जिज्ञासु व मुमुक्षु जीव पुढील मार्गक्रमण आस्ते आस्ते करूं लागतो.

याप्रमाणें 'उद्धरेदात्मनाऽऽत्मानं' या न्यायानें मानवी प्राणी आपली, आपल्या कुटुंबाची व आपल्या समाजाची उन्नति करूं लागून कांहीं एका विशिष्ट स्थितीला येऊन पोहोंचला म्हणजे त्या जीवाला गुरुकृपेची अपेक्षा उत्पन्न होते. हायड्रोजन व ऑक्सिजन वायूंचें मिश्रण केल्यानंतरही विद्युत्प्रयोगाशिवाय जसें या वायूंस जलरूप प्राप्त होत नाहीं, अधिक कढत व म्हणून अधिक पातळ होत जाणारें पाणी शंभर अंशावर जाऊन पोहोंच-ल्याबरोबर ज्याप्रमाणें एकदम वायुरूप धारण करितें; जमीन उत्तम असली, मेहनतमशा-गत चांगली केली, तरी पिकाच्या उत्पत्तीला बीजासह पर्जन्याची जशी अपेक्षा आहे, त्याच-प्रमाणें आत्मिक उन्नतीच्या कठीण घाट चढणाऱ्या जीवपांथिकाची गुरुकृपेसंबंधें स्थिति आहे. हा कांहीं विशेष मार्ग चढून गेला म्हणजे पुनः पुढें जाण्याच्या अमोघ

त्याला एक अथांग दरीवरून उडी मारून जावें लागतें. ती दरी म्हणजे सांत व अनंत यांस विभागणारी खाडी होय. ही खाडी तरून जावयाला गुरुकृपा किंवा भगवदनुग्रहच झाला पाहिजे. 'तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकं । ददामि बुद्धियोगं तं येनमामुपयान्ति ते' हें भगवंताचें वचन किंवा श्रीमद्भागवतांत एका भगवद्भक्तानें मागितल्याप्रमाणें 'अतः संसाराद्धेस्तरणसरणिं मामुपदिशन् । स्वबुद्धिं श्रौतीं मे वितर भगवंस्त्वं हि कृपया ॥ ( म्हणून संसारसमुद्रांतून तरून जाण्याची नौका दाखविणाऱ्या हे दयाळू भगवंता! मला श्रुतिविहित बुद्धि कृपा करून द्या' ) अशी परमेश्वरास प्रार्थना करण्याची किंवा 'अधीहि भगवो ब्रह्म' असें विनयपूर्वक श्रीगुरुस विनवून प्राप्त होणाऱ्या श्रीगुरुकृपेची व ईशानुग्रहाची अपेक्षा असते. ही स्थिति प्राप्त होईपर्यंत मायेच्या स्वाधीन राहून मर्यादित ज्ञान व मर्यादित इच्छा संपादन होतात. पुढें जीवाला परमात्म्याशीं एकरूप व्हावयाची आकांक्षा उत्पन्न होईल, तो परमेश्वर जसा विश्वाचा पिता, धाता, माता, भर्ता, पितामह असून स्वतःच्या स्वतंत्र सत्यसंकल्पानें विश्वव्यवस्था करितो, त्याला जशी अनादि व अनंत कालांतील वस्तुस्थितीची साहजिकतःच ज्ञानसंपत्ति स्वस्वरूपानें प्राप्त झाली आहे, त्याची बुद्धि आणि मनोवृत्ति ( Passions ) जशीं एकच एक सत्स्वरूप झालेलीं आहेत, तसें जर आपल्या मुमुक्षूस व्हावयाचें असेल, तर त्यानें आपलें ज्ञान वृद्धिंगत होईल, आपली इच्छा स्वस्वरूप होईल, असा योग प्रयत्नेंकरून साध्य करून घेतलाच पाहिजे: सत्य कोणतें, असत्य कोणतें, हें सहज रीतीनें कळण्याचें सामर्थ्य उत्पन्न होऊन सन्मार्गानें वागणें हें बुद्धिस्वातंत्र्य श्रीपरमेश्वराप्रमाणें मुमुक्षूच्या हस्तगत झालें पाहिजे; आणि हें अवघड काम सिद्ध व्हावें म्हणून श्रुतीची, गुरूची व भगवत्कृपेची आवश्यकता आहे, असें सांगितलें हें खरेंच आहे, मर्त्यवस्तूचा मात्र अनुभव असणाऱ्या व ऐहिक जगांत वागणाऱ्या जीवाला अमरत्वाची व स्वर्गाची ओळख स्वतःच्या परिश्रमानें होणें अत्यंत दुरापास्त आहे. ही ओळख श्रुतिद्वारानें होते. पण श्रुतीचा परिचय होण्याला व तेथील रहस्यें विज्ञात होण्याला तत्त्वदर्शी पंडिताचें साहाय्य घेतलेंच पाहिजे. 'उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः' ( पहा श्रीमद्भ० अ० ४ श्लो० ३४ ) स्थूल सूक्ष्म–कारणदेह टाकल्यानंतरही आत्मा निःशरीर स्वरूपानें असूं शकतो हें ज्ञान, व दुःखविरहित सुख असूं शकतें हा अनुभव, ज्ञानीं ब्रह्मवेत्त्यांकडूनच मिळवावयाचा. ह्या गुरुकृत उपदेशाचें सार्थक्य व्हावयाचें असेल, व श्रुतिगत महावाक्यांचा साक्षात्कार करून घेणें असेल तर 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः' 'स्वधर्मे निधनं श्रेयः' 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दन्ति मानवाः' 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ' इत्यादि गीतावाक्यानुसार कर्म करावयाचें व 'श्रद्धावाँल्लभते ज्ञानं' या उपदेशानुसार सद्गुरूवर अमर्याद श्रद्धा भक्तिपुरःसर ठेवावयाची, व ते सांगतील त्याप्रमाणें महावाक्यांचें चिंतन एकाग्र व एकनिष्ठेनें करावयाचें, ह्या गोष्टी आधीं सिद्ध करून घेतल्या पाहिजेत. वेदवाक्यें अपौरुषेय आहेत. तीं वाक्यें पुरुषकृत म्हणजे विकारवश माणसांनीं केलेलीं नाहींत. **श्रद्धालु, मुमुक्षु व ज्ञानी पुरुषांस स्वानुभवी साक्षात्काराच्या ईश्वरी प्रसादानें जीं मंत्र-**

**वाक्यें उपलब्ध झालीं व लोकसंग्रहाप्रीत्यर्थ जीं सिद्धमुखांतून गंगानदी-प्रमाणें बाहेर पडलीं, त्यांचा संग्रह म्हणजेच श्रुतिमंत्र आहेत.** अतएव ते अपौरुषेयच आहेत. असो; तेव्हा गुरूंच्या ठिकाणीं एकनिष्ठ पूज्यभाव, श्रुतीवर पराकाष्ठेची श्रद्धा आणि त्या सृष्टिस्थितिप्रलयकारी दयाळु पण निर्विकारी परमात्म्यावर अखंड ज्ञानपूर्वक प्रेम, हीं सज्ज असलीं, गुरु सांगतील तसें आनंदानें वागण्याची अनिवार हौस असून उत्तम प्रकारचें विषयवैराग्य बाणलें, म्हणजे गुरुमुखांतून निघणाऱ्या मोक्षद ज्ञानसरस्वतीचा प्रवाह प्रेमाच्या अनिवार जोरानें बाहेर निघून शिष्यगत अज्ञानपर्वताचा भेद करितो; आणि शिष्याच्या अंतःकरणांत असलेली श्रद्धापूर्वक जिज्ञासा व ज्ञानपूर्वक मुमुक्षा या दोन पवित्र गंगायमुना नद्यांस मिळतो. हा त्रिवेणी-संगम झाला म्हणजे ज्ञानसूर्याचा उदय होतो व कार्यसिद्धि होण्याचीं कारणें स्पष्टपणें आविर्भूत होतात. हें झालें म्हणजे गुरुस्वरूपाचें श्रद्धापूर्वक अखंड चिंतन आणि त्यांनीं सांगितलेल्या ब्रह्मज्ञापक महावाक्यांचे श्रवण, मनन व निदिध्यास हीं सर्व अभंगत्वानें चाललीं, म्हणजे व परब्रह्माचा साक्षात्कार झाला म्हणजे 'भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे (हृदयग्रंथीचा भेद होऊन सर्व संशयांचा उच्छेद होतो. त्याचीं सर्व कर्मे संपतात.) 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' या वचनान्वये मोक्षस्थिति प्राप्त होते. हा अवघड गड सर होण्याला सद्गुरुस्वरूपाचा श्रद्धापूर्वक पूर्णसाक्षात्कार, परमात्म्यावर अनन्यनिष्ठा, हीं अवश्य हवींत, हें पुनः पुनः सांगण्याचा उद्देश हा आहे कीं, सद्गुरूवर व ईश्वरावर निष्ठा असली म्हणजे विषयोपभोगांचें अनुसंधान मुळींच राहावयाचें नाहीं. ६० हजार वर्षे तपश्चर्या करून विश्वामित्र फसले, एवढाले इंद्रचंद्रादि देव दुष्ट कामाच्या नारकी झराव्यांत सांपडून निंद्यत्व पावले, गौतमानें आपली तपोराशी मातीमोलाची करण्याला कारण त्याचा क्रोध झाला, इत्यादि उदाहरणें लक्ष्यांत ठेवून संतांवर निष्ठा, परमेश्वरावर प्रेम आणि ज्ञानावर-ब्रह्मज्ञानावर-पूर्ण श्रद्धा ठेवावी, महावाक्यांचें चिंतन करावें व आपलें वर्तन लोकसंग्राहक होईल असें ठेवावें.

४ ब्रह्मज्ञान अतींद्रिय असून अलौकिक आनंद देणारें आहे; तेव्हां हें ज्ञान देण्याचें महत्कार्य श्रुतिरहस्यांचा साक्षात्कार अनुभवणाऱ्या तत्त्वदर्श्यांकडूनच झालें पाहिजे. 'अशब्द-मस्पर्शमरूपमव्ययं। तथाऽरसं नित्यमगंधवच्च यत्॥ अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवं (शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्याहून विलक्षण आणि म्हणूनच कर्णनेत्रादि ज्ञानेंद्रियांस अगोचर असणारें अव्यय, नित्य, अनादि, अनंत, महताच्या पलीकडचें व ध्रुव) असें ब्रह्मत्व' समजून देण्याचें काम आमच्या पार्थिव शरीरांचीं बिचारीं सोपाधिक इंद्रियें किंवा मन व बुद्धि काय करणार? ही आपलीं ज्ञानेंद्रियें अनित्य विषयांचें उपभोगात्मक ज्ञान करून देण्यांत पटाईत आहेत; कदाचित् विषयांच्या व्यावहारिक स्वरूपाचें व्यवस्थित ज्ञानही यांच्याकडून मिळेल, पण 'इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यो परं मनः। मनसस्तु परा

बुद्धिर्योबुद्धेः परतस्तु सः' हा जो परमात्मा, याचें ज्ञानविज्ञान होण्याला श्रद्धापूर्वक वेद-वाक्याचें–अपौरुषेय व अलौकिक मोक्षद मंत्रांचें–अधिग्रहण यांच्या करवीं होणें प्रायः असाध्यच होय. हें कार्य योग्य श्रीसद्गुरुंकडूनच झालें पाहिजे. म्हणजे अधिकारानुसार समाजपोषक व आत्मोन्नतिकारक वर्णाश्रमधर्माचें ज्ञानविज्ञान होऊन 'आपला आत्मा' अमर आहे, असा निश्चय होतो. स्वतःकरितां, कुटुंबपोषणार्थ, समाजपुष्टीस्तव व ईश्वरानुग्रहार्थ नित्यनैमित्तिकांच्या भाविक आचरणांचें फल येथें मिळालें नाहीं, तरी तें स्वर्गांत मिळतें असा निश्चय होतो. पुढें 'यो यच्छ्रद्धः स एव सः' व 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' ह्या वाक्यांची प्रतीति येऊन, आपण वेद-विहित कर्म केलें तरच आपल्यास येथें व परत्र सुख मिळेल ही श्रद्धापुरःसर बुद्धि निर्माण होते. सारांश, 'अयं लोको नास्ति पर इति मानी' असें मानणाऱ्या नास्तिक-पंथाच्या पुढें जाऊन 'स्वर्ग' आहे अशी 'प्राप्य पुण्यकृतॉंल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः' या श्रीकृष्णवचनावरून श्रद्धा उत्पन्न होते. चिरकाल सुख देणारें तें पुण्य व चिरकाल दुःख देणारें तें पाप, असा तारतम्यानें विनिश्चय होऊन हा आमचा मुमुक्षु जीव कांहीं वर्षें स्वर्गांत कृतकर्मानुसार सुख अनुभवितो; आणि 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' पुण्यकर्म फल संपतांक्षणीं पुनः मृत्युलोकांत कर्म करण्यासाठीं येतो. हा कर्मठ मार्ग आहे. या मार्गानें उद्यमी जीवात्म्याला बरेंच ज्ञान व विज्ञान प्राप्त होतें. सामान्य मनुष्यांपेक्षां यांचें ज्ञान जास्त सुसंस्कृत आणि याचें आचरण जास्त साधुभावाचें असतें. पण ह्या स्वर्गस्थ व येथील विषयसुखाचा पूर्ण अनुभव घेण्यासाठीं हजारों जन्म घेतलेल्या मुमुक्षूंस केव्हां तरी एकदां असें आढळून येतें कीं, हें विषयसुख (मग तें स्थूलविषयांपासून प्राप्त होणारें स्थूल सूक्ष्म सुख असो वा सूक्ष्मविषयांपासून होणारें सूक्ष्म स्थूल सुख असो.) अंतिम समाधान देणारें नाहीं, या सुखाला भरती ओहोटी असून ती हीं आपल्या स्वाधीन नाहीं. शिवाय, व्यवहारांत हें सुख नसलें तर तें नाहीं म्हणून दुःख, व असलें तरी तें नाहींसें होईल कीं काय, असें भीतिजन्य दुःख असतें! एवंच जीवात्म्याची तळमळ शांत होत नाहीं, असें एक प्रकारचें आनंददायी वैराग्य स्वानुभवानें उत्पन्न होत असतें. हें वैराग्य दृढ होत चाललें म्हणजे मग 'मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः' या भगवत्सिद्धांताचा अनु-भव येतो; म्हणजे हीं विषयसुखें फार तर बुद्धीपर्यंत प्रवेश करून तेथें कांहीं काळ मात्र जिवंत राहतात, आत्मारामापर्यंत त्यांचा शिरकाव होत नाहीं, हें त्याला स्पष्टपणानें कळतें. तसेंच हीं सुखदुःखें होत असतां जीवात्मा सुखदुःखी होतो असें वाटत होतें, तो **भ्रम** असून आत्मा सदैव निर्विकार असतो, असें गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे, त्याची अंधुक साक्ष पटते. अर्थातच आत्मा हा विषयाहून शरीराहून, इंद्रियांहून, फार तर काय? पण अहंकाराहूनही विलक्षण आहे असा विचारदृष्टीनें अनुभव येऊं लागतो. झालें! याप्रमाणें विषयसुखासंबंधी तर अत्यंत तिट-कारा आला. पण विषयापासून विभक्त कसें व्हावें, देहांत राहून देहातीत वृत्तीनें कसें रहावें, आत्मसुखाचा अनुभव कसा घ्यावा, हें त्यास स्वतःच्या बुद्धीनें समजत नाहीं. येथें

पुनः गुरूच्या साहाय्याची अपेक्षा आहे. तीव्र इच्छा उत्पन्न झाली कीं, कोणत्या तरी दृश्य, अदृश्य, चराचरस्वरूपानें गुरु अथवा गुरुतुल्य प्रेरक विचार, प्रकट होतो आणि पुनः मंत्रोपदेश करितो. त्याच्या अनुग्रहानें व श्रुतिपरिशीलनानें असें स्पष्ट समजतें कीं, आत्मा हा दृश्यविलक्षण व विषयविलक्षण आहे. ह्या विषयापासून व इंद्रियांपासून–सारांश मायेपासून आपल्यास परमेश्वरी साहाय्यानें त्या सोपाधिक आत्म्याचा भास आहे असें वाटणाऱ्या जीवाला सोडवितां येईल. या वेळींही श्रीगुरुजी पुनः नित्यनैमित्तिक व लोक-संग्राहक कर्में वर्णाश्रमधर्मानुसार करावयास सांगतात; त्यांत 'असक्तः सततं कार्यं कर्म समाचर' हा विशेष आहे. म्हणजे पूर्वीं वैदिक कर्में व शास्त्रोक्त कर्में कां होतना, पण अभिमानपूर्वक व वासनायुक्तत्वानें करीत होता. त्यांतील अभिमान व वासना काढून टाकून द्यावयाची असा उपदेश गुरुजी करितात. 'असंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा' हा उपदेश लक्ष्यांत घेऊन, आपण प्रामाणिक ग्रंथांनीं व मंत्रानें विहित जीं कर्में करितों, त्यांच्याशीं संग ठेवावयाचा नाहीं हें ध्यानांत येतें. 'कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन' हें लक्ष्यांत घ्यावयाचें व कर्तव्य कर्म म्हणून करावयाचें; फलाशेनें करावयाचें नाहीं, अभिमानानें करावयाचें नाहीं, हा नवीन गुरुमंत्र गीतावाचकांच्या दृक्पथापुढें अनेक वेळां आलेला आहे. वेदोरूपानें, गुरूमुखानें अगर विवेकाज्ञेनें प्रकट झालेली परमेश्वरी आज्ञा सांगते म्हणून विहित कर्म करावयाचें, 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' हें तत्त्व ध्यानांत ठेवावयाचें, आणि परमेश्वरावर निःसीम प्रेम करून त्याला आवडेल तेंच शास्त्रोक्त कर्म निःसंगत्वानें म्हणजे जयापजयाविषयीं उदासीन राहून करावयाचें, ह्या मार्गाचा स्वीकार आमचा मुमुक्षु करितो.

५. फलत्यागान्वित कर्मानें ह्याप्रमाणें कांहीं काल घालविल्यानंतर, क्षेत्र म्हणजे काय, ( पहा अ० १३ ) ईश्वराच्या परा, अपरा प्रकृति कोणत्या, ( पहा अ० ७ ) गुणांचें स्वरूप, त्यांचीं कार्यें, त्यांचें फल, ( पहा अ० १४ ) दैवीसंपत्ति व आसुरीसंपत्ति यांचें स्वरूप ( पहा अ० १६ ) इत्यादिकांविषयींचें मुमुक्षूचे ज्ञानाला व कल्पनेला विस्तृत स्वरूप येतें; हें विश्व व्यावहारिकदृष्ट्या काय आहे, त्याच्या उत्पत्तिस्थितिप्रलयांचीं कारणें कोणतीं व विश्वाचा व आपला संबंध किती व कसा, ह्या विश्वगत पदार्थांचे गुणधर्म काय ह्यांचें ज्ञान आमच्या एकनिष्ठ मुमुक्षूला परोक्षत्वानें होतें. नंतर 'क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं तत्तज्ज्ञानं मतं मम' या उपदेशानुसार एकाग्रमनानें हा जिज्ञासु चिंतन, मनन करितो. अर्थातच त्याला विश्वज्ञान कांहीं कालानंतर पूर्णत्वानें प्राप्त होतें. हें ज्ञान अत्यंत आवश्यकत्वानें संपादन केलें पाहिजे. विश्वनियमांची अकुंठित गति, त्यांचें एकरूपत्व, अविकार्यत्व, इत्यादिकांचें पूर्ण व निःशंक ज्ञानविज्ञान झाल्याखेरीज ब्रह्मज्ञानाचें चिंतन करण्याची पात्रता येत नाहीं, हें जितक्या लवकर आमच्या लोकांस समजेल, तितकें उत्तम आहे. आपल्या ज्ञानसाधनांस दार्ढ्य यावें, आपली पुरुषार्थदृष्टि बळकट व्हावी, अशी जर इच्छा असेल, तर अंतर्बाह्य विश्वाचें म्हणजे परा आणि अपरा प्रकृतींचें यथास्थित ज्ञान आपल्याला ह्या जन्मीं करून घेतलें पाहिजे, किंवा पूर्वजन्मीं तें झालें असलें पाहिजे. हें परापराप्रकृतींचें

ज्ञान व विकसित विचारदृष्टि असली व नसली म्हणजे काय भिन्नता होते, ती पहाः ब्रह्म-जिज्ञासेनें विरोचन राक्षस व देवपति इंद्र ब्रह्मदेवाला शरण गेले व त्यांनीं 'अधीहि भगवो ब्रह्म' अशी त्याची प्रार्थना केली. तेव्हां 'अन्नं ब्रह्म; तद्विजिज्ञासस्व' असा ब्रह्मदेवांनीं उपदेश केला असतां विरोचन अन्नोपभोगांत निमग्न होऊन राहिला व नाश पावला, हें कथानक उपनिषद्वाचकांस अवगत आहेच. आपली सद्यःस्थिति विरोच-नाहूनही जास्त विलक्षण झाली आहे. ज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान असें आपण समजतों, हें ठीक आहे; पण ज्ञानांत विश्वज्ञानाचा अंतर्भाव करीत नाहीं, हें मात्र ठीक नाहीं. 'येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि' हा भगवदुपदेश आहे. 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्र मिह विद्यते' असें हें पवित्र ज्ञान–ब्रह्मज्ञान, विश्वज्ञान व आत्मज्ञान–याचा आम्हीं परित्याग केला व 'मा ते संगोस्त्वकर्मणि' हा उपदेश झुगारून देऊन आलस्यामध्यें आसक्त झालों ह्मणून आमचा परमार्थ बुडाला, आणि तो बुडाला ह्मणून आमचा स्वार्थही नाहींसा झाला, अशी आमची आधुनिक स्थिति आहे! असो; सांगावयाचें रहस्य हें कीं, ब्रह्मज्ञानाला म्हणजे आत्मज्ञानाला साक्षात् किंवा परंपरया बळकटी देणारें जें विश्व-ज्ञान, त्याचें आपण यथास्थित चिंतन केलें म्हणजे आमच्या बुद्धि सूक्ष्म पण दृढ होतील व आमची कर्तव्यनिष्ठा जोरदार होईल. असो; याप्रमाणें बुद्धयादि सर्व अंगोपांगें दृढ झाली म्हणजे कृपाळू श्रीसद्गुरुराज प्रसन्न होऊन आपल्याला–मुमुक्षूला–उपदेश करितात कीं, "('अविनाशी वाऽरेऽयमात्माऽनुच्छित्तिधर्मा' [पहा बृहदा. ४–५–१४] हा आत्मा अविनाशी असून अव्यय, निरंजन, निर्विकार आहे.) तसेंच 'न जायते म्रियतेऽवा कदा-चिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः। अजो नित्यःशाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे' हा श्रीकृष्णोक्त उपदेश ज्या विषयीं करितात, तो आत्मा, नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त असा आहे. तो आनंदरूप व ज्ञानरूप आहे. तो एकच एक असून अद्वितीय आहे. त्याच्या सत्तेनें हीं सर्व अनंत कोटी ब्रह्मांडें उत्पन्न होऊन ब्रह्मामध्येंच विलयाला जातात. जीवात्मा हा परमा-त्माच आहे. व्यावहारिक दृष्टीनें मात्र तो 'ममैवांश आहे' जीवशिव एक, एकात्मकच आहेत, असें ज्ञानविज्ञान होणें हा परम पुरुषार्थ आहे (ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा विशते तदनंतरम्). जीवात्मा व परमात्मा एकच आहेत, असा निश्चय जोपर्यंत झाला नाही तोंपर्यंत निरवधि सुखरूप तर मिळणार नाहींच, पण या जगांतील जी सुखदुःखें आहेत, जी तळमळ आहे, जें अज्ञान आहे, जें विकार्यत्व आहे, जे शोकमोह आहेत, तेही सर्वथा नष्ट होणार नाहींत. सारांश, उपनिषत्कथित व गीताप्रणीत जें 'एकमेवाऽद्वितीयं' हें ज्ञानविज्ञान आहे, हें मिळ-विणें आणि अस्तिरूप म्हणजे ज्ञानरूप म्हणजे सुखरूप होणें हा पुरुषार्थ आहे व वेदविहित आचरणानें श्रीसद्गुरूच्या साहाय्यानें आणि परमेश्वरी कृपेनें मात्र तो साध्य होणार आहे." हा श्रीगुरूचा उपदेश केव्हांही विसरतां उपयोगी नाहीं.

पण हा नुसता उपदेश झाला; नुसतें श्रवण झालें. ह्यानें–ह्या श्रवणानें–सर्व संशय-निवृत्ति होते असा भाग नाहीं. उलट जीवात्मा व परमात्मा एक कसे असूं शकतील एतद्विषयीं

मन शंकाकुल होतें. गुरूपदेशानें व ग्रंथश्रवणानें आणि युक्तिपद्धतीनें ऐक्य प्रस्थापितां येतें हें खरें, 'पण सर्व भूतें आपल्यामध्यें व सर्व भूतांमध्यें आपण, तसेंच आपणच परमेश्वर' असें सर्वत्र जोंपर्यंत दिसूं लागलें नाहीं, तोंपर्यंत गुरूपदिष्ट ज्ञान परोक्षच असतें. ह्याला योगसहित मनन आणि निदिध्यासनं अवश्य आहेत. पुनः, या ऐक्यस्थापनेला भक्तीची, ऐकांतिक भक्तीची, पराभक्तीची अत्यंत आवश्यकता आहे. कर्मानें भोगविषयक अज्ञान नष्ट होईल कदाचित्; पण भक्तियोगाचें साहाय्य जोंपर्यंत नाहीं, 'जनीं वनीं' जोंपर्यंत सच्चिदानंद ब्रह्माचें स्फुरण होऊं लागलें नाहीं, तोंपर्यंत इष्ट कार्य होत नाहीं. याकरितां भक्तिपूर्वक अखंड ध्यान हा विहित मार्ग आहे. 'समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां। भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चाऽस्मि तत्त्वतः' ही स्थिति जर हवी असेल, ब्रह्म व्हावयाचें असेल तर 'मच्चित्तः सततं भव' हा पंथ स्वीकारला पाहिजे. ध्यानपंथ जसा जास्त रूढ होईल तसतसें ईश्वरावरील प्रेमही निःसीम होऊन अंतःकरणांतील सर्व किल्मिषें अशेषतः बाहेर पडतील आणि जीवाला अभिनव शांति मिळेल. याप्रमाणें निर्झरोदकतुल्य आपलें मन स्वच्छ झालें, संकल्पविकल्प संपले, कार्यकारणभाव हरपला, कालस्थलादि उपाधि गडप झाल्या म्हणजे त्या स्वच्छ अंतःकरणाच्या शुभ्र पटावर परमेश्वराचें शुद्ध बिंब यथारूप प्रकट होऊन जीवाची बुद्धि (स्वयंप्रकाश चित्कलाच ती) त्या महाभासमान, महातेजस्वी आत्मप्रकाशामध्यें विरून जाते आणि जीवशिवांचें ऐक्य होऊन ती लोकहितकारी व्यक्ति, तो मुमुक्षु, पुरुषार्थ मिळवितो, मुक्त होतो; 'लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः। छिन्न द्वैधा यतात्मानः सर्व भूतहिते रताः' सारांश, तो निर्वाण पदवीला, सच्चिदानंदाच्या अखंड स्वरूपाला जाऊन मिळतो.

६ ह्यावरून हें स्पष्ट झालेंच कीं, मोक्ष नामक पुरुषार्थ मिळविण्यासाठीं जीवाला ज्ञानपूर्णता (Intellectual perfection.) आणि वृत्तिपूर्णता (Emotional perfection.) यांचा अधिलाभ झाला पाहिजे. बुद्धि आणि वृत्ति यांची एकवाक्यता झाली पाहिजे. मस्तकामध्यें वास्तव्य करणारी बुद्धि आणि हृदयांत अधिवास करणारी मनोवृत्ति (Emotions) या उभयतांस पूर्णत्व येऊन हीं दोन्ही एकरूप झालीं पाहिजेत. बुद्धि (Intellect) वासना (will) आणि मनोवृत्ति (feeling) ह्यांचा एक जीव होईल, तेव्हां जीव एकरूप होईल. या तिघांचा एकजीव होण्यासाठीं त्यांस पूर्णत्व दिलें पाहिजे. अखंड ज्ञानप्राप्ति ही बुद्धीची पराकाष्ठा, आत्म्यावर अखंड दृढ प्रेम ही वृत्तींची पराकाष्ठा आणि अखंड अस्तित्व ही वासनेची पराकाष्ठा. तेव्हां सच्चिदानंदाचें ऐक्य वठविण्यास या तिनही वृत्तींची एकवाक्यता, एकार्थता झाली पाहिजे. आतां, मूळांतच त्या एकरूप आहेत; म्हणून यांच्या भिन्न भिन्न उन्नतींत फारसें वैषम्य आढळून येत नाहीं; ज्ञानाची पराकाष्ठा होत असतां भक्तिवृत्ति क्षीणवृत्तीनें राहील, असें सहसा होत नाहीं; किंवा भक्तीचें अंतिम स्वरूप दृग्गोचर होत असतां ज्ञानवृत्ति स्वस्थ बसेल असेंही नाहीं. एक वृत्ति वाढीला लागली म्हणजे दुसरीलाही उन्नत स्वरूप प्राप्त होतें. विश्वव्याप

व्यवस्थेनें वाढत गेलें तर ईश्वरी भाक्ति दृढतर होत जाते व भाक्तिवृत्तीला भरती आली तर ज्ञानवृत्तीचा परिपोष होतो असा पूर्वी अनुभव येत असे, पुढेंही येईल; सध्यां मात्र ज्ञानाच्या अव्यवस्थित फुगण्यानें ईश्वरी भक्ति कोठें कमी झाल्यासारखी दिसते व भोळया व भाविक भक्तीच्या अमर्याद लडपणानें ज्ञानवृत्ति किरकोळ झाल्यासारखी दिसते. हा अपवाद आहे पण तो नश्वर व क्षणभंगुर आहे. विश्वसौंदर्य पाहून घेत असतां, विश्वपतीच्या कौशल्याला लुब्ध होऊन आपलें प्रेम कसें वाढतें हें तज्ज्ञांसच विचारावें. असो; या एकस्वरूपी पण भिन्न तऱ्हेनें प्रकट होणाऱ्या वृत्ति एकमेकांवर संस्कार व प्रतिसंस्कार करीत असतात आणि सामान्यतः सर्वांचीच वाढ होते.

७ येथपर्यंत जिज्ञासु मुमुक्षूचें मार्गक्रमण आपण पाहिलें व त्याला सद्गुरूची व ईश्वराची कृपा केव्हां व कशी संपादन करून घ्यावी लागते, याचाही विचार केला. जर बळकट जिज्ञासा आहे व मोक्षाची खंबीर इच्छा आहे, तर तो जिज्ञासु मुमुक्षु केव्हां तरी मुक्त व्हावयाचाच. वाटेंत हजारों अडचणी आल्या, परिस्थितीनें वाटेल तितका प्रतिरोध केला, तरी निश्चयाचें बळ ज्याजवळ अभंग आहे, तो परमपदाला जाऊन पोहोंचलाच पाहिजे. 'मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः' असें भगवंतांनीं दोनदां सांगितलें आहे. तात्पर्य हें कीं, मनुष्यकोटींत जन्म घेऊन जो जिज्ञासेच्या व मुमुक्षुत्वाच्या कांसेला लागला, तो मुक्त झालाच पाहिजे. आतां त्याला जरी स्वज्ञानानें व स्वकर्मानें हा मोक्षमार्ग कंठावा लागतो, तथापि मागें एक दोन वेळ सांगितल्याप्रमाणें त्याला उत्कट इच्छा झाली असतां गुरुकृपेचा लाभ होतो; निदान त्याच्या चिंतनिकेंत त्याला कांहीं कठीण प्रश्नांच्या उत्तराचीं उत्तरें तरी मिळतात व ह्या–बाह्य–बाह्य कसल्या? आंतरच म्हणावयास हरकत नाहीं–साहाय्यानें विश्वव्यवस्थेचें बरेंचसें खरें चित्र त्याच्या ज्ञानचक्षूंस दृग्गोचर होतें. हा मोक्षाचा मार्ग आक्रमण करीत असतां मुमुक्षूला याप्रमाणें क्रमशः सौकर्य प्राप्त होतें. 'पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियतेऽवशोऽपि सः' येथें तरी भगवंतांनीं हेंच सांगितलें आहे. आमच्या आर्यलोकांच्या तत्त्वज्ञानाचा इतिहास पाहिला असतां जे अनेक पंथ व जीं अनेक दर्शनें उपलब्ध होतात, त्यांचें रहस्यही पण हें आहे कीं, भिन्न भिन्न मुमुक्षु आपल्या ज्ञानसंग्रहानें व इच्छासामर्थ्यानें मोक्षमार्गाचें आक्रमण करीत असतां भिन्न भिन्नकालीं निरनिराळ्या मुमुक्षु पुरुषांस कोणत्या प्रेरणा झाल्या, यांचाही संकलित इतिहास म्हणजे आमच्यांतील भिन्न पंथ व भिन्न दर्शनें होत.

आमच्या इकडील कांहीं उतावळे पुरुष 'श्रुतयश्च भिन्नाः स्मृतयश्च भिन्ना नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणं' म्हणूं लागले आहेत व अलीकडील स्वार्थैकपरायण आणि भोगैकतृप्य पुरुषांस तर 'या ब्रह्मघोंटाळ्याच्या देशांत कुठले आपण जन्माला आलों' असें पश्चात्तापपूर्वक वाटतें. पाश्चात्य लोकांनीं तर अनेक वेळां आमच्या धर्माची, शास्त्रीयज्ञानाची आणि

तत्त्वविचारांची आपल्या भाविक दुराग्रहाच्या समाधानास्तव टर उडविली आहे; व (१) तीच टर घेऊन, (२) आमच्या उदरंभरी भिक्षुकांचें व उपदेशकांचें गलिच्छ वर्तन पाहून; आणि (३) आपलीही सर्वस्वी हीनदशा देखून, कित्येक अर्वाचीन अर्वाच्य लेखकांनीं व वक्तयांनीं तर नाहीं नाहीं तसल्या घाणेरड्या टीका करण्यास आरंभही केला आहे! ह्या सर्वांच्या समाधानार्थ एखादें 'रामबाण पेय' काढण्याचें माझें सामर्थ्य नाहीं हें खरें. पण या सर्व वावदूक जिज्ञासूंस माझी सविनय विनंती आहे कीं, त्यांनीं निष्पाप मनानें एकवार सर्व दर्शनें व त्यांवरील भाष्यें वाचून पहावींत; त्याचप्रमाणें पुराणें, उपपुराणें, हे ग्रंथही वाचून पहावेत; ज्या कालांत हे ग्रंथ निर्माण झाले, त्या कालांतील विशिष्ट शंकांचें समाधान करण्यास हीं साधनें योग्य होतीं कीं नाहीं, याचा विचार करावा आणि 'सुधारलेल्या' पाश्चात्य देशांत अशाच प्रकारचा, पण येथल्याहून कमी दर्जाचा प्रकार झाला कीं नाहीं हें पहावें. हें त्यांनीं निष्पाप मनानें पाहिलें तर, उपनिषद्ग्रंथांत भविष्यत्-पंथांचीं व दर्शनांचीं बीजें आहेत, हें त्यांच्या लक्षांत आलें तर, त्यांस असें समजेल कीं, विचाराची उन्नति होत असतां ज्या अनेक क्रांत्या होतात, अनेक मतांतरें होतात, त्याचें स्पष्ट, स्वच्छ आणि मूर्तिमंत चित्र हवें असल्यास तें आमच्या येथें मात्र सांपडेल. सारांश, कोणत्याही वर्णांतील व कोणत्याही आश्रमांतील कसलाही पुरुष जिज्ञासु व मुमुक्षु प्राप्त झाला असतां त्याचें समाधान करील व त्यास समजेल, असा एकना एक तरी पंथ आमच्या येथें विद्यमान आहे. माझा पक्का निश्चय झाला आहे कीं, कोणत्याही धार्मिक अपेक्षेच्या पुरुषाची धार्मिक आकांक्षा पूर्ण करणारा एक तरी पंथ आमच्या येथें आहे. सारांश, ईश्वरप्राप्तीसाठीं अवश्य असणाऱ्या धर्मप्रीत्यर्थ आम्हांस धर्मांतर करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. पुनः, जे अनेक पंथ आहेत व अनेक दर्शनें आहेत, त्यांच्या व्यवस्थित परिशीलनानें सत्त्वादि प्रधान बुद्धिविशेषांस निर्विशेष होण्याला, बुद्धीला स्थितप्रज्ञत्व देण्याला आणि मोक्षमार्ग सौकर्यानें अनुसरण्याला, उत्तम प्रकारची सोय होते, हा विशेष लाभ आहे. अद्वैतवेदांताला तर कोणत्याही पंथाशीं किंवा दर्शनाशीं विरोध करण्याचें कारणच नाहीं. कारण तो सर्व ज्ञानाचा व सर्व कलांचा मुकुटमणी आहे; तो सर्वाधार, सर्वनियामक व सर्वपर्यवसान आहे; म्हणून त्याला कोणाशीही विरोध करण्याचें कारण नाहीं. पहा कीं, भली मोठी इमारत रचतांना पाया, भिंती, खांब, तुळया, आढें, इत्यादिकांची अवश्य जरूर असते; प्रत्येक भाग आपापलें नियमित कार्य उरकीत असतो. तेव्हां त्या इमारतीला कोणत्याही भागांशी विरोध करितां येत नाहीं, इतकेंच नव्हे तर इमारतीच्या दृष्टीनें प्रत्येकाचें काम घेऊन व सर्वांचा प्रत्येकाशीं व आपल्याशीं मेळ घालून सर्व डोलारा व्यवस्थित करावयाचा असतो; तसाच अद्वैताचाही प्रकार आहे. मात्र खांब किंवा तुळया, हेंच आपलें पर्यवसान आहे, असें जसें इमारतीस मानितां यावयाचें नाहीं, तसेंच चार्वाकादि शुद्ध आधिभौतिक तत्त्वज्ञांपासून तों शुद्धाद्वैती वल्लभाचार्यांपर्यंतच्या प्रत्येक पंथाचें व प्रत्येक दर्शनाचें अभियुक्तत्व जाणून व केवलाद्वैताखेरीज प्रत्येक पंथ एकदेशी आहे असें समजून ब्रह्मज्ञानाचा पंथ आक्रमिला पाहिजे. ज्या वृत्तीस जो पुरुषार्थ इष्ट असेल,

तो साध्य करून घ्यावयाचा व पुढें जावयाचें ही जी मानवी इच्छा तिची परिसमाप्ति 'एकमेवाद्वितीयं' 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' येथें होऊन इच्छा, ही ज्ञानरूप व सुखरूप झाली म्हणजे कार्य संपतें, ज्ञान होतें; आणि मुक्तिही मिळतें. प्रत्येकानें कुटुंबाच्या उन्नतीसाठी आपापलें योग्य कर्म योग्य रीतीनें बजाविलें म्हणजे जसें कुटुंब-पोषण उत्तम होऊन प्रेमरसानें परिपूर्ण अशी कुटुंबोन्नति होते, किंवा समाजांत व राष्ट्रांत तसें आचरण झालें तर समाजोन्नति किंवा राष्ट्रोन्नति होते, तसीच प्रेमरसानें सर्व पंथांचा मेळ घालून जीवाची आत्मोन्नति करण्याचा अद्वैताचाही हेतु आहे. श्रेष्ठकनिष्ठत्वाचा येथें प्रश्न नाहीं, 'स्वे स्वे कर्मण्यभिरतत्वाचा' सर्व भाग आहे. तेव्हां जावत्कालपर्यंत 'मीच श्रेष्ठ' असा कोणताही पंथ परमार्थदृष्टीनें ह्मणत नाहीं, तोंपर्यंत त्या त्या पंथाकडून स्वकर्म करून घ्यावयाचें व 'न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्' हें व्रत ज्ञानपूर्वक चालवावयाचें हें अद्वैतसिद्धांतांचें अबाधित, व अगाधमहात्म्याचें 'बिरुद' च आहे. श्रुतींत, पुराणांत, हाच अनुवाद आहे. 'यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः । प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः' असें गीतेंतही सांगितलें आहे. 'अधिकारा ऐसे दावियेले मार्ग । चालतांना मग कळों येतें ।' अशी श्री साधुवर्य तुकाराम महाराजांची वाणीही हेच सांगण्यासाठीं अभंग-रूपानें अवतीर्ण झाली आहे. सर्वांचें तात्पर्य एकच आहे, ते हेः 'सच्चिदानंदरूपी मोक्ष एकच आहे. त्याचा मार्गही एकच आहे: तो हा कीं, ब्रह्मज्ञानानें अविद्येचा भेदबुद्धीचा, व्यक्तित्वाचा, सांतत्वाचा नाश करावयाचा आहे. हें तत्त्व लक्ष्यांत ठेवून व आपापल्या स्वभावसिद्ध बुद्धिविलासाप्रमाणें आपापला शक्य तो पुरुषार्थ ठरवून तो सिद्ध करावयाचा आणि पुढें मार्गक्रमणा करावयाची. सारांश, येथें विरोध नाहीं, भासमान विरोध असेल, पण पारमार्थिकतः सर्व एकात्मकच आहे हें तत्त्व-हें अपूर्व आणि अश्रुतपूर्व तत्त्व-एका सनातन वैदिक आर्यधर्मामध्यें जितक्या तेजानें प्रकट झालें आहे, तितकें कोठेंच झालें नाहीं, हें आमच्या येथील धर्मसहिष्णुतेनेंही साहजिकतःच सिद्ध होत आहे. मात्र या 'सहिष्णुतेला' अलीकडे जे नेभळें स्वरूप आलें आहे, तें मात्र कालेंकरून नष्ट केलें पाहिजे. असो; हे नाना पंथ, व हीं नाना मतें, ईश्वरप्रणीत असून सर्वही सत्स्वरूप आहेत. सर्वांचा उपयोग आहे. 'उपयोग नसता व दुरुपयोग होत असता, तर त्या सर्वमंगल, सर्वदयाघन, आणि सर्वज्ञ विश्ववत्सलानें हीं भिन्नमतें कशाला निर्माण होऊं दिलीं असतीं?' असे प्रश्नमूलक विधान स्कंधपुराणांत आहे, तें सर्वथा सत्य आहे. कारण भिन्नभूमिकेवरील भिन्न लोकांच्या पुरुषार्थसिद्धीला त्याचा अत्यंत उपयोग असतो. शेवटीं हे सर्व अनेक पुरुषार्थ मुख्य पुरुषार्थाला येऊन मिळतात, हें सांगावयास नकोच आहे. श्रीकृष्णा नदीला ज्याप्रमाणें वेण्या, कोयना, भीमा, तुंगभद्रा इत्यादि नद्या मिळून पुढें ती महानदी समुद्राशीं एकस्वरूप होते, त्याप्रमाणें ह्या मोक्षमार्गाला येऊन मिळणाऱ्या गौण मार्गांचा प्रकार आहे. कृष्णाखोऱ्यांतील प्रत्येक पाण्याच्या ओहोळाला जसें कृष्णानदीसच मिळतां येत नाहीं म्हणून तो जवळचा ओढा अगर छोटेखानी नदी स्वीकारितो आणि शेवटीं कृष्णा नदीला आपला देह नामरूपासह अर्पण करितो, त्याचप्रमाणें प्रत्येक पुरुषाला प्रथमच अद्वैत-

सिद्धांतांचा प्रादुर्भाव करणाऱ्या वैराग्याचा किंवा अभ्यासाचा अवलंब करितां येणें अशक्य असते ह्मणून तो लहानसा पुरुषार्थ स्वीकारून साध्य करितो, आणि पुढें जातां जातां अभ्यास व वैराग्य संपादून घेऊन नामरूपासह आपले तिन्ही देहांचा व पंचकोशांचा आणि ज्ञान-विज्ञानांचा त्याग करून विश्वरूप होतो. **हा विश्वनियम हिंदुस्तानांतच समजला गेला.** इतर बुद्ध, ख्रिस्ती, महंमदी देशांत हें तत्त्व न समजल्यामुळें धर्मछलासारखे महा अनर्थ धर्माच्यापायीं झाले. असो: विचार जागृत ठेवा, त्याचा जिवंत झरा केव्हांही बंद करूं नका: आर्यधर्म तुमच्या आड कधींही येणार नाहीं. शुद्ध भावना असूं द्या, अद्वैत-वाद तुह्मांला केव्हांही प्रतिबंध करणार नाहीं.

८ आतां चार्वाकासारख्या महा नास्तिकांपासून तों जनकयाज्ञवल्क्यादि महा अस्तिकांपर्यंत येथें जे पंथ प्ररूढ झाले, त्यांचा इतिहास द्यावा व येणेंकरून आर्यमनो-वृक्षाची वाढ कसकशी झाली, हें पहावें असा विचार केला असतां तो फारसा फलद्रूप हो-ण्याची मुळींच आशा नाहीं. कारण, एक किंवा अन्य स्वरूपानें येथील विद्यमान व अविद्य-मान पंथ इतिहासाच्या आरंभापासून तारुण्यावस्थेंत म्हणजे जागृतावस्थेंतच आहेत असें दिसतें. ‘ पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ’ या न्यायानें ह्याचें अस्तित्वही योग्यच आहे, हें आतांच सांगितलें. तेव्हां या पंथांतील प्रमुख मतांचें संकलित स्वरूपाविष्करण करून हा विषयखंड आटपता घेतों. व्यावहारिक भाषेनुसार आतां उपक्रम करूं. जीवाची उत्पत्ति होऊन मनुष्ययोनी निर्माण झाली आणि या मानवी जातीच्या उन्नतिप्रीत्यर्थ नित्य प्ररूढ असणारे विधि व नियम प्रकट झाले म्हणजे मानवी प्राणी आपली देहयात्रा सुरू करतो. पण या बालवयस्क मानवी जातीला प्रथम प्रथम ऐहिक सौन्दर्याची, ऐहिक उपभोगांची स्वाभा-विकतःच विशेष आवड असले कारणानें शास्त्रोक्त नित्य विधिनियमांकडे त्याचें दुर्लक्ष्य होतें आणि अनाचार म्हणजे भोगैकव्यवहार वाढतो: पण याच वेळीं कित्येक मानवी जीवांस अनाचार आवडत नसल्यामुळें किंवा अनाचाराचा वीट आल्यामुळें ऐहिक भोगाहून निःशेष सुखप्रद अशा दिव्य भोगांची लालसा व दिव्य लोकांच्या ज्ञानाची जिज्ञासा उत्पन्न होते. ही लालसा व जिज्ञासा तीव्र झाली व या ‘ सात्त्विक ’ लोकांचा छल होऊं लागला म्हणजे ईश्वरी अवतार होऊन ‘ यदा यदा हि धर्मस्य ’ या न्यायानें अधिकारानुसार धर्मसिद्धांताचें व ब्रह्मसिद्धांताचें आविष्करण होतें. वेद प्रकट होतात आणि धर्मप्रचार जोरकस होतो. हें फल आलें म्हणजे अवतारी पुरुष निजधामास जातात आणि धर्म आणि ज्ञान यांची वाढ करण्याचें काम जातीवर येऊन पडतें. उघडच आहे कीं, स्वतंत्रता असल्यानंतर आपल्या ज्ञानाज्ञानाचा, मनोवृत्तीचा व कार्यक्षमतेचा जसा परिपोष होतो, तसा तो राजाश्रयानें, आचार्याश्रयानें किंवा ताताश्रयानें होत नाहीं. ‘ उद्धरेदात्मनाऽऽत्मानं ’ हा न्याय येथें लागू पडतो. अवतारी पुरुष निघून गेल्यावर कांहीं कालपर्यंत सर्व ठाकठीक चालतें. पण मानवाची उपभोगतृष्णा अनावर असते म्हणून कालांतरानें त्या त्या वर्णाचें कर्म उप-भोगपर व्हावयास लागतें आणि उपभोग वाढत असतांना आळसही वाढतो, त्याप्रमाणें

अज्ञानही वाढतें; म्हणून पुनः अनाचाराला सुरुवात होते. ' स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ' या सिद्धांतानुसार बुद्धियोग नष्ट होतो, अतींद्रिय सिद्धांतावरील विश्वास लुप्त होतो आणि कांहीं अपवाद खेरीज करून बाकीचे सर्व सामान्य लोक ' यद्दृष्टं तत्सत्यं ' या रोख्या सिद्धांताचें अनुसरण करितात. ज्या थोडया लोकांस वेदविज्ञानाचा विश्वास वाटत असतो त्यांची ही शोधकबुद्धि योगनिद्रेंतच असते. यामुळें वेदांत सांगितलेल्या कर्मकांडोक्त तंत्राची कवाईत मात्र केव्हां केव्हां बरोबर होते; पण या लोकांस ' तुह्मीं असें कां करितां किंवा आम्हांस असें करावयास कां सांगतां ? ' असें प्रश्नपूर्वक विचारलें तर ' असें करावें म्हणून सांगितलें आहे म्हणून आह्मी असें करितों ' यापेक्षां जास्त किंमतीचें उत्तर देतां येत नाहीं. धर्मप्रचारकांसच जेव्हां सोपपत्तिक ज्ञान नसतें, नुसता ' आंधळा विश्वास ' असतो, तेव्हां समाजांतील विचारी लोकांच्या मनांत या स्वार्थैकपरायण आणि नवविद्वेषी धर्मप्रवर्तकांचा व त्यांच्या पद्धतीचा इतका तिटकारा येतो कीं, हे विचारी लोक श्रुति, स्मृति, पुराणें, मंत्र, तंत्र इत्यादि सर्व अतींद्रिय वस्तूंस अविचारानें झुगारून देतात! इतकेंच काय, पण इंद्रियांस अदृश्य असे जे अनुमानप्रमाणसिद्ध सिद्धांत, त्यांचाही अव्हेर करितात! या लोकांचें भगवंतांनीं ' असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरं ' या सोळाव्या अध्यायांतील ८ व्या श्लोकापासून १८ व्या श्लोकापर्यंत खासें वर्णन केलें आहे. वेदश्रुति लोपल्या, तेव्हां मरण हाच मोक्ष, उपभोग हेंच सुख असा आनिवार समज झाला, म्हणजे उपभोगैकपरायण नास्तिकांचा पंथ प्रादुर्भूत झाला असें समजावें. हेच चार्वाक होत. ' देह हाच आत्मा ' असें म्हणण्यामध्यें नास्तिकत्वाचा कळस होतो. लोकायतिक मत तें हेंच होय. **' इंद्रियें हें एकच सत्यान्वेषणांचें साधन, प्रत्यक्ष हेंच प्रमाण, देह हा आत्मा, मरण मोक्ष, उपभोग हेंच सुख आणि राजा हा देव '** ह्या क्षणभंगूर सिद्धांतावर त्यांची आयुष्ययात्रा चालते.

## उपनिषत्काल.

९ पण जिवंत समाजांत हा समज कधींही चिरंतन होऊं शकत नाहीं. ' उपभोगानें सुख मिळत नाहीं, विषयत्यागानें सुख मिळतें ' हें व ' त्यागेनैकेऽमृतत्वमानशुः ' हें तत्त्व ज्या समाजांत जोरानें प्रचलित नाहीं, तो समाज कधींही जोरकस असणार नाहीं. अर्थातच वरील उपभोगैकव्रताचे अभिमानी जे चार्वाकादिक लोक त्यांचा पंथ थोडयाबहुत दिवसांत बलहीन होतो. कारण समाजांतील विचाराचा शुद्ध ओघ कधींही सर्वथा बंद होत नाहीं. ह्या विचाराच्या साहाय्यानें जुन्या व नव्या लोकांत मतक्रांति होऊं लागते तों, पुनः ईश्वरी अवतार होऊन हा महापुरुष असें स्पष्ट प्रतिपादितों कीं, ' तुम्हांस जर खरोखर येथील किंवा स्वर्गांतील क्षणभंगूर व कालभंगूर विषयसुखाचा खरा तिटकारा आला असेल, शोकमोहापासून तुम्हांला खरोखर परावृत्त व्हावयाचें असेल, सदैव परिभ्रमण करणाऱ्या जन्ममरणात्मक दुःखद चक्रांतून तुह्मांला जर खरोखर

मुक्त व्हावयाचें असेल आणि पुनः जन्म न येणाऱ्या परमपदाला जाऊन शुद्धानंदाचा निरामय आस्वाद घ्यावयाचा असेल, तर वस्तुस्थिति कशी आहे, ती तशी कां आहे, याचें पारमार्थिक ज्ञान तुह्मांला करून घेतलें पाहिजे.' 'श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप' हें तत्त्व सांगून पुनः 'मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहं' हें जें जगदुत्पत्तीचें तत्त्व त्याचें दिग्दर्शनही सांगून तें प्रत्यक्ष कसें करून घ्यावें याची गुरुकिल्लीही सांगून देतो. या अवतारानें उन्नतमनस्क होऊन वेदमार्गानेंच जे जुने लोक या तत्त्वाचा विचार करितात, व वेदांस अनुकूल तेच सिद्धांत खरें, असा ज्यांचा समज असतो व श्रद्धा असते, ते लोक विचार करितां करितां समाधिस्थ झाले म्हणजे त्यांस ईश्वरी प्रेरणा होऊन उपनिषद्ग्रंथांचा अवतार होतो आणि सर्वस्थलीं व सर्वकालीं व सर्वप्रसंगीं निराबाधत्वानें चालणारे तात्त्विक सिद्धांत प्रकट होऊन त्यांच्या आधारावर धर्मसंस्थापना होते. आतां या उपनिषद्गत सिद्धांतांचें पूर्ण रहस्य या कालीं कळतें असेंच नाहीं; ज्ञानाच्या वृद्धीबरोबर या मन्त्रांच्या अर्थाची वृद्धि होते आणि त्यांचें पूर्ण रहस्य सर्वज्ञ भगवान् किंवा सर्वज्ञता प्राप्त झालेले व्यास, सनकसनंदन, जनक, याज्ञवल्क्य, शंकराचार्य, ज्ञानेश्वर इत्यादि जीवन्मुक्त यांस मात्र कळतें. पण विश्वाच्या आरंभीं विश्वांतील सर्वकालीन व्यवस्थेचे नियम प्रकट करणें हें परमेश्वराचें अवश्य कर्तव्यच असतें.

## दर्शनें व नास्तिक पंथ यांचा अवतार.

वेदावर श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांस उपनिषदांसारखें मोक्षद रत्न सांपडतें व तें प्रकट करणारांस व त्याचें पूर्ण रहस्य समजून घेऊन त्याप्रमाणें वागणारांस मुक्ति मिळण्याचा मार्ग सोपा होतो हें खरें; पण सर्वांचीच बुद्धि सारखी नसल्याकारणानें व वेदांस हुसकून देणाऱ्या प्रत्यक्षवादी चार्वाकादि लोकायतिकांचें खंडन करावयाचें असल्यामुळें हे मध्यम बुद्धीचे लोक, खंडन करण्यास अति उत्तम शास्त्र जें (अ) **तर्कशास्त्र**, तें अनावृत करून (शोधून काढून) एक वादपद्धति तयार करितात, आणि या पद्धतीनें किंवा दर्शनानें वेदाचें प्रामाण्य ठरविण्याचा प्रयत्न करितात. तर्कशास्त्राच्या जोरावर हे वेदवाक्यांचें सत्यत्व सिद्ध करितात. चार्वाकाची **प्रत्यक्षप्रमाणावर** मात्र झोड असते, तर हे **अनुमानप्रमाणावर** विशेष भिस्त ठेवतात. अनुमानानें यच्चावत् गोष्टी सिद्ध करितां येतील, अशी यांस अतिरिक्त श्रद्धा प्राप्त झालेली असते. फार तर काय? पण तर्कशास्त्रानें प्राप्त झालेल्या सिद्धांताशीं प्रतिकूल असा वेदमंत्र आढळला, तर हे लोक त्या वेदमंत्राचा अर्थ फिरवून आपल्या मानवी तर्कजन्य सिद्धांताला अनुकूल असा त्याचा अर्थ करितात! अर्थातच हा अतिरेक झाला. आत्मा, पुनर्जन्म, ईश्वर इत्यादि जे अतींद्रियविषय आहेत, त्यांविषयींचा विचार केवळ मानवी बुद्धीच्या जोरानें करणें ह्मणजे सूर्यास काजव्यानें उजेड दाखविल्याप्रमाणेंच हास्यास्पद होय. विचारसंगतीवर किंवा

कार्यकारणांवर अधिष्ठित झालेलें तर्कशास्त्र जेव्हां कार्यकारणांचे स्वरूपाचा विचार करितें, किंवा ज्याच्या सत्तेनें बुद्धि आपले व्यवहार चालविते त्या आत्म्याचा किंवा गुणत्रयात्मक प्रकृतीचा विचार करण्याचें धाडस जेव्हां आमची बुद्धि करिते, तेव्हां बुद्धीची सर्वथैव फजीती होऊन ह्या तर्कदर्शनांचा आश्रय घेतल्यामुळें झालेला शीण केवळ वृथा होतो. दृष्टवस्तूंचा शोध करण्याला अनुमानप्रमाण (मग तें सप्रयोग असो, वा निष्प्रयोग असो) उत्तम साधन आहे. पण हा निश्चित रीतीनें आंखलेला कार्यक्रम टाकून देऊन जेव्हां तें शास्त्र अतींद्रिय व जीवन्मुक्तांस मात्र प्रकट झालेल्या वस्तूंचा शोध करण्याचा प्रयत्न करितें, तेव्हां सुपारी कातरण्याचा अडकित्ता आपण वज्र तोडण्याच्या उपयोगाकडे लावितों, असें होतें. प्रत्यक्ष प्रमाणांवर अतिरिक्त विश्वास टेवून जसे नास्तिक सर्वतोपरी फसले, तसेंच अनुमान प्रमाणावर फाजील विश्वास ठेवणारे तार्किकही फसले. "या विश्वाचें उपादानकारण 'अणु' (Atmos) असून परमेश्वर केवळ निमित्तकारण आहे. जीव हा ज्ञान गुण असून मनोबुद्धीच्या पदार्थसंनिकर्षानें मात्र जीवाला ज्ञान होऊन सुखदुःखाचें भान होतें. जीव हा अमर आहे; पण देहातिरिक्त असूनही 'मीच देह आहे व मर्त्य आहें,' अशी याला भ्रांति झाली आहे. परमेश्वराचा अनुग्रह झाला म्हणजे जीवाचें सत्स्वरूप समजतें व त्याचीही भ्रांति विनष्ट होते, दुष्ट मनोवृत्ति विलीन होतात, कर्म संपतें, जन्ममरण अस्तंगत होतें, आणि दुःखाची आत्यंतिक निवृत्ति होते. मोक्ष तो हाच होय. येथें जीवाची व मनोबुद्धीची मगरमिठी तुटली, विस्मरण झालें आणि जीवास ज्ञानशून्यत्वाचें स्वरूप प्राप्त झालें!" हें यांचें तत्त्वज्ञान! तसेंच या तार्किकांचा कटाक्ष व मोठी भिस्त आरंभवादावर आहे. वैशेषिक व नैयायिक असे यांच्यांत दोन पंथ आहेत; पण वरील सिद्धांत उभयतांसही मान्य आहेत. आतां या लोकांचा 'अणु' वाद, परमेश्वराचें निमित्तकारणत्व, जीवाचें ज्ञानशून्यत्व इत्यादि इंद्रियागोचर सिद्धांत यांनीं भ्रमशील बुद्धीच्या साहाय्यानें सिद्ध केले आहेत आणि म्हणूनच ते चुकले आहेत. या दर्शनकारांस वेदांचे प्रामाण्य मान्य आहे ह्मणून मात्र यांस जुन्या पक्षांत लेखावयाचें; बाकी सर्व उपनिषदांची एकवाक्यता करून व महावाक्यांचा विचार करून मग यांनीं आपले मताचें प्रणयन केलें असतें तर हें मत सर्वथा अग्राह्य झालें नसतें. असो; नास्तिकमतांचे खंडनापुरतें व प्राथमिक भूमीवरील लोकांचे समाधानाकरितां हें मत विशेष उपयोगी आहे. (आ) **सांख्यासारखे** (कपिल-महामुनींसारखे) तत्त्वज्ञ ऐतिहासिक कालांत फारच थोडे झाले असतील, असें सांगून त्यांचे सिद्धांतही गीतेच्या या सामान्य उपसंहारांत अन्यत्र दिले आहेत. हे **परिणाम-वादी** आहेत. प्रकृति व पुरुष हीं दोन तत्त्वें असून ज्ञानी, पुरुषाच्या संगतीनें प्रकृति परिणत होतें, परिणाम पावते, विसृष्ट होते, उत्क्रांत होते (evolves) व त्रिगुणात्मक प्रकृतीच्या संगतीनें पुरुष सुखदुःखभोक्ता व परतंत्र होतो. 'मी प्रकृतिजन्य बुद्धि नव्हे, स्वतंत्र आहे' असें ज्ञान झालें म्हणजे प्रकृतिनिवृत्ति होऊन कैवल्य मिळतें. हा सांख्यवाद होय. कपिलमहामुनींच्या नांवावर

जो सांख्य पंथ आला आहे त्यांत ईश्वराचें अस्तित्व प्रामाणिक असें मानिलें नाहीं. सांख्याचा परिणामवाद हा तार्किकांच्या आरंभवादापेक्षां विशेष बुद्धिग्राह्य व सयुक्तिक आहे. तथापि प्रकृतीचें पारमार्थिक अस्तित्व, जीवांची अनंतता व भोक्तृत्व इत्यादि तर्कबाह्य गोष्टी यांनीं बुद्धीच्या व कालभंगुर अनुभवाच्या जोरावर गृहीत केल्या, हें अतिक्रमण झालें. व्यावहारिक शास्त्रांच्या उत्पत्तीला व परिपोषाला हें सांख्यदर्शन कारण झालें, तार्किकांचें यांनीं खंडन केलें, इत्यादि उन्नतिप्रद व आनंददायक कर्में यांच्या हातून घडलीं हें खरें; पण वर आतांच सांगितलेल्या व मानवी बुद्धीस अगोचर असणाऱ्या पदार्थस्वभावाचा बुद्धिद्वारा-विचार केला ह्मणून अपौरुषेय उपनिषदांस व गीतेस यांचें मत सर्वथा ग्राह्य नाहीं, म्हणून तें प्रामाणिक नव्हे. पतंजली हे योगाचे प्रणेते होत. यांनीं ईश्वर मानिला आहे. पण प्रकृतीचें पारमार्थिकत्व इत्यादि सांख्यसिद्धांतच यांस संमत असल्यामुळें सांख्यमताप्रमाणेच योगदर्शनही वेदप्रतिकूल असेल तेथें अग्राह्य होय. याप्रमाणें चार्वाकादि नास्तिकांशीं वाग्युद्धाची सजा करावयाची ह्मणून व वेदांचें प्रामाण्य स्थापन करावयाचें ह्मणून न्याय, वैशेषिक, योग इत्यादि दर्शनें प्रकट झालीं. न्याय-वैशेषिकांनीं तर्काची पद्धति म्हणजे दर्शन इतकें सुंदर केलें आहे कीं, अलीकडचें युरोपियन तर्कशास्त्र आमच्या दर्शनांनीं पुष्कळ वेळ अगदीं थक्क होऊन जाईल. गदाधरांची तपःप्रणालिका पुढें चालली असती, व त्याच पद्धतीनें विश्वगत पदार्थांच्या गुणधर्मांचा शोध पुढें चालू राहिला असतां, तर आधिभौतिक व आधिमानसिक शास्त्रांच्या संबंधानें आम्हांला पश्चिमे-कडे, पश्चिमेच्या तोंडाकडे, पश्चिमेच्या ज्ञानसूर्याकडे, याचित याचित पहावें लागलें नसतें. पण गदाधरादिकांनीं, तर्कागम्य जो अध्यात्मवाद, तिकडेच आपल्या टाला फिरविल्यामुळें, या तर्कशास्त्राच्या प्रणालिकेनें आमचीं सर्व तर्कगोचर भौतिक मानसिक शास्त्रें संस्कृततर व व्यवहारोपयोगी होऊन जें आमचें कोटकल्याण व्हावयाचें होतें, त्यास मात्र आह्मी अंतरलों; आणि 'घटपटाच्या खटाटोंत' सांपडल्यामुळें मुख्य गोष्ट मिळावयाची ती मिळाली नाहींच; उलट जें मिळावयाचें होतें त्यास मात्र आंचवलों! तसाच कांहीं प्रकार सांख्ययोगदर्शनांचाही झाला. आरंभवादानें केव्हांही समाधान होत नाहीं ह्मणून परिणामवादाची, उत्क्रांतिवादाची, सांख्यांनीं कांस धरली; आणि जगदुत्पत्ति झाल्यानंतर जगाचा विस्तार कसा होत गेला, मुख्य तत्त्वें काय आहेत, प्राण इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार हीं सर्व जड कां आहेत, इत्यादिकांची मीमांसा सांख्यांनीं उत्तम तऱ्हेनें केली, व आत्मतत्त्वाचा शोध करण्यासाठीं एकाग्र चिंतनाचे उत्कृष्ट मार्ग योग्यांनीं शोधून काढून मानसशास्त्रांची व शरीर-शास्त्रांची मीमांसा उत्तम तऱ्हेनें केली. डार्विन, हक्सले, स्पेन्सर इत्यादि उत्क्रांतीच्या पुरस्कर्त्यांनीं जे विश्वसिद्धांत आज दिमाखानें युरोपांत प्रकट केले आहेत, त्यांचीं बीजें सांख्यांनीं आमच्या भूमींत आज दोन हजार वर्षांपूर्वीं पेरून ठेविलीं आहेत, आणि कपिल पतंजलींचें व्रत जर त्याच जोरानें पुढें चाललें असतें, तर आज पूर्वेच्या ज्ञानसूर्याचा प्रकाश सर्व पृथ्वीवर पसरून आमच्या-सारखे ज्ञानी आह्मीच राहिलों असतों! पण सांख्याचाही ओढा आध्यात्मिक व अतींद्रिय

विषयांकडे विशेष असल्यामुळें त्यांनीं बुद्धीच्या साहाय्यानें आत्मगडाचा बालेकिल्ला सर करण्याचा प्रयत्न केला आणि फसले! मेस्मेरिझम्, हिप्नॉटिझम्, स्पिरिच्युआलिझम् इत्यादि युरोपांत नव्या वाटणाऱ्या चीजा आमच्या हातचा मळ होत्या! पण आतां काय? गोष्ट फसली ती फसली. शिवाय या चारही दर्शनकारांचा कटाक्ष 'आंधळ्या श्रद्धे' विरुद्ध असावयाचा तो समूळ व सर्वांग श्रद्धेविरुद्ध झाल्यामुळें श्रद्धा ठेवण्या-सारख्या गोष्टींचा छडा ते मानवी बुद्धीनें काढूं लागले, ह्मणून सर्वथा विश्वसनीय वेद-सिद्धांतांपासून ते फार दूरवर लांबले; ही चुकी झाली ती निराळीच; पण खरोखर पाहिलें असतां या विचारशरण दर्शनकारांचा येथें कांहीं उपाय नव्हता. वैश्वदेव करण्याचें वेळीं 'वेणुधमन्या प्रबोध्य' असें ह्मणण्याचें ऐवजी 'अयो-धमन्या प्रबोध्य' असें लोखंडी फुंकणी घेऊन कां ह्मणावयाचें नाहीं, असे प्रश्न शुद्ध कर्म-ठांना विचारले तर त्यांचा योग्य जाब त्यांस देतां येत नसे, म्हणून आमची दर्शनकार मंडळी उलट बाजूला गेली; ह्मणजे तिनें श्रद्धेची राखरांगोळी करून, केवळ विचारास योग्य दिसेल तेंच खरें, असा आग्रह धरिला. या सर्वांचा वेदांतील कर्मकांडावर व ज्ञानकांडावर विशेष कटाक्ष होता. ( ई व उ ) तेव्हां हें कर्मकांड शुद्ध व मजबूत पाया-वर ठेवावें म्हणून '**जैमिनी**' व ज्ञानकांड जिवंत ठेवावें म्हणून **बादरायण** या मीमांस-कांचा उदय झाला. यांनीं व्याकरण, शब्दरचना, वाक्यरचना इत्यादि शास्त्रांचीं प्रमेयें व नियम यांचा अंत लावून व वेदगत सिद्धांत अनुभवाशीं तंतोतंत जुळतात असें तर्क-शास्त्रानें सिद्ध करून, तर्कबाह्य गोष्टींचा विचार निराळ्याच पद्धतीनें केला. यांनीं कर्म-कांडांतील व ज्ञानकांडांतील वेदमंत्रांचा अर्थ वेदमंत्रांच्या व तर्कशास्त्राच्या आधारानें उत्तम रीतीनें सिद्ध करून ठेविला आहे. यालाच मीमांसा असें म्हणतात. या दर्शनाचे दोन भाग आहेत. एक पूर्वमीमांसा आणि एक उत्तरमीमांसा. उत्तरमीमांसेलाच शारी-रिकसूत्रें अथवा ब्रह्मसूत्रें म्हणतात. पूर्वमीमांसेंत कर्मकांडांतील याज्ञिकादि विधींची विचारमीमांसा आहे व शारीरिकमीमांसेंत शरीरी जो देही ( आत्मा ) त्याची व विश्वाची विचारमीमांसा केली आहे. आतां वेदांचे संबंधानें जरी या दोन मीमांसांत एकवाक्यता आहे, तथापि कांहीं मुख्य प्रश्नांसंबंधानें या उभयतांत विलक्षण विचारभेद आहेत. पहा कीं, वेदांती हा ( १ ) हें विश्व त्या नित्य आणि सर्वज्ञ परमेश्वराच्या सत्तेनें उद्भूत झालें आहे, असें म्हणतो; व कर्मठ हा हें विश्व तद्गत प्राण्यांच्या कर्मानुसार संस्कृत झालेल्या अणूंपासून उत्पन्न झालें आहे, असें म्हणतो व सर्वज्ञ ईश्वराची अपेक्षाच नाहीं, असें म्हणतो. ( २ ) वेदविहित कर्में यथासांग केलीं म्हणजे मोक्ष मिळतो. 'यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः। **नान्यदस्तीति-वादिनः**।' असें कर्मठ म्हणतो आणि कर्म व कर्मफल अनित्य असल्यामुळें नित्य मोक्ष संपादण्याला ज्ञानाची अपेक्षा आहे (न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते। सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते।) असें वेदांती म्हणतो. बौद्धांनीं वेदावर व विशेषतः कर्मकांडावर जो कडाका उडविला, त्याला उत्तर देतांना कर्मठांनीं कर्माचें स्तोम अतिशय वाढविलें, तें इतकें

कीं, '**कर्मानें मात्र मुक्ति मिळणार**; मुक्तीला ज्ञानाची मुळींच अपेक्षा नाहीं; निषिद्ध कर्मांचा त्याग आणि विहित कर्मांचें निष्काम परिपालन केलें असतां नवें कर्म उत्पन्न होत नाहीं; संचित संपलें म्हणजे पुनः जन्म प्राप्त होत नाहीं, आणि नित्यकर्माचरणानें पूर्वपातकांचा क्षय होतो' असें हे कर्मठ म्हणूं लागले. 'ईश्वर नाहीं' हें विधान सुद्धां बौद्ध व अर्हत् यांनीं स्वतःच्या पैगंबरांस-धर्मसंस्थापकांस-दिव्य सर्वज्ञत्व व अमानुष ईश्वरत्व दिलें, त्याचें निराकरण करण्यासाठीं आहे. म्हणजे बुद्ध व अर्हत् यांस 'देव' मानण्याचा प्रसंग येईल, या भीतीनें ह्या कर्मठांनीं ईश्वराचें अस्तित्वच निषिद्ध केलें! वेद हे नित्य व स्वयंभू आहेत; ते कोणीही केलेले नव्हत; उपनिषदांत जो ईश्वरस्तुतिविषयक भाग आहे, तो नुसता अर्थवाद आहे, असें कर्मठ म्हणतात. वेदाध्ययन व कर्माचरण करावें, हा कर्मठांचा पंथ आहे. (३) पण वेदांती म्हणतो कीं, कर्मकांडाचा उपयोग केवळ चित्तशोधनाचा आहे. निष्काम कर्म वेदप्रणीत मार्गानें केलें म्हणजे चित्तशुद्धि होते व **ज्ञानसंपादनाचा अधिकार मात्र प्राप्त होतो.** उपनिषदांतील ग्रंथ हा अर्थवाद नव्हे. पारमार्थिक स्थितींत ब्रह्म व व्यावहारिक स्थितींत ईश्वर यांचें अस्तित्व सार्थ व नित्य असून त्याच्या सत्तेनें ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व प्रलय हीं होतात. हें विश्व नित्यशः ईश्वरामध्येंच आहे. तसेंच वेदांती म्हणतो कीं, नुसत्या विहितकर्माचरणानें नित्य व निरामय अशी मुक्ति मिळणार नाहीं. कर्मकर्ता किंवा कर्मसाक्षी जो जीव त्याचें स्वरूप त्याला मिळाल्याशिवाय नुसत्या कर्मानें कांहींएक व्हावयाचें नाहीं. नैष्कर्म्यानेंच मोक्ष मिळाला तर घरें, पर्वत, तारे, ध्रुव हे मुक्तच असते! मुमुक्षूंस ज्ञान अवश्य हवें. मुक्ति मिळवून परमानंदाची नित्य अवाप्ति करून घ्यावयाची असेल तर, अज्ञानानें हा संसारबंध उत्पन्न होऊन जन्ममरणाचें-सुखदुःखाचें-शोकमोहाचें-चक्र आपल्यामागें लागलें व ज्यानें जीवाचें ज्ञानस्वरूप झांकून टाकिलें आहे (अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः) त्या अज्ञानाचा सर्वस्वीं नाश **ज्ञानानें** केल्यावांचून मुक्ति मिळावयाचीच नाहीं. तें ज्ञान म्हणजे सर्वव्यापी ब्रह्माचें अस्तित्व, त्या ब्रह्माचें विश्वयोनित्व, सर्वज्ञत्व, सर्वनियामकत्व, अंतर्यामित्व व सर्वकारणत्व हें होय. हें ज्ञान झालें तर मुक्ति मिळेल. असो; आतां या वेदांतमतांतही माध्व, रामानुज, वल्लभ, शांकर इत्यादि अंतर्गत भेद आहेत; पण त्यांचा विचार दुसरीकडे केला असल्यामुळें येथें पुनः पुनरुक्ति करीत नाहीं.

(ऊ) आतां बौद्ध आणि अर्हत् यांच्या पद्धतीचा थोडासा विचार करून हें प्रकरण आटपूं. कर्माचें तांत्रिक प्रस्थ अतोनात माजलें; तेथील **विचारदृष्टि** सर्वथा मालविली गेली, व मंत्रांचा यथास्थित उच्चार झाला व सूत्रान्वयें त्यांचे प्रयोग यथाविधि झाले, म्हणजे काम झालें, मंत्रांचा अर्थ समजण्याची मुळींच आवश्यकता नाहीं, हें मत-हें कर्मठी मत-जेव्हां अनिवार झालें, जातिभेदाचा कडक अंमल जेव्हां सुरू झाला तेव्हां, व चार्वाक पद्धतीच्या उपभोगैक सरणीनें नीतीची, ज्ञानाची व समाजसंघटनेची माती होते असें जेव्हां समजलें, तेव्हां, पूर्वजन्मीं कांहीं सुकृत केल्यामुळें ज्यांच्या स्वभा-

वावर सात्विक गुणाची कांहीं थोडी छाया पडली आहे, असे विचारी लोक नीतिमार्गानें तर चालूं लागलेच; पण विचाराची प्रगति अनिर्बाधपणें व्हावी अशा आशेनें ह्या जिज्ञासु परंतु अज्ञानी लोकांनीं पहिल्या प्रथम वेदांचा अधिकारच निषिद्ध केला. कर्मठांच्या अत्याग्रहाचा हा परिणाम होता हे खरें; पण या लोकांनीं वेदाचा अधिकार झुगारला ही गोष्ट कांहीं चांगली केली नाहीं. त्यांनी वेद झुगारले, तेव्हां अर्थातच कर्मकांडाची मातब्बरी संपली; म्हणजे येथे सत्कर्म केले असतां पुढील लोकीं तरी त्याचे फळ मिळतें, हा जो कर्मठांचा मुख्य सिद्धांत त्याला हरताळ लागला, इतकेंच नव्हे, पण उलट जैनबौद्धांनी असा सिद्धांत बांधिला कीं, जीव हा अनित्य आहे आणि येथील कर्माचें फल त्याला कोठेही भोगावें लागत नाहीं! ह्या लोकांचे धर्मपुरस्कर्ते बुद्ध आणि अर्हत् होत. "ईश्वर नाहीं, ईश्वरानें ही सृष्टि उत्पन्न केली नाहीं, किंवा तिचें नित्यपालन करणाराही कोणी नाहीं, येथील सर्व चराचर वस्तु स्वयंभू आहेत व क्षणजीवी आहेत; त्यांच्या अस्तित्वाच्या मागील क्षणांतही त्या असूं शकत नाहींत; सर्व दुःखमय आहे; जीव व जगत् नित्य समजणें हें अज्ञान होय. या अज्ञानानें कर्म होतें आणि कर्मानें जीव बद्ध होतो. 'सर्व दुःखमय आहे, क्षणजीवी आहे, स्वयंभू आहे, जीवही क्षणजीवी आहे' हे ज्ञान झालें म्हणजे बंध सुटतो व मोक्ष मिळतो या मोक्षस्थितीत जाणिवेचा एक संतत प्रवाह असतो, तो शुद्ध असतो; दृश्य जगताच्या व तद्गत पदार्थांच्या कल्पनांनी तो मलिन झालेला नसतो." हें **बौद्धमत** होय. यांच्या पुढे गेलेले शून्यवादी 'सर्व शून्यत्व येणें' हाच मोक्ष समजतात.

**अर्हतानुयायी** म्हणतात कीं, 'पदार्थाला नियतकालिक असें नित्यत्व आहे. तसेंच जीव हा 'अणुपरिमाणु' किंवा 'विभुपरिमाणु' नसून तो शरीराच्या आकाराएवढा असतो; व गतकालीन कर्मांचें फल त्यास भवितव्यकालात भोगावें लागतें.' 'स्वतंत्र सर्वशक्तिमान ईश्वर नाहीं;' असे बौद्धाप्रमाणें हे लोक म्हणतात; पण उत्क्रांतीच्या पद्धतीनें सर्वपापमुक्त होऊन व सर्वबंधपाश तोडून मुक्त झालेला जीव सर्वज्ञ होतो, असें हे लोक म्हणतात, ते बौद्धांस रुचत असेल असे वाटत नाहीं. "जीवांच्या कर्मांचे आघात परमाणूंवर होतात आणि विश्वघटना होते. नित्य व अनित्य मिळून प्रत्येक पदार्थ बनतो. पापकर्मानें व अज्ञानानें जीवास अनेक देह घ्यावे लागतात, हाच बंध होय. कर्म संपले म्हणजे जन्मकारणें नष्ट होऊन मोक्ष मिळतो. मोक्षस्थितीत केवलानंद व अनिर्बंध ज्ञान हीं असतात. अर्हतावर पूर्ण श्रद्धा ठेऊन सद्वस्तूचें ज्ञान मिळविणें, सद्वर्तन ठेवणें आणि पापविमुख असणें, हीं तीन व्रतें चालतील तर मोक्ष मिळणे अत्यंत सुलभ आहे."

११ असो; नास्तिकांच्या अतिवादानें व कर्मठांच्या आग्रहानें विचाराला प्रगति मिळाली व त्या योगानें सांख्यादि सहा दर्शनें प्रकट झालीं, तसेच बुद्ध, अर्हत इत्यादि पंथ निर्माण झाले, ही सर्वथा मंगलप्रदच गोष्ट झाली. विचारानें केव्हां केव्हां अविचाराचा

प्रसंग उत्पन्न होतो व अश्रद्धाही वाढते हें खरें; पण या दोन गोष्टी वगळल्या म्हणजे विचारमीमांसा ही सदैव कल्याणकारीच आहे. वेदाचा अधिकार बुद्धादिकांनीं झुगारून दिला ह्मणून वेदाचें प्रामाण्य मीमांसकांनीं प्रस्थापिलें; व विचारप्राप्त सिद्धांतांवर ज्याप्रमाणें विश्वास ठेवणें अगत्याचें व अनिर्वाह पक्षाचें आहे, त्याचप्रमाणें वेदांत सांगितलेल्या व वेदांतांत सुचविलेल्या कारणांसाठीं व कारणानुसार मात्र अनुभव प्रत्यक्ष होऊं लागला, म्हणजे वेदवाक्यांवर विश्वास ठेवणें अगत्याचें व अनिर्वाहपक्षाचेंच होतें. सारांश प्रामाणिक अनुभव ही विचाराची कसोटी आहे. विचार वाढतो तेव्हां चालू अनुभवाच्या प्रतिकूल त्याचा ओघ असतो. पण अनुभव शुद्ध होत चालला म्हणजे विचार व अनुभव एक होतात हा नियम आहे. तथापि उन्हाळ्यांतील गलिच्छ व किडे पडलेल्या पाण्याला धुऊन स्वच्छ करणाऱ्या नवीन पाण्याचा जेव्हां महापूर येतो, तेव्हां सर्वच पाणी गढूळ होतें खरें; पण कांहीं काळानें शुद्ध, स्वच्छ व प्रसन्न उदक जसें लोककल्याणार्थ वाहूं लागतें, त्याचप्रमाणें जीर्ण आणि ह्मणून कुजून नासत चाललेल्या मतांचा विध्वंस करणारे विचारांचा जेव्हां वर्षाव होतो, तेव्हां कांहीं वेळ विचाराच्या व आचाराच्या राज्यांत अव्यवस्था होते. पण कांहीं काळानें विचाराचा अमर्यादपणा जाऊन तो नियंत्रित होतो, व सदासर्वदा तो सुखदायीच होतो. हा विश्वनियम आहे व तो अवश्यही आहे. तेव्हां चार्वाकास किंवा बुद्धास किंवा अर्हतास शिव्या देण्याचें किंवा त्यांची निंदा करण्याचें आपल्यास कांहीं प्रयोजन नाहीं. फुकेपणानें वाढत जाणारें जातिभेदाचें बंड बौद्धांनी मोडिलें, 'अहिंसा परमो धर्मः' हा श्रुतिगत सिद्धांत जैनांनीं इतका पुढें आणिला कीं, त्या योगानें सर्व हिंदुसमाज सर्व जगाला वंदनीय झाला, ही काय लहान कामगिरी झाली? बुद्धाचे अनुयायी भराभर वाढत जात आहेत, असें पाहून, सामान्य लोकांची आत्मिक तळमळ दूर होईल असा, व त्या सामान्य लोकांस समजेल असा, भजनपूजनाचा मार्ग सनातन वैदिक धर्माच्या परिपालकांनी प्रकट केला; ह्यासाठीं तरी आपण सर्वांनीं प्रथम बौद्धांचे व त्यानंतर अवतीर्ण झालेल्या आपल्या पूर्वजांचे आभार मानावयास नकोत काय? यज्ञयागादिकांतील प्राणीहननाचा मार्ग स्तब्ध होऊन 'पिठाचा पशु' हुत व्हावयास लागला हे जैनांचे उपकार नव्हेत काय? हेंही असो; पण सद्यःकालींही वेदांवरील श्रद्धा सामान्यतः उडाल्यासारखी झाली आहे. तेव्हां (१) ज्यांची श्रद्धा उडाली आहे, त्यांनीं बौद्ध धर्माचें आलोडन केलें, आणि नंतर आमचा उपनिषद्गत धर्म व तदंतर्गत ज्ञान यांचें परिशीलन केलें, तर बौद्धांचे ग्रंथांतील शंकांचें समाधान होऊन पुनः सनातन धर्मावर दृढ श्रद्धा बसणार नाहीं काय? तसेंच, (२) धर्ममार्गास व ज्ञानमार्गास एकीकडे सारून प्रायः आपण पुष्कळ वेळां चार्वाकाच्या मतानेंच चालतों. ही चाल मोडावयाची असेल तर आपल्यास चार्वाकपंथापासून होणारे अनर्थ समजण्यासाठीं त्या धर्माचें अध्ययन करावयास नको काय? सारांश, प्रत्येक पंथाकडे कांहीं नियमित कर्म आहे आणि तें नियमित कार्य मात्र जोंपर्यंत त्या त्या पंथाकडून होत आहे, तोंपर्यंत तो तो पंथ उपयोगीच आहे. फार लांब कशाला? हल्लीं ज्याचा आपण विशेष आदरानें अभिमान बाळगितों, त्या अद्वैत-

दर्शनासंबंधानें जर कोणी असें प्रतिपादन करूं लागला कीं, 'कर्म हें बद्धक आहे, एक ब्रह्मच काय तें सत्य आहे, बाकी सर्व मिथ्या आहे' तर आपण त्याला काय म्हणूं बरें? "बाबा! कर्म बद्धक आहे असें आपण सांगतां, तें हें आपलें म्हणणें कर्मच आहे ना? पण—आपण सांगण्याचें कर्म जाणूनसवरून करीत आहां, तेव्हां हें आपलें कर्म तरी बद्धक नसेल. एवंच आत्मदृष्टीनें आत्मपदाकडे नेणारीं सर्व कर्में बद्धक नसून विमोचक असतात, असा आपल्या बोलण्याचा रोंख आहे. तेव्हां 'न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते' किंवा 'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः' ही जीं सर्वज्ञ श्रीकृष्ण-मुखानें उद्धृत झालेलीं वाक्यें आहेत हींच खरीं आहेत. आपलें एकपक्षी म्हणणें खरें नाहीं. आत्म्यास विषयांत गुंडाळून ठेवणारीं—पण आत्मारामाला कोण गुंडाळून ठेवणार म्हणा! तेव्हां भ्रांतिकृत चमत्कारानें जीवास विषयामध्यें गुंडाळून ठेवणारीं—कर्में बद्धक असतात. पण अज्ञानपटल दूर करणारीं कर्में विमोचकच असतात, हें अद्वैताचें मुख्य तत्त्व आहे. हें तत्व पूर्णत्वानें ओळखील, तरच आपला ऐहिक व पारमार्थिक उद्धार होईल, अन्यथा होणार नाहीं, हें ध्यानांत ठेवा. तसेंच ब्रह्म काय तें सत्य आहे, असें आपलें म्हणणें ना? कबूल आहे. पण ब्रह्म सत्य आहे, हें आमच्यासारख्या अज्ञानी मनुष्यांस समजून देण्यासाठीं व जगत् भ्रामक आहे हें सिद्ध करण्यासाठीं, आपल्याला सर्व जगतांचा, त्यांचे गुणधर्मांचा परिशोध करावयास नको काय? रज्जूच्या, शिंपल्याच्या किंवा गंधर्वनगरीच्या दृष्टांतांनीं आपली खातरजमा झाली असेल. पण आमचें त्यानें समाधान होत नाहीं, तेव्हां आमचें समाधान व्हावें अशी जर आपली इच्छा असेल तर आपण विश्वगत पदार्थांचें न्यायरीत्या व प्रयोगपद्धतीनें परिशोधन जेव्हां कराल, पदार्थांतील नित्य व अनित्य धर्म कोणते हें जेव्हां आम्हांस समजून सांगून आमचा निश्चय होईल अशी व्यवस्था कराल, तेव्हां आम्ही आपला पंथ स्वीकारूं. आमची आपल्यास गरजच नसेल, व उद्धाराचा सर्वच्या सर्व मार्ग ज्याचा त्यानें पाहिला पाहिजे, असें आपण म्हणाल, तर आपल्याला श्रम दिल्याबद्दल माफी मागून आम्ही इतकीच विनंती करितों कीं, लोकसंग्राहकाचा हा मार्ग नाहीं." असो; तेव्हां अद्वैतमार्गाच्या अप्रतिहत सिद्धिसाठीं अद्वैतसिद्धांत्याला इतर सर्व पंथांचा निदान निषेधपद्धतीनें तरी उपयोग आहे.

१२ आतां एकच मुद्दा माझ्या समजुतीनें राहिला आहे, तो हा: "'देव नाहीं, धर्म नाहीं' असें म्हणणारे कांहीं भाविक लोक आहेत. ते असें म्हणतात कीं, 'देवधर्मांच्या कल्पनामुळें काय हित झालें असेल कोण जाणे' हरि जाणे किंवा ईश्वर जाणे असें म्हणावयाची या लोकांस पंचाईतच! 'असो; पण या देवधर्मानें भोळेपणा, विश्लेषकता (exc'u·siveness) आलस्य, दैवश्रद्धा, विचारमांद्य इत्यादि अनेक दुष्ट परिणाम झाले इतकें बरीक खरें. तेव्हां हें देवधर्माचें बंड मोडून टाकून शुद्ध नीतीच्या पायावर समाजरचना व व्यक्तीचें आचरण ठरविलें म्हणजे इहलोकींचें काम झालें." हे लोक आपलेच आहेत. आपली व आपल्या समाजाची, त्याच्या कल्याणाची, त्याच्या उन्नतीची अशी आपल्याला तळमळ

आहे, तशीच ह्या नवे लोकांसही आहे. तेव्हां हे लोक नास्तिक आहेत, समाजविघातक आहेत, इत्यादि स्वस्ताईच्या शिव्या देऊन त्यांची बिदागी करणें प्रत्यक्ष श्रीकृष्णासच संमत झालें नसतें; मग आमच्यासारख्या अर्धवट लोकांची काय कथा? असो; हे लोक प्रत्यक्ष-वादी आहेत, म्हणजे जें प्रत्यक्ष दिसत असेल किंवा दिसण्यासारखें असेल त्याच्यावर मात्र यांचा विश्वास आहे. अलौकिक शब्दप्रमाणावर यांचा विश्वास सहसा बसणार नाहीं. तथापि ह्या लोकांस जसजसा विश्वगत गुह्य गोष्टींच्या, योगाभ्यासानें विश्वरहस्यांचा अनुभव येत जाईल, तसतशी या लोकांची श्रद्धा वैदिक धर्मावर बसेल, यांत मला तरी संदेह वाटत नाहीं. पुनः; (२) देवभोळेपणानें आमचें अत्यंत नुकसान झालें हें खरें; तथापि विष सर्वथा मारक असतांही विषाची योजना आपण औषधाकडे करितों; ह्या मारक पदार्थाचा सर्वथा त्याग करीत नाहीं; त्याचप्रमाणें सद्गुणमंडित जो भगवान् त्याच्यावर कामुक व अतिरिक्त श्रद्धा ठेविली म्हणून आपण पतित झालों असलों तरी निष्काम व श्रुतीला संमत अशी श्रद्धा परमेश्वरावर ठेवण्यांत कोणताच प्रत्यवाय नाहीं. (३) विचा-रावर तरी श्रद्धा ठेवावयाची ती विचारजन्य सिद्धांतांचा आपल्यास प्रत्यक्ष साक्षात्कार होतो म्हणून ना? असाच साक्षात्कार श्रद्धेनें व तदनकूल आचरणानें येतो. तेव्हां श्रद्धेवर योग्य विश्वास ठेवण्यास काय हरकत आहे? (४) अनुभवाचा विचारच कराव-याचा नसेल तर '**विचारावर तरी श्रद्धा कां** ठेवावयाची' हा प्रश्न नामदार बाल्फर साहेबांनी नास्तिकवाद्यांस विचारला आहे, त्याचें तरी उत्तर द्या. विचाराची मर्यादा कांहीं मर्यादेपर्यंत आहे व असावाची. पहा कीं, १० सेंटिग्रेड अंशाची उष्णता लाविली असतां व २० अंशाची लाविली असतां, पाण्यास प्राप्त होणाऱ्या पातळपणांतील प्रमाण काढून त्रैराशिकानें १५० अंश उष्णतेच्या वेळीं पाणी इतकें पातळ होईल असें उत्तर काढिलें तर तें साफ फसेल; कारण १०० अंशांवरच पाणी कढूं लागून त्याची वाफ होऊं लागते. तेव्हां नुसता विचार उपयोगी नाहीं. आमचा अनुभव जितका विचाराच्या आश्रयानें चालतो, त्यापेक्षां त्याला जास्त आश्रय श्रद्धेचा घ्यावा लागतो. (५) शेवटीं आमच्या येथें जे दुष्परिणाम झाले ते सकामवर्तनानें झाले, देव खोटा म्हणून झाले नाहींत, हें आमच्या नव्या बंधूंनीं विसरतां कामा नये. तत्त्वज्ञान नसेल, शास्त्रज्ञान व धर्मज्ञान नसेल, तर नीतीला पायाच राहणार नाहीं. नीतीच नको असेल, तर कांहींच नको; पण नीति जर हवी असेल तर ज्याच्या योगानें नीतीला 'अमुक चांगलें व अमुक वाईट' असें म्हणण्याचा अधिकार येतो, तो धर्म व तें तत्त्वज्ञान हीं अवश्य हवींत; मात्र त्यांत स्वार्थपरायणता, अभिमान, विश्लेषण शिरणार नाहींत इतकी खबरदारी घेतली म्हणजे झालें. असो; हेंच सांगण्याकरितां धर्माचा व गीतेचा अवतार आहे, हे ग्रंथ निष्पापबुद्धीनें वाचून मग तरी त्यावर अभिप्राय पूर्ण विचारानें द्यावा, इतकें सांगून हा खंड संपवितों.

---

## खंड ३.

### आणखी कांहीं विचार.

१. कर्म उपासना आणि ज्ञान ( Action, Faith, Knowledge ) ही तीन कांडें आहेत, त्यांत आमच्या देशांत ज्ञानकांडाला प्राधान्य देऊन कर्म उपासना यांचें नियामकत्व ज्ञानास अर्पिलें आहे. आमचा ज्ञानसंग्रह ( Synthesis of sciences, Philosophy ) म्हणजे ब्रह्मज्ञान होय. ब्रह्मज्ञान उपनिषदांत सांगितलें आहे. उपनिषदांचें तात्पर्य लक्ष्यांत ठेवून श्रीव्यासमुनींनीं ब्रह्मसूत्रांची योजना केली. आणि तोच अर्थ मार्मिक रीतीनें, रहस्यरूपानें, सोप्या भाषेंत सर्वांस कळावा यासाठीं, प्राचीन कालींच श्रीभगवदिष्ट गीतेचा अमृतप्रवाह अस्तित्वात यावा, अशी योजना झाली. एवंच, उपनिषदें व त्यांच्या दोन शाखा ( ब्रह्मसूत्रें व भगवद्गीता ) यांमध्यें असलेली एकवाक्यता प्रकट करून दाखविणें हें प्रत्येक आचार्याचें काम आहे. असे आचार्य आपल्या देशांत बरेच झाले. आजमितीलाही शांकरमत, वल्लभमत, रामानुजमत व मध्वमत अशी चार मतें प्रमुखत्वानें सर्व देशभर प्रचलित आहेत. श्रीशंकरप्रणीत सिद्धांताप्रमाणें ब्रह्म हें खडेसाखरेच्या किंवा शुद्ध मिठाच्या खड्याप्रमाणें अंतर्बाह्य एकच स्वरूपानें राहणारें, एकरसात्मक आणि निर्गुण असें ब्रह्म काय तें परमार्थतः सत्य आहे. श्रीवल्लभांच्या दृष्टीनें चिदचित्स्वरूपी प्रकृतींचें नियमन करून, अनंत विरुद्ध धर्मांचा संग्रह करणारें व अनंत धर्मांचें अधिष्ठान असणारें सर्व कार्यकारणकर्तृक सगुणनिर्गुण ब्रह्म परमार्थतः एकच आहे. श्रीरामानुजांच्या दृष्टीनें चिदचित्स्वरूपी सत्प्रकृतीचें नियमन करून अनंतकल्याणगुणमंगलाचा सागर असणारें, नियामक व भक्तिज्ञेय असें ब्रह्म सगुणत्वानें विराजमान होत आहे आणि मध्वांच्या मतानुसार अनंत भेदांचें नियमन करणारें व सर्व सृष्टीचें निमित्तकारण असणारें भक्तिप्रिय सगुण ब्रह्म, संसारी जीव आणि उत्क्रांत होणारें जगत् हे पदार्थ सत्य आहेत, असा सर्वत्र प्रभेद आहे. आत्मदृष्टीनें श्रीशंकराचार्यांच्या मताचें रहस्य कळतें, बुद्धिमिश्रित आत्मदृष्टीनें श्रीवल्लभमत अधिगत होतें, बुद्धीनें श्रीरामानुजमत समजतें आणि मनोमिश्रित बुद्धीनें श्रीमध्वमत ज्ञात होतें. श्रीशंकर मायावादी आहेत. इतर सर्व मतवाले मायावादाचा निषेध करितात. श्रीशंकरमतानें भक्तीला गौणत्व येऊन ज्ञानाला, ब्रह्मज्ञानाला, प्राधान्य येतें. इतर मतानुवादी-आचार्य ज्ञानाला गौणत्व देऊन भक्तीला प्राधान्य देतात. श्रीशंकर सिद्धांतान्वयें जीवशिवांचें ऐक्य प्रकट झालें, तादात्म्य प्रकट झालें, म्हणजे मोक्ष मिळतो. **इतर मतानुवाद्यांस हें जीवशिवैक्य केव्हांही संभवनीय वाटत नाहीं.** सारांश उपाधि अनादि आहे; तथापि सांत आहे, असें श्रीशंकराचार्य म्हणतात आणि उपाधि म्हणजे माया अनादि व अनंत आहे म्हणजे परमार्थतः सत्य आहे असें इतर मतवादी म्हणतात. आतां आपलें कर्तव्य इतकेंच आहे कीं, निष्पाप मनानें श्रीमद्भगवद्गीतेचें पर्यालोचन केलें असतां

गीताकारास कोणतें मत ग्राह्य होतें हें ठरवावयाचें. हा निश्चय करण्याला तीन साधनें उपलब्ध आहेत. (१) साधा शब्दार्थ, (२) पुढचा पाठीमागचा संदर्भ आणि (३) आर्यधर्माचें रहस्य. आर्यधर्माचें रहस्य केवलाद्वैतपर आहे असें 'तत्त्वमसि' 'प्रज्ञानं ब्रह्म' 'अहं ब्रह्माऽस्मि' 'सर्वं खल्विदं ब्रह्म' या महावाक्यांचा सरळ अर्थ केला असतां स्पष्ट दिसतें. अलीकडील शोधांवरून उत्पन्न होणाऱ्या तत्त्वज्ञानाचा कल 'एकत्वच' स्थापन करण्याचा आहे, असें दिसतें. जो कांहीं थोडा अनुभव आपल्यास आहे त्यावरूनहीं, ह्मणजे आपल्या आत्म्याचें एकरसत्व व साक्षित्व पाहिलीं असतां जें एकत्व स्पष्ट दिसतें, त्यावरूनहीं केवलाद्वैताचा सिद्धांत खरा असला पाहिजे, असा निश्चय होतो. तसेंच नीतिदृष्टीला, ज्ञानपोषणाला, समाजस्थैर्याला, राजकीय व्यवहाराला व परमेश्वरी उपासनेला वेदप्रतिष्ठित व श्रीशंकरप्रणीत अद्वैतसिद्धांताचा पाठिंबा मिळतो, तसा इतर मतप्रणीत सिद्धांतांनीं मिळत नाहीं. आणखी; सुखाच्या, विषयसुखाच्या, दृष्टीनें पाहिलें असतां ज्ञानार्जनांत, ज्ञानस्वरूपांत जो आनंद, जें सुख आहे, तसला आनंद किंवा सुख जीवाला उपभोगानें मिळत नाहीं, मिळणारें सुख नित्य असत नाहीं, दुःखमूलक व दुःखपर्यवसायी असतें, असा अनुभव व अनुमान हीं विद्यमान आहेत. ज्ञानाच्या बाजूनें पाहिलें असतां ज्ञाता आणि ज्ञेय (Subject and Odject) हीं ज्ञानरूप झाल्याशिवाय खरें ज्ञान प्राप्त होत नाहीं, हा प्रमाणशास्त्राचा सिद्धांत खरा आहे, असें अनुभवाच्या अंतीं कळतें. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता **हेगेल** याचें हेंच ह्मणणें आहे.

२ आणखी; आपला जो पुरुषार्थ आहे, तो केव्हां तरी आपल्यास साध्य झालाच पाहिजे. आपला पुरुषार्थ म्हणजे दुःखाची आत्यंतिक निवृत्ति, सर्वज्ञता, अव्ययीभावता, हा होय. तात्पर्य, आपलें दुःख सर्वथा नाहींसें करावयाचें असेल, तर आपल्यास सुखस्वरूप झालें पाहिजे. आपल्याला सर्वज्ञता हवी असेल तर आपण ज्ञानरूप झालें पाहिजे. आपल्याला जन्मजरादि विकारांपासून सुटावयाचें असेल तर आपण अंतर्बाह्य सर्वव्यापी झालें पाहिजे; सारांश सच्चिदानंदस्वरूप झालें पाहिजे. हें रूप मिळालें म्हणजे मोक्ष मिळाला. वाचकहो! आपलें कर्म, आपली उपासना ही जर नित्यशः वाढत असतील, ज्ञान संस्कारानें शुद्ध होत असतील व श्रवणमननांच्या साहाय्यानें ज्ञान विज्ञान वाढत असेल तर असा एक दिवस उगवलाच पाहिजे कीं, ज्या दिवशीं आपल्यास ऐक्यस्वरूप प्राप्त होईल. पण प्राप्त होण्याचें काय आहे? तें आपल्यापाशीं निरंतर आहेच. हें आपल्यास समजत नाहीं, याचें कारण आपण स्वतः व परमार्थतः अनंत व सर्वव्यापी असूनही अज्ञानानें सांताचा (Finite) अभिमान धरिला आहे. आपण अनंत व परिपूर्ण असून विषयदृष्टीनें सांताची (Finite) वासना धरिली आहे, आपण सर्वज्ञ असून एकदेशज्ञ आहों असें आपण समजतों; हें सर्व अज्ञान, ही सर्व माया आहे. सांत मायिक आहे, असें समजलें म्हणजे हें उघड होतें कीं, आपल्यास मोक्ष मिळावयाचा तो जीवस्थितींत मिळणार नाहीं, कारण मायेला सांतत्व आहे; तेव्हां मोक्षाच्या आड

आलेला प्रतिबंध म्हणजे जीवस्थितींत मात्र खरी असणारी माया काढून टाकावयाची आहे. कर्माची व उपासनेची आवश्यकता यासाठींच म्हणजे मायारूपी प्रतिबंधाच्या निवारणासाठीं ती उपासना अवश्य आहे; म्हणून कर्तृत्व, भोक्तृत्व हें माझें स्वरूप नव्हे, असें अधिकारानुसार ज्ञान करून घेऊन कर्म करावयाचें, आणि ज्या परमेश्वरी बिंबाशीं माझें ऐक्य आहे, ( हें विसरून गेलें आहे, तें पुनः ज्ञानांत आणावयाचें आहे. ) त्या सच्चिदानंदस्वरूपाची, प्रथम, सर्वज्ञ उपकारकर्ता या दृष्टीनें, नंतर सर्वज्ञ व सर्वव्यापी मंगलगुणाधिष्ठान या सगुण दृष्टीनें व पुढें सर्वसाक्षी, अव्यय, निर्गुण ह्या दृष्टीनें उपासना अधिकारानुसार करून तत्स्वरूपाच्या अधिगमासाठीं उपासना करावयाची आहे. सारांश, कर्म व उपासना व ज्ञान हीं साधनें आहेत. ज्ञानरूप हें साध्य आहे. **हें साध्य हाताशीं आलें म्हणजे मात्र साधनांचा उपरम व्हावयाचा आहे.**

३ असो; हें आर्यधर्माच्या रहस्याचें सार आहे. ह्याचप्रमाणें मागचा पुढचा संदर्भ व उपक्रमोपसंहार ( आरंभींचा विषय व शेवटचा सिद्धांत ) हे पाहिले तर, वरील रहस्याला अनुकूल असा गीतार्थ असावा, असें वाटतें. 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' हा उपक्रम आहे. 'शोक करण्याचें कारण नाहीं, असें असतां शोक करीत आहेस.' हा उपक्रम आणि 'सर्वधर्मान्परित्यज्य' या श्लोकांत केलेला उपसंहार हे दोन्ही एकरसत्वाची प्रतीति देत आहेत. मध्यें मध्यें अनेक ठिकाणीं एकात्मकत्वाचा उल्लेख आहे तो निराळाच. आणि शेवटीं, शब्दांची फारशी ओढाताण न करितां जो सरळ अर्थ उत्पन्न होतो, तो अद्वैतपरच अर्थ लागतो. सारांश **केवलाद्वैत प्रतिपादन करणारा** व या अद्वैताच्या अनुषंगानें सर्व शास्त्रांची, नीतीची व इतर व्यवहारांची मीमांसा करणारा हा ग्रंथ आहे, असा माझा निश्चय झाला आहे. येथें अनेक प्रकारचे उपदेश देश, काल, प्रसंग पाहून केलेले आहेत, हें खरें; पण सर्वांचें तात्पर्य अद्वैतप्रतिपादनपरच आहे. त्रिगुणरहित व्हावयाचें, असुरसंपत्तीचा नाश करून दैवीसंपत्तीचाही लय करावयाचा, भेदज्ञानाचा लय करून शेवटीं ज्ञेय वस्तूचा व ज्ञातृ वस्तूचाही समारोप करावयाचा आणि जीव व शिव यांतील सेवकसेव्यभावाचें निराकरण पराभक्तीनें करून सगुणब्रह्माच्या पलीकडे जावयाचें, हें गीतामंथनाचें सार आहे.

## उपनिषदांचें रहस्य.

४ सर्व शास्त्रांचा व सर्व पुरुषार्थांचा समन्वय करणारा जो उपनिषत्प्रणीत अद्वैतसिद्धांत आहे, तो सुश्लिष्ट असून तत्रत्य शब्दांचा सरळ अर्थ केला म्हणजे स्वसमर्थन करणारा आहे, हें येथील व विलायती पंडितांस संमत आहे. वेदाचा अर्थ करण्याचीं जीं सहा लिंगें ( सहा साधनें ) जैमिनीमुनींनीं प्रचलित केलीं आहेत,

त्यांच्या साहाय्यानें मीमांसा केली असतां अद्वैतपरच अर्थ निष्पन्न होतो. दहा उपनिषदांपैकीं कोणत्याही उपनिषदांतील ज्ञानकांडाचा उपक्रम पहावा, व उपसंहार पहावा, सामान्यतः अद्वैताचेंच प्रतिपादन त्यांत केलें आहे, असें दिसेल. दुसरें लिंग अभ्यास हें होय. अभ्यास म्हणजे पुनरावृत्ति. नुसत्या छांदोग्य उपनिषदाचा सहावा अध्याय पाहिला तर 'तत्त्वमसि' हें वाक्य नऊ वेळां आलेलें आहे, असें दिसेल. तिसरें चिन्ह **अपूर्वता. अपूर्वता** म्हणजे सिद्धांताची सिद्धि एक वेदगत शब्दप्रमाणाखेरीज अन्यप्रमाणानें व्हावयाचीच नाहीं अशी स्थिति होय. वेदगतशब्दमंत्र हे अतींद्रिय ज्ञानाचे उपस्थापक आहेत; पण प्रत्यक्ष, अनुमान व उपमान हीं प्रमाणें हीं अंतर्बाह्य इंद्रियांनीं मात्र दाखविलेल्या वस्तूचा निश्चय करितात. म्हणून दृश्य विश्व हें इंद्रियगोचर आहे. अर्थातच इंद्रियपुष्ट जीं प्रत्यक्ष व अनुमानप्रमाणें, तीं वेदगत ब्रह्मापर्यंत जाऊं शकत नाहींत. अतएव वेदगत शब्दप्रमाण हे अपूर्व आहे. चवथें चिन्ह **फल.** हें फल असें सांगितलें आहे कीं, अज्ञानजन्य शोकमोहादिकांच्या प्रवृत्तीचा ज्ञानासह नाश होऊन ब्रह्मज्ञान्याला मोक्ष मिळेल. अभयं वै जनक प्राप्तोऽसि (जनकराजा! तुला अभय प्राप्त झालें) छिद्यन्ते सर्वसंशयाः (सर्वसंशय नाहींसे होतात) हें फल होय. ब्रह्मज्ञानाची स्तुति करणारा **अर्थवाद** (हें पांचवें चिन्ह आहे.) पुष्कळ ठिकाणीं आहे. **उपपत्ति** हें सहावें लिंग आहे. उपपत्ति म्हणजे न्यायघटित सिद्धि. प्रत्येक उपनिषदांत मृत्तिका, लोह, सुवर्ण इत्यादिकांचीं उदाहरणें घेऊन ब्रह्मविषयाचें युक्तिद्वारा जें प्रतिपादन केले आहे, त्याचेंही तात्पर्य अद्वैतसिद्धांतात्मकच आहे. ब्रह्म अभेदतामय आहे, सर्व दृश्य व कल्प्यविश्व 'अस्तिभाति' विषयरूप, ब्रह्मरूप आहे, असें सर्वत्र तात्पर्य आहे.

## गीतेंत अभेदसिद्धांतच आहे काय?

५ होय, आहे. जीवेश्वरभेद, भक्तिज्ञानभेद, भक्तीचें व ईश्वरी प्रसादाचें महात्म्य, कर्माचें आवश्यकत्व इत्यादि भेदाभासक गोष्टींचा गीतेमध्यें उल्लेख आहे; तथापि अधिकारानुसार उपदेश आहे हें एक विश्वनियामक महातत्त्व ध्यानांत ठेविलें म्हणजे पूर्वनिर्दिष्ट सर्व भेदभेदक गोष्टींचा निकाल होतो. जे कनिष्ठ अधिकारी आहेत, त्यांनीं नित्यनैमित्तिक व यज्ञदानादिक कर्मच केलें पाहिजे, पण तें निष्काम बुद्धीनें केलें पाहिजे; मध्यम अधिकाऱ्यांनीं उपासना केली पाहिजे म्हणजे शमदमादि निवृत्तिपर कर्म करून चित्तस्थैर्यासाठीं व चित्तशुद्धीसाठीं योगसहित श्रीपरमेश्वराचें, अखंडसद्गुणमंडित सर्वसाक्षी परमेश्वराचें, अखंड चिंतन निष्काम बुद्धीनें केलें पाहिजे; आणि उत्तम अधिकाऱ्यानें श्रवण-मनन-निदिध्यासपूर्वक, निर्गुण परब्रह्माचें अखंड ध्यान राहील, नित्य समाधि असेल, अशा प्रकारचा अभ्यास करून साक्षात्कार अनुभविला पाहिजे; ह्या निरनिराळ्या भूमिका भिन्न भिन्न अधिकाऱ्यासाठीं आहेत, शेवटही आणखी

पुष्कळ प्रभूमिका आहेत; हा सर्व भाग ध्यानांत ठेविला आणि निष्कामत्वाची आवश्यकता सर्वत्र आहे असें स्पष्ट समजून घेतलें म्हणजे गीतेचें रहस्य अद्वैतपरच आहे असें समजतें. कर्मोचा, नीतीचा, ज्ञानाचा व उपासनेचा परिपाक अद्वैतामध्येंच व्हावयाचा असा निश्चय होऊन अपूर्व आनंद होतो आणि गीताप्रणीत मार्गाचा अवलंब करण्याचा उत्साह प्राप्त होऊन आपला पुरुषार्थ साध्य होईल अशी उमेद वाटूं लागते. आतां गीतेंतच अद्वैत-सिद्धांताचा अनुवाद करणारे अनेक श्लोक आहेत, त्यांपैकीं कांहींचा मात्र अवतार उदाहरणासाठीं येथें करितों.

लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूत हिते रताः ॥ (अ० ५ श्लोक २५).

यो मां पश्यति सर्वत्र सर्वंच मयि पश्यति (अ० ६ श्लोक ३०).

ज्ञानी त्वात्मैव मे मतम् (अ० ७ श्लोक १८).

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति
तत एवच विस्तारं ब्रह्मसंपद्यते तदा } (अ० १३ श्लोक ३०).

वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः (अ० ७ श्लोक १९)

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति (अ० १८ श्लोक ५३).

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज (अ० १८ श्लोक ६६).

नित्यं सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः (अ० २ श्लोक २४).

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके । तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः (अ० २ श्लोक ४६).

येन (ज्ञानेन) भूतान्यशेषेणद्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि (अ० २ श्लोक ३५).

निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते (अ० ५ श्लोक ३).

योगयुक्तो विशुद्धात्मा कुर्वन्नपि न लिप्यते (अ० ५ श्लोक ७).

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः (अ० ५ श्लोक १९).

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ (अ० ६ श्लोक २९).

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन (अ.० ६ श्लोक ३२).

इत्यादि अनेक उतारे देतां येतील. या सर्व उताऱ्यांत अद्वैताचें प्रतिपादन आहे.

ह्याचप्रमाणें अ० २ श्लोक १९, २०, २५, २९, अ० १३ श्लोक १२ व १३ असे व आणखी बरेच श्लोक उपनिषदांतील मंत्रांचीं केवळ रूपांतरें आहेत, असेंही प्रत्ययास येईल. यावरूनही गीता उपनिषदांप्रमाणें अद्वैतपरच आहे, असें सिद्ध होतें. पुनः, अद्वैतसिद्धांताला मूळ आधार जो मायाविचार तोही 'मम माया दुरत्यया,' 'मायामेतां तरन्ति ते,' 'माययाऽपहृतज्ञानाः,' 'भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया,' 'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः,' 'ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः,' 'अज्ञानं तमसः फलं,' सक्ताः कर्मण्यविद्वांसः' इत्यादि उल्लेखांवरून स्पष्ट होत आहे.

६ असो; गीतेचा आतांच सांगितलेला उपक्रमोपसंहार, अद्वैतवचनाची पुनरुक्ति, उपनिषदांतर्गत शब्दप्रमाणावरून प्राप्त होणारी अपूर्वता, 'मामेवैष्यसि न संशयः,' 'लभन्ते ब्रह्मनिर्वाणं,' 'ब्रह्मैव तेन गन्तव्यं,' 'मद्भक्ता यान्ति मामपि,' 'ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम्' हें ब्रह्मांशीं तादात्म्यता करून देणारें फल हीं कांहीं चिन्हें होत. कर्म, उपासना यांचें विवेचन चाललें असतां ब्रह्मज्ञानाची जी स्तुति अनेक ठिकाणीं झाली, तो अर्थवाद आणि विराटस्वरूप दर्शनाचें प्रत्यक्ष प्रमाण, दुसऱ्या अध्यायांतील सांख्ययोगांत प्रणीत केलेलें अद्वैतप्रतिपादक अनुमानप्रमाण, सूर्य, आकाश, वायु, समुद्र इत्यादि दृष्टांतद्वारा प्राप्त झालेलें उपमानप्रमाण, इत्यादिकांनीं-इत्यादि प्रक्रियांनीं सिद्ध झालेली उपपत्ति होय. येथें हीं सहा जैमिनीप्रणीत लिंगें अद्वैतवस्तूचेंच प्रतिपादन करणारीं स्पष्ट चिन्हें आहेत. पुनः; दुसरे अध्यायांत जें जीवात्मस्वरूप परमार्थतः सांगितलें, तेंच स्वरूप ब्रह्माचें आहे, असें सातव्यापासून दहा· अध्यायांत ठरविलें आहे. आणि तेराव्यांत, पंधराव्यांत व शेवटीं अठराव्या अध्यायांत एकवाक्यता सिद्ध केली आहे.

७ अर्जुनाला विषाद होऊन तो शोकमोहावृत झाला, त्याचें सूक्ष्म कारण पाहिलें असतां, तो **भेदबुद्धीनें** जित झाला होता. त्याला कर्तव्यपराङ्मुखता प्राप्त झाली होती, ती भेदबुद्धीनें (मी निराळा·भीष्मद्रोण निराळे, कर्तव्यकर्म हें पापपर्यवसायी आहे इत्यादि असमंजस विचारांनीं) अवतीर्ण झाली होती. ह्या शोकमोहाची, कर्तव्यपराङ्मुखतेची, जी निवृत्ति करावयाची होती ती अर्थातच भेदबुद्धि नष्ट करून करावयाची होती. 'जें आहे त्याचा नाश कधीं होत नाहीं-नाभावो विद्यते सतः-' असें सांगून व भाऊ, मित्र, सोयरे, स्वशरीर इत्यादि परमार्थतः मिथ्या आहेत, ब्रह्माकडे नेणारा, आत्मोन्नतीचा (कर्म-उपासना-ज्ञान-घटित) अद्वैतमार्ग दाखविणारा आत्मा व आत्मविचार मात्र खरा आहे, असें प्रत्ययाला आणून देऊन, व भेदभावना नष्ट करून, व अभिमान व वासना यांचा प्रविलय करून श्रीकृष्णानें अर्जुनाचें समाधान केलें व त्याला कर्तव्योन्मुख केला. शोकमोह दूर होण्याला अभेदनिश्चयासारखें दुसरें साधन नाहीं. भेदभाव हा भीति, पापपुण्य इत्यादि शंका उत्पन्न करितो. ह्या शंकांची निवृत्ति अभेदज्ञानानें मात्र होते. राजकारण, नीति, विश्वज्ञान व तद्गतवस्तुज्ञान इत्यादि सर्व शास्त्र-

कलांच्या ज्ञानवृद्धीला, सामाजिक संघटनेला, कुटुंबसौख्याला व आत्मोन्नतीला ही अभेदज्ञानाची आवश्यकता आहे. मोक्षाचा मार्ग सांगणाऱ्या परमार्थामध्यें ज्याप्रमाणें प्रवृत्तिमूलक निवृत्ति असते ( म्हणजे अहंकार, वासना, अज्ञान इत्यादिकांचा त्याग हा आत्मोन्नति, समाजसंग्रह व ज्ञानविस्तार या सदिच्छेनें होऊन शेवटीं कर्माची परिसमाप्ति होते ) त्याचप्रमाणें व्यवहारांत निवृत्तिमूलक प्रवृत्ति असते ( म्हणजे येथें, प्रपंचांत, ज्या यज्ञदानतपांच्या क्रिया होतात-त्या झाल्या पाहिजेत,-त्यांचा मुख्य हेतु निवृत्ति संपादन करण्याचाच असतो ). सारांश निवृत्तिमूलक प्रवृत्ति असूं द्या किंवा प्रवृत्तिमूलक ज्ञानजन्य निवृत्ति असूं द्या, तात्पर्य एकच आहे: तें हें कीं, आपण पूर्वजन्मजन्मांतरीं जीं जीं कांहीं पुण्यपापात्मक कर्मे अज्ञानानें केलीं आहेत व अज्ञानोत्पादी ज्ञानसंपादन केलें आहे, त्या जन्मदायी कर्माचा व ज्ञानाचा बद्धकस्वभाव नष्ट करण्यासाठीं ज्ञानमूलक व निवृत्तिपर्यवसायी असें ज्ञान संपादन करून व तसलेंच कर्म करून शेवटीं अभेदात्मक अद्वैताचा अधिगम करावयाचा आणि मुक्त व्हावयाचें हाच परब्रह्मस्वरूपी मोक्ष होय. ज्ञानाची व कर्माची परिसमाप्ति येथें होते. ‘ जी आपली अपूर्ण स्थिति आहे, ’ असें आपल्यास अज्ञानानें भान उत्पन्न झालें आहे, तें भान ज्ञानानें व ज्ञानपोषक कर्मानें नाहींसें करून अधिकारानुसार अभेदात्मक अद्वैताचा अधिगम करावयाचा आहे. वर सांगितल्याप्रमाणें प्रपंचांतही हा मार्ग श्रेयस्कर होतो. प्रपंचांत नीतीचें, राजनिष्ठेचें, राष्ट्रनिष्ठेचें आणि धर्मनिष्ठेचें माहात्म्य ज्ञानमाहात्म्याइतकेंच स्वोपकारी व परोपकारी आहे. पुढील सुखासाठीं सद्यःसुखाचा त्याग करणें, कुटुंबसुखासाठीं, कुटुंबाच्या उन्नतीसाठीं, स्वतःच्या सुखाचा त्याग करणें व स्वतःच्या उन्नतीचा अभ्यास मागें ठेवणें, राष्ट्रासाठीं कुटुंबाचा त्याग करणें, समाजास सुखी व उन्नत करण्यासाठीं स्वसुखावर पाणी सोडून रात्रंदिवस श्रम करणें, आणि अशा रीतीनें वागून लोकहितांतच सुख आहे असें मानणें, इत्यादि सर्व कर्मप्रेरकांच्या मूळाशीं स्वार्थत्याग आहे. या त्यागाबरोबरच ‘ मी कर्ता नाहीं, निमित्तमात्र आहे ’ हें ज्ञान होत असलें ह्मणजे आपला त्याग सुसंस्कृत होतो. प्रकृतीला **वळण देण्याचें काम** सोपाधिक ह्मणून परिच्छिन्नसा दिसणाऱ्या ज्ञानरूपी आत्मारामाकडे **इच्छास्वरूपानें आहे.** हें वळण प्रकृतीला स्ववश करणारें असलें ह्मणजे आत्मोन्नति होते, प्रकृतीच्या अनुसंधानानें हें वळण लागत असेल तर आत्मावनति होते. आत्मा सोपाधिक ह्मणजे जीवस्थितींत असून तो उपाधींचा सेवक जोंपर्यंत आहे, ‘ मीच उपाधि ’ असें जोंपर्यंत मानतो आहे, तोंपर्यंत तो प्रकृतीच्या राज्यांत असतो. येथें अर्थातच त्याचें कर्तृत्व त्याच्या स्वतःच्या आधीन नसतें. उदाहरणार्थः सत्य बोलणें हें चांगलें, आहे, असें ऐकल्याबरोबर आपणही सत्यच बोलावें, अशी इच्छा त्याला प्राप्त होते. पुढें सत्य बोलण्याचा जेव्हां प्रसंग येतो, म्हणजे कांहीं विषयसुखामध्यें सत्य बोलण्यानें अंतर पडत आहे, असा जेव्हां प्रसंग येतो, तेव्हां विषयसुख देणाऱ्या विषयांच्या व विषयसुखानुभव. घेणाऱ्या इंद्रियांच्या आधीन तो जीव पूर्णतः असल्याकारणानें ‘ सत्य बोलावें ’ अशी इच्छा असतांही, या जीवाला सत्य बोलतां येत नाहीं. हा इच्छेला

प्रकार झाला. पुनः; आपण अधिकाऱ्यांची मर्जी संपादन केली असतां आपली बढती होईल, असें अनुमान करून चाललें असतां व आपण त्याची चरणधारणा व मनोधारणा करीत असतांही मध्येंच कांहीं तरी आकस्मिक विघ्न येऊन आपले हेतु विफल होतात असा अनुभव आहे. म्हणजे इच्छा असतांही तदनुसार कर्म होत नाहीं. व इच्छा असतांही फल मिळत नाहीं. एवंच आपली इच्छा-विषयेच्छा-जर आपल्या आधीन नाहीं, तर विषय, त्याचें नियम, परेच्छा व परमेच्छा इत्यादि गोष्टी आपल्या आधीन कशा राहणार ? ह्या सर्व गोष्टी आपल्या आधीन असाव्या, अशी जर आपली इच्छा असेल तर प्रथमतः आपण कामक्रोधादिकांस वश करून ज्ञान-विषयज्ञान-व शेवटीं अद्वैत ज्ञानविज्ञान हीं प्राप्त करून घेतलीं पाहिजेत. हीं जसजशीं स्वाधीन होतात, त्या त्या मानानें प्रकृति, माया, आपले स्वाधीन होते, इच्छा स्वतंत्र होते, संकल्प सत्यरूप होतो, आणि आत्मा हा ज्ञानस्वरूपांत कर्ता किंवा भोक्ता नाहीं, या सिद्धांताचा अनुभव येऊन नीति, भक्ति, ज्ञानसंचय यांस पूर्णत्व प्राप्त व्हावयास लागतें, अभेदत्व बाणतें, आणि अधिकार उन्नत होतो, तसतसें ज्ञानविज्ञान दृढ होऊन पूर्णानंदावाप्ति होऊं लागते.

८ खरें सुख अभेदाचा अधिगम झाल्याविना नाहीं, हा सिद्धांत, विषयसुख घेणें, गाणें शिकणें, ज्ञान संपादण्यासाठीं अभ्यास करणें इत्यादि दृश्य गोष्टींच्या अनुभवानेंही खासा सिद्ध होतो. आपल्याच आचारविचाराच्या मंडळींत आपण जाऊन बसलों व आपल्या आवडीचा विषय निघून सर्व मंडळी रंगांत आली असतां एकतानता उत्पन्न होऊन जी कांहीं बहार उडते ती पुसूंच नये. याचें कारण अभेद होय. यांतच जर एखादा मनुष्य एखाद्या कारणानें दुर्मुखून आला म्हणजे त्याच्या भेदकी दर्शनानेंच आनंदलहरींच्या उद्गमनावर कडाक्याचा गारठा पडतो, इतकेंच नव्हे, तर सर्व मंडळांचा विरस होऊन जातो. सारांश, भेदांत दुःख आहे, अभेदांत सुख आहे. हा अभेद वृद्धिंगत करण्यासाठींच नीतीची, ज्ञानाची, योगाची, भक्तीची अपेक्षा आहे; नुसत्या जड दिसणाऱ्या सृष्टीचीच अंतिम व्यवस्था पाहिली तर सर्वत्र अभेद उत्पन्न करण्याचा प्रयत्न उत्क्रांतिरूपानें चालला आहे असें दृष्टोत्पत्तीस येतें व आलेंच पाहिजे. पहा, सर्वच्या सर्व हिमाचलास बंगालच्या उपसागरांत नेऊन ठेवावा असा श्रीगंगानदीचा अहर्निश चाललेला प्रयत्न, सर्वत्र एकसारखी उष्णता अथवा शैत्य आणि स्वच्छता निर्माण करावी हा वायूचा प्रयत्न, सर्व वस्तूंस एकच प्रकाशानें उद्दीपित करणारा श्रीभगवान् सूर्य, विश्वाला एकाच कार्यकारणचक्रानें बांधून टाकणारे गुरुत्वाकर्षणादि विश्वनियम, इत्यादिकांवरून असें स्पष्ट दिसत आहे कीं, ही जड विश्वसृष्टि तरी निदान अभेदमूलक असून पुनः अभिन्न अशा परब्रह्मतत्त्वाकडे चालली आहे. जीवसृष्टींत व विशेषतः मानवसृष्टींत भेदाचें प्राबल्य दिसतें; पण दूरदर्शित्व, शहाणपणा, विधि, कुटुंबधर्म, सामाजिक नियम, राजशासन, शास्त्रें, व धर्म या सर्वांचे प्रयत्न भेदाचा निरास करावा, एतदर्थ चाललेले आहेत. कारण उघड आहे कीं, अभेदांत सुख आहे, निर्लेप,

मुक्त आहे; असा अनुभव आहे. प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांचाही प्रयत्न अद्वैतसिद्धांत प्रकट व प्रसृत करावे हाच आहे; परमेश्वराचें स्वरूपही अभेदात्मकच आहे. तेव्हां अभेदाची स्तुति प्रमुखत्वानें गाणारें जें गीताशास्त्र हें उत्तमच असलें पाहिजे. श्रुति हेंच सांगते. युक्ति अशीच आहे आणि अनुभवही तोच आहे. फार कशाला? आपण उत्कृष्ट काव्यांचा रसास्वाद घेत असतां किंवा उत्तम नटांचा अभियुक्त अभिनय पहात असतां जे तल्लीन होतों, याचें तात्पर्य काय आहे? आपल्या मनांत जे कांहीं विचार किंवा मनोवृत्ति कांहीं विशेष स्वरूपानें अवस्थित असतात, त्यांचेंच यथास्वरूप बाहेर दिसूं लागलें, अर्थात अंतर्बाह्य अभेद दिसूं लागला कीं, मन प्रफुल्लित होऊन तें अभिनव आनंदाचा आस्वाद घेऊं लागतें. आपल्या इतर वृत्ति तटस्थ होतात, मूर्तिमंत तन्मयत्व–तादात्म्य–अवतीर्ण होतें आणि रसपरिपाकाला मधुरत्व प्राप्त होऊन ब्रह्मानंद होतो, हा अभेदवृत्तीचा परिपाक होय. आतां हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल कीं, हा अभेद उत्पन्न होण्याला—नव्हे हा अभेद प्रकट करण्याला–आपल्या भेदविशेषांचा सर्वथा त्याग झाला पाहिजे. हा त्याग म्हणजेच यज्ञ होय. 'यज्ञाय सृष्टानि धनानि धात्रा।' हें प्रासादिक वचन घ्या किंवा 'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः' हा गीतामंत्र अवलोकन करा, अथवा 'हें यज्ञोपकरण सकळ' ही श्रीज्ञानेश्वर महाराजांची ब्रह्मवाहक उक्ति ऐका, तात्पर्य एकच आहे. तें हें कीं, या अभेदचक्रावर अभेद पुरुषार्थ प्राप्त करून घेण्यासाठीं जे भिन्न भिन्न जीव भिन्नाभिन्नाधिकारानुसार भिन्न भिन्न कार्यें करण्यास्तव निर्माण झाले आहेत, ते ईश्वरी संकेतानुसार अभेदमार्गानें अभेदचक्राचा उपयोग करून घेतील, तर मुक्त होतील; जर ते भेदमार्गानें जातील तर त्यांचा सर्वथा नाश होईल. भेद पापमूलक आहे, दुःखद आहे हा भेद आत्मोन्नतिविघातक व समाजभ्रष्ट करणारा आहे, अतएव हा भेद सर्वथा त्याज्य होय.

९ आतां कांहीं प्राकृत व कांहीं विद्वान् लोकांस अशी शंका येते कीं, सर्वत्र जर अभेदाचें साम्राज्य झालें तर कर्मविलोप होईल, उन्नति उपलब्ध राहील, नीति भ्रष्ट होईल, ज्ञानाचा परिपोष होणार नाहीं, प्रकृति नाहींशीच होईल. पण अशी शंका घेण्याचें कारणच नाहीं. ज्ञान हें अभेदजनक आहे, हें अलीकडील तरी विद्वानांस नव्यानें सांगावयास नको आहे. भेद अज्ञानानें उत्पन्न होतो व हें अज्ञान सामान्यतः फलभोगाच्या वासनेनें, अभिनिवेशानें, उत्पन्न झालेलें असतें. मुख्य गोष्ट भोगाप्रीत्यर्थ मात्र भोग नको आहे, भोग अज्ञानमूलक व अज्ञानपोषक आहे म्हणून तो त्याज्य आहे. 'यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्व किल्मिषैः' याचा अर्थ हा कीं, यज्ञ करून, लोकोपकार करून, बाकी शिल्लक राहिलेल्या आपल्या कर्मशक्तीचा व कर्मफलाचा कायतो विनियोग स्वतःच्या उपभोगाकडे करावयाचा आहे. अनेक प्रकारचे यज्ञ करण्याचें सामर्थ्य असावें म्हणून युक्त आहारविहारांनीं आपलें शरीर पुष्ट ठेवावयाचें आहे. ज्ञान मिळविण्यासाठीं आणि त्या

ज्ञानानें लोकांस ज्ञानी करण्यासाठीं आपल्यास 'आहारविहार' करावयाचे आहेत. "आहारविहारासाठीं आपल्यास ज्ञान मिळवावयाचें आहे काय? होय कारण, मुख्य उद्देश सर्वज्ञता व अखंडानंदाची आवाप्ति हा नाहीं. हें जर आहे, तर कर्मविलोप कसा होणार?" खरें आहे. जावत्कालपर्यंत ही अभिन्न सृष्टि आपल्यास भासमान होत आहे, जोपर्यंत 'माझी क्षुधातृषा निवारण करणें' हें इष्ट वाटत आहे, जोंपर्यंत 'अंतर्बाह्य' एकच एक असा घनदाट आत्मरस ओतप्रोत भरला नाहीं व 'मी' सर्वथा नष्ट झाला नाहीं तोंपर्यंत, हें सर्व ठीक. पण यत्किंचितही व्यष्टिभावना जीवंत आहे, तोंपर्यंत **कर्म जिवंत** राहणार. हें कर्म फलाशेनें व अभिमानानें केलें म्हणजे जीव लिप्त होतो, भिन्नभावना धारण करणारा होतो, अर्थात्च बद्ध व दुःखी होतो. पण जीवानें एकदां विषयरूपी फलाशेची काळीकुट्ट घोंगडी टाकून दिली, आणि अभिमानरूपी अंगवस्त्र एकदांचें जाळून टाकिलें, सुखदुःख, लाभालाभ, जयाजय इत्यादि फलवैचित्र्यांचा सर्वथा• मनःपूर्वक त्याग केला म्हणजे तो निर्लेप होतो, अभिन्नतानंदास पात्र होतो, अर्थातच मुक्त आणि केवलानंदी होतो. सारांश, **कर्मविलोप** होत नाहीं तर **कर्मफलविलोप** होतो (कर्मफलाशेचा विलोप होतो). कर्म वेदशास्त्रविहित वा नित्यनैमित्तिक वा व्यावहारिक असो, **तें आपल्या अधिकारानुसार करावयाचें;** पण त्यापासून अमुक फल मिळावें अशी जी आपल्यास आशा असते, असें जें आपल्यास वाटत असतें, ती आशा व तें वाटणें टाकून देणें म्हणजे कर्मफलविलोप आहे. **ही फलाची आशा आहे म्हणून उन्नति स्तब्ध राहते**, इतकेंच नव्हे, तर ती अवनत होत आहे. विषयाची आशा ही भेदक आहे. ही कुटुंबाचा, समाजाचा, व राष्ट्राचा घात करिते व आत्मोन्नतीच्या आड येते. **तेव्हां आशा टाकावयाची, कर्म टाकावयाचें नाहीं.** आशेचा त्याग अधिकारानुरूप करितां येतो, कर्माचा त्याग करितांच येत नाहीं. म्हणून **कर्म करावयाचें पण फलाशा टाकावयाची,** हा भगवंतांचा उपदेश आहे. हा अनेक वेळ केला आहे. ज्याप्रमाणें 'सर्वभूतेषु येनेकं भावमव्ययमीक्षते' हा शास्त्रार्थ सांगून एकात्मता हेंच परम सुख आहे असें सांगितलें, त्याचप्रमाणें **निष्काम कर्म केलें पाहिजे,** 'कर्मण्येवाऽधिकारस्ते', 'कुरुकर्मैव तस्मात्त्वं', 'न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते' इत्यादि ठिकाणीं कर्म करण्याविषयीं आग्रहानें विचारपुरःसर उपदेश केला आहे. एवंच अभेदज्ञानानें कर्माचा विलोप होत नाहीं. ज्ञानामुळें कर्मविलोप होणें व्यवहारसृष्टींत केव्हांही शक्यच नाहीं; इतकेंच नव्हे, पण आशा व अभिमान ही दुकल नाहींशी झाल्यानंतर कर्म करण्याला जें प्रोत्साहन येतें, तें सर्वथा अवर्णनीय आहे व असतें. 'माझ्या कामांत यश मिळेल कीं नाहीं?' ही एकदां चिंताराक्षसी मारून टाकिली, 'माझ्याशिवाय हें कृत्य उरकणारच नाहीं, मीच कर्ता आहे' हा असला पातकी समंध नाहींसा केला, म्हणजे कर्तव्य बुद्धीला जो जोर चढेल, जो उत्साह येईल, जी निःशंकता वाटेल व जें कौशल्य प्राप्त होईल तें खरोखर अश्रुतपूर्वच होय. परीक्षा पास होऊन नोकरी मिळविण्या-

साठीं अभ्यास करीत असतां होणारा विद्यानंद हा केवळ तत्त्वजिज्ञासेसाठीं चालविलेल्या विद्याभ्यासापासून होणाऱ्या निष्काम प्रेमानंदाच्या पासंगास तरी लागेल काय ? नाहीं.–पुनः; आपलें सर्व कर्म आशा–पिशाच्चिकेनें घेरलेलें असतें असेंही नाहीं. मुलाबाळांच्या जोपासनेचें कर्म, अनाथास पसाभर दाणे घालण्याचें कर्म, क्रीडाकौशल्यसंपादनाचें कर्म हीं सर्वांच्या सर्व कांहीं इष्ट हेतु मनांत धरून आपण करीत नाहीं. अन्न खातांना तें पचेल कोणत्या पद्धतीनें हा शोध युक्ताहारविहारी बळकट पुरुषास जसा करणें नलगे, त्याचप्रमाणें वरील कर्मे करितांना सामान्यतः आपण इष्ट हेतु मनांत सुद्धां आणू नये. मग असें आहे तरी तीं तीं कर्मे कधीं व्हावयाचीं राहिलीं आहेत, किंवा कौशल्यानें होत नाहींत असाही अनुभव नाहीं. फार काय सांगावें ? हीं कामें निष्कामप्रेमानें होत असल्यामुळें इतक्या सफाईनें होत असतात कीं, तीं तीं कर्मे करणारे समंजस आईबाप व उदार गृहस्थ प्रतिविश्वामित्र, प्रतिकालिदास, प्रतिव्यास व प्रतिशंकराचार्य, किंवा प्रतिशिवाजी–महाराजच उत्पन्न झाले आहेत कीं काय असा भास व्हावा ! ह्याच अभेदाच्या तत्त्वज्ञानाचा परिपाक होय. हा केवळ स्वसंवेद्य असणार आणि ह्मणून तज्ज्ञांसच प्राप्त होणार ! योगाचें, तपाचें, तंत्राचें, कर्माचें व उपासनेचें शिरोभूत फल हेंच होय, व मूळही हेंच होय. या अद्वैत यंत्रावरच प्राणिमात्र व भूतमात्र अधिष्ठित असून अहंममताव्यतिरिक्तत्वानें आपापलें नियत म्हणजे अभेदमूलक व अभेदपर्यवसायी निष्काम कर्म अभेदरूपी ईश्वरास अर्पण करीत गेला तर त्याला अभेदतन्मयतेचा जो आनंद प्राप्त होईल, तो केवलानंदच अथवा तेंच स्वानंदसाम्राज्य होय. हेंच ब्रह्म, हीच अहिंसा, हाच **'नेचर'** ( Nature ) व हाच **'स्पिरिट'** ( Spirit ) होय. काव्यांतील आत्मा जो 'रस' तोच हा होय. विश्वचक्राच्या या अशा अरींतून जो च्युत झाला व जो स्वार्थाकरितां मात्र जगूं लागला तो 'अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जिवति.' असो; अभेदज्ञान व तन्मूलक कर्म हा विश्वयज्ञ आहे. या विश्वयज्ञांतील शिष्टान्नाचें सेवन हेंच अमृत होय. पुनः एकदां अद्वैततत्वामृताचें प्राशन यथास्थित होऊन तेंच प्रकट होऊं लागलें म्हणजे कर्तव्याला व कर्तव्याच्या हौशीला सीमाच रहात नाहीं. अभिमान विगलित झाला, म्हणजे अकर्तव्याचा अकरणरूपी हट्टही नष्ट होतो आणि प्राप्त कर्तव्य सहज व कौशल्यानें सिद्ध होतें. सुखदुःखाचा, जयापजयाचा सिद्ध्यसिद्धीचा लकडा सुटून अभेदयंत्रानुसार कर्तव्यप्रेरणा झाली कीं, रामदासासारखे साधु व शिवाजीसारखे विश्वविजयी वैष्णव वीरच निर्माण व्हावयाचे व समाज उन्नतीच्या पंथाला लागावयाचा, हा सिद्धांत आहे. मुख्य गोष्ट फलासक्ति व कर्तृत्वाभिमान ही दुक्कल विरली कीं अभेदाच्या सर्वमंगल नियमाची सत्ता अखंडत्वानें सुरू होते. इंग्रजी अथवा पाश्चात्यभाषेनें सांगावयाचें म्हणजे कर्तव्याच्या अहंममत्वा ( Subjectivity ) ला–रजा मिळाली म्हणजे कार्यकुशलता प्राप्त होते. आणखी ज्या अर्थी म्हणजे ज्या भेदमूलक कर्मानें आपल्यास उपाधि प्राप्त झाली व परिच्छिन्नत्व ( Finiteness ) ही अंगावर येऊन पडलें, त्याअर्थी म्हणजे त्या कर्माचा,—भेदमूलक कर्माचा—नाश करण्यासाठीं

अपरिच्छिन्न, अभेदमूलक व अद्वैतवाहक **निष्काम कर्म** आपल्यास केलेंच पाहिजे. सारांश कर्म जर होणारच आहे, तर तें कर्म निष्काम व विध्युक्त तरी करूं या, कीं जेणेंकरून आपली उपाधि हळूहळू विगतप्राण होईल, आणि ज्याच्या अभावामुळें विषयानंदाचा वीट येतो, तो आपला सहज स्वरूपानंद आपल्यास मिळेल; नव्हे, आपण तत्स्वरूप होऊन जाऊं. अर्थातच आपला उत्क्रम 'आहारनिद्राभयादि-लक्षित' तामसी प्राण्यापासून झाला आहे तेथून पुढें अधिकार, कीर्ति, कुटुंबपालन, जातिरक्षण, राष्ट्राभिमान व राष्ट्रैकीकरण, विश्वाभिमान व विश्वाभेदीकरण, या कर्तव्य-मार्गानें-निष्काम कर्तव्यमार्गानें-योग, भक्ति इत्यादिकांच्यासह **अद्वैतास**, मूळस्वरूपास मिळून जातो व आपण तत्स्वरूप, तदात्मक होतों. हा मार्ग विश्वज्ञानानें, आत्मज्ञानानें, ब्रह्मज्ञानानें, सारांश अद्वैतज्ञानानें मात्र कंठितां येतो, असें 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्र-मिह विद्यते' या भगवद्वाक्यावरून 'कर्मयोगो विशिष्यते' 'न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं' इत्यादि अनेक वेळच्या उद्गारांवरून स्पष्ट आहे. 'बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां-प्रपद्यते' याचें रहस्य हेंच आहे. 'तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकं, ददामि बुद्धियोगं तं' हे नियम तरी उत्क्रांत होणाऱ्या जीवासाठींच सिद्ध झाले आहेत. 'प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति' 'करिष्यस्यवशोऽपितत्' 'शरीरयात्राऽपि च ते नप्रसिद्ध्येदकर्मणः' इत्यादि नियम सुद्धां असेंच सांगतात कीं कर्तव्यकर्म केलें नाहीं तर घात आहे व कर्तव्यकर्म निष्कामत्वानें किंवा ईश्वरार्पण बुद्धीनें केलें तरच ज्ञानप्राप्ति होऊन जीवास मोक्ष मिळेल. असा हा गीतेचा राजमार्ग आहे. गीताभिषिक्त वेदांती केव्हांही प्राप्तकर्मविमुख असत नाहीं. सारांश येथें प्रवृत्ति निवृत्तिपर्यवसायी होते. आपल्यासाठीं तयार केलेलें अन्न क्षुधातुरास देऊन बाकी शिल्लक राहिलेलें अन्न आपण भक्षिल्यास जसें निराहाराचें पुण्य प्राप्त होतें, पण तें जसें नुसत्या निराहारानें प्राप्त होत नाहीं, आपण संपादिलेलें उद्धारक ज्ञान दुसऱ्यास अर्पण केलें असतां तें जसें दृढतर होतें, पण तें जसें आपल्या पुस्तकालयाला अगर वाणीला कुलूप लावून होत नाहीं, त्याचप्रमाणें अभेदानुसंधान ठेवून आपण केलेलें प्राप्तकर्तव्यही साहजि-कतःच निष्कर्म होतें; पण **कर्मच केलें नाहीं, तर मात्र नैष्कर्म्य** प्राप्त होत नाहीं! तात्पर्य निवृत्तिमूलक प्रवृत्ति असेल तर परमार्थ साधतो, नुसती निवृत्ति शक्यच नाहीं, आणि नुसती म्हणजे केवल प्रापंचिक प्रवृत्ति घातुक होते, हें सांगण्याचा व सिद्ध करण्याचा मुख्य उद्देश आहे. 'अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः' 'काम्यानां कर्मणां सन्यासं' 'सर्वकर्मफलत्यागं त्यागं प्राहुः' इत्यादि उपदेश जो एक-कंठानें केला आहे, त्याचें तात्पर्य हेंच आहे. तेव्हां गीतामृत पिणारा यथार्थ मुमुक्षु 'कर्तव्यविमुख' होईल, अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. समुद्रांतील लहरी ज्याप्रमाणें अनेक हेलकावे खाऊन शेवटीं समुद्रांत लीन होतात, वाऱ्याच्या लहरी वाहतां वाहतां समशीतोष्ण होतात, शीत व उष्ण हीं सापेक्षत्वानें परस्परविरुद्ध असणारीं कार्ये ज्याप्रमाणें क्रमशः समस्वरूप होतात, त्याप्रमाणें ज्ञानी व अनासक्त कर्तव्यकर्मकारी

जीवही शेवटीं ' समत्वाला ' जाऊन समरूप व समरस होतो. स्थिर दीपज्योति निर्वात प्रदेशांत सर्वप्रकाशक होते, निर्लेपत्वानें राहणारें आकाश सर्वभूतमात्रांस अवकाश देतें, त्याप्रमाणें संकल्पशून्य स्थितप्रज्ञाचें कर्तव्य स्वोपकारक व सर्वोपकारक होतें. कामधेनु सर्वांस फलद्रूप होते, त्याप्रमाणें गीतावेदांती पुरुष ' आपपर भाव ' विलीन करून ' समदर्शी ' होतो.

१० गीतेंतील वेदांत समजून घेऊन व्यवहारांत आणावयाचा आहे. नुसता पोपटाप्रमाणें बडबडावयाचा नाहीं. तसेंच ' वेदांती ' म्हणवून घेऊन संकल्प-चोदनानुरूप वाटेल तें कर्म करण्याचा हा वेदांत नव्हे. वेदांततत्त्वांवर बुद्धिप्रागल्भ्यानें उत्तम उत्तम व्याख्यानें झोडून व्यवहारांत वाटेल तसे वागणारे, अनीतीचीं अश्रुतपूर्व व अघोर कृत्यें करणारें व हीं तामसी कृत्यें (अपकृत्येंच हीं!!) करण्याला उत्तेजन देणारे आसुरी राक्षस आमच्या देशांत पुष्कळ उत्पन्न झाले, आज विद्यमान आहेत व पुढेंही होतील. पण हे लोक उत्पन्न होतात म्हणून अभेदात्मक व अद्वैतरूपी वेदांत अनर्थक होय, असें म्हणणे म्हणजे अग्नीनें नगरे व देशच्या देश भस्म केले म्हणून अग्नि सर्वथा व सर्वदा अनर्थक होय, असे म्हणण्यासारखें असमंजस व अनर्थक होय. सर्व वस्तु चांगल्या आहेत, योजक मात्र हवा. तसेंच प्रपंचांतील सुखदुःखें शून्यवत् करणारा गीता-मार्ग अद्वितीयच आहे; मात्र अधिकारी चांगला हवा. ज्याला नुसतें विषयसुखच हवें आहे, त्यानें गीतामार्गाकडे जाऊंच नये, म्हणजे त्याला इष्ट अशा दुःखमूलक व दुःखपर्यव-सायी सुखाचा क्षणभंगुर अनुभव येऊन दुसऱ्याक्षणीं त्याचें चित्त अस्वस्थ होईल. पण ज्याला समाधान हवें आहे, अंतरात्मा थंडगार असावा अशी इच्छा आहे, त्यानें देहविष-यक विषयसुखावर–बाह्यसुखावर–लाथ मारून अधिकारसंपन्न झालें पाहिजे आणि जस-जसा ज्ञानाधिकार प्राप्त होईल, तसतशी आपली पुरुषार्थाची मर्यादा ठरवून, म्हणजे अधिकारानुसार मार्गांत मुक्काम करून शेवटीं अद्वैत स्वरूपाला जाऊन मिळालें पाहिजे. निरुद्योगाला अग्निरथांतून जाण्यापेक्षां पायीं चालणें पथ्यकर आहे, त्याचप्रमाणें देहस्वार्थी पुरुषानें ' आत्मानुभवाची ' खटपट न करितां प्रथम प्रथम कुटुंबपोषणाचें ज्ञान संपादन करून त्या उत्पादकज्ञानाच्या व कर्माच्या जोरावर निष्कामत्वानें कुटुंब-पोषण करणें व आपल्या स्वामीची पूजाअर्चा करणें हेंच विहित आहे. या असल्या देहस्वार्थी अज्ञान्याचे हातांत पहिल्याप्रथमच वेदांताची पुस्तकें देणें म्हणजे माकडाच्या हातीं कोलित देण्यासारखेंच आहे! परंतु त्याचा अर्थ असा नव्हे कीं, या देहस्वार्थी पुरुषाला कधीं उन्नतीचा प्रसंगच येणार नाही! छेः छेः! उलट गीतामाउलीचा असा कटाक्ष आहे कीं, ' अपि चेत्सुदुराचारः ' पुरुष सुद्धां क्रमाक्रमानें मोक्षाचा ज्ञानमार्गाचा, अधिकारी होतो! ' कुटुंबपोषक ज्ञान व तत्प्रचोदित कर्म हा शेवटचा पुरुषार्थ नव्हे ' असें ज्ञान त्याला झालें असलें म्हणजे पुरे आहे. ' मी कुलपति नसून कुलसेवक आहे ' असें कुटुंबांतील प्रत्येक घटकास वाटूं लागलें

कीं, कुटुंबव्यवहार अभेदात्मक होतो व तेथेंच अद्वैतानंदामृताचा थोडासा घुटका प्याक्यास सांपडतो. 'मी उपभोग घेण्यासाठीं येथें आलों नाहीं; कर्म, सत्कर्म, श्रुतिविहितकर्म करण्यासाठीं आलों आहें.' ही वृत्ति कुटुंबांत, कुलांत, समाजांत व राष्ट्रांत बाणूं लागली म्हणजे ज्ञानपरिपोष व कर्तव्योन्मुखता संघटित व प्रफुल्लित होऊन सामाजिकदेह म्हणजे विराट्स्वरूप व्यवस्थित होतें. हाच गीताप्रणीत उत्क्रांतीचा,–सुधारणेचा–मोक्षाचा,–मार्ग आहे. भोगात्मक, विषयसुखात्मक वृत्ति असली म्हणजे कुटुंबांतील 'बायकापोरें' नदीच्या प्रवाहांतील 'चार लांकडें' होतात; पण तेंच गृहपतीचें, गृहिणीचें ज्ञान व कर्म निष्कामप्रेमपरिपूर्ण असूं द्या कीं, ह्या सर्व निरनिराळ्या व्यक्ति कुटुंबवृक्षाचे अवयव होऊन एकमेकांचे ज्ञानपोषक, कर्तव्यप्रेरक व सुखोत्पादक होतात. मात्र प्रेम दैवी संपत्तीचें हवें; भोगाचें प्रेम नको. पहा कीं, वृक्षाचीं मुळें, बुंधा, फांद्या, फुलें व फळें हीं एकमेकांचीं कार्यें मोठ्या प्रेमानें करून एकंदर वृक्षास शोभा आणितात व त्याचा उपयोग वाढवितात. आपल्या या शरीरवृक्षाचीही अशीच गोष्ट आहे. आपल्या शरीरांतील प्रत्येक अवयव जोंपर्यंत आपलें काम निष्कामत्वानें व शुद्ध रीतीनें करितो, तोंपर्यंत शरीराची सुस्थिति राहून त्याचें कार्यक्षमत्वही वाढत जातें. पण एकाद्या अवयवानें आपलें कर्तव्य केलें नाहीं, किंवा दुसरा अवयव स्वतःकडेच आपलें व दुसऱ्याचें अन्न ह्मणजे रक्त ओढूं लागला, ह्मणजे हळूहळू रोगाचा उद्भव होऊन सर्व शरीराचा घात होतो. त्याचप्रमाणें कुटुंब काय, समाज काय, राष्ट्र काय, जगत् काय, या सर्वांची गोष्ट आहे, ह्मणजे या सर्वांचें अवयव प्रत्येकी सर्व शरीराचें पोषण करून आपलें पोषण करणारे असे हवे लागतात. हे सर्व एकाहून एक वरचढ असे अभेदपोषक वृक्ष असले पाहिजेत. तेव्हां कुटुंबांतील वयांत आलेल्या प्रत्येक अवयवानें, त्याचप्रमाणें सामाजिक व राष्ट्रीय ज्ञानी व कर्मशील अवयवानें आपआपलें कर्म–स्वतः करितां नव्हे, तर कुटुंबाकरितां, समाजाकरितां व राष्ट्राकरितां–निष्कामबुद्धीनें व प्रेमवृत्तीनें केलें, तरच कुटुंबाचा, समाजाचा व राष्ट्राचा उदय व उन्नति होतात, इतकेंच नव्हे, तर अपूर्व असा अभेदज्ञानजन्य आनंदही उत्पन्न होत असतो. मात्र कर्तव्याची हौस आणि फलाची उदासीनता ही द्वयी ज्ञानपूर्वक अवश्य हवी आहे. येथें–मानवी कोटींत–व्यक्ति हा एकांक Unit नव्हे. **कुटुंब** हा एकांक होय. कारण कुटुंबांतील निष्कामप्रेमांत अभेदज्ञानाचा स्पष्ट उद्गम होतो; त्यागाचा 'श्रीगणेशा' आपण येथेंच शिकतों. राष्ट्रानंतर पृथ्वी, नंतर विश्व इत्यादि पुरुषार्थ व शेवटचा 'ब्रह्म' नामक पुरुषार्थ ह्या पुढच्या पायऱ्या आहेत. तेव्हां सांगावयाचें तात्पर्य हें कीं, सर्वांहून अत्यंत अवघड जो ब्रह्मपुरुषार्थ त्याची वाच्यता, मागील सर्व पुरुषार्थ ह्या जन्मांत अथवा पूर्वजन्मांत करून ज्यानें योग्य अधिकार संपादन केला आहे, त्यानें मात्र करावी, कल्याण होईल. पण ही वडवड अनधिकाऱ्यानें केली असतां राजा नहुष ज्याप्रमाणें स्वर्गातून खालीं पडला, त्याचप्रमाणें हा अनधिकारी पुरुष 'इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' होऊन स्वविघातक व समाजविध्वंसक होईल. यासाठीं [illegible] 'अथ चित्तं समाधातुं' इत्यादि श्लोकत्रयांत सांगितल्याप्रमाणें व तुकारामें [illegible]

त्याप्रमाणें 'अधिकारा ऐसे दावियले मार्ग' (हें वचन दुसरीकडे आलेंच आहे!) अशी व्यवस्था सांगितली आहे. ही व्यवस्था आमच्या एका आर्यधर्मामध्यें मात्र आहे; आणि आपण स्वतः परीक्षा घेऊन आपल्या ज्ञानानुसार आपला पुरुषार्थ ठरवावा व तो साध्य झाला म्हणजे दुसऱ्या पायरीवर पाय ठेवण्याचा उपक्रम आपला अधिकार वाढवून करावा, व आपल्याशीं संगत असलेल्या व्यक्तींसही आपल्या वावदूकी नव्हे पण कर्त्या वेदांत पद्धतीनें उन्नत करण्याचा प्रयत्न भगीरथासारखा करावा. हा प्रयत्न करीत असतां 'न बुद्धिभेदं जनयेत्' हा मंत्र व 'सक्ताःकर्मण्यविद्वांसः' हा मंत्र विसरूं नये.असा उपक्रम अधिकारानुसार झाला म्हणजे 'आसुरी' लोक कमी होऊन, दैवीसंपत्ति वाढते आणि प्रपंच व परमार्थ हे दोन्ही साध्य होऊन मोक्षाचा अवजड व अवघड मार्गही सोपा व सवघड होतो. कारण 'जसा वर्तती लोक कल्याणकारी। जगीं वर्तती लोकही त्या प्रकारीं' (यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो-जनः) हा न्याय प्रबल होतो. पुनः, ज्यानें त्यानें आपला धर्म पाळला पाहिजे. हा धर्म अधिकारानुसार सिद्ध होतो. कर्मफलत्यागाची वृत्ति ठेविली, म्हणजे कर्म वाढून योग्यता श्रेष्ठ होते, ज्ञान पूर्ण होत जातें आणि मोक्ष नामक पुरुषार्थ, जवळ जवळ येतो. कर्मफलाची व विषयसुखाची आशा ठेविल्यास तदनुसार सकाम वैदिक कर्म, क्षुद्रदेवतांची सकाम उपासना व सकाम ज्ञानार्जन केलें असतां लवकरच फलद्रूप होतें. पण हें सुख क्षणभंगुर असतें; शिवाय नित्यत्व किंवा नित्य सुख देण्याचें सामर्थ्य क्षुद्र देवतांस नाहीं. आणि सकाम कर्म व विषयज्ञान तर आपल्यास विषयरूप (matter) करितें. अतएव विषयकाम व्यर्थ व घातुक आहे; तो भेदवर्धक व आनंदविध्वंसक आहे. म्हणून विषयकाम सर्वथा त्याज्य होय.

११ सांख्य म्हणजे ज्ञानयोग आणि योग्य म्हणजे कर्मयोग होत. उभयतांचें पर्यवसान एकच आहे; तें हें कीं, सर्वभूतें आपल्यामध्यें व आपण सर्वभूतांमध्यें आत्मस्वरूपानें आहों; सर्वत्र अभेद आहे, हें सिद्धांतज्ञान दोहोंच्या पर्यवसानीं ठरतें. प्रोक्त विचारानें व शास्त्रदृष्टीनें तसेंच ब्रह्मज्ञानदृष्ट्या खरे निष्कामकर्मयोगानें हें ज्ञान व्यक्त होऊन सर्वत्र अभेद आहे, असें सर्व मनोवृत्ति सांगूं लागतात. ज्ञानानें कर्म शुद्ध होतें आणि कर्मानें ज्ञानास विज्ञानत्व येतें. आतां, सामान्यतः कर्म गौण, भक्ति श्रेष्ठ व ज्ञान श्रेष्ठतर असा सिद्धांत आहे. त्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, कर्म करणारीं इंद्रियें मनोवृत्तींच्या (Emotions) व बुद्धीच्या (Intellect) सर्वथा स्वाधीन असतात, तेव्हां त्यांचें कार्य मनोवृत्तींच्या अथवा ज्ञानाच्या कार्याहून गौण आहे. तसेंच मनोवृत्ति ह्या ज्ञानाच्या आधीन असल्या कारणानें भक्ति, उपासना इत्यादि मनोवृत्तींचीं कार्यें ज्ञानाहून कमी योग्यतेचीं असतात. "ज्ञान व ज्ञान प्रकट करणारी बुद्धि ही सर्वश्रेष्ठ आहे; म्हणून ज्ञानमार्ग श्रेष्ठ होय. जो उपनिषद्रीत खरा ब्राम्हण आहे, त्यानें ज्ञानमार्ग आदरावा; जो खरा क्षत्रिय आहे, त्यानें उपासनापंथ स्वीकारावा आणि जो खरा वैश्य आहे, त्यानें कर्ममार्ग आदरावा. खरेंच आहे; बुद्धीच्या व तिच्या पलीकडील आत्मा-

रामांच्या आधीन इंद्रियें व मनोवृत्ति झाल्या म्हणजे शास्त्रांचा ( Sciences ) व आत्मज्ञानाचा ( Philosophy ) विस्तार होऊन व मनोवृत्ति ( Emotions of pleasure & pain ) शुद्ध होऊन परोपकार वाढतो, नीति वृद्धिंगत होते, दैवी संपत्ति प्रकट होते आणि प्रेममूलक अभेदज्ञान व अभेदानंद सर्वगामी होतो. तसेंच कर्मही चित्तशुद्धि झाल्याकारणानें ज्ञानपोषक व उपकारक होत असतें. तेव्हां सांख्ययोग व कर्मयोग हे परस्परपोषक असून उपयोगी आहेत. वैश्यांनीं कृषिगोरक्ष्यवाणिज्य करून वेदोक्त कर्मही करावें; अशा रीतीनें कीं प्रत्येक कर्मांत 'प्रेमरस' व उद्धारक ज्ञान उत्पन्न होतील. क्षत्रियांनीं न्यायान्यायावर देखरेख ठेवून इहपरशत्रूंपासून समाजाचें संरक्षण करावें आणि ब्राह्मणांनीं संसारापासून प्रायः अलिप्त राहून समाजाचें ज्ञान वाढवावें आणि समाजासाठीं नीतीचे, व्यवहाराचे नियम शोधून काढून राजाला व प्रजेला निर्भीडपणानें ज्ञानोपदेश व व्यवहारचातुर्य शिकवावें. शूद्र म्हणजे मतिमंद जे लोक तेच ते होत. •हे सांगकाम्याचें कर्म करणारे लोक दिवसेंदिवस उन्नत होत जातील, असें करण्याचें कामही ब्राह्मणांचेंच आहे. हा सांख्य व योग यांचा मिलाफ होय. **गुण-कर्मांच्या भेदप्रभेदांनीं जाति व वर्ण ठरतात** आणि आतांच सांगितल्याप्रमाणें ज्याचें कर्म त्यानें केलें म्हणजे समाज पुष्ट होतो. ज्ञानानें ऐक्य, भक्तीनें प्रेम आणि कर्मानें चित्तशोधन होत असतात, आणि या जन्मीं किंवा दुसऱ्या जन्मीं उन्नति होते. तात्पर्य, लोकहितकारी ज्ञानी आणि फलवांच्छाशून्य कुशलकर्म कर्ते पुढारी प्रायः एकच होत; हें संपादण्यासाठीं प्रत्येकानें अधिकारानुरूप कर्म करावें.

१२ एवंच अधिकारपरत्वें जो धर्म प्राप्त होतो, तो प्रत्येक मुमुक्षूनें आदरिला पाहिजे. येथें स्वधर्माची स्तुति अगर परधर्माची निंदा करण्याचें कारण नाहीं. ईश्वर सर्वत्र समरूप असल्याकारणानें जेथें श्रद्धा, भक्ति, मुमुक्षा दिसेल, तेथें तेथें तो साहाय्य करण्यास व साक्षात्कार देण्यास सदैव तत्परच असतो. प्रत्येक मुमुक्षूनें एक मात्र खबरदारी घेतली पाहिजे कीं, आपण ज्या योग्यतेचे खरोखर आहों, तोच धर्म अनुसरावयाचा किंवा स्वीकारावयाचा. खालचा धर्म सिद्ध झाल्यानंतर जसा गौण, तसा वरील धर्म अशक्य म्हणून अनादरणीय होय. क्रमशः अभेद, ज्ञानपूर्वक अभेद वाढतो आहे कीं नाहीं हें नित्यशः पाहणें हें काम मुमुक्षूचें आहे. आपला अधिकार वाढतो आहे हें बघण्याचें काम व तो वाढविण्याचें कामही ब्रह्मार्थी पुरुषाचें आहे; कारण आपला व आपल्या समाजाचा उद्धार करण्याचें स्वातंत्र्य प्रत्येक ज्ञानी मुमुक्षूस आहे. आतां हें सांगावयास नकोच आहे कीं, उद्धार म्हणजे अभेदज्ञानाची, अद्वैतानंदाची वृद्धि हें होय. याची पराकाष्ठा म्हणजे आत्मैकचिंतन आणि सर्वभूतहितरतत्व होत. ज्ञान आणि प्रेम, प्रेम आणि ज्ञान यांची एकवाक्यता करून सर्वत्र ब्रह्ममय दृष्टि होणें हाच मोक्ष होय. 'मी ब्रह्म आहें' ही वृत्तिही मावळत जाऊन ब्रह्मरूप होणें आणि त्या आनंदस्वरूपांत असतां परिच्छिन्नतेचा ( Finite ) विकार सामर्थ्यशून्य करून टाकणें हीच सह्याच्या अध्यायांत सांगि-

तलेली जीवन्मुक्ति आहे. वासनात्याग ही मात्रा आणि अभेदमूलक ज्ञानवृद्धि हें पथ्य; ही जोडगोळी सुरू झाली म्हणजे हळू हळू इष्ट वस्तूचा अधिगम होऊं लागतो व अनेक जन्म याप्रमाणें अखंड प्रवाह चालविला म्हणजे परागति प्राप्त होते.

याप्रमाणें शास्त्र व अनुभव यांचें सांगणें अभेदात्मक आहे, या अभेदविशेषानें अधिकारनिर्णय, अधिकारवृद्धि व आनंदावाप्ति होतात. जेथें भेद तेथें अज्ञान आणि जेथें अज्ञान तेथें शोकमोहाची व कामक्रोधाची व सुखदुःखाची दुक्कल असावयाचीच, असें सांगितलें आहे. तसेंच मनोवृत्ति उन्नत होत जाईल, तसतशी अभेदाची सत्ता प्रबल होते. भेदक मनोवृत्ति असेल तर तो अद्वैत बडबडणारा नराधम स्वपरवंचक असतो, असेंही तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे.

आतां गीतेंत अद्वैतच प्रतिपादिलें आहे; भेदरूपी परिच्छिन्न ज्ञान व ज्ञानविषय व ज्ञानेंद्रियें मिथ्या आहेत, विवर्त आहेत, एक अस्तिभातिप्रियतारूप एकच एक वस्तु आहे, व तीच सत्य आहे, असें सांगितलें आहे. इत्यादि विचार याच उपसंहारांत अन्य ठिकाणीं केला आहे, ह्मणून त्याची पुनरावृत्ति येथें करीत नाहीं.

असो;--**केवल अद्वैत** हा सिद्धांत आणि हा सिद्धांत सिद्ध करून दाखविणारें कर्म ती नीति, हें ठरलें. तसेंच व्यक्ति हा एकांक ( unit ) नसून तो एकांक कुटुंब, समाज, राष्ट्र, अशा पायऱ्यांनीं चढत जातो व पुढें सर्व 'विश्वच मी' असें ज्ञान होतें हेंही ठरलें. पण यावरून 'सुख पहातां जवापाडे दुःख पर्वताएवढें' असें हें दुःखमूलक व दुःखपर्यवसायी विश्व आहे किंवा 'निजानंदें रंगुनि रंगा विश्वरूप झाला' असें सुखमय आहे हें अद्यापि स्पष्ट ठरलें नाहीं. तथापि अभेदमूलक ब्रह्मज्ञान ज्याला करून घेणेंच आहे, त्याला कर्मकर्तव्यता हेंच सुख व फलाशा हें दुःख होतें. यावरून जगत् दुःखमूलक किंवा सुखमूलक हा प्रश्नच उरत नाहीं. कारण (१) जगन्मिथ्या आहे, ह्मणजे तें जसें आहे तसें आपल्यास दिसत नाहीं, व इंद्रियोपाधि आहेत, तोंपर्यंत स्वस्वरूपानें दिसणें शक्यही नाहीं. एवंच जें दिसतें तें मिथ्या होय. अर्थातच येथें सुखदुःखाचा प्रश्न संपला. (२) सुखदुःख हें मानीव आहे; ह्मणजे आपल्या चित्तवृत्तीच्या लहरीवर विषय सुखोत्पादक किंवा दुःखजनक होतात, तेव्हां विश्वाकडे सुखदुःखाचें कार्यच राहत नाहीं. (३) फलाशा सोडिली ह्मणजे अर्थातच सुखदुःखाची गोष्टच संपते. आणि मथितार्थ असा निघतो कीं, ज्ञानपूर्वक निष्काम कर्म करणारा तो नित्यसुखी आणि फलाशेवर भिस्त ठेवून सकाम कर्म अभिमानानें करणारा तामसी अथवा राजसी पुरुष सदा दुःखी होय. आशा व आशाबद्ध पुरुषाचा आशाभंग हीं सदैव दुःखमयच होतात. तेव्हां संसारांत स्वतःच्या **उपभोगाप्रीत्यर्थ मात्र धडपडणारे** पुरुष दुःखी असतात आणि 'अवघाचि संसार सुखाचा करीन' असें ह्मण-

णारा कर्तव्यदक्ष मुमुक्षु सदैव आनंदांतच असतो. अहंतेचा त्याग व वासनेचें निष्कासन केलें ह्मणजे कर्तव्यतत्पर मुमुक्षूंची प्रामाणिक शास्त्रांच्या अभ्यासानें दृढावलेली नीति ही, 'भूतांची दया हें भांडवल संतां' 'जगाच्या कल्याणा संताच्या विभूति' 'सर्वभूतहितेरतः' या न्यायाची असते.



## अध्याय सहावा.

### आमच्या नीतीचा पाया.

पौरस्त्य आर्यांच्या नीतीचा पाया वस्तुस्थितिविषयक सिद्धांत (शास्त्रें Sciences) आणि मानवी पुरुषार्थ (Ideals) या दोन अभंग शिलातलावर घातला आहे, म्हणजे आमची नीति प्रकृतिमूलक व धर्ममूलक आहे; आणि पर्यवसानीं प्रकृतीमध्यें उत्क्रांति घडवून आणून एकत्व उत्पन्न करणारा जो धर्म व जें तत्त्वज्ञान, या उभयरूपानें फलद्रूप होणारी आहे. सारांश, शास्त्रें व पुरुषार्थ यांचा समन्वय करणारें नीतिशास्त्र आहे. सर्व चराचर प्रकृति त्रिगुणात्मक आहे. आणि तमोगुणापासून सत्त्वापर्यंत जाणें हा उत्क्रांतीचा पंथ आहे. तमोगुणाचें प्राबल्य असतांना जीव अज्ञानवश व प्रकृतिवंत असतात. रजोगुण प्रबल असला म्हणजे प्रकृतीशीं अहंकारपूर्वक आणि वासनामूलक युद्ध सुरू असतें आणि सत्त्वगुण प्रधान झाला म्हणजे जीवास प्रकृतीचें स्वामित्व प्राप्त होऊन तो ज्ञानानें समाधान पावतो. तेव्हां १७ व्या अध्यायांत आहारविहार, यज्ञदानादिकांच्या लक्षणान्वयें स्वतःच्या प्रकृतीचा शोध करून व आपल्या स्वभावांची योग्यता ठरवून त्या योग्यतेनुसार वर्तन करणें व ज्ञान वाढवून आपली योग्यता श्रेष्ठतर बनवून श्रेष्ठतर कर्म करणें ही आमची नीति, म्हणजे हें जीवाचें अवश्य कर्तव्य आहे. पुनः; एका अवस्थेंतील सत्त्वगुण दुसऱ्या श्रेष्ठतर अवस्थेचा रजोगुण व श्रेष्ठतम अवस्थेचा तमोगुण होतो; म्हणजे पशूचा जो सात्त्विक गुण तो मनुष्यांचा रजोगुण व साधुसंतांचा तमोगुण होतो. तेव्हां ज्ञान वाढवून कर्तव्य श्रेष्ठतर करीत राहणें जीवांस अवश्य आहे. 'अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिं' असा भगवंतांचा अनुभव आहे. आणखी एकदां; स्वभार्येवर अतोनात व भोगमूलक प्रीति करणें हा गुण पशूच्या दृष्टीनें सात्त्विक, मनुष्यांच्या दृष्टीनें राजसी आणि साधूंच्या दृष्टीनें तामसी आहे. तमोगुणांत कर्तव्य न करूनही परस्परतः सुख होईल अशी दैववादी श्रद्धा असते; रजोगुणांत आपण (अर्धवट ज्ञानी) अभिमानानें कर्म केलें तरच इष्ट सुख होईल अशी श्रद्धा असते; आणि सत्त्वगुणांत पूर्ण ज्ञानानें व शुद्ध चित्तानें कर्तव्य होत असल्यामुळें सदैव समाधानवृत्ति असते. आतां असा एक अज्ञानमूलक समज सर्वत्र प्रसृत झाला आहे कीं, सात्त्विक ज्ञानी पुरुष हा कर्माविषयीं अत्यंत उदासीन असतो व असावा. हा समज युरोपियन लोकांतच आहे असें नाहीं, तर

श्रामण्य लोकांत व वेदांती लोकांतही या अपसिद्धांताचा प्रचार झाला आहे, व या अनर्थापातामुळें उत्तम सात्त्विक ज्ञानी पंडितांच्या लोकोपकारक कृत्यांस आसन्ना समाज मुकवला आहे. तो गैरसमज हा कीं, ज्ञान्यानें कर्म करूं नये. तात्त्विक ग्रंथांचा, उपनिषदांचा, गीतेचा व पुराणांचा आशय असा नाहीं, हें 'कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः, यावरून स्पष्ट होत आहे. कर्मामध्यें अहंवृत्ति व प्रयोजन न ठेवितां कौशल्यानें ज्ञान वाढविणारें व लोकसंग्रह करणारें कर्तव्य करणें हाच भगवंतासारख्या श्रेष्ठ विभूतींनीं आदरिलेला मार्ग स्वीकारिला म्हणजे कर्मामध्यें येणारे उद्वेगजनक प्रतिबंध नष्ट होऊन स्वतःचा उद्धार व लोकांचें कल्याण होतें. लोकसंग्राहक कर्म आपल्या हातून निर्मलत्वानें झालें तरच सात्त्विकतः आत्मोन्नत पुरुषांची सर्व सात्त्विक कर्में लोकसंग्राहक होतात; व याप्रमाणें स्वार्थ आणि परमार्थ या उभयतांमध्यें जो विरोध युरोपियन लोकांत आढळतो, तो विलयास जाऊन व्यक्तीचा उद्धार व लोकांचें कल्याण होतें. हें असें शुद्धचित्तात्मक कर्म म्हणजेच ऐहिक धर्म होय. समाधान तेथेंच आहे. स्तब्ध बसणें हा तमोगुण होय. समाधान ठेवणें हा सत्त्वगुण होय. विषयध्यानानें तमोगुण उत्पन्न होऊन बुद्धिनाश होतो; विषयासक्ति व विषयकांक्षा यांच्या प्रेरणेनें झालेलें स्वार्थी कर्म इच्छाद्वेष उत्पन्न करणारें असून रजोगुणी कर्म दुःखात्मक होतें; आणि ज्ञानपूर्वक झालेलें शुद्धचित्तात्मक कर्म श्रद्धाभक्तियुक्त असून श्रेष्ठत्व देणारें असतें. कर्मशून्य झाल्यानें नैष्कर्म्याची सुखशांति मिळते. सारांश, तमोगुणात्मक विषयभोगेच्छा म्हणजे काम आणि सत्त्वगुणात्मक आत्मेषणा म्हणजे श्रद्धा होत; श्रद्धा हवी; काम नको; हा आर्यनीतीचा मथितार्थ आहे; व यांत ज्ञानोपकारी बुद्धि, ध्यान व स्मृति या साधनांचा आश्रय घ्यावा लागतो.

धर्म आणि नीति यांत विशेष काढिलाच तर शुद्धसत्त्व आणि रजःसत्त्व यांत जो विशेष आहे तोच येईल. रजःसत्त्वाचें दिग्दर्शन दुसऱ्या अध्यायांतील ३१ ते ३४ श्लोकांत केलें आहे. या श्लोकचतुष्टयांत सात्त्विक अहंकाराचें महत्व सांगून रजस्तमोगुणांचा निषेध केला आहे. पण ही अगदीं सामान्य म्हणजे सापेक्ष नीति होय, व ही सामान्य लोकांकरितांच सांगितली आहे. युरोपियन नीति याच प्रकारची म्हणजे रजःसात्त्विक वर्तन तें सद्वृत्त व रजस्तमोगुणी वर्तन तें दुर्वृत्त असें मानणारी आहे; याच नीतीला विद्यासंस्कार, लोकमत व शासनपद्धति यांचा आश्रय मिळून तिचा परिपोष होतो, व समाजाचें संरक्षण होतें. यम आणि शम हीं सद्गुणाची (सद्वृत्तीची) उत्पादक असतात.

आत्मिक सद्वृत्ति ही व्यावहारिक सद्वृत्तीपेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे. आत्मिक सद्वृत्तींत अहंकार अगर वासना यांचा लेश नसतो; ज्ञानाचा उदय होऊन दृढभक्ति ही अवतीर्ण झालेली असते. विषयवैराग्य बाणलेलें असतें. (पहा अ० १३.

श्लोक ७-११) सात्त्विक गुणाचें लक्षण म्हणजे दैवीसंपत्ति आणि असात्त्विक ( राजसी व तामसी ) गुणांचें लक्षण आसुरी संपत्ति होय. दैवी संपत्तीचा पुरुष संयमी असतो ( अ० २ श्लो. ६४, ६५, ६८, ६९. ) व आसुरी संपत्तीचा पुरुष विषयी असतो. ( अ० २ श्लो. ६२, ६३, ६६, ६७ ). संयमी पुरुषाचे वर्तनाचा व वृत्तीचा मध्यबिंदु परमात्मा व विषयी पुरुषाचा नीतिमध्यबिंदु देहात्मा असतो.

मनोनिग्रह व एकनिष्ठ ईशभक्ति यांच्या द्वारां सत्त्वगुण पुष्ट होतो. सत्त्वगुणाला ज्ञानाचा आश्रय अवश्य हवा. सिद्धयसिद्धीचा विचार कर्म करितांना नसावा; हेंच आमच्या आर्यनीतीचें सार आहे. आर्यनीति म्हणजे कर्मयोग ( Practical philosophy ) होय. श्रीमद्भगवद्गीतेंत या कर्मयोगाबरोबरच सांख्ययोगाचा ( Theoretical philosophy ) विचार केला आहे, म्हणून त्या ग्रंथास तत्त्वज्ञान, ब्रह्मज्ञान, ( philosophy ) असें नांव प्राप्त झालें आहे.



# भाग आठवा.

## आठरा अध्यायांचे उपसंहार.

### खंड १.

#### विषयप्रवेश.

या भागामध्यें, श्रीमद्भगवद्गीतेचे जे अठरा अध्याय प्रकट झाले आहेत त्यांचा परस्परांशीं, आणि त्या प्रत्येकांत जे श्लोक अगर श्लोकगण आहेत त्यांचा परस्परांशीं वास्तविक व सयुक्तिक संबंध कसा आहे, हें दाखविण्याचा विचार आहे.

पहिला अध्याय तर ऐतिहासिक आणि प्रस्तावनापर आहे. या अध्यायाचे पहिले वीस श्लोक केवळ आख्यायिकापर आहेत. कोणत्या स्थळीं, कोणत्या वेळीं आणि कोणत्या प्रसंगीं गीताशास्त्राचा उपदेश केला; म्हणजे कोठें, केव्हां आणि कोणत्या परिस्थितींत सनातन वैदिक धर्माचें श्रीमद्भगवद्गीतास्वरूप प्रकट झालें, हा व इतकाच काय तो विषय ह्या श्लोकावलींत आहे. पुढील तीन श्लोकांत 'युद्ध' नामक कर्म करावयाचें तें कोणाबरोबर, हें प्रत्यक्ष पाहण्यासाठीं अर्जुनानें (सकाम कर्तव्य करूं इच्छिणाऱ्या पुरुषानें) श्रीकृष्णास (आत्मारामास) विनंति केली आहे; ती ही कीं, 'माझा रथ दोन सैन्यांच्या मध्यें जो रणस्तंभ आहे तेथें नेऊन ठेवा.' अर्जुन हा कर्तव्य करूं इच्छिणारा सकाम पुरुष, आणि श्रीकृष्ण भगवान् हा त्याचा सारथि (उपदेशक) होय. असो; पुढील तीन श्लोकांत रथस्थापना आणि श्रीकृष्णाकरवीं युद्धकर्तव्याची पूर्ण ओळख झाली आहे. नंतर श्लोक सव्वीस आणि सत्तावीस यांमध्यें आपण जें काय करावयास उद्युक्त झालों आहों, त्याचें मानवी दृष्टीनें ऐहिक पर्यवसान अर्जुनाच्या लक्ष्यांत आलें आणि तो गडबडला. 'अमुक एक गोष्ट करीन' अशी जी आपण सामान्यतः पहिल्या प्रथम वाचालता करीत असतों, प्रसंग, पर्यवसान, परस्परसंबंध इत्यादिकांचा विचार न करितां एकदम कर्तव्यासंबंधीं सिद्धांत ठोकून देतों, आणि वेळ आली, म्हणजे आपण कचरतों, मागें पाय काढितों, नाहीं म्हणतों, त्याचें येथें अर्जुनरूपानें उत्कृष्ट दिग्दर्शन झालें आहे. आतां, आपण सामान्य जन भीतीनें गांगरतों, आणि अर्जुन कृपेनें, अनुकंपेनें गांगरला, मोह पावला, कर्तव्यपराङ्मुख झाला, हा अर्जुनाचा विषाद विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. तथापि आपल्यासारखाच अर्जुनही कांहीं एक मोहानें कर्तव्यविन्मुख झाला आहे, हेंही विसरतां कामा नये.

श्लोक सत्तावीसापासून पुढें अध्यायसमाप्तीपर्यंत जी श्लोकावली आहे, तींत, अर्जुनाची आत्मिक स्थिति कोणती होती; हें स्पष्टपणानें दाखविलें आहे. 'आपल्या स्वजनांस, इष्टमित्रांस, आप्तगणगोतांस-सारांश, आपल्या बंधुबांधवांस युद्धामध्यें मारून माझें कल्याण-खरें स्वर्गीय कल्याण-व्हावयाचें नाहीं, होईल असें निदान मला तरी वाटत नाहीं' असें अर्जुनाचें म्हणणें, हें या श्लोकसंततीचें ध्रुवपद आहे. स्वकुलाचा, स्वगोत्राचा व स्वजातीचा घात करून आपण सुखी व्हावें, ही गोष्ट अर्जुनास संमत नाहीं. याचप्रमाणें आपल्यापैकीं पुष्कळांस हल्लींच्या सर्वतोपरी पतितकाळांत सुद्धां अर्जुनाप्रमाणेंच विषाद उत्पन्न होईल यांत शंका नाही. हा विचार सर्वसाधारण आहे. ध्यानांत धरावयाचें इतकेंच कीं स्वजनविघाताचें पाप केलें तर मात्र प्राप्त होणारें त्रैलोक्याचें राज्य सुद्धां आपल्याला नको, हें अर्जुन निश्चयानें सांगत आहे. "स्वजननाश करून सुख होणार नाहीं, झालें तरी तें सुख भोगण्यांत मजा नाहीं; राज्य प्राप्त झालें, किंबहुना त्रैलोक्यपतित्व मिळालें, तरी स्वजनांस सुख देण्याची व 'आपण सुखी आहों' हें त्यास दाखविण्याची संधि राहणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर स्वजनहत्येनें घोर पातक मात्र लागेल, मित्रद्रोह आणि कुलक्षय हीं पातकें एक अतिदुःसह दुःखसंतति उत्पन्न करून पितरांस दुःखी करितातः आणि दुसरें, पुत्रपौत्रांस धर्मशून्य करून तापत्रयांत लोटतात; म्हणून हीं पातकें व पातकमूलक कृत्यें मी करीत नाहीं" हा अर्जुनाचा संकल्प झाला. सारांश, आपण स्वतः सुखी व्हावें ह्या स्वार्थासाठीं दुष्टांचाही घात करण्यास सामर्थ्यशील अर्जुन कचरला; याचा अर्थ असा कीं, विषयसुखाचा उपभोग घेण्यासाठीं मात्र कर्तव्य करावें हा जो सामान्यतः कर्तव्यप्रेरक गुण म्हणून समजला जातो, तो अर्जुनास पसंत नव्हता. स्वसुखासाठीं दुसऱ्याचा नाश करण्यास अर्जुन तयार झाला नाहीं, इतकेंच नव्हे, तर हें करणें पापमूलक आहे, त्याच्यायोगानें त्रैकालिक सुखावर पाणी पडतें आणि पूर्वजांस व वंशजांस दुःखांत पडावें लागतें, ही त्याची समजूत आहे. ज्याला पाश्चात्य भाषेंत Egoist (स्वैकसुखवादी) म्हणतात, तसा तो नाहीं. राज्यसुखलोभानें प्रथमतः त्यानें युद्धाची सिद्धता केली, पण प्रत्यक्ष वस्तुस्थिति त्यानें पाहिली, तेव्हां त्याची **स्वार्थैकपरायणता** मावळली, पण तो स्वधर्मपराङ्मुख झाला. सारांश, स्वकुलाला सुखी करून स्वतःला आनंदित करण्यासाठीं सदैव सिद्ध असणारा अर्जुन हा योद्धा खरा, पण स्वकुलाचा घात करण्याचा प्रसंग आला तेव्हां मागें सरला. स्वकुल हें त्याला आत्मवत् झालें होतें. त्यांचा घात म्हणजे स्वघातच असें समजून तो ऐन युद्धाचे वेळीं कृपावृत्तीनें गडबडून गेला, आणि खिन्न होऊन स्तब्ध राहिला. हा विषय पहिल्या अध्यायांत आहे. परंपरागत आलेले जातिधर्म व कुलधर्म माहीत असणाऱ्या आणि 'तेच खरे आहेत, दुसरा श्रेष्ठ धर्मच नाहीं' असें (पूर्ण विचाराच्या अभावीं) श्रद्धेनें मात्र मानणाऱ्या सर्व कल्याणेच्छु मंडळीची अशीच अवस्था व्हावयाची! व्यक्तीचें किंवा कुलाचें वर्तमानकाळीं नुकसान करून जगाचें अथवा राष्ट्राचें भावी कल्याण करण्याचा प्रसंग आमच्या सारख्यांवर आला तर व्यक्तीच्या व कुलाच्या संरक्षणासाठीं आपण कृपावश होऊन जर्से हें

आम्हांच्या हिंदी लोकांस कांहीं नवें वर्तमान नव्हे ! असो; तरी आजचा प्रसंग असा आहे कीं आ-मच्या जुन्या गोष्टीच आजला स्मृतिपंथाच्या कक्षेंतून बाहेर गेल्यामुळे पुनः सांगाव्या लागतात.

त्याप्रमाणें (१) प्रसंग, (२) कर्तव्य करूं इच्छिणारा, (३) त्याच्या मनाची स्थिति, आणि (४) त्याची आत्मिक योग्यता, इतक्या अवश्य विषयांचा संग्रह या सर्वमान्य गीताशास्त्राच्या प्रथमाध्यायांत आहे. ही प्रस्तावना होय.

दुसरा अध्याय म्हणजे सर्व गीताशास्त्राचा आगाऊ रेखाटलेल्या नकाशा होय. प्रायः दुसरा अध्याय म्हणजे गीताशास्त्राची अनुक्रमणिका होय. येथें ज्या विषयाचें दिग्दर्शन केलें आहे, त्यांचाच विस्तार पुढील सोळा अध्यायांत करून अठराव्या अध्यायाचे शेवटीं समन्वय म्हणजे एकवाक्यता करून उपसंहार केला आहे आणि पुनः सर्व विषयांचा जीर्णोद्धार केला आहे. दुसऱ्या अध्यायांत उपक्रम आणि अठराव्या अध्यायांत उपसंहार आहे. मधील पंधरा अध्यायभर उपक्रमाध्यायांत निर्दिष्ट केलेल्या विषयांची मीमांसा, शंकासमाधान आणि पुरुषार्थाची सिद्धता केली आहे.

असो; दुसऱ्या अध्यायाचा प्रवेशसूचक श्लोक केवळ अर्जुनाची कृपापूर्णवृत्ति आणि त्याची खिन्नता, सारांश, त्याचे मनाची मलिनता व दौर्बल्य यांचे मात्र वर्णन तात्पर्यरूपानें करीत आहे. भगवंतांनी ही स्थिति पाहिली, आणि त्यांनीं अर्जुनाला प्रथमतः लौकिक-नीतीचे सामान्य नियम सांगण्यास आरंभ केला. हेतु हा कीं, प्रायशः कर्तव्याची प्रेरणा करणारे सामान्य व परंपरागत नियम सांगून जर अर्जुन वळला, तर विषयविस्तार करून गहन प्रश्नांचा विचार करण्याचें कारणच उरणार नाहीं. ते म्हणाले. "शिष्टविगर्हित आणि अनार्यस्वीकृत (शिष्ट जनांनीं टाकलेली आणि दुष्ट जनांनीं घेतलेली) ही दुष्ट मनोवृत्ति तुझ्या अंतःकरणांत आतांच कोठून उद्भवली ? ही वृत्ति कायम झाली तर स्वर्गाचें कपाट तुला कधींही उघडितां येणार नाहीं, आणि तुझी सर्वत्र अपकीर्ति होईल, हें तुला विदित नसावे काय ? हा भागुबाईपणा सोडून दे आणि क्षत्रियांचें कर्तव्य कर." हा भगवंतांचे बोलण्याचा मथितार्थ आहे. हा अगदीं सामान्य उपदेश आहे. सामान्य माणसासारखाच उपदेश भगवंतांनीं येथें प्रथमतः केला आहे. पुढें महाभारतांत युद्धप्रसंगीं जेव्हां जेव्हां अर्जुनाला उपदेश करण्याचा भगवंतांस समय प्राप्त झाला, तेव्हां तेव्हां या सामान्य सुरांतच उपदेशगायनाचा क्रम धरिला आहे. युद्धारंभींचा प्रसंग आणीबाणीचा म्हणून व अर्जुन सामान्य उपदेशानें वळत नाहीं, असें पाहून श्रीकृष्णांनीं सर्व दुःखांची आत्यंतिक निवृत्ति करणारें ज्ञान अर्जुनाला समर्पित केलें आहे. असो; प्रथम प्रथम भगवंतांनीं ऐहिक व सुलभ विषयसुखोपभोगाचें नांव सुद्धां काढलें नाहीं, हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत येऊन चुकलेंच असेल. 'संप्रदाय नाहीं, स्वर्ग मिळणार नाहीं, कीर्ति मिळणार नाहीं, भेकड म्हणून तुझी अपकीर्ति होईल, क्षत्रियवर्णाला कलंक लावणारें हें तुझें

वर्तन आहे' असे स्थूल सुखाचा उपभोग-त्याग करण्यास सांगणारे इतर कर्तव्यप्रेरक-वरिष्ठ प्रतीचे कर्तव्यप्रेरक-सुचवून अर्जुनाला कर्तव्योन्मुख करण्याची भगवंतांची खटपट आहे. तात्कालिक सुखाला फांटा देऊन संप्रदायाप्रमाणें-लोकानुकूल रीतीनें-चालणें, पुढील मोठ्या सुखाच्या आशेनें कर्म करणें, व इहपरलोकीं सुख देतात अशा प्रेरणांनीं कर्म करणें, हे कर्मप्रोत्साहक प्रकार सामान्यजनसमूहाच्या सामान्यनीतिकल्पनांहून फारसे श्रेष्ठ प्रतीचे नाहींत, हें कोणीही कबूल करील.

पण याही प्रेरणांनीं अर्जुनाचें समाधान झालें नाहीं, हे चार ते दहा श्लोक वाचिले असतां सहज कळून येतें. ज्यांनीं आपल्यास लहानाचें मोठें केलें, जे सत्यप्रतिज्ञ आणि कौरवकुलाचे आधारस्तंभ, त्या भीष्माचार्यांसारखे आजोबा, आणि ज्यांनीं आपल्याला धनुर्वेद शिकवून सकल शस्त्रास्त्रविद्येंत पारंगत केलें त्या द्रोणाचार्यांसारखे गुरुजी, यांच्या विरुद्ध कृतघ्नता प्रकट करावयाची, कृतज्ञताबुद्धि नाहींशी करून टाकावयाची, हें कर्म अर्जुनास अत्यंत विषम, पापमूलक आणि अधर्मप्रचारक वाटलें हें साहजिकच होय. भीष्मद्रोणांसारख्या वयोवृद्ध, तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध आणि विज्ञानवृद्ध अशा पुण्यशील व तेजःपुंज महापुरुषांशीं युद्ध करून त्यांस मारावयाचा प्रयत्न करणें हें कर्म अत्यंत गर्हणीय आहे, असें अर्जुनास साहजिकच वाटलें. हें अपकृत्य संप्रदायाच्या, स्वर्गाच्या व कीर्तीच्या विरुद्ध आहे, असा **अर्जुनाचा** आक्षेप आहे. 'यापेक्षां आपला भाऊबंदकीचा वांटा सोडून देऊन **कोठें तरी भिक्षावृत्तीनें उदरपोषण करणें अधिक श्रेयस्कर आहे**,' असें अर्जुन म्हणाला. पूज्यबुद्धि असणें हा सनातननीतिशास्त्राचा प्रमुख आश्रय आहे. पूज्यबुद्धि नाहा तेथें खरा आदर नाहीं, खरा स्नेह नाहीं व खरी अनुकंपाही नाहीं. पूज्यबुद्धिच नाहीं म्हणजे आपल्यापेक्षां श्रेष्ठ असें म्हणजे वंद्य कांहींच नाहीं, असा अभिमान कां एकदां मनुष्याच्या मनोमंदिरांत प्रवेश करून तेथें नित्याचा सत्ताधीश झाला, म्हणजे न्याय, अन्याय, परोपकार, अपकारनिवृत्ति इत्यादि सर्व नीतिजन्य मनोवृत्ति मावळून जाऊन तो पुरुष स्वैकपरायणतेचा केवळ पुतळाच होऊन बसतो. सारांश, नीतिशास्त्राच्या सर्व तत्त्वांस आधार देणारी जी पूज्यबुद्धि, ती नष्ट करून, शिष्टपरंपरागत कुलव्रत चालवावयाचें आणि शितांभोंवतीं जमणाऱ्या भुतांकरवीं चार दिवस स्तुतीचा गजर ऐकावयाचा, ही स्थिति अर्जुनास परम दुःसह झाली आहे. कुलव्रत मोडावें कीं पूज्यबुद्धीचा नाश करावा, काय करावें, हें त्या बिचाऱ्या पार्थास समजेनासें झालें. कुलव्रत चालवून कुलाचा नाश करावा किंवा कुलव्रत मोडून क्षत्रियाच्या ब्रीदाला हरताळ लावावी? असा सर्वथा मूढ होऊन अर्जुन विनंतिपूर्वक म्हणतो. "भगवंता! शोकमोहांच्या भोंवऱ्यांत मी सांपडलों आहें; धर्मासंबंधें माझी मति मूढ झाली आहे; मी घोंटाळ्यांत पडलों आहें; माझें कर्तव्य मला समजत नाहीं; म्हणून मी तुझ्या चरणीं लीन झालों आहें. माझें खरें कल्याण कशांत आहे, तें निश्चित रीतीनें मला सांग. सारांश, पुरुषार्थ काय आणि त्याचें साधन कोणतें हें मला सांग."

सारांश, सर्वज्ञ भगवंताच्या दृष्टीनें जें कर्तव्य स्वर्ग्य, कीर्तिकर व आर्यजुष्ट होतें, तेंच कर्तव्य अल्पज्ञ अर्जुनाच्या दृष्टीनें कृतघ्नपणाचें पापमूलक आणि राक्षसी वृत्तीचें असें झालें; आणि असेंच व्हावयाचें असा सामान्य अनुभव आहे. संकुचित दृष्टीला जें दुःखदायक असें वाटतें, तेंच दूरदृष्टीला सुखदायक असतें. पहा कीं अलीकडच्या शिक्षणपद्धतीनें वर्गांत एखादें उदाहरण करावयास सांगितलें व तें मला आलें नाहीं, पण शेजारच्या मुलास आलें, असें झालें तर मला मार बसेल या भीतीनें शेजारचा मुलगा मला त्या उदाहरणाचें उत्तर सांगतो. यांत माझा मार चुकला व शेजारच्या मुलानें दाखविलेल्या कृपादृष्टीनें सार्थक्यही झालें. पण मींच स्वतः तें उदाहरण सोडवून माझ्या मनावर जो संस्कार उत्पन्न केला असतो त्याला मी आंचवलों. शिवाय शिक्षकास फसविलें ही निराळीच गोष्ट ! तेव्हां शेजारच्या मुलानें जी संकुचित दृष्टि दाखविली तिच्या योगानें ह्मणजे त्यानें अनाठायीं दाखविलेल्या कृपादृष्टीनें पापपरंपरा उत्पन्न होते कशी, हें पाहिलें ह्मणजे समजतें. हीच दूरदृष्टी होय. ही दृष्टि अर्जुनास नव्हती ह्मणून श्रीकृष्णाचा पुढील उपदेश आहे. कशासाठीं ? अर्जुनाच्या विनंतीवरून त्याला श्रेयोमार्ग सांगण्यासाठीं हा उपदेश आहे.

## अर्जुनाच्या प्रश्नांचें तात्त्विक स्वरूप.

या थोड्याशा विस्तृत विनंतीवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल कीं, **धर्मसूढ** झालेला अर्जुन **श्रेयोमार्ग** विचारीत आहे. येथें नुसत्या नीतीचा प्रश्न नाहीं; तत्त्वाचा आणि तत्त्वसाधनांचा प्रश्न आहे. ऐहिक अगर स्वर्गस्थ कल्याणाच्या पलीकडचा, तात्कालिक अगर दूरदेशी परहिताच्या पलीकडचा, अर्जुनाचा प्रश्न आहे. इष्ट पुरुषार्थ कोणता तें समजून घेऊन, त्या पुरुषार्थाची व प्राप्त झालेल्या कर्तव्याची सांगड जुळली ह्मणजे तो कर्तव्य करण्यास तयार होणार आहे. त्याला विषयसुख नको आहे, त्याला पारमार्थिक पुरुषार्थ हवा आहे. 'निश्चित श्रेय मला सांगा' असा अर्जुनाचा आग्रहपूर्वक, कळकळीचा व शुद्ध मनोभावाचा प्रश्न आहे. अर्जुनाचा प्रश्न अशा दृष्टीचा आहे, असें समजूनच कृष्णांनीं तत्त्वज्ञानविज्ञान सांगण्यास आरंभ केला आहे. यावरून असें नाहीं समजावयाचें कीं, गीताशास्त्रांत नीतीचा विषय मुळींच आला नाहीं. नीतिविषय आला आहे, पण तो इतर विषयांसारखा गौणस्वरूपानें आला आहे. ह्या माझ्या ह्मणण्याचें स्पष्टीकरण मीं दुसऱ्या एका भागांत केलें आहे. येथें इतकें मात्र विसरतां कामा नये कीं, गीताशास्त्राचा संपूर्ण चित्रपट सिद्ध करितांना भगवंतांनीं ज्या ज्या अनेक शास्त्रीय आणि आवश्यक भूमिकांचा उल्लेख केला आहे, व त्या त्या भूमिकांचे साध्य करण्याचे मार्ग सांगितले आहेत, त्या सर्वांसच 'नीति' हें नांव द्यावयाचें असेल, तर मग मात्र माझें कांहीं म्हणणें नाहीं. मग इतकेंच करावें लागेल कीं, 'नीति' शब्दाचा प्राचीन व आधुनिक परिघ वाढवून, प्रत्येक कारागिराच्या कलेंत सांगितलेल्या नियमांसुद्धां नीतीचा 'जामानिमा' चढवावा लागेल !

असो; माझा सिद्धांत असा आहे कीं, अर्जुनाचा प्रश्न तात्त्विक आहे, तत्त्वसंबंधी आहे. philosophical ( तत्त्वाचा ) आहे, व ती भूमिका धरूनच भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकांत उत्तर देण्यास आरंभ केला आहे. श्रीकृष्ण सांगतील तर तत्त्वानुरोधानें उत्पन्न होणारें कर्तव्य करण्याला अर्जुन तयारच होता.

येथून गीताशास्त्राला आरंभ झाला. 'मी कोण? मद्व्यतिरिक्त हें जें अंतर्बाह्य विश्व दिसत आहे हें काय आहे? माझ्या अंतर्बाह्य काय आहे? विश्वाच्या अंतर्बाह्य काय आहे? हीं दोन तत्त्वें एकच आहेत किंवा भिन्न आहेत? या सर्वांचा नियामक कोण? इत्यादि प्रश्न उत्पन्न करून त्या सर्वांचा या शास्त्रांत उलगडा केला आहे. तो कसा तें आतां थोडक्यांत सांगतों.

पण याच्या पूर्वी वाचकांस हें सांगून ठेवणें इष्ट वाटतें कीं, मी स्वतः श्रीजगद्गुरु श्रीशंकराचार्य यांनीं प्रणीत केलेल्या अद्वैतसिद्धांताचा, केवलाद्वैताचा, गरीबसा पण श्रद्धालु भक्त असल्या कारणानें, व तेंच मत प्राचीन व आधुनिक प्रामाणिक शास्त्रांशीं संगतवार जुळत असून युक्तीस व अनुभवास पटत असल्या कारणानें, या वरील प्रश्नांचा उलगडा या लेखांत अद्वैतपद्धतीनेंच होणार आहे. दुसरीं मतें व दुसरे सिद्धांत असत्य आहेत, असें ह्मणण्याचें धाष्टर्य कोणीही समंजस अद्वैती करूं शकणार नाहीं. कारण, त्या त्या भूमिकेवरून पाहिलें असतां तें तें मत खरेंच दिसेल, व केवलदृष्टीनें अनुभविलें असतां अद्वैतमतच सत्य आहे, असा अनुभव येईल. तसेंच माझ्या विचारसरणीच्या साहाय्याकरितां आपल्या आर्यभूमींत जे अनेक ग्रंथ प्रकट झाले त्यांतील धुरंधरीण चार पंथ घेऊन द्वैत विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत केवलाद्वैत यांच्या भूमिकाही मी सांगणार आहे, त्यावरूनही प्रत्येकास आपलें मत कोणाशीं जुळतें हें पाहण्याची ही संधी आयतीच येणार आहे.

येथपर्यंत विस्तारानें लिहिण्याचें कारण उघड आहे कीं, काल, स्थल, प्रसंग आणि कालस्थलप्रसंगोचित अर्जुनाची मनःप्रवृत्ति यांचें स्पष्ट स्वरूप गीताभक्तांचें लक्ष्यांत यावें. पुढील मार्ग श्रीमदाचार्यांनींच सोपा करून ठेविला आहे. माझें काम केवळ संबंध दाखविणाऱ्या क्षेत्रोपाध्यायाप्रमाणें आहे!

## खंड २.

## अद्वैत सिद्धांत व इतर मतें.

मानवी देह हा श्रेष्ठ आहे; कारण ह्या देहाच्या साहाय्यानें जीवाच्या मुख्य पुरुषार्थ जो मोक्ष त्याची प्राप्ति करून घेतां येते, सर्व प्रकारच्या आधिभौतिक आध्यात्मिक व आधिदैविक सुखदुःखांचा व वासनांचा परिहार होऊन स्वस्वरूपीं लीन होण्याची योग्यता व पात्रता कर्मानें, उपासनेनें व ज्ञानानें नरदेहास येते, अशा प्रकारचा डुंदुभी सर्व संस्कृत

धर्मांमध्यें मानवी जगाच्या उत्पत्तीपासून एकसारखा दुमदुमत आहे. स्वस्वरूप कोणतें याविषयीं मतभेद आहे; तें निजरूप मिळविण्याचें उत्कृष्ट साधन कोणतें याविषयीं अभिमानवशतेमुळें मतवैचित्र्य आहे; तथापि '**धन्य धन्य हा नर देहो। येथील अपूर्वता पहाहो। जो जो कीजे परमार्थ लाहो। तो तो पावे सिद्धीतें॥**' या प्रसिद्ध **श्रीसमर्थांच्या** उक्तीनुसार नरदेहासंबंधें सर्वत्र ऐकमत्यच आहे. असो; तेव्हां या जन्माचें सार्थक्य करावयाचें ही प्रत्येक सुजाण मनुष्याची लालसा असते व असावी हें निर्विवाद आहे. आतां जन्माचें सार्थक्य म्हणजे काय व तें साध्य करण्याचीं साधनें कोणतीं अगर साधन कोणतें व दुसऱ्या अध्यायांत जें उत्कृष्ट साधन सांगितलें आहे तें जगामध्यें प्रचलित असणाऱ्या अनंत साधनांतून श्रेष्ठ आहे कीं नाहीं हें पाहून पुढील मार्गक्रमणास आरंभ करूं.

व्यवहारतः पाहिलें असतां निर्विकार व निरंजन स्थितीतून बाहेर पडून आपण जन्ममरणाच्या चक्रांत सांपडलों व भवसागराच्या विषयरूपी अनंत लहरीवर हेलकावे खात राहिलों! सर्व विश्व आपणच असतां, नेत्र, कर्ण इत्यादि पंचज्ञानेंद्रियांच्या द्वारा होणाऱ्या विकृत ज्ञानानें 'हा विषय पूर्ण व हें ज्ञान पूर्ण,' 'हें माझे,' 'हें तुझें' असें अज्ञानानें म्हणावयास लागून अभिमानाच्या व कामक्रोधलोभादिकांच्या तावडीत आपण सांपडलों! हें सर्व झिडकारून देऊन भवसागर तरून जावयाचें, जन्ममरणांतून सुटावयाचें व पुनश्च त्या अनंत विकारशून्य अशा स्वस्वरूपामध्यें जाऊन मिळावयाचें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. खरें पाहिले असतां मूळ कर्तव्य असें असावें कीं, तें केल्यावर पुनः **कर्तव्य ह्मणून उरूं नये**! म्हणजे वासना, कामना, आशा, मनीषा वगैरे सर्व नष्ट व्हाव्या, सुखदुःख अस्तंगत व्हावें, आणि निजानंदामध्यें सुखरूप रहावयास सांपडावें. सारांश 'आपण कोण?' 'आलों कोठून?' 'जावयाचें कोठें?' 'करावयाचें काय?' 'व तें कां करावयाचें?' 'हें विश्व काय आहे?' 'याचा व आपला संबंध काय?' इत्यादि अनंत प्रश्नांचा सोपपत्तिक उलगडा होऊन कांहीं शिकावयाचें, कांहीं करावयाचें अगर कांहीं मिळवावयाचें राहूं नये; आपण ब्रह्मरूप व्हावें, हीच मोक्षाची खरी स्थिति व खरें स्वरूप होय. बौद्ध, ख्रिस्ती, मुसलमानी इत्यादि धर्मांसही हें वेदांती मोक्ष स्वरूप पूर्णत्वानें न कळल्यामुळें ते ते धर्म व त्यांतील भक्त व उपासक, तसेंच आमच्यांतीलही द्वैतवादी, विशिष्टाद्वैतवादी व शुद्धाद्वैतवादी संशयसागरामध्यें गटंगळ्या खात राहिले आहेत! सर्व'एकच आहे.' ही वृत्ति पुरी बाणल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं, व संशय फिटत नाहीं पुनः; कर्म, उपासना व भेदज्ञान इत्यादिकांचे योगानें मात्र इतिकर्तव्य संपत नाहीं, असा सर्वत्र अनुभव आहे. एखाद्या अत्युत्कृष्ट चित्राची खरी पारख होण्यास, किंवा एखाद्या तानसेन गंधर्वाच्या मधुर गायनाचें रससर्वस्व प्रतीत होण्यास, अथवा एखाद्या गहन विषयाचें पूर्ण रहस्य कळण्यास तल्लीन—नव्हे! तद्रूपच व्हावें लागतें, नव्हे! त्याच्याही

पलीकडे जाऊन, विषयरूपच होऊन इतर भान अस्तंगत करून घ्यावें लागत असतें ! नाहीं बरें ? ही जर एका मर्यादित विषयाची गोष्ट तर ज्या अमर्याद विश्वचक्राची अघटित मांडणी आपल्या सभोंवतीं दिसत आहे, तिच्याशीं व ज्याच्या सत्तेनें आपण व हें विश्व निर्माण झालों, त्या सच्चिदानंदघन व अखंडैकरस परब्रह्माशीं एकतानता, एकरूपता, सारांश एकत्व झाल्याखेरीज हा अनादि परंतु सांत असा प्रपंचही सुटावयाचा नाहा व प्रपंच म्हणजे भेदबुद्धि आहे तावत्कालपर्यंत आपलें कर्तव्यही सुटावयाचें नाहीं. सारांश सुखरूपता मिळणार नाहीं हें स्पष्ट आहे. व्यवहार दृष्टीनें म्हणजे मानवी दृष्टीनें पाहिलें असतां प्रपंचाला आरंभ केव्हां झाला हें सांगतांच यावयाचें नाहीं. विचार पद्धतीनें कार्याचें कारण, कारणाचें कारण अशी परंपरा आपण कितीही मागें नेली तरी ह्या परंपरेंतील पहिला दुव्वा कोणता हें सांगतां यावयाचें नाहीं. ( २ ) कार्य म्हणजे स्वरूपांतर. हें स्वरूपांतर होतें तें त्याच्या पूर्ववृत्त जें कारण त्याच्या रूपांतरानें होतें. हें रूपांतरही कारण-स्वरूपांतरानें होतें. याप्रमाणें आपण अगदीं 'प्रथम' कारणापर्यंत जरी गेलों तरी त्या कारणाचें रूपांतर होण्याला काय **कारण** झालें, असा प्रश्न उभा राहतो. अर्थातच व्यवहारदशेंत म्हणजे सापेक्षदृष्टीनें ( Relatively ) ह्या कारणाचें आदिकारणच नाहीं असें ह्मणावें लागतें. ह्मणून प्रपंच किंवा संसार अनादि आहे, असें मानवी विचाराला ह्मणावें लागतें. पण हाच प्रपंच सांत ह्मणजे संपणारा आहे. अद्वैत ज्ञान झालें ह्मणजे भेदज्ञान मावळतें; संसार संपतो. यासाठीं प्रपंच अनादि व सांत आहे असें वर ह्मटलें आहे. असो; भेदज्ञान आहे तों **कर्तव्य** ( भेद नाहींसा करणें ) शिल्लकच राहतें. भेद संपला, एकत्व प्राप्त झाले ह्मणजे कर्तव्य संपतें. हाच मोक्षशास्त्राचा ह्मणजे गीता व उपनिषदांचा निराबाध सिद्धांत आहे. या सिद्धांताचें सत्यत्व आपण साधनांचा विचार साधकबुद्धीनें करीत असतां स्थापित करूं.

## ज्ञानमार्ग का कर्ममार्ग ?

यच्चयावत जेवढे म्हणून धर्म आहेत, त्यांत कर्म उपासना आणि ज्ञान या तीन मार्गांनीं, या तीन साधनांनीं, अधिकारी मनुष्य मुक्त होतो असा सिद्धांत आहे. आग्रहवादी लोक मात्र म्हणत असतात कीं, मुक्ति मिळेल ती आमच्याच मार्गाचें अवलंबन केलें असतां मिळेल ! कोणी ह्मणतात कीं केवळ कर्मानें इतिकर्तव्यता संपते, कोणी उपासनेनेंच पुरुषार्थ साध्य करून घेण्यांत गुंतलेले असतात, व कोणी केवळ ज्ञानमार्गानें इष्ट हेतु साध्य होतो असें म्हणतात. प्रथम कर्मवादी लोक घेऊं. या सदरांत आमचे सनातन वैदिक धर्माभिमानी कर्मठ लोक, आधुनिक नास्तिक, स्याद्वादी ( Sceptics ) काय असेल तें असो, असें ह्मणणारे अज्ञेयवादी ( Agnostics, ) काय आहे ते आपल्यास माहित होणें नाहीं असें म्हणणारे नीतिवादी ( Unknowablists ) व सत्कर्मवादी लोकांचा अंतर्भाव होतो. स्वतःचें, स्वजातीचें, मानवी जातीचें किंवा भूतमात्रांचें कल्याण होईल अशी कृत्यें

चांगलीं व बाकीचीं वाईट असें अधिकारानुसार म्हणणारे हे लोक आहेत. स्वतःचेंच कल्याण करून घेणारे खालच्या पायरीचे, स्वजातीचें कल्याण करणारे त्यांहून श्रेष्ठ, त्यांच्यांपुढील यांहून श्रेष्ठ अशी उत्तरोत्तर श्रेष्ठपरंपरा आहे. सत्कर्म म्हणजे सुखोत्पादक कर्मे केलें असतां येथें अगर अन्यत्र सुख उत्पन्न होतें व सुख मिळविणें हाच पुरुषार्थ आहे असें यांचें मत आहे

प्राणीमात्र स्वतःच्या संरक्षणासाठीं व स्वजातीच्या वृद्धीसाठीं नेहमीं कर्म करीतच असतो; अगर त्याच्या हातून कर्म होत असतें. ही प्राथमिक स्थिति होय. पुढें स्वतःचें व स्वजातीचें सरक्षण व्हावें व त्यास सुख मिळावें ह्मणून जीं विचारपूर्वक कर्में करावीं लागतात, तीं समाजाच्या व समाजाधिपतींच्या साहाय्यानें होत असतात. येथें स्वतःचे सुखापेक्षां स्वेतरांच्या सुखाची किंमत अधिक आहे, असें वाटण्यास•प्रारंभ होतो. आतां, आपली इच्छा, आपल्या समाजाची इच्छा व राजाची इच्छा फलद्रूप होतेच असा नियम नाहीं; हा अनुभव व आपण धारण केलेला इष्ट हेतु आपल्या स्वतःच्या श्रमानें अगर समाजाच्या साहाय्यानेंही सिद्धीस जात नाहीं, हा अनुभव पाहून जगास कोणी तरी नियंता असलाच पाहिजे व त्याचा अनुग्रह संपादन करून घेतला तर आपल्या इच्छा परिपूर्ण होण्याचा संभव असतो, ह्मणून त्याची कृपा आपण सेवा करूनच संपादिली पाहिजे असें ज्ञान उत्पन्न होतें व कामुकबुद्धीनें ईश्वराचें साहाय्य उपासनामार्गे मनुष्यें मिळवूं लागतात; आणि भक्तिपूर्वक योग्य कर्माचे बलाबलानुसार ईश्वर प्रसन्नही होतो. याप्रमाणें जोंपर्यंत शुद्धभाव व शुद्धभक्ति आहेत, तोंपर्यंत ईश्वराचा अनुग्रह होण्यासारखीं कर्में भक्तिबळानें मनुष्यांकडून होत असतात. सारांश जगाची प्रगति होत असतां कर्म, संयुक्त कर्म व उपासनापूर्वक कर्म अशी कर्मामध्येंही प्रगति होत असते. येथें सुख, अथवा स्वसंरक्षण आणि जातिसंरक्षण, ही प्रधान वस्तु आहे व ही प्रयत्नसाध्य आहे. या प्रयत्नास अगर कर्मास जगन्नियंत्याची उपासना, त्याची कृपा व ज्या विश्वामध्यें आपण असतो त्याचें ज्ञान या गोष्टी अवश्य आहेत; म्हणजे उपासना व ज्ञान हीं कर्माचीं साधनें असून उपासनेसह व विषयज्ञानासह केलेलें कर्म इहपरत्र सुख देण्यास व जातिसंरक्षण करण्यास समर्थ आहे, असा ज्ञानी कर्मठांचा सिद्धांत होतो. हें सुख कां मिळवावयाचें व ही सचेतन सृष्टि जतन करून वृद्धिंगत कां करावयाची या प्रश्नाला वरील कर्मठांपाशी उत्तर नाहीं. विषयसुखाचा उपभोग घेणें व सुख मिळविण्यासाठीं जगणें हाच आमचा पुरुषार्थ व या पुरुषार्थाविषयीं वासना उत्पन्न होणें हा आमचा देहधर्म येवढेंच काय तें उत्तर त्यास देतां येतें! पण हें उत्तर समाधानकारक नाहीं. कारण येथें दुःखाशिवाय उपभोग देणारें सुख असूं शकत नाहीं; ह्मणून सुख भोगण्याची इच्छा धारण केली असतां अनुषंगानें दुःख प्राप्त होण्याचा संभव असतोच असतो. सारांश ज्ञानी कर्मठांनीं आपल्या इंद्रियजन्य व बुद्धिजन्य ज्ञानानें मानवी ज्ञानाची कितीही मर्यादा वाढविली, ज्ञानसहित कर्म करून उपभोगाचे पदार्थांत जरी अमर्याद भर घातली;

तरी जोंपर्यंत 'मी निराळा व विश्व निराळें' अशी बुद्धि कायम आहे, जोंपर्यंत उपासना-मार्ग पतकरून ही ईश्वराजवळ 'मला सुख दे' अशी भिक्षा मागण्याची पद्धति जिवंत आहे, सारांश जोंपर्यंत भेदबुद्धि कायम ठेवून सुख मिळावें अशी वासना जिवंत आहे व त्या वासनेनुसार **कर्तव्य करावयाचें** शिलक राहणार आहे, तोंपर्यंत खरें, शुद्ध, नित्य आणि निर्विकार असें निर्मळ आत्मिक सुख मिळणें शक्य नाहीं. हिंदुकर्मठ यज्ञयागादि करून कदाचित् देवतादयेनें इहलोकीं व परत्र कांहीं सुख मिळवूं शकतील, स्याद्वादी, अज्ञेयवादी, व नास्तिकवादी ज्ञानाचें व नीतिमत्तेचें प्रमाण वाढवून कदाचित् हल्लीं मिळत आहेत त्यापेक्षां जास्त पदार्थांचा उपभोग जास्त लोकांस मिळवून देतील, पण भेदबुद्धि कायम राहिली असल्यामुळें तें सुख व ते भोग हे कालाच्या तडाक्यांत सांपडून जातील किंवा स्वानुषंगानें दुसरीं दुःखें उत्पन्न करतील; एवंच मनाला जें समाधान पाहिजे तें मिळणार नाहीं! असो; ह्या सर्व आर्य व अनार्य कर्मठवाद्यांत सिद्धांत गृहीत घेतलेले असतात ते हे. (१) अल्पज्ञानी जीवाला वासना ही असावयाचीच. सुखोपभोग घेत असतां ती कांहीं काळ थांबेल, पण पुढें तिचा उदय व्हावयाचाच व्हावयाचा, हा सामान्य नियम आहे. (२) ज्याप्रमाणें वासना असते, त्याप्रमाणें कर्म करण्याची बुद्धि होते व ज्याप्रमाणें ह्या जन्मीं अगर पूर्वजन्मीं कर्म केलें असेल, तदनुसार वासना उत्पन्न होते. म्हणजे कर्म आणि वासना ही परस्परांच्या आश्रयांवर अवलंबून आहेत; (३) तिसरें गृहीतकृत्य हें आहे कीं, वासनायुक्त अगर वासनाशून्य कर्मांचा कांहीं तरी परिणाम हटकून व्हावयाचाच व तो परिणाम ज्याप्रमाणें कर्मसामर्थ्य असेल त्याप्रमाणें नियमित कालीं कांहा ठराविक सामर्थ्यानें प्रकट व्हावयाचाच. अथवा नित्य जिवंत असणाऱ्या वासनेनें कर्म उत्पन्न होतें आणि कोणतेंही कर्म कधींही व्यर्थ होत नाहीं. वासनेंत कलह झाला, कर्म व विरुद्धकर्म यांचें रण माजलें तर परिणामाची दिशा बदलेल, पण परिणाम झाल्या-खेरीज राहणार नाही. हे तिन्ही सिद्धांत सर्व कर्मठांस मान्य आहेत, आणि ह्मणूनच त्यांची कर्माकडे प्रवृत्ति आहे. हे सिद्धांत आमच्या पूर्वजांनीं हजारों वर्षांपूर्वी शोधून काढले व अलीकडील अनुभवशास्त्रांनीही हें खरें ठरत आहेत, यावरून आमच्या अति-प्राचीन पूर्वजांची प्रखर बुद्धिमत्ता प्रकट होते, हा भाग स्वतंत्र आहे; त्याचा येथें विचारही करावयाचा नाहीं. पण ध्यानांत ठेवावयाची गोष्ट इतकीच आहे कीं, जीवाचें सार्थक म्हणजे जीवाला निर्विकार स्थिति अथवा स्वरूपप्राप्ति संपादावयाची आहे ती संपादण्याची योग्यता निवळ कर्ममार्गानें अगर सकाम ईश्वरोपासना आणि विषयज्ञान यांनी मिश्रित झालेल्या कर्मानें होत नाहीं. कारण ह्या पद्धतीनें **वासना जिवंत राहते, कर्तव्य संपत नाहीं, भेदबुद्धि अस्तंगत होत नाहीं,** आणि **म्हणून सद्वस्तुज्ञानपूर्वक शुद्ध समाधानही होत नाहीं**. तात्पर्य या कर्ममार्गाच्या, ज्ञानयुक्त कर्ममार्गाच्या, पुढचा मार्ग आपल्यास सांपडेल तरच इष्ट तें प्राप्त होईल म्हणून विचाराची ओढ ह्या मार्ग शोधण्याकडे लागते.

## ज्ञानमार्ग.

याप्रमाणें कर्ममार्गानें इष्ट हेतु साध्य होत नाहीं, हें तत्त्व आमच्या पूर्वजांत उपनिषत्कालाच्या पूर्वीच म्हणजे सुमारें निदान दोन हजार वर्षांपूर्वीच समजलें होतें; म्हणजे ईश्वर, विश्व आणि जीव या भिन्नत्वानें दिसणाऱ्या त्रयींपैकीं विश्वाचें ज्ञान भेदबुद्धीनें,-ईश्वराच्या सकाम उपासनेसह व जीवास सुख व्हावें यासाठीं,-संपादन करून तदनुसार सत्कर्म केलें व ज्ञानसीमाही वाढविली तथापि कार्यसिद्धि होत नाहीं असें त्यांस फार प्राचीन कालीं समजलें. शारीरिक यात्रेसाठीं कर्म करावयाचें हे ठरलें; पण शरीरयात्रा कशाला? ह्या प्रश्नाचें सयुक्तिक उत्तर त्यांस देतां येईना; तेव्हां जीवाचें सुख वाढवावयाचें हा संकल्प चांगला आहे, तथापि 'मी, तूं व तें' ही भेदत्रयी कायम आहे तोंपर्यंत निर्मळ सुख मिळावयाचें नाही असे त्यांस समजल्यावरून ते विषयैकसुखाला कंटाळले व स्वार्थ वाढविणाऱ्या कामक्रोधादिकांचा त्याग करून विषयत्यागाचा व स्वार्थत्यागाचा क्रमशः अंगीकार करून ते ज्ञानमार्गाच्या पाठीमागें लागले. आमच्या येथें ह्या ज्ञानमार्गाचे अनेक पंथ निघाले व हल्लीं जगावरही अनेक ज्ञानमार्ग उपलब्ध आहेत. सांख्य, योगी, नैयायिक, मीमांसक, बौध्द, जैन, द्वैतवादी, मध्वाचार्य, विशिष्टाद्वैतवादी, रामानुजाचार्य, शुद्धाद्वैतवादी, वल्लभाचार्य व केवलाद्वैतवादी शंकराचार्य असे अनेक आचार्य प्राचीन व अर्वाचीन कालांत उत्पन्न झाले आहेत. हे सर्व कमी अधिक प्रमाणानें ज्ञानमार्गीच आहेत. **खिस्त, महंमद** हेही ज्ञानमार्गाचेच प्रवर्तक होत. ( हे द्वैतवादी आहेत. निदान यांचा धर्म ज्यांनीं प्रसृत केला ते तरी द्वैतवादी आहेत.) यांच्या व आमच्या द्वैतवादामध्यें पुष्कळच साम्य आहे. उपासनाप्रकरण हें दोन्ही द्वैतवाद्यांत प्रधानत्वानें समान आहे. उपासनाप्रकरण प्रस्तुत प्रसंगीं अप्रस्तुत आहे व सध्यां केवळ मध्व, रामानुज, व शंकर यांच्या ज्ञानमार्गाचाच विचार कर्तव्य आहे ह्मणून सद्विकारांनीं प्रेरित झालेल्या उपासनेचा विचार एकीकडे ठेवून ज्ञानमार्गाकडे वळतों.

( १ ) आतां दोन तीन गोष्टी ध्यानांत ठेवून पुढें मार्ग क्रमावयाचा आहे ही सूचना देऊन प्रस्तुताकडे वळतों. सत्कर्म करून किंवा असत्कर्म करून विषयांचा कितीही उपभोग घेतला तरी वासना नष्ट होत नाहीं, इतकेंच नव्हे तर तैलपूरीत दीपज्वालेप्रमाणें उपभोगानुसार ती वृद्धिंगतच होत जाते, तदनुसार कर्म वाढत राहूनही इतिकर्तव्यता संपत नाहीं व चित्तास समाधान होत नाहीं, असा अनुभव येऊन ज्यांस वासनेचा व कर्माचा वीट आला; ( २ ) 'हा मी,' 'हें माझें,' 'हा तूं,' 'हें तुझें,' अशी भेदबुद्धि कायम आहे तोंपर्यंत वासनेचा उच्छेद होत नाहीं व हा उच्छेद न झाल्यामुळें अनेक प्रसंगीं मनास मलीनता आणणारीं कर्में करावीं लागतात, अनाचार करावा लागतो आणि देहदंड व मनोदंड भोगावे लागतात असें ज्यांस स्वतःच्या व इतरांच्या अनुभवावरून कळून चुकलें; ( ३ ) तसेंच ज्या

विश्वाचा उपभोग घेण्यासाठीं विश्वज्ञानपूर्वक व ईश्वरोपासनापूर्वक मी कर्मांची धडपड करीत आहें, तें विश्व मी नव्हे, तो देह मी नव्हे, ते उपभोगही मी नव्हे, मी कोणी तरी निराळाच आहे, अशी ज्याची बालंबाल खातरी झाली, ( ४ ) ज्ञानेंद्रियांस गोचर होणारें, कर्मेंद्रियांस उपलब्ध होणारें, मनबुद्धि इत्यादिकांच्या विचारदृष्टीस वश होणारें विश्व **दिसतें** तसें नसून तें व मी, आणि आम्हां उभयतांस ज्याच्या सत्तेनें अस्तित्व प्राप्त झाल्यासारखें दिसतें तें ब्रह्म व आह्मी उभयतां, हीं सर्व एकच आहोंत ( ह्मणजे जें विश्व दिसतें व आहे, त्या विश्वाहून मी निराळा नाहीं, माझ्या स्वरूपाहून विश्वरूप भिन्न नाहीं, विश्वाचा कर्ता जो परमेश्वर, त्याच्या स्वरूपाहून विश्व भिन्न नाहीं व ह्याचप्रमाणें माझ्या व परमेश्वराच्या स्वरूपांत बालाग्रही फरक नाहीं, स्वरूपतः आम्ही सर्व एकच आहोंत, राजाच्या पायांतील रणजोडव्यांपासून व कंबरबंदापासून तों शिरपेचास एकजीव करणाऱ्या सूत्रापर्यंत सर्व अलंकार ज्याप्रमाणें सुवर्णाचें असतात, सर्वांच्या मूळ स्वरूपांत म्हणजे सुवर्णांत ज्याप्रमाणें भेद नाहीं, त्याचप्रमाणें विश्वनियंता परमेश्वर, विश्वभोक्ता जीव आणि भोग विषय विश्व यांच्या मूळ स्वरूपांत कांहीं भेद नसून ते एकच आहेत ) ह्याचप्रमाणें कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि हीं सर्व बहिर्मुख ( म्हणजे बाहेर तोंड करून असलेलीं ) आहेत व सांत आहेत, मर्यादित आहेत, म्हणून वस्तुतः अनंतत्वानें व एकत्वानें असणारें ब्रह्म, ( म्हणजे हें विश्व, हा मी व तो ईश्वर ही त्रयी ) **वस्तुतः अनंत व एकस्वरूप असतां, सांत** ( मर्यादित finite ) **आणि भिन्न दिसतात,** अतएव बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादिकांकडून होणारें ज्ञान वास्तविक नसून भ्रमात्मक आहे, वस्तुतः मी, विश्व व ब्रह्म भिन्न नसून एकच आहोंत, असा विचार ज्यांचें मनांत पूर्णत्वानें बाणला, ते पूर्णनिश्चयी व पूर्ण विचाराचें लोक शुद्ध,-निर्विषय म्हणून निर्मळ,-ज्ञानाचे पाठीमागें लागतात. विषयोपभोगाचा तिटकारा, इंद्रियांचें दमन, वासनेचें निर्मूलन, चित्ताची विषयशून्य एकाग्रता, अहंकाराचा सर्वथैव अभाव व चित्तविवेक इत्यादि साधनें ज्याला साध्य झालीं, तोच ज्ञानमार्गास अधिकारी होतो; तोच मुमुक्षु होय. त्याचें स्वकर्तव्य संपलें; तो समाधानाच्या, मुक्तीच्या, मार्गास लागला, स्वार्थशून्य झाला, म्हणून त्याची नीति अनीति, वगैरे सर्व मानवी बंधनें तुटलीं, आणि इहलोकचें भान विसरून तो ब्रह्मसमाधीमध्यें निमग्न होत्साता रममाण होऊं लागला म्हणजे तो मुक्त झाला असें म्हणावयाचें. अशा अनंत दृष्टीनें, निर्मळ दृष्टीनें, जो सर्व ब्रह्ममय पाहूं लागला त्यास हें सांत व मर्यादित असें नामरूपात्मक जगत् भ्रमजन्य वाटूं लागतें, अनंतकालपर्यंत संसारांत पाडणारें कर्म व भिन्नभाव कायम ठेवणारी व पुनः पुनः जन्ममरण देणारी सकाम उपासना ही तुच्छ वाटते त्यांत काय आश्चर्य आहे ? जोंपर्यंत शुद्ध बुद्ध, नित्य आणि मुक्त आत्मारामास विषय, इंद्रियें, मन, बुद्धि अहंकार इत्यादि उपाधींनीं ग्रासून टाकिल्यासारखें भासत आहे, तोंपर्यंत हा संसार, हें विश्व, हें विश्वज्ञान व तो विश्वजनक ईश्वर हे कायम असतात; परंतु प्रेरणेनुरूप प्रकट झालेल्या उपनिषन्महावाक्यांनीं, न्यायघटित युक्तीनें व निराग्रही स्वानुभवानें उपाधींची शृंखळा तोडून टाकून

सर्व ब्रह्मच आहे, हें कधीं निर्माण झालें नाहीं व नाशही पावणार नाहीं असा वास्तविक विचार त्याच्या ब्रह्ममय बुद्धींत घोळूं लागला म्हणजे तो स्वतःच ब्रह्म होतो. गढूळ पाणी स्वच्छ करण्यासाठीं आंत घातलेली निवळी मळाचा नाश करून आपणही जशी नाहींशी होते, त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञान करून देण्यास साधनीभूत होणारें लोकसंग्राहक निष्काम कर्म, ब्रह्मज्ञानपूर्वक निष्काम उपासना व विश्वज्ञानपूर्वक उपनिषदाचें अध्ययन हींही अस्तंगत होऊन शेवटीं एकच एक ब्रह्म उरतें. तें निर्गुण, निर्विकार, निरामय, निरंजन, असें असल्यामुळें उपाधियुक्त व भेद दाखविणाऱ्या वाणीलाही गोचर नसतें! सारांश ब्रह्म (अथवा सुखदुःखविरहित ब्रह्मानंद) हें स्वसंवेद्य (स्वतःस मात्र कळणारें) व साखरेची गोडी ज्याप्रमाणें वर्णितां येत नाहीं, त्याप्रमाणें अवर्णनीय असें आहे. असो; हें कळणें व मिळणें हा मोक्षाचा, खऱ्या समाधानाचा, मुख्य पुरुषार्थाचा, शेवट होय. हा ज्यास लाधला तोच सुटला; बाकीचे आपण सर्व भवचक्राच्या तावडींत सांपडलोंच आहों! येथें सुटण्याचा मार्ग म्हणजे वर सांगितलेला ज्ञानमार्गच होय. ज्ञानी पुरुषाला कर्तव्य उरतच नाहीं, कारण तो ब्रह्म होतो. पण ज्या पूर्वकर्मानें आपल्यास देह प्राप्त झाला, त्या देहाचे सुखदुःखात्मक भोग संपेतोंपर्यंत निष्कामबुद्धीनें व भोगशून्य-वृत्तीनें देह धारण करावयाचा व देह आहे तोंपर्यंत आपल्या आचरणानें दुसऱ्या तळमळ-णाऱ्या जीवांस मोक्षमार्ग दाखवावयाचा हेंच त्याचें देहकर्तव्य असतें. स्वतः जरी तो ब्रह्म झाला व सर्व चेतनाचेतनात्मक विश्व त्यास ब्रह्ममय दिसूं लागलें, व यामुळें तो सर्वथा उदासीन झाला तथापि सुखदुःखामध्यें तळमळणारे दुसरे जीवांस या साधूंच्या शुद्ध निर्मळ व स्वार्थशून्य वर्तनानें बोध होऊन उपरति होते आणि 'खला येतें साधुत्व साधु-संगें' या न्यायानें इतर जीवही मुक्त होऊन जातात. हा ज्ञानमार्ग, हा खरें व निष्पाप समाधान करणारा मार्ग गीताशास्त्रांत सांगितलेला आहे, व त्या मार्गाला साधनीभूत जो निष्काम कर्ममार्ग अगर चित्तशुद्धि करणारा कर्ममार्ग ह्याचें अवतरण गीताशास्त्रांत केलें आहे; आणि हाच मार्ग खरा आहे हें दाखविण्यासाठीं भगवंतांनीं इतर पंथांचें परीक्षण केलें आहे. असो; कोणताही पंथ घ्या, कोणताही धर्म घ्या, गीताशास्त्रांत सांगितलेला–कर्म व उपासना यांच्या सहाय्यानें उत्पन्न होणारा–ज्ञानमार्ग त्याहून श्रेष्ठ आहे, असें विचारी पुरुषास दिसल्यावांचून राहणार नाहीं. हें अभिमानाचें बोलणें नव्हे वस्तुस्थिति आहे, ती कशी त्याचें थोडेंसें वर निरूपण केलेंच आहे व रामानुज व मध्व यांचा विचार करि-तांना आणखीही थोडासा उल्लेख करूं. हा स्वार्थत्यागाचा पंथ होय. या निवृत्ति-साध्यमार्गापासून स्वार्थ साधणाऱ्या प्रवृत्ति मार्गाचीं लक्षणें शोधून काढण्याची अपेक्षा धरणें म्हणजे शीतल जलाच्या साहाय्यानें अग्नि पेटविण्याचा प्रयत्न करण्या-सारखेंच मूर्खत्वदर्शक होय! वैराग्याचें खरें रहस्य ज्यास प्राप्त झालें अशा पुरुषास मात्र हा मार्ग साध्य आहे. 'माझ्यामागें **माझ्या** पोराबाळांची, **माझ्या** देशाची व मनु-ष्यांची, **माझ्या** विश्वाची व स्वर्गलोकीं जीवांची काय गति होईल? अशी चिंता कामुक बुद्धीनें वाहणाऱ्या सांसारिकासाठीं या मार्गाची योजना नाहीं. 'मी कोण आहे?' माझें

अंतिम साध्य काय, व तें साध्य करण्याचीं साधनें कोणतीं? हे प्रश्न ज्याला अगत्याचे वाटतात त्याच्यासाठीं हा मार्ग आहे. विषयलोलुप जीव केव्हांना केव्हां तरी दृढवैराग्याच्या सपाट्यांत सांपडतील, निर्मळ चित्तानें ब्रह्माराधन करून शेवटीं ब्रह्म होतील व आधुनिक मताप्रमाणें चैतन्य उत्पन्न करणारे अचेतन पदार्थजात सचेतन होऊन शेवटीं तेही मुक्त होतील अशी माझी खात्री आहे. ब्रह्मदृष्टीनें, पूर्ण दृष्टीनें, ते मुक्तच आहेत, तथापि अपूर्ण अथवा कर्मदृष्टी जी जीवाच्या मागें उपाधिरूपानें लागलेली दिसते-तीही नाहीशी होऊन ते मुक्त होतील असा माझा सिद्धांत आहे. असो; आजचें आपलें कर्तव्य म्हणजे 'मला ब्रह्म व्हावयाचें आहे, अशा दृष्टीनें प्रत्येक जीवाकडून निष्काम कर्म व निष्काम उपासना करवावयाची आणि ह्याला मुक्तीच्या मार्गावर कायमचें आणून सोडावयाचें हें कर्तव्य आहे. ह्या मार्गाचें अवलंबन करणें हाच सद्यःकालीन खरा पुरुषार्थ आहे.

**रामानुज, मध्व, ख्रिस्त, महंमद** वगैरे यांस हा ज्ञानैकलभ्यमार्ग संमत नाहीं; याचें कारण मोठ्या दुःखानें मला असें सांगण्याचें भाग पडत आहे कीं त्यांस उपनिषदांची गीताशास्त्राची, आचार्यमताची खरी गुरुकिल्ली सांपडली नाहीं, अथवा ही किल्ली सांपडली पण ती प्रकट केली असतां कर्ममार्गाचा व उपासनापंथाचा उच्छेद होईल या भीतीनें त्यांनीं ती तशीच लपवून ठेविली, किंवा सांपडूनही बौद्धवैचित्र्यामुळें त्या सांपडण्याचें चीज झालें नाहीं. कांहीं तरी घोंटाळा होऊन मतवैचित्र्याला आरंभ झाला व त्यायोगानें सामान्य बुद्धीच्या लोकांमध्यें संशयाचें बीज पेरलें गेलें. ही अनिष्ट गोष्ट झाली. अथवा बुद्धिविकासानुसार व बुद्धिविलासानुरूप प्रस्तुतचें मतवैचित्र्य होणें अगत्याचेंच होतें! असो; विषयापलीकडे इंद्रियें, त्याच्या पलीकडे मन, व त्या मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आणि **बुद्धिपेक्षां आत्मा श्रेष्ठ** असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें असतांही केवळ बुद्धीच्या व अहंप्रत्ययाच्या ( Consciousness ) जोरावर हे सर्व उपासनैकपंथी आणि ह्मणून द्वैतवादी महापुरुष 'निर्गुणपंथी आत्ममार्ग हा जीवांस अगोचर आहे आणि ह्मणून असाध्य आहे' नव्हे! 'हा मार्ग अशक्य व असमंजस आहे!'— असें म्हणतात. असो; "बुद्धीच्या व अहंप्रत्ययाच्या पलीकडे आत्मा आहे व आपली बुद्धि विषयशून्य करून अंतर्मुख केली असतां व 'मी आहे' हा अहंभावही विसरून गेले असतां निर्विकल्प स्थिति प्राप्त होऊन नित्य, निर्गुण, निरामय अशा शुद्ध आत्मतत्त्वाचा अगर ब्रह्माचा परिचय होतो" असें ज्ञानविज्ञान तज्ज्ञांनीं मुमुक्षूंच्या उद्धारासाठीं मोठ्या कळकळीनें प्रकट केले आहे. 'हा प्रकटित विधि खोटा व ब्रह्म हें थोतांड आहे,' असें म्हणण्याच्या अगोदर भक्तिपूर्वक परिश्रम करून वेदांत मार्गाचा निर्मळ आणि निर्विषय मानानें अनुभव घ्यावा आणि नंतर काय ह्मणावयाचें असेल तें म्हणावें अशी माझी सर्वांस सविनय प्रार्थना आहे. ज्ञानमार्गानें परब्रह्माशीं एकरूपता होऊन जाते व सर्व सुखदुःखांचा परिहार होऊन जन्ममरण देणारा संसार चुकतो. असा डिंडिम आज हजारों वर्षे वाजत आहे, **स्पेन्सर व कांट** सारखे अज्ञेयवादी 'दृश्याच्या

पलीकडे जी सद्वस्तु असते तीच बुद्धीच्या व अहंकाराच्या (अहंप्रत्ययाच्या) पलीकडे असावी, असली पाहिजे, असें अनुक्रमें विचारदृष्टीनें व पुरुषार्थदृष्टीनें ह्मणूं लागले आहेत! (पहा Secret Doctrines by Madam Blavatsky Vol II) प्रत्यक्ष श्रीमद्रामानुजाचार्य हे देखील विश्वगत अनंत पदार्थांस एका प्रकृतीच्या कोटींत प्रविष्ट करितात, व अनंत जीवास 'चित्' कोटींत अंतर्भूत करितात. अर्थात ही अभेदवादाची विजयपताकाच श्रीभाष्यकारांनीं धारण केली आहे! श्रीमन्मध्वाचार्यांनीं पंचभेदवादाचा पुरस्कार घेतला हें ठीक झालें. पण ईश्वर, जीव व जगतें ह्या सर्वांस त्यांनीं तीन वर्गांत घातलें आहे. जीव व जगतें अनंत आहेत, हें त्यांस विदित आहेच! तेव्हां मध्वाचार्यांनीं अनंत वस्तूंस तीन वर्गांत आणिलें, ही अभेदवादाची काय लहानसान कामगिरी झाली? सारांश कमी अधिक प्रमाणानें अभेदवाद, अद्वैतवाद, हाच सर्व विचारी पुरुषांस 'खरा' असावा, असें वाटतें. यावरून भेदबुद्धि नष्ट करून त्रिविध दुःखाचा परिहार करणारा व सर्वज्ञत्व देणारा ज्ञानमार्गच सर्वथैव इष्ट आहे असें वाचकांस समजेल व वर केलेल्या दिग्दर्शनानें व गुरूच्या सहाय्यानें ते जर प्रपंचैकसंपादक प्रवृत्तिमार्ग सोडून देऊन योग्य संधि प्राप्त झाल्याबरोबर निवृत्ति मार्गाकडे वळतील, तर, शुद्ध, केवल, निर्गुण अशा आत्मतत्त्वाचा त्यांस इहलोकींच स्वानुभव येऊन ते जन्ममरणांतून सुटतील यांत शंका नाहीं. असो; आतां श्रीरामानुजांचें मत पाहूं.

---

## श्रीरामानुजाचार्य व त्यांचे सिद्धांत.

परब्रह्म एकच आहे खरें पण तें निर्गुण नाहीं. तें अनंतसद्गुणगणांचें माहेरघर आहे. तें ज्ञानस्वरूप नसून ज्ञानी, सर्वव्यापी, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ व सर्वकृपाघन असें आहे. तें अंतर्बाह्य एकस्वरूपी नसून अनेक सद्वस्तूंचें आश्रयस्थान आहे. हें दृश्य विश्व व यच्चावत् जीव, अथवा विषय आणि विषयी (Object and Subject), हें उभयपदार्थद्वय खरें असून तें परब्रह्माचे अवयव आहे, अगर परब्रह्माचे हे प्रकार (Modes) आहेत; किंवा परब्रह्मापासून उत्पन्न झालेलीं हीं कार्येंच होत असें म्हटलें तरी चालेल! प्रलयकालीं हीं कार्यें परब्रह्मांत लीन होतात व सर्गस्थितांत उदय पावतात. जीवास संसार प्राप्त होतो तो पूर्वकर्मामुळें होय. संसारांतून मुक्त होण्यास ईश्वरी कृपा व उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें सगुणब्रह्मज्ञान ह्यांचा आश्रय केला पाहिजे. मुक्तीनें जन्ममरण चुकतें, तथापि सायुज्यता अथवा ब्रह्मांशीं पूर्ण तादात्म्य मिळत नाहीं. अद्वैत वाद्यांचा **मायावाद खोटा आहे**, कारण त्यास उपनिषदांत आधार नाहीं; व युक्तीनें मायावाद सिद्धही करितां येत नाहीं. जग तर आपल्यास म्हणजे जीवांस प्रत्यक्ष दिसतें. यावरून दृश्य, द्रष्टा व दर्शन हीं खरीं आहेत; म्हणून विश्व

सत्य आहे, जीव सत्य आहे आणि परब्रह्म सत्य आहे. ह्या तिन्ही वस्तु परमार्थतः सत्य आहेत. पण परब्रह्माच्या आंत या दोन्ही सद्वस्तूंचा अंतर्भाव आहे व परब्रह्म सर्वांतर्यामी आहे ह्मणून अद्वैतच आहे, तथापि विशिष्टाद्वैत आहे; ह्मणजे परब्रह्म गुणधर्मातीत नसून गुणधर्मांनीं ओतप्रोत भरलेलें आहे; सारांश ब्रह्म निर्गुण नाहीं, सगुण आहे. 'ब्रह्म सत्य, जगन्मिथ्या' हा केवलाद्वैत सिद्धांत खोटा आहे. उपनिषदांतील माया शब्दाचा अर्थ 'उपादान कारण' असा आहे. उदाहरणार्थ माती हें जसें घटाचें उपादान कारण, तशी प्रकृति ही जगाचें उपादान कारण आहे. प्रकृति म्हणजे भ्रम उत्पन्न करणारी माया असा अर्थ घेणें उपनिषदांत व ब्रह्मसूत्रांस संमत नाहीं. माया म्हणजे चमत्कृतिजनक प्रकृति होय. असो; कर्माच्या योगानें जीव संसारांत पडतो म्हणजे प्रकृतीला वश होऊन येथें सुखदुःखाचा अनुभव घेतो. प्रकृति जड आहे व विकार पावणारी आहे, ह्मणून प्रकृतींत अथवा विषयांत रममाण होणें हा पुरुषार्थ नव्हे. वेदविहित निष्काम कर्म आणि वासुदेवाची निष्काम उपासना करून वासुदेवस्वरूपानें ब्रह्मचिंतन केलें असतां ईश्वरानुग्रह होऊन जन्ममरण चुकते व मुक्ति मिळते; मात्र येथेंही म्हणजे मुक्तिलोकांत अहंभाव कायम असतो! सेवा, पूजा, नैवेद्य, स्तोत्रपठन आणि ब्रह्मचिंतन हे भक्तीचे उत्तरोत्तर श्रेष्ठ मार्ग आहेत. तसेंच चित्त स्थिर होण्यास प्रथम मूर्तिपूजा नंतर अवतारचिंतन, नंतर षड्गुणैश्वर्य परमेश्वराचें सूक्ष्म स्वरूपचिंतन आणि शेवटीं 'सर्वव्यापी' या भावानें चिंतन असे मार्ग आहेत. देहांत प्राण आहे तोंपर्यंत वेदोक्त कर्म व उपासना सुटत नाहींत. कर्मानें चित्तशुद्धि होते, उपासनेनें ईश्वरचिंतन व ईश्वरानुग्रह होतो आणि ज्ञानानें ईश्वरी स्वरूप, जीवस्वरूप व जगत्स्वरूपही कळतात; म्हणजे मुक्ति साध्य करण्याला ज्याप्रमाणें ज्ञान हें अवश्य साधन आहे, त्याचप्रमाणें चित्तशोधक कर्म आणि अनुग्रहकारक उपासना हीं मुक्तीचीं अवश्य साधनें आहेत. सारांश कर्म व ज्ञान यांच्या योगानें मुक्ति मिळते. मुक्ति म्हणजे काय हें वर सांगितलेंच आहे.

हें रामानुजपंथाच्या मताचें केवळ दिग्दर्शनच होय. तथापि गीताशास्त्रांत लागणाऱ्या अवश्य तत्त्वांपैकीं बऱ्याच सिद्धांतांचा वर उल्लेख केला आहे व कांहीं काल-पर्यंत तरी तो उपयोगी पडेल असें वाटतें. यावर अद्वैत मताच्या दृष्टीनें टीका करण्याचें हें स्थळ नव्हे. प्रस्तुत प्रसंगीं इतकेंच ह्मणतों कीं, रामानुजाचें परब्रह्म म्हणजे अद्वैतवाद्यांचा मायासंवलित परमेश्वर होय. परमेश्वरापलीकडे रामानुजास कांहीं दिसत नाहीं व अनु-भूतही होत नाहीं ह्मणून त्यास मायावादाचें असत्यत्व व जीवजगतांचें सत्यत्व सत्य वाटत आहे. अपूर्ण दृष्टीनें अथवा दृश्य दृष्टीनें जीव व जगत् हीं खरींच आहेत व माया ही खोटीच आहे. पण पूर्ण दृष्टीनें, अनंत दृष्टीनें, ब्रह्मदृष्टीनें पाहिलें असतां दृश्य दृष्टीला मात्र गोचर होणारे व्यक्तिमात्र जीव व नानाविध सृष्टि हीं उभयतां ब्रह्ममय, भेदशून्य, एकरूपी होऊन जातात; आणि दृश्य जीव व दृश्य जगतें खोटीं प्रतिभासिक, माया-

निर्मित आहेत, असें निश्चयानें वाटूं लागतें. सारांश, विचारदृष्टीचा फरक आहे. राष्ट्रदृष्टीनें बोलत असतां जशीं आपण इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी, रशिया, जपान' इत्यादिकांचीं नांवें घेतों व अंतस्थ भेद तोंपर्यंत एकीकडे ठेवितों ( म्हणजे इंग्लंडांत वेल्स, स्कॉटलंड, आयर्लंड, वसाहती आणि हिंदुस्थानासारखे आश्रित वर्गांतील देश वगैरेचा भिन्नभाव लक्षांत आणीत नाहीं ). तसाच कांहीं ब्रह्मदृष्टीचा प्रकार आहे. ब्रह्म-दृष्टीला **भेद दिसणें शक्यच नाहीं**, कारण ब्रह्मभावांत **भेद असूं शकतच नाहीं.** केवळ, निरवयव सद्वस्तूंत अवयव असणें संभवनीयच नाहीं. असो; तेव्हां **रामानुज, ख्राइस्ट, महंमद** इत्यादिकांची ज्ञानदृष्टि बुद्धि-साक्षेप आहे, केवळदृष्टि नाहीं म्हणून त्या त्या सत्पुरुषांस परब्रह्म ( ईश्वर ) सगुण आहे असें दिसतें, विश्व खरें आहे व जीव खरा आहे, असें वाटतें. असो; यांत आश्चर्य नाहीं; पण जोंपर्यंत विश्व **आहे** आणि जीवास **अस्तित्व** असून **ज्ञान** आहे व **आनंदोपभोग** घेण्याची योग्यता आहे असें ठाम आहे, तोंपर्यंत तो जीव व तें विश्व **सच्चिदानन्दब्रह्माशीं** एकरूपानें अस्तित्वरूपानें, तादात्म्यावस्थेंत आहेत आणि उभयतांसही समान अशी पलीकडे 'परब्रह्म नामक स्थिति आहे, की जेथें सर्व भेदाभेद गुणावगुण, धर्माधर्म, नष्ट होऊन सर्व एकरूपच होतात.' भेदमात्र असत्य आहे असा समज होणें व उपनिषदांच्या अभ्यासानें, सद्गुरूच्या कृपेनें, परमेश्वराच्या अनुग्रहानें व शेवटीं स्वानुभवानें ह्या समजास सिद्धांताचें स्वरूप येण्याला श्रीरामानुजाचार्यांचे सिद्धांत उत्तमोत्तम रीतीनें कळून तदनुसार विज्ञान व तत्प्रणीत पराभक्ति यांचा जीवानें उत्कर्ष करण्यासाठीं सफल भगीरथप्रयत्न केला पाहिजे व पुढें ही विचारसंतती कायम ठेविली पाहिजे. अर्थातच अद्वैताचा परिचय होऊन वरील अनुभव साध्य होईल.

---

## श्रीमध्वाचार्य व त्यांचे सिद्धांत.

**मध्वाचार्य** हे कट्टे द्वैताभिमानी आहेत. भेद, भिन्नभाव हे **सत्य** आहेत असें यांनीं प्रत्यक्ष, अनुमान व शब्द तसेंच वेदोक्त, पुराणोक्त, अशा तिन्ही प्रमाणांनीं सिद्ध करण्याचा यत्न केला आहे. वेदांत ग्रंथापेक्षां पुराणावरच या पंथाची मोठी जास्त भिस्त आहे. आतां जोंपर्यंत पहावयाचें आहे, तात्पर्य व्यवहार करावयाचा आहे, तोंपर्यंत भेद आहे हें व्यवहारदृष्टीनें विचार करणाऱ्या अद्वैतवाद्यांसही अमान्य नाहीं. जीव आणि शिव ( शिव ! शिव ! मी चुकलों ! मध्वास शिवाचें नांव खपावयाचें नाहीं ! म्हणून ईश्वर, विष्णु ) यांत नित्य सेव्यसेवकभाव आहे. सेवकानें सेव्याची, आराध्यदेवतेची, बरोबरी करण्याचा प्रयत्न केला असतां ईश्वरास क्रोध येतो ! राजा जसा बरोबरी करूं इच्छिणाऱ्या शिरजोर सर-दारांचें शासन करितो, तसाच क्रोधवश ईश्वरही आपली बरोबरी करूं इच्छिणाऱ्या उन्मत्त

दैत्यांचें व सैतान आदिकरून देवदूतांचें पारिपत्य करितो!—(पहा भागवत व बायबल.) असो; ईश्वर प्राप्तीचे उपाय तीन आहेत. (१) ईश्वरी मुद्रा धारण करणें, (२) नामस्मरण आणि दशविधा भक्ति हे तीन उपाय होत. तथापि परमेश्वराच्या अनुग्रहाव्यतिरिक्त मुक्ति मिळत नाहीं. मुक्तिस्थितींतही सेव्यसेवकसंबंध तुटला नाहीं. विश्व हें अनादि व अनंत असून परमेश्वराहून भिन्न आहे. अज्ञान हें परमेश्वरकृतच आहे.! [ 'तत्त्वमसि' तेंच (ब्रह्म) तूं (आत्मा) आहेस. आत्मा ब्रह्म आहे ] या महावाक्यांत एक 'अ' ('नाहींवाचक' शब्द) ढकलून देऊन 'अतत्त्वमसि' (तें तूं नाहींस) असा या पंथानें कोरा परीटघडी अर्थ बनविण्यासाठीं उपनिषन्मंत्रांची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढिली आहे! तसेंच; 'एकाचें ज्ञान झालें असतां सर्वांचें ज्ञान होतें' या महावाक्याचा कांहींसा रामानुजाप्रमाणेंच 'श्रेष्ठ व सर्व कारण जो परमेश्वर त्याचें ज्ञान झालें असतां सर्व कार्यांचें ज्ञान होतें' असा अर्थ केला आहे. रामानुजाप्रमाणें हेही म्हणतात कीं, शंकरानीं विस्तृत केलेला मायावाद खोटा आहे. **विश्व खरें आहे**, चारही **वेद, महाभारत, पंचरात्रागमतंत्र** आणि मूळ **रामायण** यांचाही तात्पर्यार्थ विश्व खरें आहे असें मानण्याचाच आहे. सारांश विश्व व जीव हे सेवकवर्गांत असून खरे आहेत. ब्रह्म म्हणजे विष्णु हें सर्वांचें आराध्य दैवत असून उत्पत्ति, स्थिति व संहार करणारा विष्णूच सर्वश्रेष्ठ ईश्वर आहे. सेव्यसेवकांतील भिन्नभाव **नित्य** व **कायमचा** आहे. मुक्तस्थितींतही हाच संबंध आहे.

हें **रामानुजाचार्यां**च्याही अलीकडचें म्हणजे अद्वैतदृष्टीनें कमी योग्यतेचें मत आहे. यांतील अखंडद्वैतभाव व ईश्वराच्या घरीं कामक्रोधादिकांची वसति वगैरेनीं या सिद्धांतास बराच कमीपणा येतो.

---

असो. उपनिषदाचा तात्पर्यार्थ एक अद्वैतसिद्धांत मात्र सांगण्याचा आहे. युक्तीलाही हाच सिद्धांत संमत होतो, व अभ्यासी मुमुक्षूस हाच अनुभव येतो म्हणून अद्वैत सिद्धांतच खरा आहे असें मला वाटतें. यावरून विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत, कर्ममार्ग हे मला सर्वांशीं संमत नाहीत, असें मात्र समजूं नये. या प्रत्येकाचा उपयोग विशेषस्थलीं आहे. मुख्य मुक्तिनामक पुरुषार्थ साध्य करण्याच्या-हे तीन मार्ग म्हणजे तीन पायऱ्या आहेत. ज्याची जशी योग्यता असेल तशी पायरी तो स्वीकारितो व श्रेष्ठ पायरीकडे जाण्याची खटपट कर्मानें, उपासनेनें व ज्ञानानें करीत असतो. येथें कोणी कोणाची निंदा करण्याचें कारण नाहीं; मात्र वरच्या पायरीवरील जीवानें खालच्या पायरीवर असणाऱ्या जीवास वर नेण्यासाठीं निष्काम श्रम करावें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे, हें मात्र विसरतां कामाचें नाहीं. अभेद झाल्यावर, ब्रह्मदृष्टी झाल्यावर, सर्व ब्रह्मच आहे, एकच आहे, पूर्ण आहे, असा अनुभव आल्यावर खालच्या पायऱ्या, खालचीं साधनें,

मुक्त पुरुषाच्या दृष्टीनें निरर्थक होतात व कर्तव्य संपतें. पण व्यवहारदृष्टि आहे, तोंपर्यंत धर्माधर्म, नीति, अनीति यांची मीमांसा करणें व खालच्यांस वर नेणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे हें आतांच सांगितलें. असो; माझ्या सध्यांच्या समजुतीप्रमाणें प्रगतीचा क्रम लागलो तो असा आहे.

## प्रगतीचा मार्ग.

प्रथम कर्ममार्ग; यांत जीवाची ओढ प्रथमतः तात्कालिक सुख मिळविण्याकडे अगर जे जे विकार उत्पन्न होतील त्यांची शांति करण्याकडे असते. (२) पुढें जिवंत राहण्याची व संतति उत्पन्न करण्याचीं अशीं दोन कर्तव्यें होऊन यांच्या आड येणाऱ्या सुखाची गणना अधर्मांत होते. येथें प्रगति बरीच झाली असते, (३) पुढें स्वतःच्या सुखाची, जीविताची व प्रजावृद्धीचीं साधनें जीवाच्या हातांत नाहींत असें दिसूं लागून यज्ञयागादिक कर्म व देवतांची उपासना हे मार्ग प्रचलित होतात, व यांस धर्म अशी संज्ञा मिळते. धर्माच्या विरुद्ध जर जीवित अगर प्रजावृद्धि झाली तर त्यांचीही अधर्मांत गणना होते. हा धर्म प्रथम प्रथम अतिसंकुचित स्वरूपाचा असतो. स्वकुटुंबाचें संरक्षण, स्वगोत्राचें संरक्षण, स्वजातीचें संरक्षण इत्यादि संरक्षणाच्या निरनिराळ्या पण प्रगामी पायऱ्या आहेत. प्राथमिक स्थितीतील देवही जाखाई, जोखाई, सटवाई, खंडोबा, मारुती अशा कांहीं स्वरूपाचे असतात. मनुष्याप्रमाणेंच हे प्राथमिक देव रागद्वेषाला वश असतात. भक्तांच्या विनंतीवरून ते भक्त-शत्रूंचें अकल्याण करण्यासही सज्ज असतात. यांस प्रसन्न करावयाचें म्हणजे पशूंचे अगर पक्ष्याचे बळी देऊनच होय. पुढें प्रगति झाली म्हणजे देवांची अथवा देवांसंबंधीं आपल्या भावनांची उत्क्रांति होऊन त्यांस वरुण, इंद्र, अग्नि, सूर्य इत्यादि स्वरूपें मिळतात. अर्थातच देवांचे सद्गुण जास्त प्रकट होऊन मानवी समाजाची नीति व धर्म सुसंस्कृत होतात. (४) पुढें कौटुंबिक सुख, स्वजातिसुख, स्वदेशसुख, जीवितसुख, पारलौकिकसुख, इत्यादि पुरुषार्थ (Ideals) उत्पन्न होऊन सुख म्हणजे व्यक्तीचे व समाजाचे जीवित राखणारे व जीवित वृद्धिंगत करणारे उपभोग असा अर्थ होतो. सारांश, येथपर्यंत स्वतःचें सुख (आयुष्यमर्यादा) वाढविणाऱ्या कर्मांस अगर उपभोगास पुरुषार्थ असें म्हटलें जातें; व या योगानें जगताचें ज्ञानही बरेंच वृद्धिंगत होते. (५) नंतर स्वसुखापेक्षां परकीय सुखाची मातब्बरी विशेष वाटूं लागून पुत्रभार्यादिकांचें संरक्षण करावयाचें व त्यांस सुख द्यावयाचें तें आपल्यास सुख होतें म्हणून नव्हे, तर त्यांस सुखी करणें हें आपलें सुखकारक कर्तव्य आहे, असा पुष्कळच आधींपासून मंदपणानें असणारा विचार प्रज्वलित होतो. येथें निवृत्तिमार्गाची, स्वार्थत्यागाची, परार्थस्वीकाराची, मूर्ति प्रथम प्रकट होते. निष्काममनानें कुटुंबसंरक्षण, जातिसंरक्षण, देशसंरक्षण, मानवसिंरक्षण, जीवसंरक्षण व सर्वांची सुखसमृद्धि हे एकाहूनएक श्रेष्ठ पुरुषार्थ जीवांच्या कर्मानुसार व विश्वज्ञानानुसार प्रकट होतात व त्याचवेळी

ईश्वराचें निष्काम भजनपूजन हेंही प्रचलित होतें. ज्ञानसंपादनासाठीं आपण उत्पन्न झालों, निष्काम उपासना करण्यासाठीं आपण जन्म घेतला, वासनाशून्यत्वानें कर्म करणें आपलें कर्तव्य आहे, हे सात्विक विचार या कालांत प्रचलित असतात. याच कालांत धर्म सांगतो म्हणून कर्म करावयाचें, ईश्वरास आनंद होतो म्हणून विश्वाचें ज्ञान संपादन करून अनन्य-भावानें ईश्वराची उपासना करावयाची, हे सात्त्विक धर्म प्रबल होतात. .आणि (६) शेवटीं वरील कोणताही पुरुषार्थ साध्य केला व ज्ञान कितीही वाढविलें तरी कर्म सुटत नाहीं, धर्म सुटत नाहीं, संशय फिटत नाहीं व अज्ञान नष्ट होत नाहीं, असें पाहून 'या विश्वाचा व माझा काय संबंध आहे?' आम्ही उभयतां आलों कोठून व आह्मांस जावयाचें कोठें? माझ्या देहांत वास करणारा आत्मा शुद्ध चैतन्यस्वरूपी असतांना या अचेतन विषयांच्या लगामीं कां पडला? विषयापासून होणारें सुख, शुद्ध व कायमचें आहे काय? स्वर्गातील विषयसुख अगर ईश्वरसंनिधि कायमची आहे काय?' वगैरे अनंत प्रश्न निर्माण होऊन वाढत जाणारें वैराग्य पूर्ण होऊं लागतें. हें वैराग्य, सात्त्विकवृत्तीचा अंगिकार, गुरूपदेश, ईश्वरी कृपा, उपनिषदांसारख्या प्रेरित ग्रंथांचें श्रवण, मनन आणि निदिध्यास यांच्या योगानें व केव्हां केव्हां राजयोगादि साधनांनीं अनुभव येऊन अद्वैताचा पूर्ण साक्षात्कार होतो व तो पुरुष मुमुक्षूंसाठीं अद्वैतमार्ग प्रकट करितो. ही शेवटची पायरी होय. शेवटच्या मजल्यावर जाऊन तेथें कायमचें रहावयाचें असा सिद्धांत झाल्यावर ऐहिकसाधनांस वैय्यर्थ्य येतें. असो, हा क्रममुक्तीचा पंथ आहे. अनेक व्यक्तींची अनेक रीतीनें सुधारणा होत असल्यामुळें सर्व देशांत हाच क्रम ऐतिहासिकदृष्टीनें दिसेल असें नाहीं तथापि माझ्या विचारदृष्टीला निवृत्तीच्या प्रगतीचा कृष्णोक्तमार्ग हाच असावा असें वाटतें.

असो; लिहावयास घेतलेल्या लेखाची मर्यादा केव्हांच आटपून गेली आहे; तथापि विचाराच्या व्यवस्थेसाठीं मला जितका विस्तार करणें अवश्य वाटलें तितका यथामति केला आहे. असो; आतां कर्ममार्गाचा सविस्तर विचार चवथ्या अध्यायाच्या शेवटीं करावयाचा असें सांगून व हें द्वैताद्वैत प्रकरण द्वितीयाध्यायाच्या प्रारंभीं घालावयाचें तसें न करितां त्यास गीतापुस्तकाच्या शेवटीं निमंत्रण दिलें तें 'अकरणान्मंदकरणं श्रेयः' (अगदींच न केल्यापेक्षां उशीरानें तरी कर्तव्य केलेलें बरें!) या न्यायानें संभाळून घेऊन अठरा अध्यायाचा व्यावहारिक उपसंहार-क्रमानें समजून घेण्यास उत्सुक झालेले मुमुक्षुवाचक यांच्यामध्यें आलेल्या या लांबच लांब लेखाची येथें इतिश्री करितों!

---

# दुसऱ्या अध्यायाचा उपसंहार.

## विषय संबध.

या विषयाला आरंभ करण्याचे अगोदर गीताभक्तांनीं एक गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे; ती हीः अर्जुनाला शोक मोह होऊन तो कर्तव्यविन्मुख झाला होता, तथापि समाजाला दुःख व्हावें, समाजाची नीति बिघडावी, किंवा तेथें पापसंचय व्हावा, अशी त्याची इच्छा नव्हती. तशी इच्छा असती तर पहिल्याप्रथम त्यानें जो शोकविषय घेतला आहे, तो घेतलाच नसता. त्याचप्रमाणें हा देह सुटला तरी जीवाचा नाश येथें होत नाहीं; त्याला पितृलोकांत वास्तव्य करावें लागतें व तेथें सुखदुःख भोगावें लागतें हें त्याला विदित होतें. शिवाय, अर्जुन स्वतःच इंद्रलोकांत कांहीं दिवस राहिला होता, तेव्हां इंद्रचंद्रादि लोकांच्या अस्तित्वाविषयीं शंका येण्यास त्याला जागाच नव्हती. 'आपल्या हातून आप्त इष्टमित्रांचा वध होणार व सर्वथा वंद्य असणाऱ्या भीष्म-द्रोणाचार्यांशीं युद्ध करावें लागणार' या दुःखमूलक गोष्टीमुळें तो व्याकुळ झाला होता आणि ही व्याकुलता इतकी जोरावर झाली होती कीं, आपला स्वधर्म जी क्षात्रवृत्ति ती सोडून देऊन तो ब्राह्मणाची भिक्षावृत्ति अंगीकृत करण्याचें साहस स्वीकारण्यास तयार झाला होता. श्री जगद्गुरूपुढें, श्री कृष्णापुढें, हा प्रश्न होता. हा सोडविण्यासाठीं त्यांनीं आपल्या उपदेशाचा 'ओनामा' सुरू केला, तो असाः

### ( २ ) आत्म्याचें (अर्थातच तदंशक जीवाचें) चिरंजीवित्व.

गीता हा ग्रंथ उपनिषदांचें सार आहे. उपनिषदें सामान्यतः ज्ञानमार्गप्रवर्तक आहेत, हें सर्व प्रसिद्धच आहे. ज्ञान म्हणजे सांख्य म्हणजे वेदांत अथवा तत्त्वज्ञान होय. आम्हां पौरस्त्य आर्यांचा वेदांत व त्याचें सार म्हणजे हें 'सर्व ब्रह्म आहे' हें आहे. अर्जुनाला हें शोकमोहविनाशक ब्रह्मज्ञान परमेश्वरांनीं दोन पद्धतींनीं सांगितलें. ( १ ) श्रुति, युक्ति आणि अनुभव यांस व तत्त्वज्ञानास संमत असे सिद्धांत घेऊन तद्वारां आत्म्याचें व जीवाचें चिरंजीवित्व स्थापन करणें आणि ( २ ) अध्यारोप करून म्हणजे उलट कल्पना घेऊन तद्वारा जो सिद्धांत निघतो तो श्रुति, युक्ति व अनुभव यांच्या उलट आहे, म्हणजे अशक्य गोष्ट आपण कांहींतरी सिद्ध करितोंसे होतें म्हणून ही उलट कल्पना असत्य व अपवादक म्हणजे मूळ कल्पना खरी, असें सिद्ध करणें. आतां ह्या दोन पद्धति कशा असतात तें गीतासाहाय्यानें दाखवितों.

( १ ) श्लोक १९ व २० हे कठोपनिषदांतील मंत्रांचीं प्रतिरूपेंच होत. ह्या मंत्रात्मक श्लोकांत आत्मा मरत नाहीं व मारीत नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्याला जन्ममरणादि

सहा विकार बिलकुल **बाधा करूं शकत नाहींत.** तो नित्य, शाश्वत व पुराण असा आहे, असें वेदमंत्रांनीं, ( शाब्दप्रमाणानें ), सिद्ध केलें. या श्रुतीच्या आधींच सर्व शास्त्रांस संमत व अनुभवप्रत्यक्ष असे दोन सिद्धांत १६ व्या श्लोकांत सांगून त्यांचें स्पष्टीकरण १७ व १८ व्या श्लोकांत केलें. सताचा ( अस्तित्वाचा ) नाश केव्हांही होत नाहीं व असत् हें केव्हांही अस्तित्वरूपानें, स्वस्वरूपानें असूं शकत नाहीं, हे ते दोन सिद्धांत होत. हे तत्त्वज्ञानाचे मुख्य सिद्धांत होत. तत्त्वज्ञान म्हणजे सांख्य ( प्रकृतीच्या स्वरूपाचें वर्णन करणारीं आत्ममूलक सर्व शास्त्रें-वर्तमान व भावी शास्त्रें-Sciences ) आणि योग ( जीवांच्या सद्भावना-जीवांचे पुरुषार्थ-सिद्ध होण्याचे उपाय सांगणारीं सर्व विधिशास्त्रें ) यांची ( या उभय सांख्ययोग शास्त्रांची ) ज्या वस्तुस्थिती-संबंधानें एकवाक्यता होते, तें-तत्त्वज्ञान-होय. असो; वरील दोन सिद्धांतांची भूमिका १२, १३, १४ व १५ व्या श्लोकांत निरनिराळ्या शास्त्रांचे सिद्धांत अवतीर्ण करून--ही भूमिका—सिद्ध केली आहे. १२ व्या श्लोकांत **अध्यात्मशास्त्रांतील** एक सिद्धांत सांगितला व आत्म्याचें चिरंजीवित्व तद्वारा सिद्ध केलें. 'मी नाहीं, जीव नाहीं, द्रष्टा नाहीं' असें व्यवहारकालीं अथवा परमार्थतः कधींच होणें शक्य नाहीं. भूत, भविष्य व वर्तमान हे कालभेद जावत्कालपर्यंत आहेत, जोंपर्यंत जग व जगद्व्यवस्था आहे, तोंपर्यंत त्यांचा **द्रष्टा** असावयाचा हें उघड आहे. मला मुक्ति मिळेपर्यंत **मला** जगद्भान राहणार. सारांश, 'मी' हें भान आहे तोंवर जगत् राहणार व जगत् राहणार तोंवर 'मी' राहणार आणि जगाचा आत्यंतिक प्रलय, मला मुक्ति मिळाल्यामुळें, झाला तर मग **आत्मस्वरूपानें मी राहणार.** हा अध्यात्मशास्त्रांतील सिद्धांत होय. एवंच ज्ञानरूप अथवा ज्ञानी या दृष्टीनें 'मी' 'तूं' सर्व जीवात्मे अखंडकालपर्यंत असाव-याचे म्हणून शोक करण्याचें कारण नाहीं. येथें क्षणिक विज्ञानवादी बौद्धांचें खंडन झालें. १३ व्या श्लोकांत **आधिभौतिक** (physical) सिद्धांत सांगितला. कौमार्य, तारुण्य, वार्धक्य या **देहाच्या अवस्था** आहेत; ह्या देहाच्या अवस्थांबरोबर आत्मा कुमार, किंवा तरुण किंवा वृद्ध होतो, असा कोणालाही अनुभव नाहीं. एवंच प्रकृति व आत्माराम यांमध्यें साम्य असणें शक्य नाहीं. पंच-महाभूतात्मक जो देह त्या देहाला अवस्थांतरें होणें हा भौतिक शास्त्रांतील सिद्धांत आहे. **आत्मारामामध्यें अवस्थांतर होत नाहीं,** हा अनुभव आहे. मृत्यु हें एक **अवस्थांतर** आहे; अर्थातच तें अवस्थांतर आत्मारामास नाहीं, हें सिद्धच आहे. हें चार्वाक, देहात्म वादी यांचें खंडन होय. १४ व्या श्लोकामध्यें **मनःशास्त्रांतील** विषयज्ञानाचा व तज्जन्य सुखदुःखादिकांचा विचार करितां हें विषयज्ञान व सुखदुःखादि चंचल विकार मनोगोचर-अंतःकरणगोचर-मात्र आहेत. त्यांच्या पलीकडे, मनोबुद्ध्यादिकांच्या पली-कडे, लिंगदेहाच्या पलीकडे या विषयांची म्हणजे विषयज्ञानाची व सुखदुःखात्मक विका-रांची मजल जात नाहीं. सारांश मन चंचल होतें, बुद्धि गडबडते, पण आत्मस्वरूपांत कांहीं फरक होत नाहीं. एवंच दोघांचा स्वभाव निराळा असतो, हें ठरतें. बाह्यविषय येणारे

जाणारे व अनित्य आहेत; त्यांस ग्रहण करणारीं इंद्रियें व मन हीं मात्र यांजकडून विकृत होतात. आत्मारामाला त्यांची खबरही नसते; याचा प्रत्यय सुषुप्ती-मध्यें किंवा समाधीमध्यें उत्तम येतो. एवंच **अंतरिंद्रियाची** सुखदुःखादि अथवा मृत्यु ही एक अवस्था आहे; **आत्मारामाची** नाहीं; मानसिक दृष्टीनें आत्माराम मरणें शक्य नाहीं; म्हणून शोकाचें कारण नाहीं. तार्किकांचा हा समाचार होय. याप्रमाणें अध्यात्मिक, अधिभौतिक व मानसिक शास्त्रांचे सिद्धांताचा अवतार करून मग तत्वज्ञानाचा सिद्धांत प्रकट केला तो हा कीं, सताचा नाश होत नाहीं, असताचा अभावच असतो. आत्मा सत् आहे, शरीर असत् आहे; म्हणून आत्म्याचा, ज्ञानस्वरूपाचा नाश नाहीं: तो नित्य, अव्यय, सर्वव्यापी आणि अंतरिंद्रियगोचर आहे. शरीरें मात्र विकारी नाशवंत आहेत. हा सिद्धांत युक्तीनें व अनुभवानें ठाम झाल्यावर श्रुतींतील दोन मंत्र श्लोक १९ व २० मध्यें घेऊन तो दृढतर करितात. आत्मा अविनाशी आहे, असा ग्रह बद्धपरिकर झाल्यावर २१ व्या श्लोकांत कर्म योगांतील (arts, Ethics &c.) सत्य प्रकट होतें, तें हें कीं, आत्मा अविनाशी, नित्य, अनादि व अव्यय आहे.' हें शास्त्रद्वारां समजलें म्हणजे त्याचा नाश करावयास म्हणजे तो नाशवंत आहे असें म्हणावयास कोण शहाणा पुरुष सिद्ध होईल? अर्थात कोणी नाहीं. त्याला उमजच असा पडेल कीं 'आत्मा मरतो हें म्हणणें' अशुद्ध, असत्य व अप्रमाण आहे. २२ व्या श्लोकांत उपमानात्मक अलंकार घेऊन श्रोतृवृंदास लीलेनें समजेल असें सत्य सांगितलें कीं, शरीर हें आत्मारामाचें **वस्त्र** आहे. एक वस्त्र जीर्ण किंवा निरुपयोगीं झालें म्हणजे प्राणी दुसरें वस्त्र परिधान करितो, त्याचप्रमाणें आत्मा दुसरें शरीर धारण करितो. वस्त्र नष्ट झालें म्हणून त्याचा उपभोक्ता जसा नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें शरीर नष्ट झालें म्हणून देही (जीव, आत्माराम) नष्ट होत नाहीं; कारण (श्लोक २३ पहा) पंचमहाभूतांपैकीं कोणाचेंही सामर्थ्य आत्मरूप नष्ट करण्यास अनुरूप नाहीं. तात्पर्य; २४ व्यांत आत्मा हा **सर्वथा अविनाशी, नित्य, सर्वगत, स्थाणु, अचल** व **सनातन** आहे. हा मूर्त नाहीं म्हणून **अव्यक्त** (unmanifested) व अविनाशी आणि मनोबुद्धींस अगोचर म्हणून **अचिंत्य** आहे. **हा सिद्धांत होय.** माया अथवा मूलप्रकृति ही अव्यक्त व अचिंत्य आहे. पण ती विकारवश आहे. हा सर्व आधिभौतिक व मानसिक शास्त्रांचा सिद्धांत आहे. एक क्षणभरसुद्धां मूलप्रकृति किंवा महत् ब्रह्मस्वरूपांत राहत नाहीं. एक-सारखी घडामोड सुरू आहे. परंतु आत्माराम हा सर्वदा **अविकार्य** आहे. याला कोण-ताही विकार होणें शक्य नाहीं; म्हणजे याचा नाश व्हावयाचा नाहीं. नाशच नाहीं, तर शोकाचें कारणही नाहीं. हा आत्मत्वसिद्धीचा, अशोच्यत्वाच्या सिद्धीचा, पहिला प्रकार होय.

(२) दुसरा प्रकार असा. आत्मा किंवा जीव हा नित्य जन्मतो व नित्य मरतो, असें मानिलें तर उत्पादित वस्तूचा नाश आणि नष्ट वस्तूचें प्रत्युत्पादन हा आधिभौ-

**तिक शास्त्रांचा** ( Physics ) **मुख्य** सिद्धांत आहे. जडाचें, **प्रकृतीचें, अविनाशित्व** ( Indestructibility of matter ) नित्य आहे, जडाचा आकार व रूप अथवा **नामरूप बदलतील व बदलतात,** पण तें (जड, matter ) व्यवहारकालांत **अविनाशी आहे, हें सत्य** आतां सर्व मान्य झालें आहे. हा निसर्गाचा नियम आहे. निसर्गाच्या **नियमाप्रमाणें** 'भाजणाऱ्या अग्नि' संबंधानें शोक करणें हा खुळेपणा आहे; त्याचप्रमाणें **सर्व वस्तूंचा नाश करणाऱ्या** मृत्युवस्तु विरुद्ध शोक करण्यांत कांहींच शहाणपणा नाहीं. **कारण** मर्त्यवस्तु अव्यक्तांतून उत्पन्न होतात व अव्यक्तांत लीन होतात. सारांश, **अव्यक्त** हेंच त्यांचें स्वरूप आहे. ह्मणून शोक करण्याचें प्रयोजनच नाहीं. **सर्वच अव्यक्तात्मक आहे.** हें **नास्तिक सांख्यांचें** व आधुनिक **मिलप्रभृति नास्तिकांचें** मत **होय.** पण श्रुतीच्या आधारें २९ व्या श्लोकांत असें सांगितलें कीं, ह्या अव्यक्ताला पाहणारी, **जन्ममृत्यूची** संतती प्रत्यक्ष पाहणारी, ज्ञानरूप ज्योति अविकार्य स्वरूपानें **सर्वांस** प्रत्यक्ष असून पुनः अव्यय आहे ती कशी विसरावयाची? एवंच अव्यक्त घेतलें **तथापि** अव्यक्ताला जाणणाऱ्या नित्य आत्मारामाचें अस्तित्व कबूल करावेंच लागतें. **तो** सर्व मूर्तस्वरूपामध्येंही आहे. मूर्तस्वरूपाची घडामोड प्रतिक्षणीं चालली आहे, ह्मणून **शहाण्या** माणसानें प्रतिक्षणीं अश्रु ढाळीत बसावें कीं काय? शिवाय प्रतिक्षणीं हजारों **मूर्तवस्तु** जन्मास येतात, ह्मणून प्रतिक्षणीं आनंदातिरेकांत असावें कीं काय? ही स्थिति **अशक्यच होय. शरीर** हंसेल, रडेल पण हें हंसणें, रडणें पाहणारा जो **आत्माराम** तो नित्य, अविनाशी, अविकार्य व अचिन्त्य अखंड असतोच. मग शोक कां?

येथपर्यंत **खरा तात्त्विक** विचार झाला. 'मी कोण आहें?' या प्रश्नास **उत्तर मिळालें.** तसेंच उत्तर विश्व व विश्वेश्वर यासंबंधें मिळेल. हें उत्तर, हा सिद्धांत म्हणजे **सर्व शास्त्रांचा,** ( Sciences ) सर्व नीतींचा ( Methods and arts ) मूलाधार **आहे.** सर्व प्राचीन, आधुनिक व भविष्यकालीन शास्त्रांची व नीतींची उत्पत्ति येथूनच आहे. या उपसंहाराच्या एका भागांत सर्व शास्त्रें व सर्व नीति यांचा अंतर्भाव तत्त्वज्ञानांत कसा होतो, हें दाखविलें आहे. (पहा भाग १ पृ. १–९ तत्त्वज्ञान). तें प्रकरण वाचल्यानंतर गीता शास्त्राची खरी योग्यता वाचकांस पूर्णपणें कळेल असें वाटतें.

असो; हा तत्त्वविचार अनुभवाच्या जोरावर समजल्यानंतर व आत्मा अमर आहे, हा निश्चय झाल्यानंतर अर्थातच श्रुतिस्मृतींनी ठरविलेला जो परंपरागत वर्णाश्रमधर्म आहे, त्याच्या आज्ञेप्रमाणें कां वागावें व कसलीही भीति कां बाळगूं नये, हा नीतिविषय वर्तनविषय, सदाचारविषय, ओळीनेंच पुढें आला. परमार्थतः मरणें नाहीं व मारणें नाहीं असा विचार ठरल्यानंतर, परोक्षज्ञान झाल्यानंतर, सनातन वैदिक धर्माच्या अभंग व अभेद्य आज्ञा अज्ञानी पण शुभेच्छु जनांनीं पाळणें हीच शुद्ध वर्णाश्रमविहित नीति आहे. **ह्या नीतीचें शास्त्रशुद्ध** अनुपालन केलें असतां होणारी आत्मिक उन्नति व आज्ञापालन **केलें**

नाहीं तर होणारी ऐहिक व पारमार्थिक अवनति ह्यांची मीमांसा एकतीस ते छत्तीस श्लोकांमध्यें झाली आहे. सदतिसाव्या श्लोकांत फलप्राप्ति आणि अडतिसाव्या श्लोकांत आपलें कर्तव्य करण्याची शास्त्रशुद्धपद्धति कोणती ती सांगितली आहे. कर्तव्य करीत असतां व केल्यावर सुख दुःख होतें किंवा होईल, लाभहानि होते किंवा होईल, जयापजय होतो किंवा होईल, ह्याकडे दुर्लक्ष करून, यांची भीति न बाळगितां, आपलें कर्तव्य करावें, असा हा भगवंतांचा उपदेश सर्वांनीं, सर्व बालतरुणवृद्धांनीं, सर्व गरीबश्रीमंतांनीं, सर्व कुलीनाकुलीनांनीं, सदैव ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. शास्त्रानें, युक्तीनें व अनुभवानें जें कर्तव्य करणें आपल्या वर्णाश्रमधर्मास आवश्यक आहे, तें सुखदुःखादिकांचा विचार न करितां व फलाची आशा न ठेवितां केलें तर आपली आत्मिक योग्यता वाढून आपण आत्मविचार करण्याला योग्य होतों. एवंच **स्वधर्म म्हणूनही** जीवानें आपलें कर्तव्य **कर्तव्यदृष्टीनें मात्र** केलें पाहिजे. याप्रमाणें शास्त्रज्ञान व धर्म या दृष्टींनीं विचार झाला.

## सांख्य अथवा ज्ञानमार्ग.

ह्या मार्गाचें नांव **सांख्यमार्ग** आहे. सांख्यमार्ग ह्मणजे ज्ञानमार्ग. सुखदुःखाची पर्वा न करितां आपलें स्वकर्म करावयाचें; कर्तव्यपराङ्मुख केव्हांही व्हावयाचें नाहीं, ही वर्तनपद्धति आणि हें कर्म करीत असतां तत्त्वविचाराचें श्रवण, त्याचें मनन व त्याचा निदिध्यास करून आत्मस्वरूपाचा अंशभाक् जीव आपल्या स्वतःच्या ज्या भासमय अज्ञानानें परिच्छिन्न बनला आहे, तो भास, शास्त्रें, गुरु व ईश्वर यांपासून मिळविलेल्या ज्ञानानें काढून टाकावयाचा व आत्मस्वरूपीं जाऊन मिळावयाचें, ह्या त्या मार्गाच्या पायऱ्या आहेत आणि एकच आत्मा सर्वव्यापी, नित्य, निर्विकार निर्विकल्प, निर्विशेष आहे, असें ज्ञानविज्ञान करून घेऊन व स्वतःचें आभासिक अज्ञान नष्ट करून पुनः जीवानें शुद्ध आत्मा व्हावयाचें हा पुरुषार्थ आहे. येथें ज्ञान ( सांख्य ) आणि कर्मयोग ( संपादन करण्याचा मार्ग ) या दोहोंचें एकीकरण व एकस्वरूपच होतें आणि सर्व प्रश्नांचा उलगडा होऊन समाधान होतें, सर्व सुखदुःख संपून संसारही आटपतो आणि हीं कार्यें आपल्या करवीं निरभिमानानें व निष्काम मनानें होत असलीं म्हणजे कोणतेंही शास्त्रविहित कर्तव्य करण्यास अडचण पडत नाहीं. आतां, हें आत्मसंपादक **कर्म कसें करावयाचें** तें सांगतात.

## स्वधर्मदृष्टी.

( ३ ) याप्रमाणें अर्जुनास झालेला जो शोकमोह तो नाहींसा करण्यासाठी आत्मस्वरूपाची मीमांसा करून सामान्यतः असें ठरविलें कीं, कर्तव्याच्या आड येऊं पाहणारे शोकमोह व त्याचीं कारणें हीं अज्ञानजन्य आहेत, खरीं नव्हत; नंतर श्रुतिस्मृतिप्रणीत

वर्णाश्रमाचें जें कर्तव्य ग्रंथांतरीं सांगितलें आहे, त्यांत क्षत्रियाला जर कोणी युद्धाला पाचारण केलें तर त्यानें त्या आमंत्रणाचा अनादर करूं नये; संरक्षक युद्ध मात्र करावें; हा क्षत्रियांचा धर्म आहे, असें मुख्यतः सांगितलें आहे. हा धर्म अनुसरला नाहीं तर स्वधर्महानी, कीर्तिहानि व पापसंपादन हे अनर्थ उत्पन्न होतात. स्वकर्तव्यास परा-ङ्मुख झालें तर कीर्तिहानीचा अनुभव प्रत्यहीं येतो. समाजामध्यें प्रचलित असणाऱ्या नीतिनियमानुसार वागणें कीर्तिप्रद होतें; प्रतिकूल वागणें अकीर्तिमूलक होतें. हें सामाजिकशास्त्राचे अनुभवसिद्ध सिद्धांत होत. समाज विस्कळित होईल अशा पद्धतीनें वागणारा पुरुष अप्रिय, निंद्य व तिरस्करणीय व्हावा हें समाजाच्या स्थाइकपणाचें चिन्ह आहे. हा विषय ३४, ३५ व ३६ व्या श्लोकांत दिग्दर्शित करून ३७ व्या मध्यें स्ववर्णाश्रम धर्माप्रमाणें दृढनिश्चयानें वागत असतां मृत्यु आला तर स्वर्गसुख व जिवंत राहिल्यास ऐहिक सुख मिळतें व ह्याला प्रमाण स्मृति व अनुभव होत असें सांगितलें. परिणाम काय वाटेल तो होवो, स्वधर्माप्रमाणें वागलें असतां पापसंस्पर्श होत नाहीं, हा सिद्धांत आहे. मात्र ही कर्तव्यबुद्धी कर्तव्यप्रेरणेनेंच उद्दीपित झाली पाहिजे. कर्तव्यैकप्रेरित कर्मबुद्धि असेल तर पापसंस्पर्श होत नाहीं.

याप्रमाणें सांख्ययोगांतील अन्वय व व्यतिरेक पद्धतींनीं आत्म्याचें व तदनुषंगानें जीवाचें अविनाशित्व सिद्ध करून वर्णाश्रम धर्मानुसार ( सामाजिक शास्त्रानुसार, कर्तव्य दिशा दाखविली व कर्तव्य करित असतां पापसंस्पर्श होत नाहीं असें 'पापमेवाश्रयेत्' असें मोहानें बडबडणाऱ्या अर्जुनास सांगून सांख्ययोगाची परिसमाप्ति ३८ वे श्लोकानें केली आहे. जीवाचें अमरत्व ( १ ) अध्यात्मशास्त्रानें, ( २ ) भौतिकशास्त्रानें, ( ३ ) मानसिकशास्त्रानें सिद्ध करून सर्व शास्त्रानुसार एकतत्त्व सिद्ध केलें, तें **सताचें नित्यभावित्व व असताचा नित्याभाव**, हें होय. येथें सिद्ध केलें, याचा अर्थ सांगितलें इतकाच घ्यावयाचा. कोणतीही गोष्ट प्रमाणांनीं सिद्ध होते हें खरें; पण प्रमाणांचें उपजीवनच सोळाव्या श्लोकांतील प्रमेयानें होतें; तेव्हां प्रत्यक्षादिप्रमाणें मुख्य प्रमेयाची सिद्धि करण्यास असमर्थच आहेत. अतएव सिद्ध करणें म्हणजे सांगणें होय, मग ( ४ ) **श्रुतीचें** प्रमाण व ( ५ ) अनुभवप्रमाणें आणून जीवाचें अमरत्व सिद्ध केलें व शोक वृथा आहे हें सांगितलें ही अन्वय पद्धतीची परंपरा आहे. व्यतिरेक पद्धतीनें नित्यमृत्यु पावणाऱ्या वस्तूचा शोक वृथा आहे असें सांगून ह्या नित्य विनाशी द्रव्यांचा साक्षी नित्य, अविनाशी व विलक्षण आहे असें **श्रुतीच्या** आधारानें सिद्ध केलें. आणि 'शोकाचें कारण नाहीं, युद्ध कर' अशी आज्ञा केली. पुढें **स्वकर्तव्याच्या अकरणानें अकीर्ति, अधर्म व पाप** हे अनर्थ उत्पन्न होतात, स्वकर्तव्याचरणानें होत नाहींत, म्हणून [illegible] [illegible] युद्ध कर असें सांगितलें.

## कर्मयोगनिष्ठा.

वर जी सांख्यबुद्धि किंवा शास्त्रप्रणीत तत्त्वबुद्धि सांगितली त्यावरून निर्लोभतः व निरभिमानतः स्वकर्तव्य करण्यानें हत्या होत नाहीं, अकरणानें पापसंचय होतो असें झालें. तेव्हां पापनिवारणार्थ कर्तव्य करणें प्राप्त झालें. हें करित असतां जीवानें कोणत्या पद्धतीची मनोवृत्ति अंगीकृत केली पाहिजे हें ठरविण्यासाठीं कर्मयोगाच्या व तदवश्यक बुद्धीचा येथें अवतार आहे. कर्मयोगबुद्धि म्हणजे आपण वेदविहित जें कर्तव्य करितों तें निष्काम-बुद्धीनें करणें व तें सर्व कर्म ईश्वरार्पण करणें होय. निष्कामतः कर्म केलें म्हणजे फला-कडे आपलें चित्त नसतें. आर्य-मानसशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं, चित्त ज्या विषयांचें चिंतन करितें, त्या विषयाचें स्वरूप पुढें धारण करितें. विषय तर विनाशी आहे; ह्मणून विषयचिंतनानें आपण विनाशी होऊं: आपल्यास विनाशी म्हणजे विकारी व्हावयाचें आहे काय? नाहीं. ह्मणून फलचिंतन किंवा विषयचिंतन नको, अथवा निष्कामत्व पाहिजे. पुनः चिंतिलेल्या फलाच्या आवाप्तीनें जें सुख होतें तें कर्तव्यकर्म एकाग्रतेनें केलें असतां कर्मसमाप्ती नंतर जें सुख होतें त्यापेक्षां फार कमी दर्जाचें असतें; आणि फलचिंतन असेल तर-फलाचा संग असेल तर-कर्मकौशल्यहीं संपादितां येत नाहीं. सारांश, कुशाग्रता येत नाहीं व निर्मळ सुख होत नाहीं ह्मणून फलचिंतन नको. ( २ ) ईश्वरार्पणाचा हेतु स्पष्टच आहे. असो: फल मला नको, ईश्वरास किंवा दुसऱ्या कोणा-सही तें फल मिळो, अशा ज्या मनोवृत्तीनें कर्तव्यकर्माचें आचरण होतें, **ती कर्तव्य-बुद्धि होय**; हिला **व्यवसायात्मिका किंवा निश्चितबुद्धि असें म्हणावें**. ह्या मनो-वृत्तीनें कर्तव्य केलें तर कर्मबंध प्राप्त होत नाहीं. कर्मबंध प्राप्त होतो तो विषयचिंतनानें आणि कर्तृत्वाच्या अभिमानानें होतो. विषयचिंतनानें विषयत्व प्राप्त होतें हें वरती सांगितलेंच आहे. कर्तृत्वाचा अभिमान धरिला असतां ( १ ) शुद्ध आत्म्यास कर्तृत्व-भोक्तृत्व नसतांना त्याच्यावर तें लादलें जातें हा अन्याय होतो. ( २ ) जीव परि-च्छिन्न स्थितींत आहे तोंपर्यंत जीवात्म्याकडे कर्तृत्व थोडेंबहुत असतें; पण हा खरा भाग न समजल्यामुळें, अज्ञानी जीव सर्व कर्तृत्व आपल्याकडे घेतात, ही दुसरी असद्वस्तु आहे. ( ३ ) मागच्याप्रमाणेंच कर्तृत्वचिंतन व त्याचा अभिमान राहील तर विषयात्मकता प्राप्त होऊन पुढें उन्नत होण्याची आशाही अभिमानवशात् नाहींशी होईल; म्हणून विषयचिंतन व कर्तृत्वाभिमान हीं बद्धक आहेत. ही जोडी नसली म्हणजे कर्मबंध होत नाहीं; अतएव व्यवसायात्मिका बुद्धि प्राप्त झाली असेल तरच कर्मयोग साध्य होऊन आपलें शुद्ध, निर्मळ जें आत्मस्वरूप त्या प्रत आपण प्राप्त होऊं. तेव्हां पूर्वकर्मानें जी परिच्छिन्न स्थिति प्राप्त झाली आहे, तिच्या मधून मुक्त होण्याला निष्काम कर्तव्यकर्म ईश्वरसमर्पण करावयास शिकलें पाहिजे. म्हणजे मोक्षमार्ग सुलभ होईल, हें उघड झालें. हा कर्मयोग आहे.

## कामुक कर्मांचा निषेध.

ज्यांस हा निश्चय साध्य होत नाहीं, केवळ शारीरिक व मानसिक सुखांचा उपभोग मिळावा एतदर्थ श्रुतिस्मृतींनें सांगितलेलीं कर्में 'मी करितों' या अभिमानानें करणारे पुरुष खरोखरच अज्ञानी असतात. 'सुख' म्हणजे काय हें माहित नसल्यामुळें आभासिक सुखावरच लुब्ध होऊन अनेक प्रकारचीं कर्में हे लोक करीत असतात. त्यांतही एकदृष्टि नसल्यामुळें आज हें कर्म घेतलें, तें संपलें नाहीं तोंच दुसऱ्या कर्मांचा अंगीकार केला; त्याची पूर्तता होते न होते तों तिसऱ्याचा आदर केला, अशी त्यांची सुखाशेनें नित्य तारंबळ उडून जाते. भोग व ऐश्वर्य हाच त्यांचा देव; पण त्याचेंही स्वरूप नीट न समजल्यामुळें हे बिचारे समाधानाच्या सुखास आंचवतात. 'आत्मा कर्ता व भोक्ता आहे' हा त्यांचा सिद्धांत,-नव्हे! अपसिद्धांतच-होय! वेदांवर यांचा विश्वास आहे; पण कोठपर्यंत? तर विषयोपभोग हेंच आत्यंतिक सुख आहे, असें वेद म्हणतील तोंपर्यंत! याप्रमाणें एकदृष्टि नाहीं, सुखाची कल्पना नाहीं, आत्मस्वरूपाचें ज्ञान नाहीं, वेदाचें रहस्य समजण्याची ऐपत नाहीं, म्हणून हे लोक सुकाणूविरहित असलेल्या नौकेप्रमाणें अत्यंत खवळलेल्या 'भवसागरांत गटंगळ्या खाऊन बुडतात, बुडून वर येतात, पुनः खालीं जातात; अशा त्यांच्या येरझारा' नित्य सुरू असतात. ह्या पुरुषांस शांति हा पदार्थच ठाऊक नसतो. हें नित्यशः दुःखमग्न असतात. म्हणून **कामुककर्म** नको. असो; या कामुकांचा व यांच्याही पलीकडच्या नास्तिकांचा सविस्तर विचार अध्याय १६ मध्यें केला आहे. येथें केवळ दिग्दर्शन मात्र केलें आहे.

## त्रिगुणातीतत्त्व.

कामना ठेवून वेदोक्तकर्में करणारे कर्मवादी हे 'कर्म करणें अवश्य आहे व कर्माचें फल स्वर्गसुखादि भोग व ऐश्वर्य यांत परिणत होतें' असें म्हणतात. भगवंतांनीं यांस इतकेंच उत्तर दिलें आहे कीं, असल्या कर्मानें कर्मनाश अथवा संसारनाश कधींही व्हावयाचा नाहीं: आणि चित्तशुद्धि झाल्यानंतर ज्ञानमार्गानें नित्य, निरंजन, निर्विकार अशा ब्रह्मसुखाचा आस्वाद घेण्याला व शेवटीं तद्रूप होण्याला तुम्हांस संधीच सांपडावयाची नाहीं! मार्टिनो नामक प्रसिद्ध नीतिमीमांसक म्हणतातः 'Self is the centre and essence of all Sin, and the surrender of self, the simple condition of union with God' (अहंकार, मीपणा, हा सर्व पापाचा उगम आणि मूलद्रव्य आहे. आत्मत्याग केल्याशिवाय ईश्वराशीं एकरूप होणें शक्यच नाहीं). ही ख्रिस्त-भक्तांचीं वाक्यें आहेत. त्यांचा एक अर्थ प्रस्तुत प्रकरणास उपयोगी असा मार्टिनो साहेबांनीं केला आहे. ते म्हणतातः 'The Will, whenever it goes astray, follows the direction of individual tendency and wish,-the forces of the Ego unrestrained by reverence for a

good that is not ours.' (जेव्हां जेव्हां इच्छा, कामना, मार्गभ्रष्ट होते, तेव्हां तेव्हां ती अहंकाराच्या लहरींस व इच्छेस पूर्णपणानें वश असते. ह्या लहरी व ही इच्छा हे अहंकाराचे वाहक आहेत. जें परमात्म्याचें सुख आहे, त्या सुखाविषयीं अनादर संपादून हे अहंकाराचे घोडे उच्छृंखल झाले म्हणजे मानवी वासनांचा रथ कसा मार्गभ्रष्ट होईल हें सांगावयास नकोच!) मार्गभ्रष्ट झालेल्या मनुष्याला हजारों वाटांनींही इष्ट देश सांपडत नाहीं हें सर्वानुभूतच आहे.

निश्चयात्मिक बुद्धि यांत बुद्धि व श्रद्धा यांचा अंतर्भाव होतो असा अर्थ चतरजी नामक विद्वान् ग्रंथकारानें केला आहे. ईश्वर एकच आहे. अद्वितीय आहे, त्याला सजातीय अगर विजातीय असा दुसरा कोणीच नाहीं, असा जो दृढ निश्चय त्याचें नांव निश्चयात्मिका बुद्धि; या संबंधानें व ४२, ४५, ४६ श्लोकासंबंधानें बायबलमधील रोमन्स हा भाग वाचावा अशी यांची शिफारस आहे. 'ईश्वराचें पूर्ण ज्ञान व्हावें म्हणून जीवास अमर केलें आहे' असें ख्राईस्ट म्हणतो (पहा जानचें शुभ वर्तमान, अ० १७) व पूर्णावस्था प्राप्त होते तेव्हां,—ईश्वराशी प्रत्यक्ष परिचय होतो तेव्हां—अपूर्ण सृष्टीवरील प्रेम नष्ट होतें. (पहा कोरिंथिअन्स अ० १०) मनुष्यांस सात्त्विक गुणांची प्राप्ति झाली नाहीं, कारण निश्चयात्मकबुद्धि अगर विश्वास न ठेवितां केवळ कायद्यांच्या शब्दार्थालाच ते मोहित झाले.' (पहा रोमन्स अ० ९) 'बायबलच्या नियमाप्रमाणें कर्म केले म्हणजे, पुरुषार्थ साध्य होतो किंवा—जीव पवित्र होतो, असें नाहीं; नियमांनीं फक्त पापाचें ज्ञान होतें. नियमांनां तामस गुणाला प्रकटता येते. विश्वास, निश्चयात्मक बुद्धि, उत्पन्न झाली म्हणजे नियमांस अंधत्व येतें (म्हणजे आपण निश्चयात्मक विश्वास-बुद्धीनें वागावें, नियमांच्या शब्दाकडे लक्ष्य देऊं नये.) जे आपण परमात्मभजनीं लागलों व विषयभजन सोडून देते झालों, त्यांच्यामध्यें ईश्वराचा पूर्ण सात्त्विकगुण अवतीर्ण होईल. (पहा रोमन्स अ. ३, ८, ७ व ८). ज्याला शुद्ध सुख, शुद्ध ज्ञान व शुद्ध अमरत्व हीं हवीं आहेत, त्यानें त्रिगुणात्मक जे वेद अथवा उपभोगमात्र वाढविणारे सर्व प्राचीन व अर्वाचीन ग्रंथ यांचा योग्यकाळीं तिरस्कारपूर्वक त्याग करून त्रिगुणातीत जो परमात्मा तिकडे जाण्यासाठीं त्याचेंच अनुकरण करण्यास शिकावें म्हणजे आपणही त्रिगुणातीत होण्याचा अभ्यास करण्यास लागावें. द्वंद्वरहित होणें, नित्य योगयुक्त असणें, योगक्षेम-चिंताशून्य होणें व आत्मवंत होणें याला निस्त्रैगुण्य म्हणावें. ४६ व्या श्लोकांत एक तात्त्विक-महासिद्धांत सांगितला आहे, तो हाः तत्त्वज्ञानाच्या अधिगमानें, प्राप्तीनें, जी सुखशांति मिळते, ती सर्व वैदिक (उपभोगात्मक) कर्में करून मिळणाऱ्या शांतीपेक्षां अनंतपटीनें मोठी असते, इतकेंच नव्हे तर या अधिगमापासून, या त्रैगुण्यातीत करणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून, सर्वज्ञता, फार काय सांगावें?—ब्रह्मत्व प्राप्त होतें! ४५ व्याचा पूर्ण विस्तार गीतेंतील अ० १४ व अ० १७ मध्यें आहेच आहे, पण निस्त्रैगुण्य म्हणजे काय याची फोड ४७–५० मध्यें चांगली केली आहे. पहा कीं, (१) कर्मफलाच्या आशेनें कर्म

करणें याचा त्याग केला व कर्माशीं आसक्ति ठेविली नाहीं, सारांश फल व अभिमान या जोडीचा त्याग करून व एक ब्रह्माकडे दृष्टि ठेऊन प्राप्तकर्तव्य करणें ह्या स्थितीसच निर्द्वंद्व असें म्हणतां येईल. येथें 'एकच ब्रह्म आहे व तें प्राप्तव्य आहे' ही दृष्टि आहे. द्वैतबाधा मुळींच नाहीं. (२) नित्यसत्त्वस्थ राहणें म्हणजे सदैव योगयुक्त असणें होय. समबुद्धि, अविकृत बुद्धि प्राप्त होणें म्हणजे नित्य सत्त्वस्थ वृत्तींत असणें होय. सिद्धि होवो, असिद्धि येवो, जयापजय असो, कोणत्याही प्रसंगीं चित्तरूपी कोटाचा भंग होऊं न देणें ह्याचेंच नांव नित्य सत्त्वस्थता आहे. (३) फलहेतूचा त्याग करून योगक्षेमाची चिंता परमेश्वरालाच समर्पण करणें याचें नाव निर्योगक्षेम होणें होय. कर्मयोगाची बुद्धि ती हीच कीं, येथें सुकृतदुष्कृतांचा व कर्मफलाचा विचारपूर्वक त्याग करून व केवळ कर्तव्यकर्माकडे मात्र लक्ष देऊन तें ईश्वरार्पणबुद्धीनें करावयाचें व आत्मचिंतन सदोदित कायम ठेवावयाचें ही ती व्यवसायात्मिकाबुद्धि होय. (४) वरील कर्तृत्वभोक्तृत्व मोह संपून परमेश्वराकडे एकतानतेनें तंद्री लागूं लागली म्हणजे आत्मवंतता प्राप्त होते. पुरुष 'आत्मवान्' झाला, ब्रह्मपदीं रुळूं लागला, म्हणजे अर्थातच तो कर्तव्याच्या पलीकडे जातो. त्याला वेद अथवा इतर प्रामाणिक ग्रंथ कांहीं नवीन किंवा ग्राह्य असे सांगूं शकत नाहींत, अर्थातच त्याची बुद्धीही चंचल असत नाही. बुद्धि निश्चल झाली तरच योगमार्ग साध्य होऊन, हा जीव मोक्ष पावतो, ब्रह्म होतो. याप्रमाणें श्लोक ४७, ४८, (४९, ५०, ५१,) ५२, ५३, व हे अनुक्रमें निर्द्वंद्व, नित्यसत्त्वस्थ, निर्योगक्षेम व आत्मवान् हीं ४५ व्या श्लोकांतील लक्षणें . तर करितात. येथें बुद्धिविरहित कर्म गौणप्रतीचें मानलें आहे आणि अनुभव ही तसाच आहे. तसेंच कर्मांचा कर्ता **मी** हा अभिमान व 'कर्मफल **मला** मिळालें पाहिजे' ही वासना, ही अभिमान-वासनेची दुक्कल सोडिल्याखेरीज कर्मांमध्यें कौशल्य प्राप्त होत नाहीं व प्राविण्य संपादन करितां येत नाहीं. हा अनुभवही सर्वांसच आहे. नीतिशास्त्रही हेंच सांगतें, धर्माचा हाच उपदेश आहे व शिष्टही हेंच म्हणतात. ही सांखळी वरील चारही दुव्यासह तयार झाली म्हणजे त्रिगुणातीततत्त्व मिळतें आणि कर्मबंध सुटतो. असो; ४७ व ४८ यांचा विस्तार तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत सांपडेल; ४९ ते ५१ व ७१ व ७२ हे पांचव्या व सहाव्या अध्यायांचे सूत्रभूत श्लोक होत; आणि ५२ वा श्लोक १५ व्या अध्यायाची प्रस्तावना करितो.

## योगबुद्धि मिळणार कशी?

या श्लोकावलींत योगबुद्धीचें संपादन कशी करावी, तें सांगितलें आहे. 'कर्म करणें' इतकेंच मात्र मनुष्याचे स्वाधीन आहे. या कर्मापासून 'अमुक फल मिळेल' अशा आशेनें कर्म करणें किंवा 'अमुक फल मिळालेंच पाहिजे' असा आग्रहनिग्रह करणें हें व्यर्थ असून संसारांत पाडणारें आहे. फल अमुकच मिळेल' असें आपण अल्पज्ञ मनुष्य

ह्मणणार कोण ? तें अनिश्चित असतें. तथापि ' फल अनिश्चित आहे, हें कळल्यानें मनुष्य विहित कर्माविषयींही उदासीन होईल, ह्मणून भगवान् सत्तेचाळीस श्लोकांत सूत्ररूपानें आणि तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत विस्तारानें सांगतात कीं **कर्म केलेंच पाहिजे**; मात्र फलाशा-विरहित मनोवृत्तीनें आपलें स्वकर्तव्य आपण केलें पाहिजे, सुखदुःखातीत होऊन स्वकर्म केलें पाहिजे. कर्म केलेंच पाहिजे. पण असल्या **कर्मानें मात्र मुमुक्षूची** इष्टकार्यसिद्धि होते असें नाहीं. त्याला परब्रह्माचे ठिकाणीं अभिरत झालेली एकाग्र बुद्धि हवी आहे. आतां, फलाशा न ठेवितां व अभिमान न धरितां आपलें प्राप्तकर्तव्य आपण करूं लागलों, तेंच कर्म ज्ञानपूर्वक कौशल्यानें करूं लागलों, म्हणजे ही एकाग्र बुद्धि क्रमशः येऊं लागते. ही बुद्धि पूर्णत्वास पोहोंचून तिनें अंतःकरणांतील सर्व विषयसंबंधीं सर्व आशा नष्ट केल्या आणि सर्व अंतर्विषयसंबंधीं सर्व अभिमान नष्ट केला, साराश भेदबुद्धि सर्वतः नष्ट झाली म्हणजे ज्ञानसंपादनाची योग्यता येऊन ज्ञानसंपादनानें ब्रह्मप्राप्ति होते. ही प्राप्ति अखंडत्वानें व अभंगत्वानें झाली कीं, मुक्तीला काय उशीर आहे ? हाच योग होय. याप्रमाणें या आवर्तांत, योगमार्ग, योगबुद्धि आणि योग, यांचीं लक्षणें सांगून परब्रह्मसाधनाचा अवश्य मार्ग जो योग त्याचा ( अज्ञानविध्वंसक मार्गाचा ) व ज्ञानाचा संबंध दाखविला. यांचा विस्तार तिसऱ्या, चवथ्या व पांचव्या अध्यायांत केला आहे, त्यांचें पठण अर्थातच अत्यंत इष्ट होय.

याप्रमाणें येथपर्यंत तत्त्वज्ञान (आत्मस्वरूप) आणि तें प्राप्त करून घेण्याचीं साधनें, कर्म, आणि कर्म करीत असतां अवश्य असणारी मनोवृत्ति सांगितली. तत्त्वज्ञानाचा नकाशा आंखून तें तत्त्वज्ञान कसें मिळेल त्याचीं साधनें सांगितलीं. या साधनांचा (शास्त्रकलांचा) विचार करितां करितांच सर्व मानसिक, भौतिक व दैविक शास्त्रांचा व नीतींचा विचार होऊन सर्वत्र एकवाक्यता व्हावयाची आहे. सर्व विद्यांचें, सर्व शास्त्रांचें व सर्व कलांचें (नीति, विशिष्टनियम, आचार, अभ्यास इत्यादिकांचें) एकीकरण करून एकच वस्तूचें अस्तित्व स्थापित करणें या सर्वांस व प्रकट झालेल्या ज्ञानास, तत्त्वज्ञान असें म्हणतात. एतद्विषयक हा गीताग्रंथ आहे. योगबुद्धीनें व योगकर्मानें चित्तशुद्ध झालेल्या स्थितप्रज्ञाचें वर्तन—(स्वकर्तव्याचरण कसें असतें हे दाखविण्यासाठीं)—यापुढें सांगतात.

ह्याप्रमाणें तत्त्वज्ञान, तत्साधनें व तत्स्थिति, या सर्वांचें वर्णन देऊन तत्त्वज्ञानरूपी चित्राचा सूक्ष्म नकाशा भगवंतांनीं या दुसऱ्या अध्यायांत रेखाटला आहे.

### **स्थितप्रज्ञ** अथवा **व्यवसायी पुरुष.** ( ५४—६८ ).

स्थितप्रज्ञ म्हणजे काय याला ५५-५६ मध्यें उत्तर आहे. स्थितप्रज्ञ बोलतो कसें याला ५७ मध्यें उत्तर आहे. ५८ व ५९ मध्यें तिसऱ्या प्रश्नाचें म्हणजे तो कोठें

असतो याला उत्तर आहे व ६४–६५ हे श्लोक स्थितप्रज्ञ व्यवहार कसा करितो याला उत्तर देतात. कर्मयोगाची बुद्धि अवगत झाली म्हणजे कर्मबंध सुटतो असें मागें ३९ श्लोकांत सुचविलें त्याचा विस्तार ५४ पासून ६८ श्लोकांपर्यंत आहे. पूर्वसंचितकर्मानें संस्कृत किंवा विकृत झालेल्या मनाला जें कांहीं हवेंसें वाटतें "**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्यहृदि स्थिताः। तदा मर्त्योऽमृतो भवति**" ही श्रुति पहा. हा व पुढील दोन्ही श्लोक या श्रुतीच्या आधारेंच गीतेंत आले. (१) ह्या कामाचा त्याग, (२) पुढें प्रतिकूल विषय येईल म्हणून होणारें भीतीसह दुःख, विषय येईल तेव्हां होणारें अनुकूल प्रेमासह सुख व अनुकूल विषयास कांहीं अडथळा येईल म्हणून उत्पन्न होणारा क्रोध, या सर्वांचा त्याग (श्लोक ५६), (३) प्राप्त झालेलें शुभ-मंगल-अथवा अशुभ-अ-मंगल-यां संबंधानें उत्पन्न होणारा आनंद अथवा द्वेष यांचा त्याग (५७) हे सर्व त्याग ज्या योगीपुरुषाला साध्य झाले, भूत वर्तमान भावी सुखदुःखांविषयीं जो पूर्णतः उदासीन झाला व ज्यानें विषयांकडून आपलीं इंद्रियें सर्वथा निवृत्त केलीं इतकेंच नव्हे तर विषय आणि विषयरस यांनीं सुद्धां सरसकट या महात्म्याला पाहून पळ काढला, सारांश स्वार्थी व स्वोपभोगपोषक कर्म करावयास लावणारीं अंतर्बाह्य इंद्रियें व इंद्रियांस प्रवृत्त करणारे सर्व विषय हे ज्याला सर्वथा वश झाले, तो **स्थितप्रज्ञ** होय. या इंद्रियांस वश करण्याची जीं जीं साधनें भगवंतांनीं सांगितलीं त्यांचा विस्तार तीनपासून सतराव्या अध्यायापर्यंत केला आहे. यज्ञ, योग, भक्ति, ज्ञान इत्यादि साधनें व त्यांचा विस्तार १५ अध्यायांत दिसेल. कर्मेंद्रियें, मन, बुद्धि व अहंकार यांस स्वाधीन करून घेणें आणि मग स्वपरविमोचनाप्रीत्यर्थ ईश्वरीमार्गानें खटपट करून विश्वज्ञान संपादन करणें व करविणें हा गीतेचा मुख्य कर्मयोग आहे. हा साधला म्हणजे चित्तशुद्धियोग व नंतर दुसऱ्या, तेराव्या इत्यादि अध्यायांत सांगितलेलें आत्मज्ञान संपादन करून व करवून मुक्त होणें हा गीताप्रणीत सांख्ययोग आहे.

## इंद्रियविजय.

असो; हीं इंद्रियें महाव्रात्य आहेतः यांस नुसतें स्तब्ध ठेवीन झटलें तर चालावयाचें नाहीं. यांची मर्कटासारखी चंचल व खोडकर वृत्ति असते. जीवनशास्त्रामध्यें पाहिलें तर असें दिसेल व मानसशास्त्राच्या अभ्यासानें वरील ग्रह पुष्ट होईल; तो असा कीं, हीं नित्यचंचल इंद्रियें मोकळीं सोडून दिलीं असतां फार मोठाले अनर्थ होतील. याकरितां त्यांस समाजाच्या, परमेश्वराच्या व ब्रह्माच्या लगामीं लावावें; म्हणजे कर्मयोग, भक्ति-योग व ज्ञानयोग साध्य होतील. कठोपनिषदांत झटलें आहेः

**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ।**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेवच ॥**

इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ।
आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥
यस्त्वविज्ञान् भवत्ययुक्तेन मनसा सदा ।
तस्येंद्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ॥

अर्थ स्पष्टच आहे. असो: तेव्हां वाटेल ती खटपट करून इंद्रियें वश होतील तो प्रयत्न केला पाहिजे. परमेश्वराच्या लगामीं इंद्रियें लावण्याचा विस्तार सात ते बाराव्या अध्यायांत केला आहे. येथपर्यंत ६१ श्लोकांचें तात्पर्य झालें.

## विषयचिंतनाचे परिणाम. ( ६२—६३ )

विषयचिंतन सुरू झालें म्हणजे विषयासक्ति उत्पन्न होते, आसक्ति झाली म्हणजे मग काम, मग क्रोध, क्रोधापासून मोह, मोहानें स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशानें बुद्धिनाश आणि शेवटीं सर्वनाश, अशी ही परिणामपरंपरा आहे. विषयचिंतनानें विषयत्व प्राप्त होतें, हें दाखवून देणाऱ्या या पायऱ्या आहेत. मानसशास्त्री व मनोवृत्तींचे शास्त्री हेंच सांगतील. शिवाय विषयध्यास लागला म्हणजे त्या विषयाविषयीं किती जबरदस्त आसक्ति उत्पन्न होते हें 'मनोराज्य करणाऱ्या धनगरानें आपलें तुपाचें मडकें फोडिलें' या गोष्टीवरून स्पष्ट होईल. 'कामातुराला लज्जा किंवा भय कांहीं नाहीं' 'क्रोधवश पुरुष अर्धवेडा होतो;' हा मूढ पुरुष पूर्व गोष्टी विसरतो, स्मरण गेलें म्हणजे नित्यानित्य विवेक करणारी बुद्धि नष्ट होते आणि बुद्धि गेली म्हणजे दुःखाला काय सीमा आहे? असो; ह्या सर्व सार्वजनिक अनुभवाच्या गोष्टी आहेत. इंद्रियांस वश करून ठेविलें नाहीं तर तीं विषय पाहातील व अयुक्त मन त्यांचें चिंतन करूं लागेल व अनर्थ ओढवेल म्हणून हा विषय येथें आला आहे. ६७ व्या श्लोकांत सांगतात कीं, अयुक्त मन स्वैर इंद्रियांच्या ताब्यांत गेलें म्हणजे वाऱ्याच्या झोतांत सांपडलेल्या सुकाणूंविरहित नौकेची गति त्यास प्राप्त होऊन तें भिरकांड्या खात राहील व शेवटीं नष्ट होईल! अयुक्ताला निश्चयात्मिका बुद्धि प्राप्त होत नाहीं व भावनाही नसते. ईश्वरी भावना नसेल तर शांति नष्ट होते आणि शांति नष्ट झाली म्हणजे सुखसूर्य अस्तंगत होतो! एवंच अनिश्चयी पुरुषाच्या जीवयात्रेचा दुःखपर्यवसायी खेळ होतो. पण हेंच

## मन युक्त असेल तर

इंद्रियांचे रागद्वेष मावळतात आणि मन प्रसन्न असतें. मन स्वच्छ व प्रसन्न असलें म्हणजे दुःखहानि होऊन बुद्धि स्थिर होते. एवंच ज्याचीं इंद्रियें विषयांपासून भोग-दृष्टीनें विराम पावलीं त्याची बुद्धि स्थिर होते ( ६८ ) हें ठरलें. ५८ व्या श्लोकाचीच ही पुनरावृत्ति आहे. पण इंद्रियांच्या स्वाधीन मन झालें असतां काय अनर्थ होतात, विषय-ध्यानानें बुद्धिनाश कसा होतो, इंद्रियें श्रीपरमेश्वर चरणीं लीन केलीं असतां त्यांचा

विषय वैराग्य कसें येतें, प्रसाद, दुःखहानि, बुद्धिस्थिरता कशी प्राप्त होते, हें विस्तरशः व सप्रमाण सांगून ही पुनरावृत्ति केली असल्यामुळें तिला सिद्धांताचें स्वरूप आलें आहे.

## स्थितप्रज्ञ पुरुष व त्याचें वर्तन. ( ६८–७२ )

याचें वर्तन संसारी जनांच्या उलट असतें. ज्या परब्रह्मस्वरूपाविषयीं जनास पूर्ण अज्ञानाची रात्र असते त्याविषयीं वरील पुरुष ज्ञानप्रकाशांत स्थिर असतो व संसार जी रात्र, त्यांत राहून आत्मनाश करण्यांत पटाईत झालेल्या पुरुषाचें तामसी ज्ञान (अज्ञानच असतें तर बरें! हें तामसी ज्ञान भारीच वाईट ! ) तें स्थितप्रज्ञाला मुळींच नसतें. ४६ वे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ह्या तुडुंब व ओतप्रोत भरलेल्या शांत शांतिसागराकडे अनेक अशा सरिता ( वासनारूपी नद्या ) भरपूर पात्रांनीं आल्या तरी या सागरांत कांहीं सुद्धां खळबळ होत नाहीं इतकेंच नव्हे तर या वासना नद्या, सागराचें स्वरूपांत मिळून जाऊन स्थिर होतात ! हा पुरुष ज्या शांतीचा उपभोग घेतो, तिचा एक •लक्षांश सुद्धां कामी पुरुषांचा काम पूर्ण झाला असतां मिळत नाहीं. निर्ममत्व, निरहंकार आणि निष्कामता ही त्रयी साध्य होऊन कर्म करित राहणाऱ्या स्थितप्रज्ञाला खरी शांति मिळतें. तुकाराम, एकनाथ, कबीर, माणिकप्रभु इत्यादि पुरुषांची चरित्रें वाचिली असतां वरील गोष्टी खऱ्या आहेत, असें दिसेल. हीच ब्राह्मि स्थिति होय. ही मिळविली म्हणजे मोह संपला. मोह संपून ज्ञानविज्ञान होणें हाच मोक्ष होय. ही ब्राह्मी स्थिति प्राणोत्क्रमणाच्या वेळीं साध्य झाली तरी फलप्रद होते, मोक्षद होते. मग आयुष्याच्या तिसऱ्या प्रहरापैकीं कोणच्याही प्रहरांत स्थितप्रज्ञता प्राप्त झाली तर मोक्ष मिळेल यांत नवल तें काय? हा आशीर्वाद होय.

ह्याप्रमाणें तत्त्वज्ञान, तत्साधनें व तत्स्थिति, या सर्वांचें वर्णन देऊन तत्त्वज्ञानरूपी चित्राचा सूक्ष्म नकाशा भगवंतांनीं या दुसऱ्या अध्यायांत रेखाटला आहे. पुढील सर्व प्रासाद या पायावर रचिला आहे. येथें सांगितलेल्या सूत्रभूत श्लोकांवरून प्रासादाच्या प्रत्येक अंगाचें सूत्र वरील नकाशांत कसें दाखवितां येतें हें समजतें; आणि येथें निर्दिष्ट केलेल्या सूत्रांवरून पुढील भागांची मांडणी कसकशी झाली हेंही समजतें.

असो; आतां यापुढें साधनक्रमाचा विचार सुरू करावयाचा. सर्व साधनांतील अत्यंत स्वल्प साधन म्हणजे कर्मयोगसिद्ध कर्म करणें हें होय. त्याचा विचार करावयास लागूं.

पण कर्मयोगाला प्रारंभ करण्याचे पूर्वीं एका गोष्टीचा विस्तरशः विचार केला पाहिजे. ती गोष्ट म्हटली म्हणजे.

## सांख्यमत परीक्षण.

होय. गीतेमध्यें ‘ सांख्य ’ शब्दाचा उल्लेख अनेक वेळ झाला आहे. हें सांख्य म्हणजे कापिलसांख्य नव्हे. गीतेतील सांख्य याचा अर्थ ‘ केवळ ज्ञानमार्ग ’ असा

आहे. कित्येक लोकांस ' सांख्य ' शब्दावरून कांहीं शंका उत्पन्न होतात त्या होऊं नयेत ह्मणून कापिलसांख्याचे मुख्य सिद्धांत व त्यांचा गीतेशी परंपारित संबंध खाली देत आहे.

हल्लीं उपलब्ध असलेल्या सांख्यमताचे मुख्य आचार्य कपिलमहामुनि होत, असें म्हणतात. हे कपिल कोणते, ह्यांचा काळ कोणता, यांनी प्रथमतः प्रणीत केलेलीं मतें कोणतीं, या सर्वांचा उलगडा यथासांग करणे हा मोठा मौजेचा व उपयोगाचा विषय आहे. सांख्यकारिका, सांख्यसूत्रे हे ग्रंथ मला वाचण्यास मिळाले, त्यांवरून पाहतां सांख्य-मतप्रस्थापक कपिलमुनी हे अतिप्राचीन कालांत झाले असूनही सर्वकालीन तत्त्ववेत्त्यांच्या पहिल्या वर्गांत या श्रेष्ठपुरुषास खुशाल बसवितां येईल असे मला वाटते. प्रचालित धर्मास व शास्त्रास अमळ एकीकडे ठेवून ज्या महात्म्याने सर्व सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयांची उत्कृष्ट मीमांसा एका बुद्धीच्या जोरावर करण्याचा जो प्रयत्न केला व आलीकडील स्पायनोझा, क्यांट हेगेल, शोपेनहार, हार्टमन, स्पेन्सर, डार्विन, हक्सले इत्यादि महामुनींच्या एकंदर प्रयत्नांस जे यश आलें आहे, तो प्रयत्न व ते यश आमच्या आर्यावर्तांतील महातत्त्वज्ञानें सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वी ज्या एकट्यानेच संपादन करण्याचे पुण्य घेतले व हल्लीं जगांतील सन्माननीय धर्मामध्ये मोडणारा बुद्धधर्म हा ज्याच्या खटपटीचा एक अंश, तो महापुरुष किती बुद्धिमान् असला पाहिजे याची वाचकांनीच कल्पना करावी. आमच्या पूर्वजांनीही ह्या अलौकिक पुरुषाचे कौतुक केले नाही असे नाही. कपिल हा ईश्वरी अवतार असें भागवतांत वर्णन आहे कपिलाच्या दुर्धर शापाने सगराचे साठ हजार पुत्र एका क्षणमात्रांत भस्म झाले असे रामायण म्हणते. जीवन्मुक्त नारदाने दक्षाच्या मुलांस सांख्याचे अध्ययन करा ' असा उपदेश केला त्याचे वर्णन महाभारतांत आहे. असो; तेव्हां सर्व जगास आपल्या बुद्धिप्रभेने थक्क करून टाकून जगाची व मानवी बुद्धिसामर्थ्याची महती वाढविणाऱ्या या थोर-अतिथोर पुरुषाचा लागेल तितका शोध लावून त्याची तत्त्वें मराठी वाचकांस अर्पण करण्याचा प्रयत्न करणारा पंडित आह्मा सर्वांवर अनेक उपकार करील असें मला वाटते.

---

* सांख्य तत्वाचे प्रतिपादक कपिलमहामुनी याच्या संबधानें इतके स्तुतिपर लिहा-वयाचे कारण इतकेंच की, हिंदुस्थानामध्ये पुढे जे तत्त्वविचार प्रसृत झाले त्याचा मूळ पाया खाली दिग्दर्शविलेल्या सांख्यतत्त्वामध्ये आहे. प्रथमतः; "पुरुष आणि प्रकृति अशा दोन वस्तु होत. पुरुष, म्हणजे आत्मा हा निर्विकार आणि निष्क्रिय असून साक्षी असतो. मूळ प्रकृतीमध्यें सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण सारखेच असतात, म्हणून ती साम्यावस्थेंत असते. पण पुरुष आणि प्रकृतीची गांठ पडली म्हणजे आत्म्याचें शुद्ध आणि निर्विकार स्वरूप स्वस्वरूपा-पासून भिन्न होतें. विकृतस्वरूप प्रकृतीच्या संयोगानें होतें. आत्म्यास त्रिविधतापांपासून दुःख भोगावें लागतें तें प्रकृतीच्या संगतीमुळें होय आणि प्रकृतीची संगति तोडून टाकण्याची

आतां ह्या श्रेष्ठ पुरुषाच्या सिद्धांतापैकीं गीतेंत ओघानें आलेल्या तत्त्वांचें निदर्शन व खंडन यांचें दिग्दर्शन करून हा विषय आटपतों.

१ आत्मे व प्रकृति किंवा प्रकृति आणि पुरुष अशा दोन सद्वस्तु आहेत असा सांख्य-सिद्धांत आहे.

,, येथपर्यंत झालेल्या प्रकरणांत-व पुढेंही-गीतेंत सांगितलें आहे कीं, सद्वस्तु एकच आहे. प्रकृति ( Nature ) मायिक म्हणजे मिथ्या आहे, सद्वस्तु मिथ्या

---

खटपट झाली, अगर कर्माचा सर्वथैव त्याग केला, तर आत्मा पुनः पूर्वस्वरूपास जाऊन मिळेल;" हा सांख्यांचा सिद्धांत व मोक्षमार्ग होय. सर्वच भिन्नरूपानें दिसणारे पदार्थ एकाच प्रकृतीपासून झाले आहेत, हा सांख्याचा मूलतत्त्वमूलक सिद्धांत आहे. कपिलमहामुनींनीं सर्व प्रकारचें कर्तृत्व आत्मसांनिध्यानें विकृत होणाऱ्या प्रकृतीकडे असतें व विश्वाची उत्पत्ति, त्याची स्थिति व त्याचा लय हें सर्व प्रकृतीकरवींच होतें असें मत प्रकट केलें. आपली बुद्धि, अहंकार व सर्व इंद्रियें हीं प्रकृतीपासूनच उत्क्रांत झालीं असें कपिल म्हणतात व अलीकडील **क्लिफर्ड** आदि तत्त्ववेत्तेही हेंच म्हणतात. **स्पायनोझा**चें सांख्यतत्त्वाशीं साम्य दिसतें तें सेश्वर सांख्य अगर योगतत्वाशीं होय. असो; सांगावयाचें तात्पर्य म्हणून इतकेंच कीं, सर्व विश्व प्रकृतीपासून, अव्यक्तापासून, उत्पन्न झालें असें जें कपिलसांख्यदर्शन म्हणत आहे,त्याच्या जवळ जवळच **स्पेन्सरादि** उत्क्रांतितत्त्वाचे पुरस्कर्ते यांचें म्हणणें येत आहे ! ग्रीस देशांत **आरिस्टॉटल** नामक तत्त्ववेत्त्यानें सुमारें दोन हजार तीनशें वर्षांपूर्वी सामान्य गोष्टी शास्त्राच्या चक्रामध्यें गुंतवून ठेविल्या, तीनशें वर्षांपूर्वी म्हणजे खिस्ती शकाच्या सोळाव्या शतकांत **बेकन** नामक आंग्लभौमतत्त्ववेत्त्यानें पूर्वीच्या ज्ञानाचा आढावा घेऊन भौतिक शास्त्रांची सीमा कशी वाढवावी हें तत्त्व प्रकट केलें, आलीकडे एकोणिसाव्या शतकांत **स्पेन्सर** नामक महापंडित आणि महातत्त्ववेत्त्यानें सर्व भौतिक व मानसिक गोष्टींचा कांहीं उलगडा आपल्या उत्क्रांतितत्त्वानें केला, त्याचप्रमाणें आमच्या देशांत सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वी **सांख्य**मुनीनें इहलोकामध्यें दिसणाऱ्या सर्व पदार्थांचें प्रत्यक्ष आणि अनुमानानें अवलोकन करून सर्व पदार्थ एका मूळ प्रकृतीपासून निघाले आहेत असें ठरविलें ! ही गोष्ट लहान सामान्य आहे काय? सांख्याच्या नंतर जीं शास्त्रें उद्भूत झालीं तीं योग, वेदांत व इतर दर्शनें होत. त्यांचे पुरस्कर्ते व संपादक यांनीं पुष्कळ अंशांनीं सांख्यमताचेंच अनुसरण केलें आहे. सांख्य मतानें मुळापासूनच 'अनंत आत्मे निरनिराळे होते' ते एकाच महान् आत्म्यापासूनच निघाले आहेत असें योगानें ठरविलें; म्हणजे निरीश्वर सांख्य मताला सेश्वर केलें. वेदांत्यांनीं प्रकृति व पुरुष हीं दोन तत्वें शुद्ध विचाराच्या कसोटीस उतरत नाहींत व दोन वस्तूंमध्यें सामान्य असें कांहीं तरी पाहिजे असें ठरविणें हा अग्र बुद्धीचा धर्मच आहे. असा विचार करून पुरुष आणि प्रकृति या दोहोंच्याही पलीकडे ब्रह्म म्हणून खरी सद्वस्तु आहे व तिच्या सत्तेनें मात्र सर्व दृश्य जग, उत्पत्ति-स्थिति-लयाच्या चक्रांतून हिंडत आहेसें भासतें, असा सिद्धांत करून अद्वैत मताची स्थापना केली. सारांश जे जे कोणी तत्त्ववेत्ते पुढें निर्माण झाले, त्यापैकीं कांहींनीं

नाहीं, असा गीतेचा उपनिषदानुसार सिद्धांत आहे. ( पहा अ० २ श्लोक १७।१८।२०।२५ ).

२ सांख्यांचे मतें आत्मे अनेक आहेत.

,, गीतेचा, उपनिषदांचा व वेदांताचा मथितार्थ 'आत्मा एकच आहे' पण जीव मात्र अनेक आहेतसे दिसतात' असा आहे. ( पहा अ० २ श्लोक १७ ते २५ ). १२ वा श्लोक संशयित आहे. त्याचा विचार त्याच श्लोकामध्यें केला आहे.

३ सांख्यमतानें 'अव्यक्त' प्रकृति, श्रेष्ठ व चिंतनीय आहे.

,, गीतामतानें आत्मा अव्यक्त खरा पण तो अविकारी व अचिंत्य आहे. ह्मणून अव्यक्त या शब्दानें सर्वत्र प्रकृति घेतां येत नाहीं. केव्हां केव्हां आत्माच घ्यावा लागतो. ( पहा अ० २ श्लोक २५ ).

४ कर्म न करणें हा सांख्यमतानें पुरुषार्थ ठरतो.

,, कर्तव्य केलेंच पाहिजे, निष्काम आणि निरहंकार बुद्धीनें मात्र कर्म केलें पाहिजे, असें गीताशास्त्र सांगतें. ज्ञानोत्पत्तीपूर्वी कर्म केलें नाहीं तर प्रपंचही होत नाहीं व परमार्थही साधत नाहीं. ( पहा अ० २ श्लोक १८ व ३१ ते ३८ ).

५ आत्मा सुखदुःखाचा अधिकारी आहे.

,, आत्मा अविकारी आहे म्हणजे तो सुखदुःखाचा अधिकारी नाहीं. ( पहा अ० २ श्लोक १४।१५ ),

वरील विषयांत सांख्यमतखंडनपर जे जे श्लोक मला आढळले त्यांचें येथें निदर्शन केलें आहे. सुखदुःखाच्या विमोचनासाठीं तत्त्वज्ञानाचा व्यासंग केला पाहिजे; सांख्याचें अनुसरण तरी केलें आहे व इतरांनीं सांख्यमताची सुधारणा केली आहे. हा संसार, हें जन्ममरण, हा ऐहिक वास हें सर्व दुःखमय आहे असें सांख्यमुनींनीं सांगितलें आहे. तेंच योग्यास, अद्वैत्यांस, बुद्धास व आगस्टाईनसारख्या ख्रिस्तभक्तास व हार्टमन शोपेनहार नामक तत्त्ववेत्यास मान्य आहे. असो; तेव्हां सांख्यमहामुनींचा स्तुति करणें अवश्य आहे असें ह्मटलें, तें यथार्थ आहे असें यावरून दिसेल वेदांतमताला जें अति उत्कृष्ट स्थैर्य प्राप्त झालें व दुःखी व अनाथ आणि तळमळणाऱ्या जीवांचें समाधान करण्याचें सामर्थ्य जें त्यास प्राप्त झालें, त्याचा बराचसा मूळ पाया सांख्यांत आहे असें ह्मटलें असतां अद्वैत मताची निंदा होत नसून उलट येवढया जबरदस्त सांख्यमताचाही पराभव करण्याचें सामर्थ्य त्याच्या अनुषंगानेंच पुष्ट झालेल्या वेदांतास आलें आहे हें त्यास भूषणच आहे. शिवाय सन्मत जें स्थापित होतें ते प्रथमतःच होत नाहीं; दुर्मतांचा विध्वंस करून मग तें प्रतिष्ठापित होत असतें. हेंही आमच्या भाविक मुमुक्षूंनीं विसरतां कामा नये.

ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं; आत्म्याशिवाय 'माझें' असें दृश्य जगांत कांहीं नाहीं; विषय, इंद्रियें, मन, लिंगदेह, अहंकार, बुद्धि, कारणदेह हीं सर्व प्रकृतीचीं कार्यें आहेत; आत्मा निराळाच आहे; वगैरे पुष्कळ सिद्धांत कपिलसांख्य आणि गीतासांख्य ह्या दोन्ही शास्त्रांसही मान्य आहेत. मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही कीं, तत्त्वविवेकानें आत्मानात्मविषयाचे सिद्धांत ठरवून ठेवून व त्याप्रमाणें आचरण करावयाचें असा निश्चय करून मनुष्यानें आपापलें कर्तव्य करावें. दैहिक, मानसिक, अगर नैतिक अडचणी येतील त्या एकीकडे सारून शास्त्रप्रणीत कर्तव्य निर्लोभ मनानें केलेंच पाहिजे, असें सांगण्याचा श्रीभगवंताचा हेतु आहे व तो हेतु वरील तात्त्विक, सयुक्तिक आणि समंजस प्रतिपादनाच्या योगानें सिद्धीसही गेला आहे. सारांश गीतासांख्यशास्त्र निष्काम कर्तव्याच्या आड येत नाहीं हें येथें सिद्ध झालें.

गीताकालानंतर **कित्येक वर्षांनीं** कपिलसांख्यास 'दर्शनाचें' व्यवस्थित स्वरूप आलें हें केव्हांहा विसरूं नये. ( पहा डायसन कृत 'उपनिषदांतर्गत तत्त्वज्ञान' ). असो; आतां गीताप्रणीत 'कर्मयोगाच्या मीमांसेला प्रारंभ करूं.'

---

## खंड ३.

# तिसऱ्या अध्यायाचा उपसंहार.

भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायाच्या उपसंहारास सुरुवात करण्यापूर्वी पुनः एकवार इतकें सुचवून ठेवणें इष्ट दिसतें कीं, दुसरा अध्याय हा सर्व गीताशास्त्राचें सार आहे. अठरा व्याख्यानामध्यें जे विविध विषय यावयाचे व ज्या अनेक प्रश्नांची चर्चा व्हावयाची, त्या सर्व विषयांची व प्रश्नोत्तरांची एकवाक्यता करून मोक्षाच्या किल्ल्याला सुगम व शास्त्रशुद्ध असा एकच घाट आहे असें सूत्ररूपानें त्या अध्यायांत सांगितलें आहे. हा घाट कोणता? तर ज्ञानमार्ग होय. याची पहिली पायरी म्हणजे निष्काम कर्म करून मन निर्मळ करावयाचें ही आहे. परमेश्वराला आपण कर्मफळ अर्पण करूं लागलों म्हणजे आपल्या मनामध्यें निष्कामत्वाचा संचार होऊं लागतो. प्रथम आपण प्राकृत बुद्धीनें खाजगत अथवा सार्वजनिक कर्म करीत असतां 'कर्म करणारा **मी** आहे.' हा अभिमान व 'कर्माचें फल **मलाच** मिळालें पाहिजे,' ही वासना ह्या दोन्ही गोष्टी प्रबल असतात. पुढें, आपण शक्तिसर्वस्व खर्च करीत असूनही कार्यसिद्धि होत नाहीं, असा प्रसंगानुसार अनुभव येऊं लागला म्हणजे आपला कर्तृत्वविषयक **अभिमान** विरकळित होतो; व मोठ्या कष्टानें कार्यसिद्धि झाली तरी **अपेक्षित सुख आपल्यास मिळत नाहीं** असा प्रत्यय येऊं लागतो; म्हणजे येथील सुख हें शुद्ध नसून सदैव दुःखमिश्रित आहे अशी खातरी होत जाऊन फलवासना विरून जावयास लागते. सारांश कर्तृत्वसंबंधें आपण परतंत्र

आहों असा सिद्धांत होतो व वासनेचा वीट येतो. ही मनाची जी क्षणिक व पुढें पुढें कायमचीशी स्थिति होऊं लागते, तिलाच परमेश्वराकडे जावयाचें वळण लाविलें, सर्व फलत्यास अर्पण करावयाची संवय मनाला लाविली, म्हणजे निष्कामत्व सिद्ध होऊं लागतें. हें निष्कामत्व जसजसें साध्य होईल, तसतसें आपलें अंतःकरण शुद्ध होत जातें आणि नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त अशा ज्ञानाची जिज्ञासा उत्पन्न होते. ही जिज्ञासा झाली म्हणजे गुरु भेटतो, वेदांत विषयाचें श्रवण, मनन इत्यादि साधनें साध्य होतात, श्रद्धा दृढ होत जाते आणि सद्गुरूचा अनुग्रह होऊन 'महावाक्या' चा उपदेश होतो. शेवटीं मनन व निदिध्यास यांच्या साहाय्यानें साक्षात्कार होऊन जीव मुक्त होतो. असा हा तात्त्विक ज्ञानाविज्ञानाचा क्रम-मार्ग आहे. तेव्हां व्यावहारिक पद्धतीनें ह्या मार्गाची प्रसिद्धि सर्व जगभर करावी एतदर्थ श्रीगीताशास्त्राचा अवतार आहे व त्या शास्त्रांतील दुसरा अध्याय म्हणजे सर्व व्याख्यानाचें अमृतरूपी सार होय. इतर अध्यायांत अनेक तात्त्विक विषयांचा विस्तरतः विचार करून हाच मोक्षमार्ग सिद्ध केला आहे.

असो; तिसऱ्या व चवथ्या अध्यायांचा प्रवेश 'योगस्थः कुरु कर्माणि' या दुसऱ्या अध्यायांतील श्लोकानें झाला आहे. प्रत्यक्ष तिसऱ्या अध्यायांत अनेक प्रश्न उपस्थित करून त्यांचा निर्णय भगवंतांनीं केला आहे. या प्रश्नांचा जागजागीं विचार केला आहेच, तथापि सर्व प्रश्नांची व त्यांच्या भगवन्निर्मित निर्णयांची एकतानता व्हावी एतदर्थ हा उपसंहार लिहीत आहें. आतां पहिला प्रश्न असा आहेः कीं, 'मुक्ति मिळविण्याचे

## मार्ग दोन कां एक ?

कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असे दोन निरनिराळे मार्ग आहेत कीं काय ? कर्म जर ज्ञानापेक्षां कमी श्रेष्ठ आहे तर मुमुक्षूनें कर्म न करितां ज्ञानमार्गाचाच अवलंब केला तर मोक्ष मिळेल कीं नाहीं ?' हे दोन प्रश्न केवळ अर्जुनानेंच काढले आहेत, असें नाहीं. नित्य व निरामय ज्ञानासह आपल्यास सुख मिळावें अशी इच्छा धारण करणाऱ्या प्रत्येक मनुष्यास हे प्रश्न उत्पन्न होतात. आणि खऱ्या मार्गाचें ज्ञान नसल्यामुळें भिन्न लोक भिन्नभिन्न अशीं उत्तरें देतातः (१) जे कर्मठ आहेत, कर्म केलें तरच नित्यसुख मिळेल नाहींतर मिळणार नाहीं, असा ज्यांचा समज आहे, ते लोक कर्ममार्गच श्रेष्ठ आहे असें ठरवून कर्म करण्याला सुरुवात करितात; व कर्म सुखदायक नाहीं असें म्हणणाऱ्या व कर्मबद्धक आहे असें प्रतिपादणाऱ्या लोकांची निंदा व त्यांचा छल हे कर्मठ लोक करितात. (२) जे आपल्यास ज्ञानी म्हणवून घेतात ते लोक निष्काम कर्मापासून होणाऱ्या कर्मविमोचक फलाचा म्हणजे चित्तशुद्धीचा विचार न करितां कर्म हें बद्धकच आहे अशी मनाची समजूत करून घेऊन कर्माचा तिरस्कार करितात;

व जे कोणी कर्मठ असतील त्यांची निंदा अगर कारणपरत्वें त्यांचा छलही करि-तात. एवंच दोघांमध्येंही अज्ञान जिवंत असतें. भगवंतांनीं या प्रश्नांस तिसऱ्या श्लोकांत उत्तर देऊन असें सुचविलें कीं, वासना व अहंकार कायम आहेत तोंपर्यंत मनुष्यानें कर्मच केलें पाहिजे आणि ह्या द्वयीचा नाश झाला म्हणजे ज्ञाननिष्ठेचा अवलंब केला पाहिजे. एवंच मार्ग दोन नाहींत. एकच मार्ग आहे पण त्याचे मजलं मात्र दोन आहेत. ह्मणून अधिकाराप्रमाणें ज्यानें त्यानें आपला मजल, मिळवून घ्यावा. ' वासना व अहंकार जिवंत असतील तर कर्म कर, नसतील तर वेदांतप्रणीत ज्ञानमार्गानें जा. कर्मानें तुझें अंतःकरण निर्मळ होईल व ज्ञानविज्ञानानें तुला ब्रह्म व आत्मा यांच्या एकत्वाचा साक्षात्कार होईल. सारांश, अज्ञानी मुमुक्षूसाठीं कर्म विहित केलें आहे. गीतामार्गानें कर्म केलें ह्मणजे चित्तशुद्धि होते. चित्तशुद्धि अवश्य हवी. कारण ही ज्ञानाची पायरी आहे; निष्काम कर्मानें चित्तशुद्धि झाल्याशिवाय ज्ञानाधिकार येत नाहीं व ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं. ' असा • तिसऱ्या श्लोकाचा मथितार्थ आहे.

पुढे भगवान् कर्ममहात्म्याकडे वळतात आणि स्पष्टपणानें सांगतात कीं, शरीर व आत्मा यांचें साहचर्य आहे असें जोंपर्यंत भान आहे तोंपर्यंत कर्मसंन्यास होणें अशक्य व असंभवनीय आहे. मनुष्य कोणत्याही अधिकाराचा असो, ज्ञानी असो वा अज्ञानी असो, जोंपर्यंत त्याची भेदबुद्धि कायम आहे, तोंपर्यंत त्यानें केवढीही खटपट केली तरी त्याच्या हातून कर्मत्याग होणें शक्य नाहीं. एथें कर्म ह्मणजे आपल्या हातून सहज रीतीनें अथवा बुद्धिपुरःसर होणाऱ्या चलनवलनादि सर्व स्थूलसूक्ष्म शारीरिक व मानसिक क्रिया असा अर्थ घ्यावयाचा. केवळ श्रुतिस्मृत्यादिकांनीं सांगितलेलें कर्म इतकाच अर्थ ' कर्म ' शब्दाचा करावयाचा नाहीं. सारांश, जावत्काल शरीर व आत्मा यांचें साहचर्य आहे व ह्या साहचर्याचें भान आहे, तावत्कालपर्यंत यच्चयावत् सर्व शारीरिक व मानसिक कृत्यांचा (कर्मांचा) सहज किंवा बुद्धिपुरःसर त्याग करणें अत्यंत असंभवनीय आहे. तेव्हां '**मी सर्व कर्मांचा त्याग केला**' असें म्हणणारा पुरुष भोंदु, अज्ञानी, आग्रही किंवा अभिमानी असला पाहिजे. ज्ञानी पुरुष कर्मांचा त्याग करितात हें खरें; पण त्याचा अर्थ असा कीं, वासना व अहंकार यांनीं युक्त जीं कर्में त्यांचा ते त्याग करितात आणि हा त्याग करि-तांना, ' आपण त्याग केला. ' असेंही भान त्यांस नसतें. अर्थातच हीं श्रेष्ठ कोटीं-तील मानवरत्नें होत. सामान्य मनुष्याच्या हातून हा वरील अभिमानत्याग प्रथमपासून होणें शक्य नाहीं. ह्यासाठीं निष्कामकर्म करण्याची संवय लावून घेऊन क्रमाक्रमानें मार्ग-क्रमण केलें पाहिजे. तसें न केल्यास अनर्थ होण्याचा संभव आहे. कर्मांचा उद्देश शरीररक्षण, समाजरक्षण व मनःशुद्धि हा आहे. शरीर हें सर्व मानसिकशक्तींचें राहण्याचें ठिकाण आहे. शरीरच नसेल तर ह्या लोकीं तरी निदान मनःशुद्धि करण्यास दुसरें साधन नाहीं. वाचकहो ! जगण्यासाठीं किंवा उपभोग घेण्यासाठीं मात्र शरीराची योजना नाहीं.

तर आपण येथें व अन्यत्र, या जन्मीं व मागील जन्मपरंपरेंत केलेलीं आणि आपल्या पूर्वजांच्या आनुवंशिक संस्कारांनीं आपल्यामध्यें संक्रमित झालेलीं जीं कर्में असतात, व ज्या कर्मांमुळें अथवा त्यांच्या विपाकामुळें आपल्यास जन्म पावला असतो, त्या कर्मांचा व कर्मविपाकाचा क्षय उपभोगाशिवाय होत नाहीं. अतएव ह्मणजे उपभोगानें, कर्मक्षयानें, कर्मनाश होण्यासाठीं शरीराची प्राप्ति होत असते; ज्ञानसंपादनानें अभिमान व वासना ह्यांचा निरास झाला नाहीं, तावत्काल चित्तशुद्धि होत नाही. वासना व अहंता यांचा निरास होऊन चित्तशुद्धि व्हावी ह्मणून शरीररक्षण करावयाचें व त्यायोगें शरीरांत राहणाऱ्या ज्या ज्या शक्ति आहेत, त्यांची विहितकर्मांनी शुद्धि करून सर्वांचा ओघ निष्काम-कर्म, देहशुद्धि, समाजशुद्धि, उपासना आणि शेवटीं ज्ञानसंपादन होईल व पुढें विज्ञान-पूर्वक आत्मसाक्षात्कार लाभेल, असा वळवावयाचा आहे. ह्यासाठीं कर्मसंतति-निष्काम व निरभिमान कर्मसंतति-अवश्य आहे. सारांश, ज्ञानसंपादन होऊन आत्मारामाचा साक्षात्कार होईपर्यंत कर्म करणें अवश्य आहे. हे कर्म मध्येंच टाकून दिलें तर 'इदं च नास्ति न परं च लभ्यते ॥ ( हाही लोक नाहीं व परलोकही नाहीं ! ) अशी स्थिति होते. तेव्हां मन निर्मळ होण्यासाठींच व तें मन राहण्याचें ठिकाण जें शरीर त्याचें रक्षण करण्यासाठीं आणि **सात्त्विक गुण प्रगट करण्याचें साधन जे समाजबंध** ते शुद्ध करण्यासाठीं अज्ञानी मुमुक्षूनें कर्म केलेंच **पाहिजे.**

## कर्म व त्याचे प्रकार

कर्म केलेंच पाहिजे असा जर गीताशास्त्राचा उपदेश असेल, जन्ममरणांतून मुक्त होऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें विहितकर्म केलेंच पाहिजे असा जर कटाक्ष असेल, तर तें कर्म ह्मणजे काय व त्याचे प्रकार किती आहेत अशा तऱ्हेचे प्रश्न अर्जुन विचारील असें मनांत आणून श्रीकृष्ण कर्माचें स्वरूप कशा प्रकारचें असतें व त्याचें प्रकार किती हें ह्या अध्यायांत सांगून पुढील अध्यायांत कर्माचें लक्षण देतात; तिकडे आपण आतां क्रमाक्रमानें वळूं. कर्म हें बद्धक आहे, कर्मच जीवास संसारांत घालितें, असा सर्व शास्त्राचा सिद्धांत असतांही भगवंतांना कर्म करावयास सांगितलें हें आहे तरी काय, अशी शंका जिज्ञासूंस येईल, तेव्हां तिचें निरसन करण्यासाठीं भगवान् ह्मणतात. (१) जोंपर्यंत प्रकृतिपुरुषाची संगति आहे, तोंपर्यंत जीवाच्या हातून कर्म व्हावयाचेंच आहे. तेव्हां, हें कर्म आपल्या शरीररक्षणाचें उपयोगीं पडेल, बद्धक व्हावयाचें नाहीं, असा परिणाम घडवून आणण्यासाठीं मुमुक्षूनें मनोनिग्रह करण्यास आरंभ करावा. **मीच** एकटा कर्ता,' व '**फलही माझेंच,**' अशी जी मनाची वृत्ति असते तिचें दमन करण्यास आरंभ करावा. उपभोग व अभिमान वाढविणारीं कर्में करण्यास लागणें अज्ञानमूलक आहे हें त्यानें विसरूं नये. ह्या असल्या कर्मांनेंच देहास व जीवास यातना होतात. तेव्हां साधकानें **विचार करून** कर्म करावें, कार्य कोणतें, अकार्य कोणतें

हें पाहून कर्म करावें; ह्मणजे सद्यःकालीं दुःखदायक परंतु परिणामीं हितावह होणारीं कर्मेंही चित्तशोधक असतात, अशीं कर्में करण्यास लागावें. (२) येथेंच **'यज्ञा'स** सुरुवात होते, यज्ञ म्हणजे वस्तुतः स्वार्थत्याग होय. या स्वार्थत्यागास आरंभ होतो तो आपल्या स्वतःस सुख देणाऱ्या कर्मांचा त्याग करून ज्यानें ज्यानें आपल्यावर उपकार केले आहेत त्यांचे उपकार फिटतील असें कर्म, कृतज्ञतादर्शक कर्म, करण्याला आरंभ होतो. हा पहिला यज्ञ होय. तसेंच, वर्तमानकालीन विकारांचें दमन करणें हा एक यज्ञ आहे. हें दमन होण्यापूर्वीची आपली कर्में पूर्णपणें बद्धक असतात. असो; पूर्वकालीं यज्ञयागादिक सत्कर्में करण्याची प्रवृत्ति असे; आधुनिककालीं सकाम उपासना किंवा लोककल्याण, वगैरे करण्याचे प्रकार आहेत. यांचा इत्यर्थ **इतकाच आहे कीं, पुढें आपलें कल्याण व्हावें एतदर्थ आपल्याजवळ सध्यां जें कांहीं आहे त्याचा त्याग करावयाचा.** या यज्ञयागादिकांनीं उपासनांनीं, व लोकोपयोगी कर्मांनीं दृश्यादृश्य देवांना आळवून त्यांनीं आपलें पुढें कल्याण करावें, आपल्यास संतति, संपत्ति व कीर्ति देऊन सर्व प्रकारचे उपभोग घेण्याचें सामर्थ्य द्यावें; हा मुख्य हेतु आहे, सारांश, यज्ञयाग व लोककल्याण, उपासना हीं कर्में सकामवृत्तीनें, विषयसुख आपल्यास व आपल्या समाजास मिळावें या लालसेनें, होत असतात; म्हणजे सकामवृत्ति आहे; पण विचारदृष्टीचा पुष्कळ प्रवेश झाला आहे, असें आहे. भविष्यकाळीं पुष्कळ वर्षेंपर्यंत सुख भोगण्यासाठीं वर्तमान सुखांचा त्याग करण्याची संवय या सकाम यज्ञादिकांनीं, व सकाम उपासनेनें लागते. ही **विचाराची** पहिली पायरी होय. हा **निवृत्तीचा** पहिला धडा होय. ज्याला ह्मणून पूर्ण निवृत्तीचें सुख घ्यावयाचें असेल त्यानें ह्या धड्याचें पारायण केलेंच पाहिजे. पुढील सुखासाठीं सद्यःसुखाचा त्याग करणें हा एक यज्ञ आहे.

### यज्ञकर्म आणि पापनाश.

दहाव्या श्लोकापासून तो सोळावे श्लोकापर्यंत परमेश्वरांनीं यज्ञाचें जनन, देवजीवांत परस्परस्नेह राखण्याचें यज्ञकर्मांचें सामर्थ्य, याज्ञिकाची आत्मोन्नति, अयाज्ञिकांचें अधःपतन, आणि अन्न आणि कर्म यांचा परंपरित संबंध, इत्यादि विषय घेऊन विश्वांतील सामर्थ्यसंचयाचें (Conservation of energy) वर्णन केलें आहे व शेवटीं या सामर्थ्यसंचयाचे जे नियम आहेत, त्यांचें पालन न करणारांची काय गति होते, त्याचेंही दिग्दर्शन केलें आहे. यज्ञ केला तरच अन्न मिळेल, कृतज्ञताबुद्धि असेल तरच सुख लागेल व परोपकारी मनोवृत्ति असेल तरच आत्मिक उन्नति होईल. असो, येथें सामर्थ्यसंचयाचा गतिस्थितिशास्त्रांतर्गत नियम आणि तन्निष्ठ दैवी व मानवी नीतिकर्तव्यें हीं स्पष्ट केलीं आहेत. विश्वचक्राचा नियमच जर परार्थद्योतक आहे, **तर व्यक्तीचें स्वार्थैकसाधु कर्म निंद्य व पुण्यविघाती होतें हें आतां स्पष्ट करून सांगावयास नकोच आहे.**

यज्ञयागांस महत्त्व आहे तें एवढयाचसाठीं आहे. केव्हां तरी यज्ञयागादिक केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आतां, ज्या लोकांस निवृत्तीचा हा पहिला 'ओनामा' शिकावा असें वाटत नाहीं, सारांश जे केवळ स्वतःच्या देहाचा मात्र अविचारी अभिमान जिवंत ठेवून तात्कालिक उपभोग घेण्यासाठीं तडफडत असतात, ते सुखलोलुप (Egoists) लोक आत्मघाती आहेत, त्यांची शरीरयात्रा व्यर्थ आहे, असें भगवंतांनी श्लोक १३ व श्लोक १६ मध्यें सांगितलें आहे. तें भगवद्वचन म्हणून तर यथार्थ आहेच, पण आपणा मानवांस जो अनुभव येतो, त्यावरूनही म्हणजे अनुभवानें हा सिद्धांत सत्य आहे असें सिद्ध होतें; म्हणजे जो मनुष्य स्वतःच्या मात्र तात्कालिक सुखासाठीं धडपड करीत असतो, तो सदैव दुःखमग्न असतो असें दिसतें. शरीररक्षण व्हावें, पुढें सुख मिळावें व आपला समाज सुखी असावा यासाठीं अज्ञानी मनुष्यानें कर्म केलेंच पाहिजे व तें कर्म दूरदृष्टीनें सुखप्रद होईल असें केलें पाहिजे, असा विषय ८ ते १६ श्लोकांत आला आहे. मोक्ष नामक गडाची वाट अत्यंत बिकट तर खरीच: पण हा किल्ला सर करावाच अशी ज्यास खरोखर इच्छा झाली असेल, त्यानें विषयसुखाची किंमत ओळखून त्यापासून पूर्णपणानें निवृत्त होण्यासाठीं' तात्कालिक सुख देणाऱ्या विषयांना व विकारांचा त्याग हलके हलके करण्यास शिकून घाटमाथ्यावर जाण्याची तयारी केली पाहिजे.

एवंच, (१) कर्मयोग संसारी लोकांतील मुमुक्षूंकरितां आहे, (२) अकर्मत्व हें संसारी-जनाला जास्त पापांत लोटणारें आहे (३) कर्म केलेंच पाहिजे, नव्हे! तें नित्यशः होतच आहे (४) नाहीं म्हणणारा लबाड आहे (५) कर्म करून फलत्यागाच्याद्वारें अकर्मी होणारा पुरुष श्रेष्ठ आहे (६) कर्म होणारच, तर शास्त्रविहित कर्म तरी करावें, तेणेंकरून अधिक संसारांत न पडतां शरीरयात्रा चालेल, आणि (७) सकाम कर्मबद्धक आहे; निष्कामकर्म, परोपकारार्थ्यर्थ अथवा प्रत्युपकारासाठीं कृतज्ञतापूर्वक केलेलें कर्म बद्धक नाहीं. इतके अमोलिक सिद्धांत ३-९ श्लोकांमध्यें आले आहेत. हें सर्व प्रकरण आमच्या मध्यकालीन निस्तेजस्वी लोकांनी विशेष काळजीपूर्वक वाचून त्याचें पठण, मनन व निदिध्यास करावा. कर्म केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आपल्या शरीराची, कुटुंबाची, जातीची इत्यादि ज्या अनेक जबाबदाऱ्या आपण अंगावर समजून अगर न समजून घेतल्या आहेत, त्या जबाबदाऱ्यांतून सुखेपणानें बाहेर निघण्यास कर्म केलेंच पाहिजे. आतां तें कर्म मात्र ईश्वरास, श्रुतास, युक्तीस व अनुभवास योग्य असें व निष्काम असेल तर ईश्वराकडे जाऊं, किंवा नसेल तर अधिक घोंटाळ्यांत आपण आपल्यास व इतर प्राण्यांस ढकलूं. पण आपण कर्म केलेंच पाहिजे. येथें आपल्यास स्वातंत्र्य नाहीं. मात्र कर्म करितांना मनोवृत्ति कोणत्या प्रकारची ठेवावयाची व कर्म कोणतें करावयाचें ह्याचें स्वातंत्र्य आहे. हें स्वार्थकर्म झालें. नवव्या श्लोकांत कृतज्ञतादर्शक कर्माचा निर्देश केला. हे यज्ञ आपण कृतज्ञताबुद्धीनें करितोंच: पण त्यांतच जर निष्काम-बुद्धि अवतीर्ण झाली, निष्कामबुद्धीच्या दैवी तैलानें जर आपलें कृतज्ञतादर्शक कर्म आपण अंतर्बाह्य माखलें, तर काय बहार होईल बरें!

येथें यासंबंधें खरा जिज्ञासु म्हणजे मुमुक्षु स्वाभाविकतःच असा प्रश्न करील कीं, "या दूरदृष्टीनें केलेल्या कर्मांत कामक्रोधादिकांचा व अहंकाराचा यथेच्छ संचार आहेच. उद्यां आपल्यास दुःख प्राप्त होऊं नये किंवा आपण हा लोक सोडून गेल्यावर पुढील लोकीं आपल्यास यमयातना होऊं नयेत, या हेतूनें केलेलीं कर्में पुढें सुख देणारीं होतात, हें कदाचित् खरें असेल; तथापि ह्यांत पुढें विषयसुख पुष्कळ मिळावें, किंवा कीर्ति व्हावी, ह्मणून आजच्या विषयसुखास रजा दिली इतकाच काय तो फरक झाला. पण विषयसुख, सुखाची वासना, व माझ्या कर्मानें सुख मिळावयाचें हा अहंकार इत्यादि कामादिकांचें बिऱ्हाड राहिलेंच; आणि 'हें गांठोडें आपल्याजवळ आहे तोंपर्यंत आत्मसुख मिळणार नाहीं' असे वेदांतग्रंथ सांगतात; तेव्हां यज्ञयागादिक करून, उपासना करून, अथवा व्यवहारामध्यें सचोटीनें वागूनही आत्मसुख मिळण्याची आशा नाहींच. अतएव हा भगवंतांचा मार्ग मोक्ष-गडाच्या किल्ल्यावर नेणारा नसावा."

## मुमुक्षूंस आवश्यक गोष्टी.

### ( १ ) विवेक.

(१) या प्रश्नाला पूर्वीच उत्तर मिळालें आहे कीं, 'सुख मिळविणें व सुखोपभोग घेणें' हीच जी अज्ञानी मनुष्याच्या मनाची सीमा होती, ती विस्तृत होण्याचा प्रसंग विचारामें उत्पन्न केला आहे. विचार म्हणजे विवेक आणि विवेक ह्मणजे वस्तुतः विषयापासून निवृत्ति होय. या निवृत्तीला एकदां आरंभ झाला व तिची गति अखंड कायम राहिली म्हणजे क्रमशः आणि योग्यकालीं पूर्ण निवृत्ति प्राप्त होते. सुखोपभोगी मनुष्य शुद्धस्वार्थी [ Egoistic ] होय. ह्या सुखैकलंपट पुरुषाच्या मनांत भावी कालाचा व इतर मनुष्यांच्या सुखाचा विचार येऊं लागला म्हणजे तो कांहींसा **स्वार्थत्याग** करण्यास शिकला असें होतें. असो; तो निवृत्तिगड चढावयास लागला असें झालें. तो विषयैकसुखलंपट आहे व यज्ञयाग, कुटुंबपोषण लौकिककार्य व उपासना ह्या सुखदृष्टीनें करितो, हें खरें; पण त्याच्या अंतःकरणांत अज्ञानाचा जो काळाकुट्ट पडदा होता, तो ज्ञानप्रकाशाच्या किरणाघातांनीं हळूहळू जीर्ण व पारदर्शक होतो. आणि जसजसा तो जास्त विचार करील तसतसा त्याचा विवेक दृढ होतो, स्वार्थत्यागबुद्धि विस्तृत होते; आणि पुढें तो आपली सकाम आणि साभिमान वृत्ति सोडून देऊन केवळ निरपेक्ष बुद्धीनें यज्ञयागादिक, लोककल्याणाची व उपासनेचीं कामें करावयास लागतो. कुटुंबाचें पोषण निर्लोभमनानें करणें, श्राद्धपक्ष, दानधर्म इत्यादि सत्कर्में केवळ कर्तव्यबुद्धीनें करणें व स्नानसंध्यादिक भगवदुपासनेचीं कर्में ब्रह्मार्पणबुद्धीनें करणें, येथपर्यंत मनाचा विकास झाला म्हणजे आमचा मुमुक्षु बराच सुसंस्कृत झाला, त्याचें चित्त पुष्कळच शुद्ध झालें, असें म्हणावयाचें. असो; तेव्हां सुखलंपट मनुष्यही विचारवश झाला म्हणजे परार्थ साध्य करा-

बयांस लागतो ही प्रगति लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. आतां ज्याला खरोखर निष्कामत्व साधावयाचें आहे, त्यानें कर्तृत्व व भोक्तृत्व हीं दोन्ही परमेश्वरास अर्पण करून आपल्या मनामध्यें दया, औदार्य, न्यायबुद्धि इत्यादि जे सद्विकार आहेत त्यांचा परिपोष करण्यामध्यें व येणेंकरून समाजास संघटित करण्याकडे आपल्या कर्माचें पर्यवसान होईल, अशी भगवंताची प्रार्थना करीत असावें. ईश्वराची लीला आपल्या सारख्या प्राकृत मनुष्यास कळावयाची नाहीं; आपला धर्म शुद्ध मनानें कर्म करण्याचा मात्र आहे; हें ध्यानांत ठेवून निष्कामवृत्ति बाणूं लागली म्हणजे पुष्कळच कार्यभाग झाला. येथें खरी द्वैतसिद्धि, सेव्यसेवकपणा व लोककल्याण हीं साध्य होतील. **पण आपल्यास येथें थांबावयाचें नाहीं.** याच्यापलीकडे जावयाचें आहे कारण द्वैतसिद्धांत निर्मळ सुख नाहीं. असो; सुखलंपटता सुख देत नाहीं, तसेंच सकाम यज्ञयाग अगर सकाम उपासना व सकाम लोककल्याण ह्यानेंही पुरुषार्थ साध्य होत नाहीं, म्हणजे निर्मळ आनंद मिळत नाहीं, म्हणून पुढचें मार्गक्रमण आहे. यज्ञमार्गाचें खरें रहस्य सांगून नंतर भगवान् अद्वैतज्ञानाची दिशा दाखवितांना लोकसंग्रहाचा विस्तार करीत आहेत तिकडे आपण आपला मोर्चा वळवूं या.

## ( २ ) लोकसंग्रह.

( २ ) १७ ते २६ श्लोकांमध्यें लोकसंग्राहकाची वृत्ति कशी असावी, लोकसंग्रह करून पुरुषार्थ सिद्ध करण्याचा मार्ग कोणता, लोकसंग्रह म्हणजे काय, व तो कां करावा व कसा करावा ह्या विषयांची चर्चा भगवंतांनीं केली आहे. लोकसंग्रह म्हणजे लोकांची उन्नति होऊन त्यांचा पुरुषार्थ सिद्ध होईल अशा तऱ्हेचें वर्तन आपण करणें व त्यांकडून करविणें हा होय. लोकसंग्रहाचें इंग्रजींत Altruism असें भाषांतर होऊं शकेल. ज्या समाजांत आपण उत्पन्न झालों व आपल्या सद्वर्तनानें अथवा दुर्वर्तनानें ज्या समाजाचें बरें वाईट होणार, त्या आपल्याशीं निगडित झालेल्या समाजाच्या उन्नतीप्रीत्यर्थ निष्कामत्वानें आपण अहर्निश प्रयत्न केल्यास ईशकृपेनें तो सिद्धीस जाईल; अथवा तो भगवदिच्छेनुसार सिद्धीस जावो न जावो, आपण आपलें श्रुतिप्रणीत कर्तव्य केलेंसें होईल, यांत मला तरी शंका वाटत नाहीं. लोकसंग्रह करणें हें प्रत्येक समंजस जीवाचें कर्तव्य आहे कीं नाहीं, हा प्रश्न अगदीं स्वतंत्र आहे. तथापि प्रत्येक मुमुक्षूच्या हातून लोकसंग्रहाचीं कामें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें घडत असतात, सहज रीतीनें व बुद्धिपूर्वक तो महापुरुष लोकांच्या उन्नतीला सहायभूत होत असतो, यांत मला तरी स्वतः शंका नाहीं. योगमार्ग व थिआसफी हेंच प्रतिपादन करीत आहेत. भगवंतांनींही आपला अभिप्राय २२।२३ व २४ श्लोकांत स्पष्टपणें दिला आहे कीं, लोकसंग्रह करणें हें ज्ञानी पुरुषाचें कर्तव्य आहे. आधुनिक वेदांती कांहीं म्हणोत, **हाब्स** अगर **मँडिव्हेली** नामक तत्त्ववेत्त्यांप्रमाणें **'आपल्यास सुख होतें म्हणून मीं दुसऱ्यास सुखी केलें पाहिजे'** असा जरी त्यांचा अभिप्राय असला, तथापि तो एका दृष्टीनें मान्य असून

लोकसंग्रहाचा पक्ष या रीतीनेंही सुदृढ होतो. लोकसंग्रह करून आत्मसुख वृद्धिंगत करा किंवा विषयसुखाचा त्याग करून लोकसंग्रह करा, फलदृष्टीनें एकवाक्यताच आहे. तात्त्विकदृष्ट्या स्वार्थैकदृष्टि गर्हणीय आहे. पण हा विचार आतां नको.

## (३) आत्मनिष्ठा.

(३) आत्मसुख हें सर्व वैशेपिक अथवा विषयनिष्ठ सुखापेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे असा ज्याचा निश्चय झाला, त्याला उपभोगदृष्टीनें कोणतेंही कर्म करण्याचें उरत नाहीं. फलाची वांच्छा होऊन कर्म केलें असतां शुद्ध सुखाचा अनुभव येत नाहीं असें विज्ञान ज्या मोक्षार्थी पुरुषास झालें, त्याचीं सर्व कर्में निर्लेपवृत्तीनें होत असतात. आपलें कर्तव्य आहे ह्मणून जीं जीं कर्में आपण करीत असतों, त्या त्या कर्माचे वेळीं 'हें केलें तर आपल्या स्वतःस सुख होईल, केलें नाहीं तर आपल्यास दुःख होईल' असा विचारच कर्तव्यतत्पर पुरुषाच्या मनांत येत नाहीं. स्पेन्सर साहेब आपल्या 'मानसिक तत्त्वग्रंथांत' म्हणतात कीं, 'नित्य अभ्यासानें कर्तव्यतत्परता उत्पन्न झाली म्हणजे त्या त्या कर्तव्यासंबंधानें सुखदुःखाचा प्रश्न लुप्तच होतो.' भगवंतांचा हाच अभिप्राय १७ व १८ श्लोकांत प्रकट होऊन १८ वे श्लोकांत अशी आज्ञा अवतीर्ण झाली आहे कीं, ज्या कोणाला श्रेष्ठ पुरुषार्थ साध्य करून घ्यावयाचा असेल त्यानें प्रथमतः (विज्ञान अवगत होण्याच्या पूर्वी) निर्लेप मनानें आपलें कर्तव्य करण्यास शिकलें पाहिजे व फलसिद्धीबरोबर उत्पन्न होणारीं जीं सुखदुःखें त्यांचा विचार दृढाभ्यासानें नष्ट करून टाकिला पाहिजे. कर्म करूनही चित्तशुद्धि प्राप्त करून घेतलेले जनकादि राजे ज्ञानमार्गानें मुक्त झाले असें सांगून भगवान् म्हणतात कीं, निर्लेप मनानें विहित कर्म करण्यास आरंभ करावा. लोकसंग्रहाचे कर्मही आपण करावें. हें भगवंताचें ह्मणणें अर्थातच युक्तिशुद्ध असलेंच पाहिजे. कारण जीवास जर मुक्त व्हावयाचें आहे, तर त्याचें मन, त्याचे विचार, त्याचे आचार इत्यादि त्याच्या अंतःकरणाचे सर्व भाग व प्रभाग शुद्ध झालेच पाहिजेत. सत्त्व, प्रेम, दया, औदार्य, परोपकारित्व, न्याय्यता, ब्रह्मचर्य, इत्यादि सद्गुणांचा पूर्ण अवतार होऊन आपला अभिमान व आपली वासना, सारांश आपलेपणा यांचा संपूर्ण त्याग जर व्हावयाचा असेल, रागद्वेषादिकांचा समूळ उच्छेद व्हावयास पाहिजे असेल, ज्ञानानंदाचा अखंड व अप्रतिहत असा उद्गम व प्रवाह सुरू व्हावयाचा हें इष्ट असेल, तात्पर्य–आपले सद्विकार विकसित होऊन शेवटीं त्यांस निर्विकाराचें स्वरूप जर यावयाचें असेल, तर मुमुक्षु पुरुषानें समाजांत राहून समाजस्थ स्त्रीपुरुषांची जेणेंकरून उन्नति होईल, जेणेंकरून त्यांस लीलेनें जिवंत राहण्याची साधनें प्राप्त होऊन आपल्याप्रमाणेंच निवृत्तिमार्गाची भक्ति त्यामध्यें उत्पन्न होईल, जेणेंकरून त्यांचेही पुरुषार्थ सिद्ध होतील, अशा प्रकारचें सात्त्विक कर्म ज्ञात्यानें अनासक्त मनानें केलेंच पाहिजे. समजा त्यानें नाहीं केलें व "माझा समाजाशीं कांहीं संबंध

नाहीं, 'काय रानांत आटल्या नद्या? काय बसाया न मिळती गुहा? ।' असा विचार करून मी गिरिकंदरांत जाऊन बसेन, आणि योगमार्गानें मी स्वतः मुक्त होऊन जाईन". असें मोक्षार्थी पुरुष म्हणेल तर अनर्थ होतील. भगवान् २४ वे श्लोकांत म्हणतात कीं, "परमेश्वरानें व अनासक्त ज्ञानी मुमुक्षूंनीं व इतर श्रेष्ठ पुरुषांनीं जर कर्म केलें नाहीं, तर जगाचा संहारकालच प्राप्त झाला असं म्हणावें! होय! सर्वत्र उच्चनीच लोकांचें व जीवांचें संमिश्रण होऊन विश्वचक्राचीं उन्नतिप्रद परिभ्रमणें स्तब्ध होतील व सर्व विश्वास पुनः तमःप्रदेशांत शिरावें लागेल!" आणि हें अक्षरशः खरें आहे. समाजांतच उत्पन्न झालेले ज्ञानश्रेष्ठ व वर्तनश्रेष्ठ पुरुष जर समाजाच्या बाहेर निघून गेले, कित्ता घेण्यासारखें वर्तन जर समाजांत कोणाचेंच राहिलें नाहीं, तर समाज निःसत्व होऊन तात्काल मृत होईल यांत शंका कसली? दंतभग्न झालेला सर्प जसा सत्वशून्य होतो, हस्तपाद भग्न झालेला व मस्तकशून्य झालेला पुरुष जिवंत असलाच कदाचित्, तरी जसा मृतप्राय होतो, तद्वतच श्रेष्ठशून्य समाजाची स्थिति होय. या दृष्टीनें ज्ञानी पुरुषांस समाजाचा त्याग विज्ञानकालापर्यंत करितां येत नाहीं. तसेंच त्यांची स्वतःची पूर्णता होण्यास म्हणजे स्वार्थत्याग सिद्ध होण्यासाठीं ज्ञानी पुरुषास समाजांत रहावें लागतें. 'विकारहेतौ सति विक्रियन्ते। येषां न चेतांसि त एव धीराः॥' (विकार उत्पन्न करणारी परिस्थिति कायम असतांही ज्यांच्या चित्ताचा भंग होत नाहीं तेच खरे धीर होत.) या श्लोकार्धाचा अर्थ तरी हाच आहे. सारांश, स्वतःस पूर्ण करावयाचें असेल व जगांतील ज्या पूर्वपिढ्यांचे आपल्यावर अनंत उपकार आहेत, त्यांचें जर उतराई व्हावयाचें असेल, तर समाजांत राहून निर्लेप मनानें आपण सामाजिक इहपर कल्याणाचा प्रयत्न केलाच पाहिजे. मुक्तीच्या मार्गाला नेणारी जी चित्तशुद्धि तिचें पूर्णत्व लोकसंग्रहाशिवाय होणें नाहीं. प्रत्यक्ष पुरुषोत्तम जर कर्म करितात, तर ज्ञानस्थितींतील पुरुषास कर्म करण्यास लाज वाटावी, व मी कर्म करणारच नाहीं, असा हट्ट त्यानें कां धरावा हें समजत नाहीं. हें आश्चर्य होय! असो; तेव्हां कर्मानें चित्तशुद्धता प्राप्त करून घेणाऱ्या मुमुक्षूनें कर्म केलें पाहिजे हें व्यावहारिक व धार्मिकदृष्टीनें सिद्ध होतें; तसेंच वेदांत व भगवद्गीता यांच्या साग्र दृष्टीनें व आधुनिक अनुभवशास्त्रदृष्टीनें असें सिद्ध होतें कीं, जन्मास आलेल्या जीवांचा प्रवास निवृत्तिमार्गानें चालला असतां प्रत्येक जीवानें इतर जीवांचा उद्धार करण्याचा प्रयत्न निष्कामत्वानें केला तरच त्याची चित्तशुद्धि पूर्ण होऊन तो मोक्षपदवीस योग्य होतो. सारांश, लोकसंग्राहक पुरुष भगवंताचा साह्यकारी म्हणून भगवदंशच होय. याप्रमाणें लोकसंग्राहकांची बुद्धि निरपेक्ष असावी, लोकसंग्रह म्हणजे अधिकारानुरूप प्रत्येक मनुष्यास प्रवृत्तिमार्गामधून निवृत्तिमार्गाकडे येणें हा होय; व हा लोकसंग्रह स्वतःच्या शुद्धीसाठीं व कृतज्ञताबुद्धीची सांगता करण्याप्रीत्यर्थ व निष्कामत्वाप्रीत्यर्थ आचारिला पाहिजे इत्यादि विषयांचें तात्विक विवेचन भगवन्मतानुसार झालें.

## (४) लोकसंग्रहाचा मार्ग.

(४) आतां लोकसंग्रहाचा मार्ग कोणता, व लोकसंग्रह कसा करावा याविषयीं स्फुट विवेचन करून हा विषय संपवूं. ज्याला ज्याला म्हणून लोकसंग्रह करण्याची इच्छा आहे त्या प्रत्येकानें इतर लोकांप्रमाणेच कर्म करावें. पण इतर लोक जसे सुखदुःखांत आसक्त झालेले असतात, जसे ते अभिमानी असतात, तसला प्रकार मात्र या लोकसंग्रही पुरुषानें आपल्या आचरणांत येऊं देऊं नये. म्हणजे लोकांस मूर्तिपूजा आवडत असेल तर आपणही मूर्तिपूजा करावी. मात्र मूर्तिपूजेसंबंधें सामान्य लोकांच्या मनांत ज्या वेडगळ व असंबद्ध कल्पना असतात, त्या कल्पनांचा विटाळही आपणा स्वतःस होऊं देऊं नये. मूर्तीच्या साहाय्या-शिवाय परमेश्वराचें स्वरूप ज्या ज्ञानी पुरुषाच्या ध्यानांत येऊन ते तेथें सतत राहूं लागलें व त्या ज्ञानी पुरुषाच्या आचरणावर परमेश्वरी ध्यानाचा संस्कार होऊं लागला म्हणजे, या ज्ञानी पुरुषास मूर्तिपूजेची आवश्यकता राहत नाहीं. हें खरें आहे; तथापि हा ज्ञानी पुरुष समाजांत राहत असेल तर व समाजाचें लक्ष्य या ज्ञानी पुरुषाच्या आचरणाकडे असेल तर या पुरुषानें मूर्तिपूजेचा त्याग करितां उपयोगी नाहीं. कारण यानें त्याग केलेला पाहिला ह्मणजे ज्यास मूर्तित्यागाचा अधिकार नाहीं, असे अज्ञानी लोक मूर्तीचा त्याग करितात आणि अमूर्तीचें ध्यान करण्याचा अभ्यास नसले कारणानें 'तेल गेलें, तूप गेलें आणि धुपाटणेंही गेलें' या न्यायानें बिचारे उभयविभ्रष्ट होतात. ह्या अज्ञानी लोकांनीं कृतार्थ व्हावें अशी ज्ञानी पुरुषानें इच्छा धारण केली ह्मणजे त्यांच्या उद्धारार्थ या ज्ञानी पुरुषास मूर्तिपूजा आदरणीय होते. मात्र मूर्तिपूजेविषयीं वेडगळ कल्पना मात्र तो धारण करीत नाहीं व करूं नये. त्यानें शुद्ध चित्त होऊन पूजा करावी. ह्याचप्रमाणें मूर्तिपूजेचें खरें रहस्य काय आहे तें प्राकृत पुरुषांस अधिकारानुरूप समजून सांगून त्याचें पारमार्थिक ज्ञान वृद्धिंगत होईल व त्याचें आचरण शुद्ध होईल इकडे दृष्टि ठेवावी. अशीच पद्धति प्रत्येक सुधारणा करितांना लक्षांत ठेवावी. खालच्या स्थितींतील माणसें वर आणण्यास ज्ञानी पुरुषानें अज्ञान्यांसारखें वागून त्यास वर आणिलें पाहिजे. समाजस्थितीमध्यें कोणत्याही प्रकारची भयंकर व नाशकारी क्रांति न करितां व आपल्या नैसर्गिक स्वातंत्र्याचा टेंभा न मिरविता समाजास सुधारण्याचा ह्मणजे निवृत्तिकडे वळविण्याचा हा मार्ग आमचे सामाजिक, राजकीय व धार्मिक सुधारक अनुसरतील काय ?

समाजामध्यें कांहीं जोम असेल तर अत्यंत घाणेरडया चाली समाजामध्यें अत्यंत रूढ कधींही व्हावयाच्या नाहींत हें जितकें खरें आहे, तितकेंच समाज जसजसा पुष्ट होत जातो, तसतशा अत्यंत प्राचीन व्यावहारिक समजुती व चालीरीति निःसत्व होऊन गळण्याच्या बेताला येतात आणि म्हणूनच त्या त्याज्य होत असतात. पण अखंड सत्यावर जे नीति-सिद्धांत बसविलेले असतात, ते अभंगत्वानें राहतात व सर्वदां अनुसरावे लागतात, हेंही खरें आहे. तेव्हां उत्कृष्ट मार्ग ह्मणजे लोकांमध्यें जें जें अत्यंत प्रिय असेल त्या त्या प्रिय

वस्तूंचें खरें रहस्य सद्बुद्धीने इतरांस समजून देऊन त्यांच्या भोंवतालीं जी घाण सांचली असेल, ती काढून टाकावयाची, हा होय. हा उत्तम मार्ग आहे. या मार्गानें जे गेले त्यांचेच हेतु परिपूर्ण झाले आहेत. असें न करितां ज्यांनीं सामाजिक, धार्मिक अगर राजकीय मतांवर सर्व बाजूंनीं कुऱ्हाडी घालून समाज सुधारण्याचा प्रयत्न केला ते जसे फसले आहेत, तसेंच सर्वस्वीं लोकच्छंदानुवर्तन करून मात्र समाज सुदृढ होईल असें ज्या ज्या पुरुषांस वाटलें आहे, तेही प्रगतिविरोधक म्हणून समाजघातक होत, असें ठरलें आहे. भगवंतांनीं 'असक्त' हें जें पद २५ व्या श्लोकांच्या दुसऱ्या ओळींत योजिलें आहे, त्यावरूनच सुधारक कसे असावेत एतद्विषयीं त्यांचा अभिप्राय प्रकट होतो. समाजांत घेण्यासारखें कांहीं नाहीं असें ज्याला वाटतें तो सुधारक जसा कुचकामाचा, तसेंच समाजांत जें आहे तें सर्वच चांगलें आहे असें म्हणणारा संरक्षकही निरुपयोगी होय. हा भगवंताचा अभिप्राय पूर्णपणें अवगत होत नाहीं म्हणून वितंडवाद उत्पन्न होतात. असो; भगवान् २६ व्या श्लोकांत पुनः म्हणतातः कर्मामध्यें मात्र सक्त झालेल्या लोकांच्या मनांत कर्माविषयीं, कर्मरहस्यांविषयीं अथवा पुरुषार्थाविषयीं अश्रद्धा उत्पन्न होईल असें कोणतेंही कृत्य (अपकृत्यच तें!) लोकसंग्राहकानें करितां उपयोगाचें नाहीं. आपलें आचरण शुद्ध, सात्त्विक व पवित्र ठेऊन इतर लोकही भक्तिपूर्वक कर्म करितील व शेवटीं नैष्कर्म्याच्या स्थितीला हळूहळू येतील असेंही आपलें आचरण ठेविलें पाहिजे. लोकांची श्रद्धा उडेल असें कर्म कधींही करितां उपयोगी नाहीं. यांत लोकांची हानि होते इतकेंच नाहीं तर आपली स्वतःचीही हानि होत असते. शुद्ध निराकार परमेश्वराचें आराधन करावें असें **सेंट पाल, सेंट आगस्टाईन** या पुरुषांनीं जोरानें प्रतिपादन केलें खरें, पण लोकांच्या मनाची तितकी तयारी झाली नव्हती म्हणून दहाव्या, अकराव्या व बाराव्या शतकांत **खिस्तमूर्तीसाठीं, खिस्तभूमिसाठीं, खिस्तक्रीडास्थानासाठीं,** लाखों लोकांस आपले प्राण बळी द्यावे अशी स्फूर्ति झाली! **मूर्तिभंजक मुसलमानांनीं ताबुताची संस्था निर्माण केली, आचार्यांचे** अनुयायी म्हणविणाऱ्या **अद्वैत्यांनीं कर्ममार्गाचा पुनः प्रसार केला,** वगैरे, उदाहरणें काय सिद्ध करितात बरें? वर जाण्याची लोकांची अगदींच तयारी नसेल तर सुधारकांच्या हेतूच्या उलट अज्ञानी लोकमताचें वर्चस्व स्थापन होऊन समाजाला प्रतिगतीचें वळण लागतें म्हणजे समाज मागें येतो हेंच सिद्ध होतेंना? शिवाय; वस्तुतः पाहिलें असतां जातीभेद ब्रह्माचे ठिकाणीं किंवा परमेश्वराचे येथें नाहीं, निदान अंतिमसाध्याच्या स्थितींत राहणार नाहीं हे सर्वथा खरें आहे. ह्याचप्रमाणें जातीभेदाची तीव्रता जितकी कमी करितां येईल, तितकी सात्त्विक व प्रेमळ आचार-विचार निर्माण व प्रसृत करून सर्वत्र अमलांत आणावी हेंही खरें आहे. तथापि 'जातभेद चांगला नव्हे, वेदविहित नव्हे, असें प्रतिपादन करणारे वेदांती व आधुनिकांतील कांहीं धर्मशून्य सुधारक यांच्याजवळ जरी यक्षिणीची कांडी दिली, तथापि ब्राह्मणाचें शिरस्त्र असलेलें सात्त्विकत्व अतिशूद्रामध्यें एका क्षणांत कधीं तरी त्याच्यानें संचारवेल काय? तसेंच ज्यांचें आचरण, ज्यांचे विचार व ज्यांची वाणी

पिढ्यानुपिढ्या शुद्ध होत चालली आहे, अशा एखाद्या लिंगाईत अथवा जैन जातीस खालीं दडपण्याचा प्रयत्न हट्टानें आमच्या भाविक श्रीमत्तांनी कितीही केला तरी ती जाति दडपून खालीं राहील काय? एवंच तात्पर्य असें आहे कीं, लोकांची खरी सुधारणा व्हावी हें इष्ट असेल व त्या योगें आपला व त्यांचा पुरुषार्थ साधणें हें अगत्याचें वाटत असेल तर, लोकांच्या श्रद्धेमध्यें बिघाड न करितां प्रथमतः त्यांचें आचरण शुद्ध होईल, नंतर त्यांची वाणी शुद्ध होईल आणि शेवटीं विचार व श्रद्धा शुद्ध होतील असा, किंवा प्रथम विचार शुद्ध करून नंतर इतर गोष्टी शुद्ध होतील असा कोणता तरी मार्ग **अलिप्त म्हणजे निस्पृहबुद्धीनें** स्वीकारून आपलें जीवमान आहे तोंपर्यंत किंवा आपल्यास साक्षात्कार होईपर्यंत प्रत्येक समंजस पुरुषानें लोकसंग्रहाचा यथाशक्ति प्रयत्न करणें हें त्याचें कर्तव्य आहे.

## (५) अहंकार.

(५) परंतु सामान्यतः स्वतःचा अथवा स्वेतरांचा पुरुषार्थ सिद्ध करीत असतां कर्मठांच्या हातून एक चुकी होत असते. ती ही कीं, 'अमुक गोष्ट **मी** करितों' असा या कर्त्यास सामान्यत्वेंकरून अभिमान असतो. हा अभिमान वृथा आहे हें पुढें १८ व्या अध्यायांत स्पष्ट होईलच. केवळ दिग्दर्शनासाठीं येथें इतकेंच सांगावयाचें कीं, निसर्गानें अथवा इतर कारणांनीं उत्पन्न झालेल्या गुण-कर्मांच्या साहाय्यानें मात्र आपल्यास कार्य सिद्ध करितां येत असतें. हें न समजतां 'केवळ **मी** कार्य करितों' हा अभिमान किंवा 'याचें **फल मला मिळालें पाहिजे**' ही वासना धरून जे पुरुष कर्म करितात, ते फसतात. निस्पृहीपणानें काम केलें तर तें कर्त्यास बद्धक होत नाहीं. हें तत्त्व ध्यानांत नसतें म्हणून आपण संसारसागराच्या तापत्रयलहरींत गटंकळ्या खात हेलकावले जात आहों. खासगत काम असो, वा सार्वजनिक असो, निस्पृहीपणानें, **कर्तव्य म्हणून मात्र,** कर्तव्य केलें पाहिजे, **लांगफेलो** नांवाचा एक कवि ह्मणतोः—

Let us then be up and doing,
With a heart for any fate;
Still achieving, still pursuing
Learn to labour and to wait.

('आळस वगैरे शत्रूंचा पराभव करून आपलें कर्तव्य आपण बजावूं चला! फलाविषयीं फिकीर करणें आपलें ब्रीद नाहीं, उद्योग करूं या, काय व्हावयाचें असेल तें होईल. आपण सर्वदां उद्योगी असून काम करूं व आपला पुरुषार्थ साध्य करण्याची खटपट करूं. **कर्म करण्यास शिकणें** हें आपलें काम आहे. तसेंच फलाविषयीं स्वस्थ राहण्यास शिकावें हेंही आपलें कर्तव्य आहे.')

याच्याही पुढें जाऊन भगवान् म्हणतातः—( पद्य ४७ अ० २. )

**कर्म करण्याचा अधिकार तुला आहे।**
**फलाविषयीं तूं शून्यचित्त राहे ॥**

असो; तर फलाविषयीं उदासीन राहून अभिमानशून्यत्वानें कर्म करणें हाच सार्वजनिक अथवा लोकसंग्रहाचें काम करीत असतां अथवा खासगत काम करीत असतां प्रत्येक समंजस पुरुषानें मार्ग अवलंबिला पाहिजे. पण एवढी सावधगिरी ठेविली पाहिजे कीं, ज्यांचा उद्धार करण्याचें आपल्या मनांत आहे व ईश्वरी अनुग्रह असेल तरच ज्यांचा उद्धार होणार, त्या मंदबुद्धि लोकांची श्रद्धा विसकळेल असें आपण वागतां किंवा बोलतां उपयोगी नाही. ही सावधगिरी न ठेविल्यास अनर्थ होतील. वेदांताचें पूर्ण रहस्य न समजल्यामुळें जसे आमचे लोक कर्मभ्रष्ट होऊन अज्ञानसागरांत हेलपटत पडले आहेत, तसा अनर्थ, अत्यंत आग्रह अगर आततायीपणा केला असतां उत्पन्न होतो. ज्ञान ही वस्तु चांगली आहे खरी, पण कोणाला? अधिकार असेल त्याला! इतरांच्या हातांत ती वस्तु पडली असतां अनर्थच व्हावयाचे. असो; तेव्हां लोकसंग्राहकानें आपल्या अनुयायांचे अधिकार पाहून मग त्यांस ज्ञानोपदेश करावा; व जसजसें ज्ञान वाढत जाईल व श्रद्धा दृढ होत जाईल तसतसें शुद्धतर कर्म करण्याचा उपदेश करावा. हें तत्त्व अत्यंत शहाणपणानें ओतप्रोत भरलेलें आहे. पण इकडे कोणाचें फारसें लक्षच जात नाहीं. जगांत जे अनर्थ होत आहेत ते केवळ अधिकार नसलेल्या प्राण्यास ज्ञानरहस्यें समजावून देण्याचा अयोग्य प्रयत्न केल्यामुळें होत आहेत. सारांश, यासंबंधानें जितकी सावधगिरी ठेवावी, तितकी थोडीच आहे.

याप्रमाणें वरील तत्त्वें ध्यानांत ठेवून आणि आपल्यास जो पुरुषार्थ साध्य करावयाचा आहे तिकडे पूर्ण लक्ष ठेवून पुरुषानें सर्व कर्में परमेश्वरास अर्पण करावीं. असें केलें असतां तो वासनाशून्य व अभिमानशून्य होईल व त्याचा सर्व संतापही नष्ट होईल. अशी वृत्ति ठेवून जो कर्म करील तोच स्वतःचें व स्वेतराचें खरें कल्याण करणारा होऊन येथील सर्व ऋणांतून विमुक्त होईल; इतकेंच नव्हे, तर अशा वृत्तीनें लोकसंग्रहाचें व त्याचप्रमाणें स्वतःच्या मोक्षाचें साधन करण्यासाठीं कर्म करणारा पुरुष पूर्णत्वानें निराशी व निर्मम झाला तर त्याचें चित्त निर्मळ आरशासारखें शुद्ध होऊन तो ज्ञानसंपादनास पात्र होईल व शेवटीं आपला पुरुषार्थ साध्य करील. या पुरुषाला श्रद्धेचें बळ व मत्सरशून्यता या दोन गोष्टी अवश्य आहेत, हें सांगावयास नको.

आतां ज्याला लोकसंग्रह तर करावासा वाटतो, पण कर्माचा अतिरिक्त अभिमान व फलाची जबरदस्त वासना यांचा तर त्याग करवत नाहीं, त्या पुरुषाच्या हातून कांहीं चांगलें तर होत नाहींच, पण उलट त्याच्यावर व त्याच्या अनुयायांवर अनर्थ मात्र ओढवतात. 'अमुक गोष्ट अशीच केली पाहिजे' असा ज्याच्या मनामध्यें दुःग्रह अभि-

मान उत्पन्न झाला व 'माझ्या कर्माचें फळ **मलाच** मिळालें पाहिजे, मग तें द्रव्यरूपानें असो, कीर्तिरूपानें असो,' अशी ज्याची दुर्निवार वासना प्रबळ होत चालली, त्या पुरुषाच्या हातून कांहीं झालेंच तर आपल्यासकट सर्वांच्या नाशाचें काम मात्र उत्कृष्ट तऱ्हेनें साधेल. उघडच आहे कीं, 'माझ्याशिवाय दुसरा कोणीही शहाणा नाहीं' अशी बळकट अभिमानपिशाचिका ज्याच्या मागें लागली, किंवा फलभोक्ता मीच असावा, दुसरा असतां उपयोगी नाहीं ह्या दुराशेनें ज्याला झपाटलें, त्याच्या हातून ज्ञानी किंवा अज्ञानी लोकांचें कितपतसें हित होणार हें दिसतच आहे. असो; तेव्हां लोकसंग्रहाचें तर काम नाहींच, पण त्याच्या हातून स्वतःचेंही कल्याण होत नाहीं. अहंकार व वासना आणि मत्सरबुद्धि जागृत असल्यामुळें त्याचें चित्त शुद्ध होत नाहीं; आणि चित्त शुद्ध न झाल्यामुळें तो कर्माच्या बंधांत सांपडतो! आणि चित्तशुद्ध न झाल्यामुळें जो शांतिसुखाला व कर्मकुशलतेला मुकला म्हणजे बंधांत सांपडला, तो दुसऱ्यांचा उद्धार कितपत करील हें कळतच आहे! सारांश, त्याच्याठायीं असलेल्या बुद्धीचा विपर्यास होऊन तो स्वतःच्याच इष्टमित्रांच्या नाशास मात्र पात्र होतो. याप्रमाणें लोककल्याणकारी कसा असावा हें सिद्ध होऊन अधिकाराप्रमाणें लोकांस ज्ञानोपदेश करणें हाच संग्राहकाचा मार्ग आहे हें ठरलें. **सुखवस्तु देणें व देवविणें हें खरें लोकसंग्राहकत्व नव्हे, तर सात्त्विकसंपत्ति व तत्प्रपोषक सात्त्विकगुण वाढवून लोकांमध्यें समाधान उत्पन्न करणें हें संग्राहकाचें खरें कर्तव्य आहे हें ठरलें.** परिस्थिति पाहून लोकसंग्रह करावयाचा हें पुनः सांगावयास नकोच. येणेंप्रमाणें लोकसंग्रहाचा मार्ग आहे. हा मार्ग विषयसंपन्न युरोपिअन लोकांस अद्यापिही सर्वतः गोचर नाहीं. अभिमान व वासना यांचा सर्वथा क्षय करावा हें तत्त्व व या तत्त्वाचें रहस्य त्या लोकांस न कळल्यामुळें त्यांचा मार्ग गीतामार्गापुढें मंदतेज होतो. युरोपिअन मार्ग अपूर्ण आहे ह्याचें उत्कृष्ट उदाहरण इंग्लिशभाषाभिज्ञांस **मिल्ल** साहेबाच्या आत्मचरित्रामध्यें सांपडेल. असो; तेव्हां प्रकृतीच्या अनुषंगानें ज्ञानी पुरुषानें वागून आपला व इतरांचा उद्धार करावा.

## इच्छास्वातंत्र्य.

"आतां ज्ञानी पुरुषाला सुद्धां जर प्रकृतीच्या तंत्रानें म्हणजे अनुषंगानें वागावें लागतें, सर्व भूतमात्रास जर पूर्वकृत कर्मांपासून विभक्त होतां येत नाहीं, सारांश, जीवाची या जन्मांत काय स्थिति असणार हें जर त्या जीवाच्या पूर्वकर्मानें ठरवून ठेविलेलें असतें, तर मग सुधारण्याची, निवृत्तिमार्गाकडे जाण्याची आशाच खुंटली असें म्हटलें पाहिजे. माझें काय व्हावयाचें तें जर पूर्वकर्मामुळें, प्राक्तनामुळें, नशीबामुळें ठरलेलेंच आहे, तर माझें पुरुषकारत्व, माझें स्वातंत्र्य कोठें राहिलें? एवंच स्वातंत्र्य नाहीं, जें काय होतें तें निसर्गाच्या तंत्रानें होतें, माझा त्यांत संबंध नाहीं." अशा

प्रकारचीं मतें वेदांतकालीं विशेष प्रचलित होतीं. त्यांच्या निरसनार्थ ३४ व्या श्लोकाचा अवतार आहे; त्याच्या संबंधानें मला काय म्हणावेंसें वाटतें तें आतां सांगतों. **कर्माचें फल काय होईल हें ठरविण्याचा मला अधिकार नाहीं, पण काय करावें, काय करूं नये, हें ठरविण्याचें व वाईट कृत्य माझ्या हातून झालें असतां, त्याबद्दल पश्चात्ताप करण्याचें मात्र स्वातंत्र्य मला आहे.** ' हा सिद्धांत यापुढें प्रतिपादन करावयाचा आहे.

जीवास स्वातंत्र्य आहे कीं नाहीं या विषयाचा संस्कृत ग्रंथांतून फारसा ऊहापोह केलेला दिसत नाहीं, तथापि उपनिषदांसारखे, ब्रह्मसूत्रासारखे, श्रीमद्भगवद्गीतेसारखे जे प्रासादिक ग्रंथ त्यांची मीमांसा करितांना वरील प्रश्नांचा विचार अवश्य झाला पाहिजे, असें मला वाटतें म्हणून, व प्रत्यक्ष श्रीकृष्णांनीं प्रस्तुत अध्यायाच्या ३३ व ३४ श्लोकांत या प्रश्नाचा अवतार केला आहे हें जाणून, प्राचीन वेदांत्यांस नीरस वाटणारा परंतु आधुनिक अनुभवशास्त्राच्या दृष्टीनें, व्यावहारिकतः व एकंदरींत तात्त्विकदृष्टीनें अवश्य असणारा विषय मी वाचकांपुढें ठेवण्याचें बुद्धिपूर्वक धारिष्ट करीत आहे; याचा हेतु इतकाच कीं, वस्तुस्थितीचें समग्र पर्यालोचन करण्याची जिज्ञासा खऱ्या मुमुक्षूंस व्हावी.

## कार्यकारणशृंखला व तिचें अभेद्यत्व.

एकंदर विश्वाची रचना आपल्या दृष्टीस पडते व ज्ञानास गोचर होते ती पाहिली असतां कार्यकारणाचा नियम अबाधित आहे असाच निश्चय होतो. जी जी वस्तु म्हणून विकारवश आहे ती विकृत होण्यास योग्य अशा कारणाची अपेक्षा अवश्य असते, हें कोणासही असंमत होणें शक्य नाहीं. जें काय आपल्यास आज दिसत आहे, तें सर्व योग्य कारणांपासून निर्माण झालेलें आहे, असा मनुष्यजातीचा समज फार दिवसांपासून झाला आहे. यदाकदाचित् वास्तविक कारण समजलें नाहीं, तरी प्रत्येक कार्यास कारण असलें पाहिजे असें आपण मानितों व आपण उद्योगी असलों तर त्या अज्ञात कारणाचा शोध करूं लागतों. हा सामान्य अथवा सर्वसाधारण नियम आहे व यास अपवाद नसलाच पाहिजे अशी आपली ठाम समजूत झाली आहे. सभोंवार दिसणारी प्रचंड सूर्यमाला, आपली अवाढव्य पृथ्वी, तसेंच खनिजसृष्टि, वनस्पतिसृष्टि, प्राणिसृष्टि, मनुष्यसृष्टि इत्यादि कोठेंही पाहिलें तरी जीं कार्यें आपल्यास दिसतात, तीं सर्व कारणवश आहेत, पूर्वीच्या परिस्थितीमधून उत्पन्न झालीं आहेत, असें दिसतें. फार कशाला? आपला देह, आपलें मन, आपले विचार आपल्या राजकीय, सामाजिक, व धार्मिक संस्था, आपले खेळ व विश्रांतिसमाज हे सर्व कारणवश आहेत, असें विचाराअंतीं दिसून येतें. आपण घरीं मुलांस सांगतांना, शाळेंत शिकवितांना, उपदेश, नीति, कायदे, सामाजिक विचार इत्यादि प्रकट करितांना आपल्या सांगण्याचा परिणाम श्रोत्यांच्या

मनावर आपण म्हणतों तसाच होईल असें समजून आपण उपदेश करीत असतों, कायदे करितों व लेख लिहीत असतों. तसेंच 'देवदत्त' नामक पुरुषाची आपल्यास उत्तम माहिती असेल तर तो विवक्षित वेळीं काय करील, हेंही आपल्यास सांगतां येतें. सारांश, मनुष्याच्या **कर्तव्यबुद्धीची जी घटना होते** ती **कारणानुरूप होत असते,** या समजावरच सर्व नीतिग्रंथांची, धर्मपुस्तकांची व कायद्यांची रचना होत असते. आपल्या वेदांत ग्रंथांतूनही असेच उद्गार आहेत कीं, मनुष्याच्या हातून पूर्वकर्मानुरूप मात्र आचरण होत असतें. ज्या ओघांत प्राणी सांपडलेला असतो, तदनुसार त्यास वागावें लागतें, असेही उद्गार आहेत. एवंच मनुष्यप्राण्यास—इतर प्राणी तर सर्वथा परतंत्रच आहेत—वर्तनस्वातंत्र्य किंवा विचारस्वातंत्र्य बिलकुल नसून पाठीमागील कारणांची व त्यांच्या कारणांची अथवा कारणकारणांची जशी घटना झाली असेल तद्वत् पुढील पुढील कार्यांची घटना होत असते; येथें या मायाचक्रांत स्वातंत्र्य असें कोणासच नाहीं, असा आधुनिक अनुभवसिद्ध शास्त्रांचा, एकपक्षीय द्वैतवाद्यांचा व शुद्धाद्वैतवाद्यांचाही सिद्धांत झालेला दिसतो. प्राक्तनानुसार वर्तमानकाळ व वर्तमानकाळाप्रमाणें भावीकाळ व त्या त्या काळांतील वर्तन अगोदरच ठरून जातें, असा या शास्त्रांचा व संप्रदायवाल्यांचा सिद्धांत आहे.

## विचारस्वातंत्र्य व वर्तनस्वातंत्र्य.

परंतु भगवद्गीता, कांहीं उपनिषदें, योगवासिष्ठ, आधुनिक ख्रिस्तीशास्त्र व व्यावहारिक समज इत्यादिकांचा समज उलट आहे. कोणत्याही ओघांत प्राणी सांपडो, आपली स्थिति सुधारण्याचें किंवा बिघडविण्याचें **विचारसामर्थ्य** प्रत्येक प्राण्यास आणि विशेषतः मनुष्यप्राण्यास आहे, असें यांचें मत आहे. 'मनुष्य हा आपल्या नशिबाचा कारागीर आहे,' ही इंग्लिश म्हण घ्या, किंवा (**बंधमोक्ष उत्पन्न करण्याला कारण मन हेंच आहे**) 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः' ही संस्कृत म्हण घ्या. अर्थ एकच आहे कीं, आपण अमुक प्रसंगीं काय करावें हें **ठरविण्याचें स्वातंत्र्य** मनुष्यमात्रांत आहे. 'I ought, therefer I can' ('मी अमुक करावें' असें ठरलें तर मला तें करण्याचें सामर्थ्य आहे, असाच अर्थ अंतर्भूत असतो.) असें प्रसिद्ध तत्त्ववेत्ता जो **कांट** त्याचें म्हणणें आहे आणि हें खरें असावें. कारण जर आपल्यास विचारस्वातंत्र्य व वर्तनस्वातंत्र्य हीं नसतीं व आपण सर्व प्राणी निसर्गदेवीचे, मायादेवीचे, पूर्वकर्माचे म्हणजे आपल्या प्राक्तनाचे **सर्वथा** बंदेगुलाम असतों, तर आपल्या या सर्वथा पराधीन स्थितींत झालेल्या कृत्यापकृत्यांबद्दल आपल्यास बक्षीस अगर शिक्षा देणें हें सर्वन्यायी प्रभूच्या दरबारांत अन्याय्य झालें असतें. पण आपण विचारपूर्वक बोलत असतां 'परमेश्वराच्या घरीं अन्याय आहे' असें केव्हांही, स्वप्नांतसुद्धां, म्हणत नाहीं; म्हणून तेथें अन्याय नाहीं; म्हणजे मनुष्यास **स्वातंत्र्य** आहे. शिवाय 'काय करावें, कसें करावें' हा

दशाक्षरी मंत्र आपण जपतों, तेव्हां आपण कांहीं तरी निश्चितपणानें केलें पाहिजे, व काय करावें, हें ठरविण्याचें सामर्थ्य आपल्यास आहे असा प्रत्येक मनुष्याचा अनुभव आहे. हें सत्य प्रत्येकास स्वानुभवानें ठरवितां येईल. तसेंच जर आपल्यास वर्तनस्वातंत्र्य नसतें तर एखादें अपकृत्य करून गेल्यावर आपल्यास जो पश्चाताप होतो, तो होण्याचें कारणच नव्हतें. पण पश्चाताप होतो यावरूनच आपल्यास वर्तनस्वातंत्र्य असतें असें सिद्ध होत नाहीं काय? पुनश्च, आपल्या वर्तनावर लोक गुप्तपणानें अथवा उघड रीतीनें टीका करितात; आतां वर्तनस्वातंत्र्यच जर आपणास नसेल, तर त्यांची टीका योग्य होईल काय? नाहीं. पण टीका योग्यच असते; म्हणून स्वातंत्र्य आहे. आणखी, दोन गोष्टींमध्यें कोणती करावी, असा प्रश्न उत्पन्न झाला असतां तो सोडविण्याचें म्हणजे मला योग्य वाटेल ती कर्मदिशा स्वीकारण्याचें स्वातंत्र्य मला आहे, ही समजूत प्राणिमात्राची आहे. शेवटीं, शिक्षण, उपदेश, कायदा, लोकमत इत्यादिकांच्या योगें मनुष्याचा स्वभाव बुद्धिपुरःसर बदलतां येतो हा अनुभव सार्वत्रिक आहे. सारांश, आपली स्थिति सुधारण्याचा निश्चय करण्याचें स्वातंत्र्य मनुष्यास आहे, मग त्याची परिस्थिति कशीहि असो.

तात्पर्य; सारासार विचार करून पाहिलें असतां असें दिसतें कीं, निदान मनुष्यप्राण्यास तरी वर्तनस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य हीं दोन्ही आहेत. मात्र जसजशी आपली वर्तणूक वयोमानानें, विद्येनें, देशकालवर्तमान इत्यादि परिस्थितीनें निश्चित होत जाते, तसतसें हें स्वातंत्र्य कमीजास्त होत जातें. आतां हें खरें आहे कीं, पूर्ण पारतंत्र्य अगर पूर्ण स्वातंत्र्य या जीवकोटींत नाहीं. वास्तविक पाहतां जड वस्तु सर्वथैव परतंत्र आणि आत्मतत्त्व पूर्णतः स्वतंत्र आहे, असें म्हणतां येतें, तें तरी मोठ्या कष्टानें होय. कारण जड वस्तु परतंत्र आहेत असें आपल्यास वाटतें; वस्तुतः त्यांस भान नसल्यामुळें परतंत्र हा शब्द तेथें अनर्थकच होय. तसेंच जेथें एकच आहे, जेथें सर्व प्रकारचें भान नष्ट होऊन सच्चिदानंदस्वरूपच सिद्ध आहे, तेथें स्वतंत्र हा शब्दही अनर्थपरच होय. कारण दुसरें कांहीं असेल तर 'स्वतंत्र,' 'परतंत्र' हे शब्द सार्थ होणार; पण तसा प्रकार येथें कांहींच नाहीं! पण जीवदृष्टीनें पाहतां मूळ स्वरूपापासून पतित होऊन विषयवश होत गेलें तर आपलें स्वातंत्र्य कमी होतें आणि विषयापासून परावृत्त करणारा निवृत्तिपंथ आपण स्वीकृत केल्यावर स्वस्वरूपाकडे, निजरूपाकडे जात असतां आपलें स्वातंत्र्य वृद्धिंगत होतें, असा वेदांचा, उपनिषदांचा, गीताकरांचा, बुद्धाचा, आधुनिक ख्रिस्तीधर्मशास्त्र्यांचा व पौरस्त्य व पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचा अभिप्राय आहे. 'कोणी कितीही पतित होवो, त्याला सद्बुद्धि होऊन तो विषयपराङ्मुख व विवेकोन्मुख होऊं लागला तर तोहि मुक्तीच्या वाटेस लागतो, मग इतर लागतीलच यांत नवल काय?' असा सर्वज्ञ श्री भगवंतांचा अखंड सिद्धांत आहे. हा सिद्धांत निरबाध

आहे; याला प्रमाण ह्मणून तर याची साक्ष म्हणून '**म्याकेंझीकृत नीतिसार**' पुस्तकाचा आस्वाद आंग्लभाषाभिज्ञ पुरुषांनीं अवश्य घ्यावा अशी माझी सविनय सूचना आहे. **सेनेट** नामक थिओसोफिस्ट यांचाही हाच अभिप्राय आहे.

'आपण सर्वथा पतित झाली, आमची राजकीय, सामाजिक, धार्मिक व आर्थिक परिस्थिति आह्मांस सर्वथा प्रतिकूल आहे. ह्मणून आतां आपल्यास उन्नतीचे दिवस कधींही नाहींत, अशी आमच्यांतील कित्येक समंजस पुढाऱ्यांच्या तामसी मनाची समजूत झालेली दिसते. धर्मावर खरी श्रद्धा नसणें किंवा मनुष्यमात्रास परमेश्वरानें स्वसुधारणेचें सामर्थ्य दिलें आहे याचें अज्ञान असणें हें या दुःखमूलक समजुतीचें मूल कारण आहे. या कांहींशा बहकलेल्या पापी सत्पुरुषांची धर्मावर पूर्ण श्रद्धा बसून ते सात्त्विक मार्गानें खऱ्या निवृत्तिपंथाचा उत्साहकारी उपदेश समजून घेऊन आपल्या अनुयायामध्यें त्याचा विस्तृत प्रसार सहृदयतापूर्वक करूं लागतील, तर आधुनिक प्रतिकूल प्रसंगच अनुकूल होऊन आपली सात्त्विक आर्यज्योति आपल्या नैसर्गिक प्रभेनें आपल्यासहवर्तमान सर्व जगास उद्दीपित करील, यांत मला तरी शंका वाटत नाहीं.

## स्वधर्म व परधर्म.

तेव्हां ज्याला ह्मणून स्वतःचें व इतराचें पारमार्थिक कल्याण खरोखर करावयाचें आहे, त्यानें आपल्यास वर्तनस्वातंत्र्य आहे हें तर समजून घ्यावेंच, पण या स्वातंत्र्याच्या जोरावर आपल्या परिस्थितीबाहेरील अगर आपल्या नैसर्गिक गुणांस सर्वथा अगोचर, अशीं अपकृत्यें करण्याच्या मात्र भरीस पडूं नये. भूतकालीन प्रसंगांनीं जे गुण आपल्यास प्राप्त झाले आहेत, त्यांचा आपल्या स्वातंत्र्याच्या सहाय्यानें सदुपयोग करून आपल्या गुणानुसार आपल्या वर्तनाची दिशा ठेवावी. उद्योग केला तर 'नरका नारायण होत' हें खरें; पण जोंपर्यंत वरिष्ठ **गुणांचा** पूर्ण संचार आपल्या कृतीनें प्रकट होण्याचा संभव नाहीं, तोंपर्यंत वरिष्ठ गुणांचीं कर्में करावयास लागणें इष्ट नव्हे. उदाहरणार्थ, वेदांतदृष्टीनें किंवा दुसऱ्या कित्येक धर्मांच्या दृष्टीनें मूर्तिपूजा असमंजस आहे असें वेदांत्याला जरी कदाचित् दिसत असलें, तथापि जोंपर्यंत ब्रह्माकार वृत्ति झाली नाहीं, किंवा निराकार परमेश्वराचें ध्यान करण्याची संवय झाली नाहीं तोंपर्यंत या वेदांत्यानें—अर्थातच बाकीच्या लोकांनींही—मूर्तिपूजा सर्वथा सोडणें हें घातकारी आहे. ३५ व्या श्लोकांत भगवंतांनीं हेंच सांगितलें आहे. आपल्या नैसर्गिक गुणांप्रमाणें ठरणारा आपला धर्म कदाचित् इतर दृष्टीनें सामान्यसा वाटला तर तो आपण सोडून परकीय धर्म घेऊं नये. परकी धर्म चांगला असेल; पण तो कोणाला? ज्याला त्या धर्माची दीक्षा घेण्याची योग्यता आली त्यालाच होय. दुग्धप्राशनानें अंगकांति सतेज होते; हें खरें. पण या सिद्धांतास भुलून जाऊन

जर एखादा कफक्षयाचा रोगी दुधाच्या चरव्या रिचविण्याचा प्रयत्न करील, तर कोणत्याही प्रकारचा लाभ न होतां स्वतःसच तो बिचारा या जगांतून बाहेर काढून लावील ! असो; तेव्हां स्वगुणधर्मांनीं ठरविलेलें जें आपलें मोक्षमार्गाचें लहानसें साधन असतें त्याचेंच अनुसरण करावें व आपल्यास ईशकृपेनें जें थोडेंबहुत वर्तनस्वातंत्र्य मिळालें आहे, त्याच्या साहाय्यानें आपले गुणांस सात्त्विकतेचें स्वरूप देऊन नंतर मग श्रेष्ठ मार्गास लागावें, हें भगवंताचें मत आहे. सारांश, कर्म करण्याची मात्र ज्याची ऐपत आहे त्यानें ज्ञानाच्या प्रासादांत शिरण्याची खटपट सहसा करूं नये. कर्म करणें म्हणजे विहित कर्म करणें होय. शास्त्रानें किंवा धर्मानें जें कर्म विहित केलें आहे, तें बिनतक्रार करावयाचें ही प्राथमिक स्थिति आहे. हा लष्करी कायदा आहे, असें कांहीं आधुनिक नास्तिक लोकांस वाटेल. इलाज नाहीं. पण निसर्गतः प्राप्त झालेली जी तामसी वृत्ति तिला शास्त्रांचा, धर्माचा व शिष्टानुभवाचा संस्कार प्रथम देऊन मग त्या त्या संस्काराची मीमांसा सांगावी असा प्राचीन क्रम आहे. कर्माची योग्यता कमी आहे ती याच अर्थानें होय. असो; "अर्जुना!" भगवान् म्हणतात, "तुझी योग्यता कर्म करण्याची मात्र आहे, ह्मणून तूं कर्मच कर. तें नीच प्रतीचें आहे असें तुला वाटेल. पण जोंपर्यंत तुझा अभिमान व फलवासना हीं द्वयी कायम आहे, तोंपर्यंत तुला कर्मच केलें पाहिजे. शिवाय या द्वयीचा नाश होणें तोही कर्मानेंच होणार आहे. म्हणून तूं कर्म कर. कर्म न करितां म्हणजे योग्य अधिकाराशिवाय, **एकदम ज्ञानमार्गाचा आश्रय केलास तर तुझा नाश होईल.**" आधुनिक राजकीयसुधारक व सामाजिकसुधारक ह्या भगवद्वचनाकडे लक्ष्य देतील काय ?

## पापाचें मूळ व त्याचें उच्चाटन.

( ६ ) अध्यायाच्या शेवटीं अर्जुनानें प्रश्न विचारला आहे तो अत्यंत महत्वाचा होय. 'महाराज !' अर्जुन विचारतो, 'अधिकार नसतांनाही आपल्यास अधिक कांहीं असावे असें मनुष्यास कां वाटतें व पापकर्म करण्यास, अयोग्य कर्म करण्यास, मनुष्य प्रवृत्त कां होतो बरें ? सारांश, पापप्रवृत्तीचा उदय कोठें व कसा होतो ?' अशा अर्थाचा हा प्रश्न आहे. सर्वदयाघन, सच्चिदानंद, सर्वशक्ति आणि सर्वज्ञ प्रभूनें जर हें विश्वचक्र निर्माण केलें आहे तर येथें ह्मणजे परमेश्वरसत्तेनें चाललेल्या या लोकीं पापाचा, दुःखाचा प्रादुर्भाव कसा होतो, ही शंका चार्वाकादि पौरस्त्य व मिल, हक्सलेप्रभृति पाश्चात्य नास्तिकांसच आली होती, असें नाहीं; तर मोठमोठ्या धर्मश्रद्धालु भक्तशिरोमणीस व सामान्य मनुष्यासही केव्हां केव्हां अज्ञानानें असली शंका उत्पन्न होते. पुष्कळ वेळीं व विशेषतः संकटकाळीं आपणही परमेश्वरी दयेच्या, परमेश्वरी शक्तीच्या अगर परमेश्वरी ज्ञानाच्या संबंधानें साशंक होतो व 'तो आहे कीं नाहीं याची पडली आह्मां भ्रांति ।' अशी आपली मनःस्थिति होते. अतएव हा विषय अत्यंत महत्वाचा आहे. पापाच्या उद्भवाची व पाप-

त्याग करणें हें समंजस पुरुषाचें प्रथम कर्तव्य आहे. प्रथम इंद्रियदमन, पुढें मनोनिग्रह व नंतर बुद्धिस्थैर्य हे आशेच्या नाशाचे मार्ग आहेत. ( १ ) मनाला इंद्रियदमन करण्याचें सामर्थ्य आहे. ( २ ) मन हें बुद्धीच्या सत्तेखालीं असलें म्हणजे मनोनिग्रह होतो. आणि ( ३ ) नित्यानित्यविवेक येऊं लागला म्हणजे बुद्धि स्थिर, स्थिरतर होत जाते. असो; आतां आशा नष्ट झाली म्हणजे कर्मबुद्धीचा अथवा उन्नत-स्थितीचा नाश होईल अशी भीति बाळगावयाचें कारण नाहीं. कारण गुणा-नुसार आपली योग्यता ठरतच असते; आणि योग्यतेप्रमाणें फलही येथें किंवा अन्यत्र मिळतच असतें. तेव्हां निर्विकार असें जें आपलें स्वस्वरूप तिकडे दृष्टि ठेवून क्रमाक्रमानें आपली सात्त्विक योग्यता वाढवावयाची, आपल्या अधिका-राचा व योग्यतेचा कधींही अतिक्रम करावयाचा नाहीं, असा निश्चय ठेवून वर्तन चालविलें असतां या पापोत्पादी आशाराक्षसीचा संहार होऊन आपलें स्वस्वरूप आपल्यास प्राप्त होईल यांत शंका नाहीं. परमेश्वराचाही हाच संकल्प आहे. स्वातंत्र्य देऊन अधिकार व योग्यता वाढविणें हें एक परमेश्वरास मात्र शक्य आहे. त्यानें आपल्यास स्वातंत्र्य दिलें आहे व पुनः शिक्षणार्थ मोहही ठेविले आहेत; ते ठेवण्याचा हेतु आपण शुद्ध, निर्लेप व पूर्ण व्हावें असा आहे, हा हेतु ज्यास समजत नाहीं, तेच नास्तिक होत. असो; भगवंताप्रमाणेंच ख्राइस्ट, सेंटपाल, कांट, हेगेल इत्यादिकांचाही हाच अभिप्राय आहे, हें तीन हजार वर्षांपूर्वी 'अवतीर्ण' केलेल्या गीताकारांस केवढें भूषण आहे? ( पहा म्याकेंझीकृत नीतिसार Manual of Ethics, Mackenzie ).

सारांश, स्वातंत्र्याचा सदुपयोग केला म्हणजे आपलें कर्म निष्काम होऊन आपलें निजरूप आपल्यास सांपडतें व आपल्या आचरणानें इतर लोकांचाही उद्धार होतो. पण जर आपण त्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला, तर आपण आपल्या अनुयायांसह पतित होऊन संसारचक्रांत सांपडतों व शेवटीं जडस्थितीस जातों. भगवंतांनीं सहाव्या अध्या-याच्या पांचव्या श्लोकांत हेंच सांगितलें आहे. 'तुला स्वातंत्र्य दिलें आहे; तरून जाणें किंवा बुडणें हें **तुझ्या** हातांत आहे.' हेंच या अध्यायाचें सार होय.

## सारांश.

याप्रमाणें तिसऱ्या अध्यायांत स्वसुखवादी ( Egoists ) सकाम याज्ञिक, कर्मठ, उपासक व लोकसंग्राहक ( Utilitarians ) इत्यादि नीतिमार्गांचा येथें विचार केला. ( १ ) स्वसुखवादानें मनुष्यास शुद्ध सुख मिळत नाहीं, पूर्णत्व येत नाहीं. ( २ ) सकामकर्मानें चित्तशुद्धि होत नाहीं आणि ( ३ ) लोकसंग्रहापुरतेंच निष्काम कर्म केलें तरी मुक्ति मिळत नाहीं, असें सांगितलें. खरी चित्तशुद्धि करून अद्वैतज्ञानाचा बोध झाल्याशिवाय मोक्ष नाहीं, ह्या सिद्धांतास अनुलक्षून अनेकविध कर्मांचा विचार केला व

कर्मास लागणारें स्वातंत्र्य मनुष्य प्राण्यास मिळालेलें आहे असें सांगून पापबुद्धिही स्वातंत्र्यापासून उत्पन्न होते, तेव्हां मुमुक्षूनें सावध राहून प्रकृतीहून पलीकडे असणारें जें नित्य, शुद्ध व पूर्ण असें आत्मस्वरूप तिकडे दृष्टि ठेवावी व निवृत्तिमार्गानें जावें अशी सूचनाही देऊन ठेविली; सारांश, विषयैकबद्ध असें सुखकारी कर्म पापात्मक आहे, सकामकर्म प्रपंचांत घालणारें आहे, लोकसंग्रहाचें निष्कामकर्म चित्तशोधक आहे, परमेश्वरार्पित कर्मानें विश्वस्वरूप प्राप्त होऊन पापाचें निर्मूलन होतें व ज्ञानविज्ञानास अधिकार पोहोंचतो हें या अध्यायाचें तात्पर्य होय. विज्ञान संपादन करण्यापूर्वी हीं कर्में विहित आहेत, हें सांगावयास नकोच. हाच विषय अंमळ विस्तारानें खालील परिच्छेदांत सांगतों:—

या अध्यायांत (१) चित्तशुद्धीकरितां कर्म हवें, त्या व्यतिरिक्त कर्मसंन्यास होत नाहीं, (२) शरीरीपणांत प्रत्येक क्षणीं व प्रत्येक क्षणांशांत कर्म होत असतेंच, कर्म होत नाहीं किंवा आम्ही करीत नाहीं म्हणणारे लबाड आहेत, (३) म्हणून आपल्या हातून होणाऱ्या प्रत्येक कर्माला शास्त्रविहितत्त्वाचें स्वरूप देणें अवश्य आहे, (४) तसेंच कर्माव्यतिरिक्त शरीरयात्रा चालावयाची नाहीं, (५) याज्ञिककर्मे, यज्ञरूपी कर्मे, केल्याव्यतिरिक्त कृतज्ञताबुद्धि व परोपकारबुद्धि ह्या उत्पन्न होणार नाहींत व या (बुद्धि तर) आत्मोन्नतीस व विश्वनियमास अत्यंत अवश्य आहेत, (६) यज्ञकर्माचा अवतार ब्रह्मापासून आहे व या चित्तशोधक कर्मानींच ब्रह्ममार्ग सोपा होतो, (७) स्वतःकरितां मात्र-स्वोपभोगासाठीं मात्र-कर्म करणारा पापात्मक आहे, (८) पूर्ण ज्ञानी पुरुषाला सहेतुक व साभिलाष कर्म करण्याची आवश्यकता नाहीं, म्हणून व अनासक्त कर्म अज्ञानविध्वंसक होतें म्हणून अनासक्त कर्म श्रेष्ठ आहे, व तेंही मोक्षमार्ग सुलभ करणारें आहे, (९) लोकनायकांनीं (क्षत्रियांनीं, राजकारणी पुरुषांनीं) लोकसंग्रहास्तव नित्यनैमित्तिकादि सच्छास्त्रविहित पावककर्मे अनासक्त वृत्तीनें केलीं पाहिजेत, नाहीं तर अनवस्था होईल, व भलत्यास भलताच उपदेश केलासें होईल, (१०) अभिमान व वासना टाकून स्वधर्मनियतकर्म केलेंच पाहिजे म्हणजे तें पाहून हळू हळू अज्ञानी मनुष्यें उद्धारयोग्य होतील, (११) कर्म ब्रह्मार्पण केलें म्हणजे विमोचक होतें, (१२) अभिमान घातक आहे, कारण, प्रकृति कर्म करविणारच, (तेव्हां जीवानें अभिमान धरणें म्हणजे स्वविघात करणें आहे,) (१३) म्हणून रागद्वेषांचा त्याग करून स्ववर्णोचित कर्म करावें व केलेंच पाहिजे, (१४) रागद्वेषांनींच पापाची उत्पत्ति होते, रागद्वेष सर्व ज्ञानेंद्रियांचे ठिकाणीं असतात, तेव्हां इंद्रियातीत जो आत्मा त्याचें ज्ञान करून घेतलें म्हणजे रागद्वेषांचा बीमोड होतो, निर्हेतुक पद्धतीनें स्वकर्म करण्याचें सामर्थ्य येऊन चित्तशुद्धि होते व ज्ञानविज्ञानाचा मार्ग सोपा होतो, असे अनेक विषय म्हणजे चित्तशोधक कर्म करण्याचे हेतु येथें सांगितले आहेत. आत्मज्ञान होण्याला जी चित्तशुद्धि अवश्य आहे, ती कर्माशिवाय साध्य नाहीं, इतकेंच सांगितलें म्हणजे निव्वळ कर्मयोगी व निव्वळ सांख्ययोगी या दोन्ही मतांचें अवश्य तेवढें खंडन होऊन ज्ञान मिळविण्याला योग्य जी चित्तशुद्धि ती संपादन करण्यासाठीं कर्म—शास्त्रशुद्धकर्म

अवश्य आहे, असें ठरतें. ही चित्तशुद्धि होण्याला, अभिमान व वासना यांचा त्याग सिद्ध होण्यासाठीं, कामक्रोधांचा जोर कमी केला पाहिजे, व त्यांचा विनियोग लोकसंग्रहाकडे केला पाहिजे; आणि हें होण्यास आत्मज्ञानाचें श्रवण तरी झालें पाहिजे; अशा तऱ्हेची विचारमालिका या अध्यायांत अवतीर्ण झाली आहे. सारांश, कर्मयोगाचा विचार, ( १ ) तत्त्वज्ञानश्रवण, ( २ ) नीतिशास्त्र, ( ३ ) व्यक्तिविषयक व समाजविषयक मानसशास्त्र, ( ४ ) जीवनशास्त्र, ( ५ ) गतिस्थितिशास्त्र, ( ६ ) धर्मशास्त्र, ( ७ ) अध्यात्मिकशास्त्र, ( ८ ) समाजशास्त्र, ( ९ ) इत्यादि अनेक आधिभौतिक शास्त्रें आणि ( १० ) ऐतिहासिक शास्त्र, ह्या शास्त्रांतील सिद्धांत घेऊन केला आहे व असें ठरविलें आहे कीं, ज्ञानी व अज्ञानी या उभयतांनीं आपापलें विहित कर्म केलें तरच आत्मोन्नति व लोकसंग्रह होईल.

असो; या विवेचनावरून प्रेयोवाद ( मग तें कल्याण स्वतःचें असो, वा इतराचें असो, ) खरें सुख देण्यास असमर्थ आहे, कर्तव्यप्राप्त्यर्थ कर्म करणें ह्यानें चित्तशोधन मात्र होतें, खरें सुख प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर अद्वैतसिद्धांतांचें श्रवण, मनन करून निदिध्यास व गुरूपदेशासह परमेश्वरी अनुग्रह संपादन केला पाहिजे, व पुढें साक्षात्कार होईपर्यंत हा अभ्यास चालविला पाहिजे हें जर लक्षांत येईल, तर इतर धर्मापेक्षां अद्वैतधर्म श्रेष्ठ आहे व इतर नीतिवादांपेक्षां आमचे धर्मशुद्ध नीतिसिद्धांत श्रेष्ठ आहेत, ही समजूत दृढ होईल.

---

## खंड ४.

## चतुर्थ अध्यायाचा उपसंहार.

या अध्यायांत कर्ममीमांसा, अध्यात्मिक यज्ञयाग इत्यादि विषय येणार आहेत, तिकडे आतां क्रमाक्रमानें प्रयाण करावयास लागूं. प्रथमतः श्रीकृष्णांनीं

### साधनरूप भागवतकर्मयोगाचें अनादित्व

सिद्ध करण्यासाठीं ' सद्रूप ब्रह्मानें तैजससूर्यास, सूर्यानें मानवांचा पिता जो मनु त्यास व मनूनें इक्ष्वाकु राजास, अशा परंपरेनें सांगितलेला हा योगमार्ग अनादि चालत आला आहे ' हें सांगितलें. याचें रहस्य उघडच आहे कीं, सर्वज्ञ ईश्वरानें सर्व प्रकाशक सूर्यास हा मार्ग प्रत्येक सृष्टीच्या आरंभीं सांगावयाचा; त्या जगत्पालक रवीनें तोच मार्ग मनुष्यांचा आदिपिता जो मनु त्यास दाखवावयाचा आणि त्यानें स्मृतिरूपानें प्रकट करावयाचा. हा अभिप्राय सगुण ' ब्रह्म, ' जगाचें आश्रयस्थान सूर्य, ' 'मानवधर्मशास्त्रप्रणेता

मनु पृथ्वीचा प्रथम राजा 'इक्ष्वाकु' इत्यादि शब्दांचे अर्थ बरोबर ध्यानांत धरल्यास, सहज लक्ष्यांत येईल. कर्म, उपासना आणि ज्ञान ही अनादि सोपानपरंपरा परमेश्वर-प्रणीत आहे. या परंपरेत केव्हांही बदल होत नाहीं. व्यक्तिविषयक कर्म, कौटुंबिक, सामाजिक आणि विश्वव्यापी कर्म आणि कर्मशून्यता, ह्या दृष्टीनें कर्म उपासना आणि ज्ञान या परंपरेस पाहिलें तर हा ईश्वरप्रणीत ब्रह्मविद्यांतर्गत ज्ञान-कर्मयोग अनादि आहे व अनंत आहे अशी सात्त्विक मुमुक्षूंची खातरी झाली पाहिजे. 'असें आहे तर परमेश्वरप्रणीत अनादि असा हा मार्ग मागें पडूं नये.' परंतु मनुष्येतर मर्त्यांस व मनुष्यास थोडेंबहुत वर्तनस्वातंत्र्य आहे ह्मणून व त्यास मायेनें अज्ञानप्राप्ति झाली असल्यामुळें पापप्रवृत्त होऊन, मोक्षमार्ग मागें पडतो. पण जगाचा उद्धार व्हावा अशी दयाळू भगवंतांची इच्छा आहे; ह्मणूनच भगवंतांस निरनिराळे वेळीं निरनिराळ्या ठिकाणी अवतार घेऊन तेथील लोकांस त्यांच्या अधिकाराप्रमाणें मोक्षमार्गाचा जीर्णोद्धार करणें भाग पडतें. आपल्या या आर्यावर्तांतीलच अवतारमालिका पाहिली तर प्राण्यांच्या अधिकारानुरूप परमेश्वरानें मत्स्यकूर्मादि अवतार घेऊन धर्मसंस्थापना केली आहे असें दिसून येईल. असो; धर्माला ग्लानी आली व अधर्म बळवंत झाला म्हणजे परमेश्वरी विभूति **जिवंत देशांत** अलौकिक इच्छेनें व शक्तिनें अवतीर्ण होऊन व मायेस सर्वथा आपले स्वाधीन ठेवून साधुसंरक्षण आणि दुष्टविमर्दन करितात आणि आपल्या अपरिमित तेजानें, वार्यानें, वाणीनें आणि पवित्र आचरणानें धर्माचा जीर्णोद्धार करून व त्यास सुसंस्कृत करून नंतर निजधामास जातात, ही सर्वज्ञ व सर्वसाक्षीपरमेश्वराची लीला, हें शिवशास्त्र (The-ology) किती प्रोत्साहनशील आहे बरें? भगवान् हे सर्वांचेच आप्त आहेत, म्हणून त्यांच्या वचनांवर प्रत्येक समंजस पुरुषाचा विश्वास तर बसला पाहिजे हें उघडच आहे. पण आपल्यास अनुभवही असाच येत नाहीं काय? बुद्धधर्मानें विश्वनियामक जो परमेश्वर त्याच्या भजनपूजनाची संस्था काढून टाकली म्हणून जो अनाचार वाढला त्याच्या नाशार्थ आचार्यांचा अवतार; पुढें मुकुंदराजापासून तों थेट परवां परवां विद्यमान असलेले श्रीअक्कलकोटकरमहाराज, श्रीमाणिकप्रभु व श्रीनृसिंहसरस्वती स्वामीपर्यंतची संतमालिका, यांचीं चरित्रें अवलोकन केल्यास हे सर्व महापुरुष अनाचारभंजनार्थच ऐतिहासिक कालांत निर्माण झाले होते, असें कोण ह्मणणार नाहीं? असो; याप्रमाणें आपल्यास सर्वसंकटहर्त्या परमेश्वराचें याप्रमाणें आश्वासन प्रसिद्धपणानें मिळालें असतां व आपल्या येथें व इतर जिवंत राष्ट्रांत अशा प्रकारचा उन्नतिकारक अनुभव नित्य येत असतांही 'आमचा आतां नाशच होणार!' अशी बायकी समजूत करून घेणाऱ्या व आपल्या अनुचरांस राक्षसी वर्तन शिकविणाऱ्या अहंमन्य पंडितांच्या संबंधें काय म्हणावें बरें? एक तर त्यांची धर्मावर तरी श्रद्धा नाहीं असें ह्मणावें लागेल; किंवा दुसरें, कूपमंडूकांप्रमाणें त्यांस अल्पज्ञानानें मोठा अभिमान उत्पन्न होऊन त्यामुळें त्यांस एखादा मस्तकरोग तरी झाला आहे, असें म्हटलें पाहिजे. ज्या देशांत गीतेसारखा दिव्य ग्रंथ लोकोद्धारासाठीं निर्माण होऊन तो बहुमोल ग्रंथही लोकमान्य

झाला व हल्लींच्या दारुण धर्मांधकाराच्या सर्वव्यापी अज्ञानांतही त्या ग्रंथाचा पाठ ज्या देशांत हजारों लोक निःसीम भक्तीनें करीत आहेत, त्या देशांतील लोकांचा उद्धार कधींही व्हावयाचा नाहीं, अशा प्रकारच्या वृथा कल्पना लोकस्फीतीच्या व पंडितंमन्यतेच्या जोरावर बालिशपणानें करणें म्हणजे अखंड सूर्यतेजाला काजव्यानें स्वतेजाच्या जोरावर अंधतमस म्हणणें होय. हे लोक दुष्ट आहेत हें त्यांस व त्यांच्या अनुयायांस कळत नाहीं. असो; पण यांच्या बडबडीनें काय होणार? 'युगायुगाचे ठायीं मी धर्मसंस्थापनेसाठीं अवतार घेत असतों' ह्या वज्रभेदी भगद्वचनापुढें आमच्यांतील धर्मशून्य वृथापंडितांच्या वाष्कळ प्रजल्पना क्षणैक टुरटुर करून पुनः शून्याकाशांत जाऊन मिळतीलच मिळतील. असो; तेव्हां हा तिसऱ्या व्याख्यानांतील योगमार्ग **अनादि** आहे, व अज, अव्याकृत, ब्रह्मस्वरूपी परमेश्वराचे अवतार योग्य वेळीं ह्या सनातन धर्माचा विशेष बालबोध करण्यासाठीं नियमानें होत असतात, हें ज्या पुरुषाच्या हृत्पटलावर खोल खोदलें गेलें आहे, त्या पुरुषाला योग्य काळीं योग्य ज्ञान होऊन तो योग्य आचरण करील आणि कैवल्यमुक्तीचा अनुभव घेईल व आपल्या अनुयायांसही तो घेण्याचा मार्ग दाखवील; असा प्रोत्साहनकारी धर्मपंथ ( Religion ) १ ते ९ श्लोकांत आला आहे. या अध्यायांत कर्मयोगाची प्रशंसा कर्मयोग व ज्ञानयोग यांचें एकत्व आणि या योगाची अनादिसिद्धि हे विषय आहेत हें सांगावयास नकोच.

## कर्मानुरूप फल मिळतें.

हा विषय १० ते १६ श्लोकांमध्यें आला आहे. 'कर्माप्रमाणें फल मिळणें हें योग्य आहे,' हा सिद्धांत मंदबुद्धीच्या, आळशी व अज्ञानग्रस्त लोकांशिवाय इतर सर्वांस पसंत होईल; कारण हा सिद्धांत म्हणजे, वस्तुस्थितीचें प्रतिपादन आहे. "सर्व लोक माझेंच आराधन करितात; कारण मीच विश्व, विश्वपति व सर्व पुरुषार्थ आहें. आतां, जशी भावना धरून माझे भक्त माझी आराधना करितात, त्या त्यांच्या भावनेप्रमाणें मी त्यांस तसे फल देतों. येथें पक्षपात नाहीं. अधिकाराप्रमाणें योग्य भावना धरण्याचें स्वातंत्र्य प्रत्येकास आहे. योग्य कर्म करून योग्य फलेच्छा केली तर ऐहिक संपत्ति मिळते व फलेच्छा सोडून दिली तर परमार्थ साध्य होतो. एवंच योग्य कर्मवृत्ति धारण केली तर उन्नति होते, अयोग्य भावना केली तर अवनति होते. याप्रमाणें पूर्वकर्मानुसार जे जे गुण मनुष्यास ( इतर प्राण्यांचा विचार कर्तव्य नाहीं ) प्राप्त झाले असतील, त्यांचा सदुपयोग स्वस्वातंत्र्यानें त्यांनीं केला म्हणजे त्यांस निवृत्तिमार्गाकडे जातां येतें. हीं पूर्वकर्में सुद्धां त्यांचीं त्यांनींच निर्माण केलीं आहेत. अमुक गुण प्राप्त झाले असतां मनुष्यानें अमुक आचरण करावें हें मात्र धर्मानें (Religion) ठरविलें आहे. याप्रमाणें गुण प्राप्त झाले, कर्म विहित झालें, तरी

पूर्णस्वातंत्र्यामुळें व त्याच्या जोरावर पूर्ण असतांना, अशी परिस्थिति असतांही, तात्कालिक लाभासाठीं जर सात्त्विक लोक रजोगुणांत अगर तमोगुणांत शिरूं लागतील, तर त्यांस राजस अगर तामसच फल मिळावयाचें! सारांश, मी ईश्वर असूनही कांहीं करीत नाहीं, साक्षित्वानें सर्व व्यवस्था लावितों व हेंही मी सर्व करितों तें विश्वोद्धारासाठीं निस्पृहपणानें करीत असतों, हें ज्याला समजतें त्याला प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याचा खरा उपयोग करितां येऊन अंतीं तो मुक्त होतो. अर्जुना! पूर्वीच्या लोकांनीं हें ज्ञान संपादन केलें व मुक्त झाले." हा उपदेश उत्तमोत्तम आहे असें कोण-म्हणणार नाहीं? सारांश, योग्यतेप्रमाणें कर्म करून फलाशा व कर्तृत्वाभिमान ही जोडी ठेविली नाहीं आणि स्वातंत्र्याच्या साहाय्यानें निवृत्तिपंथ स्वीकारला म्हणजे गुरुकृपेनें व भगवदनुग्रहानें मुक्ति मिळतें. कर्मानुसार फल मिळतें हें तत्त्व आधुनिक अनुभवशास्त्रास पूर्णपणें संमत आहे हें सांगावयास नकोच.

## पुनर्जन्म.

पुनर्जन्माचें मत स्वीकारलें म्हणजे ख्रिस्ती किंवा मुसलमानी धर्माप्रमाणेंच आमच्याही धर्मावर जो एक आक्षेप येण्याचा संभव असतो, तोही नष्ट होतो. पुनर्जन्म मानिला नाहीं तर या पृथ्वीवरील समाजांत श्रीमंत-गरीब, ब्राह्मण-शूद्र, विजयी-विजित, काळा-गोरा, असा विषमभाव व कोणी सुखी तर कोणी दुःखी असा तारतम्यभाव, सारांश असा पक्षपाती व असा दयाशून्य भाव, कां उत्पन्न व्हावा याचें उत्तर यथास्थित मिळत नाहीं. या जन्मांत दुष्कर्म केल्यास दुष्ट मनुष्य शिक्षेस पात्र होतो हें ठीक आहे; पण एका जीवाची परिस्थिति जन्मतःच श्रेष्ठ कां असावी व त्याच दिवशीं जन्मलेल्या दुसऱ्या मनुष्याची परिस्थिति कनिष्ठ कां असावी? सर्व प्रकारच्या पापी लोकांस एकच शिक्षा कां आणि सर्व प्रकारच्या पुण्यशालांस एकच बक्षीस कां? या व इतर प्रश्नास सोपपत्तिक उत्तर ख्रिस्ती धर्मानें अथवा पुनर्जन्म ज्या लोकांस मान्य नाहीं त्यांच्या मतानें देतां येत नाहीं असें मला वाटतें. परमेश्वर तर निर्लेप आहे. तेव्हां अनुकूल अगर प्रतिकूल परिस्थितीचें कारण जीवाच्या पूर्वकर्मांतच शोधिलें पाहिजे. येथें दुसरी तोड निघणें अशक्य आहे. पुनर्जन्म नसेल तर म्हणजे पुनर्जन्माची कल्पना मान्य नसणाऱ्या पुरुषाला त्याच्या समजुतीनें, यदृच्छेनें प्राप्त झालेल्या प्रतिकूल परिस्थितींतही उत्तम प्रकारचें सात्त्विक अथवा निवृत्तिपोषक आचरण करणारा तो पुरुष जगद्वंद्य होतो हें मला कबूल आहे; पण सात्त्विकवृत्ति म्हणजे काय हेंच समजण्याचें साधन ज्याला प्राप्त झालें नाहीं, त्या बिचाऱ्या हजारों लोकांची वाट काय? असल्या सामान्य पुरुषांस प्रतिकूल स्थितींत जन्म घालणें म्हणजे परमेश्वरानें आपलें नैर्घृण्य निष्ठुरपणें प्रकट करणें होय. एवंच ज्या धर्मांत जीवाची सदसद्विवेकबुद्धि व त्यास मिळणारें स्वातंत्र्य हीं अनादिपूर्वकर्मांमुळें क्रमाक्रमानें व वर्तमान कर्मानुसार जास्त विकसित अगर जास्त

संकुचित होत जातात, असा स्पष्ट किंवा अस्पष्ट सिद्धांत नाहीं, त्या धर्मास ईश्वराचें निर्विकारत्व सिद्ध करितां येत नाहीं, आणि म्हणूनच कर्माप्रमाणें फल मिळतें या अबाधित सिद्धांतास त्या त्या धर्मांत बाध येऊं लागतो. असो;

## ईशप्राप्तीचे उपाय.

नवव्या श्लोकांत भगवत्प्राप्तीचे उपाय सांगितले, त्याचेंच स्पष्टीकरण दहाव्या श्लोकांत झालें. कामक्रोधभयशून्यता व परमेश्वरमयत्व साध्य करून घेऊन परमेश्वर हाच ज्यांनीं शरण्य केला, अशा (१) चित्तशुद्ध झालेल्या साधूंस जर (२) ज्ञानतपाची जोड मिळाली, तर ईशप्राप्तीस काय उशीर आहे? 'येथें पूर्ण विश्वास ठेवून अनन्यभावानें व ज्ञानतपश्चर्येनें निरंतर ध्यानपुरःसर ज्याला आपण शरण जातों, तत्स्वरूप आपण होतों,' 'हा मानस व भौतिकशास्त्रांस एकवट करणाऱ्या सृष्टीच्या शास्त्राचा, प्रकृतिशास्त्राचा एक अपूर्व सिद्धांत सांगितला आहे, व त्याचेंच स्पष्टीकरण अकराव्या श्लोकांत केलें कीं, '**जसा भाव तसा देव**' असतो व तो देव भक्तांस तसें वागवितो. आणि याप्रमाणें विषमता व निर्घृणता हे दुष्ट गुण परमेश्वरास न शिवतां जीवांकडेसच त्यांची रवानगी होते. नंतर, मनुष्यें परमेश्वराकडे कां जात नाहींत याचें उत्तर बाराव्यांत व तेराव्यांत आहे. गुणकर्मांप्रमाणें वर्ण प्राप्त होतो; वर्णाप्रमाणें मनोवृत्तीची रचना असते; आणि शिवाय स्वभावतः अज्ञानी जीवाला, लवकर फलप्राप्ति होइल, तेंच काम करावेंसें वाटतें. ही मनोवृत्तीची रचना आणि लवकर लवकर फल मिळण्याची हौस या दोन कारणांनीं म्हणजे अज्ञानानें मनुष्य तामसी गुणांत शिरतो व दुःख भोगितो. हें दुःख म्हणजे एक उन्नतीची शाळा आहे. या शाळेचा अनुभव घेऊन **विचारी** पुरुष शहाणा होतो व उन्नतीच्या मार्गाला लागतो. असो, सृष्टिनियंत्या परमेश्वराच्या नियमानुरूपच ही व्यवस्था आहे. प्रत्येक जीवाची व विशेषतः मनुष्यजीवाची प्रवृत्ति उन्नति करून घेण्याकडे असते, हा अधुनिक उत्क्रांतिवादाचा सर्वसाधारण सिद्धांत येथें दिला आहे, हें वाचकांच्या सहजच लक्षांत येईल. असो; हे नियम करणारा पुरुषोत्तम अकर्ता, अव्यग्र, निर्लेप व निस्पृह असा आहे. हा शिवशास्त्रांचा सिद्धांत झाला. हें जाणणारा व कर्म करितांना परमेश्वराचें अनुकरण करणारा पुरुष कर्ममुक्त होतो हें धर्मशास्त्र, आणि पंधराव्या श्लोकांत दिलेला ऐतिहासिक सिद्धांत, हे उभयतां मुक्तिमार्गाचे कर्मप्रेरक आहेत असें सांगून अर्जुनाची प्रवृत्ति तिकडे वळेल असें केलें. एवंच, परमेश्वरास शरण जाऊन निष्कामतेनें व ज्ञानपूर्वक कर्म केलें असतां तें कर्म बद्धक होत नाहीं, असा पूर्वाध्यायगत परमेश्वरी कर्मयोगाचा सिद्धांत पुष्ट केला आहे.

## कर्म म्हणजे काय?

आतां कर्म म्हणजे काय याचा थोडक्यांत विचार करूं. आचार्यांचें विस्तृत स्पष्टीकरण ज्यांनीं सावधानपूर्वक वाचेलें आहे, त्यांस कर्म म्हणजे काय हें

उत्तम तऱ्हेनें समजलें आहेच ! मला लिहावयाचें आहे तें माझ्यासारख्या सामान्य वाच-कांसाठींच होय ? असो; भगवान् ह्मणतातः ' हें कर्माकर्म उत्कृष्ट तऱ्हेनें समजून तदनुसार वर्तन झालें कीं, प्राणी प्रपंचांतून मुक्त होतो. ' ज्ञान आणि ज्ञानरूप वर्तन यांचा महिमा व्यवहारांतही असाच आहे. जो खरा मुमुक्षु आहे म्हणजे ज्याचा अभिमान विगलित झाला आहे व फलाशा नष्ट झाली आहे, त्याचें कर्मही वस्तुतः ब्रह्मदृष्टीनेंच केलें असल्यामुळें निष्कर्म होतें. पण **मी कांहीं करीत नाहीं** असा ज्याला अभिमान झाला, त्याचें कर्मशून्यत्वही **सकर्मक** होतें ! तसेच ज्याची दृष्टी ब्रह्ममय झाल्यामुळें आपपरभाव नष्ट झाला आहे, तो **कर्म करीत असला तरी निष्क-र्मशीलच राहतो.** ह्या सिद्धांत १८ वे श्लोकांत सांगून पुढें २४ श्लोकापर्यंत वरील कर्म ब्रह्मप्राप्ति करून देण्यास उत्तम साधन आहे अशी या निष्कर्म कर्माची प्रशंसा भगवंतांनीं केली आहे. येथें ध्यानांत ठेवावयाची गोष्ट ही आहे कीं, निष्कर्मकर्म अथवा ब्रह्मयज्ञ हा तेव्हां सिद्ध होतो कीं, जेव्हां कर्ता आशाशून्य, अभिमानशून्य, मनोजयी, विषयविरक्त समाधानी, विमत्सरी, द्वेषशून्य, शांत आणि ज्ञानैकदृष्टि असतो; म्हणजे त्याचें सर्व कर्म ' यज्ञ ' स्वरूपी म्हणजे स्वार्थत्यागपूर्ण असें होऊन तें सर्व कर्म फलशून्य व चित्त-शोधक होतें. ज्याला इंग्लिश भाषेंत disinterested actions ( स्वार्थशून्य कृत्य ) म्हणतात, त्या कृत्यापेक्षांही साम्यावस्थेंत असणाऱ्या पुरुषाचें कर्म मूल्यवान् असून तें पुरुषार्थसिद्धीस सोईचें होतें.

### पुरुषार्थ कोणता ?

युरोपियन नीतिशास्त्रांत स्वार्थी, परार्थी, कर्तव्यकारी ( आत्मप्रत्यक्षवादी ) आणि पुरुषार्थकारी (शिवस्वरूपकारी) असे नीतिमूलक सिद्धांताचे चार विभाग आहेत. Egoistic Hedonism, Universal Hedonism, Intuitionism and perfection ? अशीं यांचीं पाश्चात्य नांवें आहेत. यांपैकीं स्वार्थ आणि परार्थ ह्या दृष्टीनें गीतेंत प्रकट झालेला नीतिमार्ग श्रेष्ठ आहे हें कारणांसह तिसऱ्या अध्यायांत सांगितलें. आतां कर्तव्यकारी व पुरुषार्थकारी कर्मांचा विचार करावयाचा. आपलें कर्तव्य काय आहे हें ठरविण्याच्या अगोदर आपला पुरुषार्थ काय, आपल्यास इष्टतम गोष्ट कोणती, हें ठरविलें पाहिजे. युरोपियन नीतिशास्त्राचा उदय खिस्तप्रेरणेवरून झाला असल्यामुळें, त्यांच्या नीतिशास्त्रांतील पुरुषार्थ म्हणजे खिस्तभक्ति करून व खिस्तमार्गाचें अवलंबन करून व शेवटीं परमेशापाशीं जाऊन तेथें त्याची अहर्निश सेवा करणें हा आहे. आमचे द्वैतवादी हेंच म्हणतात. कृष्ण अगर हरीच्या जागी खिस्ताची योजना आहे इतकाच काय तो फरक आहे. पण वेदांतशास्त्राचा हा सिद्धांत आहे कीं, जोपर्यंत ईश्वर श्रेष्ठ व मी कनिष्ठ असें ज्ञान आहे, तोपर्यंत आशाबीज व अभिमानबीज पूर्णत्वानें नष्ट होत नाहीं व ह्मणून पूर्णसुख

अथवा सुखरूपता मिळत नाहीं. पूर्णसुख मिळण्यास तद्रूपताच नव्हे तर तदेकता किंवा केवळ ब्रह्माशीं तादात्म्यच झालें पाहिजे. तेव्हां जोपर्यंत '**एकमेवाद्वितीयम्**' ( तें ब्रह्म एकच आहे; अद्वितीय आहे ) हें अतींद्रियज्ञान मिळविण्याची योग्यता आली नाहीं, तोंपर्यंतचें सर्व तत्त्वज्ञान, पुरुषार्थ व तदनुषंगी सर्व नीतिशास्त्र हीं अपूर्णच रहावयाचीं. 'अहं ब्रह्मास्मि' ( मी ब्रह्म आहें ) हाच कायतो एक स्वयंभू पुरुषार्थ आहे. बाकीचे पुरुषार्थ गौण व त्यांचीं साधनें हीं अनित्य असतात असो; विश्वज्ञान व तत्त्वज्ञान यांचा विचार क्षण-भर एकीकडे ठेऊन व केवळ आचरणाचा उहापोह कर्तव्य आहे असें गृहीत घेऊन आपण विचार करूं या. असा विचार केला तर असें दिसेल कीं, ज्ञानपूर्वक स्वार्थसाधना-पासून तों सर्वस्वत्यागापर्यंतचीं आचरणें आहेत. या उत्तरोत्तर श्रेष्ठ मानिलेल्या आचरणांत **त्यागाची** महति दिसून येते. आणि शेवटीं जेव्हां सर्व विषयत्याग होतो, तेव्हां नीतीचें व धर्माचें साम्राज्य संपूर्ण होऊन तेथून वरील प्रदेशांत अद्वैत सिद्धीचा एकच मार्ग उरतो. आजची पोळी उद्या खावी ' येथें **विचारपूर्वक स्वार्थसाधन** सुरू होतें; ह्मणजे **त्यागास** किंवा २३ व्या श्लोकांत सांगितलेल्या '**यज्ञास**' सुरवात होते. हा त्याग वाढत गेला, कुटुंबाकारितां, मनःशुद्धीकारितां, समाजाकारितां, नीतीसाठीं, विश्वाकारितां, देवाकारितां व धर्मार्थप्रीत्यर्थ विषयोपभोगाचा अधिकारानुसार त्याग करावयाचा अशी क्रमाक्रमानें त्यागास उन्नतावस्था प्राप्त होत चालली, शेवटीं **स्वाभिमानाचा व फल-तृष्णेचाही** त्याग झाला, ह्मणजे तो त्यागी पुरुष ब्रह्मविद्येच्या अध्ययनास अधिकारी होतो. पुढें विषयच निर्विषय झालें ह्मणजे त्याचें सर्व कर्म केवळ **कर्तव्यतापरत्वानें** व **पुरुषार्थदृष्टीनें** होत असतें आणि ह्मणून तें कर्म कर्त्यास बाधक होत नाहीं. याप्रमाणें कर्मच स्वतः स्वार्थशून्य झालें म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें धर्म-नीतीचें राज्य संपतें. पुढें ज्ञानाच्या राज्यास आरंभ होतो. ब्रह्मज्ञान सिद्ध झाल्याविना नीतीस व धर्मास पूर्णत्व येत नाहीं. असो; ब्रह्मदृष्टीनें पाहिल्याशिवाय नीतीस पूर्णता येत नाहीं, कारण ब्रह्मप्राप्ति हा पुरुषार्थ आहे. ब्रह्मज्ञानानें ब्रह्मप्राप्ति होते. अर्थातच ब्रह्मज्ञान हा पुरुषार्थ झाला. आतां ब्रह्मज्ञान म्हणजे पुरुषार्थ काय आहे, हें कळल्याखेरीज इष्ट काय आहे हें समजल्यावांचून, ' करावयाचें काय ? ह्मणजे उत्तम नीति कोणती ! हेंही समजणार नाहीं, हें जर वाचकांच्या लक्ष्यांत स्थिरपणानें वागेल तर पुष्कळच कार्य होईल. आजतागा-ईत जगांमध्यें जीं नीतितत्वें प्रकट झाला आहेत, त्यांची पुरुषार्थसीमा आकुंचित अस-ल्यामुळें तीं तीं नीतिशास्त्रें अपूर्ण, असंबद्ध—आणि कधीं कधीं अनर्थोत्पादीही,—अशी झालीं आहेत. गीताशास्त्रकारास सर्वज्ञ ह्मणावयाचें याचें कारण हेंच कीं, आजपर्यंत जे नीतिमार्ग व धर्मपंथ ह्मणून स्थिरत्वानें प्रकट झाले आहेत, किंवा पुढें जे होतील त्या सर्वांचा अंतर्भाव गीताशास्त्रांत असून त्या सर्वांचें एकीकरण करील असा प्रगल्भ मार्ग गीताशास्त्रांत सांगितला आहे. सारांश, गीताशास्त्रांतील त्यागमूलक कर्तव्यपरता व ' [illegible]हाच ब्रह्म आहे,' हा पुरुषार्थ, हीं श्रेष्ठ आहेत.

## जसा अधिकार तसा मार्ग.

आतां कोणाही सुज्ञ वाचकास साहजिकतःच अशी शंका येईल कीं, इतका उत्तम तत्त्वसंग्रह व इतकी उत्तम नीति व इतका उत्कृष्ट धर्म आम्हांस लाधला असतांही आम्ही मागासलों कां ? त्याला उत्तर असें आहेः अधिकाराप्रमाणें योग्य मार्ग दाखविण्याची योजना करावयाची हें ज्ञान ज्या दिवशीं आमच्या लोकाग्रणींमधून लुप्त झालें, त्या दिवशीं आमचा समाज भ्रष्ट होण्यास सुरवात झाली. आतां तर काय ? वेदांताच्या गप्पा मारणारें पंडितांचें आचरण कधीं कधीं अत्यंत नीचयोनींतील अज्ञपुरुषासही किळस व शहारे आणील असें होत आहे ! आणि इकडून स्नानसंध्यादि कर्में करण्याची प्रेरणा अनधिकारी लोकांस होत आहे ! असा सर्वच घोंटाळा उडून गेला आहे. या सर्वांचें कारण अज्ञानी आणि अनधिकारीलोकांस श्रेष्ठ मार्गाचा उपदेश हें होय. तथापि आपली अवनति अद्यापि इतक्या अतलगर्तेत जाऊन पडली नाहीं कीं, जेथून पुनः उन्नति होणें अशक्यच आहे. सुधारणेच्या सामर्थ्यास आपण व्यक्तिशः व सामाजिकतः अद्यापि गोचर आहों. ही आनंदाची सुवार्ता आहे. सारांश, आपण खास सुधारूं असा भगद्वचनावरून दृढग्रह होणें शक्य असल्यामुळें, आपण स्वतः व इतरांनां सुधारावें व सुधारण्यास गीतामार्गच बालबोध आहे, हें सांगावयाचें मी धारिष्ट करीत आहें. गीताशास्त्रांतील नीतिशास्त्र इतर सर्व नीतिशास्त्रांत वरिष्ठ आहे, असें ह्मणण्यानें व या दर्पोक्तीनें जो योग्य अभिमान उत्पन्न व्हावयाचा, तो तर व्हावाच, पण त्या अभिमानाचें पर्यवसान केवळ बोलण्यामध्येंच न होतां आपल्या देशांत प्रकट झालेल्या गीताशास्त्राच्या अभिमानाचें रूपांतर सात्विक आचरणामध्यें परिणत व्हावें. आपली सध्यां तमावस्था आहे. यांतून रजावस्था व शेवटीं शुद्ध सात्विक अवस्था अशा पायऱ्यांनीं आपल्यास स्वतः व सामाजिकतःच सर्वांनीं मिळून गेलें पाहिजे. अशा दृष्टीनें ज्या दिवशीं गीतेचा अभ्यास करणारे लोकनायक गीताशास्त्राची चर्चा, अधिकार पाहून, करावयास लागतील तोच खरा सुदिन होय.

### इतर यज्ञ. (फलोत्पादि त्याग.)

असो; याप्रमाणें कर्माभिमान व कर्मफलाशा सोडून केलेलें कर्म तेंच सत्कर्म अथवा निष्कर्म होय, असें सांगून यज्ञास ह्मणजे अल्प विषयत्यागास प्रथम सुरवात केली. ह्मणजे फलोत्पादक यज्ञांची मीमांसा सुरू केली. पुढें २५ ते ३३ श्लोकांत ज्यांच्या योगें आपल्यास ज्ञान होतें अशीं ज्ञानेंद्रियें, ज्यांच्या द्वारां आपण कर्म करितों, तीं कर्मेंद्रियें, ज्यांच्यामुळें आपली प्राणक्रिया अथवा श्वासोच्छ्वासक्रिया, रक्ताभिसरण इत्यादि सहज स्थितीनें होतात, तें पंचप्राण व पंचउपप्राण इत्यादिकांचा ज्ञानतः पण फलाशेनें त्याग करणाऱ्या यतींचा निर्देश करून हे सर्व यति प्रथम ज्ञानानें व पुढें फलदर्शनें निर्मळ होतात आणि यज्ञ करून अवशेष राहिलेल्या

कालांत जर ते यति ब्रह्मज्ञानसंपादनाचा साक्षात्कारापर्यंत अभ्यास करतील, तर त्यांस ब्रह्मावगति होईल, असें भगवान् म्हणतात. येथें यागशास्त्रांतील व योगशास्त्रांतील अनेक विषयांचा व सिद्धांताचा अवतार २५-३३ श्लोकावर्लीत लीलेनें आला आहे. सारांश, याग्ययोगादि सर्व कर्में कर्मापासूनच उत्पन्न होतात व निरभिमानानें व आशाशून्यत्वानें त्या कर्मांची ज्ञानपूर्वक सांगतासिद्धि केल्यास हीं कर्में चित्तशोधनास कारण होतात. हें त्या अवताराचें तात्पर्य आहे. जो यज्ञ म्हणजे त्याग करीत नाहीं त्या सुखैकलंपट पुरुषाची इहलोकची यात्राही सफल होत नाही, असें पुनः एकवार सांगून, ज्ञानयज्ञ सर्वांत श्रेष्ठ आहे, ज्ञानयज्ञ सिद्ध झाला म्हणजे मात्र कर्म संपतें, असा विषय ३१।३२।३३ श्लोकांत आला आहे तो सिद्धांतदर्शी म्हणून मनोहर होय.

## ही ज्ञानप्राप्ति.

सद्गुरूला शरण जाऊन, त्याची सेवा करून, त्यास विचारून मात्र होणारी आहे. घरीं बसून हें ज्ञान मिळावयाचें नाहीं. अनन्यभावानें गुरूला शरण गेलें व त्याची सेवा करून त्यास प्रसन्न करून घेतलें, त्या भास्करापासून आपलें सर्व शंकारूपी तिमिर नष्ट केलें, तरच भागवत-कर्म-योग्याला हें अद्वैतज्ञान प्राप्त होतें. या ज्ञानाला विज्ञानस्वरूप आलें, 'ब्रह्मच काय तें आहे,' असा साक्षात्कार झाला म्हणजे

## फलप्राप्ति काय होते ती पहाः

( १ ) मोहाचा नाश होतो, ( २ ) सर्व भूतें आत्ममय होतात, ( ३ ) पापसमुद्र ( द्वैताभास ) आटून जातो, ( ४ ) ज्ञान मिळून साक्षात्कार होतो; सारांश कैवल्य-मुक्ति मिळते. म्हणून ज्ञानासारखी वस्तु नाहीं. योगी व आधुनिक निसर्गशोधक शास्त्री, हे ज्ञान संपादितात खरें, पण हें **विषयज्ञान**, हें प्रकृतिविषयक ज्ञान, आहे. अद्वैतज्ञानापुढें या प्रकृतीच्या ज्ञानाची मातब्बरी ती किती! सूर्यप्रकाश आणि दिवलीचा प्रकाश यांमध्यें जें अंतर त्यापेक्षां अनंतपटींनें जास्त अंतर आत्मज्ञान आणि प्रकृतिज्ञान यांच्यामध्यें आहे. यावरून प्रकृतीचें अगर मानवी स्वभावाचें ज्ञान कुच किंमतीचें आहे, असें मात्र समजावयाचें नाहीं. आमचे अलीकडील कांहीं पूर्वजांनीं प्रकृतीच्या ज्ञानास अजीबात फांटाच दिला म्हणून प्रकृतीनेंही आम्हांस हाताबाहेर टाकून दिलें आहे! हा विषय निराळा; सांगावयाचें तात्पर्य हें कीं, प्रकृतीचें शुद्ध, युक्तिसिद्ध असें सप्रमाणज्ञान जितकें जितकें जास्त वाढत जाईल तितकें आपलें चित्त लीलेनें शुद्ध होऊन भगवंताचें व नंतर ब्रह्माचें ज्ञान स्पष्टरीतीनें आपल्यास संपादतां येईल; म्हणजे प्रकृतिज्ञानांतच तत्त्वज्ञानाची 'इतिश्री' होते जरी असें नाहीं; तरी पण तत्त्वज्ञान नीट समजण्यासाठीं प्रकृतिज्ञानाची, पुरुषज्ञानाची, व विद्याकलाज्ञानांची

आवश्यकता अत्यंत आहे. आतां प्रकृतिज्ञान आणि ब्रह्मज्ञान यामध्यें विरोध आहे असें नास्तिक, उतावळे अनुभवशास्त्री आणि मंदबुद्धीचे भाविक लोक समजतात. हा निव्वळ भ्रम आहे. विश्वाचें ज्ञान जितकें जास्त संपादवेल तितका चित्तशोधनास व पुढें ब्रह्मज्ञानास जास्त उपयोग होईल. श्रीकृष्ण ३८ वे श्लोकांत म्हणतात तिकडे पुष्कळ लोकांचें लक्ष्य जात नाहीं हा आपला दोष होय. **योग ज्या पुरुषाला उत्तम साधला आहे, त्याला कालांतरानें अद्वैतज्ञान प्राप्त होतें.** योग म्हणजे *विषयाचें ज्ञान, इंद्रियाचें ज्ञान, प्राणांचें ज्ञान करून घेऊन या सर्वांस आपल्या सामर्थ्यानें वश करून घेणें आणि त्या सर्वांची एकवाक्यता करून ब्रह्माशीं समन्वय करणें, हा-योग-होय.* तात्पर्य, प्राणांचें, बाह्य विषयांचें व अंतर्विषयांचें ज्ञान व त्या सर्वांस वश करण्याचें सामर्थ्य ज्याला प्राप्त झालें, तो योगी मात्र आत्मज्ञानासंबंधें श्रेष्ठ अधिकारी होतो. असो; हें आत्मज्ञान प्राप्त झालें, सर्वत्र सूर्यकोटीप्रकाश पडला म्हणजे जीवास पीडा देणारे अनंत प्रकारचे मोह असतात, त्यांचा नाश होतो, विश्वांतील पदार्थ मात्र आपणच आहोंत, परमेश्वरही आपणच आहोंत,या प्रकारची वृत्ति होऊन नंतर सर्व भेदभावना नष्ट होतात, पापाचा लेशही राहत नाहीं आणि येणेंप्रमाणें सर्व संसारयात्रा संपून जाते. तेव्हां हें अद्वैत-ज्ञानविज्ञान ज्यांच्या योगानें प्राप्त होतें असें अंतर्बाह्य विश्वज्ञान आणि निष्काम व निरभिमान कर्म यांचा योगाभ्यासानें दृढ परिचय करून घेऊन जो मोक्षमार्गास लागला, त्याचा मार्ग कालांतरानें म्हणजे योग्याधिकार प्राप्त झाल्यावर सोपा होतो व पुढें तो मुक्त होतो.

## परंतु ज्ञान होण्यास श्रद्धा अवश्य हवी!

अलीकडे सुधारणेच्या काळांत श्रद्धा हा शब्द उच्चारल्याबरोबर विद्वान् व शहाणे म्हणवून घेणाऱ्या मनुष्यांच्या कपाळास आंठ्या चढतात! एकादृष्टीनें अनुभवाशिवाय श्रद्धा ठेवणें वेडेपणाचें होतें, व आमच्या पूर्व पिढ्यांतील लोकांच्या मनावर अंधश्रद्धेनें साम्राज्यच बसविलें होतें म्हणून पुष्कळ अनाचारही झाले हें कोणासही नाकबूल करवणार नाहीं. असा प्रकार झाला, म्हणजे अतिश्रद्धेच्या योगानें अत्याचार झाला, म्हणून येथून तेथून श्रद्धेस हद्दपार केलें पाहिजे असा हट्ट धरिला तरी इकडूनही अनर्थ होण्याचा संभव आहे! एका जांवयानें आगळीक केली म्हणून राज्यांतील सर्व जांवायास सुळावर चढविणाऱ्या बादशहासाठीं सोन्याचा व आपल्या साठी रुप्याचा सूळ करून व हे दोन्ही सूळ (१) बादशहाच्या सासऱ्याच्या जांवयाकरितां व (२) बिरबलाच्या श्वशुराच्या जामाता करितां आहेत असें सांगून बादशहाचें वेड उतरविणाऱ्या बिरबलाप्रमाणें कोणी चाणाक्ष पुरुषानें संशयवाद्यांची खोड निःसंशय मोडिली पाहिजे. असो; श्रद्धा नसेल तर एक क्षणभरही आपला व्यवहार सुरळीत चालावयाचा नाहीं. नवऱ्याची बायकोवर, बायकोची नवऱ्यावर, मुलांची आईबापांवर, आईबापांची मुलांवर, शेत्यांची शेत्यांवर, यजमानचाकरांची परस्परांवर, गिऱ्हाईक-दुकानदारांमध्यें, सावकार-ऋणकोमध्यें व प्रजेची राजावर व राजाची प्रजेवर, श्रद्धा नसेल तर

एक क्षणभरही कुटुंब, समाज किंवा राज्य यांस स्वास्थ मिळणार नाहीं. माजी प्रधान बाल्फरसाहेब यांनीं श्रद्धा या विषयावर सुंदर निबंध लिहिले आहेत ते आमच्या इंग्लिश मित्रांनीं अवश्य वाचावे; कारण यांत बुद्धीचे दोन भाग जे ज्ञान आणि श्रद्धा यांच्या सापेक्ष-संबंधाचा उत्तम विचार केला आहे. यावरून हे स्पष्ट होईल कीं, अविचारी श्रद्धा जितकी घातकारी आहे, तितकीच अविचारी श्रद्धाशून्यताही घातकारी आहे. शिवाय, साक्षात् परिचय घेण्यासारखी स्थिति असून किंवा अनुभव येत असून सुद्धां श्रद्धा न ठेवणें किंवा श्रद्धेयगोष्टींचा अनुभव न घेणें म्हणजे डोळे उघडे असूनही अंधळ्यासारखें वागणें असें कित्येकवेळीं होत असतें, हा अतिरिक्त श्रद्धाशून्यतेचा किंवा संशयात्मत्वाचा प्रभाव आहे. आप्त म्हणजे यथार्थवक्ता, याच्या वचनावर श्रद्धा ठेविलीच पाहिजे. सर्वकामपरिपूर्ण असा जो सर्वज्ञ परमेश्वर त्यानें मनुष्यांच्या-सर्व जीवांच्या कल्याणार्थ जे नियम करून ठेविले आहेत त्यांवर आपण श्रद्धा ठेविली नाहीं, तर आपल्या **विचारपद्धतीला** तरी कोणत्या आधारानें श्रद्धेय समजावयाची? 'मनुष्य स्वार्थाप्रमाणेंच केव्हां केव्हां परार्थासाठीं उद्योग करितो तेव्हां त्यास सुखच झालें पाहिजे,' असा भगवत्सिद्धांत आपण अश्रद्धेय समजलों तरी नवऱ्याकरितां बायको व बायकोकरितां नवरा, मुलाकरितां आईबापें इत्यादि मनुष्यें निष्काम-बुद्धीनें स्वार्थत्याग करीत असतांना त्यास परमसुख होत असतें, हें आपल्यास धडधडित दिसतें ना? वाचकहो! स्वार्थत्याग करण्याची वेळ आली असून आपण जवळ नसल्यास त्यांस अतिशय दुःख होतें, असा अनुभव नित्यशः येत असूनही निष्काम स्वार्थत्याग हा सुखकारक आहे अशी ज्यांची समजूत पडत नाहीं, गुरूंवर व सद्ग्रंथांवर, विश्वास बसत नाहीं आणि म्हणून जे मोक्षपर न होतां संसारी बनतात; इंद्रियांस आपल्या स्वाधीन करून न घेतां आपणच उपभोगबुद्धीनें त्यांचे दास होतात; त्यांच्या मनाचें समाधान होणें, मनाची तळमळ नाहींशी करणें, मनाला परम शांति मिळणें, या महत्सुख लाभांची जोड त्यांस केव्हां मिळणार! सर्वथा या सुखांस ते बिचारे आंचवतात! उलटपक्षीं अनुभवानें दृढ होणाऱ्या सिद्धांतांवर विश्वास ठेऊन जे मोक्षपर होतात, इंद्रियांचें दमन करितात, त्या लोकांस ज्ञान मिळून शांतिसुखही मिळतें. विचारी श्रद्धा आणि अविचारी अश्रद्धा अगर संशयी स्वभाव यांच्यामध्येही अर्थातच हा फरक आहे. अश्रद्धेचा अतिरेक झाला, प्रत्येक गोष्टीविषयीं मन संशयाकुल होऊं लागलें, म्हणजे त्या श्रद्धाशून्य पुरुषाला ह्या लोकींही सुख लागत नाहीं; मग परलोकीची गोष्ट कशाला?

## म्हणून असें करावें कीं

चित्तशुद्धि करून व मोक्षाचा मार्ग सोपा करणारें निष्कामकर्म करून कर्मसंन्यास करावा, म्हणजे सकाम व साभिमान कर्मांचा त्याग करावा; जे काय आपल्या मनांत संशय असतील त्यांचे निरसन ज्ञानवंत पुरुषांकडून व ज्ञानमार्गोपदेशक सद्ग्रंथांकरवीं साधक-बुद्धीनें, श्रद्धापूर्वक, करून घ्यावें आणि सदैव आत्मचिंतनपर असावें. अशा पुरुषास कर्मांची

बाधा होत नाहीं. "अर्जुना! केवळ अज्ञानामुळे तुझ्या मनांत जें विहितधर्माविषयीं संशयाचें काहूर उठलें आहे; बाबा! जो संशयरूपी राक्षस तुझ्या मनोभूमीवर स्वैरसंचार करीत आहे, त्याचा ज्ञानरूपी खड्गानें नाश करून टाक व मीं तुला जो निष्काम कर्मयोग सांगितला आहे तो श्रद्धापुरःसर करावयास लाग. आणि दुष्टांचा व दुष्टानुकूल पुरुषांचा नाश करावयाचा हें क्षत्रियाचें जें कर्तव्य आहे, जो धर्म आहे, तो तूं समजून घे व निष्काम कर्तव्यकर्म मोक्षपर आहे असें समजून तूं युद्ध करण्यास सिद्ध हो."

याप्रमाणें (१) भागवतकर्मयोगाचें सनातनत्व (२) त्याचा प्रणेता जो भगवान् त्याचें **स्वरूप, कर्म, जन्म,** त्याची परोपकारता, निःपक्षपात बुद्धि, त्याचें अकर्तृत्व, निर्लेपता, निस्पृहता यांचें ज्ञान, (३) कर्माचें लक्षण व उदाहरणें, ब्रह्मयज्ञाची महती (४) यज्ञाचे प्रकार व ज्ञानयज्ञाची महती (५) ज्ञानप्राप्ति व ईश्वरार्पण केल्यानें कर्माचा नाश; श्रद्धादिकांची आवश्यकता आणि संशयाचें घोर स्वरूप इत्यादि ज्ञानविषयांचा विचार चवथ्या अध्यायांत करून सर्वकर्मार्पण परमेश्वरास ज्ञानपूर्वक केलें म्हणजे ज्ञान होऊन पुढें मुक्ति मिळते, असा सिद्धांत या अध्यायांत स्थापित केला आहे; व कर्तव्यकर्म करूं लागण्याचे अगोदर अनेक शास्त्रें व विद्या यांच्या आधारें कर्मसंन्यासपूर्वक तत्त्वज्ञान समजून घेण्याची सूचना केली आहे. ह्या संस्मरणीय गोष्टी होत.

## तात्पर्य.

अथवा लोकसंग्रहासाठीं निष्कामबुद्धीनें ज्ञानपूर्वक स्वार्थत्याग करण्यास क्रमाक्रमानें आरंभ केला म्हणजे चित्तशुद्धि होते, नंतर श्रद्धा उत्पन्न होऊन परमेश्वराचें प्रथम सगुणरूपानें व नंतर निर्गुणरूपानें ध्यान करून **पराभक्तीनें** तो ईश्वराशीं तादात्म्य पावतो, अर्थात तो पूर्ण सात्त्विक होतो. संपूर्ण विश्वतत्त्वाचें ज्ञानही त्यास येथेंच होतें. नंतर सद्गुरुकृपेनें ज्ञान व विज्ञान होऊन तो पूर्ण अद्वैती होतो. शेवटीं निदिध्यासानें साक्षात्कार पावून तो मुक्त होतो व पुढें इतरांसही सन्मार्गानें जाण्याचा उपदेश करण्याचा अधिकार त्याला प्राप्त होतो. या वेळीं त्याच्या हातून जें कांहीं कर्म होत असतें तें केवळ शुद्धसात्त्विक स्वरूपाचें असतें. एवंच हें विश्व व त्यांतील अनंत विषय हे स्वोपभोगासाठीं नसून त्यांचा विनियोग यज्ञाकडे–लोकसंग्रहाकडे–करावयाचा, निष्काम कर्म करून चित्त निर्मळ करावयाचें व ज्ञान संपादून आपल्यास मुक्त करून घ्यावयाचें व इतरांस मुक्तीचा मार्ग दाखवावयाचा हा चवथ्या, ज्ञानकर्मसंन्यास, नामक अध्यायांतील विषय आहे.

महाभारतांतील शांतिपर्वाच्या २६२ अध्यायांत **जाजली** ब्राह्मण आणि **तुलाधार** वैश्य यांचा संवाद आहे, त्यांत धर्मरहस्य जाणणारा तुलाधार म्हणतोः—" सर्वेषां यः सुहृन्नित्यं सर्वेषां च हिते रतः । कर्मणा, मनसा, वाचा, स धर्मं वेद जाजले ॥ जो सर्वांशीं मित्रभावानें वागतो, सर्वदा लौकिकहित करण्याविषयीं जो कायावाचामनेंकरून झटतो, त्यालाच धर्मरहस्य उत्तम तऱ्हेनें कळलें आहे असें म्हणावें.

---

## खंड ५ वा.

# पांचव्या अध्यायाचा उपसंहार.

या अध्यायांत कर्मसंन्यासाचें नित्य स्वरूप सांगावयाचें आहे. कर्मानें संसार उत्पन्न होतो, अशी समजूत आहे व ती खरी आहे. प्रत्येक मुमुक्षूनें संसाराचें पापीस्वरूप घालविण्याचा उपाय नीट समजून घ्यावा. सकाम कर्म संसारोत्पादक आहे. निष्काम व निःसंग कर्म हा संसार नष्ट करणारा कर्मसंन्यासच आहे, व हाच श्रीमद्भगवंतास मान्य आहे. तिसऱ्या अध्यायांत भागवतकर्मयोग सांगितला, चवथ्यांत ब्रह्मार्पणयोग सांगून व कर्माला ज्ञानगर्भस्वरूप कसें येतें तें सांगून, पांचव्यांत हें निष्काम कर्म ज्ञानपूर्वक झालें म्हणजे त्याला कर्मसंन्यासाचें स्वरूप येतें हें सिद्ध केलें आहे.

येथें पहिल्या दहा श्लोकांत 'सांख्य' व 'कर्म' हे विचारदृष्ट्या एकच आहेत, व त्यांचें फलही एकच आहे, असें सांगितलें आणि जो अज्ञानी आहे त्यानें ज्ञानयोगाचें अनुष्ठान न करितां प्रथमतः कर्मयोगच करावा असें सांगितलें आहे. या कर्मयोगाला आरंभ केल्यानंतर सर्व कर्में परमेश्वरास अर्पण करावयाचीं, असा अभ्यास करावा. हा विषय पहिल्या दश श्लोकांत आला आहे.

यानंतरच्या १८ श्लोकांत अहंकारत्याग, वासनात्याग आणि कर्मत्याग हे विषय प्रथमतः घेऊन नंतर यच्चावत् कर्म अविवेकडून होत असतें, अविद्या नष्ट झाली म्हणजे व वेदांतश्रवण झाल्यावर देदीप्यमान ज्ञानप्रकाश सर्वत्र फांकून मनाला समता येते, ब्रह्मांचे ठायीं मन लीन होऊन कामक्रोधादिकांचा क्षय होतो व शेवटीं ज्ञान-विज्ञानांच्या साहाय्यानें ब्रह्मनिर्वाणाची प्राप्ति होते, अशा विषयांचा ऊहापोह केला आहे. शेवटच्या तीन श्लोकांत योगमार्गाचें अवतरण करून त्याचा विस्तार सहाव्या अध्यायांत करावयाचा आहे व कर्मयोगाला योगमार्गाची दिशा लागल्यानंतर ब्रह्मज्ञान सौकर्यानें कसें मिळतें हें तेथेंच सांगावयाचें आहे असें ध्वनित करून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.

## कर्मयोग व कर्मसंन्यास. (१-६).

चित्तशुद्धीच्या अगोदरचा कर्मसंन्यास दुष्टकर्मोत्पादी असतो. याकरितां मुमुक्षूनें कर्मयोगाचा-भगवत्प्रणीत कर्मयोगाचा आश्रय करणें श्रेयस्कर आहे, असें दुसऱ्या श्लोकांत ध्वनित करून द्वेष, दुराशा आणि द्वंद्व यांनीं रहित अशा मनोवृत्तीनें कर्म करणारा संन्याशीच आहे, हें ३ तें ६ श्लोकांत सांगितलें आहे व तसेंच सांख्यमार्ग व योगमार्ग एकच आहेत, सांख्याला अवश्य असणारें नैष्कर्म्य कर्मयोगावांचून मिळत नाहीं, व कर्मयोगाला ज्ञानमार्गावांचून गति नाहीं, योगमार्गाशिवाय सांख्यमार्ग सिद्ध होणें शक्य नाहीं इत्यादि गोष्टींची सिद्धता दिग्दर्शविली.

## कर्मांची कर्मशून्यता.

योगी, विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेंद्रिय आणि सर्वभूतात्मभूतात्मा यांचें **कर्म** निर्लेप असतें. हा विषय सामान्यतः सर्व अध्यायभर आहे. श्लोक ८-१० मध्यें **योग्याचें लक्षण दिलें** आहे. श्लोक ११-१२-१३ मध्यें योग्याची **आत्मशुद्धि, त्याची शांति** व त्याचा **कर्मसंन्यास** सांगून कर्तृत्व, कर्मत्व आणि फलसंयोगित्व हीं सर्व प्रकृतिमूलक व प्रकृतिफलक आहेत हा विश्वव्यापी सिद्धांत सांगितला. अज्ञानानें मात्र कर्तृत्वभोक्तत्व आपण आपल्याकडे ओढून घेतों; आत्मस्वरूपांत कर्तृत्व, भोक्तृत्व कांहीं नाहीं हें तत्त्व केवळ आर्यधर्मांत मात्र प्रकट झालें आहे. ईश्वराच्या आज्ञेनें प्रकृति-माया-ही जगदुद्धारासाठीं कर्म करीत व करवीत आहे हा सिद्धांत आर्यधर्मतत्त्वाचाच आहे व त्याला आतां उत्क्रांतिवादाची संमति मिळत आहे. विश्व-व्यवस्था, तिचे नियम व तिचें रहस्य समजून घेऊन जीवामध्यें प्रथमच प्रकाशित झालेल्या ज्ञानशलाकेचे आसपास जमलेली उपाधिजनित घाण (हीं जीवस्थितीच्या आदिकालीं जीवाला ज्ञानपोषकच होते.) काढून टाकण्यास कर्मयोगाची आवश्यकता पतकरावी, आणि नंतर ज्ञानपंथाचा घाट चढत असतां हळूहळू इंद्रियांनीं, मनानें, बुद्धीनें इत्यादि कर्मसंन्यास संपादन करून घेऊन शुद्धस्वरूप व्हावें, हा सनातन वैदिक धर्म व त्यांतील सिद्धांत येथें अवतीर्ण झाले आहेत.

## अहंकार, वासना आणि कर्म यांचा त्याग.

परमेश्वरास आपलीं कर्में बुद्धिपूर्वक समर्पण करावयाचा, नुसता 'तत्सद्ब्रह्मा-र्पणमस्तु' असा निर्जीव व औपचारिक मंत्र मात्र म्हणावयाचा नाहीं, अशी एकदां मनाला संवय लाविली ह्मणजे क्रमाक्रमानें 'केलें हें मीच केलें' अशा प्रकारचा अभिमान विगलित होतो. 'अनेक कारणांच्या संयोगानें विवक्षित कार्य घडून येतें, मी निमित्तमात्र कारण आहे.' असा मनाचा हळूहळू निश्चय होऊं लागला म्हणजे **अहंकार** कमी होत जातो. विषयोपभोगाचें सर्व कर्म जीवाच्या सविवेक-इच्छेच्या व्यतिरिक्त होत असतें, म्हणजे मला अमुक पदार्थ सुख भोगण्यासाठीं हवा आहे, ही जी प्राण्याला किंवा मनुष्याला इच्छा होते, ती इच्छा जीवाच्या पूर्वकर्मानें उत्पन्न झालेली असते; ह्मणून अर्थातच येथें जीवास प्राप्त झालेल्या वर्तनस्वातं-त्र्याचा कांहींएक उपयोग होत नाहीं; अएतव त्या पूर्वकर्मजन्यइच्छेचें कर्तृत्व आपल्या-कडे घेणें हें जाणत्या पुरुषास योग्य नव्हे. पण आपण सामान्य मनुष्यें या इच्छेचें कर्तृत्व, वर्तनस्वातंत्र्याचा दुरुपयोग करून, आपणांकडे अज्ञानानें घेतो! याचेंच नांव अहंकार. हा अहंकार सत्य दृष्टीनें नष्ट झाला म्हणजे आपलें चित्त निर्मळ होतें व नंतर कर्में होतात तीं केवळ शरीर, मन किंवा इंद्रियें याकरवीं होतात. अहंकारशून्यचैतन्याला (आत्मा-

रामाला ) त्या कर्मांचा मळ लागत नाहीं. याच दृष्टीनें कर्मांपासून होणाऱ्या फलांचा त्याग केला पाहिजे; म्हणजे **वासनेचा** त्याग केला पाहिजे. विषयोपभोगाचें सुख मला मिळावें, दुःखमूलक विषयोपभोग मला नसावे ही मनोगत इच्छा तिचें नांव वासना. ही वासना पूर्वजन्य कर्मानेंच उत्पन्न होत असते. ह्या वासनेचा अंकुर आपल्या मनांत ठेवणें म्हणजे कर्मचक्राच्या सपाट्यांत सांपडणें होय. असो; परमेश्वराकडे सर्व भोक्तृत्व सोंपवून म्हणजे आलेल्या भोगाला सुखदुःख विरहित सादर राहून व सुखदुःखादि परमेश्वराला अर्पण करून आपण केवळ परमेश्वराचे आधीन राहणें, आणि आपल्यास प्राप्त झालेल्या वर्तनस्वातंत्र्याच्या सामर्थ्यानें परमेश्वराचें ध्यान करणें, ह्या दोन गोष्टी अभ्यासानें दृढ करून ठेविल्या म्हणजे विषयाकडे ओढणाऱ्या, व स्वातंत्र्याचा दुरुपयोग केल्यानें उत्पन्न झालेल्या, वासनेचा क्षय होतो; आपल्या हातून अभिमानानें कोणतेंही विषयविषयक कर्म होत नाहीं आणि म्हणून आपल्यास उत्तम प्रकारची शांति मिळते. पाठीमागचें स्मरण नाहीं, पुढचें भय नाहीं, वर्तमानकाळीं समाधान, अशी मनाची स्थिति झाली, म्हणजे उत्पन्न होणाऱ्या शांतीचें सुख काय वर्णन करावें ? अखंड सुखाचा अनुभव जो ह्या स्थितींत घ्यावयास सांपडतो, त्याचें शब्दांनीं वर्णन करणें अशक्यच होय. असो; तेव्हां वासनाशून्य पुरुष सुखी असतो; पण वासनायुक्त पुरुष दुःखमूलक आणि दुःखपरिणामी संसारांत सांपडून बद्ध होतो आणि जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतो; ह्मणून वासनेचा त्याग व अहंकाराचा त्याग हे सिद्ध झाले म्हणजे कर्मत्यागच होतो. असल्या आत्मसंयमीपुरुषाच्या हातून जें कर्म होतें, तें केवळ शरीराकडून होतें ह्मणून त्या कर्मांपासून ह्या पुरुषाला सुखदुःखाची बाधा होत नाहीं, आणि मनोवृत्तीला स्थैर्य असल्यामुळें कर्मही उत्तम तऱ्हेचें होतें.

## साधूचें व संसारिकाचें कर्म.

आपण संसारीपुरुष सर्वदां कर्मच करीत असतों व साधुपुरुषाच्या हातूनही कर्म होत असतें. उभयतांही कर्म करितात, पण त्या त्या कर्मांत मोठा विशेष आहे तो हाः साधक स्थितीमध्यें असणाऱ्या पुरुषाचीं सर्व कर्में चित्तशोधक असतात. चित्त शुद्ध झाल्यानंतर व ज्ञाननिष्ठा दृढ झाल्यावर साधु स्वतः कर्म करीतच नाहीं; त्याच्या हातून मात्र कर्म होत असतें. पण तें कर्म उपभोग वाढविणारें नसून इतर अज्ञानी पुरुषांस साधक स्थितींत आणणारें, त्यांचे उपभोग कमी करणारें, कर्म असतें. सारांश, विषयाच्या ज्ञानाची मर्यादा अमर्याद करणें आणि ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें निवृत्तिमार्गाचा उपदेश करून उपभोगतृष्णा संकुचित करणें अथवा आपल्या हातून ज्ञानोत्पादक व विषयोत्पादक जितकें कर्मसाफल्य होते त्यापेक्षां विषयभोग कमी घेणें व तो जास्त कर्म फल उत्पन्न करण्यासाठींच घेणें, ह्या सामाजिक पुरुषार्थाची सिद्धि व्हावी. एतदर्थ साधूचें कर्म होत असतें. पण आपण संसारीपुरुष जें कर्म करितों तें फल-

तृष्णेनें अतिव्याप्त झालेलें असतें म्हणून तें कर्म चांगल्या रीतीनें सिद्ध होत नाहीं; पुनः; तें दुःखमय सुख देणारें असतें. आपण त्यायोगें बद्ध होतो. म्हणजे सुख मिळविण्या-साठीं आणि दुःखाचे निवारण करण्यासाठीं अभिमानानें दुःखमूलक कर्म करीतच असतों. सारांश, आपलें कर्म याप्रमाणें बद्धक होतें.

## सकामकर्मांचें बीज अविद्या आहे.

अविद्या म्हणजे माया, आणि माया म्हणजे आत्मशून्यस्थिति-ज्ञानशून्यता, होय. मी निराळा आणि विश्व निराळें, विश्वाचें सुख वाढणें म्हणजे माझें सुख कमी होणें असा जो द्वैतभाव पूर्वकर्मानें आपल्या मनांत दृढ झालेला असतो, तो द्वैतभाव म्हणजेच माया होय. हा द्वैतभाव जितका जास्त दृढ तितकें अज्ञान म्हणजे माया जास्त असते. ह्या मायेचें अत्युग्र स्वरूप पहावयाचें असल्यास केवळ स्वतःच्या तात्कालिक सुखासाठीं धडपड करणाऱ्या एखाद्या दुर्योधनप्रकृति पुरुषाचें चरित्र पहावें. स्वतःच्या तात्कालिक विषय-सुखासाठीं ज्यानें आपण आपले इष्टमित्र, भाऊबंद, पुत्रपौत्र, आप्तस्वकीय मातापितर, किंबहुना सर्व राष्ट्रहा खर्ची घातले, तो खरा कलिपुरुष, मायादास, होय! पण आपल्या सुदैवानें इतकें नीच पुरुष जगांत फारसे उत्पन्न होत नाहींत. म्हणजे सर्वथा अज्ञानी पुरुष फारसे असत नाहींत. स्वकुटुंबासाठीं स्वतःचें सुख कमी करून घेणारेच जीव हल्लाच्या मनूंत जास्त सांपडतील. स्वजातीसाठीं कुटुंबसुखावरही लाथ मारणारीं राष्ट्रें प्रस्तुतकालीं विद्यमान आहेत. विश्वसुखासाठीं आपलें सुख, कुटुंबसुख, जातिसुख इत्यादि सर्वसुखांचा त्याग करणारीं शंकराचार्य, रामदास, साक्रेटीस, जीजसक्राईस्ट सारखीं नररत्नें भूतलावर कधींतरीं अवतीर्ण होतात. तरी पण बहुजनसमाजांत कुटुंबसुखासाठीं जातिसुखावर पाणी सोडणारे व स्वतःच्या लहरीप्रीत्यर्थ राष्ट्रसुखाची आहूति टाकणारे लोकच फार असतात. हें शुद्ध अज्ञान होय. ज्ञानप्रकाश फांकत जाईल त्या मानानें आमच्यांतही पुनः रामदास होऊं लागतील! असो; याप्रमाणें आपल्या आत्म्याचा जितका जितका आपण संकोच करितों, तितके तितके आपण जास्त दुष्ट म्हणजे जास्त अज्ञानी अथवा जास्त मायावश असतों आणि आपलें कर्म तितक्याच जास्त दाढर्यानें सकामुक होत असतें. एवंच द्वैतभावना, विरोधवृत्ती जोरावर असली म्हणजे दुष्टवासना ( मायोपाधि ) बलवत्तर होत जाऊन जास्त दुःख होत जातें असा विश्वाचा अनुभव सर्वज्ञप्रभूनें १४ व १५ श्लोकांत ग्रथित केला आहे; आणि स्वार्थसुखपरायणतेचा सर्वस्वी निषेध केला आहे. हा काम, ही वासना, ही मायोपाधि जसजशी कमी होईल म्हणजे आत्म्याचा विस्तार आपण समजतों ह्यापेक्षां मोठा आहे हें ज्ञान जसजसें अधिकारानुसार वाढत जाईल तसतसा आत्मप्रकाशही स्पष्ट-तर होत जाईल.

## आत्मजय. ( १६—१९ ).

श्लोक १६-१७-१८-१९ हे विजितात्मत्व व आत्मजय प्रतिपादितात. 'अवघें समब्रह्म पाहे, सर्वांभूतीं विठ्ठल आहे' असें श्रीमद्भक्तावतंस श्रीतुकाराम महाराजांचे म्हणण्याप्रमाणें ज्याला अद्वैतज्ञान होऊन, तेथेंच निष्ठा दृढ झाली, आणि समत्वबुद्धि प्रकट झाली, तोच आत्मविजयी पंडित होय.

## जितेंद्रियत्व. ( २०—२३ ).

ह्या चतुःश्लोकींत जितेंद्रियत्वाचें म्हणजे विषयवैराग्याचें व आत्मनिष्ठेचें वर्णन आहे. विषयोपभोगाची लालसा कमी होऊन तत्त्वाची जिज्ञासा अधिक वाढल्याशिवाय ज्ञान होत नाहीं; उत्तम ज्ञानाशिवाय अक्षय्य सुख मिळत नाहीं; विषयजन्य इंद्रियसुख अस्थिर आणि क्षणभंगुर आहे, असें ज्ञानविज्ञान होऊन विषयोपभोगाच्या संबंधानें जीं सुखदुःखें व सुखदुःखात्मक प्रसंग उत्पन्न होतात, त्या सर्वांचा वेग सहन करण्याचें सामर्थ्य येणें व अविहित मार्गानें न जाणें हेंच जितेंद्रियत्व होय.

## सर्वभूतात्मभूतत्व ( २४—२५ )

आत्मनिष्ठ पुरुष ब्रह्मभूत होऊन पापशून्य, द्वैतशून्य, कामक्रोधशून्य आणि सर्वभूतमित्र होतात. ह्यांनाच ब्रह्मनिर्वाण मिळतें. हें मिळण्याचें साधन योगमार्ग–ईश्वरप्रणीत योगमार्ग–आहे; त्याचे सूत्रभूत श्लोक २७-२९ हे आहेत.

येथील सर्व विषय अध्यात्मपरच आहे; व म्हणून मानसशास्त्र, नीतिशास्त्र आणि समाजशास्त्राचा अवतार होऊन त्यांस एकरसत्व आलें आहे. कर्मयोगानें नैष्कर्म प्राप्त होऊन शुद्ध चित्त, ज्ञान आणि ब्रह्म मिळतें हें येथें सांगावयाचें आहे. येथीलही शेवटचें पर्यवसान ब्रह्मपर–तत्त्वज्ञानपरच आहे.

### आत्मप्रकाश

विशेष देदीप्यमान झाल्यावर निष्कामकर्माची, निष्काममुखाची, अखंडशांतीची, सीमा वृद्धिंगत होते. सर्व विश्व आत्मस्वरूपी आहे, असा प्रकाश बुद्धीवर पडून तदाकारवृत्ति झाली, आपण तत्पर झालों, म्हणजे सर्व पापपुण्यात्मक सकामकर्मांचा क्षय होऊन आपपरभाव नष्ट होईल व समदृष्टि बाणेल आणि ह्या मृत्युलोकांतच आपण अमर होऊन सुखदुःखांची वार्ता नसणाऱ्या जीवन्मुक्तस्थितींत अक्षय्य अशा परमोत्कृष्ट शांतिसुखाचा सदैव अनुभव घेत राहूं. मग आपल्या पुढें, विषयोपभोग आले काय व गेले काय, त्यांची

खबरही या वरील महापुरुषांस नसल्यामुळें आणि सर्वसंहारी कामक्रोधादि खवळलेल्या जलधीच्या पर्वतप्राय लाटा यांच्या आत्मलीनमनोभूमीवर सोसाट्याने येऊन आवेगानें आदळल्या तरी यांचें शुद्ध मन एकरसात्मकआत्मस्वरूपामध्यें विलीन होऊन गेल्यामुळें त्यांस कोणतीही बाधा न होता हे महापुरुष अखंड आनंदामध्यें सुखरूपच राहतात. एवंच **कर्मयोगानेंच चित्तशुद्धि करावयाची असेल** तर निष्कामबुद्धीनें कर्म करून तें **निष्कर्म** करावें; आत्मस्वरूप सर्वत्र ओतप्रोत भरलेले आहे असा मनाचा पक्का निश्चय करावा; समबुद्धि ठेवून विषयोपभोगापासून निवृत्त व्हावें व कामक्रोधादिकांस मागें हटवून आत्मसमागमांत; आत्मविहारांत आणि आत्मप्रकाशांत सदैव निमग्न असावें आणि द्वैतबुद्धींचा उच्छेद करून लोकहित होईल असें मात्र ( कर्म करण्याची स्थिति असल्यास ) कर्म करावें. वास्तविक पाहिलें असतां वरील महापुरुषाने द्वैतबुद्धि नष्ट करावी, किंवा लोकहित करावें, असें सांगण्याची अपेक्षाच नाहीं; कारण सिद्धपुरुषाकरवीं जें जें कर्म होतें, तें विश्वहितार्थच असतें. तेव्हां अशा स्वरूपाचें कर्म ज्यांकरवीं होतें, तेच महापुरुष होत.

## तात्पर्य.

ज्ञानयोग आणि कर्मयोग यांचें पर्यवसान एकच आहे; म्हणजे उभयतांकरवीं मोक्षच मिळतो. मात्र कर्मयोग **निष्काम** पाहिजे. सारांश, कर्मयोगानें चित्तशुद्धि, नंतर ज्ञानप्राप्ति, नंतर आत्मानुष्ठान ह्या मार्गे सांगितलेल्या पायऱ्या पुनः सांगितल्या; हेतु हा कीं, **अनधिकाऱ्यालाही** मोक्षमार्ग समजावा.

आतां एका संशयाचा निकाल करून हा उपसंहार आटपूं. पांचव्या अध्यायांतील १५ वा श्लोक व २९ वा श्लोक हे परस्परविरोधी आहेत असें कै० नामदार तेलंग यांनीं म्हटलें आहे व त्यावरून असें अनुमान काढिलें आहे कीं, गीतारचनेचा काळ ख्रिस्ती शकापूर्वीच असला पाहिजे ! पण इतर धर्मांस पाठीमागें ठेऊन ख्रिस्तीधर्माचा प्रसार करण्याची दीक्षा घेतलेले कित्येक परोपकारी मिशनरी लोकांनीं नामदार तेलंगासारख्या विद्वद्रत्नाचा वरील अभिप्राय वेदवाणीतुल्य समजून असा डांगोरा पिटविला आहे कीं ' असलें परस्परविरोधी सिद्धांतांचें प्रणयन करणारें पुस्तक ईश्वरनिर्मित असणें शक्यच नाहीं. ' !! आमचें कल्याण करण्याची इच्छा धारण करणाऱ्या मिशनरी लोकांच्या उद्योगाची, त्यांच्या विद्यादानाची, त्यांच्या संकटप्रियतेची, त्यांच्या कर्तव्यतत्परतेची, त्यांच्या शांततेची, जितकी स्तुति करावी तितकी थोडीच होय. आमच्या लोकांत ही संकटप्रियता, कर्तव्यतत्परता, हा उद्योग, व ही शांति असती तर आम्हीं केवळ लीलेनें गीताप्रणीतधर्म सर्व जगभर हां हां म्हणतां प्रकट केला असता. असो नामदार तेलंग गेले; तेव्हां पश्चात् त्यांच्या मतांवर हल्ला करण्याचें काम नामुष्कीचें आहे असें समजून

मी वरील मत प्रकट व प्रसृत करण्याची जबाबदारी सदैव जिवंत असणाऱ्या मिशनरी संस्थांवर ठेवितों. पण ह्या सत्यान्वेषी सद्गृहस्थांस माझी अशी प्रतिपृच्छा आहे कीं, श्लोक १५ व श्लोक २९ यांचा अर्थ आपल्यास बरोबर समजला आहे काय? केवळ शब्दार्थ पाहिला तर 'या दोन श्लोकांत विरोधात्मक सिद्धांत आहेत,' असें वाटण्याचा संभव आहे. पण गीतेचा अभ्यास साधकबुद्धीनें करणारांस हा विरोध न दिसतां एकवाक्यताच आहे असे दिसेल. पहा कीं, निर्लेप व निराकार जें परब्रह्म किंवा त्याची प्रकट मूर्ति परमात्मा हा पापपुण्याचा अधिकारी बिलकुल नाहीं. म्हणजे सकाम व साभिमानकर्मांचा संबंध आत्मारामाशीं किंवा परब्रह्माशीं बिलकुल नसतो.. त्या कर्मांचा संबंध अभिमानी जीवाशीं असतो व त्याप्रमाणें तो जीव फलेंही भोगतो; असा १५ व्या श्लोकाचा अर्थ आहे; आणि २९ श्लोकांत निष्कामबुद्धीनें केलेलीं यज्ञादितपःकर्में म्हणजे निर्भेदबुद्धीनें, निर्विशेषबुद्धीनें, ब्रह्मबुद्धीनें, केलेलीं कर्में म्हणजे निवृत्त्यात्मक कर्में अर्थातच आत्म्याकडे, परमात्म्याकडे जातील. तेव्हां सकामकर्मांचा मालक अभिमानी जीव आणि परमात्म्याशीं निष्कामकर्माची एकात्मता यामध्यें विरोध तो काय आहे बरें? येथें वस्तुस्थितीचेंच वर्णन नाहीं काय? व ही वस्तुस्थिति न्याय्यही नाहीं काय? तेव्हां विरोध नसतां विरोधाभास झाला हा केवळ सकाम व निष्काम कर्मांमधील विशेष लक्षांत नसल्यामुळें उत्पन्न झाला हें बरोक खरें.

याप्रमाणें तिसऱ्यांत कर्मयोग, चवथ्यांत ब्रह्मार्पण नामक ज्ञानयोग आणि पांचव्यांत कर्मसंन्यासयोग सांगितले. म्हणजे सामान्यकर्म, ज्ञानपूर्वक याज्ञिककर्म व कर्म करूनही ज्ञान उत्पन्न करणारें 'कर्मसंन्यास'–नामक–निष्कामकर्म हे विषय हा कालपर्यंत झाले. आतां सहाव्यांत आत्मसंयमयोग सांगून 'त्वं' पदाचें विवेचन पूर्ण करावयाचें.

---

## खंड ६ वा.

# सहाव्या अध्यायाचा उपसंहार.

प्रथम षट्कांतील या सहाव्या अध्यायांत योगाचें लक्षण, त्याचे भेद, त्याची साधनें त्याचें फल, योगविघ्नपरिहार आणि त्याची परमेश्वरयुक्त सिद्धि केली असतां उत्पन्न होणारी आत्मिक स्थिति, इत्यादि अनेक विषयांचें भगवंतांनीं स्पष्टीकरण केलें आहे. प्रत्यक्ष योगासंबंधें, जेवढें मला शक्य होतें व इष्ट वाटलें तेवढें विवेचन या अध्यायाच्या आरंभीं उपोद्घातरूपानें केलें आहे. आतां या अध्यायांतील मार्मिक स्थळांचा मात्र यथास्थित निर्देश करून या अध्यायाची परिसमाप्ति करावयाची आहे.

## योग व संन्यास

कर्मफलाचा त्याग करून कर्मयोगाचें विहित अवलंबन करणारा तो संन्यासी होय. 'ऐसा येई का संन्यास । करी संकल्पाचा नास ' हा खरा संन्यास आहे. हा पूर्वाध्याय-गतविषय उपसंहाररूपानें या अध्यायाच्या पहिल्या दोन श्लोकांत सांगितला.. हा संन्यास-योगनामक पर्वत चढण्याचें मनांत आणिलें ह्मणजे **कर्म करावें** लागतें. विहित कर्म करितां करितां चित्तशुद्धि होते, पुढें योगारूढत्व संपादणाऱ्या व संपादिलेल्या पुरुषाला शम, इंद्रियनिग्रह हवा. विषयापासून, कर्मापासून व कर्मफलापासून निवृत्ति झाली ह्मणजे **योगारूढता** प्राप्त होते. हे सर्व ३ ते ६ श्लोक अध्यात्मशास्त्रांतर्गत मानसशास्त्रांतले आहेत. आत्मविजय होऊन शांति मिळाली, द्वंद्व संपलें, ज्ञानविज्ञानाने तृप्ति होऊन पूर्ण वैराग्य बाणलें, सर्वत्र समबुद्धि झाली, ह्मणजे त्याला योगी म्हणावें. ही तिसरी पायरी आहे. येथें संन्यास पूर्ण झाला.

## संन्यास व योग यांची एकवाक्यता.

२ वास्तविक पाहतां **संन्यास आणि योग यांमध्यें विरोध नाहीं. इतकेंच नव्हे पण ते एकस्वरूपच आहेत.** कर्मफलाविषयीं आसक्ति न धरितां जो पुरुष आपलें कर्तव्य निरहंकार बुद्धीनें करीत असतो, तो संन्यासी असतो व योगीही असतो. कारण त्यानें फलसंकल्पाचा व कर्तृत्वाभिमानाचा त्याग केला आहे. संकल्पत्यागानें संन्यास सिद्ध होतो आणि निरहंकार कर्तव्याचरणानें योग सिद्ध होतो. सारांश भगवीं वस्त्रेंच मात्र परिधान करणें हा जसा संन्यास नव्हे, मिथ्याचारही होईल, त्याचप्रमाणें कांहाएक न करितां स्वस्थ राहणें हा योग नव्हे, केवळ ढोंग आहे. संकल्पाचा त्याग हाच कायतो संन्यासाचा व योगाचा ओनामा आहे. हा संकल्पत्याग जसजसा पूर्णत्वास पोहोंचेल तसतशी निर्विकाराची स्थिति जवळ जवळ येईल. स्वतःचा देह, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार, इत्यादिकांविषयींचे संकल्प क्रमाक्रमानें टाकीत गेले पाहिजे. त्याचप्रमाणें कुटुंब, कुल, जाति, देश इत्यादिकांवरील अहंबुद्धीही कमी करीत गेलें पाहिजे. असें हळूहळू मार्ग-क्रमण केलें असतां व '**स्वधर्मे निधनं श्रेयः**' याचें रहस्य पूर्णपणें समजून अधिकारा-प्रमाणें निष्काम कर्तव्य करावयाचें व अधिकाराप्रमाणें अहंकार-त्याग करावयाचा असा मार्ग धरिल्यास संन्यास व योग याची एकवाक्यता होऊन परमशांतीचें जें अखंड सुख त्याची प्राप्ति होणार आहे. अधिकार समजून घेऊन संकल्पत्याग करणें ही मुख्य ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. ह्या गोष्टीचें विस्मरण होतें म्हणून कित्येक संन्यासी व्यवहारांत घुटमळून आपल्यास व इतरांस विपथ मार्गास नेतात आणि सोन्यासारख्या आमच्या मनुष्यजातीच्या आर्यधर्मास काळोखी आणितात. ह्या गोष्टीचें विस्मरण होतें म्हणूनच कित्येक आधुनिक कर्ते पुरुष जातिभेदादिकांस अनाठायीं गुंडाळून ठेवून धर्मो-

द्धारक सुधारणेची गति प्रकुंठित करितात, तसेंच कित्येक जीर्णाभिमानी लोक हट्टानें जेथें तेथें जातिभेद आणून सामाजिक विद्वेष वाढवितात. असो; तेव्हां अधिकारानुसार संकल्प–त्याग करणें व अधिकारानुसार निष्कामबुद्धीनें कर्तव्य करणें, ह्या गोष्टी लक्षांत राहून त्याप्रमाणें आचरण झाल्यास आमचे हतधर्मी लोकही कालांतरानें सात्विक होतील असा भगवंतांनी दिलेला आशीर्वाद पुनरुक्त करून ( पहा अध्याय ६ श्लोक ४० ) दुसऱ्या विषयाकडे वळतों.

३. मार्टिनो नामक तत्त्वज्ञानें आपल्या 'क्राइस्ट—तुल्य—वर्तनाविषयीं प्रयत्न' या पुस्तकांत 'तुजजवळ काय आहे' (What you have) 'तूं काय करितोस' (what you do) आणि 'तूं कसा आहेस' (what you are) या अवस्था-त्रयींतील विशेष दाखवितांना 'तूं कसा आहेस' या प्रश्नाच्या उत्तरावर मनुष्याची आत्मिक योग्यता ठरवावी असें सिद्ध केलें आहे. सहाव्या अध्यायाच्या चवथ्या श्लोकाचें रहस्य हेंच आहे. विषयविन्मुखता, कर्मपराङ्मुखता आणि संकल्पशून्यता या त्रयी-पैकीं **संकल्पशून्यतेस** भारी किंमत आहे. ही संकल्पशून्यता ह्मणजे योगारूढता अगर शमदमादि-साधनसंपन्नता होय. अहंकारशून्यता व शमदमादिकांची अनुकूलता झाली ह्मणजे आत्मिक उन्नति होण्यास कालावधि लागणार नाहीं.

## स्वावलंबन.

४ यांतील पांचव्या श्लोकाचें जेवढें मनन करावें तेवढें थोडेंच आहे. वेदांत-गतअद्वैतपर्यवसायी आर्यधर्मांत जर कांहीं जोम असेल, तर तो या श्लोकांतील रहस्यानें आलेला आहे; जर स्वतःचा तुला उद्धार करून घ्यावयाचा असेल तर **आत्म-सहायानें** आपला उद्धार कर. 'आत्म्यासारखा बंधु नाहीं' या वाक्यांत सर्वज्ञतेचें सारसर्वस्व ओतप्रोत भरलेलें आहे. हें वाक्य आपण विसरलों, या वाक्याचा अर्थ आपण अनर्थपर केला ह्मणून आपली सर्व प्रकारची योग्यता नष्टप्राय झाली आहे. धर्म-मापक यंत्रावर आम्हां हिंदुलोकांचे धर्म-घर्मांश पाहिले तर ते खचित कोठें तरी शून्या-जवळ असतील यांत शंका नाहीं. याचें मुख्य कारण आपल्या स्वतःचा अधिकार विस-रून आह्मी (What I have) 'मजजवळ विषयसंपत्ति केवढी आहे' त्यावरून आपली योग्यता ठरवावयास लागलों, सारांश विषयलोलुप आणि कर्तव्यविन्मुख झालों हें होय. या अशा आपल्या अवनत स्थितींत आम्ही 'उद्धरेदात्मनाऽऽत्मानं' हें तत्त्व (Self-helf) विसरून गेलो, स्वतःच्या संबंधानें सर्वथा ( धार्मिक, नैतिक, लौकिक, राजकीय, औद्योगिक इत्यादि अनंत बाबतींत ) परतंत्र झालों, देशकालवर्तमान नामक 'परस्थितीवर' अत्यंत भिस्त ठेवूं लागलों, हें आमच्या धर्म-शून्यतेचें कारण होय. असो; आम्ही या आत्मिक उन्नतीच्या संग्रामांत बावळ्यासारखे

प्रकटस्वरूप जो परमेश्वर त्याची 'भक्ति कशी करावयाची' इत्यादि प्रश्न उत्पन्न होतात. या प्रश्नांस सांप्रतच्या द्वितीय षट्कांत उत्तरें दिलीं आहेत.

२. अधिकाराप्रमाणें जीवाचें स्वरूप जसें भिन्न असतेसें भासतें ह्मणजे 'मीच देह, मीच प्राण, मीच मन, मीच बुद्धि किंवा विज्ञान, आणि मीच आनंद' अशीं स्वतःची निरनिराळीं स्वरूपें आहेत, असें जीवांस वाटत असतें, एकच ब्रह्ममय स्वरूप असतांही अज्ञानजन्यभेदबुद्धीनें 'आपण ह्मणजे देहच' असें कोणी समजतो, 'आपण ह्मणजे प्राणच' असें दुसरा समजतो, तसेंच कोणी 'आपण मनं, विज्ञान, किंवा आनंद आहों' असें प्रत्येकीं समजतो; एवंच जसा अधिकार असेल, तसें आपलें स्वरूप आहे असा ज्या-प्रमाणें आपण स्वस्वरूपावर अध्यास करित असतो, तसाच अध्यास परमेश्वरी स्वरूपावरही होत असतो. ब्रह्माचें स्वरूप परमार्थतः एकच आहे, ज्ञानी पुरुषास एकच दिसतें आणि मोक्षोन्मुख झालेल्या जीवाला त्या एकरस स्वरूपामध्येंच पराकाष्ठेचा अवर्णनीय आनंद होऊन तो त्या आनंदामध्यें लीन होत्साता तत्त्वस्वरूपी होणार असतो हें सर्व खरें आहे. पण प्रत्येक जीवाला हा मोठा अधिकार प्राप्त झालेला नसतो. जितका त्याचा अधिकार लहान मोठा असेल तितक्या प्रमाणानें त्या जीवाची ईश्वरविषयक कल्पना लहान किंवा मोठी असते व असावी, हें सहजच आहे. सूक्ष्मत्त्वदर्शक किंवा महत्त्वदर्शक कांच डोळ्यास लाविली असतां एकच पदार्थ जसा लहान किंवा मोठा दिसतो तसाच प्रकार आपल्या विचारशक्तीचा आहे. श्रीकृष्णाचें एकच स्वरूप कंसास, चाणूरास, कुब्जेस व अक्रूरास निरनिराळें दिसलें हें प्रसिद्धच आहे. एवंच ज्याप्रमाणें आपलें मन शुद्ध किंवा मलीन असेल त्याप्रमाणें आपली ईश्वरविषयक कल्पना उदार किंवा संकुचित असेल, व असली पाहिजे. आपलें मन वासनादिकांनीं अशुद्ध असेल किंवा अल्पदृष्टीमुळें अल्पज्ञ असेल तर परमेश्वरी स्वरूपही रागद्वेषयुक्त आहे असें आपल्यास वाटतें. ज्यांस आपण अज्ञानी किंवा भोळे समजतों, त्यांचा देव खातापिता असतो. स्तुति केली ह्मणजे संतुष्ट होणारा आणि निंदा केली ह्मणजे रागावणारा देव असतो. येथें स्तुति ह्मणजे अयथार्थ वर्णन व निंदा ह्मणजे यथार्थ वर्णन असें समजावें. असो; तेव्हां अज्ञानी लोकांच्या देवविषयक कल्पना अज्ञानयुक्त असतात. पुढें विचारशक्ती वाढली, नीति सुधारली ह्मणजे याच ईश्वरविषयक कल्पना प्रगल्भ होतात. शेवटीं पूर्ण दृष्टि झाली म्हणजे ईश्वराचें पूर्ण ज्ञान होतें, आणि दृष्टीला ज्ञानस्वरूपता येऊन केवलत्व आलें म्हणजे कैवल्याचें, ब्रह्माचें विज्ञान म्हणजे अनुभव येतो व सर्वत्र 'एकमेवाद्वितीयं' होऊन जातें. ह्यास्तव 'त्वं' स्वरूप प्रथम शुद्ध करावें; कर्म, उपासना, ज्ञान, योग, इत्यादिकांच्या साहाय्यानें 'त्वं' पद शुद्ध करून घेऊन त्याच्या आश्रयानें कैवल्य स्थापून घ्यावें कीं लागलेंच ब्रह्मस्वरूप प्रकट होऊन (साक्षात्कार होऊन) मुक्ति मिळते; म्हणजे सांत म्हणून मानलेला परंतु परमार्थतः अनंत असलेला चिदंश (आभासरूपी जीव) अनंतत्व अनुभवितो. पण हा सयुक्तिक विचार ध्यानांत न आल्यामुळें मुसलमानी धर्माचे व

ख्रिस्ती धर्माचे अनुयायी इतर धर्मांचा उपहास, किंवा छल करीत असतात. अधिकार-परत्वें ईश्वरस्वरूप त्या त्या व्यक्तीस भिन्नत्वानें दिसतें हें तत्त्व या वरील ईशोपासकांस न समजल्यामुळें त्यांच्या हातून पूर्वकाळीं अत्याचार घडले व सद्यःकालींही घडतात. पण अधिकारपरत्वें उपदेश करावा हें तत्त्व आमच्या पूर्वकालीन धर्मसंस्थापकांस उत्तम कळलें असल्यामुळेंच सकाम पितृपूजेपासून तों निष्काम ब्रह्मनिदिध्यासापर्यंत उपास्य दैवतें अस्तित्वांत आणून क्रमाक्रमानें मनाचा उद्धार करण्याचें साधन व त्याची सामग्री त्यांनीं निर्माण केली आहे; आणि म्हणूनच त्याला सनातनत्व प्राप्त झालें आहे आणि सर्वकालीं, सर्वस्थलीं व सर्वप्रसंगीं उपयोगी पडणारा धर्म ईश्वरी प्रेरणेनें त्यांच्या करवीं या आर्यस्थानांत निघाला असें म्हणण्याचा स्पृहणीय अधिकार आम्हांस प्राप्त झाला आहे. ह्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नये. म्हणजे आमचा 'सनातन धर्म, सनातन धर्म' असा गलबला मात्र करावयाचा, पण जीवाच्या आत्मिक प्रगतीचा उद्योग करावयाचा नाहीं; असें करूं नये. तर जीवाचें ज्ञान दिवसेंदिवस जास्त वृद्धिंगत होईल म्हणजे जीवांची ईश्वरविषयक कल्पना जास्त उदात्त होत जाईल व आपलें आचरण त्या उदात्त कल्पनेस योग्य असें होईल, असा अभ्यास नित्य करावा. शेवटीं जीवदृष्टीचें सांतत्व जाऊन अनंतत्व प्राप्त होईल व ते ब्रह्मपदाप्रत जातील असा क्रम धरणें व या क्रमाला एकनिष्ठ राहून त्याच्या सिद्धीसाठीं सफल प्रयत्न करणें हे प्रत्येक धर्मनिष्ठ पुरुषाचें काम आहे.

## भक्तीचे तीन प्रकार.

३. या षट्कांत स्थूलमानानें तीन प्रकारच्या भक्तांचा विचार केला आहे. या तीन वर्गांतील प्रत्येकांत आणखी पोटभेद आहेतच; पण आपण केवळ तीन वर्गांचाच मात्र विचार करूं. (१) पहिल्या वर्गांत योगारूढ ज्ञानी पुरुष येतात. या उत्तमोत्तम वर्गांतील लोकांस परमात्मस्वरूप **जसें आहे** तसेंच बुद्धिगोचर होतें व अनुभवास येतें. वेदांतप्रतिपादक ग्रंथांत सांगितलेली लक्ष्य वस्तु आपल्या स्वस्वरूपानें या पुरुषांस मात्र निःशेषत्वानें समजते. उपनिषदांतील शब्द उच्चारण्याचा मात्र अवकाश कीं, यांच्या पूर्वसंस्कृत अंतःकरणांत सद्वस्तूचा पूर्णप्रकाश होतो. हेच खरे महात्मे होत. पूर्वजन्मींच्या पुण्यसंचयानें यांची पापोन्मूलकवृत्ति सर्वथा मावळून गेलेली असते व पूर्वीच श्रवणमननादिसंस्कार पुष्कळ होऊन याही जन्मांत त्यांची पुनरावृत्ति झाल्यामुळें त्यांचें ज्ञान पूर्णावस्थेस गेलेलें असतें. अर्थातच यांचा जन्म केवळ लोकसंग्रहाकरितां होत असतो. किंवा सत्यलोकाच्या आसपास पराभक्ति करून शुद्धज्ञानानंदांत जे श्रेष्ठ जीव असतात, ते जीव ईश्वराज्ञेनें लोककल्याणार्थ व धर्मसंस्थापनेकरितां अवतार घेतात. एवंच कोणत्याही प्रकारें यांचें आगमन पाहिलें तरी ते लोकोद्धारकच होतें. अर्थातच परब्रह्मावरील यांची अनुरक्ति पराकाष्ठेची भेदशून्य असते. सारांश यांची आत्मिक उन्नति संपूर्णतेस पोहोंचली असल्यामुळें हे परब्रह्माचे एकनिष्ठ भक्त असतात आणि परब्रह्माशीं यांचें नित्य साहचर्य असल्या कारणानें यांच्या वृत्तीस अखंड व एकरसात्मक

तादात्म्य येऊन ते सर्वथा ब्रह्ममय होऊन जातात. यांसच जीवन्मुक्त असें म्हणावें. या भक्तांची जी 'परा' नामकभक्ति, तिचा विचार व विस्तार सातव्या अध्यायांत केला आहे. (२) यांच्या बऱ्याच खाली असणारा वर्ग म्हणजे मुमुक्षु भक्तांचा होय. ह्यांच्या वृत्तीमधील राजसता व प्रपंचप्रीति सर्वथा नाहींशा झालेल्या नसतात; ह्यामुळें चित्ताला जें अखंड स्थैर्य यावयाला हवें असतें, सुख-दुःखांमध्यें समबुद्धि ठेवण्याचें सामर्थ्य हवें असतें, तें या दुसऱ्या वर्गांतील भक्तांस प्राप्त झालेलें नसते. तथापि चित्ताचें संशोधन करणारे संस्कारांचें बरेंच कार्य झाले असल्यामुळे वेदांतप्रणीत धर्मावर व धर्मग्रंथांवर यांची निःसीम प्रामाण्यबुद्धि असते व सात्त्विक गुणांचा पुष्कळसा प्रादुर्भाव झालेला असल्या कारणानें राजस वृत्तीचा व प्रापंचिक प्रीतीचा ओघ परोपकार व सामाजिक कल्याण अथवा लोकसंग्रह करण्याची बळकट प्रेरणा इकडे, द्रव्य लोभानें नव्हे तर कीर्तिलोभाने, वळतो. 'परब्रह्मस्वरूप व आत्मस्वरूप ही दोन्हीं शुद्ध, बुद्ध, नित्य व मुक्त आहेत' हें शास्त्रीयज्ञान त्यांस झालेले असून त्या ज्ञानावर यांचा दृढ विश्वासही असतो. परंतु यांस अद्यापि साक्षात्कार झालेला नसतो. 'ईश्वरामध्ये आणि माझ्यामध्यें वस्तुतः अभेदच आहे' हें विज्ञान यांस झालेले नसतें. एवंच या शास्त्रपारंगत पण सात्त्विक गुणांस आरंभ मात्र झालेल्या मुमुक्षूंस सत्त्वगुण प्रवृद्ध होऊन ज्ञानपराकाष्ठेच्या साहाय्याने साक्षात्कार होण्याची कायती अपेक्षा असते. पहिल्या वर्गांतील भक्तांनीं ती आशाही समूळ विनष्ट केलेली असते. असो; ह्या दुय्यमप्रतीच्या ह्या भक्ताविषयींचे व तद्गत ब्रह्माचे वर्णन ८ व्या अध्यायांत आहे. (३) तिसऱ्या वर्गांतील लोकांच्या वैषयिक इच्छा शांत झाल्या नसल्या कारणानें त्यांचे चित्त समाधिस्थ होत नाहीं. त्यांचें ईशचरणी प्रेम असते; त्यांचे हें प्रेम म्हणजे ईश्वर हा सर्वांतर्यामी आहे असा प्रत्यय होय. जलस्थलादि सर्व जंगम पदार्थ आणि सचेतन अथवा जीवंत प्राणी यांमध्यें अवघा नारायणच भरला आहे असे समजून ते सर्वत्र सगुणरूपी नारायणाचा शोध करीत असतात. (पहा अ० १० श्लोक ८, ९, १० व ११;) वासनासंन्यास आणि अहंकारत्याग हीं दोन साधनें त्यांस बऱ्याच प्रमाणानें वश झालेलीं असतात. या प्रतीचे लोकांचा व तद्गत ब्रह्माचा ऊहापोह नऊपासून बारा अध्यायापर्यंत केला आहे. हे सर्वही शेवटीं निर्वाणमुक्तीचे अधिकारी होतात. जीवेश्वराच्या ऐक्याचा साक्षात्कार झाला की पहिले भक्त मुक्त होतात. दुसरे भक्त पहिल्या वर्गांत जाऊन पुढें जीवेश्वराचे ऐक्यास अनुभवी होतात आणि तिसऱ्या वर्गांतील लोक दुसऱ्यांतून पहिल्या वर्गांत जाऊन नंतर साक्षात्कार अनुभवितात. असो; ज्यांस ज्ञान-विज्ञान होऊन मुक्तदशा प्राप्त झाली आहे ते परब्रह्मच होत. ते सर्व वर्गांच्यावर, सर्वश्रेष्ठ सर्वव्यापी, ब्रह्मच होत (पहा अ० ७ श्लोक १८).

## गीताशास्त्र कां प्रवर्तलें ?

३ (अ) याप्रमाणें श्रीमद्भगवद्गीतेंत जें परब्रह्मवर्णन आहे त्यावरून उपास्यउपास-

कांचे स्थूल मानानें जे सामान्य भेद होतात, त्यांचें वर्गीकरण झालें. आतां उपास्य म्हणजे '**तत्**' शब्दलक्ष्य जें परब्रह्म तें कोणतें याचा पहिल्या वर्गांतील लोकांच्या दृष्टीनें विचार करायाचा. सातव्या अध्यायाचे पहिले तीन श्लोक प्रस्तावनापर आहेत. मुख्य विषयाला सुरवात करण्यापूर्वी एकच गोष्ट थोडक्यांत सांगतों. ती हीः ब्रह्माचें ज्ञान होणें व साक्षात्कार होणें यागोष्टी प्रायः अशक्यच आहेत. परब्रह्माचें ज्ञान क्वचित् एखाद्यासच होतें. हें ज्ञान दुर्मिळ आहे म्हणून व मानवी शक्तीला याचा शोध लागणें असाध्य, निदान अति कठिण, आहे म्हणूनच परमेश्वरमुखानें ही ज्ञानामृतवृष्टि या भूलोकांवर झाली आहे. श्रीकृष्णपरमात्मा हें परब्रह्माचें प्रकटस्वरूप होत. या ईश्वरावतारी महापुरुषानें गीताशास्त्राचा अवतार केला आहे व श्रीमद्व्यासांवर परमेश्वरी अनुग्रह मोठा, म्हणून तन्मुखानें हें अखंड सत्यशास्त्र जगांत प्रकट झालें आहे. अर्थातच या शास्त्राला अबाधित्व येऊन तें सर्ववंद्य झालें हें नीटच झालें. या शास्त्राचें पठन, मनन व अनुध्यान नित्य होऊन तदाकारवृत्ति झाली, तेथील ज्ञानविज्ञान समग्र व निःसंशय समजून उमजलें म्हणजे जाणावयाचें असें कांहा एक राहत नाहीं. असो; श्रोतृवृंदास अभिमुख करणारा, श्रोत्यांचें लक्ष्य याप्रमाणें सर्वस्वी आकर्षण करणारा, असा हा प्रस्ताव झाल्यानंतर भगवान् प्रथमतः

## अपरा व परा प्रकृतींचें स्वरूप

वर्णितात. परब्रह्माशिवाय या विश्वांत जें काय ज्ञानदृष्टीला दिसतेंसें वाटतें तें व विश्व यांची बेरीज म्हणजे प्रकृति होय. या प्रकृतीचे परा आणि अपरा असे दोन भाग होतात. गति अगर चेतना ज्या शक्तीपासून उत्पन्न होते, त्यापासून चैतन्यापर्यंतच्या सर्वशक्ति ( All forces physical mental & moral) यांचा अंतर्भाव परा प्रकृतींत होतो. या निरनिराळ्या शक्ति जेथें आविर्भूत होतात, प्रकट होतात, ते अपरा प्रकृतींत येतात. सारांश, या शक्तींचे विषय ( Matter ) म्हणजे अपराप्रकृति होय. विषय आणि विषयज्ञता, अथवा परा आणि अपरा प्रकृति, मिळून ईश्वराचें ऐश्वर्य आपल्या मानवी दृष्टीनें पूर्ण होतें. गेल्या शतकांत **हेगेल** म्हणून जो महातत्ववेत्ता यूरोपखंडांत होऊन गेला त्यानें असें प्रतिपादिलें कीं, 'ज्ञाता व ज्ञेय' यांच्या पलीकडे असणारें, परंतु दोहोंचाही अंतर्भाव करणारें जें एक तत्त्व आहे, तेंच सत्य होय. हें सत्य म्हणजे आमचें परब्रह्म! ही गोष्ट आमच्या लोकांस कित्येक शतकें अगोदर समजून चुकली होती. असो; तेव्हां पृथ्वी नामक अत्यंत स्थूल पदार्थापासून तों थेट अहंकार नामक 'मूळ प्रकृति, अव्यक्त,' या अत्यंत सूक्ष्मापर्यंत जे जे म्हणून ज्ञेय, ज्ञानविषय, ज्ञानेंद्रियादिसह सर्व विषय आहेत, त्यांचा अंतर्भाव '**अपरा**' प्रकृतींत होतो. (आधुनिक पाश्चात्य मानसशास्त्रें पहा. त्यांचाही सिद्धांत असाच आहे). ही प्रकृति स्वभावतः **जड** आहे, समजण्याचा **विषय** आहे म्हणून हिला 'अपरा' (गौणप्रकृति) असें नांव मिळालें.

या शब्दाच्या अर्थांत सर्व दृश्यादृश्य वस्तूंचा समावेश होतो हें आतांच सांगितलें आहे. यांत सर्व गुणविशिष्टभूतांचा त्यांचे गुणांचा व त्यांच्या क्रियांचा अंतर्भाव होतो. म्हणजे शास्त्रीयदृष्टीनें बोलावयाचें असल्यास भूस्तर, वनस्पति, जीवन, ज्योतिष, गणित, मानसनीति इत्यादि सर्व शास्त्रांचे विषय व त्यांतील सिद्धांत यांचा अंतर्भाव अपरा प्रकृतांत होतो. आतां समजण्याचें सामर्थ्य असणारें 'जीव' नामक जें तत्त्व आहे त्याला **परा प्रकृति** असें म्हणावयाचें. हा जीव, हा प्राण, ही चेतनाशक्ति आहे म्हणूनच जगाचें अस्तित्व कायम राहतें. जेथें म्हणून समजण्याचें सामर्थ्य आहे, तेथें 'परा' नामक प्रकृति प्रकट होते. या 'परा' प्रकृतांत पदार्थांत चेतना उत्पन्न होणाऱ्या गतीपासून आरंभ होऊन व ध्वनिप्रकाश, उष्णता, विद्युत्, चुंबकत्व इत्यादि नानाशक्तींचा अंतर्भाव होऊन ज्ञानशक्ति व इच्छाशक्तिपर्यंतच्या सर्व अधिभौतिक, अधिमानसिक, अधिदैविक आणि अध्यात्मिक शक्तींचा समावेश होतो. सारांश Force पासून Consciousness जाणीवेपर्यंत सर्वांचा 'परा' मध्यें अंतर्भाव होतो. तात्पर्य हें आहे कीं, समजणाऱ्या सर्व वस्तु हा एक घटक, ज्ञातृत्वशक्ति हा दुसरा घटक; हे दोन मिळून हें विश्व निर्माण झालें आहे. सारांश, कोणताही प्राणी किंवा कोणताही पदार्थ आपण घेतला असतां तेथें आपल्यास जडचैतन्याचें मिश्रण कमी अधिक प्रमाणानें सांपडेल. नुसतें चैतन्य किंवा केवळ जड वस्तु आपल्या अनुभवास येणें शक्यच नाहीं; दगडांतील चैतन्य लुप्तपणानें वास करितें, पण बाह्यशक्तीच्या योगानें तें प्रकट स्थितातही येतें. विराटस्वरूपालाही जडाजडसंयोग आहेच! एवंच हें विश्व चराचरात्मक, जडचैतन्यात्मक आहे. हा शास्त्रीयसिद्धांत ६ व्या श्लोकाच्या पूर्वार्धांत सहज आला आहे.

## ईश्वराचें अस्तित्व.

४ या जड चेतनांचे संयोगवियोगानें सर्व सृष्टिव्यापार चालू शकतील; आतां परमेश्वराची कांहीं अपेक्षा नाहीं; असें कोणी कदाचित् म्हणेल, त्यास ६ व ७ श्लोकद्वयांत उत्तर दिलें आहे. भगवान् म्हणतातः जगाची उत्पत्ति व संहार, यांचें कारण मीच आहें. माझ्या पलीकडे, माझ्याहून श्रेष्ठ असें कांहीं नाहीं. मणी ज्याप्रमाणें सूत्रांत ओंविलेले असतात, त्याचप्रमाणें हीं सर्व विश्वें मजमध्यें आहेत. मीच त्यांचा सूत्रधार आहे.

खरेंच आहे. नुसतें जड व नुसती चेतना आणि त्यांचा संयोग यांच्या हातून काय होणार? नुसतें जड किंवा नुसती चेतना स्वतः कांहीं करूं शकत नाहींत. त्यांस योजकाची अपेक्षा असते. आपण यःकश्चित् जीव ना? पण आपण सुद्धां कांहीं तरी इष्टप्राप्तीसाठीं जडचेतनास चालन देतों! मग हें जें अवाढव्य रीतीनें विस्तारलेलें अनेक जगतात्मक विश्व कीं ज्याच्या व्यापारामध्यें एक बालाग्रही अव्यवस्था दृष्टीस पडत नाहीं तें विश्व उगीचच्या उगीच म्हणजे यदृच्छेनें परिभ्रमण करीत हिंडत आहे, असें म्हणणें युक्तिशून्यत्वाचें होईल. शिवाय, असा अनुभवही आपल्यास नाही. सारांश, विश्वाची व विश्वांतील पदार्थांची उत्पत्ति, त्यांचा लय, व त्यांची स्थिति याला कांहीं तरी हेतु हवा.

हेतु आला कीं, कोणी तरी योजक आला. हा योजक-महायोजकच हा! म्हणजेच परमेश्वर होय. स्वार्थाची कोणतीही अपेक्षा मनांत न धरितां-कारण तो आप्तकामच आहे-परमेश्वर हें विश्वचक्र चालवीत आहे व जीवांचा उद्धार त्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें स्वनियमानुसार व्हावा, हा हेतु मनांत धरून, हें विश्वचक्र तो चालवितो आहे. सूर्याची फेरी कधीं तरी टळली आहे काय? पौर्णिमेला चंद्र १४ कळाच घेऊन आला असें कधीं तरी झालें आहे काय? राळे पेरून व राळ्यांचीच मशागत करून कधीं तरी भोपळे आले आहेत काय? झाडांच्या पानांवरील, पुष्पांच्या आंतील, कीटकांच्या पृष्ठावरील, शिंपल्यांतील व इंद्रधनुष्यांतील नकशी, रंगदार नकशी कशी तयार झाली? याला 'यदृच्छा ( chance )' हे उत्तर समाधानकारक होत नाहीं. कारण येथे योजना दिसते आणि योजना आली की तेथें योजक आलाच! असो: अभिज्ञ वाचकांस विनंति आहे कीं, त्यांनीं प्रश्न व श्वेताश्वतर हीं उपनिषदें, या प्रश्नांच्या मोक्षार्थ्यर्थ अवश्य वाचावीं. सारांश या विश्वांतील पदार्थजातीस जे नियम घालून दिले आहेत, त्यांचें अतिक्रमण त्यांच्या हातून होणें तर शक्यच नाहीं; त्या नियमानुसार प्रत्येक सजीव अगर निर्जीव पदार्थास चाललेंच पाहिजे. आतां या चराचराच्या वर्तनाला 'नियम' अशासाठीं म्हणावयाचें कीं, त्यांत कांहीं उद्दिष्ट हेतु आहे. हा हेतु कोणता? सर्व पदार्थांचा उद्धार करणें हा हेतु होय. या उद्धारालाच युरोपियन लोक Evolution ह्मणत असतात. चेतनेचा उद्धार म्हणजे चैतन्यस्वरूपांत लीन होऊन जाणें नव्हे, तर तादात्म्य पावणें हा होय. चैतन्याशी चेतनेची अत्यंत उन्नतावस्था परमेश्वरी अनुग्रहानें प्राप्त व्हावयाची, त्याच प्रमाणें जडास चेतनेचे स्वरूप यावयाचें, तेंही परमेश्वरीसंकेतानुरूपच होय. सारांश जड, चेतना व चैतन्य हीं एका सच्चिदानंदाचीं अवस्थांतरें जीवास, -उपाधिविशिष्ट आत्म्यास-भासतात: आणि अविद्यावश जीवाच्या व मायापति परमेश्वराच्या उपाधि जसजशा कमी होत जातील तसतसा खरा प्रकार अनुभवास येऊं लागून शेवटीं उपाधींचा नाश व ब्रह्मस्वरूप एकदम प्रकट होतील. भेददृष्टि नाहीशी होत जाणें हाच उद्धार आणि याच उद्धारासाठीं विश्वनियम जागृत होतात. असो; ईश्वर आहे कीं नाही? या प्रश्नाला एक उत्तर असे आहे. 'विश्वांत सर्वत्र व्यवस्था आहे की नाहीं?' या प्रश्नाला होय अगर नाहीं, असें उत्तरद्वय येईल. 'नाही असे उत्तर आल्यास मूळ प्रश्नाचें बीजच संपले. कारण व्यवस्थाच नाहीं तर प्रश्नास सयुक्तिक उत्तर यावें हा न्यायच-ही व्यवस्थाच-संपली! 'आहे' पक्षीं व्यवस्थापक हवा असतो. कारण, व्यवस्थेमध्यें हेतु असतो: आणि हेतु हा इष्टप्राप्तीचें एक साधन आहे. असो; विश्वाची बिनचूक व्यवस्था लावणारा सर्वज्ञ, सर्वशक्ति, सर्वसाक्षी असा असलाच पाहिजे. सर्वसाक्षित्वानें परमेश्वर विद्यमान् असतो, असें सातव्या श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगितलेंही आहे. 'या ईश्वराचा ईश्वर कोण? याला प्रथमार्धांत उत्तर आहे.

या विश्वाच्या अंतर्यामीं राहून विश्वाचें सर्वथा नियमन करणारा, सर्वव्यापी, शुद्ध, निर्विषय असा जो परमात्मा तो विश्व होऊन आपणच त्याचा स्वामी

झाला आहे.—( जीवशिवांचें ऐक्य पूर्णपणें उमजल्यानंतर विश्व आणि स्वामित्व यांचा लय होऊन एक ब्रह्म मात्र उरतें, दुसरे कांही नाहीं ही स्थिति याच अध्यायांतील १८ व्या श्लोकांत वर्णिलेल्या ज्ञानी पुरुषांची आहे. ही गोष्ट निराळी. हिचा विचार आपल्यास सध्यां कर्तव्य नाहीं. )—असो; ज्ञातृत्व व विषय यांचा स्वामी होऊन त्यांचें नियमन करणारा, प्राण्यांच्या व विश्वांच्या कर्मानुसार त्यांची उत्पत्ति, त्यांची स्थिति व त्यांचा लय करणारा जो परमात्मा तो सर्वश्रेष्ठच आहे त्याच्या पलीकडे कांहीं श्रेष्ठतर असणें शक्यच नाहीं. अखंड व निर्विकार, सर्वद्रष्टृ व सर्वनियामक असे 'एकच' सिद्ध झाल्यावर त्याच्या पलीकडे दुसरें आणखी एक 'एक' असेल अशी कल्पना करणें म्हणजे साखरेची साल काढणाऱ्या न्यायाचें अवलंबन करणें होय. असो; तेव्हां हा जो सर्व-नियामक, सर्वांतरभावी, परमात्मा आहे त्याच्या आधारावर, ह्याच्या सत्तेनें, हीं विश्वमाला अबाधितपणें चाललेली आहे. सांख्यांच्या तात्त्विक शोधाचा ओघ 'परा आणि अपरा' प्रकृतीपर्यंतच येऊन थांबला! पण, एकरसात्मक समुद्रास मिळेपर्यंत नदीचा ओघ ज्या-प्रमाणें थांबूं शकत नाही, त्याचप्रमाणें, 'परा आणि अपरा' नामक दोन परस्पर विरुद्ध तत्त्वांस ज्याच्या योगानें **अस्तित्व** आले, ज्याच्या योगानें उभयतांचा संबंध होतो व ज्याच्या योगानें परस्परविरोध नष्ट होऊन एकवाक्यता सिद्ध होते, असे कांहींतरी तत्त्व घेतल्याशिवाय विचाराचा ओघ थांबणार नाही. ह्या विधानांच्या प्रत्ययार्थ Royce कृत 'जीव आणि जगत्' पुस्तकांतील mysticism ( साक्षात्कार ) हा भाग इष्ट तर वाचावा. असो; हें ( एकं एव अद्वितीयं ) तत्त्व वैदिक मतांत आहे म्हणून सांख्यमताहून वैदिक सिद्धांताला सर्वमान्यत्व आलें आहे. परब्रह्मांत ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय हे संबंध व श्रेष्ठता, कनिष्ठता हें तारतम्य संपतें. काळ, स्थळ, प्रसंग इत्यादि उपाधि संपतात. आणि शुद्ध चैतन्य मात्र अवशिष्ट राहते. असो; पदार्थाला **अस्तित्व, भातित्व, प्रियत्व** जें प्राप्त होतें तें सच्चिदानंदघन जो परमात्मा त्यापासूनच होय. पदार्थाचें **नाम** आणि त्याचें **रूप** हीं दोन मात्र भेदस्थितींत उत्पन्न होतात; कारण नाम व रूप हीं अबाधित नाहींत. एवंच नामरूप नित्य नव्हे. 'अनेन जीवेनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि' ही श्रुति पहा. हा विवेक सांख्यांनीं केला नाहीं म्हणून त्यांचें मत तात्त्विक दृष्टीला अग्राह्य झालें. या-प्रमाणें परा व अपरा प्रकृतींचें उपांगत्व व ब्रह्माचें श्रेष्ठत्व स्थापित झालें. आतां परमा-त्म्यामध्यें '**सर्वविश्व कसें गोंविलें आहे**' व परमेश्वराव्यतिरिक्त पदार्थच नाहीं, त्यांचा विस्तार ८ ते १२ श्लोकांमध्यें केला आहे. 'एषोऽन्तर्यामी, एष योनिः सर्वस्य, प्रभवाप्ययौ हि भूतानां' ही श्रुति आहे. ( मॉलिब्रयांचीचें तत्त्वविचार पहा. )

**विज्ञान.** ( प्रत्ययास येणारें ज्ञान. )

५. आठ ते बारा या श्लोकावलींत काय सांगितलें आहे **बरें? स्थिरचर व्यापून दशांगुलें उरणारा परमेश्वर ( पुरुषसूक्त मंत्र १ ) पृथ्व्यादि पंचमहाभूतांमध्यें गंध, रस, रूप ( तेज ), स्पर्श आणि शब्द या स्वरूपानें परमेश्वर आविर्भूत**

होतो. जलाला जलत्व त्यांतील रसानें येतें. हा रस नष्ट झाला कीं, जलत्व संपलें. अशींच सर्व पंचमहाभूतांची व्यवस्था आहे. या महाभूतांस अस्तित्व येतें तें परमेश्वराच्या आविर्भावानें येतें व या भूतांचें नियामकत्वही परमेश्वराकडेच आहे; उघडच आहे, जलाचें जलत्व त्यांत असणाऱ्या रसपरिमाणानें ठरावयाचें व नियमित व्हावयाचें! असो; भगवंतांनीं येथें अग्नि सूर्यचंद्रादि तेजोगोलक यांत विशेष करून 'अग्नीचें **तेज** (Heat) मी आहें' व 'सूर्यचंद्रांचि **प्रभा** ( Light ) मी आहें' असें सांगितलें आहे, हें संस्मरणीय होय.

ह्याचप्रमाणें सर्वतः व सर्वथा प्रामाणिक ग्रंथ जे वेद यांत वस्तुतः व विधितः परमेश्वराचें स्वरूप वर्णन आणि तत्स्वरूप प्राप्त होण्याचे उपाय सांगितलेले असतात; श्रुतीस अनुकूल असून युक्तीनें व अनुभवानें प्रामाणिक ठरणारा प्रत्येक ग्रंथ 'वेद' च होय. आतां केव्हां हें ग्रंथ अधिभौतिक वस्तूंची मीमांसा करीत असतील, कधीं अधिदैविक वस्तूंचे नियमांचे उद्घाटण करीत असतील व कधीं मानसिक आणि अध्यात्मिक पदार्थांचें प्रवचन करीत असतील. कांहींकां असेना! ही सर्वगत व सर्वव्यापी परमेश्वराची गुणवर्णनरूपी स्तुतिच असते. तसेंच अमुक इष्ट हेतु सिद्ध होण्यासाठीं कांहीं शास्त्रीय ग्रंथांतून विधिपर वाक्यें व निबंध आढळतात. हें सर्वही परमेश्वराचें स्तोत्रच होय. असो; या स्तोत्राचें अतिसंकलित स्वरूप म्हणजे ॐ हें होय. आणि आपण श्वासोच्छ्वास करीत असतां 'सोहं' 'हंसः' असा जो आपल्या नकळत अजपाजप चाललेला असतो, तो समजून होईल तर तीही परमेश्वरी स्तुतिच आहे. आतां ही स्तुति वायुद्वारा होत आहे, म्हणून 'वेदांतील ॐकार स्वरूपी मी' असें भगवान् म्हणतात. आकाशांतील **शब्द** परमेश्वर आहे, शब्दगुण नष्ट झाला कीं आकाशही संपलें, हें अलीकडील प्रयोगांवरूनही सिद्ध झाले आहे. 'शून्य' प्रदेश आपल्यास निर्माण करितांच येत नाहीं; पण आपण जसजसें 'आकाशद्रव्य' कमी कमी करीत जातों, तसतसा शब्दगुणही नष्ट होतो, हें प्रयोगसिद्ध आहे. पुरुषास '**पौरुष**' आहे तें भगवत्स्वरूपी आहे. आपल्या ज्ञानेंद्रियांच्या व कर्मेंद्रियांच्या द्वारानें प्रयत्न करून 'मी श्रेष्ठपदाला जाण्याची खटपट फलापर्यंत करीत राहीन' असा दृढ निश्चय करून त्याप्रमाणें फल मिळविणें याचेंच नांव 'पौरुष' होय. सारांश, 'पौरुष' म्हणजे **उद्धाराची इच्छा आणि सफल प्रयत्न.** अर्थातच त्याचें स्वरूप ईश्वरीच असलें पाहिजे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ सांगितले आहेत. हे साध्य करणारांत 'पौरुष' असतें. पृथ्वींतील **सुगंध** आणि अग्निगत **तेज** हीं भगवत्स्वरूपेंच होत. सर्व भूतांमध्यें जी **जीवनशक्ति**, **प्राणशक्ति** आहे तीही परमेश्वरच आहे. तसेंच या शक्तीच्या साहाय्यानें आणि मन, बुद्धि, अहंकार यांच्या करवीं **तपश्चर्या** होते ती भगवंतांचें स्वरूप आहे. याप्रमाणें 'अपरा व परा–'प्रकृतींचा विचार झाला. आतां प्रकृतिबाह्य स्वरूप सांगतात. सर्वभूतांचें सनातन असें आदिकारण, मध्यकारण व अन्तकारण मीच आहे. हें कारण अनाद्यनंत आहे. सर्व प्रकृति आपल्या उभयस्वरूपांनीं लीन झाली तरी हें कारण जसेंच्यातसेंच राहतें. येथें

भंग नाहीं. पुनः जीवकोटीचा विचार करून सांगतात. बुद्धि, क्षत्रियाचें तेज, वैश्याचें सात्त्विक बल, शूद्रासकट सर्वांचा धार्मिक काम, हें उद्धारक गुण परमेश्वरच नटला आहे. सारांश, ज्ञानगोचर जें कांहीं आहे तें परमेश्वरस्वरूप आहे. फार तर काय पण सात्त्विक, राजस व तामस इत्यादि गुण हे परमेश्वरकृत असून प्राणिमात्राच्या कर्मानुसार त्या त्या जीवास प्राप्त होणारे आहेत. परमेश्वरामध्यें मात्र हे गुण नाहींत. हेंच सांख्यमताचें निराकारण होय. हेंच परमेश्वरी स्वरूप प्रकट करणारें ज्ञान होय. हें सर्व वाचून गेल्यावर गीतावाचकांच्या अनेक शंका नाहीशा होतील असें वाटतें. "ईश्वरानें 'कांहीं नाहीं' पासून जगत् उत्पन्न केलें" असे कांहीं धर्मांत सांगितलें आहे. 'कांहीं नाहीं' पासून, अभावापासून, जगत् उत्पन्न करणे हें अयुक्त, अचिंतनीय आणि असमंजस आहे; अनुभवही जीवास असें सांगतो. म्हणून प्रत्यक्ष सर्वशक्तिवंत परमेश्वरासही तसें करणें त्या जीवाच्या मतें अशक्यच होय! (पहा श्लोक १६ अध्याय २). जीव आणि जीवन, पुरुष आणि प्रकृति हीं ईश्वराचींच दोन अंगें असून हीं परस्परविलक्षण अशीं बालकें परमात्म्याचीं भिन्न, आभासिक व परस्परावलंबी स्वरूपें आहेत. आपण प्राकृत लोक आहोंत; तेव्हां आपल्यास समजेल अशा भाषेंत बोलावयाचें असल्यास हें विश्व प्रकृतीचा **परिणाम** आहे. प्रकृति व पुरुष हीं परमेश्वराचीं **अंगें आहेत.** अव्यक्त प्रकृतीपासून ह्या व्यक्त विश्वाचा उद्भव झाला आहे, पुरुष भोक्ता आहे व परमेश्वर या विश्वाचा नियामक आहे. ज्यांस **तत्त्वज्ञान** प्राप्त झालें आहे त्यांनीं ह्या आभासिक विश्वाकडे पाहिल्यास विचारदृष्टीनें त्यांस हें विश्व **विवर्त** आहे, भासमात्र आहे, असें दिसेल; आणि तात्त्विक अनुभवाचें खरें तत्त्व पाहूं गेल्यास त्यांना ब्रह्माव्यतिरिक्त कांहींच दिसणार नाहीं. येथें 'पाहूं गेल्यास' व 'दिसणार नाहीं' हे शब्द सुद्धां कष्टानेंच वापरावयाचे! कारण 'सर्व ब्रह्ममय झाल्यावर पाहणें कसचें? आणि पाहणारा तरी कोण?' असा वास्तविक प्रसंग येतो! असो; तेव्हां प्राकृत भाषेनुसार व प्राकृत कल्पनेनुसार विश्वाचें उपादान कारण परमेश्वरच आहे असें ठरतें. आणि श्रीकृष्ण परमात्म्यानें हेंच ज्ञानविज्ञान ८—१२ श्लोकांमध्यें लोकांस ब्रह्मानुभवाचा परिचय व्हावा म्हणून कथिलें आहे. आतां जिज्ञासु सामान्य लोकांस

## हें तत्त्व कां समजत नाहीं?

६ परमेश्वराकडून मिळालेलें किंवा जडापासून चैतन्याकडे उत्क्रांति होत असतां परमेश्वरी अनुग्रहानें संपादित झालेलें जें इच्छास्वातंत्र्य त्याचा दुरुपयोग केलेला असतो म्हणून सर्वत्र ब्रह्म पसरलें आहे, तें अज आहे, अक्षर ( अविनाशी व अविकार्य ) आहे, हें समजत नाहीं. अधिकारमदानें उन्मत्त झाल्यामुळें प्राप्त झालेल्या इच्छास्वातंत्र्याचा दुरुपयोग केला म्हणजे वर सांगितलेली गोष्ट समजत नाहीं. पूर्ण, अनंत, शुद्ध, निर्विकार्य, असें जें आपलें मूळस्वरूप तें समजण्याकडे अगर जो मुख्य पुरुषार्थ, तो साध्य

होईल अशा साधनाचें संपादन करण्याकडे आपल्या इच्छास्वातंत्र्याचा उपयोग करणें हा देवमान्य मार्ग सोडून देऊन प्राणी ज्या वेळीं अपूर्ण, सांत, विकारपूर्ण व मलीन अशा भासमान विषयाचा आश्रय करितो, प्राप्त झालेल्या अधिकारानें आपल्या योग्यतेहून अलभ्य अशा श्रेष्ठतर किंवा अयोग्य अशा नीचतर पुरुषार्थापाठीमागें लागतो, त्यावेळीं तो अशुद्ध सात्त्विक, राजस अगर तामस यापैकीं एकाच्या किंवा या तीनही गुणांच्या स्वाधीन होऊन मूढ होतो. विवेकशून्य झाल्यामुळें त्यास ज्ञानांधत्व येतें आणि मग अर्थातच परमात्म्यासारखें तेजःपुंज, अपरोक्ष, असणारें सर्वव्यापी तत्वही समजेनासें होतें! हीच माया होय. कारण सात्त्विकादि त्रिविध भावांची उत्पत्ति सार्वत्रिक मायेपासून आहे. हे सर्व विकार अस्तित्वस्वरूपानें परमेश्वरांत असतातः पण विकारस्वरूपानें परमेश्वर त्यांच्यांत नसतोः कारण परमेश्वरास विकारच नाहीं. विकार हें मायेचें स्वरूप आहे व तें त्रिविध आहे. ह्या विकारांच्या योगानें जगही विकृत असणार आणि जगास पाहणारा जीव हाही, विकृत अशीं इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार यांच्याच द्वारें बघणार! अर्थातच त्यास त्रिविध विकार मात्र दिसतात; पण त्यांचे मागें सदैव असणारें जें अज आणि अव्यय असें सच्चिदानंदस्वरूप तें ह्या विकृतद्वारांनीं पाहणारांस दिसत नाहीं; आणि हें सत्स्वरूप साध्य झाल्याविना मोक्ष नाहीं. 'तेव्हां सत्त्वरजतमोयुक्त जी ईश्वरप्रकृतिद्वयरूपी दुस्तर माया आहे, तिला तरून जावयाचें असेल तर सच्चिदानंदरूपी जें माझें स्वरूप त्याला शरण गेलें पाहिजे.' ग्रंथकारांनीं वेदमंत्र घेऊन मायेचें खासें वर्णन केलें आहे. (पहा मूळ अ० ७ श्लो०९-१४).

## मायेचा विलास (उत्क्रांति-विसृष्टिवाद) आणि मायेचा नाश.

केवळ जडापासून शुद्धचैतन्याकडे जाण्याचा विश्वाच्या उत्क्रांतीचा क्रम आहे; असें अलीकडील तत्त्वज्ञानावरून दिसतें. या उत्क्रांतिवादाचा वेदांतसिद्धांताशीं मुळींच विरोध येत नाहीं. केवळ तामसी स्थितींतून आपण शुद्धसात्त्विक किंबहुना, त्याच्याही पलीकडच्या आत्मिक स्थितीकडे समाजतः चाललों आहों. पूर्ण तामस गुणाच्या राक्षसी तावडींतून सुटून आपण शुद्धसात्त्विक व आत्मिक स्थितींच्या सौम्य स्वराज्याकडे जात आहों हें वेदांतासही मान्य आहे. मध्यंतरीं मात्र तामस, व राजस आणि तामस मिश्रित सात्त्विक व राजसमिश्रित सात्त्विक गुणांच्या आधीन आपण असतों. आतां शुद्ध तामस स्थितींत ज्ञानच नाहीं; राजस स्थितीमध्यें 'आपण' या शब्दाचा फारच संकोच असतो आणि शुद्धसात्त्विक स्थितींत 'आपण' हा शब्द सर्वव्यापी होतो. एवंच परमात्म्याचें शुद्ध निर्विकार्य, सर्वव्यापी, एकरसात्मक स्वरूप पाहणें असल्यास आपली ज्ञानवृत्ति सात्त्विक म्हणजे वासनाशून्य व अहंकारविरहित, असली पाहिजे आणि शमदमादि साधनसंपत्ति, दया, क्षमा, औदार्य इत्यादि सद्विकार जागृत होऊन आपलेपणा अभेदवृत्तीचा झाला पाहिजे. हा जेथें नाहीं तेथें भेदमूलक

ज्ञान, भेदमूलक मनोवृत्ति आणि भेदमूलक आचरण आहे. अशा लोकांस आकाशाहून जास्त स्थिर, वायूहून शीघ्रगामी, अनंतकोटी सूर्याहून जास्त तेजस्वी, क्षीरसागराहून अनंतपटीनें मधुर, असले सर्वव्यापी, शुद्ध, निर्लेप ब्रह्मतत्त्व कोठून समजणार? परमेश्वराचें स्वरूप एक, एकरस, असे आहे. जीवाच्या वरिष्ठ कोटीस तें प्रकृतिद्वयाचें कारण आहे, असें दिसतें. वस्तुतः अस्ति, भाति, प्रियता या एकाच परंतु भिन्न दिसणाऱ्या स्वरूपानें परमेश्वरच सर्व नटला आहे; विकार मायेचे आहेत व ते मायोपाधि जीवास मात्र दिसतात. माया संपली ह्मणजे हें विकृतस्वरूप संपले आणि संसारबंधनही संपले. हें ज्ञानविज्ञानाचें अत्यंत उन्नत स्वरूप होय. योग्याने शेवटी याच स्वरूपाचें ध्यान करावयाचें आहे. हे समजून घेणे ज्यास इष्ट वाटेल त्यानें देवनिर्मित मायेचा, ईशप्रणीत इच्छास्वातंत्र्याच्या योगाने क्रमशः नाश करून प्रत्यक्ष परमेश्वरास शरण गेले पाहिजे. परमेश्वरास शरण गेले असतां अलंघ्य असा 'भरला पूर, मायेचा वाहून नेणारा लोंढा' ओलांडितां येतो व हा ओलांडिला ह्मणजे परमेश्वरस्वरूप स्पष्टतर होतें. सारांश, जीवरूपी जें आपले अविद्येत पडलेले प्रतिबिंब आहे, ते सोडून ईशरूपी जें मूळ बिंब तिकडे आपली मनःप्रवृत्ति वळविली तरच दैविक मायेला तरून जातां येईल. परंतु

## दुष्टलोक व अधम नरपशु

(७.) परमेशाला शरणच जात नाहीत. हे लोक अत्यंत अभिमानी असतातः म्हणजे ऐहिक प्रपंच हेंच आपले जीवितसर्वस्व आहे असे समजतात. देह, कांता, पुत्र, धन हीं तरी प्रिय वाटतात याचे कारणही तीं आपल्यास सुख ( मग ते दुःखमूलक व दुःखपरिणामी कां असेना! ) देतात, तेव्हां हीच माझी आहेत असा ह्या क्षणिक सुखदायक जडवस्तूंचा या जीवांस अभिनिवेश (अभिमान) दृढ झाला असतो; आणि ह्यामुळे संकुचित दृष्टि होऊन अज्ञान माजते व अविवेक उत्पन्न होतो. अशी वैषयिक स्थिति झाल्यामुळे अर्थातच प्राणरक्षक व उपभोगाच्या उपयोगी ज्या नश्वर वस्तु असतात, तेवढयानेंच पुरुषार्थ साधेल असें मानणाऱ्या कामक्रोधपूर्ण 'राक्षसांस' सर्वज्ञ, सर्वशुद्ध व सर्वसद्गुणपरिपूर्ण ईश्वराकडे जातां येत नाही हें स्पष्टच झालें. या संकुचित दृष्टीच्या, अतएव कामक्रोधास वश झालेल्या पुरुषांस, कुटुंबाचें खरें कल्याण म्हणजे खरा उद्धार, समाजाचा खरा उद्धार, विश्वाचा खरा उद्धार इत्यादि कामक्रोधादिनाशक वृत्तीचा व दया, क्षमा, शांति इत्यादि सद्विवेकांचे पोषक-वृत्तीचा गंधही नसतो. एवंच ते 'पापी, पापकर्मे, पापात्मे, पापसंभव,' असे होतात आणि उत्तरोत्तर—खऱ्या पुरुषार्थ सिद्धीच्या प्रयत्नाभावामुळे—जडावस्थेप्रत प्राप्त होतात अथवा नरकस्थितींत जाऊन पडतात! असो; भगवान् म्हणतात; हे तामसी वृत्तीचे प्रापंचिक नराधम सोडून दिल्यानंतर बाकी

## चार प्रकारचे भक्त

(८.) उरतात. या 'भक्तांच्या' अर्थाचा प्रपंच 'सारांश' नामक लेखाच्या भागांत

पुनः केला आहे. असो; हे भक्त परमेश्वराचें चिंतन करितात. परमेश्वराचे भक्त म्हणजे संकुचित स्वोपभोगाची इच्छा टाकून देऊन प्रापंचिक सुखाचा होम करणारे लोक होत. आतां (१) आर्त म्हणजे दुःखानें पोळलेले व आपलें झालेलें नुकसान भरून काढण्याची इच्छा करणारे लोक होत. हे लोक एक प्रकारचे कामुक भक्त आहेत; म्हणजे आपल्या वैषयिक इच्छा सात्त्विक मार्गानें पूर्ण व्हाव्या अशी इच्छा करणारे हे भक्त होत; आणि म्हणूनच ईशभजन करणारे हे लोक आहेत. किंवा संसारसागरांतील दुःखलहरींस कंटाळून, वैतागून, हे लोक परमेश्वराला शरण जातात. (२) अर्थार्थी म्हणजे सात्त्विक कामाकडे लावतां येईल अशा साठीं द्रव्यसंचय, विषयसंचय, करावा व तो संचय होण्यासाठीं परमेश-भजन करावें अशी यांची वृत्ति आहे. हेही कामुकच भक्त होत. तथापि पूर्वसंचित चांगलें असल्या कारणानें परमेशपूजा करावी असें त्यांस अंतःकरणपूर्वक वाटून ते कोणत्या तरी स्वरूपानें भगवद्भजनास लागतात. किंवा दुःखशून्य सुख मिळविण्याचे आशेनें कांहीं लोक परमेश्वराचें आराधन करितात. (३) जिज्ञासु हाही एक भक्तांचा वर्गच आहे. हे वास्तविक कामुकच खरे; पण यांची इच्छा आपल्यास ब्रह्मानुभव व्हावा, मुक्ति मिळावी अशी असते. वेदांतशास्त्राचे श्रवणमननादिकांनीं जीवरहस्य यांस कळलेलें असतें व शम-दमादि साधनषट्काच्या साहाय्यानें चित्तशुद्धि उत्तम झालेली असते. आतां केवळ शास्त्रप्रणीत सिद्धांताचा, उपनिषदांतील महावाक्यांचा, साक्षात् अनुभव आपणास यावा अशी मात्र एक इच्छा यांस असते व या इच्छेच्या तृप्तीसाठीं हे **मुमुक्षु** परमेश्वराचें शुद्ध मनानें, विषयशून्य मनानें चिंतन, भजन, पूजन, करीत असतात. वरील दोन्ही वर्गापेक्षां यांचा वर्ग उच्चतर आहे. हे मुक्तीच्या मार्गाला लागलेले असतात. (४) ज्ञानी भक्त हे मात्र सर्वश्रेष्ठ होत. '**अहं ब्रह्माऽस्मि**' '**एक मेवाऽद्वितीयम्**' इत्यादि महा-वाक्यांचा साक्षात् परिचय झाल्याकारणानें, अपरोक्ष अनुभव आल्यामुळें, यांची मोक्षमूलक इच्छा सुद्धां भस्म होऊन गेलेली असते. यांची भक्ति अर्थातच पूर्णत्वानें निष्काम असते. **हेच खरे आत्मनिष्ठ पुरुष होत.** हे भक्त आत्मरति, आत्मक्रीड, आत्मसंतुष्ट, सारांश आत्मनिष्ठ असे-भक्त-असतात. आत्मस्वरूपी भगवंतांस हे अत्यंत प्रिय असतात; याचें खरें कारण म्हणजे हे परमात्म्याशीं तादात्म्यवृत्तीनेंच राहतात; प्रत्यक्ष आत्मस्वरूपीच होतात. यांची समाधि सदैव जागृत असते; ह्या भक्तांस उत्तम गति मिळते हें सांगा-वयास तरी कशाला हवें? हे मुक्तच झाले. जीवन्मुक्त यांसच म्हणावयाचें. सातव्या अध्यायांत जें ब्रह्मस्वरूप सांगितलें आहे, तें यांच्या करितांच आहे. यांची शरीरयात्रा यांचें आचरण, केवळ '**भवोऽहि लोकाभ्युदयाय तादृशां**' (यांचा अवतार लोक-संग्रहासाठींच असतो) या न्यायाचेंच असतें. भगवान् म्हणतातः अशा पूर्णसात्त्विक व पूर्ण आत्मिक स्थितीमध्यें जन्म प्राप्त व्हावयाला अनेक जन्मांचे पूर्वसुकृताची अपेक्षा आहे. 'सर्वत्र, सर्वकाळीं वासुदेवच भरला आहे' असा अंतःकरणांत सर्वथा रूढ झालेला अपरोक्षानुभव येण्याला अनेक जन्मांतील निष्काम सात्त्विक आचरणाची तयारी असावी लागते. असो; यावरून '**ब्रह्मज्ञान नोहे लेंकुराच्या गोष्टी । तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥**' ही

साधुमुकुटमणी तुकोबामहाराजांची उक्ति किती सार्थ आहे, याचा प्रत्यय वाचकांस येण्यासारखा आहे. अशी वैष्णववीराची मंडळी फारशी असणें कोणत्याही-विशेषतः-हल्लींच्या मनूंत तरी शक्य नाहीं. भगवंतांनीं या अध्यायांतील तिसऱ्या श्लोकांत व एकोणिसाव्या श्लोकांत हेंच सांगितलें आहे. आतां सत्कर्माचा कधीं नाश होत नाहीं. (पहा अध्याय २ श्लोक ४० व अध्याय ६ श्लोक ४०) ही त्या सर्वज्ञ व सर्वदयाघन प्रभूची अमोघवाणी अनंत वेळां प्रगल्भपणें प्रकट झाली आहे म्हणून आपण पूर्णश्रद्धेनें प्रापंचिकज्ञान व परमार्थज्ञान करून घेऊन, श्रवण-मनन-निदिध्यासानें व ईश्वराच्या ऐकांतिकभक्तीनें आत्मसाक्षात्कार होईल असा अभ्यास करून स्वतःच्या उद्धाराचा व अज्ञानीजनांच्या उद्धाराचा प्रयत्न अहर्निश करावा हें योग्य होय. जर 'ब्रह्मच मी आहे' अशी पदवी पटकावयाची आहे, तर त्यासाठा आपणास प्रयत्नही पुष्कळच केला पाहिजे. असो; ही ज्ञाननिष्ठ ब्रह्मभक्ति हीच अस्सल प्रीतीची शुद्ध भक्ति होय. ही सर झाली म्हणजे मोक्षाचा **बालेकिल्ला** आपल्या ताब्यांतच येतो. असो; चाऱ्ही प्रकारचे भक्त हे उदार होत, कारण यांनां सांसारिक सुखाला लाथ मारिली असते. असो; पण बाकीचे जे परमेश्वरेतरदेवतांच्या भक्तांचे प्रकार आहेत ते संकुचित दृष्टीचे असल्यामुळें

## कामुकभक्तीचें पर्यवसान

(९.) अंतवंत फल देण्यामध्ये होतें. (पहा मूळ अ० श्लोक २३ प्रपाकारांची शातपथ श्रुति व श्लोक २५ प्रपाकारांचा ऋग्वेदांतर्गत मंत्र पहा) तथापि भगवान् म्हणतातः "सकाम-वृत्तीनें अन्य देवतांचें, क्षुद्रदेवतांचे जे नियमपुरःसर आराधन होत असतें तें वस्तुतः माझेंच आराधान होत असतें ह्मणून व प्रत्येक गौण किंवा प्रधान देवता माझ्या स्वाधीन असते ह्मणून वरील कामुकभक्तांच्या अंतःकरणांत वास करीत असलेली श्रद्धा मी दृढ करितों व त्यांचे कामुक मनोरथ मीच पूर्ण करितों. परंतु त्यांस प्राप्त झालेलें फल मात्र चिरकालिक नसतें. क्षुद्र देवतांची कामुक भक्ति केल्यामुळें त्यांस फल मिळतें तें जन्म-मरण चुकविणारें नसतें. त्यांस स्वर्गप्राप्ति झाली तरी ती चिरकालिक नसते. 'भाव तसें बळ, व भक्ति तसें फळ' हा न्याय येथेंही लागू पडतो. सारांश ह्या भक्तांची कामुक सत्कृत्यें मर्यादित असल्यामुळें त्यास स्वर्गसुखाचा भोगही मर्यादित कालपर्यंतच मिळतो. सारांश त्यांस मोक्ष मिळत नाहीं. तथापि हे लोक सत्कृत्यें करणारे असतात, उदार मनाचे असतात ह्मणून त्यांस माझा आश्रय परोक्षतः मिळतो व पुढें त्यांनीं आपले इच्छास्वातंत्र्याचा सदुपयोग केल्यास त्यांचें मोक्षमार्गाकडे जाणें सुकर असतें. पराकाष्टेच्या स्वार्थांतून निघून ते थोडेसे तरी सन्मार्गास लागलेले असतात. अतएव तेही उदारच होत."

## भक्त तितका उदार.

एवंच पूर्ण अज्ञानाच्या स्थितींतील विषयोपभोगाची इच्छा जीवांचें हित करणारी असते. इच्छेमुळें **कर्म** तरी होऊन जसजशी ती सात्त्विक मार्गाकडे जाऊं लागते तसतसें

आत्मस्वरूप प्रकट होतें. पुढें परमेश्वराचें भजन पूजन सात्त्विक मार्गानें होऊं लागलें म्हणजे विषयेच्छा नकोशी होते. हा असा इच्छात्याग करण्यास जो मानव तयार होतो तो अर्थातच उदार होय.

असला उत्साहकारक उपदेश इतरत्र आढळणें शक्य आहे काय ?

## परमात्म्याचें ज्ञान कां होत नाहीं ?

१० चोवीस श्लोकापासून सत्तावीस श्लोकांपर्यंत वरील प्रश्नाचा विचार केला आहे. एकरसात्मक जो परमात्मा आहे, जेथें कोणत्याही प्रकारची भेदवृत्ति नाहीं, केवळ ज्ञानस्वरूपच जेथें आहे, अशा जन्मशून्य, अविकार्य व सर्व श्रेष्ठ ब्रह्माला सामान्य लोक मूर्त स्वरूपानें, जन्ममरणादि उपाधींसहित व सविकार्यतः ओळखतात; म्हणजे परमेश्वर हा मर्यादित स्वरूपाचा, जन्म पावणारा, मरणारा, सुखदुःखादि विकार होणारा, एक मोठा प्राणी आहे, असें समजतात; सर्वव्यापी स्वरूपाच्या परमात्म्याला एका ठिकाणीं कोंडून ठेवितात ! याचें कारण **माया** होय. ही अज्ञानापासून, मोहापासून उत्पन्न होते. आपल्या उपभोगासाठीं आपल्या योग्यतेहून जास्त विषय असावे ही इच्छा, व त्या उपभोग्य पदार्थांत दुसरा वांटेकरी उत्पन्न झाला, तर त्याविषयीं द्वेष, ही **इच्छाद्वेषाची जोडी** 'विषयभोगासाठींच आपला जन्म आहे, कर्तव्य करण्यासाठीं, ज्ञान संपादनासाठीं, नाहीं' असा मोह प्रकट झाला असतां, उत्पन्न होते. हा मोह जन्माबरोबरच येतो. पूर्वजन्मार्जित पापपुण्यसंचयानुसार याचें प्रमाण कमी जास्त असतें इतकेंच. हा मोह कमी करणें व आपणच ब्रह्म आहोंत हें ज्ञानविज्ञान करून घेणें हें येथील जन्माचें कर्तव्य आहे. असो; जीवास खरें ज्ञान होत नाहीं, याचें कारण त्यांचा **मोह** आहे. मोह हा पूर्वकर्माचा परिणाम आहे. कर्म सात्त्विक असेल तर मोह बिलकुल उत्पन्न व्हावयाचा नाहीं. मोहशून्य लोक मात्र श्रेष्ठभक्तीचे असतात. श्रीकृष्ण परमात्म्यानें या अध्यायांत जें ब्रह्मस्वरूप प्रकट केलें आहे, तें या थोर विभूतीसाठींच आहे. असो; राजस व तामस गुणांच्या कर्मानें मोह उत्पन्न होतो. 'देह मी व विषय माझे' असा अभिमान व वासना प्रबल झाली म्हणजे ज्ञान होत नाहीं. यामुळ परमात्मचिंतन, परमात्मपूजा इत्यादिकांकडे चित्ताचें वळण न जातां मायेचें, क्षणभंगुर व कालभंगुर विषयांचें, भजनपूजन होतें. सारांश, मायेचा ताबा चुकत नाहीं. असो; आतां एका शंकेचें निराकरण करून हा अज्ञानाचा प्रस्ताव आटपूं.

## ब्रह्माला झांकणारी माया ब्रह्मापेक्षां मोठी आहे काय ?

११ ही शंका सर्वकाळ येत असते. " अज्ञान नसतें तर सर्व प्राणी संसारमुक्त होऊन सर्वत्र एकच परब्रह्मस्थिति असती; परंतु अज्ञान जोरदार आहे म्हणून ब्रह्माचें

सामर्थ्य लुप्त होतें." अशा अर्थाचे अनेक प्रश्न अनेक वेळीं उत्पन्न होतात. याला मुख्य उत्तर हें आहे कीं, ही माया संसाराबरोबर किंवा कांहींशीं आधी उत्पन्न झालेली आहे. परमेश्वराकडून जें इच्छास्वातंत्र्य आपल्यास मिळालें आहे व केवळ जडावस्थेंतून शुद्ध चैतन्यावस्थेकडे जीवदृष्टीनें मार्गक्रमण करीत असतां या इच्छास्वातंत्र्याचा जो आपण दुष्ट उपयोग करितो, त्या इच्छास्वातंत्र्यापासून व त्या दुष्ट उपयोगापासून मायेचा परिपोष होतो. ह्मणजे मुक्त होण्यासाठीं जें स्वातंत्र्य आपल्यास मिळालें त्याचा दुरुपयोग करून आपल्यास नीच अवस्थेंतच ठेवणारीं कर्में किंवा खालीं ढकलणारीं कर्में जेव्हां करितों, करण्याचें संकल्पितों, तेव्हां मायेचें आवरण आपल्या भोंवतीं जमतें. आपल्यास उन्नतर अवस्थेस नेणारीं कर्में आपण बुद्धिपूर्वक व अधिकारानुसार करूं लागलों व ज्ञानसंपादन केलें ह्मणजे मायेचें आवरण पातळ पातळ होत जाऊन तें पारदर्शक होतें व शेवटीं नष्टही होतें; आणि सर्वत्र प्रकाश पडून ब्रह्मस्थितीचा अनुभव येतो. सारांश, **इच्छास्वातंत्र्याच्या दुरुपयोगानें मायेचा परिपोष होतो.** आतां जीवावस्थाच केव्हां व कशी उत्पन्न होते हा प्रश्न मोठा आहे; पण याचा विचार येथें करणें इष्ट नाहीं. वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, जडावस्थेंतून प्राणी चैतन्यावस्थेंत प्राणीदृष्टीनें, संकुचितदृष्टीनें, व्यावहारिक दृष्टीनें जात आहेत. हे मार्गक्रमण चाललें असतां उन्नतर स्थितीकडे बुद्धिपूर्वक प्रगति झाली ह्मणजे जीवाची योग्यता वाढतें व मायेचें आवरण कमी होतें. उन्नतर स्थितिकडे जात असतां मध्येंच थांबण्याची स्फूर्ति झाली कीं, मायेच्या लोंढ्यांत आपण सांपडलों व खालीं जाऊं लागलों, असें समजावें. यावरून हें स्पष्ट आहे कीं, ब्रह्माला माया आंवरिते, झांकून टाकिते, याचा अर्थ आपण स्वतः आंधळे असतों, म्हणजे आपण स्वतः आपल्या विसृष्ट होणाऱ्या बुद्धीमध्यें व परमेश्वरामध्यें अशी एक अपारदर्शक भिंत उत्पन्न करितों कीं, जिच्यायोगें आपली बुद्धि त्या भिंतीच्या पलीकडे कांहीं बघूं शकत नाहीं. हाच आंधळेपणा होय. ब्रह्मापेक्षां माया श्रेष्ठशक्तीची नाहीं, तर जीवापेक्षां तिची शक्ति मोठी आहे हा अर्थ होय. आतां जीवांमध्यें असें आणखी एक सामर्थ्य आहे कीं, ज्याच्या योगानें मायेचा पडदा नाहींसा होऊं शकतो. बोलून चालून ही जीवाच्या अज्ञानानें उत्पन्न झालेली! आणि म्हणूनच तें अज्ञान नष्ट झाल्याबरोबर मायाही नष्ट होते. एखाद्या घनदाट अंधकाराच्या खोलींत आपण आपल्यास गाडून घेतलें ह्मणून सूर्याच्या प्रभेला बालाग्रही कमीपणा येत नाहीं. पण ती खोली व तिच्या भिंती जमीन दोस्त केल्याबरोबर जसा सर्वत्र प्रकाश पडतो, तशीच आपल्या बुद्धीच्या सभोंवार जें मायेचें वेष्टन आहे तें ज्ञान-शलाकेनें दूर सारिलें म्हणजे मायाही नष्ट होते. असो;

## माया कशाला ?

ही माया बाल्यावस्थेंत जीवाच्या अत्यंत उपयोगी पडते. **जीवास अज्ञावस्थें-तून राजसी अवस्थेमध्यें नेण्याला हीच कारण आहे.** जीवाच्या बाल्यावस्थेंत

अज्ञान भरपूर असतें व आळसही सपाटून भरलेला असतो. पण आपल्यास कांहीं तरी हवें, खाण्यापिण्यास हवें (हीच माया!) ह्या प्रेरणेनें बालकें व बालसमाज धडपड करितात, व पूर्णतमाच्या स्वराज्यांतून वरील लोक रजोगुणाच्या म्हणजे उद्योगाच्या राज्यांत प्रवेश करितात. हा मायेचा खेळच हाय. येथून पुढें नेणारी ही मायाच आहे. तेव्हां अज्ञान-जन्य परंतु कांहीं कालपर्यंत उपयोगी पडणारी ही माया ब्रह्मज्ञान होण्यासाठींच जणूं कांहीं निर्माण झाली आहे! ब्रह्मसत्तेनें, ज्ञानसत्तेन, हिला अस्तित्व येतें; पण माया म्हणजे काय असा शोध करूं लागलें तर तिचें स्वरूप समजत नाहीं! 'ब्रह्म सर्वव्यापी आहे' असें ज्ञान होईपर्यंत ही जिवंत राहते. सर्वत्र ब्रह्मदृष्टि झाली म्हणजे आपोआप नष्ट होते. 'बीजगणितांतील उदाहरण सोडवितांना जशी 'क्ष' ह्मणून एक कांहीं तरी किंमत धरून आपण तें उदाहरण सोडवितों, व सुटल्यावर 'क्ष' ला झुगारून देतों, तद्वतच ब्रह्माची समजुत करून घेण्यासाठीं व तें जवळ करून घेण्यासाठीं मायेचा अवतार असून तें ब्रह्म समजलें ह्मणजे माया समूळ संपते. एवंच माया ह्मणजे संकुचित दृष्टि होय. हा संकोच सूक्ष्म होऊन नामशेष झाला, दृष्टि अनंत, अमर्याद झाली कीं, दृष्टि-संकोच, वासना व अहंकार हे सर्व नाहीसे होऊन जीव मुक्त होतो. यावरून मायेची शक्ति किती आहे याचा निश्चय सहजच झाला.

## ब्रह्मभक्तीचें फल.

१२ निष्काम कर्माचरणानें चित्त शुद्धि होऊन ज्ञानोदय होऊं लागला कीं, ज्ञानस्वरूपी स्वच्छ आरशावरील पापरूपी मळ उडून जातो, जीव स्वरूपाचा विकास होऊन सर्व विकार नष्ट होतात आणि परमात्मस्वरूपाची ओळख, त्याची निःसीम भक्ति, त्याच्याशीं तादात्म्य इत्यादि गोष्टी क्रमाक्रमानें घडून येतात. ज्ञानशुद्धि होऊन इच्छा मेली कीं जन्ममरण संपतें! असो; अशा भक्तांस ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म हे भिन्न नसून एकच आहेत असा दृढ अभ्यासानें परिचय होतो व त्यांचें ब्रह्मानुसंधान केव्हांही सुटत नाहीं.

याप्रमाणें परब्रह्म हें परा व अपरा प्रकृतीचें अधिष्ठान असून त्यांचें नियामक आहे; त्याच्या सत्तेनें सर्व पदार्थमात्र अस्तित्वांत आले आहेत असें जाणून सर्वत्र, ब्रह्मरसच भरलेला आहे असें अनुसंधान ठेवावयाचें आणि सदां सर्वदां इच्छाद्वेषशून्य होऊन ब्रह्म-ध्यानामध्यें निमग्न असावयाचें, असा बोध श्रेष्ठ भक्तास येथें केला व ब्रह्म हें अज, अव्यय, अनुत्तम, पर, सर्वज्ञ, त्रिकालज्ञ, सर्वाधिष्ठान, सर्वरहस्य, सर्वव्यापी, सर्वनियामक व सर्व-बीज आहे असें सविज्ञान ज्ञान सांगितलें. येथेंच मायेचा अवतार करून तिचें स्वरूपही ज्ञानपोषणार्थ सांगितलें. हा ज्ञानविज्ञान नामक ज्ञानी पुरुषांसाठीं सांगितलेला सातव्या अध्यायाचा सारांश आहे. 'सर्वत्र ब्रह्मदृष्टि ठेवणें हें ज्ञानी भक्तांसच साध्य आहे' हें या अध्यायाचें सार आहे.

---

## खंड ८ वा.

# आठव्या अध्यायाचा उपसंहार.

आठव्या अध्यायाचें व्याख्यान दुय्यम प्रतीच्या भक्तांसाठी आहे; हें मागें सांगितलेंच आहे. यांचा अधिकार कमी दर्जाचा असतो; कारण या भक्तांचा अहंकार व प्रापंचिक वासना ही जोडी अद्यापि सर्वथा नष्ट झालेली नसते. तथापि शमदमादिक सात्त्विकसंपत्तीच्या साहाय्यानें रजोगुण व तमोगुण यांचा प्रायशः अस्त झालेला असतो आणि वेदांतग्रंथांवर या भक्तांची श्रद्धा असून ध्यानधारणेमध्यें हे बरेच प्रवीण असतात. असो; गेल्या अध्यायाच्या उपसंहारसमयीं सांगितल्याप्रमाणें यांस परोक्षज्ञान झालें असतें; परंतु अपरोक्षविज्ञान अगर साक्षात्कार झालेला नसतो. म्हणून यांच्या कल्याणार्थ अथवा यांच्या पुरुषार्थास उपयोगी पडेल, असा मार्ग प्रस्तुतच्या व्याख्यानांत उपदेशिला आहे.

२ अध्यायाच्या आरंभीं जे सात प्रश्न उत्पन्न केले आहेत व त्यांचीं जीं उत्तरें दिलीं आहेत, त्या सर्वांचें एकनिष्ठतेने अनन्यचिंतन केलें असतां योग्यवेळीं अपरोक्षानुभव अथवा साक्षात्कार होईल यांत शंका नाहीं. हाच हेतु मनांत आणून हे प्रश्नसप्तक निर्माण केलें आहे. श्रवणमननानंतर या अखिल प्रश्नोत्तरमालिकेचा अखंड निदिध्यास एकनिष्ठेने केला असतां अंतःकरणांत प्रकाश फांकून तें स्वतःच ब्रह्ममय होऊन जाईल. आपला आत्मा ब्रह्मस्वरूपच होता, आहे व असेल हें खरें आहे. म्हणून 'ब्रह्ममय होऊन जाईल' या वाक्याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, ज्या ब्रह्मस्वरूपाच्या प्रत्ययाला आपण आपल्या वासनाजन्य अज्ञानाने पराङ्मुख झालों असतों, तो प्रत्यय जसजसें अज्ञान नष्ट होत जात असतें, तसतसा साक्षात्कारस्वरूपी होत जातो. अत्यंत जड अवस्थेंतून अत्यंत चैतन्यावस्थेंत जाणें, ह्या मार्गाने प्रत्येक जीवाला मोक्षाकडे जावयाचें आहे. जावत्कालपर्यंत विषयभान आहे, तोंपर्यंत जडसंयोग सुटत नाहीं. पूर्ण चैतन्यावस्थेत विषयभान नाहीं. असो: तेव्हां ब्रह्मस्वरूपास जाऊन मिळावयाचें यांचा अर्थ आपलें जें अज्ञान (मर्यादित ज्ञान) असतें तें क्रमशः नाहींसें करून अमर्यादज्ञान संपादन करावयाचें; आणि शेवटीं ह्या ज्ञानाज्ञानापलीकडे जाऊन परब्रह्मस्वरूप व्हावयाचें. हाच पुरुषार्थ आहे. वरील दुय्यमप्रतीच्या उपासकांस हें अज्ञेयज्ञान होणें दुःसाध्य आहे; म्हणून परमेश्वरानें या श्रद्धालु भक्तांसाठीं पुढील व्याख्यानांत त्यांस समजेल असें परमेश्वरस्वरूप वर्णून त्यांनीं कोणत्या मार्गानें जावें हें सांगितलें आहे.

### प्रश्नसप्तक.

३ (१) ब्रह्म (२) अध्यात्म (३) कर्म (४) अधिभूत (५) अधिदैव व (६) अधियज्ञ म्हणजे काय? आणि (७) मरणकाळीं परमेश्वराचें ध्यान कसें करावें?

हे प्रश्न होत. या सर्वांस यथास्थित उत्तरें मिळालीं तर ब्रह्म, जगतें आणि जीव यांचा उलगडा चांगलाच होतो.

## उत्तरसप्तक.

४ **ब्रह्मांचे** अपरब्रह्म आणि परब्रह्म (सगुण ब्रह्म आणि केवलब्रह्म, निर्गुणब्रह्म) असे दोन प्रकार भक्तांच्या ज्ञानमर्यादेनें उत्पन्न होतात. निर्गुण ब्रह्माचें लक्षण निषेधाच्या द्वारें मात्र सांगतां येतें. 'ज्याचा नाश नाहीं' या येवढयाशा एका निषेधात्मक लक्षणानें सर्व प्रकारचे गुणांचा व पदार्थांचा निरास होऊन बाकी 'जें एक अथवा एकच किंवा अद्वितीय एकच आहे,' अशा परब्रह्माचा परोक्षतः (व्यतिरेकद्वारा) निर्देश होतो. आतां ज्याला शास्त्रविज्ञान उत्तम होऊन अपरोक्षानुभूति झाली आहे, त्याला हें लक्षण उत्तम रीतीनें समजेल; म्हणजे या लक्षणानें लक्षिलेल्या वस्तूचें ज्ञानविज्ञान उत्तम होईल. पण आपल्या सारख्या सामान्य मनुष्यांस किंवा शास्त्रमात्रपारंगत वेदांत्यासही तें समजणार नाहीं. येथें हें लक्षण देण्याचा हेतु इतकाच आहे कीं, विषयाचें विषयत्व नाहींसें करून स्वस्वरूपाची अंतिम मर्यादा कोणती आहे, हें सामान्यतः कळावें. बृहदारण्यकांत गार्गीच्या प्रश्नावरून या विषयाचा निकाल झाला आहे. उदाहरणार्थ एक आम्रफल घेऊं या. 'हा आंबा काय आहे?' असा प्रश्न केल्यास आपण त्याचें स्वरूप सांगूं. त्याचे गुणधर्म सांगूं व त्यापासून होणारीं कार्येंही सांगूं. बरें; हें स्वरूप, हे गुणधर्म व हीं कार्यें आपल्या इंद्रियादिद्वारानें प्रकट झालीं आहेत. आतां आपलीं इंद्रियादि अंतःकरणें अन्य तऱ्हेनें घटित झालीं असतीं, तर आपल्यास सद्यःकालीं जो अनुभव येत आहे, तद्विलक्षण असा दुसराच अनुभव आला असता. पुनः; इंद्रियादिकांत फेरबदल झाला तर तिसरा, चवथा, असे अनंत पण परस्परविलक्षण अनुभव आले असते व येतील. यावरून काय सिद्ध होतें कीं, आपलें सर्व इंद्रियजन्य ज्ञानविज्ञान इंद्रियसापेक्ष आहे, इंद्रियनिरपेक्ष नाहीं. म्हणजे **आंबा जसा वस्तुतः आहे** तसा तो आपल्यास **दिसत नाहीं**; कारण, इंद्रियांच्या संस्काराची भर त्यांत कांहीं तरी पडलेली असते. असें असूनही, म्हणजे आपणांस यथार्थ ज्ञान नसूनही, '**आपल्यास दिसतो, तसाच तो आंबा आहे,**' असें जें आपण म्हणतों, तें आपलें **अज्ञान** म्हणजे **माया** होय. असो; आपल्यास इंद्रियद्वारा अगर मनबुद्धिद्वारा जें ज्ञान अनुभवानें प्राप्त होतें, तें सर्व आपण क्षणभर एकीकडे ठेविलें तर बाकी काय राहील? 'कांहीं नाहीं' असें पुष्कळांचें उत्तर येईल. पण ही भ्रांति आहे. कारण, आंब्याचें स्वरूप, त्याचे गुणधर्म इत्यादि काय शून्यावर लटकावलेले आहेत? नाहीं. शून्यावर कांहीं गुणधर्म लटकून ते प्रतीत होणें संभवत नाहीं. म्हणून गुणधर्मांच्या पलीकडे तेथें कांहींतरी असतेंच कीं, ज्याचे आश्रयानें सर्व गुण आंब्यांत अधिष्ठित झाले असतात. हें कांहींतरी जर जड म्हणावें व तें जडच इंद्रियादिकांस विकृत करितें असें म्हणावें, तर जडवाद (Materialism) पक्ष सिद्ध होईल. आतां हें जड आपल्यास प्रत्यक्ष होणार तें त्याच्या गुणधर्मानुसार होईल,

असें म्हटलें तर या दुसऱ्या गुणधर्माच्या मागें काय? असा प्रश्न पुनः उभा राहून त्याचें उत्तर, पुनः प्रश्न, अशी अनवस्था होणार. शिवाय शुद्ध जडाला, इंद्रियांच्या द्वारां ज्ञान प्राप्त करून घेणारें जें शुद्ध चैतन्य, त्यावर संस्कारही करितां येणें शक्य नाहीं. तेव्हां **'तें कांहीं तरी होतें'** तेंच चिन्मय ब्रह्म होय. पुनः आंबा हा आपल्यास इंद्रियादिकांनीं कळला, पण **'आहे'** हें जें आपण विधान केलें तें कशाच्या जोरावर? त्याला एक अद्वैत सिद्धांत्याखेरीज दुसरा कोणीही उत्तर देऊं शकणारच नाहीं! 'आहे' हें अस्तित्वमूलक विधान आपण करितों तें आपल्या अत्यंत संनिकट असणारें जें 'आत्मतत्त्व' 'ब्रह्मतत्त्व' त्याच्याच जोरावर होय. तेव्हां आपल्या जवळ असलेला आत्मा इतर पदार्थांत असलेल्या आत्म्यास स्वरूपानें पाहतो. पुढें अर्थातच याप्रमाणें सर्वत्र ब्रह्म आहे, असें विचारांतीं आपल्यास समजून येतें. सारांश इंद्रियें, मन, बुद्धिआदि अंतःकरणें व त्यांचे निरनिराळे विषय हे सर्व मायामय आहेत आणि त्यांच्या मुळाशीं त्यांस सत्ता देणारें, त्यांचे नियामक व त्यांचे साक्षी आणि पुनः स्वतंत्र एकरस व सर्वव्यापी असें आत्मतत्त्व आहे हें उघड आहे. हें या श्लोकत्रयींत ज्ञानगम्य ब्रह्म सांगितलें आहे. हें सच्चिदानंदरूपी परमेश्वराचें म्हणजे विचारास अंशतः गोचर असणाऱ्या प्रकट परब्रह्माचें स्वरूप होय. प्रत्यक्ष परब्रह्माचें स्वरूप काय आहे हें कोणासच सांगतां येणें शक्य नाहीं; कारण तें वाणीस, मनास, बुद्धीस व विवेकशक्तीसही अगम्य आहे. आणि म्हणूनच त्यास 'अक्षर' याच नांवानें येथें आळविलें आहे. असो. तें अनुभवूनच पाहिलें पाहिजे. कारण तें स्वसंवेद्य आहे. त्याचा थोडासा मासला सातव्या अध्यायांत आलाच आहे.

## प्रकृति.

आकाशाच्या व महत्तत्त्वाच्या पलीकडे असणारी जी त्रिगुणात्मक प्रकृति तिच्यामध्यें सर्व भूतांचा नियमित काळीं लय होतो. यालाच कल्पक्षय असें म्हणतात. या वेळीं प्रकृतिगुण ( सत्त्व, रज व तम ) हे समावस्थेमध्यें असतात. असो; दुसऱ्या कल्पाची वेळ आली म्हणजे माझ्या-परमेश्वराच्या-आज्ञेनें पुनः सृष्टीचा उदय होतो. या वेळीं पुनः सर्व भूतें आपआपल्या पूर्वकर्मानुसार व पूर्व अदृष्टानुसार अवतीर्ण होतात. सारांश, तीं भूतें प्रकृतीच्या स्वाधीन सर्वतोपरी असतात. मात्र प्रकृतीचा अवष्टंभ करणें अगर तिचें विसर्जन करणें हें परमेश्वरी इच्छेवर अवलंबून असतें. म्हणजे प्रकृतीच्या अवष्टंभाचा किंवा विसर्जनाचा काल परमेश्वराधीन असतो. कालाचें स्वामित्व व कर्मविपाकाचें नियामकत्व परमेश्वराच्या आधीन आहे. आतां परमेश्वर ही कर्में करितो, म्हणून तो बद्ध होत असेल अशी शंका घेणें योग्य नाहीं; कारण त्याचें सर्व कर्म निःष्काम, अभिमानरहित आणि आसक्तिशून्य असें असतें; म्हणजे तो केवळ साक्षित्वानें असतो व त्याच्या सत्तेनें हें सर्व होत असतें. त्याच्या साक्षित्वानें माया अगर प्रकृति सृष्टीची व अखिल चराचराची उत्पत्ति करिते. प्रकृति म्हणजे अज्ञान, तेव्हां विश्वांत विपरिवर्तनाचा—एक असून भलतेंच दिसण्याचा—जो व्यवहार चालतो तो सर्व अज्ञानमयच होय.

**अध्यात्म** ह्मणजे प्रत्यगात्मा आहे. ज्याच्या सत्तेनें आपण बोलतों, चालतों, विचार करितों, रागावतों, परंतु ज्यास आपण सामान्य मनुष्यें ओळखीत नाहीं, इतकेंच नव्हे तर ज्याचा आपण प्रापंचिक संसारी कधींही विचार करीत नाहीं, तो आपल्या शरीरांत वात्सल्य करितोसा दिसणारा सर्वसाक्षी जीवात्मा होय. हा प्रत्यक्ष परमात्मस्वरूपच असून सच्चिदानंदाची त्रयी याच्या सत्तेनेच जीवासन्निध असते. याचें स्वरूप कोणतें आहे, याचा विचार पहिल्या सहा अध्यायांत केला आहेच. आतां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, परमात्मा व हा प्रत्यगात्मा यांत भेद नसून ते उभयतांही एकच आहेत. हें सांगितलें म्हणजे अर्थातच दुर्गम प्रतीच्या भक्ताला ध्यानधारणेच्या योगानें आत्मस्वरूप समजून उमजेल आणि मग साहजिकच परमार्थाने परमात्मस्वरूप व पुढें ब्रह्मस्वरूपही त्यास कळेल. 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत' अशी श्रुति आहे.

**कर्म** म्हणजे भूतांची उत्पत्ति करणारें तें. यांत सात्त्विक, राजस व तामस या सर्व कर्मांचा अंतर्भाव होतो. सारांश कर्माच्या योगानें प्रपंचाची उत्पत्ति होते, संसार कर्माच्याच योगें चालतो आणि कर्माच्या योगाने संसाराचा नाश होतो. एवंच कर्म किंवा कर्म करण्यास लावणारें आपलें मन हे संसारनाशास कारण आहे. ज्ञान किंवा वासना कर्म करवितें. ज्ञानपूर्वक कर्म मोक्षदायी आहे, वासनायुक्त कर्म प्रपंचांत घालविणारें आहे. परब्रह्माचा शुद्ध भाव, स्वभाव म्हणजे अध्यात्म असे आताच सांगितले. आतां भूतांचा जो भाव तो भूतभाव. भूतभाव म्हणजे भूताचें उत्पन्न होणे, कांहीं वेळ अस्तित्वांत असणें व शेवटीं विलयाला जाणें, हा प्रकार कर्मानें होतो. यालाच येथे विसर्ग म्हटलें आहे. असो;

**अधिभूत** म्हणजे विनाशी पदार्थांचें कालभंगुर अस्तित्व व त्या अस्तित्वाचें आधिपत्य होय. पदार्थांचे अस्तित्वाचा अधिपति परमात्माच आहे. या दृष्टीनें म्हणजे क्षरांत ( नाशवंत पदार्थांत ) अक्षर ( अविनाशी ) पाहतां येऊं लागलें म्हणजे पुष्कळच कार्य झालें. सांख्याची प्रकृति जड आहे. परंतु वेदांतांतील 'क्षरत्व' परमात्मस्वरूपी आहे असें ज्ञानदृष्टीने पाहतां येते व म्हणूनच सांख्यापेक्षां वेदांतमत श्रेष्ठ ठरतें.

**अधिदैवत** म्हणजे ज्ञानाचे प्रकट स्वरूप होय. सांख्य मतांतील पुरुष हा केवळ फलोपभोक्ता आहे. येथील पुरुषास ज्ञान आहे. व आपल्यास मुक्त करणारें कर्म करण्याचें स्वातंत्र्य ( मनःस्वातंत्र्य ) त्या पुरुषास आहे. या सर्व पुरुषांचा अधिपति, समष्टि व व्यष्टि स्वरूपानें राहणारा, सर्व व्यापी, तो अधिदैवत होय. अर्थात् हिरण्यगर्भ स्वरूप तें हेंच होय. 'हिरण्यगर्भः समवर्तताऽग्र अशी श्रुतिच आहे.

**अधियज्ञ** म्हणजे यज्ञाधिपति. प्राणीमात्राच्या करवी जें कर्म होत असतें तो एकप्रकारचा यज्ञ आहे आणि यज्ञाचा अधिष्ठाता व अधिपति 'यज्ञो वै विष्णुः'.

आहे, हें तृतीय व चतुर्थ अध्यायांत स्पष्ट करून सांगितलेंच आहे. तात्पर्य हें कीं, सर्व निष्काम कर्माचें समर्पण भगवंतास केले तर त्या कर्मास सद्यज्ञस्वरूप येतें व निष्काम-त्वाच्या कसाला तो कर्मयज्ञ जसजसा उतरेल तसतसें कर्मफल ही ईश्वरसत्तेनें मिळत जातें, म्हणजे अर्थातच निष्काम—कर्म, व कर्ता सात्त्विक, पूर्ण सात्त्विक होत जातो. हें सर्व नियमन परमात्म्याच्या सत्तेनें होत आहे. ह्मणून परमात्म्यास अधियज्ञ ह्मटलें.

*सारांश विश्वव्यापार हा यज्ञ असून त्याची अधिदेवता परमात्मा आहे, अशा ( १ ) स्वरूपानें ईश्वराचें ध्यान केलें; किंवा आपल्या जीवास होणारी विषयोपलब्धी, वासना, विचार व विवेक या सर्वांचें म्हणजे पराप्रकृतीच्या स्वरूपांचे आधिपत्य परमात्माच आहे, ( २ ) अशा स्वरूपानें त्या पुरुषोत्तमाचें ध्यान केलें; किंवा विनाशी वस्तूंमधील म्हणजे अपराप्रकृतीचें क्षणभंगुर अस्तित्व हें त्या अखंड अस्तित्वाची एक कला असून ती त्या अखंड अस्तित्वानें नियमित होत असते, असें समजून त्या ( ३ ) विराट्स्वरूपाची आराधना केली; अगर विश्वचक्रांत जें जें कर्म होत असते त्याचा ( ४ ) सर्वाध्यक्ष परमात्माच आहे असें समजलें व उपासनाव्रत सुरू केलें; अथवा आपल्यास वस्तुतः अपरोक्ष असणारा जो प्रत्यगात्मा तोच परमात्मा होय असें समजून व उमजून त्या ( ५ ) परमात्मस्वरूपाचें एकनिष्ठ ध्यान केलें तथापि, फलश्रुति एकच आहे. तात्पर्य ( १ ) यज्ञपति '**विष्णु**' ह्मणून ( २ ) जीवेश्वर '**पुरुषोत्तम**' ह्मणून ( ३ ) विश्वरूप '**विराटपुरुष**' ह्मणून ( ४ ) **कर्माध्यक्ष** म्हणून ( ५ ) किंवा **प्रत्यगात्मा** ह्मणून केलें, तरी अधिकाराप्रमाणें फल प्राप्त होईल. जें जें ध्यान आपल्या अधिकारानुसार आपल्यास उपयोगाचें होईल, तें तें ध्यान अंगीकृत करून उपासनापंथ ज्ञानशुद्धमार्गानें वाढवावा एतदर्थ हीं निरनिराळीं स्वरूपें वर्णिलीं आहेत. ह्या सर्व भिन्नस्वरूपांत एकरसत्वच आहे. भिन्नत्व दिसतें याचें कारण आपलें अज्ञान म्हणजे माया हें होय. असो; तेव्हां 'अधिकारानुरूप या सत्यस्वरूपांपैकीं कोणत्याही स्वरूपानें जो माझें ध्यान करील त्याला सद्गति प्राप्त होईल व पुढें कालांतरानें ज्ञान होऊन तो माझ्याच स्वरूपाला येऊन मिळेल यांत शंका नाहीं.' ही भगवत्प्रतिज्ञा सर्वांनीं लक्ष्यांत ठेवावी.

'अंतकाळीं तुझें स्मरण कसें होईल व त्या स्मरणांतील स्वरूप कसें असावें? अशा अर्थाचा सातवा प्रश्न आहे. त्यास स्वरूपसंबंधानें वर उत्तर दिलेंच. आतां प्राणप्रयाणाच्या वेळीं स्मरण होण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे इष्ट व उपास्यस्वरूपाचें अखंड चिंतन होय. कोणत्याही स्वरूपाचें अखंड चिंतन अहोरात्र केलें असतां-**कीटकांस** भृंगाचें ( भुंग्याचें ) स्वरूप प्राप्त होतें, जडभरतास हरिणरूप मिळालें इत्यादि उदाहरणावरून-उपास्यस्वरूपाची प्राप्ति होते हें अनुभवसिद्ध

आहे. मन आणि बुद्धि यांची तंद्री अनन्यभावानें एकाच विषयाकडे लागून राहिली ह्मणजे तन्मयता, तादात्म्य होतें, ही भगवद्वाणी स्वानुभवास येण्यासारखी आहे. कर्तव्य-बुद्धीनें कर्मतत्परता आणि श्रद्धापूर्वक भगवत्स्वरूपस्मरण हीं दोन अबाधित असलीं ह्मणजे अंतकाळींही भगवत्स्वरूपस्मरणगामी होऊन आपल्या अधिकाराप्रमाणें आपल्यास सद्गति मिळते. 'ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति' अशी श्रुति आहे. असो;

**या प्रश्नसप्तकाचा**

विचार वर केलाच आहे. निर्गुण व सगुण ईश्वर, जगत, जीव, जीवकर्म, निष्कामकर्माचा अधिपति आणि शेवटील वृत्ति इतक्याचा विचार तत्वज्ञानाला करावाच लागतो. 'मी कोण ?' 'आलों कोठून ?' 'जाणार कोठें ?' आणि 'कां' 'हें जगत् काय आहे ?' 'याचा अधिपति कोण ?' आणि 'पुरुषार्थ काय ?' हेच तत्त्व-ज्ञानाचे प्रश्न होत. या प्रश्नांस योग्य उत्तर देणें हें तत्त्वज्ञानाचें काम आहे. आतां 'मी कोण ?' हें प्रथम षडध्यायींत समजून दिलें आहे. 'मी ( जीव )=सच्चिदानंद-स्वरूपी आत्मा=प्रत्यगात्मा=परमात्मा=ब्रह्म' असें सांगितलें. अर्थातच मी सदैव आहें, कोठून आलों नाहीं व मला कोठेंही जावयाचें नाहीं. वस्तुतः व तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें हें खरें आहे; तथापि मायावश होऊन मी आपलें स्वस्वरूप विसरून गेलों आणि जें नाहीं त्यालाच 'आहे' असें नांव देऊन तेंच मी आहें, असें मानूं लागलों. हें **दिसणारें** विश्व वस्तुतः ब्रह्मस्वरूप असतांही तें मजपासून निराळें आहे असें मला वाटतें, व तें विश्व माझ्या उपभोगाकरितां उत्पन्न झालें आहे असेंही वाटतें. हीच माया होय. ह्या मायेच्या योगानेंच **उत्क्रांति चालली आहे** ( विसर्गः कर्मसंज्ञितः ) असें माझ्या उत्क्रांत बुद्धीस वाटतें. असो; तेव्हां या मायिक स्थितींत 'मी अल्पज्ञ, दुःखी व क्षण-भंगुर आहें, पूर्वकर्मानें मी हें विश्व पाहतों व सुखदःखाचा अनुभव घेतों व वर्तमान कर्माच्या फलानुसार मी पुढें सुखदुःख भोगीन व सर्वकर्मफलदाता परमेश्वर आहे;' अशीं उत्तरें आपण देतों. **हीं व्यवहारस्थितींत खरीं आहेत;** वस्तुतः खरीं नव्हेत. खरीं उत्तरें म्हणजे 'मी ब्रह्म आहें, सदैव आहें, कोणत्याही कालांत तसाच असेन, कारण **कालास सत्ता देणारा मी आहें,** मला कोठें जायचें नाहीं, हें जगत् मीच आहें व जगत्पतिही मीच आहें. सर्व मीच आहें, तेंव्हा मला कर्तव्य कांहीं नाहीं.' हीं होत. येथें सातव्या अध्यायाचा परमार्थ, तात्त्विक भाग, संपला. आतां मायोपाधिग्रस्त झालेला व तापत्रयानें विव्हल झाल्यामुळें सन्मार्गास लागलेला जीव म्हणतोः "ब्रह्म हें अव्यय, विकाररहित आहे, मी त्याचाच अंश आहें, माझ्या अंतःकरणाचें **नियमन करणारा आत्मा मजजवळच आहे** व तो ब्रह्मरूप आहे. माझ्या कर्मानुसार माझ्या अल्पज्ञ जीवाची उत्क्रांति किंवा अपक्रांति होणार आहे. ही माझ्या सभोंवार दिसणारी प्रकृति ( अहंकारापासून विषयांपर्यंतचे सर्व दृश्य व भोग्य पदार्थ ) विकार्य, चलस्वरूपी आहे.

आणि तिचा उपभोग घेणारा मी उपाधिग्रस्त जीव आहें. पण या उपाधींच्या बाहेर पडून निष्कामबुद्धीनें जीं जीं **यज्ञरूपी कर्में** मी करीन तीं तीं सर्व **विष्णुरूप होऊन** माझी उन्नति, आत्मिक उन्नति, करतील. आणि मी अखंड भक्तीनें सदैव भगवच्चिंतन केलें तर अंतकालींही माझीं मनबुद्ध्यादिक अंतःकरणें भगवद्रूपी होऊन मला विष्णु-स्वरूपच प्राप्त होईल." हें **धार्मिक** उत्तर झालें. श्रुतींस, स्मृतींस व पुराणांस अनुकूल असा हा सिद्धांत आहे.

## अन्ते मतिः सा गतिः

मानसशास्त्राच्या नियमानुसार असा एक सिद्धांत आमच्या आर्यपूर्वजांनीं बांधून ठेविला आहे कीं, 'ज्या विषयाचें अखंड ध्यान आपण मनबुद्ध्यादिकांच्या एकाग्र तल्लीन-तेनें चिरकाल करितों, तो विषयच आपण शेवटीं होतो.' **'ध्यात्याला ध्येयस्व-रूप यावें हें ध्यानाचें फल आहे.'** हा सिद्धांत पाश्चात्य आर्यांस अद्यापि मानवला नाहीं, तसाच आमच्या इकडे द्वैतवाद्यांसही हा सिद्धांत मानवत नाहीं. 'Like attracts the like and repels the unlike' (समाचा समाकडे ओढा आणि विषमा-कडे पराङ्मुखता असते) हें तत्व ग्रीक महात्म्यांस कळलें होतें. आपल्या प्रत्यहींच्या अनुभवाला तसेंच येतें. तेव्हा प्राणप्रयाणाचे वेळीं आपल्या इष्ट वस्तूचें-आपण ज्याचें अखंड ध्यान करितों त्याचें-स्मरण होईल. अर्थातच परमेश्वराचें स्मरण सहज झालें ह्मणजे आपल्यास सद्गति मिळेल. असें असतांही व विचारदृष्टीनें असें दिसत असतांही आमच्या इकडील द्वैतवादी व युरोपियन धार्मिक व अधार्मिक तत्ववेत्ते, यांचें जितकें लक्ष या अति महत्वाच्या सिद्धांताकडे जावें, तितकें जात नाहीं, हें दुर्दैव होय. असो; जोंपर्यंत हें मानसोन्नतीचें तत्व प्रबलत्वानें प्रकट झालें नाही, तोंपर्यंत खऱ्या धर्माचें, खऱ्या भक्तीचें, रहस्य समजलें नाहीं, असें म्हणणें भाग आहे.

येथेंच **खऱ्या भक्तीचें लक्षण**ही सामान्यतः सांगून ठेविलें आहे. जें आपलें इष्टदैवत असेल त्यांस आपलें मन व आपली बुद्धि अर्पण करून (म्हणजे आपल्या इष्टदेवतेचें ज्ञान करून घेऊन तिला प्रिय होईल असाच संकल्प ठेवावयाचा, असेंच ज्ञान वाढवावयाचें व अशीच इच्छा धारण करून ती सिद्ध करण्याचे प्रयत्न आपल्या इष्टदेवतेस प्रिय होतील अशाच मार्गानें करावयाचे; याचें नांव अर्पण होय. असें मनबुद्धीचें अर्पण करून) इष्टदेवतेचें अखंड स्मरणपूर्वक आपलें कर्तव्य करीत राहणें याचें नांव खरी भक्ति होय. वंदन, पूजन, स्मरण इत्यादि उपयोगी आहे, पण एकनिष्ठ भक्ति म्हणजे वर सांगितलेली भक्ति ही अखंड भक्ति म्हणजेच अभ्यासयोग होय. असें अव्यभिचारी चित्त झालें व रात्रंदिवस निदिध्यास सुरू असला म्हणजे दिव्य पुरुष (आपली इष्टदेवता) प्राप्त होतो, इतकेंच नव्हे तर आपण त्याच्याशीं तादात्म्यवृत्ति पावतों.

सारांश, ब्रह्मरूप, तत्स्वभाव, तत्प्रीत्यर्थ कर्म, माया, हिरण्यगर्भ, पुरुषार्थ आणि पुरुषार्थाचें साधन, निवृत्तिमूलक कर्म, ज्ञानयोग, भक्ति, अपरोक्षज्ञान, यांचा विस्तार सातव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकापासून तों येथपर्यंत म्हणजे आठव्याच्या पंधराव्या श्लोकापर्यंत केला. आणि सातव्या अध्यायाच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें ज्ञानविज्ञान समग्र सांगितलें.

५ याप्रमाणें सर्व प्रश्नांची उत्तरें झालीं. आतां दुय्यम प्रतीच्या भक्तांस परमात्मस्वरूप लीलेनें समजेल अशा हेतूनें ९ व्या श्लोकांत परमात्मस्वरूपाचें वर्णन केलें आहे. अशाच प्रकारचें वर्णन अनेक उपनिषदांत आलें आहे. हें तज्ज्ञांस सांगण्याचें कारण नाहीं. 'अजो नित्यः' हा श्लोकही याच अर्थाचा आहे. 'वेदाहमेतं पुरुषं महान्तं,' 'अणोरणीयान्महतो महीयान्,' इत्यादि श्रुति पहा–९ व्या श्लोकांत सांगितलेल्या स्वरूपानुसार परमात्मचिंतन अखंड असावें. समाधियोगाचें साहाय्य असेल तर उत्तमच होय. परंतु हें अमळसें अव्यक्त स्वरूप ध्यानांत येणें कठिण वाटत असल्यास

ॐकार स्वरूप ( ब्रह्माचें एकाक्षरी स्वरूप )

दृढ करून त्याचें चिंतन करावें. कठ, श्वेताश्वतर व विशेषतः मंडुकोपनिषदांत ॐकार स्वरूपाचा उत्तम विस्तार आहे. वे. शा. सं. केशवशास्त्री दामले यांचा 'प्रणवप्रकाश' व रा. रा. हरि नारायण कृत ॐकारस्वरूपाचें इंग्रजी व्याख्यान, हीं पुस्तकें अतज्ज्ञ प्रापंचिकांस अत्यंत उपयोगी आहेत. प्रत्यक्ष भगवंतांनीं हीं ॐकारमहात्म्य या अध्यायाच्या ११ व १३ व्या श्लोकांत कथिलें आहे; व १२ व्या श्लोकांमध्यें साधकाची वृत्ति व शरीरयोजना कशी असावी याचा विस्तार सांगितला आहे. हें ॐकारस्वरूप दृढ होऊन सदैव चित्तनिष्ठ व्हावें म्हणून सदासर्वदा ॐकारस्वरूपानें भगवद्ध्यान करावें. ध्यान अखंड केलें तर ॐकारस्वरूपाचा साक्षात्कार होईल हें सांगावयास नकोच. असो; मला कळविण्यास आनंद वाटतो कीं, 'अव्यक्त बोध' नामक एक सुंदर ग्रंथ श्री० जटार साहेब जहागिरदार, ग्वाल्हेर यांनीं केला आहे, त्यांत 'अ, उ, म,' इत्यादि ॐकार घटकावयवांचा उत्तम विचार झाला आहे. ॐ स्वरूपानें मूळच्या अद्वैताला द्वैतत्व मायाभासानें आलेसें वाटतें, ते कसें व ॐकारनिदिध्यासानें या द्वैताचा निरास कसा करावा, याविषयीं सुंदर व्याख्यान श्री० जटार साहेबांच्या पुस्तकांत केलेलें आहे; वाचकांनीं हें अवश्य वाचावें, असें सांगण्याचें विषयांतर केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

६ याप्रमाणें ॐकाराचें किंवा पहिल्या तीन चार श्लोकांत निर्दिष्ट केलेल्या स्वरूपाचें अखंड ध्यान करणारा पुरुष, योग्यता प्राप्त झाली म्हणजे जरामरणापासून सुटतो हें

ठरलें. त्याला अध्यात्मिक, अधिभौतिक, अधिदैविक तापत्रयांची बाधा किमपीही न होतां उत्तम प्रकारचें सम्यग्ज्ञान होतें व शेवटीं तो मुक्त होतो. एवंच सगुण स्वरूपाच्या अंखड ध्यानानें दुय्यम प्रतीच्या भक्तासही शेवटा उत्तम गति मिळते असें ठरलें. ज्यांचे विकार शांत झाले नाहींत व प्रापंचिक वासना नष्ट झाल्या नाहींत, त्यांनीं श्रद्धापुरःसर वेदांत ग्रंथ वाचिले व अधिकारानुसार परब्रह्माचें सगुणध्यान दृढ केलें म्हणजे त्यांस साक्षात्कार होतो व शेवटीं 'मीच ब्रह्म आहे,' असा त्यांचा निश्चय होतो. पुढें कांहीं कालें हें भान अखंड झालें, स्वरूपमय झालें, म्हणजे तें भानही नष्ट होऊन ते भक्त अखंड सच्चिदानंदाच्या कारणावस्थेंत जाऊन, ब्रह्मस्वरूपांत जाऊन, ब्रह्म होतात. त्यास पुनरावर्तन नाहीं.

## ब्रह्मपदीं पुनरावृत्ति नाहीं, इतरत्र आहे.

जरामरण चुकवावयाचें असेल, तर वर सांगितल्याप्रमाणें ज्ञानपूर्वक भक्ति आणि भक्तिपूर्वक ज्ञान यांचा व त्यांचे सहचारी जे निवृत्तिपूर्वक कर्म, योग, इत्यादिकांचा आश्रय करून, सर्वेश्वर जो भगवान् आणि सर्वेश्वरासही सत्ता देणारें जें ब्रह्म यांच्या ठायीं एकनिष्ठ भक्ति अर्पण केली पाहिजे; म्हणजे ब्रह्मपदीं ठाव मिळेल आणि जन्म-मरणाचा त्रास चुकेल. आपल्या सर्व अज्ञानाचें भंजन होऊन आपण स्वस्वरूपीं झालों सच्चिदानंदाच्या पलीकडे आपण राहूं लागलों, अनंत झालों, केवळ झालों, म्हणजे जीव-स्वरूप, सुखदु खादि उपाधि, सविकारत्व, सांसारित्व इत्यादि सर्वांचा अंत होतो. सारांश, आपण मुक्त होतो. आपण मुक्तच आहों व असतोंच, पण अज्ञानानें, मायेनें, जें कांहीं काळे ढग येऊन आपल्या स्वयंभु प्रकाशास आपण आंचवलों होतोंसें आपल्यास वाटत असतें, तें आपलें वाटणें संपतें, खोटे ढग मावळून जातात आणि स्वयंभु आत्मप्रकाश देदीप्यमान आहे, तसा पुनः अनुभवास येऊं लागतो. अज्ञानाची झांपड उचलण्या-साठीं सर्व शास्त्रांची व सर्व निष्काम कर्मांची आवश्यकता आहे. मळलेलाच आरसा तोच खरा मूळ आरसा अशी जी भ्रांति झाली आहे, ती भ्रांति नष्ट करावयाची आहे. अज्ञानदृष्टीनें ममत्वाचा परिघ अत्यंत संकुचित झाला होता तो ज्ञानदृष्टीनें अमर्याद करावयाचा आहे आणि भोगदृष्टीने ममत्वाचा जो विस्तार करूं पाहत होतों, त्याचा संकोच करावयाचा आहे. ज्ञानदृष्टीनें मी सर्व विश्वभर झालों आणि भोगदृष्टीनें माझा 'मी' मारून टाकिला म्हणजे मोक्ष लाभला, पुनरावृत्ति संपली, सुखदुःख लयास गेलें आणि अभेद्य असें समाधान सर्वत्र संचून राहिलें. मग येथें जाण्यायेण्याची, यातायातीची वार्ता कोठून येणार ?

## पुनर्जन्म कां येतो?

७ पुनरावर्तन या जीवन्मुक्त लोकांस नाहीं, याचें कारण "अज्ञानानें 'अमुक मीच आहें' 'माझा आहे' असें अहंकारानें वाटणें व 'मी अपूर्ण आहें' असें वाटणें" हें या लोकांच्या ठायीं नसतें हें होय. अमुक मी आहें असें वाटलें कीं विकार होण्यास

सुरुवात होते. **असल्याशिवाय वाटत नाहीं व वाटल्याशिवाय असत नाहीं,** हे सिद्धांत कालाबाधित व स्थलाबाधित आहेत. माझ्या वेदांतीमित्रांस हे अपसिद्धांत आहेत असें वाटण्याचा संभव आहे, पण ते तसे नाहीत. 'यो वा एतदक्षरमविदित्वा... स लोके भविष्यति' असें श्रुति सांगतें. जन्म येणें हीं गोष्ट जडाशीं संयोग **झाल्याशिवाय** होत नाहीं. जडाशीं संयोग, जडाशीं तादात्म्य, जडाची वासना, इत्यादि गोष्टी अज्ञानानें उत्पन्न होतात. एवंच ( मीं जड आहें, मी देह आहे, मीच बुद्धि, मीच अहंकार, मीच मन, मीच इंद्रियें, मीच विषय इत्यादि ) जडात्मकता येण्याला आपलें मूळचें अज्ञान व तज्जन्यकर्म हीं कारणें आहेत. ( आतां अज्ञान केव्हां उत्पन्न झालें, आपण पूर्वी ज्ञानी असून पुढें अज्ञानी झालों किंवा अज्ञानी होतों व हलुहलु ज्ञानी होत चाललों आहों, हा वाद महत्वाचा आहे; तथापि तो या पुस्तकांत, निदान येथें तरी, काढणें शक्य नाहीं. ) असो; जोंपर्यंत अज्ञान आहे तोंपर्यंत जडात्मकता व जडात्मकतेचा प्रत्यय या गोष्टी प्रकट व्हावयाच्याच. पुनः व्यवहारदृष्टीनें देह, बुद्धि, मन, इन्द्रियें, विषय ही वस्तुमाला प्रत्येकीं लहान, मर्यादित, काल-स्थल कार्यकारणादि प्रसंगास वश आणि म्हणून विकार्य अशी आहे. विकार होणें म्हणजे कार्यकारणाच्या विश्वव्यापी नियमांस वश होणें आहे. जितका जितका जडांश जास्त, तितका तितका कार्यकारणाचा पगडा जास्त, तितके तितके विकार जास्त आणि तितका तितका जन्म-मरणाचा संभव जास्त: हा न्याय अबाधित आहे. सारांश जडाशीं संयोग करणें ही वासना अज्ञानानें उत्पन्न होते आणि जडाशीं संयोग झाला कीं जन्ममरणाच्या फेऱ्यांत जीव सांपडतो. यावरून गीतावाचकांच्या हें स्पष्ट लक्षांत येईल कीं, उपभोगाच्या आशेनें जेवढें कर्म होतें, जडाशीं संयोग करण्याच्या अभिलाषानें जेवढें कर्म होतें, तेवढें सर्व कर्म जीवास जन्ममरणाच्या पिंजऱ्यांत घालणारें होतें; आणि कर्तव्यबुद्धीनें, निरभिलाषानें, निष्कामबुद्धीनें जें जें कर्म होत असतें, तें कर्म 'जन्ममरण' नामक पिंजऱ्याचा एक एक गज उपटून टाकणारें होतें. जडप्रेरित स्वार्थी कर्म उपकारक न होतां अपकारक होतें व निष्काम-कर्म उपकारक होतें. वस्तुतः कर्म बाधक नाहीं; तथापि जडविषयक सकामकर्म असलें कीं त्या कर्त्यास व जडविषयकज्ञान असलें कीं त्या ज्ञात्यास जन्ममरणाचे गोते चुकत नाहींत. म्हणून ब्रह्मदेवासारखे ( सहस्रयुगपर्यंतमहर्ब्रह्मं यदुच्यते ) सृष्टिकर्त्या विधात्यांसही जड-जन्ममृत्यूने सोडिलें नाहीं ! त्याचा जन्म सृष्टीच्या आधीं होतो व त्याला महाप्रलय झाल्यावर मरण येतें ! इतकाच कायतो फरक आहे.

**आरंभवाद, परिणामवाद आणि विवर्तवाद असे** तीन वाद जगाच्या व्यवहाराची मीमांसा करितात. अमुक काळीं, अमुक स्थळीं, परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलें आहे, असें आरंभवाद म्हणतो. सर्व द्वैतवादी या वादाचा स्वीकार करून विश्वोत्पत्तीची मीमांसा करितात, व या पद्धतीनें आत्मिक उन्नतीच्या विशिष्ट स्थळीं ( भूमिकेवर ) पोहोंचलेल्या पूर्ण भक्तांचें समाधानही होतें. पण ईश्वरानें ही सृष्टि कां

केली? कोठून केली? जगांत असें विचित्रत्व कां? असे प्रश्न विचारले म्हणजे, ह्या भक्तांस समाधानकारक असें उत्तर देतां येत नाहीं. ईश्वरी इच्छा, त्याचें विलक्षण सामर्थ्य इत्यादि उत्तरें देतात व शून्यापासून देवानें प्रकृति उत्पन्न केली असें ह्मणतात; पण यांनीं समाधान होत नाहीं. ह्याच्या वरील पायरीचा परिणामवाद आहे. हा परिणामवाद येथील विशिष्टाद्वैत व शुद्धाद्वैत वाद्यांस आणि पाश्चात्य तत्त्वज्ञांस संमत आहे. यासच अलीकडील लोक उत्क्रांति ( Evolution ) असे ह्मणतात. दुधाचें दहीं होणें, माकडाचें मनुष्य होणें, हीं सर्व उत्क्रांतीचीं कार्यें आहेत; कारणांत कार्याचा अंतर्भाव बीजरूपानें असतो, असें यांचें ह्मणणें आहे. एका सर्वत्र पसरलेल्या वायुमय तत्त्वापासून ह्या विश्वांतील चराचरांचें उद्गमन झालें आहे व पुनः तीं त्याच तत्त्वाकडे जाणार' असें उत्क्रांतितत्त्ववादाचे पुरस्कर्ते स्पेन्सर साहेब म्हणतात. पण वायुतत्त्व कोणी, केव्हां व कां उत्पन्न केलें? याचें उत्तर यांस देतां येत नाहीं. विवर्तवाद हा सर्वश्रेष्ठ वाद आहे. विश्वांत आरंभपद्धति असो वा परिणामपद्धति असो, तें सर्व मायामय आहे. ( दोरीवर सर्पाचा आभास होतो याप्रमाणें मिथ्या आहे ) पुरुषार्थसिद्धतेला विश्व व विश्वज्ञान आवश्यक आहे, तथापि तेवढयानें पूर्तता होत नाहीं, ह्मणून विश्व व विश्वज्ञान मिथ्या होय. पुरुषार्थ म्हणजे मोक्ष साधावयाचा असेल तर आत्मज्ञानाचा अधिगम केला पाहिजे. आत्मज्ञानदृष्टीनें सर्व विश्व व विश्वज्ञान आणि विश्वांतील घडामोड विवर्त आहे. **संसार**–कारण, **अनादि** आहे. याला आरंभ केव्हांच झाला नाहीं, असेंच फार तर सापेक्षज्ञान सांगेल. कारण, कारणाचें कारण, त्याचें कारण, असा अनंत कालपर्यंत ज्याच्या संबंधानें वाद चालणार त्या जगाचें कोडें इंद्रियज्ञानानें कधींही उलगडावयाचें नाहीं. पण आत्मविचारांत सृष्टिच नसते, तेव्हां तिचें कोडेंही नसतें. असो; तेव्हां विश्व हें ब्रह्मावर व ब्रह्मसत्तेनें एक विवर्त आहे, समुद्रावरील एक लाट आहे, व ही लाट प्रकृतीमुळें दृग्गोचर आली आहे हें समजून घ्यावें आणि निष्कामस्वरूपी परमेश्वराच्या कांसेला लागावें, हें विवर्तवादावरून शिकून घ्यावयाचें आहे. पुनः, आरंभवाद व परिणामवाद, यांतूनच विवर्ताकडे जावयाचें आहे; त्याचप्रमाणें कुटुंब, समाज, राष्ट्र, जगत्, विश्व यांच्याकडे भोगदृष्टीनें न पाहतां ज्ञानदृष्टीनें अवलोकन करून क्रमाक्रमानें निष्काम कर्मांचा संग्रह करण्यासाठीं व आत्मोन्नति करण्यासाठीं या व्यावहारिकतः नित्य असणाऱ्या विश्वाचें, राष्ट्रांचें व कुटुंबांचें अस्तित्व आहे, हें समजून घ्यावयाचें आहे, ह्मणून भगवंतांनीं दहाव्या श्लोकांत 'विपरिवर्तते' हा शब्द उपयोजिला आहे. वाद कोणताही असो; प्रभुसत्तेनें ह्या विश्वाची घडामोड चालली आहे हें ध्यानांत ठेवून, या विश्वमायेंतून सुटण्यासाठीं प्रभूचें आराधन ( म्हणजे परमेश्वरास सर्वथा संमत होईल, असें आपलें वर्तन, अशी आपली वृत्ति आणि असे आपले विचार ) ठेवून परमेश्वरस्वरूप तत्त्वतः समजून घेण्याचा मुमुक्षु पुरुषांनीं यत्न करावा.

प्रकृतीची साम्यावस्था सुटून विकर्षण शक्तींचा ( Repulsive forces ) उत्कर्ष झाला म्हणजे अव्यक्ताला व्यक्त स्वरूप येतें. पुढें लाखों वर्षांनीं संकर्षण जोरावर

म्हणजे सृष्टीला म्हातारपण येतें. पुढें सर्व वस्तूंमधील सर्व संकर्षणविकर्षणात्मक शक्ति गुप्त झाल्या, म्हणजे प्रलय! ही सृष्टी किती दिवस टिकेल व हा प्रलय किती दिवस राहील, हें गतिस्थितिशास्त्र, रसायनशास्त्र, भूतशास्त्र, इत्यादिकांच्या व गणितशास्त्राच्या आधारानें आपल्यास सुद्धां (सर्व गोष्टी माहित असतील तर) ठरवितां येईल. असो; तेव्हां सिद्धांत असा कीं, ज्याला शब्दस्पर्शरूपादिकांचा 'संयोग होऊन अंतःकरणगोचरत्व (इंद्रियें, मन व बुद्धि, ही अंतःकरणाचीं घटकें होत.) प्राप्त झालें, कल्पनागोचरत्व प्राप्त झालें, तो पदार्थ सांत, मर्यादित, परिछिन्न झालाच असें समजावें. सारांश, नामरूपात्मक सर्व पदार्थ विकार्य आहेत, आणि हाच सिद्धांत अलीकडील उत्क्रांतिदर्शक शास्त्रें (Evolutionary Sciences) सांगत असतात. जें दृश्य (Phenomenal) आहे, त्याचें स्वरूपांतर हें व्हावयाचेंच. तात्पर्य इंद्रियांस गोचर असणाऱ्या पदार्थांची इच्छा करणें, त्यांचा अभिमान धरणें व त्यांचा अखंड ध्यास ठेवणें. याचा परिणाम पाठीमागें सांगितलेल्या मानसशास्त्राच्या नियमावरून असा होतो कीं, ध्येयाचें ध्येयस्वरूप, विषयरूप होऊन जातें, तो ध्याता आपलें केवलस्वरूप (Absoluteness) जास्त जास्त विसरतो आणि मायेच्या, जन्ममरणाच्या, दुःखत्रयाच्या, भोंवऱ्यांत सांपडतो! मरणें, अव्यक्तस्वरूपांत जाणें, म्हणजे जन्ममरणांच्या चक्रांतून सुटणें असें नव्हे. तेल, वात व इतर सामग्री भरपूर असून दिवा मालविला असतां प्रकाशाचा अभाव कांहीं वेळ होतो, हें खरें; पण ज्योतीचा स्पर्श होतांच जसा पुनः दिवा लागतो, त्याचप्रमाणें अभिमान व वासना यांची सामग्री जय्यत असतां जीवज्योति विझाली, तरी नियमित काल येतांच ती ज्योति ईश्वरी नियमानें पेटते आणि पुनः जन्म प्राप्त होतो. असो; जेथें जन्म आहे तेथें मृत्यु आहे आणि जेथें जन्ममृत्यु आहे तेथें दुःख आहेच. सात्त्विकवृत्ति असेल तर कमी दुःख होईल, हें खरें; पण दुःख आहे. हें दुःख नाहींसें होणार ज्ञानानें. ज्ञान मिळविण्याला चित्तशुद्धीसह परमेश्वराची अनन्यभक्ति हेंच साधन आहे. परमेश्वराचीच अनन्यभक्ति म्हणजे उपभोगैकवर्धक स्वार्थाचा सर्वथैव त्याग होय. उपभोग जडवस्तूंचाच व्हावयाचा. कारण चैतन्य उपभोग्य नाहीं व ज्ञेयही नाहीं! सारांश विकारजन्य म्हणून सुखमूलक दुःखांचा व दुःखमूलक सुखांचा जर सर्वथा बीमोड करावयाचा असेल तर साधकानें आपली योग्यता पाहून ठरविलेल्या परमेश्वरी स्वरूपाचें अखंड चिंतन करण्यास लागावें. हें चिंतन दृढ होत जाईल तसतशी चैतन्यज्योति प्रकाशवंत होत जाईल व पूर्णप्रकाश फांकला म्हणजे ध्याता व ध्येय हा संबंध निरस्त होऊन एकच शुद्ध, निर्विकार, निरंजन, असें चैतन्य उरेल. ॐकार अगर सगुण ब्रह्म हीं या शुद्धचैतन्यांचीं प्रकट म्हणजे ज्ञानगोचर स्वरूपें होत; पण जडमिश्रित म्हणून जन्ममरणशील स्वरूपें होत. तथापि हीं स्वरूपें साधनभूत होऊन जीवांचें कार्य करितात म्हणजे त्यास सद्गति देतात.

यावरून जेवढी म्हणून ज्ञानविषय वस्तु आहे, ती जड आहे व जन्ममरणास वश आहे असें सिद्ध झालें. ज्ञानाला गोचर होणें हें जडत्वाचें दर्शक आहे. कारण बुद्धि-

मन, इंद्रियें, या करवीं आपल्यास ज्ञान होतें, आणि हीं जीं सर्व अंतःकरणें व बाह्यकरणें आहेत तीं जड व विकारी आहेत; अर्थातच यांस गोचर होणारे पदार्थही जड असले पाहिजेत. कर्मेंद्रियांस गोचर होणाऱ्या पदार्थांचीही हीच स्थिति असणार! म्हणून ज्ञानास व कर्मास गोचर असणारे सर्व पदार्थ जड, विकारी, जन्ममरणशील असावयाचे असें ठरलें. ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत बुद्धिगम्य, मनोगम्य व इंद्रियगोचर सर्व पदार्थ उत्पन्न होणारे व मरणारे असले पाहिजेत, असें ठरलें. तसेंच सुखदुःख, रागद्वेष इत्यादि द्वंद्वें हीं मृत्युगोचर आहेत. काळाच्या वश नाहीं असा एकही पदार्थ नाहीं, असें पाहून ' कालाय तस्मै नमः ' असे जें कित्येक तत्त्वज्ञ कवी म्हणतात' तें अक्षरशः खरें आहे. या कालरूपी सर्वभक्षक महाराक्षसाच्या तावडीतून जर आपल्यास सुटावयाचें असेल, तर उपभोगाची इच्छा नष्ट करणारें व अहंभाव नाहींसा करणारें **कर्म करण्याचें** अंगीकृत केलें पाहिजे आणि काम, क्रोध, लोभ यांचा व तज्जन्य व तज्जनक कर्मांचा व विचाराचा सर्वथा त्याग केला पाहिजे. ' कामक्रोध मीठ मिरची। यांची घेऊं नये रुची ॥ ' असें साधुवर्य तुकोबा ' विठ्ठल मात्रा घेणारांस ' पथ्य सांगत आहेत. हें ध्यानांत ठेऊन आचरण ठरविलें पाहिजे. **या क्रमानें जाऊं लागलों म्हणजे क्रमशः मुक्ति मिळेल.** पण हें न करितां केवळ स्वार्थसाधनासाठीं अनंत सत्कृत्यें केलीं, तर कीर्ति मिळेल, संपत्ति मिळेल, इंद्रलोकीं वास्तव्य होईल, प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या मांडीशी मांडी लावून बसावयास मिळेल, पण ही स्थिति कालभंगुर होय. यानें जन्ममरण चुकावयाचें नाहीं, दुःख संपावयाचें नाहीं, ज्ञान होणार नाहीं. सारांश पुनरावृत्तीचें गाडें थांबणार नाहीं. या पुनरावृत्तीचें कारण अज्ञान व जडसंयोग होय. हा जडसंयोग क्रमाक्रमानें टाकून देऊन

## परमात्म्याचें आराधन करावें,

८ हा सर्वदयाघन प्रभूचा उपदेश आहे. हा सर्व जीवांस उपदेश आहे. परमात्मा हा काळाचा कर्ता, अव्यक्ताचा अधिपति, सनातन व अविनाशी आहे. सर्व भूतें येथेंच सामावतात. हा सर्वव्यापी आहे. २०, २१, २२ व २७ श्लोकांतील उपदेश व त्यांतील रहस्य वाचकांनीं समजून उमजावें. (**'पुरुषान्नपरं किंचित्साकाष्ठा सा परा गतिः'** हें श्रुतिवाक्य आदरणीय आहे.) परमात्म्याचें ध्यान व परमात्मा जोडेल असें निष्काम, निष्कपट व शास्त्रविहित आचरण व कर्तव्यतत्परता ही जोडी जर असेल, तर ज्ञानाचा परिचय होऊन परमात्म्याचें परोक्षज्ञान होईल; आणि पुढें ( या अगर पुढील जन्मीं ) योगपूर्वक व भक्तिपूर्वक निदिध्यास झाला तर अपरोक्षविज्ञान होऊन मुक्ति मिळेल. येथें गेल्यावर, या स्थितीस जाऊन पोहोंचल्यावर, जन्ममरणाचें नांवच घ्यावयास नको! येथें ज्ञानाच्या पलीकडे, आनंदाच्या पलीकडे व अस्तित्वाच्याही पलीकडे आपण जाऊं! पण हें सिद्ध व्हावयास ज्ञानविज्ञान हवें. ज्ञानविज्ञानाचीं साधनें

मिळाल्याशिवाय ज्ञानविज्ञान हस्तगत होणार नाहीं. सत्कर्म, योग, उपासना, वेदांतश्रवण इत्यादि साधनें क्रमशः अंगीकृत केलीं तर ज्ञानविज्ञान होईल.' असो; तेव्हां दुय्यम-प्रतीच्या भक्तानें ओंकारादिकांची उपासना व ध्यान संपादून अखंड चिंतनांत निमग्न रहावें व ७ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें वर्णप्राप्त व आश्रमप्राप्त कर्तव्य निष्कामबुद्धीनें करावें. या भक्तांसाठींच ९, ११, १२, १३ व २०, २१ आणि २२ श्लोकांत परमात्म्याचें स्वरूप, परब्रह्माचें सगुण स्वरूप, सांगितलें आहे आणि श्लोक ५ ते ८, १०, १२, १४, व २२ श्लोकांत या स्वरूपाची उपासना करण्याचे सुलभ मार्ग सांगितले आहेत. तसेंच ५, ७, ८, १०, १३, १४, १५ इत्यादि श्लोकांत या उपासनेचें फल सांगितलें आहे. जन्ममरणाच्या त्रिविध तापांतून सुटावयाचें असेल तर अनन्यभक्तीनें परमेश्वराचें आराधन केलेंच पाहिजे; असा हा विषय आहे.

९ शेवटच्या श्लोकांत पुनरावर्तनाच्या अभिमानिनी देवता कोणत्या व अपुनरावर्त-नाच्या देवता कोणत्या हें सांगितलें आहे. ब्रह्मवेत्ते लोकांस प्रकाशक व ज्ञानविज्ञान-दात्या देवतांचें पाठबळ असल्या कारणानें त्यांस पुनर्जन्म येणें संभवनीय नाहीं. प्रकाश व प्रकाशकदेवता ज्ञानपोषक आहेत, असा पूर्वी सर्वत्र समज होता. प्रसिद्ध कवी **मिल्टन-याच्या काव्या मध्यें** प्रकाश म्हणजे ज्ञान असें प्रकट करणारीं अनेक कवितास्थळें दाखवून देतां येतील. शिवाय प्रकाशानें जितकें ज्ञानसंपादन होतें, तितकें इतर भूतांकडून होत नाहीं. एवंच प्रकाश हा ज्ञानपोषक असल्याकारणानें दिवसां, शुक्लपक्षांत व उत्तरायणांत, सारांश उत्तरायणांतील शुक्लपक्षाच्या दिवसां जर मरण आलें तर तो पुरुष भाग्यवान् समजावा; ( कारण त्या जीवाला मार्गदर्शक प्रकाशदेवताच होतात ) असा प्रकार असणें, असें मत असणें, साहजिकच होतें. बृहदारण्यक उपनिषदाच्या सहाव्या अध्यायाच्या द्वितिय ब्राह्मणांत पुढील मंत्र आहे. ( पहा बृहदारण्यक उपनिषद. )

ते य एवमेतद्विदुर्येचामी अरण्ये श्रद्धा ँ सत्यमुपासते, तेऽर्चिरभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङ्यादित्य एति मासेभ्यो देवलोकं देवलोकादादित्यमादित्याद्वैद्युतं तान्वैद्युतान्पुरुषो मानस एत्य ब्रह्मलोकान्गमयति ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति तेषां न पुनरावृत्तिः

याचा सामान्य अर्थ असाः 'आपण अग्नीपासून उत्पन्न होऊन अग्निस्वरूपच आहों असें ज्या गृहस्थांस समजतें व जे वानप्रस्थ व यति, श्रद्धापूर्वक सद्रूपी ब्रह्माची उपासना करितात ते, सारांश पंचाग्निवेत्ते व सत्यब्रह्मवेत्ते हे अर्चिरादि मार्गानें, देवयान मार्गानें, उत्तर मार्गानें जातात. (१) अर्चिः, (२) अह (दिवस), (३) शुक्लपक्ष, (४) उत्तरायण, (५) देवलोक, (६) आदित्य लोक, (७) विद्युल्लोक, या या लोकांप्रत अर्चि, अह इत्यादिकांच्या अभिमानी ज्या देवता त्यांच्या साहाय्यानें जातात व

तत्तत्स्वरूप होतात. नंतर एक मानस पुत्राच्या साहाय्यानें (८) ब्रह्मलोकास जातात, तेथें बरेच दिवसांनी ब्रह्मस्वरूप पावल्यानंतर ते पुनः परत येत नाहात, सारांश मुक्त होतात. हा **देवयान पंथ** होय. यांतच उत्तरायणाचा संबंध आहे. ज्ञानी पुरुषानें येथें देह ठेविल्यानंतर ज्या ज्या प्रदेशांतून त्याचा आत्मा परिशुद्धिकरितां जातो, त्या त्या प्रदेशांतील देवतांच्या द्वारें तो उन्नतोन्नत मार्गानें श्रेष्ठ-श्रेष्ठतर लोकांस जात असतो. शेवटीं **मानस** पुत्राच्या (Logos) साहाय्यानें तो परिशुद्ध आत्मा ब्रह्मलोकांस जातो; व तेथें सर्वज्ञत्वादि परमात्मस्वरूप पावून तो मुक्त होतो. हा क्रममुक्तीचा, उत्तरोत्तर मनुष्ययोनीला मुक्ति प्राप्त करून देणारा श्रेष्ठ पंथ आहे. यावरून, मनुष्यजीव हीच श्रेष्ठ कोटी आहे, अशी ख्रिस्ती व महंमदी धर्मीयांची समजूत आहे, ती अवास्तविक आहे. कारण, (१) ती श्रुतिविरुद्ध आहे; (२) युक्तिविरुद्ध आहे. एका आयुष्यक्रमांत सांत जीव अनंत होणें शक्य नाहीं. जीव अनंतस्वरूपी झाल्याशिवाय त्याला मोक्षप्राप्ति नाहीं. तसेंच, अनेक योग्यतेचे सांत, मर्यादित जीवांस ईश्वरी लोकांत एकच प्रकारचें स्वरूप मिळणें शक्य नाहीं, आणि सर्वन्यायी देवाच्या घरीं, देवासन्निध, देवस्वरूपी, प्राण्यांत भेदभाव असणें संभवनीयच नाहीं. (३) आणि अनुभवही तसा नाहीं. परिस्थिति व अंतःस्थिति बदलल्या असतां स्वरूपभिन्नता प्राप्त होते, असा प्रत्यहींचा अनुभव आहे. जीव उत्तरोत्तर उत्क्रांत होत आहे यांत शंका नाहीं. म्हणजे क्रममुक्तीचाच पंथ आला! सारांश, आधुनिक उत्क्रांतिशास्त्रांचें पाठबळ आमच्या श्रुतिप्रणीत सिद्धांतांस आगंतुकत्वानें मिळत आहे, यावरूनही क्रममुक्तीचाच क्रम स्वीकारला पाहिजे. असो; हा देवयान पंथ झाला. आतां

## दक्षिणपंथ म्हणजे

अथ ये यज्ञेन, दानेन, तपसा लोकाञ्जयन्ति ते धूममभिसंभवन्ति, धूमाद्रात्रिᳪरात्रेरपक्षीयमाणपक्षमपक्षीयमाणपक्षाद्यान्षण्मासान्दक्षिणाऽऽदित्य एति मासेभ्यः पितृलोकं, पितृलोकाच्चंद्र, ते चन्द्रं प्राप्यान्नं भवन्ति ताᳪस्तत्रदेवा यथा सोमᳪराजानमाप्यायस्वापक्षीयस्वेत्येवमेनाᳪस्तत्र भक्षयन्ति तेषां यदा तत्पर्यवैत्यथेममेवाऽऽकाशमभिनिष्पद्यन्त, आकाशाद्वायुं वायोर्वृष्टिं वृष्टेः पृथ्वीं, ते पृथ्वीं प्राप्यान्नं भवन्ति, ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्ते, ततो योषाग्नौ जायन्ते लोकान्प्रत्युत्थायिनस्त एवमेवानुपरिवर्तन्ते।

सामान्य अर्थः—जे लोक काम्यतः व ब्रह्मज्ञानविज्ञानशून्य पद्धतीनें यज्ञ-दान-तपद्वारा येथें वेदविहित पुण्यकर्मे करितात ते (१) धूमदेवता, (२) रात्रिदेवता, (३) कृष्णपक्षदेवता, (४) दक्षिणायनदेवता, (५) पितृलोकदेवता, (६) आणि चंद्रदेवता, या या देवतांच्या साहाय्यानें त्या त्या लोकांप्रत जाऊन भोग भोगण्यासाठीं तद्रूप होतात. हे लोक चंद्रलोकांत अन्नस्वरूपी होतात. हें अन्न म्हणजे कर्मठ लोकांचें

वेदविहित काम्यकर्मांचें संचित पुण्य होय. हें पुण्य म्हणजे चंद्रलोकस्थ देवांचें भक्ष्य अन्न असतें. देवांनीं खाऊन खाऊन हें अन्न संपलें, हें पुण्य संपलें, म्हणजे वरील कर्मठ प्राण्यांचे जीव ह्या आपल्या मृत्युभूमीच्या आकाशांत मिसळतात आणि मग वायु, वृष्टिमार्गानें पृथ्वीवर ते भक्षणीयपदार्थरूपानें अवतीर्ण होतात; आणि प्रथम पुरुष शरीरांत व नंतर स्त्रीशरीरांत येऊन पुढें जन्म पावतात. हा दक्षिणपंथ, पितृयानपंथ, परिभ्रमणपंथ होय. या चक्रांत सांपडलेला जीव, ब्रह्मज्ञानास योग्य जें वैराग्य व जो विवेक, तो प्राप्त होईपर्यंत, जन्ममरणाच्या चक्रांत फिरत राहतो. ही पुनर्जन्माची परंपरा आहे.

श्रीमद्भगवद्गीतेंतील श्लोकांत केवळ चार लोकांचाच उल्लेख केला आहे. म्हणून '**अग्नि-ज्योतिरहः शुक्लः**' असा जो सर्वविश्रुत पाठ सर्व गीता पुस्तकांतून आढळतो, त्याच्या ऐवजीं '**अग्निज्योतिरहः शुक्लः**' असा पाठ असेल तर उत्तम होईल. हा पाठ असाच असावा, असें वर दिलेल्या बृहदारण्यकांतील उताऱ्यावरून व छांदोग्योपनिषदाच्या चवथ्या अध्यायाच्या पंधराव्या खंडांतील मंत्रावरून स्पष्ट होत आहे. आतां 'अग्नि हीच ज्योति' असा अर्थ केल्यास ( **ज्योतिरूपमयमग्निः** बृ० प्रथम अ०; **अग्निरेवास्य ज्योतिर्भवति**. ४ था अध्याय ) एकंदरीनें उत्तरायण व दक्षिणायन पंथांत चारच लोकांचा, चारच रूपांतरांचा उल्लेख होतो. २४ व्या श्लोकांत ५ रूपांतरांचा व २५ वे श्लोकांत ४ रूपांतरांचा उल्लेख दिसतोसें वाटतें. पण ही भ्रांति होय. माझें गीतापुस्तक छापतांनाही 'अग्निर्ज्योतिरहः' असें छापलें आहे! पुढें जितका स्पष्टार्थ करावयास हवा तितका केला नाहीं व अर्थ करतांनाही रूढपद्धत्यनुसारच अर्थ करून गेलों. वे. रा. रा. आत्माराम मोरेश्वर छत्रे यांनीं जी आर्यासप्तशती प्रसिद्ध केली आहे तेथेंही 'अग्नयर्चिरहःशुक्लः' असाच पाठ आहे; तथापि उपनिषदनुकूल 'अग्निज्ज्योतिरहःशुक्लः' हा पाठच ठीक दिसतो. असो; निष्कामत्वानें वेदविहित कर्में करून कर्मविपाकाचें ज्ञान झालेला व ज्ञानसंपन्न होणारा पुरुष २४ व्या श्लोकामध्यें दिग्दर्शित केलेल्या देवयानपंथानें जातो व काम्यकर्में करणारा पुरुष २५ व्या श्लोकांत सांगितलेल्या पितृयानपंथानें जातो. हें स्पष्ट झालें. देवयानपंथानें जाणाऱ्या पुरूषाची पुनरावृत्ति संपते; पितृयानानें जाणारा पुरुष पुनरावृत्तीच्या फेऱ्यांत सांपडतो. येथें, वरील श्लोकांत, **अग्निदेवता, अहर्देवता** घेणेच्या आहेत, केवळ भौतिक अग्नि अगर दिवस हे घ्यावयाचे नाहींत; तेव्हां अर्थातच 'ज्ञानी पुरुष रात्रीं मरतो कीं नाहीं? इत्यादि शंका व्यर्थ होतात.

आपले आर्यपूर्वज आठ दहा हजार वर्षांपूर्वी उत्तरध्रुवाजवळ राहत असत, असें आतां म्हणजे प्रो० टिळक यांचा अपूर्व ग्रंथ प्रसिद्ध झाल्यादिवसापासून बहुतेक ठरल्यासारखें झालें आहे. उत्तरध्रुवावर सहा महिने दिवस व सहा महिने रात्र असण्याचा संभव होता. त्यावेळीं रात्रीं मृत झालेल्या मनुष्याचा प्रेतसंस्कार दिवस उजाडल्यावर होई।

अर्थातच त्या प्रेतास संस्काराशिवाय म्हणजे धूममार्गानें जावें लागे. दिवसा मेलेले लोक संस्कृत होऊन अर्चिमार्गानें जात. ही कथा मनांत आणून उपनिषदांत व गीतेंत देवयान व पितृयान पंथांचा हा उल्लेख असावा. हल्लींही उत्तरेकडे राहणाऱ्या लोकांस सूर्यप्रकाश जास्त वेळ असतो हेंही विसरतां कामा नये. शिवाय अलीकडील शास्त्राप्रमाणें सूर्यकिरणांनीं आकर्षित झालेला जीव पृथ्वीवर येणें शक्य नाहीं, पण चंद्राकर्षित जीव पृथ्वीवर येऊं शकेल, हें पृथ्वी ही सूर्यमालेंतील एक ग्रह व चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे हें ध्यानांत ठेविलें असतां समजणार आहे. एवंच अज्ञानमार्गानें जाणारे लोक पुनर्जन्म पावतात व ज्ञानमार्गानें जाणाऱ्या लोकांस पुनर्जन्म येत नाहीं; ते उत्तम उत्तम लोकांप्रत जाऊन शेवटीं मुक्त होतात. म्हणून वेदाध्ययन, यज्ञ, तप, दान, यांच्या करण्यानें जें पुण्य प्राप्त होतें, सकामत्वानें हीं कर्में केलीं असतां जें पुण्य मिळतें, त्यापेक्षां अनंतपटीनें मोलवान फल ईश्वराच्या निष्कामभक्तीनें मिळतें. अतएव सर्व लोकांनीं या व्याख्यानांत सांगितलेल्या पद्धतीनें परमात्मभजन करावें. हें केलें तरच जीवाचें सार्थक होईल, जन्ममरण चुकेल, समाजाचें मनुष्यतेचें, किंबहुना जीवमात्राचें कल्याण होईल, प्रापंचिक जीवांचे दुःख कमी होऊन स्वतःस कालांतरानें परमावधीच्या अखंड सुखाकडे जाऊन स्वस्थ व्हावयास सांपडेल आणि धर्मग्रंथांचें चीज होईल !

---

## खंड ९ वा.

# नवव्या अध्यायाचा उपसंहार.

श्रीमद्भगवद्गीतेमध्यें जें उत्कृष्ट गुणसर्वस्व अवतीर्ण झालें आहे त्याचा आस्वाद नवव्या अध्यायामध्यें पुष्कळच घ्यावयास सांपडतो. शालीवाहन शकानंतर जे हजारों साधुसंत या महाराष्ट्रांत झाले त्या सर्वांस नववा अध्याय सर्वोत्तम म्हणून वाटत असे, असा लोकप्रवाद आहे. देहावसान व्हावयाचा समय येऊन समाधिस्थ होण्याचा प्रसंग आला असतां ज्ञानेश्वरादिक साधुवर्यांनीं नववा अध्याय उघडून तो वाचित असतां समाधीमध्यें प्रवेश केला, असें ऐकिवांत आहे. प्रत्यक्ष भगवानही या अध्यायाच्या प्रथम श्लोकांत म्हणत आहेत कीं, यांत सांगितलेलें ज्ञानविज्ञान अवगत झालें असतां अमंगल जन्ममरणां पासून प्राणिमात्राची सुटका होते. तेव्हां

### या अध्यायांत काय सांगितलें आहे,

याचा विचार करून नंतर पुढील मार्ग क्रमण्यास आरंभ करावयाचा आहे. अर्थात कथित अर्थें जें [illegible] त्याची मीमांसा नवव्या व्याख्यानांत केली आहे. [illegible]

विचार आहे. येथें कार्यकारणातीत ब्रह्माचा उपदेश व ही मीमांसा केवळ शास्त्रीय (Theory) अगर शाब्दिक मार्गानें केली आहे असें नाहीं. जें जें काय येथें सांगितलें आहे त्याचा प्रत्यक्ष अनुभव (Realization) कसा येईल, याचीही दिशा या व्याख्यानांत दाखवून दिली आहे. या सर्वश्रेष्ठ अध्यात्मविद्येचें यथासांग श्रवणमननादि झालें असतां पराकाष्ठेची कष्टप्रद जी जीवयात्रा तिचा अंत होऊन जीवास स्वस्वरूप प्राप्त होतें. भगवान् सांगतात की, ही विद्या अतिशय पवित्र आहे. ही (विद्वान्पापपुण्ये- विधूय) 'विद्या जाणणारा विद्वान पापपुण्यादिकांस पार धुवून टाकितो' अशी श्रुति आहे. ही विद्या प्रत्यक्ष समजण्यासारखी आहे; समाजपोषक व व्यक्तितारक आहे; समजण्यास व आचरण्यास सुगम आहे आणि या विद्येचा कधींही नाश होण्यासारखें हिचें स्वरूप नाहीं. शिवाय **अनुभव आल्यावर विश्वास ठेवावा**, असें भगवानच ह्या विद्येविषयीं, धर्माविषयीं सांगतात. असो; याप्रमाणे सोपी, पवित्र, धर्मशील, विश्वसनीय व जन्ममरण नुकविणारी अशी ही राजविद्या कोणती आहे हें समजण्यासंबंधें अर्जुन जसा आतूर झाला असेल, तसेच गीताभक्तही झाले असतील असे समजून मी त्या विद्येचा यथामति उहापोह करितो.

## ईश्वराचें गुह्य स्वरूप.

२ या अध्यायांतील चवथ्या, पांचव्या व सहाव्या श्लोकांत भगवंतांनीं ब्रह्मरूपाचें वर्णन दिग्दर्शनरूपानें केले आहे. हें स्वरूप समजून घेणें अत्यंत अगत्याचें आहे. खरा-पुरुषार्थ साध्य करावयाचा, या हेतून आत्मिक उन्नतीचा मार्ग आक्रमण करूं लागण्यापूर्वी जें स्वरूप आपल्यास साध्य करून घ्यावयाचें आहे त्याची स्थूल माहिती व त्या साध्य वस्तूचे साधन करून देणारा मार्ग ह्या दोन्ही गोष्टी अवश्य समजून घेतल्या पाहिजेत. असो; आतां परब्रह्म स्वरूपाचा विचार सांगितला आहे, त्याचें श्रवण करूं. हें जें आपल्या सभोंवार अनंत व आकाशपूर्ण विश्वचक्र फिरतांना दिसत आहे, त्या सर्व व्यक्ताव्यक्ताला-साकाशविश्वाला अंतर्बाह्य व्यापून टाकणारे परब्रह्माचें स्वरूप सर्वत्र ओतप्रोत व घनदाट भरलेलें आहे. एक पावअंगुळ जागासुद्धां अशी नाही कीं जेथें परब्रह्माचें अस्तित्व नाहीं. प्रत्येक अणुरेणु व आकाशसर्वस्व हीं परब्रह्मानें व्यापून टाकिलीं आहेत. पण चमत्कार पहा कीं, ज्याला कसल्याही प्रकारचा अवयव नाहीं, कोणत्याही प्रकारचें मूर्तस्वरूप नाही, अशा ब्रह्मानें हें दृश्य व मूर्तिमंत असें अनंतकोटी ब्रह्मांड व्यापून ठेविलें आहे! ब्रह्माचें स्वरूप मूर्त नाहीं म्हणून तें बुद्धीपासून स्थूल इंद्रियापर्यंतच्या कोणत्याही इंद्रियास गोचर नाहीं; पण विश्व हें कांहींसें दृश्य आहे; म्हणून तें कांहींअंशीं इंद्रियगोचर आहे. अशा इंद्रियगोचर विश्वास इंद्रियातीत ब्रह्मानें व्यापिलें आहे, हाच चमत्कार होय. अशा अमूर्त सद्वस्तूनें हें सर्व ब्रह्मांड सर्वथा व्यापून ठेविलें आहे, हा व्यावहारिक दृष्टीनें मोठाच चमत्कार होय! आपल्यासारख्या 'चक्षुर्वैसत्यं' नामक महासिद्धांताचा मात्र

आश्रय करणाऱ्या स्थूल दृष्टीच्या जीवांस 'मूर्त व म्हणून दृश्य विश्वास व्यापून टाकणाऱ्या अमूर्त आणि म्हणूनच **ज्ञानगम्य** ब्रह्म वस्तूचा' परिचय होणे दुःसाध्यच होय. गुह्य, गुह्य ते हेंच की, अमूर्त वस्तु मूर्त पदार्थास आंवरून धरितें. येथें अश्रद्धा अथवा अविश्वास होण्याचें कारण नाहीं. पहा कीं, कोणतेही इंद्रियास–उदाहरणार्थ–डोळ्यास दिसते तेंच व तेवढेंच खरें असें आपण व्यवहारांत मानितों; पण डोळ्यांस पाहण्याची शक्ति देणारी व विषयास दृश्य करविणारी अमूर्त शक्ति–जाणीव, जाणण्याची शक्ति,–आपल्याजवळ अखंडत्वाने व सर्वव्यापीपणानें राहते असा आपला दृढ विश्वास असतोच ना? तर सर्व विश्वास व्यापून त्याला अस्तित्व देणारी व सर्वत्र आणि सर्वदा अखंडत्वाने राहणारी अमूर्त ब्रह्मवस्तु 'आहे की नाही' याबद्दल तरी संशय कां उत्पन्न व्हावा? असो; तेव्हां अशा रीतीने विश्वव्यापी अमूर्त सद्वस्तु ओतप्रोत भरलेली आहे असें समजलें म्हणजे त्या प्रचंड, अगाध व अनंत ब्रह्मसमुद्रांत केवळ लहरींच्या क्षणभंगुर स्वरूपानें विश्व व विश्वांतील भूतें नांदत आहेत हे सहजच समजेल. ही सर्व सूक्ष्म आणि स्थूल भूतें **आपल्यास दिसतात** म्हणून, या भूतांच्या योगाने **ब्रह्मवस्तूस अस्तित्व आलेलें आहे, असें मात्र नाहीं.** धूम पाहिल्यावर त्या ठिकाणीं–जवळपास –अग्नि आहे, असे **ज्ञान** अनुमानाने होतें त्याप्रमाणेंच भूतें आहेतशीं दिसतात. यावरून **ब्रह्मवस्तु आहे** असें **ज्ञान अनुमानानें ठरवून घ्यावयाचें हें खरें**; पण या भूतांच्या अस्तित्वाने ब्रह्मवस्तूला **अस्तित्व येतें**, असें केव्हांही समजणे चुकीचे होईल. भूतें दिसोत न दिसोत, असोत नसोत, ब्रह्मवस्तूला, त्यासंबंधीं कांहीं कर्तव्य नाहीं. तिचें अस्तित्व त्रिकालाबाधित आहे. तसेंच मूर्त पदार्थांनीं ब्रह्मवस्तूचें नियमन होत नाहीं. **मूर्त वस्तूमध्यें अमूर्त वस्तु मूर्तत्वानें नसते**, तर **अमूर्त वस्तूच्या अस्तित्वामुळें दृश्य भूतांस अस्तित्व आहेसें भासतें.** म्हणजे भूतमात्रांच्या आंत बाहेर जें निराकार ब्रह्मतत्त्व भरलेलें आहे तें ब्रह्म भूतमात्रांचे मूर्त आकार घेऊन स्वतःला अस्तित्व प्राप्त करून घेतें असें नव्हे, तर या ब्रह्माचें अस्तित्व गृहीतच करावें लागतें. तें आहे असें म्हणावेंच लागतें. तें आहेच; मग गृहीत केल्याशिवाय चालेल कसें? तेव्हां **तें आहे म्हणून** दृश्य विश्वास अस्तित्व आहेसें भासतें.—हा चमत्कार पहिल्यापेक्षांही गुह्यतर होय. सर्व पदार्थांस सत्ता, आश्रय व आधार देऊन **त्या पदार्थांमध्यें पदार्थ रूपानें नसणें**, निर्लेप असणें हा चमत्कार आहे. सर्व दृश्य विश्व अंतर्बाह्यतः व्यापून पुनः त्या विश्वामध्यें **परिच्छिन्नरूपानें नसणें** हाच हा चमत्कार होय. सूर्याचा प्रकाश सर्व पदार्थांस प्रकाशित करितो, व सर्वांस आंतून बाहेरून व्यापून राहतो म्हणून प्रत्येक पदार्थांतील परिच्छिन्न तेजानें सूर्य हा तेजोगोलक झाला आहे, किंवा पदार्थांतील तेज हाच सूर्य आहे हें जसें आपण व्यवहारांत म्हणत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व **परिच्छिन्न** पदार्थांस–(म्हणजे मूर्त पदार्थांस)–'अस्तित्व, भातित्व, व प्रियत्व' देणारी ब्रह्मवस्तु ही या परिच्छिन्न पदार्थांत **परिच्छिन्नत्वानें** दिसत व असत नाहीं.

पण याहीपेक्षां तिसरा चमत्कार गुह्यतम आहे. परब्रह्मामध्यें सर्व भूतें आहेत असें चवथ्या श्लोकांत सांगितलें; यावरून आपल्या सारख्याची अशी समजूत होईल कीं, परब्रह्म वस्तूला अवयव आहेत व आकार आहे व सर्व पदार्थ एकत्र केले असतां ब्रह्मवस्तु सिद्ध होईल. सारांश, ही वस्तु अवयवी व आकारवंत आहे, असा प्रकार नाहीं असें स्पष्टपणानें कळावें, एतदर्थ भूतें 'माझ्यामध्यें नाहींत' असें पांचव्या श्लोकांत सांगितलें आहे. याचें रहस्य असें कीं, सर्व वस्तूंचें अधिष्ठान ब्रह्म असल्यामुळें त्या वस्तु ब्रह्मांत आहेत असें दिसतें; परंतु वस्तुतः तशी स्थिति नाहीं. परमात्मा भूतभृत व भूतभावन असूनही भूतस्थ म्हणजे परिच्छिन्न नाहीं. पहा कीं, मंदप्रकाशामध्यें एखादी दोरी लांबच लांब पसरलेली असली म्हणजे पाहणारास सर्पाचा आभास होतो हें सगळ्यांस विदित आहे. आतां सर्पाचें जें भासमान अस्तित्व आहे, त्याचें अधिष्ठान रज्जु आहे; म्हणजे त्या दोरीमध्यें सर्प आहे असें आपण व्यवहारांत म्हणूं. पण तीव्र प्रकाशामध्यें तीच दोरी स्वरुपानें पाहिली असतां तिचें आभासलेलें सर्पत्व नष्ट होऊन लांबच लांब दोरी मात्र स्थिरत्वानें राहिली आहे असें स्पष्ट होईल. दोरीच्या ठिकाणीं प्रथमतः सर्प दिसला. तीव्र उजेड झाल्यावर सर्प जाऊन दोरी राहिली; तथापि 'निदान सर्पाभास कोठें होता ?' असें कोणी विचारल्यास दोरीमध्यें होता असें बोलण्याच्या इरादानें आपण दोरीकडे बोट दाखवूं इतकेंच; वस्तुतः आभासित सर्पत्वाचा बाध होऊन दोरी मात्र राहिली. भगवंताचें म्हणणें असेंच आहे. ते म्हणतात कीं, हीं दिसणारीं भूतें वस्तुतः माझ्यामध्यें नाहींत. असो; सारांश हाः प्रथमतः हे परिच्छिन्न मर्यादित व कालस्थलास वश असें जग दिसतें; ( २ ) पुढें ज्ञान वाढत जातें तसतसें परमेश्वराचें अस्तित्व निश्चित होऊन जगांत परमेश्वर भरला आहे, असें कळतें, ( ३ ) पुढें परमेश्वरांत जग आहे आणि ( ४ ) शेवटीं परमेश्वर, परमात्मा, परब्रह्म मात्र आहे असें कळतें. असो; हें जें चमत्कारत्रय आहे त्यासच भगवंतांनीं 'योगैश्वर्य' म्हटलें आहे. भूतांचें अधिष्ठान असून भूतांमध्यें नसणें किंवा आत्मस्वरूपानें भूतांचा 'सर्गस्थितिप्रलय' चालूं ठेवणें, याचेंच नांव योगैश्वर्य होय.

परमात्मस्वरूप घ्या किंवा परब्रह्मस्वरूप घ्या, त्यांची गूढता सहज उकलण्यासारखी नाहीं. परब्रह्म हें सर्वांचें अधिष्ठान तर आहेच; पण तें सर्वकारण असून पुनः निर्लेपही आहे! तें त्रिगुणातीत आहे, स्वयंभू आहे, पूर्ण आहे व शुद्ध आहे. आपण स्थूलदृष्टीचे पुरुष आहोंत, म्हणून हें असलें शब्दातीत, कल्पनातीत, स्वरूप आपल्यास समजणें शक्य नाहीं. तथापि केवळ दिग्दर्शन करण्यासाठीं लहानसें उदाहरण घेतों. आपल्यास सुखदुःख होत असतां आपण काम करित असतां, आपण स्वस्थ असतां, जर विचार करूं लागलों तर सुखदुःखाचा, कामाचा व स्वस्थतेचा पाहणारा–द्रष्टा–कोणी तरी निराळा 'मी' या स्वरूपानें आहे, करणाऱ्याहून किंवा भोगणाऱ्याहून तो निराळा असून करण्याचा, भोगण्याचा व वाटण्याचा तो साक्षी आहे, असें आपल्यास विचाराअंतीं कळून

येतें. आपण साखर खात असतांनाच जर आस्वादसुखाची मीमांसा करूं लागलों तर गोडीची रुचि घेणाऱ्याहून रुचीचें ज्ञान असणारा व रुचि घेत आहे असें पाहणारा कोणी तरी तटस्थ व उदासीन निराळाच 'मी' आहे असा अनुभव आपल्यास असतो, असें ठरतें; निदान हें ज्यानें त्यानें स्वानुभवानें ठरवावें. हा साक्षी प्रत्यगात्मा ज्याप्रमाणें प्रत्येक ठिकाणीं हजर असून स्वतः निर्लेप राहतो, प्रत्येक गोष्टीस अस्तित्व देऊन पुनः प्रत्येक वस्तूच्या व्यतिरिक्त असतो, त्याचप्रमाणें परब्रह्माची व्यवस्था आहे असें सांगण्याचा भगवदुद्देश आहे.

ह्याप्रमाणें परब्रह्माच्या स्वरूपाविषयीं स्थूलमानानें विचार झाला. हें गूढस्वरूप वाणीनें एकमेकांस सांगतां येण्यासारखें नाहीं; ह्याचें केवळ दिग्दर्शन मात्र करितां येण्यासारखें आहे. सारांश भगवत्स्वरूप ओळखण्यास स्वस्वरूपाचा परिचय हवा आणि हा परिचय वेदांतश्रवणादिकांनीं, गुरुपदेशानें व भगवदनुग्रहानें होणार आहे. आपलें स्वरूप,-आपला आत्मा, हा निर्लेप, स्वयंभु, सर्वव्यापी, सर्वकारण व सर्वसाक्षी आहे हें कळलं म्हणजे भगवत्स्वरूप कळेल.

## सृष्टिरचना.

३ आपल्या या परिच्छिन्न देहनगरीचें अध्यक्षत्व **जीवाकडे** मात्र आहे, असें व्यवहारांत कांहीं काळपर्यंत आपल्यास वाटतें व आत्मिक उन्नतीच्या प्रथमारंभी तें अध्यक्षत्व कांहीं वेळ जीवाकडे कांहींसें असतेंही; तशीच सृष्टिरचनेच्या व्यवस्थेची घटनाही सर्व ब्रह्मांडाच्या अध्यक्षाकडून, परमेशाकडून, कांहींशी होत असते. म्हणजे त्या नित्य चिदात्म्याच्या अस्तित्वानें ब्रह्मांडास अस्तित्व येतें. पण परिच्छिन्न व चराचर पदार्थांच्या व जीवांच्या मर्यादित कर्मानुसार विविध कर्मविपाक उत्पन्न होतात. याप्रमाणें ह्या ब्रह्मांडास विविधता व वैचित्र्य येऊन उत्पत्तिविनाशाचें रहाटगाडग्यें परिभ्रमण करावयास लागतें.

परब्रह्माचें ज्ञानविज्ञान झाल्यावर म्हणजे साक्षात्कार झाल्यानंतर जीवन्मुक्तास 'सृष्टि कां उत्पन्न झाली ?' 'कोणीं उत्पन्न केली ?' 'कशापासून ती निर्माण झाली ?' हे प्रश्न निरर्थक होतात. 'सर्व ब्रह्म आहे' असा साक्षात्कार झालेल्या मुक्त पुरुषास सृष्टि, तिची उत्पत्ति, तिच्या उत्पत्तीचा हेतु इत्यादि कांहीं एक प्रश्न उत्पन्न होत नसून उत्पत्ति, स्थिति, लय नाहीं, अशी एकरसात्मक, अखंड, साक्षीभूत-अशी मात्र-स्थिति असते. उत्पत्तिलय, विषमता, सुखदुःख इत्यादिक त्याला नसतात. त्याची जी ज्ञानदृष्टि असते, त्या दृष्टीला जन्ममरण नसते म्हणजे ह्या मुक्त पुरुषाच्या दृष्टीनें कोणी जन्मास येत नाहीं व कोणी मरतही नाहीं. सारांश ज्ञानदृष्टीच्या मुक्त पुरुषाला सृष्टीसंबंधीं सर्व प्रश्न शून्यार्थक आहेत. परब्रह्माची हीच स्थिति असते म्हणून तें परब्रह्म कर्म-

शून्य, निर्विकार, शुद्ध-बुद्ध, नित्य आणि मुक्त असतें. आणि म्हणूनच तें साक्षित्वानें राहतें असें ९ व १० श्लोकांत म्हटलें आहे. पण आपणासारख्या मर्यादित दृष्टीच्या पुरुषास दिसणारा उत्पत्तिस्थितिलय हा ज्ञानदृष्टीच्या पुरुषास व ब्रह्मास विवर्त रूपी भासतो. हा विवर्त-हा आभास-हा अध्यास, परमार्थतः मिथ्याच होय.

परंतु ज्यांस ज्ञानविज्ञान झालें नाहीं, ज्यांची दृष्टि कमी अधिक मर्यादित आहे, त्यांस वरील प्रश्न अत्यंत महत्वाचे आहेत. जावत्कालपर्यंत जीवांची दृष्टि मर्यादित आहे, तोंपर्यंत पुरुषार्थसिद्धि, तत्संबंधीं साधनें, येथील सृष्टिविषयक चमत्कार यांविषयीं प्रश्न उत्पन्न व्हावयाचे व त्यासंबंधें श्रुति, युक्ति व अनुभव यांस मान्य अशीं उत्तरें देण्याच्या व समजून घेण्याच्या कामी तो पुरुषार्थी जीव प्रयत्नही करावयाचा. असो; तेव्हां त्याच्या दृष्टीस योग्य म्हणजे त्याला समजेल असें उत्तर भगवान् देतात कीं, जीवदृष्टीनें भूतांचा अत्यंत नाश होतो, तो प्रकृतीमधील लय होय. उत्पत्ति ही पुरुषदृष्टीनें परमेश्वराकडून म्हणजे परब्रह्माच्या प्रकटरूपाकडून होत असते. ही उत्पत्ति व हा लय भूतांच्या कर्मानुसार व्हावयाचा असा नियम आहे परब्रह्माच्या साक्षित्वानें, परमेश्वर स्वतः उदासीन राहून, तो प्रकृतीच्या करवीं सृष्टीची उत्पत्ति-स्थितिलयघटना करवितो. ही घटना व विघटना भूतांच्या कर्मानुसार होते. कर्म केव्हां उत्पन्न झालें म्हणजे सृष्टि केव्हां उत्पन्न झाली हें किंवा कर्म म्हणजे सृष्टि केव्हां संपेल हें कोणास केव्हांही सांगतां येणार नाहीं. फक्त कर्मानुसार सृष्टीचे व्यापार चालतात, हें सांगतां येतें. एवंच या सृष्टीला अस्तित्व येतें तें व लय होतो तो भूतांच्या कर्मानुसार होय. सारांश परिच्छिन्न दृष्टीनें पाहिलें असतां खालील सिद्धांत सत्य आहेतसें भासेल. (१) ही सृष्टि अनादि व अनंत आहे; (२) या सृष्टीचा आरंभ किंवा लय ह्या दोन्ही गोष्टींचें ज्ञान परिच्छिन्न बुद्धीच्या बाहेर आहे. तथापि सृष्टींतील नियमांवरून असें दिसतें कीं, येथें रात्रंदिवस घडामोड चाललेली आहे. म्हणजे कोणत्याही परिच्छिन्न वस्तूला (आकाश आणि काल अपवाद आहेत असें नैयायिकांकरितां म्हणावयाचें !!) कायमचें असें स्वरूप नाहीं. स्वरूपामध्यें घडोघडीं, क्षणोक्षणीं बदल होत आहे. कोणत्याही वस्तूचा अत्यंत नाश होत नाहीं, केवळ तिच्या स्वरूपामध्यें कमी अधिक फरक होत असतो. बुद्ध्यादिकांस ओळखतां येत नाहीं असा फरक झाला म्हणजे आपण त्यास मृत्यु (नाश) म्हणतों व दृश्य असें स्वरूप बुद्ध्यादिक इन्द्रियांस गोचर झालें म्हणजे जन्म झाला असें म्हणतो. सारांश जन्म म्हणजे प्रथम उत्पत्ति नव्हे व मरण म्हणजे शेवटचा नाशही नव्हे. व्यवहाराच्याही तात्त्विक दृष्टीनें म्हणजे परिच्छिन्न शास्त्रीय दृष्टीलासुद्धां जन्मणारी व मरणारी वस्तु दिसत नाहीं. ध्यानांत ठेवण्यासारखा शास्त्रीय सिद्धांत हा कीं, प्रकृति नित्य आहे परंतु विकार्य आहे. ही विकार्यता चैतन्याच्या साक्षित्वानें होणाऱ्या कर्मानें उत्पन्न किंवा नष्ट होते; म्हणजे या चंचल स्वरूपामध्यें होणारा फरक चैतन्यसाक्षित्वानें होतोसा दिसतो, परंतु वास्तविकतः तो फरक प्रकृतीच्या संगतीनें अभि-

मान धरून चालणाऱ्या परिच्छिन्न चैतन्याकरवीं होतो. **सर्वांचा अध्यक्ष परमेश्वर आहे.** ( ३ ) उघड रीतीनें बोलावयाचें झालें म्हणजे परमेश्वराच्या सान्निध्यानें विश्वघटना होत असून जीव–शिव हे कांहींसें निमित्तकारण व कांहींसें उपादान कारण आहेत. परिच्छिन्न दृष्टीला वासना व अभिमान असतात. ही दुक्कल कमी कमी होत जाऊन जीवांची गति पुरुषार्थाकडे लागली, अथवा विषयांचा कंटाळा येऊन तद्विषयीं वैराग्य उत्पन्न व्हावयास सुरुवात झाली, म्हणजे शारीरिक सुखापेक्षां मानसिक सुख जास्त मोलवान वाटूं लागतें, नंतर सत्ता, कीर्ति, इत्यादि मिळवावी असा अभिनिवेश उत्पन्न होतो; पुढें स्वकल्याणाचा मोर्चा मागें सरकून कुटुंबकल्याण, लोककल्याण, विश्वकल्याण, इत्यादि पुरुषार्थ साध्य करावे असें वाटून तत्प्रीत्यर्थ प्रयत्न सुरू होतात; ह्यानंतर वासना व अभिमान सर्वथा विगलित होऊन कर्तव्य दृष्टीनें कर्म होतें. ही अशी आपली मानसिक प्रगति चालली असतां प्रथम मूर्तस्वरूपी देवाची, पुढें, कल्याणगुणगणमंडित ईश्वराची व नंतर आत्मस्वरूपी परमात्म्याची निःसीम, निष्काम भक्ति होत असते. या भक्तीच्या उन्नतावस्थेत प्रथमतः **जग खरें व स्वतंत्र आहे,** नंतर तें **ईश्वराधीन आहे,** पुढे **ईश्वरच सर्वथा जग** आहे आणि भक्तीच्या पराकाष्ठावस्थेंत **ईश्वरच सर्व आहे** आणि शेवटी **सर्व एकच आहे,** असें भिन्न भिन्न परंतु उत्कृष्ट, उत्कृष्टतर, उत्कृष्टतम भक्तिस्वरूप उज्वलित होतें. सारांश मर्यादित दृष्टीच्या वेळीं ‘ जगत् ’ सत्य आहे व ‘ मी ’ सत्य आहें असा भास असून आपण जगतांतील विषयांचा उपभोग घ्यावा अशा प्रकारचा पुरुषार्थ असतो. या पुरुषार्थानें जन्ममरण चुकत नाहीं. पुढें मानवी शास्त्रपद्धतीनें जगताचें अनंतत्व सिद्ध होतें व धर्मदृष्टीनें ईश्वर या जगताचा नियामक असून जीवाच्या कर्मानुसार सुखदुःखांचा धाता आहे, असें समजतें. जन्ममरण येथेंही चुकत नाहीं; जगांत ईश्वर आहे व ईश्वरांत जग आहे या धार्मिक व तात्विक दृष्टानीं कांहींशी शांति मिळते; परंतु संसार मरत नाहीं; इतकें झाल्यावर पुढें भक्तीची पराकाष्ठा होऊन ईश्वराचा मी निष्काम सेवक, ( २ ) ईश्वराचा निरपेक्ष मित्र, ( ३ ) ईश्वराचें मी परिछिन्न स्वरूप व ( ४ ) ईश्वर आणि मी एकच अशा क्रमानें आत्मसाक्षात्कार व ब्रह्मसाक्षात्कार होऊन एकरसात्मकता बनली म्हणजे उत्तम ज्ञानविज्ञान होऊन प्राणी मुक्त होतो. एवंच परमेश्वराची भक्ति हें मुक्तीच्या साधनांपैकीं उत्तम साधन आहे. ब्रह्मसाक्षात्कार अद्वैतज्ञानपूर्वक अखंड भक्तीनेंच साध्य व्हावयाचा आहे.

परब्रह्माविषयींचा विचार तूर्त एका बाजूस ठेऊन केवळ परमेश्वराचाच विचार केल्यास परिच्छिन्न दृष्टीनें विश्वाचा उत्पत्तिकर्ता व संहारकर्ता तोच आहे असें स्पष्ट होतें. येथील जन्ममरणापासून किंवा सुखदुःखापासून सुटका करून घ्यावयाची असेल तर तो परमेश्वर अमूर्त, प्रकृतीचा स्वामी, वासनाशून्य व अभिमानरहित, सर्वसाक्षी, सर्वव्यापी, सर्वशक्ति, इत्यादि अनंत गुणांनीं मंडित आहे असा विश्वास उत्पन्न करून घेतला पाहिजे, आणि येथील क्षणिक सुखदुःखांचा त्याग करून निष्काम-

मनानें त्याची आराधनाही कर्तव्यतत्परता-बुद्धीनें केली पाहिजे. पण अज्ञानी लोक ही आराधना न करितां परमेश्वर आपल्यासारखाच देहाश्रित आहे, असें मानितात व त्याचें आर्जव केलें असतां तो स्तुतिवश होऊन भाळण्यासारखा आहे असें समजतात. अशा प्रकारच्या मानवीकल्पनांनीं ईश्वरी मूर्ति घडविली म्हणजे कांहीं थोडेंबहुत कल्याण होईल हें खरें, पण पुरुषार्थसिद्धि होणार नाहीं. पुरुषार्थ सिद्धीला निष्काम, निर्लोभ, स्वसुखाभिलाषविरहित अशा प्रकारची आराधना अखंड असली पाहिजे. सकामभक्ति विषयसुख देईल; व विषयसुखापासून उत्पन्न होणारी क्षणिक शांतिही देईल; पण निर्विषय सुख देण्याचें सामर्थ्य सकामभक्तीला नाहीं. सकामभक्तीच्या पाठीमागें लागलेले लोक स्वसुखाचे दास होत. आणि स्वसुखदास म्हणजेच राक्षस किंवा असुर होत. 'मला विषयसुख हवें' अशी वासना जोंपर्यंत प्रबल आहे (या वासनेंत संपत्तिसुख, स्त्रीसुख, आरोग्यसुख, पुत्रसुख, कीर्तिसुख, सत्तासुख, स्वातंत्र्यसुख इत्यादि सर्व वैषयिक सुखांचा अंतर्भाव होतो) तोंपर्यंत राक्षसी अवतार आहे, कलियुग आहे, असें समजावयाचें. सारांश, 'स्वतःचें सुख' हा जोपर्यंत मानवी प्रयत्नांचा पुरुषार्थ आहे, व तत्प्रीत्यर्थ जीवंत राहणारी वासना व अभिमान जोरदार आहेत, तोंपर्यंत ते ते मानव तमोगुणाश्रित किंवा रजोगुणान्वित आहेत असें समजावयाचें आणि तोंपर्यंत कलियुगाचा प्रभाव बलवंत आहे असें ठरवावयाचें. हे ११ व १२ श्लोकांवरून उत्पन्न होणारे विचार आहेत. अधिकारानुसार वासनेचा व अभिमानाचा त्याग करावयाचा व परमेश्वराची भक्ति करावयाची ती 'मला अमुक दे, तमुक नको' ह्या सकाम बुद्धीची नसून 'माझें कर्तव्य निष्कामत्वानें होईल' अशा प्रार्थनापुरःसरत्वानें व्हावयाची, हें तत्त्व व हें रहस्य मनांत बिंबेल तर पुरुषार्थ-साधनाच्या मार्गाला आपण येऊन भिडलों असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### शहाणे लोक.

अधिकारानुसार वासनात्याग होऊं लागला व अभिमानशून्यता येऊं लागली म्हणजे क्रमाक्रमानें परमेश्वराचें कीर्तन, परमेश्वराचें ध्यान, त्याविषयीं नम्रबुद्धि, व त्याचें अखंड स्मरण इत्यादि कर्तव्यें निष्कामत्वानें होऊं लागतात. "सर्व 'सृष्टीचा चालक तो आहे, तो स्वतः निर्विकार आहे, जगताची घडामोड त्याच्या सत्तेनें होत असून विश्वव्यवस्थेंत मी निमित्तमात्र आहे. स्वतःसंबंधें परमेश्वराचें निष्काम भजनपूजन करणें म्हणजे निर्लोभ मनानें प्राप्त झालेलें शास्त्रविहित कर्तव्य निर्लोभबुद्धीनें करणें, निदान तसा प्रयत्न करणें, एवढें कायतें माझ्या स्वाधीन आहे; तो परमेश्वर सर्व कल्याणगुणगणमंडित असून त्याचें भजनपूजन अनन्यभावानें अखंड केलें तरच त्याची प्राप्ति होऊन माझी सुटका व्हावयाची आहे, अशा प्रकारची सात्त्विक वृत्ति झाली असतां तुकारामादिक महासाधूंप्रमाणें आपण परमेश्वरी गुणांचें कीर्तन करूं, त्यास अनन्यभावानें आळवूं, त्याचें अनन्यध्यान करूं आणि निर्लोभ चित्ताचे होऊं."

ज्ञानमार्गे बुद्धस्थिर झाल्यानंतर सर्वत्र ईश्वर भरला आहे, सर्व कर्ताकरविता तोच आहे, सृष्टिनियामक तोच आहे, आपल्यास तारणारा तोच आहे, आपले आईबाप, आपले इष्टमित्र तोच असून आपल्यास शरणस्थान तोच आहे, आपला खरा बेली तोच आहे व आपल्यास जो पुरुषार्थ साधावयाचा आहे तोही तोच आहे; सारांश परमेश्वरा-व्यतिरिक्त कांहीं नाहीं, सृष्टि तो, सृष्टिनियामक तो, उपास्य तो, उपासक तो, उपासना तो आणि उपास्य द्रव्येंही तोच, अशी सर्वत्र ईश्वरीभावना होऊन आपल्या हातून जें काम कर्तव्य होत जाईल तें परमेश्वररूपानेंच होत जाईल, अशी अखंड भक्ति एकनिष्ठ मनानें झाली, वेदांतश्रवण, गुरूचा अनुग्रह आणि परमेश्वरी कृपा झाली म्हणजे साक्षात्काराचा अधिकार आपल्यास प्राप्त होतो. हा अधिकार प्राप्त झाला, पूर्ण अद्वैत स्थिति विचारांत, उच्चारांत व आचारांत बाणली म्हणजे उपास्य स्वरूप व उपासक स्वरूप हीं वस्तुतः एकच आहेत, असें ज्ञान होऊन पुढें साक्षात्कार होतो.

सगुणभक्तीचें महात्म्य या प्रकारचें आहे. हिंदुस्तानांतील आर्यलोक अथवा स्वकर्मानें सर्वांच्या अनादरास पात्र झालेले हिंदुलोक, अनेकदेववादी आहेत, असा त्यांच्या संबंधानें एक अपवाद उत्पन्न झाला आहे. ह्या अपवादांत जितका सत्याचा अंश आहे, तितकेच किंबहुना त्यापेक्षां जास्ती असत्य चे अंश आहेत. हिंदुस्तानांतील आर्य लोक अनेक देवांस एककालीच सर्वेश्वरत्व देत होते, असा कोणताही काल अथवा कोणताही भक्त दाखवितां येणें शक्य नाहीं. कोणतेंही उपनिषद् घ्या, भग-वद्गीता घ्या—फार लांब कशाला—यच्चावत् सर्व पुराणें घ्या, त्यांत अनेक देव-तांचें एककालीन सर्वेश्वरत्व कोठेंही सांपडावयाचें नाहीं. कोठें शंकराची कोठें देवीची, कोठें गणपतीची तर कोठें विष्णूची, रामाची, कृष्णाची अथवा विठ्ठलाची व कोठें सूर्याची, सर्वेश्वरत्वभावानें स्तुति केलेली आढळेल हें खरें; पण ही सर्वेश्वराचीं विशे-षणें सामान्यतः एकार्थक असतात, एकच तत्त्वप्रणालिका सांगतात, एकच प्रकारचें कर्म -निष्कामकर्म-विहित करितात, असें आढळून येईल. सर्वांस निर्गुणतत्त्व अथवा निर्धर्मक ब्रह्म संमत असतें, असाच प्रकार दिसेल. ह्या अनेक व्यक्ति नव्हेत, तर एकच पदा-र्थाचीं अनेक नांवें आहेत. एकाच सर्वेश्वर परमात्म्याला अनेक भक्तांनीं आळविलें तर ते जसे निरनिराळया स्वरूपानें त्यास हांका मारतील, त्याचप्रमाणें वरील प्रकार आहे. सर्वेश्वरास कोणी शंकर ( कल्याणकर्ता ), कोणी देवी ( सर्व शक्ति ), कोणी गणपति ( सर्वनियंता ), कोणी विष्णु (सर्वव्यापी), व कोणी सूर्य ( जगावभासक ) या नांवांनीं आळविलें म्हणून ते काय निर-निराळे ईश्वर झाले ? इंग्रज लोक घोड्यास Horse म्हणतात व संस्कृत लोक अश्व म्हणतात; म्हणून घोडा, Horse व अश्व असे तीन निराळे प्राणी होतात, असें म्हणता ? महाराजा असें आपल्यास म्हणतांच यावयाचें नाहीं. सर्व पुराणग्रंथ वाचून जर कांहींएक निश्चित विधान करावयाचें असेल तर तें हेंच कीं, सर्वत्र श्रुत्यनुसरण्यार ' एको देवः सर्व-भूतेषु गूढः ' याचेंच विस्तारपूर्वक स्पष्टीकरण सांपडेल. ' को अद्धा वेद। कुत इयं विसृष्टिः।

इत्यादि प्रश्न यज्ञकालानंतर पण ख्रिस्तीशकाच्या हजारों वर्षे पूर्वी उत्पन्न झाले व त्यांस उपनिषदांमध्यें समर्पक उत्तरेंही मिळालीं. 'एकच देव आहे' हे उपनिषदांत नित्यशः गृहीत केलेलें आहे यज्ञकालांतील इंद्र, वरुण, सोम इत्यादि देवांस उपनिषत्कालांत देवतांचें स्वरूप येऊन त्या प्रत्येकाचीं कार्येंही नियमित झालीं. यज्ञकालांत सुद्धां 'यज्ञो हवै विष्णुः' हें तत्त्व प्रकटच होतें. सारांश सर्वेश्वर एक आणि निरनिराळीं कार्यें करण्यासाठीं निरनिराळ्या—पण सर्वेश्वराच्या आधीन असणाऱ्या—देवता अनेक, हा आर्यधर्मप्रचार आहे. देवास 'ईश्वर' व देवतांस 'देवदूत,' असें सेमेटिकधर्म म्हणतात; पण तात्पर्य एकच आहे. आतां आमच्या धर्मसंस्थापकांनीं एक बरीक केलें नाहीं. तें हें कीं, सर्व वर्णांच्या व सर्वाश्रमी सर्व लोकांची 'पलटणी सेना' करून तेथील कवायतीप्रमाणें एकच 'हुडेलहप्पो' पूजा सांगितली नाहीं! त्या बिचाऱ्यास काय ठाऊक कीं ख्रिस्ती शकाच्या एकोणिसाव्या व विसाव्या सुधारकी शतकांत लष्करी कायद्याची बजावणी होऊन 'सर्वांनीं एकाच तऱ्हेनें, एकाच वेळीं, एकाच देवाचें आराधन करावयाचे हुकूम सुटावयाचे आहेत म्हणून?' सामान्यतः मनुष्यांच्या प्रकृति निराळ्या असतात, व प्रकृतिस्वभावाप्रमाणें, बुद्धि व श्रद्धा यांच्या प्रमाणानें, प्रत्येकास उन्नतीचा मार्ग—एकाच अर्थाचा पण निराळ्या स्वरूपाचा—सांगितला पाहिजे; असें त्यांस वाटलें. ही बरीक त्यांनीं मोठी चूक केली! असो, आतां काय त्याचें? झाली, गोष्ट होऊन गेली!! तथापि तात्पर्य एकच कीं, हिंदुस्थानवासी एकेश्वर भक्त होते व कांहीं अंशीं आहेतही!

आतां, वरील अपवादांत सत्याचा अंश आहे तो अलीकडे नादान झालेल्या आमच्या आम्हींच आणलेला आहे. तो कसा त्याचा विस्तार आणखी एखादे वेळीं करितों.

सगुणानंतर निर्गुणज्ञान वेदांतविचारानें कसें साध्य होतें हें मागें सांगितलेंच आहे. असो; तेव्हां आपला अधिकार निरहंकारपणानें समजून घ्यावयाचा हें मोक्षार्थी पुरुषाचें पहिलें कर्तव्य आहे. नंतर वासनात्याग (वैराग्य) अहंकारशून्यता (कर्तृत्वाचा अभिमान नसणें) ह्या पायऱ्या चढून तत्पदाचा म्हणजे विश्वाचा व विश्वनियामकाचा विचार शास्त्रीयपद्धतीनें करावा. हा विचार शास्त्रशुद्धमार्गानें करीत असतां ईश्वराचें अखंड अस्तित्व सर्वत्र दिसूं लागेल, ईश्वराचें गुणानंत्य प्रकट होईल, पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन तिचा उत्कर्ष होईल आणि नित्य व एकनिष्ठ ध्यानाचा अभ्यास सुकर होऊन बुद्धीला उत्तम संस्कार मिळतील. पुढें वेदांतविचार सुरू केला म्हणजे द्वैतभावना सर्वथा नष्ट होऊन अद्वैत बाणेल. हें या अध्यायांतील भक्तीचें रहस्य आहे.

## सकामभक्ति.

४ पण सामान्यतः बहुतेक जीवांस वरील तत्त्व समजण्याचा अधिकार प्राप्त झालेला नसतो, हें आतांच वर सुचविलें आहे. उघडच आहे कीं, सृष्टीच्या उत्पत्तिकाला-

पासून आपल्या जीवाबरोबर साहचर्यानें वाढलेल्या वासना व मित्रत्वानें आपली पाठ न सोडणारा अहंकार या उभयतांची व आपली ताडातोड करण्याचें काम पुष्कळांच्या हातून होण्यासारखें नसल्यामुळें पूर्ण निष्कामभक्तीचें रहस्य फारशा लोकांस समजत नाहीं. प्रकृतीच्याच साम्राज्यांत राहून त्या सर्वशक्ति व सर्वगामी प्रकृतीच्या विरुद्ध बंड करावयाचें व त्यांत विजयसिद्धि संपादन करावयाची, तिला आपल्या स्वाधीन करून घेऊन त्या जड प्रकृतीला चैतन्यस्वरूप द्यावयाचें हें सामान्य वीरांचें काम नव्हे: शिवाय, स्वार्थत्यागाच्या शिक्षेमध्यें उत्तम निष्णात झालेल्या म्हणजे कसलेल्या वीरांसही अनेक जन्मपर्यंत अखंड श्रम करावे लागतात, तेव्हां वरील गोष्ट साध्य होते! तेव्हां अर्थातच असल्या घनघोर संग्रामाचें स्थल पाहण्याची इच्छा आपल्यासारखे सामान्य लोक करीत नाहींत; तर मग, रणस्तंभाजवळ छातीनें उभें राहून अद्वैताचा शुभ्र व निर्मळ झेंडा सांभाळण्याची गोष्ट फार लांब, ह्याची वार्ताच नको!! नुसता कामाचा हल्ला आल्याबरोबर दांतीं तृण धरावें हें मात्र आम्हांस साहजिक होय. आमच्यासारख्यांनीं स्वार्थाची मर्यादा थोडीशी विस्तृत केली, वासनेचा थोडासा त्याग केला, अभिमानास थोडेंसें शून्यत्व आणिलें म्हणजे मिळविली! सारांश, प्रकृति नामक शत्रूस तोंड न दाखवितां व तिच्या समोर उभें न राहतां कोठें तिचें एखादें घोडें पळीव, एखादा लुंगा सुंगा शिपाई धरून आण, तिची दाणावैरण बंद कर, अशा प्रकारची गनीमी पद्धत चालविली, तर भाग्य म्हणावयाचें! हें करणें तर फारसें मोलाचें नव्हेना? पण आम्ही असले शेंदाड शिपाई आहोंत कीं, इवलासा स्वार्थत्याग केल्याबरोबर तट्ट फुगून जाऊन 'आम्ही यंव केलें, त्यंव केलें' अशा फुशारक्या मारावयास लागतों आणि जो अभिमानत्याग आम्हीं केला असें म्हणतों त्याच्या अनंतपट अभिमानाचें ओझें आपल्या खांद्यावर वाहावयास लागतों! इतकेंच नव्हे तर बक्षिसेंही मागावयास लागतों! याला कां स्वार्थत्याग, कां विषयवैराग्य, कां अभिमानशून्यता म्हणावयाचें?

पण असल्या सकाम भक्तीबद्दलही ईश्वराच्या राज्यांत बक्षिसें मिळतात! प्रकृतीला थोडासा धक्का देणाऱ्याला सुद्धां ईश्वराच्या चैतन्यपूर्ण साम्राज्यांत बक्षिस मिळतें. सकाम यज्ञयाग करणारे लोक याच पंथांतील होत. 'आजची पोळी उद्यां खाऊं' असें म्हणणारांपैकीं हे लोक होत. यांच्या या मृत्युलोकांतील यज्ञयागांनीं ( स्वार्थत्यागानें ) पुष्कळ कार्यसिद्धि–वास्तविक पाहिलें असतां–व्हावयाची. पण 'आम्हांस स्वर्गसुख हवें, पुत्र हवा, द्रव्य हवें, कीर्ति हवी,' अशा मागण्याच्या वजनांनीं हा स्वार्थत्याग दडपून जातो. असो; ह्या पुरुषांस ह्यांच्या क्षणिक विषयवैराग्याबद्दल बक्षीस मिळते; पण काय? तें अर्थातच कालभंगुर असतें. जितकी पुण्याई असेल तितक्या कालपर्यंत सुखोपभोग घेतला म्हणजे हे जीव पुनः जन्ममरणाच्या चक्रांत येऊन पडतात! एवंच, वासना आहे, अहंकार आहे, तोंपर्यंत म्हणजे वासनेसहित व अभिमानासहित असणाऱ्या जीवांच्या हातून झालेला स्वार्थत्याग आत्मिक

उन्नतीच्या अंमलाही उपयोगी पडत नाहीं. विषयाची आशा केली व तो मिळण्यासाठीं योग्य प्रयत्न केले तर तो विषय प्राप्त होईल हें खरें; पण विषय हा चैतन्यात्मक नाहीं म्हणून अनित्य आहे; अतएव तो नष्ट होतो आणि नष्ट झाला म्हणजे दुःखप्राप्ति होते. तात्पर्य, **विषयाची आराधना** जोंपर्यंत आहे तोंपर्यंत चिरकाल टिकणारें अखंड स्वास्थ्य मिळणें नाहीं. खरेंच आहेः अग्नीचा उपशम व्हावा या हेतूनें आपण जर त्यांत तेल-तूप ओतूं लागलों तर न विझतां तोच अग्नि जास्त प्रज्वलित होतो! त्याप्रमाणें शांति मिळण्यासाठीं जर आपण विषयोपभोगाची योजना केली तर शांति न मिळतां उलट उपभोगतृष्णा मात्र वाढण्याचा संभव,–नव्हे! निश्चितपणा,–आहे. म्हणून भगवंतांनीं २१ व्या श्लोकांत सांगितलें आहे कीं, 'विषयेच्छा धारण करणाऱ्या लोकांनीं जरी वेदविहित सर्व कर्में केलीं किंवा आशापूर्णचित्तानें पुरुषार्थाचा मार्ग शोधिला, तरी मुख्य फल जें शांति तें न मिळतां जन्ममरणाची गोणी मात्र या कामुक भक्तांच्या पाठीवर बसेल. उघडच आहेः काम म्हणजे विषयेच्छा होय. आपण देहमर्यादितच आहों अशी परिच्छिन्न कल्पना आपली असली, असा आपला निश्चय असला, म्हणजे आपण अपूर्ण आहों, म्हणून आपल्यास हें हवें, तें हवें, अशी इच्छा उत्पन्न होऊन तत्प्रीत्यर्थ आपले प्रयत्न सुरू होतात. प्रयत्नांतीं **फल मिळालें तर सुख होतें; यश नाहीं मिळालें तर दुःख होतें.** ही दोन्हीं कालभंगुरच असतात. म्हणजे सुख जातें व दुःख येतें. सुख गेलें म्हणजे व दुःख आलें म्हणजे दुःख होतें. सुख आलें व दुःख गेलें म्हणजे सुख होतें. पण हीं दोन्हीं क्षणभंगुर–कालभंगुर–आहेत. तथापि या दोन्ही स्थितींत अभिमान कायम असतो म्हणून सुखाचा वियोग आणि दुःखाचा संयोग हे दोन्ही तळमळ उत्पन्न करितात; अर्थात् शांति नाहींशी होते. तेव्हां मिळविलेल्या फलापासून उत्पन्न होणारें सुख, शांति देणारें नाहीं; शांति हवी असेल 'तर विषय अनित्य आहेत; विषयोपभोगानें देहाची, इन्द्रियांची मनाची व बुद्धीची तृप्ति न होतां तळमळ वाढते; जीवाच्या अध्यात्मिक उन्नतीचें कार्य होत नाहीं;म्हणून विषयोपभोग नको' अशा प्रकारचें वैराग्य उत्पन्न होऊन तें स्थिर झालें पाहिजे. शांति हवी असेल तर 'मी पूर्ण आहें किंवा असलों पाहिजे; मी कर्ता व भोक्ता नाहीं किंवा नसलों पाहिजे; मी परिच्छिन्न नाहीं किंवा नसलों पाहिजे; सारांश मी नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त आहें, किंवा असलों पाहिजे' अशा तऱ्हेचा निश्चय अध्यात्मिक श्रवणमननानें व निदिध्यासानें साध्य होईल असा प्रयत्न कर्तव्यतत्परतेनें केला पाहिजे. आपली वासना मोडण्यासाठीं परहिताच्या पाठीमागें निरभिलाषबुद्धीनें लागलें पाहिजे. अहंकार नष्ट करण्यासाठीं विश्वाचा, विश्वांतील घडामोडींचा, विश्वनियमांचा, व विश्वनियामकाचा शाश्वत: विचार करून 'विषयासंबंधानें आपल्यास बिलकूल कर्तुं अकर्तुं–सामर्थ्य नाहीं, ह्या सृष्टिव्यवस्थेंत आपण केवळ पंगु आहोंत, निमित्तमात्र आहोंत, सर्व सामर्थ्य एका परमेश्वरास मात्र आहे, परमेश्वरी कृपा होईल तसतसा मीही प्रकृतीचा स्वामी होत जाईन,' असा निश्चय ज्ञानविज्ञानानें करून घेतला पाहिजे. स्वेतरांचें खरें कल्याण करणें व कल्याण करीत असतां अहंकाराचा व सिद्धिजन्य सुखाचा आणि असिद्धिमूलक दुःखाचा

त्याग केला पाहिजे. हें ईश्वराच्या भक्तीचें एक अंग आहे. सृष्टिनियम अबाधित आहेत, सृष्टीची उत्पत्ति जीवांच्या उन्नतीसाठीं दयाळु परमेश्वरानें केली आहे व दयाळु परमेश्वराचें अखंड ध्यान भक्तिपूर्वक केल्याशिवाय आपलें दुर्बलत्व, आपलें किंचिज्ञत्व आपल्यास स्पष्ट व्हावयाचें नाहीं व हे स्पष्ट झाल्याशिवाय ईश्वराविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होणार नाहीं. ही पूज्यबुद्धि पराकाष्ठेला पोहोंचली म्हणजे वासना निर्मूळ होते व अहंकारही सकारण नष्ट होतो. पुढें 'ईश्वर म्हणजेच मी' असा ज्ञानविज्ञानासह निश्चय होऊन हा पुरुष सर्वथा मुक्त होतो. एवंच निष्कामता, अहंकारत्याग, व ईश्वरज्ञान हीं पूर्ण झाली म्हणजे सकामत्व व सकाम भक्ति संपतात आणि तत्त्वाचें पूर्णज्ञान आणि अखंड उपासनेनंतर अखंड अद्वैतनिश्चय हीं मुक्तीचीं साधनें लाभलीं म्हणजे जीव मुक्त होतो.

## परमेश्वराची निष्काम भक्ति.

५ हा बोध ज्यांस झाला तेच अनन्यभक्त होत. हेच जीवन्मुक्त पुरुष होत. यांचें सर्व योगक्षेम भगवान् चालवितात हे आतां सांगण्याचेंसुद्धां कारण नाहीं. (१) कारण हे स्वतःच परमेश्वर-स्वरूपी झालेले असतात; (२) त्यांस वासनारूपानें किंवा अहंकाररूपानें कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नसते; (३) त्यांस सदासर्वदा समाधान, खरें समाधान, असतें. सारांश त्यांचा देहच चिन्मय बनून जातो व त्यांचें अस्तित्व केवळ जगदुद्धारासाठीं व लोकसंग्रहासाठीं असतें. अद्वैतज्ञानी भक्त ते हेच होत.

## अन्य देवांची निष्काम भक्ति.

६ आतां कांहीं लोक परमेश्वराचें आराधन न करितां त्याच्या अंगभूत असणाऱ्या इतर देवदेवतांचें श्रद्धेनें आराधन करितात, तें ठीक नाहीं, तरी फारसें वाईटही नाहीं; कारण हें आराधन कोणत्या तरी ज्ञानशाखेचें किंवा सद्गुणशाखेचें असतें. येथें सर्वगुणसंपन्नतेचें व ज्ञानसर्वस्वाचें आराधन नसतें म्हणून मात्र हा आराधनविधि अशास्त्र होतो. सर्व ज्ञानशाखांची व सर्व मंगल गुणशाखांची एकवाक्यता करून नंतर श्रद्धापुरःसर सच्चिदानंदाचें आराधन अखंड करणें व सर्व सत्कर्मांचा भोक्ता व स्वामी परमेश्वर आहे, असें निश्चयानें समजून त्यास आपलें सर्वस्व अर्पण करणें ही खरी भक्ति आहे. आतां एकच ज्ञानशाखेचें अगर सद्गुणाचें भजन-पूजन केलें तर तें दुसऱ्या सद्गुणांस व ज्ञानशाखेस प्रतिकूल होण्याचा संभव असतो म्हणून गौण देवदेवतांचें आराधन शास्त्रनिषिद्ध असतें. शिवाय, या गौण देवता प्रसन्न झाल्यातरी म्हणजे देव, पितर किंवा भूतें प्रसन्न झालीं तरी आत्मोन्नती कितीकशी होणार? देव देवत्व, पितर पितृत्व व भूतें भूतत्व देतील; परंतु मोक्ष देणें यांचे स्वाधीन नाहीं. स्वतः या देवताच मुक्त नाहींत, तर त्या मोक्ष देतील

शकणार नाहींत हें उघड आहे. एवंच परमेश्वराव्यतिरिक्त इतर देवतांचें भजनपूजन लोकोपकारक व आत्मोद्धारक होत नाहीं. तथापि अज्ञानी जीवाला श्रेष्ठ मार्ग दाखविणारें हें साधन आहे. हें प्रथमतः अंगीकृत केलें व कारण संपल्यावर, ज्ञान वाढल्यावर, हें सोडून देऊन श्रेष्ठतर साधन अंगीकृत केलें तर मोक्षमार्ग कालांतरानें तरी सांपडेल.

पण आजमितीला आमच्या लोकांत परस्परविघातक अशा एक एक गुणांचें म्हणजे परिछिन्न देवतांचें आराधन श्रद्धापुरःसर नव्हे तर कामपुरःसर होत आहे, विषयोपभोगाच्या लालसेनें होत आहे, हें अत्यंत उद्वेगजनक होय. सद्यःकालीं पारमार्थिक व व्यावहारिक ज्ञानविज्ञानाचा प्रायः लोपच झाला असल्यामुळें सामान्यतः सर्वत्र अश्रद्धा व सर्वत्र विलक्षण भोळेपणा माजला आहे. पारमार्थिक आत्मज्ञान व्यावहारिक ज्ञानविज्ञानाचें अधिष्ठान आहे व व्यावहारिक ज्ञानविज्ञान हें आत्मज्ञानविज्ञानाच्या तळमजल्यावर नेणारा सोपानमार्ग आहे, हें तत्त्व आपले लोक सामान्यतः विसरल्यामुळें व्यवहार व परमार्थ यांच्या नित्यसाहचर्याचा घटस्फोट झाला आहे. खरे ज्ञानी रानावनांत हिंडतात! कारण त्यांचा उपदेश ऐकण्यास संसारी लोक तत्पर नाहींत. यामुळें आत्मज्ञान हेंही एकदेशी होऊन 'आत्मज्ञान म्हणजे स्वतःच्या देहांत अडकवून राहिल्यासारखा दिसणारा जीवात्मा याची सुटका होय.'! असा परिछिन्न, संकुचित अर्थ सर्वव्यापी ज्ञानास आला; अतएव संसारी लोकांस व विशेषतः आलीकडच्या अश्रद्धाळु संसारी लोकांस आत्मज्ञानाचें महत्व समजत नाहीं. अर्थातच संसारांत राहून जो काय परमार्थ साधणार, त्यालाही 'खो' मिळाला आणि 'मायबापें सांभाळिती। पोटाकारणें पाळिती।' अशी तुकाराममहाराजांची अथवा 'रांडापोरें, वंचक चोरें' अशी जोशीबोवांची वाणी प्रकट होऊन संसारांतही पितृसेवनानें कृतज्ञताबुद्धि अगर पुत्रपालनानें अनुकंपाबुद्धि जागृत होणार तोही भाग नाहींसा होत चालला; मग श्राद्धपक्षाची अगर यज्ञदानाची गोष्ट लांबच राहिली. शाळांतील पुस्तकांतून सुद्धां 'जर आपण **वडिलांची मर्यादा ठेविली तरी** बाळ। **तैसी पुढेंही ठेविति** ...। अशा कामवृद्धि करणाऱ्या आर्या प्रगट होतात! पुनः, संसारांत, आलीकडील 'देवाणी घेवाणी संसारांत,' व्यापारी संसारांत, निसर्गतःच दुःखातिशय असल्या कारणानें या दुःखांचा शेवट करण्याकरितां किंवा आपलें विषयवैभव वाढविण्याकरितां देवदेवतार्जनाचा, वेदांतचर्चेचा, उपद्व्याप समारंभानें करूं लागतों! आपल्यास आत्मोन्नतीची खरी श्रद्धा तर नाहींच नाहीं. पण आमचे गुरुजीही वेदांत बोलणारे पण संसारी पुरुषांसही संसाराचा वीट येईल इतकें नीच वर्तन करणारे, असतात. तात्पर्य गुरुजींचा, आत्मज्ञान्यांचा व सर्व संसारी पुरुषांचा सर्व खटाटोप अज्ञानप्रेरित भोगसुख वाढविण्याकडे चालला आहे! ज्ञानाशिवाय हा सर्व चाललेला प्रयत्न विफल होतो, इतकेंच नव्हे, तर ज्ञानाभावीं नसतीं दुःखें व नसते भोग आमच्या मागें मात्र लागत आहेत! आमच्या जवळ ज्ञानभांडार असूनही आमची त्यावर श्रद्धा नाहीं, यामुळें तें असून नसून आम्हांस सारखेंच झालें आहे. ज्ञानच नाहीं, तेव्हां विषयदुःखाच्या प्रशमनार्थ व विषयसुखाच्या

पोषणार्थ आपण वाटेल त्याच्यावर विश्वास ठेवूं लागतो! याचेंच नांव भोळेपणा होय. ज्ञानाविषयीं अश्रद्धा आणि विषयोपभोगांविषयीं भोळेपणा, हे दोन राक्षस आमच्या मागें लागले आहेत. यांचा वध करावयास एकच उपाय आहे आणि तो म्हणजे ज्ञानपूर्वक व श्रद्धापूर्वक परमेश्वराचें **निष्काम भजन** होय. आईचें मुलांसंबंधें जसें निष्काम प्रेम असतें तसें सर्वांवर यथाशक्ति प्रेम करावयास शिकावयाचें आणि सत्पुत्राची आईबापांवर त्यांच्या वृद्धापकालीं जशी भक्ति असते, निदान असावी, तशी जगत्पिता जो परमेश्वर यावर भक्ति असावी, हाच आत्मतरणोपाय, समाजतरणोपाय आहे, असें मला वाटतें.

यावरून गौण देवदेवतांची भक्ति कुचकामाची आहे असें मात्र समजूं नये. कोणत्याही योग्यतेची कां असेना, पण भक्ति ही वस्तु मोलाची आहे. श्रद्धायुक्त निष्कामभक्ति असेल पण पूर्ण ज्ञान झालेलें नसेल तर मोक्षाचें साधन सिद्ध व्हावयाचें नाहीं हें खरे; तथापि ही निष्काम-भक्ति मोक्षमार्गाला नेणारी उत्तम नौका होईल. परिछिन्न देवतांची निष्काम आराधना केली असतां चित्तशुद्धि होते हें खरें; पण आराध्य दैवतच प्रकृतिमिश्रित असल्यामुळें 'मोक्ष' नामक पुरुषार्थाची जोड त्यांच्याकरवीं होत नाहीं. ज्या देवतेचें जसें आपण आराधन करूं तसें ती देवता आपल्यास फल देईल. परमेश्वराखेरीज ज्या इतर देवता आहेत, त्यांचें स्वरूप (१) मर्यादित असले कारणानें, त्यांची सत्ता (२) कालदेश परिच्छिन्न असल्यामुळें आणि त्या स्वतःच (३) प्रकृतीला वश असतात म्हणून, त्यांची कितीही निष्काम भक्ति केली तरी तिच्यायोगें इष्टकार्याची सिद्धि होणार नाहीं. म्हणजे जन्ममरण चुकणार नाहीं व पूर्ण शांति मिळणार नाहीं. उघडच आहे कीं, ज्या देवता स्वतःच मरणाधीन आहेत, विकारवश आहेत, कामदेवाच्या ताब्यांत आहेत, त्या बिचाऱ्या स्वभक्तांस कशाची शांति देणार? त्यांचा जन्ममृत्यु कसा चुकविणार? किंवा लोभद्वेष कसा नाहींसा कर-णार? या देवतांची भक्ति प्रथमारंभीं युक्त होते. आतां मनुष्यजीव जसा जसा जास्त सुसंस्कृत होतो, सृष्टीचें ज्ञान जसें फांकत जातें, तसा तसा त्याचा बुद्धिगोल विस्तृत होत जातो हा अनुभव आहे, हा भाग निराळा. तरी प्रथम प्रथम गौण देवतांची कां होईना, पण निष्कामभक्ति हवी. कारण ही निष्कामभक्ति परमेश्वराच्या घरीं रुजु असते व भक्त्यनु-सार व उपास्य—स्वरूपाच्या ज्ञानानुसार त्या त्या भक्तास फल मिळतें. हें फल उत्तम प्रतीचें नसल्यामुळें ते कालभंगुर असतें हें ध्यानांत ठेवूनच ईश्वराचें पूर्ण स्वरूप समजून घ्यावें. ज्ञानाची आवश्यकता आहे ती येवढ्याचसाठीं! ज्ञानाशिवाय मुक्ति मिळत नाहीं याचा तरी अर्थ हाच आहे. सर्वकर्ता व करविता परमेश्वर आहे, सर्वत्र तोच ओतप्रोत भरला आहे, तो शुद्ध, नित्य, बुद्ध व मुक्त आहे, तो सर्वसाक्षी आहे, असें ज्ञान करून घेऊन जेव्हां त्याची सातव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें निःसीम भक्ति करावी तेव्हां त्याचें स्वरूप समजेल, विज्ञान होईल, साक्षात्कार होईल, आणि मोक्ष मिळेल. इतर देवतांच्या हातून हें कर्म होणार नाहीं.

## म्हणून परमेश्वरभक्ति करावी.

७ तो अर्पण केलेल्या विषयाचा भोक्ता नाहीं, तर आपल्या शुद्ध मनोवृत्तीचा भोक्ता आहे. 'मायेचा कोंडा' जितका व ज्या कारणासाठीं आपणांस प्रिय असतो, तितका व त्याच कारणाकरितां 'व्याह्याचा मांडा' आपल्यास आवडत नाहीं. हाच प्रकार ईश्वराच्या घरीं आहे. आपल्याजवळ जें काय असेल तें ईश्वरास समर्पण करणें, ईश्वरास साक्षी ठेवून आपण शुद्ध मनानें केलेलीं आपलीं सर्व कर्में त्याला देऊन टाकणें, हाच संन्यासयोग आहे. अर्थातच हीं कर्में बद्धक होत नाहीत. शिवाय ईश्वरास अर्पण केलेल्या पदार्थावरून नव्हे, तर त्याला समर्पण केलेल्या अंतःकरणशुद्धतेच्या ताजव्यानें सर्वांच्या भक्तीची परीक्षा होत असते. असो; याच कारणास्तव श्रीपरमेश्वराची, सर्वज्ञ परमात्म्याची अखंड भक्ति हवी व ती निष्कामभक्ति असावी; ईश्वरी स्वरूपाचें पूर्ण ज्ञान झालें, म्हणजे त्या जगदीशास भक्त जें काय अर्पण करितील तें प्रियच असतें. कारण भक्तांचें सर्व कर्म परमेश्वरार्पणबुद्धीनें होत असतें. त्यांचा स्वाभिमान नष्ट होऊन दृष्टि अमर्याद झालेली असते. 'स्वतःचें परिच्छिन्न अस्तित्व' ज्ञानपूर्वक नष्ट केल्यावर पापपुण्याचा विचार अर्थशून्य होतो. सारांश त्यांचें करणें, त्यांचे बोलणें, त्यांच चालणें, सर्व ईश्वरपर असतें. स्वतःचा अभिमान ज्ञानपूर्वक नष्ट झाला म्हणजे संसार संपतो. मग असल्या पुरुषांस सर्व विश्व परमेश्वरी स्वरूपानें भरलेलें दिसतें. कर्म करित असूनही त्यांचा संन्यास सिद्ध होतो. असल्या भक्तांची योग्यता भगवंतांनीं एका शब्दांतच सांगितली आहे, ती ही कीं 'ते माझे आत्मेच होत.' हे भक्त केवळ जगदुद्धारक होत. भाग्यवंत देशांत व भाग्यवंत कुलांत असल्या महात्म्यांचा जन्म व्हावयाचा. यांच्या विश्वव्यापी संसारयात्रेनें सर्व विश्वच मोक्षमार्गाकडे वळत असतें, सरकारी अंमलाच्या दपटशहानें, सामाजिक बंधनांनीं, धर्माच्या अविज्ञात विधिनिषेधांनीं जीं कार्यें कधींही व्हावयाचीं नाहात, तीं कार्यें या महाभक्तांकडून लीलेनें सहज होत असतात.

## अमोघ ईश्वरी दयाघबल्व.

८ ईश्वर हा निःपक्षपाती आहे. आर्जवी पुरुषांस तो वश होतो व निस्पृह पुरुषांचा तो तिरस्कार करितो, असला प्रपंच त्याचें घरीं नाहीं. ज्याचें अंतःकरण शुद्ध, ज्याची निष्ठा उत्तम, ज्याचें ध्यान परमेश्वराकडे एकाग्र झालें, तो पूर्वजन्मीं किंवा पूर्वकाळीं जरी पापपुरुष असला तथापि तो ईश्वराच्या धर्मराज्यांत साधु पदवीस-इतर अधिकारानुसार-प्राप्त होतो. अत्यंत पापकर्म करून धर्मबाह्य झालासा दिसणारा प्राणी जर कधीं काळीं (आहे त्या जन्मीं अगर पुढील जन्मीं) उपरत झाला, विषयवैराग्य होऊन तो जर भक्तिपंथास, निष्काम भक्तिपंथास,

ज्ञानपुरःसर निष्काम भक्तिपंथास, ज्ञानध्यानपुरःसर निष्काम भक्तिपंथास, क्रमशः लागला, त्याचें चित्त शुद्ध होऊन तेथून वासना व अहंकार यांनीं हळूहळू 'यःपलाय' केलें, त्याला जर अद्वैतज्ञान झालें, तर तो पूर्वीचा पापकर्माहि मोक्षपदवीस पोहोंचूं शकेल! वाहवा! काय या गीताप्रणीत धर्मांची थोरवी वर्णन करावी? सर्व धर्मांनीं टाकून दिलेल्या प्राण्यानें जर कदाचित् गीताप्रणीत अमृताचें सेवन यथाशक्ति करून तेथें सांगितलेलें पथ्यकर आचरण ठेविलें तर तो तसला पापीही मुक्त होण्याची सवलत ज्या धर्मात दिली आहे त्याचें कौतुक करावें तरी किती? विशेषतः मनुष्यास प्राप्त झालेल्या इच्छास्वातंत्र्याचा, ज्ञानस्वातंत्र्याचा व वर्तनस्वातंत्र्याचा कितीही वेळ त्याच्या हातून दुरुपयोग झाला तथापि जर त्याच्या मनांत दृढपणानें आपलें वर्तन शुद्ध करावयाचें येईल, जर त्यास केव्हां तरी अनुताप होईल, तर त्यास क्रमशः श्रेष्ठमार्गानें जाण्याची मोकळीक गीतामाऊलीनें ठेविली आहे. इतकेंच नव्हे! तर त्याचा एकनिष्ठपणा कायम राहिल्यास निश्चितपणानें त्याला मोक्षही मिळेल असें आश्वासन दिलें आहे! पुनर्जन्मासंबंधानें, मूर्तिपूजेसंबंधें अत्यंत कडक टीका करून वेदांतधर्माचा उपहास करण्याचें अखंड व्रत ज्यांनीं एकनिष्ठेच्या बाण्यानें चालविण्याचा विडा उचलिला आहे, त्यांनीं शांतपणानें, निःपक्षपातीपणानें, शुद्ध चित्तानें, श्रेष्ठपुरुषार्थाचा सावकाश, सयुक्तिकतः व अनुभवासह विवेकपूर्वक विचार केला असतां त्यांस आढळून येईल कीं, वेदांतप्रणीत अद्वैतसिद्धांताच्या श्रुतिविहित, युक्तिशुद्ध व अनुभवजन्य अशा मार्गाला लागण्यासाठीं जीं अनेक साधनें सांगितलीं आहेत, तीं यथायोग्य असून आवश्यक आहेत. सारांश अत्यंत अवघड दिसणारा मोक्षमार्ग श्रीमद्भगवतप्रणीतमार्गानें क्रमिला असतां कोणाही पुरुषाला इष्टग्रामास, सुखधामास, शांतिगृहास, जातां येईल. 'माझ्या भक्तांचा नाश कधींही होत नाहीं.' ही कधींही न मालविली जाणारी स्वयंप्रकाश दीपज्योति आमचे 'ब्राह्मण' म्हणवून घेणारे वेदांतभक्त आपल्या बरोबर घेऊन जगदुद्धारासाठीं जर एकनिष्ठ भक्तीनें व कर्तव्यतत्परतेनें बाहेर पडतील व सात्त्विकतः अखंड प्रयत्न करितील तर बिशाद काय आहे कीं कोणत्याही देशांतील कसलाही नाठाळ प्राणी विषयोपभोगाच्या अथवा निराशेच्या अंधकारामध्यें दडून राहील. सारांश, भगवंतांच्या आश्रयाचा ज्यांस एकदां सद्गुरुमुखानें लाभ झाला ते व्याधासारखे शूद्र असोत, अजामिळाप्रमाणें पापी असोत, पिंगलेसारख्या प्रत्यक्ष स्त्रियाही असोत, त्या सगळ्यांचा उद्धार होणें शक्य आहे. इतकेंच काय, पण संभवनीय आहे; किंबहुना निश्चितच आहे असें प्रत्येक सुजाण मनुष्यानें समजावें. वाचकहो! नवव्या अध्यायांतील ३४ व्या श्लोकाचें व १८ व्यांतील ६५ व्या श्लोकाचें नित्यशः एकाग्रमनानें मनन व तदनुरूप आचरण करण्याचें व करविण्याचें मनावर घ्याल तर आपल्यास या मृत्युलोकच्या अत्यंत कष्टमय संसारांत रात्रंदिवस पोळून काढणारी दुष्ट तळमळही कारणासह जळून खाक होईल आणि 'जगीं सर्व सुखी असा कोण आहे?' असे प्रापंचिकांच्या सुखासंबंधानें सानुकंप उद्गार काढणारे साधुश्रेष्ठ समर्थ रामदास अथवा,

In such a world, so thorny, and where none
Finds happiness unblighted, or, if found,
Without some thistly sorrow at its side...

असे उद्गार काढणारा कवि **कौपर** या उभयतांचे स्वानुभव एकीकडे सारून देऊन.

**आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन.**

( ब्रह्मानंदाच्या अनुभवी पुरुषास कसलेंही भय उरत नाहीं. ) या तैत्तिरियोपनिषपदाची सार्थकता करणारा एकच धर्म आहे आणि तो श्रीमद्भगवत्प्रणीत गीताशास्त्रांतील धर्म होय; असा आपला निश्चय होईल, यांत मला तरी संदेह वाटत नाहीं.

### तात्पर्य.

९. असो; हें विषयांतर होय. नवव्या अध्यायामध्यें ब्रह्मज्ञयाचें गुह्य, सृष्टिरचनेचें गुह्य इत्यादि गुह्यें प्रकट करून इष्टतम पुरुषार्थ जो मोक्ष त्याची सिद्धि निष्कामभक्तिपूर्वक अद्वैतज्ञानानें कशी होते हें सांगितलें. त्या साधनाला साध्य करून देणारे जे मार्ग आहेत तेही सामान्य प्रतीच्या भक्तांसाठीं सांगितले आहेत, यांचें मननपूर्वक वाचन जर होईल तर गीतोक्त मोक्षमार्ग उत्तम, पवित्र, अनुभवयोग्य धर्मविहित, व सवघड आहे असें प्रत्येकास समजेल.

---

## खंड १० वा.

# दहाव्या अध्यायाचा उपसंहार.

सातव्यांत भगवत्तत्त्व व नवव्यामध्यें ज्ञानविभूति सांगितल्या. आतां ह्या अध्यायांतील पहिल्या अकरा श्लोकांत पूर्ण-सगुण-भक्तीचें दिग्दर्शन करून नंतर तत्पोषणार्थ ईश्वरीस्वरूप भगवंतांनीं सांगितलें आहे. नंतर, परमेश्वराचें स्वरूप ' परमेश्वरानें ' च कां सांगितलें पाहिजे या प्रश्नाला परोक्षतः उत्तर दिलें आहे. श्लोक १२ ते श्लोक १८ पर्यंतच्या श्लोकांमध्यें अर्जुनानें मला आपल्या अनंत विभूतींचें विस्तारतः कथन करावें ' अशी त्या दयाघन व भक्तकामकल्पद्रुम परमेश्वराजवळ करुणा भाकिली आहे. नंतर ' पार्थाचिया पुरविणार मनोरथातें ' अशा भक्तवत्सल परमेश्वरानें आपल्या अनंत, अपार, अगणनीय अशा तेजस्वी व सत्वशील विभूतींपैकीं कांहीं थोड्याशा विभूति सांगितल्या आहेत. हें विभूतिकथन पार्थास समजेल अशा पद्धतीनें करण्याचा संकल्प असल्यामुळें ह्या विभूतिमीमांसेच्या द्वारानें योग्य श्रम अश्रांत रीतीनें केले असतां गीतेचा काल ठर-

वितां येण्यासारखा आहे. सर्वकालांस व सर्वदेशांस योग्य अशा सत्य सिद्धांताचें प्रणयन करून सर्वांस अधिकारयोग्यतेनुरूप मोक्षमार्ग सांगणाऱ्या गीताशास्त्राचा काल ठरवीत बसणें कदाचित् अप्रस्तुत आहे, असें गीताभक्तांस वाटण्याचा संभव आहे; व वास्तविक पाहिलें असतां हा काल ठरविण्याची कांहीं अवश्यकताही नाहीं. युक्लीडचे भूमितीसिद्धांत प्रकट होण्याचा काल २,२०० वर्षांपूर्वी असला किंवा हल्लींचा २० वा शतक असला तरी त्या महापुरुषाच्या सिद्धांतसत्यतेला कोणताही बाध येत नाहीं, किंवा न्यूटनचे गुरुत्वाकर्षणाचे नियम १७ व्या शतकांत प्रकट झाले म्हणून पूर्वकालीं त्या नियमांच्या व्यवस्थेची सत्यता खंडित झाली होती, असें कोणीही ह्मणूं शकणार नाहीं! त्याचप्रमाणें गीताशास्त्रांतील नित्य व शुद्ध सिद्धांताला ख्रिस्ति शकापूर्वी ३० व्या शतकांत प्रकटता प्राप्त झाली असली अगर ख्रिस्तोदयानंतर परंपरया ख्रिस्तमत कृष्णमुखानें या भरतभूमींत प्रथमतः अवतीर्ण झालें असलें, तथापि सत्यान्वेषण करणाऱ्या परमार्थी जिज्ञासूस फलश्रुति एकच आहे. हें सर्व खरें आहे; तथापि कित्येक आग्रही पुरुषांचे विचित्र विप्रलाप कधीं कधीं सन्मताचा झरा कलुषित करण्यास कारणीभूत होतात; त्या ह्या झऱ्याच्या शुद्धीकरणार्थ मात्र या उपसंहाराच्या शेवटीं गीताकालाचा विचार अमळशा विस्तारानें केला आहे. तो वाचकांचे ज्ञानदृष्टीला संमत होवो अशी प्रभुचरणीं विनंति आहे.

## सगुणभक्तीचें उत्कृष्ट स्वरूप.

२ पूर्णज्ञान झाल्याशिवाय निर्विकल्पसमाधिसुखाचा अनुभव येणें शक्य नाहीं. अंकगणित समजल्याशिवाय बीजगणितामध्यें जशी जास्त गति होत नाहीं, तसाच कांहींसा प्रकार येथेंही आहे. भगवान् म्हणतातः 'परमेश्वर अज आहे, अनादि आहे. सर्व लोकनियंता आहे' असा निश्चय झाल्याशिवाय भक्ताचें परमोत्कृष्ट स्वरूप प्रकट व्हावयाचें नाहीं. "परमेश्वराच्या लीलापूर्ण व जीवान्तिकारी सत्यसंकल्पी इच्छेनें प्राथमिक प्रजापती निर्माण झाले, सूक्ष्म विषयाचें आलोचन करणारी बुद्धि, आत्मानात्मविवेक, प्रसंगीं न गडबडणारें धैर्य, इत्यादि अत्यंत सात्त्विक, उत्तमोत्तम ज्ञान शिकविणारे व उत्कृष्ट वैराग्य देणारे गुणही त्या अनंतकल्याणगुणगणमंडित परमेश्वरापासूनच अवतीर्ण झाले" हें ज्ञान ज्याला निश्चयानें झालें, तोच ज्ञानी अखंड आणि अबाधित भक्तियोगानें युक्त होत्साता निर्विकल्प ज्ञानाला व शेवटीं निर्विकल्प सुखाला अधिकारी होतो. 'परमेश्वर सर्वकर्ता आहे, सर्वकरविताही परमेश्वरच आहे' अशी ज्यांच्या मनाची बालंबाल खात्री झाली, आणि परमेश्वरचरणीं ज्यांची दृढश्रद्धा बसली, तेच लोक परमेश्वरी चिंतनामध्यें अहोरात्र निमग्न होतात, परमेश्वरप्रीत्यर्थ देह समर्पण करण्यास आनंदानें सिद्ध असतात, परमेश्वरी स्वरूपाचा उपदेश अज्ञानी लोकांस करून त्यांचा उद्धार करितात, आणि सर्वकाल परमेश्वरी गुणानुवाद गात असतात. "हेच माझे अनन्यभक्त होत. माझ्या ठिकाणीं यांची भक्ति निःसीम प्रेमाची असते." असें भगवान् १० व्या श्लोकांत सांगतात,

सर्वथा परमेश्वरमय अशी भक्तस्थिति झाली ह्मणजे परमेश्वरी अनुग्रह होऊन त्या निष्काम-भक्तांस ' बुद्धियोग ' प्राप्त होतो; ह्मणजे ' एकमेवाऽद्वितीयं ' या महावाक्याचा बोध होतो; अर्थात् ज्ञान प्राप्त होतें. हा ज्ञानयोग साध्य झाला, निदिध्यासानें ज्ञानाला विज्ञानाचें, साक्षात्काराचें स्वरूप आलें, ह्मणजे माझा भक्त मुक्त होतो; ' सारांश भक्तांस असलेलें प्रकृतिजन्य अज्ञान नाहींसें होऊन साक्षात्कारानें तो मुक्त होतो असें भगवान प्रत्यक्ष सांगत आहेत. ह्या भगवद्वाणीवर ज्यांची पूर्ण निष्ठा असेल, श्रुतियुक्त हें भगवद्वाक्य आहे, युक्तीला धरून आहे, अनुभवही असाच आहे, असें ज्यांच्या अनुभवास आलें असेल, त्यांनीं कायावाचामनेंकरून सात्त्विक कर्में निष्कामतः करण्यास व ईश्वराची भक्ति निष्ठेनें करण्यास आरंभ केला असतां त्यांचा उद्योग फलद्रूप होईल. ' ईश्वरापासून सर्व विश्वें निर्माण झालीं, हें विश्वचक्र त्याच्याच सत्तेनें चालत आहे, मी यःकश्चित् आहें, किंचित्ज्ञ आहें, हा देह क्षणभंगुर आहे, सुखदुःखें अनियमित आहेत ' इत्यादि भावना अज्ञान स्थितींत मनामध्यें ठेऊन ' ईश्वरसत्तेनें मला जें सामर्थ्य प्राप्त झालें आहे त्याचा मी ईश्वरसाक्षित्वानें सदुपयोग करीन; ईश्वराप्रीत्यर्थ, ईश्वरानें दिलेल्या सामर्थ्याचा सदुपयोग, निष्कामतेनें व एकनिष्ठेनें करीन; वासना व अभिमान यांचा सर्वथा त्याग करीन आणि ईश्वरी वळण पुढें ठेऊन निर्लेपत्वानें लोकसंग्रह करीन व सर्व–लोकसंग्रहकर्ता जो परमेश्वर त्याचें प्रेमपूर्वक अनुध्यान नित्यशः करीन.' असा ज्या निःस्पृह व निरभिमानी भक्ताचा निश्चय झाला तोच खरा भक्त होय. या महापुरुषाची भक्ति ही परमश्रेष्ठ कोटींतील आहे. ही भक्ति साध्य होऊन सर्वत्र ( आंत बाहेर ) परमेश्वरीध्यान दृढ झालें, आचरण पवित्र व उन्नतिकारी झालें, परमेश्वराचें ठिकाणीं सर्वथा व सर्वेंद्रियपूर्वक अनुसंधान लागलें ह्मणजे जीवाचें अज्ञान नष्ट होतें व महातेजस्वी ज्ञानदीप पाजळून ' एकच एक आहे, हें ज्ञान परमेश्वरी अनुग्रहानें होतें यांत काय आश्चर्य आहे ? असो; अशा ज्ञानी भक्तास निर्विकल्पसमाधि साध्य होऊन शेवटीं तो मुक्त होतो हें सुज्ञ वाचकांस सांगावयास सुद्धां नको आहे. ! असो; आतां

## परमेश्वरी स्वरूप कोणास कळते ?

३ ह्या महत्वाच्या प्रश्नाकडे वळूं. चार्वाकादि महानास्तिकांपासून तो आधुनिक अनुभववाद्यांपर्यंत ( डार्विन, मिल्ल, स्पेन्सर, हक्स्ले, रेना, इत्यादिक ) जे अनेक प्रकारचे अनंत नास्तिक–तत्त्वशोधक–निर्माण झाले आहेत, त्या सर्वांचें पर्यायानें असें म्हणणें आहे कीं, परमेश्वर असला तरी किंवा परमेश्वराचें अस्तिव मानणें भाग असले तरी तो म्हणजे ' परब्रह्म किंवा परमेश्वर, या वस्तूचें पूर्ण ज्ञान मनुष्यास होणें शक्य नाहीं; तसेंच सर्व कर्मांपासून व सर्व विकारांपासून अलिप्त राहणारा जो शुद्ध परमेश्वर तो, वेदासारखें, गीतेसारखें, बायबलसारखें, अगर कुराणासारखें पुस्तक रचून तें एका विवक्षित लोकांच्या हातांत देईल, ही गोष्ट अयुक्तिक, असंबद्ध आणि ह्मणून असमंजस आहे. ' आतां या

कोटीवर काय म्हणतां येण्यासारखें आहे ते पाहूं. **परमेश्वरी ज्ञान मानवी बुद्धीस होणें शक्य नाहीं** हें जितकें खरें आहे, तितकेंच **परमेश्वराचे स्वरूपाचा अनुभव मनुष्यास होणें शक्य आहे,** हेंही खरेंच आहे! पहाः अनंत ब्रह्मांडें उत्पन्न करून पुनः त्यांची व्यवस्था शुद्ध व अविकार्य आणि अतियोग्य तऱ्हेनें लावणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ परंतु अत्यंत गूढ, महायोगेश्वर, परमेश्वराचें, परब्रह्माचें, ज्ञान किंचित्ज्ञ विषय-देखणाऱ्या व पाहिलें त्यावरून अनुमानें काढणाऱ्या मानवी व इंद्रिय-परतंत्रबुद्धीस होणें सर्वथा असंभवनीय आहे. ह्या विश्वाचें जें कांहीं थोडेंबहुत ज्ञान मनुष्यादि-प्राण्यांस होतें तें मन, बुद्धि इंद्रियें इत्यादिकांचे द्वारां होतें. हीं द्वारें बरीवाईट असतील, तदनुसार आपलें म्हणजे जीवांचें ज्ञान तथ्य किंवा अतथ्य असणार. अथवा जशी सचेतन प्राण्यांची इंद्रियघटना असेल तसें ज्ञान त्यांस होणार. म्हणजे त्यांचें ज्ञान सोपाधिक असणार. ठशांत घातलेलें सोनें ज्याप्रमाणें ठशाचा आकार घेऊन उठतें, याप्रमाणें बाह्य वस्तूंचें ज्ञान आपल्यास आपल्या इंद्रियघटना ठसा उमटवितील त्या प्रमाणें मिळतें. एवंच वस्तुस्थितीचें निरपेक्ष ज्ञान इंद्रियवश जीवांस कधींही व्हावयाचें नाहीं. म्हणून पदार्थ वास्तविक रीतीनें कसा आहे हें जीवास कळणें अशक्य आहे. कावीळ झालेल्या मनुष्याचें पदार्थज्ञान (रूपज्ञान) दूषित असतें, तापकऱ्यास साखरही कडू लागते, इत्यादि अनुभवावरून डोळे, कान इत्यादि इंद्रियांचें द्वारा ज्ञान प्राप्त करून घेणारा पुरुष सर्वदा पदार्थाच्या मूळस्वरूपासंबंधें अजाणच राहा-वयाचा. सारांश पदार्थ जसे दिसतात, तसेच आहेत कीं नाहीं हें ठरविणें मनुष्याच्या स्वाधीन नाहीं. ही स्थिति दिसणाऱ्या विश्वासंबंधें झाली. आतां या विश्वाच्या आधीं काय होतें, काल उत्पन्न होण्यापूर्वी व आकाश उत्पन्न होण्यापूर्वी काय होतें इत्यादि वस्तुस्थितीचे ज्ञानप्राप्तीची आशा करणें म्हणजे आपल्या खांद्यावर आपण बसण्याचा प्रयत्न करण्यासारखें अघटित होय! सारांश ह्या अनंत विश्वाच्या अनंत घडामोडीचें ज्ञान होणें अशक्य आहे व विश्वाच्या आदिकालीं व विश्वप्रलयानंतर सदैव राहणारा जो कालस्थलातीत परमेश्वर त्याचेंही ज्ञान होणें सर्वथा अशक्य होय! याप्रमाणें वरील अनुभववादी आधुनिक नास्तिकाची अनुमानसरणी असते व ती अनु-भवदृष्टीनें खरीही आहे. पण ईश्वरजन्य प्राणीवर्ग व विशेषतः मनुष्यजाती जितकी पंगू दिसते तितकी ती नाहीं हें खचित. आपल्या अद्वितीय बुद्धिसामर्थ्यानें व अश्रांत श्रमानें मनुष्यानें विश्वांतील कांहीं गोष्टींचा शोध लावून ईश्वराचें अमोघ चातुर्य, अप्रतिम स्नेह, अपरिमित दूरदर्शित्व, अखंड सामर्थ्य इत्यादि कांहीं ईश्वरीगुण प्रकट केले आहेत, ही गोष्ट एका बाजूलाच ठेऊन देवूं; व आपल्या मर्यादित ज्ञानदीपानें विश्वांतील कांहीं थोडासा अंधकार दूर केला आहे, ही गोष्टही सध्यां अप्रस्तुत समजूं या. हें क्षणभंगुर मानवीबुद्धीसही थक्क करून सोडणारें मानवीबुद्धीचें वैभव एकीकडे ठेवून या अद्वितीय मानवी-प्राण्यानें ईश्वरी अनुग्रहानुसार दुसरा एक चमत्कार केला आहे तो पाहण्यास आपण वळूं या. तो चमत्कार म्हणजे स्वस्वरूपाचें ज्ञान हा होय. 'मी कोण आहें' या प्रश्नांतील 'मी'

या पदार्थाचा शोध ज्यांनीं लाविला आहे, ते या विश्वांत काय करूं शकणार नाहींत? 'मी' हा पदार्थ इंद्रियांस गोचर नाहीं, तो कालास वश नाहीं, स्थलास वश नाहीं, विकारास वश नाहीं, असा शुद्ध व अविकार्य पदार्थ योग्य श्रम घेणाऱ्या मनुष्यास प्रकट होतो. हा 'मी' नित्य आहे. 'लहानपणचा जो **मी** तोच **मी** आतांही त्याच स्वरूपानें प्रकट होत आहे' असा अनुभव प्रत्येक मनुष्यास, नव्हे प्रत्येक जीवास आहे. कळूं लागल्याच्या प्रारंभापासून कळण्याची स्थिति कायम आहे तोंपर्यंत तरी निदान हा '**मी**' नित्य व अविकृत आहे, 'मी सुखी आहें,' 'मी दुःखी आहें,' या दोन्हीं स्थितींचा **साक्षी** तोच आहे. माझा 'मी' नेहमीं अविकृत असतो असा अनुभव मी विचार केला तर, मला येतो. मी कर्म करितों, पण माझा 'मी' त्या कर्मानें लिप्त होत नाहीं हा अनुभव सर्वसाधारण आहे. यावरून काय ठरलें पहा: प्रत्येक मनुष्याच्या विचारशुद्ध अनुभवाची मीमांसा केली असतां असें आढळून येईल कीं, प्रत्येक विचारी "मनुष्याला नित्य बुद्ध, शुद्ध आणि मुक्त" अशा आत्म्याचें स्वरूप शुद्ध **चिन्मय** आहे, चिन्मय आहे ह्मणून तें **आहे** आणि चिन्मय आहे ह्मणून तें **पूर्ण समाधानी** आहे' असा अनुभव, असें विज्ञान असतें. हें विज्ञान त्या मनुष्यास इंद्रियद्वारां उत्पन्न झालें असतें असें मुळींच नाहीं हें आत्मस्वरूप कालस्थलाला किंवा प्रसंगालाही वश नाहीं. अशी स्थिति असूनही विचारी मनुष्याला ह्या आत्मस्वरूपाचा अनुभव आहे. तें सच्चिदानंदघन आहे, पूर्ण आहे, असा त्याचा निश्चय आहे. तेव्हां इंद्रियांशिवाय मनुष्याला स्वरूपज्ञानाचा अनुभव अप्रत्यक्ष होणें संभवनीय आहे म्हणजे कालस्थलातीत वस्तूचाही ज्ञानानुभव येणें शक्य आहे, असें ठरलें.

(**आ**) या दोन परस्पर विरुद्धसिद्धांतांची सांगड कशी जमवावयाची? आत्मव्यतिरिक्त बाह्यसृष्टीचें ज्ञान **इंद्रियद्वारां** होतें म्हणून तें पूर्ण नाहीं व वास्तविक नाहीं. पण आत्मवस्तूचें ज्ञान इंद्रियाव्यतिरिक्त आत्मप्रत्यक्ष पद्धतीनें-निरपेक्षपद्धतीनें-अनुभवास येतें ह्मणून तें पूर्ण व वास्तविक आहे. ह्मणून आत्मदृष्टीनें झालेलें विज्ञान सत्य व अनात्मकदृष्टीनें ( इंद्रियादिकांच्या साहाय्यानें व कालस्थलांच्या मर्यादेनें ) झालेलें ज्ञान असत्य होय, हेंच ठरलें पाहिजे. आतां विश्वाचें आपल्यास जें ज्ञान होतें, त्याच्या अंतर्यामीं एक विज्ञान असतें तें पाहून ह्या प्रश्नांची मीमांसा आटपूं. मी ज्या कागदावर लिहीत आहे त्या कागदाचा आकार, रंग, गुळगुळीतपणा, गंध, आवाज इत्यादि वजा केले, इंद्रियांना उत्पन्न केलेलें सर्व ज्ञान वजा केलें, तरी '**आहे**' याचें विज्ञान नाहींसें होत नाहीं. कागदाचें ज्ञान मला इंद्रियांनीं व मन बुद्धि यांच्या करवीं होतें: पण 'कागद **आहे**' हें जें विधान मी करितो, त्याला आधार काय आहे? सर्व रंगरूप वजा केले तरी **ज्याच्यावर हे रंगरूप आहेत तें नाहींसें होत नाहीं तें 'आहे' या रूपानें कायमच राहतें व माझ्या आत्मस्वरूपी चिद्रूपानें माझ्या अनुभवास येतें.** तें '**आहे**' हें विज्ञान अविकृत व अलिप्तच आहे. एवंच आत्मव्यतिरिक्तसें भासणारें जें

विस्तीर्ण विश्व तेंही **सत्** आहे, **चित्** आहे, **आनंदमय** आहे, सारांश सच्चिदानंदघन आहे, मत्स्वरूपींच आहे असा मी विचार केल्यास मला अनुभव येतो. सारांश, जसा मी सच्चिदानंदघन आहें तसेंच सर्व विश्वही सच्चिदानंदघनच आहे, असा अनुभव मला येऊन सर्वत्र 'एकच एक भरलेलें' आहे, असा प्रत्यय होतो व अद्वितीय ब्रह्माचें विज्ञान मला होतें.

*याप्रमाणें आपल्या या देहरचनेच्या अंतर्यामीं कैवल्य असल्यामुळें व त्या केवलाचा* अनुभव घेण्याचा स्पृहणीय अधिकार सर्व जीवांस, पण विशेषतः मानवी प्राण्यास असल्यामुळें आणि ह्या केवलस्वरूपाचा एकाग्र व एकनिष्ठ पुरुषांस पूर्ण साक्षात्कार होण्याचा संभव असल्यामुळें 'मानवी नियमित बुद्धीला वास्तविक स्वरूप दिसणें अशक्य आहे' हा सिद्धांत आत्मदृष्टीनें खरा नाहीं, असें वाचकांच्या लक्षांत उतरल्यास पुष्कळच कार्यभाग झाला असें मी समजेन. असो; याप्रमाणें बाह्य विश्वाचें खरें-सच्चिन्मय-स्वरूप आत्मदृष्टीनें आपल्या अनुभवास येतें हें खरें; पण त्याच बाह्य विश्वाचें इन्द्रियांच्या साहाय्यानें मात्र प्रत्यक्ष झालेलें जें दृष्टस्वरूप आहे, जे मायिक स्वरूप आहे, तें जसें आहे तसें ओळखितां येणे, स्वस्वरूपानें या नामरूपात्मक स्वरूपाचा पूर्ण परिचय होणें, हें मात्र आपल्या नियमित इन्द्रियांच्या परतंत्री साहाय्यानें होणे शक्य नाहीं, हेंही खरें आहे.

(इ) पण, बाह्य स्वरूपाचा परिचय झाल्यावांचून आत्मस्वरूप आपणा स्वतःसही प्रकट होत नाहीं. तेव्हां बाह्यस्वरूपाचा परिचय करून घेणें ही आत्मस्वरूपाकडे जाण्याची पहिली पायरी आहे असें ठरतें. यावरून हें स्पष्ट झालें कीं, जितकें बाह्यस्वरूप जास्त चांगलें समजेल, तितकें अंतःस्वरूप उज्वलतेनें प्रकट होण्याला विशेष सौकर्य प्राप्त होतें. तरी पण मानवी शक्ति सर्व बाह्यविश्वाचें एकसमयावच्छेदेंकरून व पूर्णस्वरूपानें आकलन करण्यास असमर्थ आहे, हें मागील विवेचनावरून आपण ठरविलेंच आहे. आणि म्हणून *बाह्यज्ञानाच्या योगानें आत्मस्वरूप पूर्ण समजण्याचा संभव नाहीं.*

असो; जसें बाह्यस्वरूप चांगलें समजेल तसें आत्मस्वरूप चांगलें समजेल हें पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल. वायूची गति फार मोठी आहे असा आपला समज होता. त्यानंतर वाफेपासून उत्पन्न होणारी गति, आवाजाची गति, विद्युल्लतेची गति, प्रकाशाची गति, यांचें ज्ञान आपल्यास झाल्यामुळे व आणखी अनंत गति प्रकट होण्याचा संभव असल्याकारणानें 'आत्मा मनापेक्षांही जलद कसा चालतो' हें आपल्या लक्षांत येतें. पृथ्वीपासून आपला तेजोनिधि रविराज हा ९ कोटी २५ लक्ष मैल लांब आहे व तेथून निघालेला किरण सुमारें आठ मिनिटांत पृथ्वीवर येऊन पोहोंचतो; म्हणजे स्थूलमानानें प्रत्येक सूर्यकिरण दर मिनिटास ११५ लक्ष मैल चालतो! कोठें एक मिनिटांत एक मैल चालणारी आगगाडी आणि कोठें एक मिनि-

टांत ११५ लक्ष मैल चालणारा सूर्यकिरण! विद्युद्गति या पेक्षांही जास्त आहे असें सांगतात! रामायणांतील प्रसिद्ध मारुतीचा वेगही या प्रकाशवेगापुढें फिक्का पडतो! असो; या एकाच उदाहृणावरून आतां आपल्यास कल्पना करितां येऊं शकेल कीं, द्वारकेभोंवतीं दर पळांत १००० फेऱ्या करणारें श्रीकृष्णाचें सुदर्शनचक्र किती जलद चालत होतें! याचप्रमाणें पदार्थांच्या जलद वेगाची इतकी परमावधि आपल्या कल्पनेनें करूं शकूं कीं, तो प्रायः स्थिरच राहूं लागेल! "आत्मा हा सर्वव्यापी पदार्थ इतका जलद चालणारा आहे कीं, तो सर्वत्र दिसतो म्हणजे वस्तुतः स्थिर असतो!" या विधानाची सत्यता व स्पष्टता वरील बाह्यविश्वांतील शक्तींच्या ज्ञानानें बरीच दृढ होईल असें वाटतें. तात्पर्य हें आहे कीं, आत्मस्वरूपाची सत्यता श्रद्धेनें आपण दृढ करून घेतों; त्यालाच बाह्यविश्वाच्या विचारशुद्ध अनुभवाची जोड मिळाल्यास ही सत्यता पूर्ण दार्ढ्यानें आपल्या मनावर बिंबेल आणि आपली श्रद्धा वज्राप्रमाणें सुदृढ होईल. हा प्रकार इंद्रियजन्य ज्ञानाविषयीं झाला.

(ई) परंतु **श्रद्धा उत्पन्न करणारीं प्रमेयें** आपल्यास मिळावयाचीं तीं सर्वज्ञ परमेश्वराकडूनच मिळावयास हवींत. मनुष्यास ही प्रमेयें प्रथमारंभीं समजण्याचें सामर्थ्य नाहीं. हें जगत् उत्पन्न कसें झालें, याचा अंत कसा होणार, जीवानें कसें आचरण ठेवावें कीं, ज्यायोगें हा दुःखमय संसार आनंदमय होईल, इत्यादि विषयस्थ अनेक गूढ सिद्धांत आणि विधिविधायक शास्त्रें आणि विद्या, यांचें प्रकटन परमेश्वराकरवींच झालें असलें पाहिजे. कारण यत्किंचिज्ज्ञ आणि उपाधिगर्भित मनुष्यास या 'अनंतपार' शास्त्रांचा शोध लाबितां येणें अत्यंत असंभवनीय आहे. हें ध्यानांत ठेविल्यास वेद 'अपौरुषेय कां?' श्रीकृष्णासच गीताशास्त्र कां सांगावें लागलें, इत्यादि प्रश्नांचा सहज उलगडा करितां येण्यासारखा आहे.

(उ) धर्मसंस्थापना करण्याचा किंवा धर्माचें स्वरूप उज्वलित करण्याचा जेव्हां जेव्हां प्रसंग येतो, तेव्हां तेव्हां तत्तत्कालीन लोकांचा मगदूर पाहून सत्सिद्धांतांचें स्वरूप भगवान् प्रकट करितात व जीवयात्रा सुकर करितात, असा आजपर्यंतच अनुभव आहे. हा प्रकटीकरणाचा विधि ब्रह्मरूपाचें प्रकट स्वरूप (परमेश्वर) या करवीं अगर परमेश्वराचा अनुग्रह झालेल्या एखाद्या नारदासारख्या महापुरुषाकरवीं होत असतो. असो; याप्रमाणें परमेश्वरांनीं दहाव्या अध्यायांत 'माझें स्वरूप कोणासच पूर्णत्वानें विदित नाहीं, **म्हणून तें मी तुला सांगतों;**' असें म्हटलें, याचा हाच अर्थ होय. मानवीबुद्धीस आकलन न होणाऱ्या विद्या व शास्त्रें यांचें प्रकटीकरण परमेश्वराकडून अथवा ईश्वरानुग्रहीत महापुरुषांकडूनच झालें पाहिजे. ज्यावेळीं हें सिद्धांत प्रकट होतात, त्यावेळचे लोकही ते ते सिद्धांत ग्रहण करण्यास समर्थ असतात. हें ग्रहणसामर्थ्य सार्थ झालें अथवा हे प्रकटित सिद्धांत विचारांत, उच्चारांत व आचारांत आले म्हणजे हाच सिद्धांतांस पुनः उजळा मिळून पूर्वकालीन विचारांत, आचारांत व उच्चारांत सुधारणा होते आणि येणेंप्रमाणें

आर्यलोकांसारख्या चिरंजीव राष्ट्रांत सुधारणेचें ह्मणजे सात्त्विक वृत्तीचें पाऊल जान्हवीच्या ओघाप्रमाणें दिवसेंदिवस जास्त पुढें जाऊन कर्मानें, सत्तेनें, विद्येनें, व व्यवहारानें तें राष्ट्र सर्वांस वंदनीय होतें.

(ऊ) सारांश, स्वानुभवाचा पूर्ण छडा लावित गेलें असतां परब्रम्हस्वरूपाचें आकलन होणें दुरापास्त नाहीं; मात्र परमेश्वरी अनुग्रहानें आणि ईश्वर प्रकटित धर्मावरील निःसीम श्रद्धेनें बाह्य विश्वाचा चांगला परिचय झाला पाहिजे; हा बोध वाचकांचे मनावर ठसेल व त्याप्रमाणें आपणा सर्वांचें आचरण होईल तर आपल्यामध्यें वसत असलेलें धर्मौदासिन्य, मत्सरबुद्धि, मिरविण्याची हौस, स्वार्थाभिलाष व तज्जन्य सर्व दुर्गुण यांचा कालशः आणि क्रमशः न्हास होऊन जाईल आणि उत्साही बालवयांत दृग्गोचर होणारी अतुल जिज्ञासा, उद्योगप्रेम, निष्कपटस्नेह, साहसप्रियता, धर्मनिष्ठा इत्यादि सद्गुणांची सात्विकरीतीनें प्राणप्रतिष्ठा होईल यांत संदेह नाहीं. 'माझ्या भक्तांचा नाश कधींही व्हावयाचा नाहीं' या भगवत् वाक्यावर दृढ निष्ठा बसली असतां जें धैर्य, जो उत्साह, जें प्रसंगावधान, जी न्यायप्रियता, जे सात्विकगुण प्रकट होतील, त्यांचें या मानवी लेखणीनें काय वर्णन करावें? असो; असा संसाराचा मोक्ष करणाऱ्या धर्माचा संस्थापक जो षडगुणैश्वर्यसंपन्न भगवान परमेश्वर, त्याचें आराधन भक्तिपुरःसर केलें असतां परमेश्वरी स्वरूप प्राप्त होतें, असे भक्तशिरोमणी जो अर्जुन त्यानें ऐकल्याबरोबर 'परमेश्वरा! आपलें सगुणध्यान अखंडत्वानें करावें अशी माझी इच्छा आहे; याकरितां आपण आपल्या विभूति सांगाव्या व आपलीं प्रकट स्वरूपें कोणतीं तीं कृपा करून मला ऐकवावीं, ह्मणजे मला ध्यान करण्यास सोपें पडेल' अशी वर्तमान व भावी मंदप्रज्ञ लोकांच्या उद्धारार्थ अर्जुनानें प्रार्थना केली आहे व तिचें उत्तर भगवंतांनीं दिलें आहे,' ह्या उत्तराचा मथितार्थ आतां आपण पाहण्यास लागूं.

## भगवंतांच्या विभूति.

४ ह्या विभूतींचें कथन मंदप्रज्ञांसाठीं आहे व तें अर्जुनास व तात्कालीन लोकांस समजेल अशा धोरणानें केलें आहे हें आतांच मी सांगितलें आहे. परमेश्वरांनीं सर्वांत पहिली जी विभूति सांगितली आहे ( यालाच कांहीं टीकाकार 'योग' असें ह्मणतात ) त्यावरूनच गीताशास्त्र हें अद्वैतमतप्रतिष्ठापनेसाठीं व इतर सर्व धर्मांची व्यवस्था लावण्यासाठीं प्रकट केलें आहे, असें सिद्ध होतें. 'सदैव जागृत असणाऱ्या अर्जुना! सर्व चराचर भूतांच्या आंत प्रधानत्वानें राहणारा 'आत्मा, मी आहें; तो मी आत्मा सर्वांच्या आधीं असतों व सर्वांच्या अस्तित्वकाली असतों व सर्वांच्या अंतींही मीच असतों.' यावरून असेंच सिद्ध होत नाहीं काय कीं, ह्या अनंत जगाला जें वस्तुत्व आहे, त्या विश्वांतील अनंत पदार्थांस जें अस्तित्व प्राप्त झालें आहे, तें सर्व एका परमेश्वरामुळें प्राप्त झालें

झालें आहे व हें सत्य आपणास ईश्वराकडून मात्र कळणार आहे? सारांश, अस्ति, भाति आणि प्रियता हें परमेश्वरी स्वरूप सर्व विश्वांत प्रकट झालें आहे. पदार्थास पदार्थत्व परमेश्वराच्या सत्तेमुळें येतें. भूत, भविष्य व वर्तमान काळीं एक परमेश्वर मात्र आत्म-स्वरूपानें चिरंजीव आहे. या निर्विकल्प स्वरूपांत इंद्रियगोचर गुण नाहींत. द्वैतवादी, विशिष्टाद्वैतवादी वाटेल तसा अर्थ करोत, 'भूतांचें आदिकारण मी आहें, भूतांस अस्तित्व माझ्या सत्तेनें येतें आणि भूतांचा अंत झाल्यावर मीच मात्र शिल्लक राहतों,' यावरून ज्ञानस्थितींत एक अद्वैत मात्र खरें आहे, बाकीचीं सर्व मतें अज्ञानकाळीं मात्र खरीं असतात असें सिद्ध होतें. ( इंद्रियांस गोचर होणारे पदार्थ मात्र सत्य, बाकीचे मिथ्या, असें मानण्याचा जो काळ तो अज्ञानकाळ होय. या अज्ञानकालांत चार्वाकादि देहात्मवाद्यापासून श्रीमच्छांडिल्यादि 'पराभक्ती' च्या प्रस्थापकापर्यंतच्या सर्व मतप्रतिपादकांचा समावेश होतो. ) या सर्वांची जाति एकच पण प्रती मात्र निराळ्या असतात. पण गीताशास्त्र कोणत्याही मताच्या आड येत नाहीं, इतकेंच नव्हे, तर प्रत्येक मताची योग्यता पाहून त्याची व्यवस्था करितें. असो; तेव्हां परमेश्वरांनीं एका शब्दांत ( आत्मा हा तो शब्द ) अद्वैतासिद्धांत स्थापित केला आहे, इतका भाग लक्षांत राहिला म्हणजे पुष्कळ झालें.

( **आ** ) आतां या विभूतीनंतर ज्या अनेक विभूतींचा अवतार केला आहे, त्याचें स्थूलमानानें वर्गीकरण अनेक प्रकारें करितां येईल. 'जेथें कांहीं विशेष असेल, जेथें विशेष शोभा असेल, विशेष सामर्थ्य असेल, तेथें माझे तेजांशाचा अवतार आहे, असें समज ' ह्या वाक्यानें भगवंतांनीं एक प्रकारचें वर्गीकरण केलें आहे हें खरें आहे; तथापि आपल्या मानवी समजुतीसाठीं मी खालीं सांगितल्याप्रमाणें वर्गीकरण करितों.

( **इ** ) प्रथम वैदिक देवता घेतल्या तर त्यांत सामान्यतः द्वादश आदित्य, एकादश रुद्र, अष्ट वसु आणि अश्विनीकुमारद्वय ( येथें कोणी द्यावापृथ्वी अथवा इंद्रप्रजापती यांचा समावेश करितात. ) असे तेहतीसकोटींचे, जातींचे, वर्गाचे, देव होतात. या निरनिराळ्या वर्गांपैकीं अश्विनीकुमारांचा मात्र या विभूति अध्यायांत उल्लेख नाहीं; अकराव्यांत आहे. आदित्यांत **विष्णु**, रुद्रांत **शंकर** आणि वसूंमध्यें **अग्नि**, असें भगवंतांनीं आपलें विभूतिवर्णन केलें आहे. विष्णु हा सर्वव्यापी, धर्मसंरक्षक आणि अदितिपुत्र जे आदित्य त्यांचा स्वामी आहे. ( ऋग्वेद, मंडल, १ सूक्त १५७ पहा. ) यालाच **त्रिविक्रम** असें नांव आहे. रुद्रांमध्यें **शंकरास** प्राधान्य आलें तें त्याच्या भक्तवात्सल्याप्रीत्यर्थ आलें आहे. रुद्रदेवता उग्र आणि संहार करणाऱ्या खऱ्या; पण त्यांतच शंकर नामक कल्याणकारी व भक्तवत्सल देवतेची गणना आहे. **भोळा शंकर** हें नांव प्रसिद्ध आहे. वसुदेवतांचा अग्नि आणि सूर्यप्रकाश यांच्याशीं संबंध आहे; तेव्हां अष्टवसूंत अग्नीस शिरोमणित्व आलें हें नीटच आहे. ऋग्वेदामध्यें अग्निदेवतेचें माहात्म्य जागोजागीं वर्णिलें आहे. देव आणि मनुष्य यांची परस्पर ओळख करून देण्याच्या कामीं

अग्नीची योजना आहे, हें तज्ज्ञास सांगावयास नको. अग्नीसच **हव्यवाहन** म्हणतात. हें एकंदर जे तेहतीस देव होतात त्यांचा अधिपति **इंद्र** आहे. इंद्राचें **वासव** हें नांव आहे, व या नांवावरून इंद्राचा अंतर्भाव वसूंमध्यें पूर्वकालीं होत असावा, पण त्याचें अलौकिक सामर्थ्य, त्याचें अमोघ वज्र, वेदकालीन आर्य-भक्तांस साहाय्य करण्याची त्याची सप्रेम आतुरता, इत्यादिकांवरून त्यास श्रेष्ठत्व आलें आहे. हा पूर्वदिशेचा स्वामी आहे. प्रकाशवंतांमध्यें किरणांसह स्वप्रकाश दूरपर्यंत नेणारा **रवि** (सूर्य) श्रेष्ठच समजला पाहिजे. सूर्य उगवला म्हणजे सर्व व्यवहारास सुरुवात होते. फल, पुष्प, धान्य इत्यादिकांची समृद्धि करणारें पर्जन्याचें आगमन रविसंदेशानुसार होत असतें. अग्नि, विद्युत्, तारागण हे प्रकाशवंत पदार्थ होत. पण या सर्वांत सूर्याचा प्रकाश सकिरण, स्थिर आणि कार्यक्षम आहे, म्हणून सूर्यास प्राधान्य आहे. चंद्र हा परप्रकाशी म्हणून स्वयंप्रकाशी वस्तूंत त्याची गणना केली नाहीं. पृथ्वीला कंप देणारे ४९ मरुत आहेत. पण या सर्वांमध्यें **मरीचीला** प्राधान्य द्यावयाचें तें यासाठीं कीं, मरीचि हा विद्युल्लतेसह प्रकट होतो. वीज उत्पन्न करून मेघांस आंदोलन देणारा व पर्जन्य पाडणारा **मरीचि** श्रेष्ठ मानिला गेला यांत काय आश्चर्य आहे? या संबंधें ऋग्वेद मंडल १ सू० १६८, व मं० ५ सू० ५२ हीं वाचण्यासारखीं आहेत. स्वच्छ आकाशामध्यें हजारों तारकपुंजासहवर्तमान अवतीर्ण होऊन सर्व पृथ्वीस शोभायमान करणारा व शांतता देणारा **चंद्र** हा नक्षत्रगणांत श्रेष्ठत्व पावला हें ठीकच झालें. चंद्र हा वृक्षलतापल्लवांस रात्रौ पुष्ट करितो हे अलीकडील शास्त्रांसही मान्य आहे. यच्चयावत वृक्ष रात्रौ प्राणवायूचें ग्रहण करित असतात हें सर्वविश्रुतच आहे. **यक्ष राक्षसांचे** जे अनेक गण आहेत त्यांचा स्वामी **कुबेर** आहे. हा धनाधिपति आहे, उत्तर दिशेचें अधिपत्य या वित्तेशाकडे आहे. **गंधर्वांचा** स्वामी **चित्ररथ** आहे. 'गवां=रश्मीनां धर्ता=सूर्यः' अशी सायणाचार्यांनीं 'गंधर्व शब्दाची एके ठिकाणीं व्युत्पत्ति दिली आहे. (मंडल ८ सू० ११ पहा.) **सिद्धांमध्यें कपिल** हा श्रेष्ठ आहे. हा सिद्ध आंगिरसकुलाचा अधिपति होता असें ऋग्वेदावरून दिसतें. पितृलोकाचा अधिपति **अर्यमा** होय. सूर्याचें नांव अर्यमा आहे आणि वरुण, मित्र व अर्यमा अशी ही त्रयी ऋग्वेदामध्यें नेहमीं एकत्र दृष्टीस पडते. **वरुण** हा समुद्रपति अथवा जलचरांचा अधिपति आहे. हा पश्चिमदिशेचा स्वामी होय. वरुणाचें महात्म्य वेदकालीं फार होतें. रात्रीचें स्वामित्व याकडेसच होतें. **मित्र** हा दिवस्पति आणि **वरुण** हा निशापति असे ऋग्वेदांत अनेक उल्लेख आहेत. मैत्रावरुण व इंद्रावरुण यांच्या स्तुतिपर ऋग्वेदांत अनेक सूक्तें आढळतात. वरुण हा मायेचा अधिपति आहे. इतकी श्रेष्ठ देवता ही परमेश्वराचा अंश असलीच पाहिजे. 'संयमन करणारांमध्यें मी **यम** आहे' असें भगवद्वाक्य आहे. या 'यम' शब्दानें दक्षिण-दिशेचा अधिपति **यम** घ्यावयाचा किंवा ऋग्वेदांत 'यम यमी' चें जें एक सूक्त आहे, तेथील दृढनिश्चयी व मनोनिग्रही **यम** घ्यावयाचा हें अनिश्चित आहे. दोन्ही अर्थ

**सुंदर आहेत.** कर्माकर्माचा न्याय करणारा **यमराज** हा परमेश्वरविभूति असणें जितकें साहजिक आहे, तितकेंच आत्मसंयमनाचा उत्कृष्ठ नमुना दाखविणारा वैदिक 'यम' ही परमेश्वरी अंश असणें साहजिक आहे. दोघेही सूर्यपुत्र आहेत. मला असें वाटतें कीं, वैदिक 'यमाचा सर्ववंदनीय मनोनिग्रह पाहूनच त्यास वेदोत्तरकालांत कर्म-विवेचनाचें काम मिळालें असावें! याप्रमाणें सामान्यतः देवसंबंधी विभूतींचा आढावा आहे. या आढाव्यावरून वाचकांच्या हें लक्ष्यांत येईल कीं, भगवंतांनीं ज्या देव-संबंधी विभूतींचा उल्लेख केला आहे, त्यांपैकीं बहुतेक, **मुख्यत्वानें वागणाऱ्या वैदिक-कालीन देवता आहेत.**

( ई ) वेदकालीन ऋषीपैकीं **बृहस्पति, भृगु, नारद, व्यास** आणि **उशनस** योचाच काय तो येथें उल्लेख आहे. बृहस्पति ही पवित्रतेची व धर्माची संचारक देवता आहे असें वेदोक्त सूक्तांवरून दिसतें. अर्थातच पुरोहिताचें काम या देवतेकडे आलें. **नारद** हा वेदकालीन ऋषि आहे. आठव्या व नवव्या ऋग्वेद-मंडलांत नारदाचीं सूक्तें आहेत. यांचीं भक्तिसूत्रेंही सर्व प्रसिद्धच आहेत. **व्यासाविषयीं** आर्यलोकांस मुळींच सांगायास नको. विचारी पुरुषामध्यें व्यासासारखा बुद्धिवंत व उद्योगी लोकांत महा उद्योगी पुरुष नाहींच म्हटलें तरी चालेल. **उशना** ( पुराणकालांत यासच शुक्राचार्य म्हणतात ) हा वेदकालांत 'कविमुकुटमणी' या नांवानें प्रसिद्ध होता. हे येथें उल्लेखिलेले मंत्रद्रष्टे, धर्माचार्य, कवी आणि वेदव्यवस्थापक मुनी हे आदिकालीन पुरुष आहेत. अर्जुनानेंही उल्लेखिलेले नारद, असित, देवल व व्यास हे सर्व आदिकालीनच आहेत. भारतामध्यें पुष्कळ ठिकाणीं यांचाच उल्लेख होतो हेंही लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे. राहतापैकीं भृगु राहिले. हे सप्तऋषींतील अग्रगण्य होत. यांचीं केलेलीं अनेक सूक्तें वाचिलीं असतां हे अग्न्युपासक असून कदाचित् अग्नि प्रकट करण्याची युक्ति यांनींच काढिली असावी अशी कल्पना होते. हेही **आदिकालीन** मंत्रद्रष्टे होत.

( उ ) **स्कंद** हा देवसेनापति आहे. यानेंच **तारकादि** दानवांचा पराभव करून वेदोक्त धर्माची संस्थापना केली. **'उच्चैःश्रवा'** नामक अश्व आणि **'ऐरावत'** नामक गज हे अमृतमंथनसमयीं सागरांतून बाहेर आले. **वज्र** हे इंद्राचें अमोघ अस्त्र आहे. **कामधेनु** ही इष्टफल देणारी धेनु आहे. ही स्वर्गात असते. कारणाच्या स्वरूपासारखेंच कार्य उत्पन्न करणाऱ्यांमध्ये **मदना**सारखा दुसरा कोणी नाहीं, हें विदितच आहे.

( ऊ ) **दैत्य** जरी स्वभावतः दुष्ट आहेत, तरी त्यांच्यांत जे कांहीं सात्त्विक दैत्य निर्माण झाले त्यांतील भक्तावतंस **प्रल्हाद** हा परमेश्वरी अंश होय. असन्मार्गानें जाणाऱ्या आपल्या पित्यास अनेक वेळ ज्यानें बोध केला, सात्त्विकवृत्ति धारण केल्याबद्दल

अनेकशः छल झाला तरी ज्यानें आपली सत्वनिष्ठा सोडिली नाहीं, आणि परमेश्वराजवळ ज्यानें आपला छल करणाऱ्या पित्याप्रीत्यर्थ सकरुण प्रार्थना करून रदबदली केली आणि नरहरीस वश केलें तो प्रल्हाद खरोखरच चिरस्मरणीय होय.

( ३३ ) वर्णमालिकेमध्यें अ हें एकवर्णात्मक अक्षर सर्वेतर अक्षरांची जननी आहे. 'अ'पासून सर्व अक्षरांची उत्पत्ति होते. संस्कृत, युरपियन व अरबी वर्णमालिका 'अ' पासूनच सुरू होतात! मुलांचा प्रथम उच्चार 'अ' हा असतो. यावरून 'अ' स प्रधानता आली. शब्दकृत वाणीचें सार 'ॐ' या एका अक्षरांत आहे. 'ॐचें' महात्म्य छांदोग्यउपनिषदांत व विशेषतः मुंडकोपनिषदांत पाहावें. 'ॐ इत्येतदक्षरमुपासीत' (छांदोग्य) 'ओमिति ब्रह्म' (तैति०) 'ॐ ब्रह्मणो महिमा,' 'ओमापो ज्योती रसो ब्रह्म' (मैत्रे०) ओमित्येवं ध्यायथ आत्मानम्' (मुंड०) 'ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणः' (गीता) इत्यादि अनेक ठिकाणीं ॐकार महात्म्य वर्णिलें आहे. श्री० जटार यांच्या अव्यक्तप्रकाशांतील ॐकारापासून विश्वोत्पत्ति दाखविण्याचा अभिनव प्रयत्न चिंतनीय आहे. असो; सर्व भाषेचे सार ॐ हें आहे; कारण हें अक्षर सर्व पुरुषार्थाचें साधक आहे. ॐकारोपासना केली असतां व नित्य अभ्यासानें प्रणवाचा उच्चार शुद्ध बुद्धीनें झाला असतां अंतकालीं महाफल प्राप्त होतें हें आठव्या अध्यायांत सांगितलेंच आहे. **गायत्रीछंद** हा सर्व छंदांत श्रेष्ठ आहे. गायत्रीचें कथानक मूळ श्लोकाचें व्याख्यान करितांना सांगितलें आहे. तें वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. छंद हा वेदकालीन शब्द आहे. 'गायत्री छंदसां माता' असें **महानारायणोपनिषदांत** म्हटलें आहे. 'गायत्रं छंद ऋग्वेद.' असें **महोपनिषद्** म्हणतें. गायत्रीचा जप द्विजानें त्रिकाल म्हणजे तिन्ही संध्यांचे वेळीं करावा अशी वेदाज्ञा आहे. गायत्रीचें श्रेष्ठत्व या प्रकारचें आहें. सर्वांमध्यें उत्तम यज्ञ कोणता तर **जपयज्ञ** होय. कारण तेथें हिंसादि कांहीं नाहीं हें एक आहेच. पण उपास्यदेवतेचें आराधन मात्र करण्याचा ज्यांस अधिकार आहे त्यांनीं होमहवन, यज्ञयाग, इत्यादिक भानगडीमध्येंच आपल्यास शेवटपर्यंत गुंतवून न घेतां उपास्यदेवतेचें अखंड ध्यान (प्रथम सगुण आणि मूर्तस्वरूपानें; नंतर सगुणस्वरूपानें; नंतर निर्गुणस्वरूपानें आणि शेवटीं आत्मस्वरूपानें ध्यान) केलें असतां उपास्याशीं तादात्म्य प्राप्त होऊन महावाक्याचा अर्थ कळूं लागेल व पुढें साक्षात्कार होईल. निष्कामबुद्धीनें ॐकाराचा अगर दशप्रणवयुक्त गायत्रीचा एकाग्र जप केला असतां चित्तशुद्धि फार लवकर होते. हें सामर्थ्य इतर यज्ञांत नाहीं. हा यज्ञ यथासांग सिद्ध झाला तरच ज्ञानयज्ञाला अधिकार पोहोंचतो. भगवंतांनीं १२ प्रकारचे यज्ञ ४ थ्या अध्यायांत सांगितले आहेत ते गीताभक्तांस अवगत आहेतच.

**सामवेद** म्हणजे वस्तुतः ऋग्वेद होय. तथापि उद्गात्यानें मंजुल स्वरानें सामवेदांतील मधुर सामें म्हणावयाचीं असतात व या सामांत उत्साह, बल, ऐश्वर्य इत्यादि

उत्पन्न करणाऱ्या **सोमाचीं** स्तोत्रें आहेत म्हणून '**ऋग्वेदात्सामवेदस्य महिमा भूयान्**' असें गुरुवर्य डा० भांडारकर यांचे 'संस्कृतमंदिरांतःप्रवेशिका' नामक पुस्तकांत एक मार्मिक वाक्य आलें आहे. गायनप्रिय प्राण्याला सामवेदच प्रिय व्हावयाचा. कारण जीव हा नादलुब्ध प्राणी आहे. त्या सामांतही **बृहत्साम** म्हणून जें एक स्तोत्र आहे तें परमेश्वर स्तुतिपर म्हणून श्रेष्ठ होय. समासामध्यें **द्वंद्वास** श्रेष्ठत्व आलें तें बहुधा त्याच्या प्राथमिक योजनेनें आलें असावें; म्हणजे दोन किंवा दोहोंपेक्षां अधिक शब्द एकत्र करणाऱ्या समासाला, सामासिक पदें योजण्याला, 'द्वंद्वा' पासून आरंभ झाला असावा. द्वंद्व हा पहिला समास असावा. सर्व समासांत द्वंद्व हा अत्यंत सोपा व साधा म्हणून सुंदर समास आहे.

सत्यान्वेषणाचें काम चाललें असतां '**वाद**' हाच विशेष उपयोगी पडतो. सत्य बाहेर काढण्यासाठीं जो पूर्वपक्ष, उत्तरपक्ष होत असतो त्यास वाद म्हणतात. हल्लीं जी वादपद्धति सुरू झाली आहे, तिच्या दुष्ट परिणामावरून भगवत्प्रणीत वादपद्धति किती श्रेष्ठ होती, 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' ह्या उक्तीस सार्थकता कशी येत असेल, याचें अनुमान करितां येण्यासारखें आहे.

**अध्यात्मविद्या** म्हणजे आत्मज्ञान. आत्मज्ञान झाल्यावांचून इतर बाह्यविद्या सर्व व्यर्थ आहेत असें मागें अनेक वेळीं सांगितलेंच आहे. 'Know thyself' (तूं कोण आहेस हें जाणून घे) हें प्रमेय साक्रेटिस यानें जोरानें युरोपखंडांत प्रणीत केलें. **कांटच्या** तत्त्वज्ञानाचा मुख्य विषय तोच आहे. अर्थातच आत्मज्ञानाचें श्रेष्ठत्व अवर्णनीय आहे.

(**ऋ**) मेरूच्या सभोंवतीं सूर्याची प्रदक्षिणा होत असते; म्हणजे मेरूच्या शिखरावरून सर्वदा सूर्य दृश्यमान असतो; तेव्हां अर्थातच तो सर्व उन्नत पर्वतांपेक्षां अत्यंत उंच असला पाहिजे. हा देव लोकांचा पर्वत होय. 'हा पर्वत उत्तरध्रुवावरच असला पाहिजे. तेथें अगर ह्या सुमारास प्रथमतः आर्य लोक राहत असले पाहिजेत.' हा प्रो० बाळ गंगाधर टिळक यांचा शोध खरा ठरेल तर मेरू पर्वताची कल्पना, तेथें प्रकट झालेली देवांची वसति, इत्यादि पुष्कळ पौराणिक गोष्टींस यथार्थत्व येणार आहे. वेदपारंगत विद्वान् लोकांनीं इकडे लक्ष्य देऊन त्यांनीं या शोधाची 'भवति न भवति' केली असतां हिंदुधर्माचें सनातनपुराणत्व आणखी एका प्रमाणानें **खरें ठरेल.** जलसंचयांत अमोलिक रत्नांचा उत्पन्नकर्ता व मिठाचें माहेरघर जो **सागर** तो श्रेष्ठ कां हें सांगावयास नकोच. सर्व पृथ्वीवरील स्थावर पदार्थांत **हिमाचल** अत्यंत मोठा आहे हें विधान अद्यापिही सत्य आहे. 'नगाधिराज' ही त्याची पदवी २० वे शतकांत सुद्धां अयथार्थ झाली नाहीं व पुढें कधीं होईल असा संभवही नाहीं. दोन तीनशें मैल रुंद, सोळाशें सतराशें मैल लांब

आणि ५ मैल उंच अशी ही अवाढव्य पर्वतपंक्ति इतरत्र सांपडणें अशक्य होय. **जान्हवीचें** माहात्म्य, तिचें स्वच्छ व मधुर जल, तिचें पवित्र दर्शन इत्यादिक महति आर्यलोकांस सांगण्याचें कारण नाहीं. वृक्षकोटींत **अश्वत्थास** श्रेष्ठत्व आलें तें तो यज्ञोपयोगी म्हणून होय. (ऋ० मं० १० सू० ९७ पहावें) शिवाय या वृक्षाचा औषधाकडेही पुष्कळसा विनियोग करीत असत. हा वृक्ष अनेकशें वर्षे जगतो अशीही पूर्वी प्रचलित समजूत होती. 'अश्वत्थः सोमसवनः' (छांदोग्य); 'एषोऽश्वत्थः सनातनः' (कठ०) असे उपनिषदांत उल्लेख आहेत. सर्प जातींत **वासुकी** व नाग जातींत **अनंत** हे श्रेष्ठ आहेत. वनचर पशूंमध्यें **मृगेंद्र** (सिंह) ह्याचें श्रेष्ठत्व सर्वसंमत आहे. पक्ष्यांमध्यें **गरुडाचें** सामर्थ्य विलक्षण आहे. जलचर मत्स्यांमध्यें **मकर** (मगर, नक्र) हा बलानें, धैर्यानें आणि श्रमसातत्यानें श्रेष्ठ आहे. **वर्षारंभ मार्गशीर्षांत** होई म्हणून **मार्गशीर्ष** श्रेष्ठ होय. षड्ऋतूंत फलपुष्पादिकांस बहर आणणारा 'ऋतूंमध्यें हा पहिला **वसंत**' अत्यंत रमणीय होय.

(**ऌ**) **वाऱ्यासारखा शोधक** दुसरा पदार्थ नाहीं. जल, सूर्य आणि पवन हे पृथ्वीवरील महापराक्रमी रोगहंते व आरोग्याधिपति होत. असो; स्वच्छ व मोकळी हवा ही उत्तम शुद्धि देणारी संजीवनी आहे हें आजला सर्वसंमत आहे. गणितवेत्त्यांचा **काल,** सृष्टीबरोबर उत्पन्न होऊन तिच्या अस्तित्वामध्यें अखंड चालणारा **काल,** कर्मापासून अबाधितपणें उत्पन्न होणारें योग्य फल देणारा **धाता,** उत्पादितपदार्थांस केव्हां तरी स्वाधीन करून घेणारा सर्वस्वहर **मृत्यु,** भविष्यकालीं विकाराचा उदय करणारा **कर्मविपाक** हे आपआपल्या परीनें श्रेष्ठच आहेत: सृष्टवस्तूंचें कारण, त्यांची स्थिति आणि त्यांचा परिणाम ह्या तीनही स्थिती, हे तिन्ही विकार श्रेष्ठ आहेत. सर्व पदार्थमात्रामध्यें **चेतना** ही श्रेष्ठ शक्ति आहे. चेतनेचा एकदा अखंड संयोग झाला म्हणजे पदार्थांतील जडत्व हळू हळू निघून जाऊन पदार्थाला वृक्षकोटींत, पुढें प्राणी कोटींत व पुढें या कर्मभूमींत व शेवटीं श्रेष्ठत्वानें वागणाऱ्या मनुष्ययोनींत जन्म येतो; आणि येथें आत्मज्ञानविज्ञान झालें म्हणजे मुक्ति मिळते. जड हें एकदेशीय आहे. पण चेतनेला चैतन्यस्वरूप आलें म्हणजे ती सर्वव्यापी होते. या जगांतील जड पदार्थांतून चेतनाशक्ति अजीबात काढून घेतली तर जड हें पुनः अदृश्य व अव्यवस्थित होऊन जाईल. तें आहे कीं नाहीं हेंही सांगतां येणार नाहीं. ह्याच आत्यंतिक प्रलय होय. सांख्याचें **अव्यक्त** तें हेंच होय. हें अव्यक्त म्हणजेच '**कांहीं नाहीं**' असें विद्वान पुरुष म्हणेल. म्हणो बिचारा! पण, सर्व चेतना एकवट होऊन चैतन्यस्वरूपी झाल्या म्हणजे त्या सर्वव्यापी, एकरसात्मक शुद्ध व बुद्ध होऊन ब्रह्मस्वरूपानें अखंड राहतील. हेंच ब्रह्म होय. विद्वानास हें अखंडत्वानें प्रत्ययास येतें म्हणून तो 'ब्रह्म नित्य आहे' असें म्हणतो. अविद्वानास हें कळत नाहीं म्हणून तो 'ब्रह्म नाहीं' असें म्हणतो!

(**ॡ**) **मन** हें इंद्रियाधिपति आहे. **राजा** हा नराधिपति आहे. कीर्ति, शोभा, सद्वाणी, यथार्थस्मरण, शुद्धबुद्धि, अलोट धैर्य, शक्तिवंत क्षमा हे गुण समाजपोषक आणि

**धर्मसंवर्धक म्हणून श्रेष्ठ आहेत.** तेजस्वी लोकांचें तेज, **ज्ञानी लोकांचें ज्ञान, कार्यक्षम लोकांची सत्यपरता** Honesty is the best policy **इत्यादि गुण सात्विक आहेत.** उन्मत्तांचें दमन **करावयाचें उत्तम साधन दंड होय.** सन्मार्गास लावणारीं दोन आकर्षणें, दोन मुख्य साधनें, आहेत. पहिलें दंडाकर्षण आणि दुसरें **प्रेमाकर्षण.** यालाच आधुनिक महातत्त्वशोधक स्पेन्सरसाहेब Religions of enmity and Amity (शत्रुत्वमूलक आणि मित्रत्वमूलक धर्म) असें म्हणतात. **स्पेन्सरसाहेबांचे** मतें सर्वत्र मित्रत्वमूलकधर्माच्या तत्वानुसार मानवी वर्तन असावें, असें आहे. **ख्राइस्ट-चेंही** मत हेंच आहे. ख्रिस्तीमताला जी मनोहरता आली आहे ती या मताच्या उत्पाद-काच्या प्रेमातिशयानें होय. 'आत्मवत्सर्वभूतेषु दयां कुर्वन्ति साधवः' असें आमचा सना-तन धर्म सांगतो. असो; पण येथील व्यवहार अत्यंत विलक्षण आहे. उनाड कारट्यांशीं प्रसंग पडला तेव्हां प्रत्यक्ष स्पेन्सरसाहेबांसही प्रेमास्त्रें टाकून देऊन दंडाचा प्रयोग करावा लागला ! ख्राइस्टच्या अनुयायांस **प्रेमधर्मप्रसारासाठीं लाखों लोकांस धारातीर्थी स्नान घालावें लागलें** ! सारांश, उन्मत्त मनुष्यें प्रथम दंडाला वश होतील तरीं प्रेमाला होणार नाहींत. असो; तेव्हां उन्मत्त प्राण्यांचा मद उतरावयाचा असेल तर प्रथमतः अंकुशाचा मारच दिला पाहिजे. मात्र ही दंडयोजना चिरकाल नसावी व तामसवृत्तीच्या नाशार्थ मात्र हिचा उपयोग होत असावा. श्रीकृष्णांनीं तरी हेंच सांगितलें आहे. छल करण्यामध्यें, दुसऱ्यास फसविण्याच्या कामीं, द्यूतासारखी वस्तूच नाहीं ! श्रीकृष्णाविषयीं साशंक असणारी सात्विक पण रहस्यानभिज्ञ मनुष्यें येथें हें पुस्तक रागानें भिरकावून देतील यांत मला तरी शंका वाटत नाहीं. पण या पुरुषास नम्रतेनें एक विनवणी करितों ती ऐकून नंतर मग त्यांना काय करावयाचें तें खुशाल करावें. 'मी दंड आहें' 'मी द्यूत आहें' 'मी मौन आहे' ह्या अशा ज्या परमे-श्वरांनीं विभूति सांगितल्या आहेत, त्यांचें एक रहस्य श्रद्धापूर्वक जाणून घ्यावें अशी त्यांस माझी विनंति आहे. याचें रहस्य काय आहे तें पहाः 'एखादा वाईट पुरुष आहे' असें एकदां आपल्या मनानें घेतलें म्हणजे 'नावडतीचें मीठ आळणी' या न्यायानें त्या पुरुषाचा प्रत्येक गुण, प्रत्येक कृत्य, प्रत्येक संबंध, वाईट, दुष्ट, त्याज्य आहे अशी आपण कल्पना करून घेतों हा **आपला दोष** आहे, त्या पुरुषाचा नाहीं. म्हणून गीतेसारख्या ग्रंथांत दोष काढण्यापूर्वी आपल्यांत कांहीं दोष आहेत कीं काय हें आपण पहावें. असो; द्यूत खेळून दुसऱ्यास फसविण्याच्या कलेमध्यें कांहीं **तेजस्वी बुद्धि** हवी असते. उन्मत्तास दंड करीत असतां जें कार्य प्रदर्शन करावें लागतें त्यांत **सात्विक धैर्याचा** पुष्कळ अंश असतो. खोटें न बोलतां व खोटें न सुचवितां आपलें कारस्थान गुप्त ठेवावयाचें असेल तर 'तुम्हांस माझे बेत मी कळविणार नाहीं' असें सांगण्यास **उत्तम प्रकारची निस्पृहता** असावी लागते. सारांश तेजस्वी बुद्धि, सात्विक धैर्य, उत्तम निस्पृहता जेथें आहेत तेथें परमेश्वरी अंश नाहीं असें म्हणणें सयुक्तिक नाहीं इतकेंच नव्हे, तर अनुभव-विरुद्ध आहे.

(ए) विभूति अध्यायांत रामाचा अवतार आहे. हा बहुधा दाशरथी राम असावा; जमदग्नीसुत भार्गवरामही असूं शकेल. दोघेही अजिंक्य धनुर्धर होते. परशु-रामाचा फरश आणि दाशरथी रामचंद्राचा बाण हे दोन्ही प्रत्यक्ष मृत्यूच होत! 'रामबाण' हा शब्द तेथूनच निघाला. वेदांमध्यें 'वृष्णी' चा अर्थ कार्यपूर्तता करणारा असा आहे. वृष्णी म्हणजेच यादव होत. वासुदेव म्हणजे यादवश्रेष्ठ होय. पांडवांत धनंजय श्रेष्ठ होता.

(ऐ) सारांश वस्तूचें बीज, तिचें सौंदर्य, तिचें सामर्थ्य, तिचें ओज इत्यादि-सर्व परमेश्वराच्या विभूति आहेत. परमेश्वर पदार्थास अस्तित्व देतो. तथापि विशेषतः जेथें असाधारण सौंदर्य, असामान्य बल, तेजस्वी ओज दृष्टीस पडतें तेथें परमेश्वर आहे असें समजावें. तात्पर्य जेथें मन रमतें, उन्नत होतें, पूज्यभाव धारण करितें, तेथें 'देवाची वसति' प्रकट झाली आहे असें समजावें.

५ येथें परमेश्वराच्या अगाध स्वरूपाचा ठाव घेतला नाहीं. कारण तो घेतां येणें शक्य नाहीं. उदाहरणासाठीं कांहीं विभूति सांगितल्या; शेवटीं तात्पर्यानें असें सांगितलें कीं, हें सर्व विश्व अनंत-परमेश्वराचा एक अंश सुद्धां पुरतासा होत नाहीं! हें अनंत स्वरूप समजून घेण्यासाठीं आपल्यासही अनंत झालें पाहिजे. आपल्यास 'अनंत' व्हावयाला म्हणजे 'अनंत आहों' असें समजण्याला अनंत परमेश्वराचा अनुग्रहच हवा.

६ या विभूति अध्यायांत जी देवमालिका आली आहे, त्यावरून वेदांचें प्राबल्य ज्या कालीं अत्यंत होतें, अशा कालांत या गीताशास्त्राचें अवतरण झालें, असें स्पष्ट दिसतें. सर्व देवांचें आधिपत्य इंद्राकडे असून विष्णु व शंकर या देवता अप्रधान होत्या; तेव्हां गीतेचा अवतार झाला असावा. ब्रह्मा, विष्णु व महेश ही त्रयी वेदकालीं प्रमुख नव्हती, हें विचारी पुरुषांस सांगावयास नकोच आहे. रा० नंदुर्गीकर शास्त्री न्यू. इं. स्कूल, हे आपल्या 'रघुवंशाच्या' प्रस्तावनेंत ह्मणतात, त्याप्रमाणें कालीदासाचा जन्म जर खि० श० पूर्वीचा असेल, तर कालीदासग्रंथांत शंकराची प्रामुख्यत्वानें प्रार्थना असल्यामुळें गीताशास्त्र हें कालिदासाच्या आधीं ह्मणजे खि० श० पूर्वी-कांहीं शतकें तरी अगोदर-अव-तीर्ण झालें असलें पाहिजे. 'आदित्य, वसू, रुद्र, अश्विनीकुमार मिळून सगळे विश्वे-देव होतात व त्यांचा अधिपति इंद्र आहे,' अशा काळांत गीता झाली असली पाहिजे. मरुत ह्या ४९ देवता असून त्यांत विद्युयुक्त मरुतांचा श्रेष्ठत्व असण्याचा काळ ह्मणजे पर्जन्यसूक्तें म्हणून इंद्राची प्रार्थना करणाऱ्या ऋषींचा हा उत्तर काल असला पाहिजे. उत्तरकाल येवढ्यासाठीं कीं, कर्मापेक्षां जास्त श्रेष्ठ असा कांहीं पुरुषार्थ आहे, असें कित्येक उपनिषत्कार गर्जनेच्या स्वरानें सांगावयास लागण्याचा हा काल आहे. (भृगु ऋषीचें महात्म्य वेदकालांत फार होतें. त्याला महर्षी ही संज्ञा असून सप्तर्षीमध्यें त्यांची

गणना होती. शिवाय " भगवंतांनीं या अध्यायाच्या सहाव्या श्लोकांत सप्तर्षी आणि **चार मनु** ' हे माझे मानसपुत्र आहेत ' असें म्हटलें आहे: म्हणजे गीता अवतीर्ण झाली त्यावेळी चवथा मनु होता; निदान चार मन्वंतरें होऊन पांचव्या मन्वंतरास आरंभ झाला होता " अशी शंका कदाचित् येण्याचा संभव आहे. पण गीताशास्त्राचा काल निर्णय करणें इतकें सोपें काम नाही. चवथ्या अध्यायाच्या प्रारंभीच 'वैवस्वत' मनूचा उल्लेख स्पष्ट आहे. यावरून 'वैवस्वत' मनूचा प्रारंभ झाल्यावर, अथवा चालूं मन्वंतरांतच गीतेचा उदय झाला. मात्र तो ऋषीकालानंतर लागलीच झालेला आहे. माझी स्वतःची अशी समजूत झालेली आहे कीं, उपनिषत्कालास आरंभ झाल्यानंतर व उपनिषद्विचारांनीं आपल्या अति तेजस्वी प्रकाशोदयानें विचारश्रेष्ठ व ज्ञानपुंगव अशा महापुरुषांचा अज्ञानांधकार नष्ट केल्यानंतर, सामान्य लोकांस ज्ञानप्रकाशाचे किरण प्राप्त व्हावें एतदर्थ गीताशास्त्राचा अवतार झाला. खरेंच आहे. सूर्योदय करणाऱ्या प्रभाताच्या वेळीं प्रथमतः पर्वतांचीं उंच शिखरें मात्र सूर्यरश्मींमध्यें स्नान करूं शकतात. आणि नंतर जसजसा सहस्रकिरण सूर्य क्षितिजावरून निघून स्वच्छ आकाशात उंच उंच भराऱ्या मारूं लागतो, तसतसे सामान्यवृक्ष, मैदानांतील घरें व घरांतील अंगणेंही प्रकाशलहरींमध्यें पोहावयास लागतात. हा अनुभव प्रत्यही आहे. तसाच अद्वैतसिद्धांताचाही प्रकार झाला असला पाहिजे; म्हणजे उपनिषदांतील सिद्धांत तीव्रप्रज्ञास प्रकट झाल्यानंतर सामान्य लोकांसाठीं, मंदप्रज्ञासाठीं आपल्या गीतेचा अवतार झाला असावा; तरीपण हा अवतार ऋषीकालीच झाला असावा. सांख्यांच्या व बौद्धांच्या आणि योग्यांच्या सिद्धांतास स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी गीताशास्त्र प्रकट झाले असले पाहिजे. कारण या शास्त्रांत पद्धतशीर सांख्याचा, सूत्रबद्ध योगाचा अगर नास्तिक बुद्धमताचा परोक्ष अगर अपरोक्ष कोठेंही उल्लेख नाहीं. शारीरिकसूत्रें झालीं त्याच्याआधीं हा काल असला पाहिजे; कारण ज्या श्रुतिस्मृतींच्या आधारानें वेदांतसूत्रांतील अधिकरणें रचिलीं आहेत, त्यांत गीतास्मृतीचा उल्लेख अनेक वेळीं संप्रदाय पद्धतीनें केलेला आहे. पतंजलीभाष्यामध्यें भारतांतील 'पांडव', 'वासुदेव इत्यादि नांवांचा उल्लेख येतो, त्यावरून व ज्याच्या हातून महाभारतासारखा प्रचंड ग्रंथ लिहिला गेला, त्यानेंच गीतेचें उपनिबंधन केलें असलें पाहिजे, असें अनेक अंतःप्रमाणांवरून सिद्ध होत असल्यामुळें पतंजलीच्या अगोदर गीताशास्त्राचा उदय आहे. **वसंत संपात** चालूं असण्यास व **मार्गशीर्षांत** वर्षारंभ व्हावयास कोणता काल असला पाहिजे याचें ज्योतिःशास्त्रानुसार गणित करितां निदान तीन हजार वर्षांनीं तरी मागचा असा हा काल असला पाहिजे, असें के० शं. बा. दीक्षितांसारखे ज्योतिषी म्हणतील असें वाटतें.

एवंच इंद्र, वरुण, अर्यमा इत्यादि देवता ज्या काळीं प्रमुख होत्या, व शिव, विष्णु, ब्रह्मदेव यांस देवाधिपतित्व प्रमुखत्वानें प्राप्त झालें नव्हतें, ऋषींमध्यें भृगु ऋषीचें महात्म्य विशेष असून उत्तरकालीन जे प्रमुख विश्वामित्र त्यांचा प्रमुखत्वानें फारसा नामनिर्देश

होत नव्हता, **नक्षत्रें हीं सर्व फिरणारीं आहेत,** व तीं सूर्यकिरणांनीं प्रकाशित होतात ( पहा मं० ७ सू० ८२ मंत्र. ५ आणि मं० १० सू० ८५ मंत्र २ ) इतकीच ज्यावेळीं ज्योतिषाची ज्ञानमर्यादा होती, **उशना** हाच कवि-[ ऋग्वेदांत 'उशना हा कविपुत्र आहे, काव्य आहे, इंद्राचा मित्र आहे, याच्याच साहाय्यानें इंद्रास वज्राचा लाभ झाला (मं० १ सू० १२१ मंत्र १२; मं० ९ सू० ८७ मंत्र ३)' अशा प्रकारचे उल्लेख येतात. ]- उशना हाच **कवि** म्हणून—ज्यावेळीं मानिला जात असे, व वाल्मिकी इत्यादि पुराण-कर्त्यांचा नामनिर्देश सुद्धां होत नसे, प्रणवाचा, ॐकाराचा व **जपयज्ञाचा** ज्यावेळीं नुकता कोठें उदय होऊं लागला होता, सामवेदच ज्या काळीं गायनाचा आधारस्तंभ होता, वृक्षकोटींत अश्वास आश्रय देणाऱ्या अश्वत्थालाच श्रेष्ठत्व असे, **वसंतसंपात ज्याकाळीं होता,** अशा काळीं गीतेचा उदय झाला. पतंजलीच्या आधीं, कपिलकृत सांख्यसूत्रांच्या अगोदर, योगमार्ग व बौद्धधर्म प्रकट होण्यापूर्वी, हा उदय झाला. निवळ कर्ममार्गापासून परावृत्त होण्यास उपनिषत्काली ज्या ओघास आरंभ झाला, त्याची गीता ही मध्य स्थिति होय. सांख्य व बौद्ध कालांत कर्ममार्ग नामशेष होतो कीं काय अशी भ्रांति उत्पन्न झाली होती. असो; तर गीतावताराचा काल वरील अंतःप्रमाणांवरून ठरवावयाचा म्हणजे ख्रि० श० पूर्वी १५०० व ५०० वर्षांच्या दरम्यान केव्हां तरी गीताशास्त्राचा उदय झाला असला पाहिजे. वृद्ध संप्रदायानुसार पाहिलें असतां धर्मराज्याचे अखेरीस कलियुगास आरंभ झाला व कलीस आज ५००० वर्षे होऊन गेलीं! तेव्हां ख्रि० श० पूर्वी ३००० वर्षांच्या मागें गीता प्रकट झाली असावी असें होतें. अर्थातच हा वाद पुराणवस्तुविवेचकांनीं करावयाचा आहे. दहाव्या अध्यायांत ज्या पदार्थांचा नाम-निर्देश झाला आहे, त्याच्या अनुसारें माझें वरील विवेचन आहे. गीतेची भाषा, साधे वृत्त, 'ह' 'धे' चें दर्शन, वृत्ताक्षरासंबंधें अनियमितपणा, साध्या संधी-नियमांचें वारंवार उल्लंघन, महाव्याकरणकार जो पाणिनि त्यास असंमत असणारीं 'प्रसविष्यध्वम्' सारखीं शब्दरूपें, इत्यादिकांवरूनही गीताशास्त्राचें पुराणत्व ठरविण्यास अनेक साधनें आहेत. सारांशतः मला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, 'पुराणें' उत्पन्न होण्यापूर्वी व 'वेद व उपनिषदें' यांच्या द्वारें मात्र पुरुषार्थाचें साधन करावयाचा प्रघात असे त्यावेळीं—हें शास्त्र अवतीर्ण झालें.

---

## खंड ११ वा.

## अकराव्या अध्यायाचा उपसंहार.

आपल्यासारख्या प्राकृत व संसारी मनुष्यास अकरावा अध्याय जितका चमत्कृति-जनक आहे, तितकाच तो परोक्ष ज्ञानी लोकांस विज्ञान देणारा आहे. येथें परमेश्वरांनीं

अर्जुनास समजेल असें विश्वरूप दाखविलें आहे. ह्या अध्यायांत प्रश्न फारसे नाहींत. (१) अर्जुनाची विश्वरूपदर्शनाविषयीं प्रार्थना, (२) दिव्यदृष्टीचें दान आणि विश्वरूपदर्शन, (३) अर्जुनानें तात्काळ केलेलें स्तवन, अथवा अर्जुनाचें प्रेमळ व भक्तिशुद्ध स्तोत्र आणि विश्वरूपदर्शनाचें महात्म्य आणि फलश्रुति इतकेच काय ते विषय येथें विचारणीय आहेत. या प्रश्नाचा आतां यथाक्रम विचार करूं.

## विश्वरूपाचे दर्शनाविषयीं अर्जुनप्रार्थना.

अर्जुन म्हणतो; "कृपावत्सल आणि भक्तकामकल्पद्रुम परमेश्वरा! माझ्यावर आणि माझ्या निमित्तानें सर्व विश्वावर अनुग्रह करणाच्या हेतूनें आपण, 'तूं कोण आहेस?' (Know thyself) या 'त्वं' पदार्थासंबंधें पहिल्या सहा अध्यायांत जें व्याख्यान दिलें, अध्यात्मज्ञानाचा आपण मला क्रमाक्रमानें जो उपदेश केला, येणेंकरून माझें सर्व अज्ञान 'तूं, मी, माझें, परक्याचें' असा जो भिन्नभाव होता, माझ्या ठिकाणीं जो अहंकार होता व विषयवासना होती, सारांश जें पूर्ण अज्ञान होतें, तें सर्व माझ्या समजुतीनें निरस्त झालें आहे. जीवांच्या स्वरूपाला म्हणजे आत्म्याला शोकमोहांचें कांहीं कारण नाहीं. तो विषयांहून, इंद्रियांहून, मनाहून, बुद्धीहून, आणि अहंकाराहून, भिन्न असून शुद्ध आहे, स्वयंप्रकाश आहे, पूर्ण आहे, नित्य आहे, अजर आहे, अमर आहे व सनातन आहे, अशी माझी दृढ समजूत झाली आहे. हें असें जें परम गुह्यज्ञान तें मला प्राप्त झाल्यामुळें माझें स्वस्वरूप मला 'निकें कळलें; गुरुराय जे आपण त्या आपला हा माझ्यावर अत्यंत असामान्य अनुग्रह होय.' परमेश्वरा! येवढीच आपण मज दीनावर कृपा केली असती तरी आपल्या या अद्वितीय उपकाराप्रीत्यर्थ मला उतराई होतां आलें नसतें. पण आपला कृपेचा ओघ याहीपलीकडे गेला आहे. सातव्या व्याख्यानापासून तों आतांच संपलेल्या दहाव्या व्याख्यानापर्यंतच्या ४ व्याख्यानांमध्यें आपण 'तत्' पदार्थ जें परब्रह्म याची ही मीमांसा मला सांगितली आहे. माझ्या सभोवार जीं अनंत विश्वें दिसत आहेत व या प्रत्येकांत जे अनंत पदार्थ ओतप्रोत भरलेले दिसत आहेत, सारांश हें जें दृश्य विश्व मला गोचर होत आहे, तें वस्तुतः दिसत आहे, तसेंच नसून स्वरूपतः तें परब्रह्मच आहे अशी माझी समजूत झाली. परमेश्वरा! या दिसणाऱ्या विश्वाचा उद्भव व त्याचें उत्क्रमण आपल्याच सत्तेनें होतात; या विश्वाचे आदिकारण व संहारकारण, या विश्वाची आदिस्थिति आणि लयस्थिति, या विश्वाचे आविर्भाव आणि तिरोभाव या सर्वांचें अधिष्ठान परब्रह्मच असून तें शुद्ध, नित्य, अजर, अमर, पुराण, सनातन, अक्षय्य, अविकारी, अनादि, अनंत आणि स्वयंप्रकाश आहे, हेंही मला समजलें. एवंच त्वं पदार्थ जो प्रत्यगात्मा आणि तत्पदार्थ जें परब्रह्म, या उभयतांत लवमात्रही भेद नाहीं, दोन्हीं एकच आहेत, असेंही मला समजलें आहे. ह्याचप्रमाणें भक्तवत्सला! ह्या अज्ञानी जगाच्या उद्धाराप्रीत्यर्थ परब्रह्मास प्रकटत्व प्राप्त होऊन तें परमे-

श्वरस्वरूपानें व सगुणस्वरूपानें आविर्भूत होतें; तसेंच, त्या परमेश्वराकरवींच सर्व सृष्टि-स्थितिलयादि व्यापार चालले असून तो स्वतः निर्लेप आहे; कर्माकर्मानुसार विश्वतोमुख फलदाता तोच असून स्वतः असंग आहे; हें त्या परमेश्वराचें (म्हणजे अर्थातच आपलें) माहात्म्य मीं ऐकिलें. याचप्रमाणें प्रत्यगात्माही असंग व निर्लेप असला पाहिजे असें मला वाटतें. सारांश याप्रमाणें गुह्यज्ञान आणि माहात्म्यश्रवण या उभयतांच्या साहाय्यानें माझें अज्ञान माझ्या समजुतीप्रमाणें नष्ट झालें असें मी म्हणतों, तरी मला एक वासना राहिली आहे! ती वासना ही कीं, आपल्या या पारमेश्वरी स्वरूपाचें दर्शन या डोळ्यांस होऊन त्यांचें पारण फिटावें. आपण ज्ञानस्वरूप सांगितलें आहे, तसेंच तें असलें पाहिजे यांत मला काडीमात्र शंका नाहीं. पण भगवंता! आमच्यासारख्या संसारी जीवांची श्रद्धा दृढ होण्याला प्रत्यक्ष दर्शन ही 'रामबाण मात्रा' आहे; तसें दृढीकरण हजारों व्याख्यानांनींही होणार नाहीं. प्रत्यक्षानु-भवासारखें श्रद्धादृढीकरणाला दुसरें साधन नाहीं. हे दयाघन परमेश्वरा! एतदर्थ आपण इतकी अनुग्रहपरंपरा केलीं, तीच परंपरा पुढें वाढवून, मला एकदां परमेश्वरी स्वरूपाचें दर्शन द्यावें. 'मी योग्य आहे,' असें आपल्यास वाटत असेल तर कृपा करून आपण मला विराट्स्वरूप दाखवावें. आपण काय वाटेल तें करण्यास समर्थ आहां, म्हणून आपल्यास ही मी प्रार्थना करीत आहे. भगवंता! आपलें अव्यय स्वरूप मला एकदां दाखवावें."

अर्जुनाचे प्रार्थनेचा हा सारांश आहे. ज्ञान झालें तरी विज्ञान अवश्य आहे. विज्ञान म्हणजे साक्षात्कार होय. हा साक्षात्कार गुरुप्रसादानें किंवा परमेशानुग्रहानें व्हावा लागतो. 'सर्व एकच आहे,' असें कळलें तरी 'सर्व एकच आहे' असें उमजल्यावांचून, पाहि-ल्यावांचून, मनाची तळमळ तुटत नाहीं व अखंड शांति मिळत नाहीं. परब्रह्म ही वस्तु इंद्रियाला किंवा मनबुद्धीला गोचर नाहीं; तिचें दर्शन व्हावयाचें तें आत्मस्वरूपाच्या ज्ञान विज्ञानानें व्हावें लागतें. **परब्रह्माचें स्वरूप आहे, तसा अनुभव येण्याला आपणही तसेंच झालें पाहिजे."** 'जलामाजी मासा। झोंप घेतो कसा? । जावें त्याच्या (माशाच्या) वंशा। तेव्हां कळे! ॥' ही संतोक्ति येथें बराबर लागू पडते. सारांश आत्मस्वरूपाची ओळख पटल्याशिवाय ब्रह्मस्वरूपाचें विज्ञान होत नाहीं आणि हें विज्ञान झाल्या व्यतिरिक्त संशय तुटत नाहीं, भेद मोडत नाहीं, पाप सरत नाहीं, तात्पर्य संसार मरत नाहीं. 'त्वं' पदार्थाचा भगवंतांनीं प्रथम अवतार केला त्याचें स्वारस्य तरी हेंच होय. असो; आपण आतां विश्वरूप पाहावयास जाऊं या.

## विश्वरूप प्रदर्शन.

२. अर्जुनासारख्या निष्काम भक्तानें अंतःकरणपुरःसर प्रार्थना करण्याचा मात्र अवकाश असतो. प्रार्थना केली कीं, फल हात जोडून तयारच असतें! प्रस्तुत प्रसंगीं

तर अत्यंत मोठाच चमत्कार झाला. तो असा: परमेश्वर हा सर्वदां आपल्या विश्वव्यापी स्वरूपामध्येंच असतो. आपल्यास त्याचें सत्स्वरूप दिसत नाहीं, ही **परमेश्वराची अवकृपा नव्हे;** तर **आपली संकुचित इंद्रियवृत्ति या आपल्या अंधळेपणास कारण आहे.** आत्मदृष्टीनें पाहिल्यास 'आपल्यासुद्धां सर्वच परमेश्वर आहे,' असा अनुभव येईल, यावा व येतो. पण आपण असल्या चर्मचक्षूंनीं, आपल्या कालस्थलोपाधित मनानें व कार्यकारणघटित व सामान्यविशेषनिर्मितबुद्धीनें, पहावयास जातों, म्हणून आपल्यास भिन्नता, विचित्रता, सारांश विषमता दृष्टीस पडते. इंद्रियांनीं आपल्यास बांधिलें आहे, अज्ञानानें आम्हां जीवांस दास केलें आहे म्हणून आपण 'जगणारे, मरणारे, रडणारे, किंवा हंसणारे' होतों. वस्तुतः आपलें स्वरूप निर्मळ असतांही मलीन आरशांतून आपण पाहतों म्हणून आपल्यास आपण मळीन वाटतों. असो; अर्जुनाची चर्मदृष्टि काढून टाकून तेथें आत्मदृष्टीची स्थापना केल्याबरोबर 'चतुर्भुज, शंखचक्रादिमंडित, श्यामल श्रीकृष्णमूर्ति' विलीन होऊन सर्व विश्वंभर परमेश्वराचें अवर्णनीय स्वरूप प्रकट झालें! मग काय विचारतां? अखिल विश्वासास प्रकाश देऊन जगतांचे सर्व व्यवहार चालविणाऱ्या सूर्याची तेजस्वी प्रभा कोणीकडे मावळून जाऊन त्याच्या ऐवजीं कोटी सूर्यांची अतितेजस्वी प्रभा एकसमयावच्छेदेंकरून एकवट झाली कीं काय, असा भास त्या अर्जुनास झाला! जिकडे पहावें, तिकडे परमेश्वरी स्वरूप आपल्या अद्वितीय तेजानें प्रकाशूं लागलें. अनेक हजार तोंडें, अनेक सहस्र डोळे, अनेक अयुत हातपाय इत्यादि अवयव दृग्गोचर झाले. आकाश व पृथ्वी यांमधील अंतर सर्वशः व्यापणाऱ्या या मूर्तीचे अनंत अवयव अतिदिव्य अलंकारांनीं शृंगारलेले आहेत, दिव्य आणि अमोघ अशीं अगणित शस्त्रास्त्रें परमेश्वराच्या अनंत हस्तांत झळकूं लागलीं आहेत, अदृष्टपूर्व असे अनेक चमत्कार (mysteries and miracles) मनास थक्क करून सोडीत आहेत, दिव्यगंधी हजारों माळा परमेश्वराच्या अंगावर रुळत आहेत, अलौकिक सुवासाच्या मधुरगंधानें आकाशपाताळ दरवळून गेलें आहे, पहावें तिकडे चंचल मनास स्तब्ध करणारे, व भूतभविष्य कळविणारे शतावधि असामान्य चमत्कार, पाहणारास चित्रासारखे तटस्थ करीत आहेत, त्या परमेश्वराच्या अपरंपार, विराट व नानाविध स्वरूपाच्या एका कोंपऱ्यास कोठें हें आमचें 'विस्तीर्ण व नानाविध जग' एकवट होऊन जाऊन पडलें आहे, असा मानवी मनास, मानवी वाणीस व मानवी लेखणीस सर्वथा अगोचर असा हा चमत्कार पाहून आत्मदृष्टीनें पाहणारा अर्जुनसुद्धां हर्षचकित झाला, आश्चर्यानें स्तब्ध झाला! हा अलभ्यलाभ पाहून तो आनंदाच्या अगाध सागरामध्यें यथेच्छ बुडया मारूं लागला, यांत काय आश्चर्य आहे? 'ताजमहाल' सारखी मनुष्यकृत पण अतिदिव्य शुद्ध इमारत पाहून जर आपण क्षणएक देहभान विसरून जातों तर सर्वोत्कृष्ट सद्गुणांचें, सौंदर्याचें व सद्वस्तूचें हें अगाध, अपार व अनंत स्वरूप पाहून अर्जुन चित्रासारखा तटस्थ झाला, यांत काय आश्चर्य आहे? **कोणीही झाला म्हणून काय, येथें आश्चर्यानें स्तब्धच व्हावयाचा; कारण येथें अद्भुतरसच मूर्तिमंत अवतरला आहे! धन्य त्या अर्जुनाची माउली कीं, ती अशा भक्तश्रेष्ठ पुरुष-**

पुंगवास प्रसवली! या अभिनवसोहळ्याचें काय वर्णन करावें? लेखकांची अगर वाचकांची कल्पनाशक्ति जितक्या उंच भराऱ्या मारील त्यांच्या अनंतपटीनें गुणगणमंडित असणाऱ्या या विश्वरूपी दयाघनाचा जेव्हां प्रत्यक्ष साक्षात्कार झाला असेल तेव्हांचा अर्जुनाचा आनंद परमावधीचा असेल यांत शंका नाहीं. त्यास अति आनंद झाला, अतिआश्चर्य वाटलें. त्याची वृत्ति अति नम्र झाली. पूज्यभाव त्याच्या अंतकरणीं दाटला. त्यानें श्रीभगवंतास आदरपूर्वक शिरसाष्टांग नमस्कार घालून हात जोडले आणि परमेश्वराचें स्तवन करण्यास आरंभ केला.

## अर्जुनाचें प्रथम स्तोत्र.

अर्जुनाचें हें प्रथमस्तोत्र वाचकांनीं अतिशय काळजीपूर्वक वाचावें. अर्जुनानें स्वयंभू स्फूर्तीला वश होऊन जें हें परमेश्वराचें स्तोत्र गाईलें आहे, तें आपल्यापैकीं प्रत्येकानें प्रत्यहीं वाचावें अशा योग्यतेचें आहे. त्यांतील नुसते एकच विशेषण उदाहरणार्थ घेतलें तरी त्यांत सर्वेश्वराचें विश्वरूपत्व प्रकट होत आहे. 'तुला अनेक हात, अनेक उदरें, अनेक मुखें व अनेक नेत्र आहेत' या एका आधिभौतिक (Physical) विशेषणावरून केवढा बोध होतो पहाः हस्ताचा उपयोग कर्म करण्याचा आहे. ईश्वर आप्तकाम आहे तरी सदैव अलिप्तपणानें कर्म करीत असतो. अलिप्तपणाचें कर्म समाजांत वाढूं लागणें, हेंच त्या समाजाच्या प्रगतीचें, ईश्वरीमार्गक्रमणाचें लक्षण आहे असें यावरून सिद्ध होतें, नव्हे! असो; अलिप्तपणानें सत्कर्म करीत रहावें, असा हा भगवंतांचा अभिप्रायच परोक्षरीतीनें प्रकट झाला आहे. त्याला अनेक उदरें आहेत, याचा अर्थ तो सर्व यज्ञांचा, अलिप्तकर्मांचा भोक्ता म्हणजे संचय करून ठेवणारा पुरुष आहे. निष्कामकर्म फार होऊं लागलें तर विश्वव्यवस्था चालणार नाहीं अशी स्पेन्सर साहेबांस भीति पडली होती, तिचें निराकरण भगवंतांनीं आधींच करून ठेविलें आहे! तें काय कीं, निष्काम कर्मांचा संचय कधींही व्यर्थ होत नाहीं. भौतिक संपत्ति जास्त वाढण्याचा प्रसंग येऊन त्या संपत्तीला ऊत आला तर तो कर्मसंचय जीवांची मानसिक संपत्ति वाढवितो आणि समाजांत जीवनयात्रा सुलभ करून अनेक प्रकारांनीं व दिशांनीं ज्ञानाचा उदय होईल अशी व्यवस्था अमलांत आणितो. सारांश, निष्कामकर्म केव्हांही वांया जात नाहीं. परमेश्वरास अनेक मुखें आहेत. तात्पर्य हें कीं, ब्रह्मदेव चार मुखांनीं चार वेद बोलला. पण या ब्रह्मदेवी वेदांत प्रकट झालेलें ज्ञान–विज्ञान आजमित्तीस आपल्यापर्यंत येऊन पोहोंचलेल्या वेदांत प्रकट झालेलें व होणारें ज्ञान–हेंच ज्ञानसर्वस्व आहे असें कोणीही समंजस पुरुष म्हणूं शकणार नाहीं. कारण ज्ञान अनंत आहे, तेव्हां त्याचें प्रकटीकरण करण्याचीं द्वारेंही अनेक म्हणजे अनंतच पाहिजेत. शिवाय प्रत्येक मनुष्य देवास भक्तिपुरःसर आळवूं लागला म्हणजे देव त्याच्याशीं बोलतो, तेव्हां इतक्या भक्तांशीं एकसमयावच्छेदेंकरून बोलावयाचे झालें म्हणजे देवाला तोंडेंही अनेकच हवींत! तसेंच तो

सर्वसाक्षी आहे हें दाखविण्यासाठीं त्यानें विश्वरूपांत अनेक नेत्रही धारण केलें आहेत. अनेक याचा अर्थ येथें अनंतच घेतला पाहिजे. कारण त्याच पंक्तींत 'अनंतरूप' असा शब्द आहे व १९ व्या श्लोकांत 'अनंतबाहु' असें विशेषण आहे. शिवाय अनेक तोंडें असल्यावर तेथें दुप्पट-अनेक-हात हवे असतील. पण ज्याअर्थी 'अनेक' हाच शब्द सर्वत्र ठेविला आहे त्याअर्थी 'अनेक' म्हणजे 'अनंत' असाच परमेश्वराचा अर्थ असला पाहिजे. 'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्' येथें हजार डोकीं, हजार डोळे व हजार पाय विराट पुरुषाला असतात, असें वर्णन आहे. पण हजार डोकीं असलीं कीं दोन हजार डोळे असावयाचेच. म्हणून 'हजार' याचा अर्थ अनंत होय. असो; आतां तो परमेश्वर सर्वव्यापी आहे; तेव्हां जेथें पहावें. तेथें त्यास 'अनंतबाहूदरवक्त्रनेत्र,' दिसतीलच दिसतील. तात्पर्य तो सर्वव्यापी, सर्वकर्ता, सर्वभोक्ता, सर्वसाक्षी, व सर्वज्ञ आहे हें सिद्ध आहे.

असो; एकाच विशेषणावरून उद्‌बुद्ध होणारें हें ईश्वरी स्वरूप झालें. सर्व विश्व हेंहीं ईश्वरामध्येंच अंतर्भूत होत आहे, हा सिद्धांत 'परमेश्वर आकाशव्यापी आहे,' यावरूनच सिद्ध होतो. पुनः हें विश्वरूपांत अंतर्भूत होणारें विश्व भयाकह आहे, येथें नुसत्या विश्वाचाच आश्रय धरून 'शम' मिळणार नाहीं असें अर्जुन २४ वे श्लोकांत म्हणतो. ( ३ ) तसेंच जीव हाही देहदृष्टीनें नश्वर आहे, ( श्लोक २६-२७ पहा ). जीवदृष्टीनें जीव हा दासत्वास योग्य आहे, ज्ञानदृष्टीनें स्तुतिपाठक होण्यास व दैवीसंपत्तियुक्त असेल तर तादात्म्यास योग्य आहे असें श्लोक २१ व २६ यांवरून स्पष्ट होतें. तसेंच कर्मविपाक हा जीवास जन्ममरण देण्यास समर्थ आहे, तोच जन्ममरणास कारण होतो, असें २६-३० श्लोकांवरून स्पष्ट होतें. असे अनेक प्रकारचे बोध या स्तोत्राच्या साहाय्यानें उद्‌भूत होतात. फार काय सांगावें ? ज्यानें सार्थ गीतापाठ प्रत्यहीं करण्याचा फलद्रूप संकल्प केला आहे, त्यास प्रत्यहीं उत्तमोत्तम नवीन अर्थ प्रकट होतात, हें स्वानुभवानें ज्याचे त्यास कळणार आहे. दिव्यदृष्टि प्राप्त झाली, तथापि अर्जुनाला तें अनंतस्वरूप एकसमयावच्छेदेंकरून दिसलें नाहीं. अर्जुनाची दृष्टि जसजशी वळली, तसतसें अनंताचें अनंतस्वरूप अर्जुनास कांहींसें दिसलें. अर्जुनानें जें पाहिलें त्याचेंच तो वर्णन करीत आहे.

( अ ) हे परमेश्वरा ! आपल्या या विश्वव्यापी देहामध्यें मला सर्व तेहतीस कोटींचे देव व त्यांचे मुख्य नायक ( विष्णु, शंकर, वासव, पावक, अग्नि अश्विनीकुमार इत्यादि ) दिसत आहेत. याच प्रमाण सर्व चराचर वस्तु व त्यांचे संघ ही माझ्या दृष्टीस पडतात. इतकेंच काय, पण सृष्टि-उत्पन्नकर्ता ब्रह्मदेव आपल्या कमलासनावर बसलेला मला येथें दिसत आहे. पृथ्वी हें कमल आणि मेरुपर्वत हा **कर्णिकार**, म्हणजे कमलपुष्पांतलि दंड, होय. ब्रह्मदेवाचें आसन तें हेंच होय. ह्याचप्रमाणें सर्व ऋषी व विशेषतः सप्तऋषी मला दृग्गोचर होत आहेत. हे सप्त ऋषी म्हणजे पहिले ब्रह्मदेवपुत्र आणि पहिले प्रजापतीच होत. पृथ्वीस आंवरून धरणारा शेष ( शेष, अनंत हे शब्द आवंत्य

अपारता, या अर्थाचे वाचक आहेत. पृथ्वी शेषाच्या मस्तकावर आहे, याचा अर्थ अनंताच्या आश्रयानें सांत प्रकट होतें असाच करावयाचा. सांत वस्तु ह्या अनंत सागरावरील लहरी आहेत. समुद्राच्या लहरी वर खालीं आंदोलन करितांना दिसतात म्हणून समुद्र हेलकावे खात आहे असें आपण म्हणतों. लहरींत पाणी असतें, पाण्यापासून लहरी उत्पन्न होतात आणि पाण्यांतच लीन होतात. ह्याचप्रमाणें अनंतापासून सांत वस्तु उत्पन्न होतात. ह्या वस्तूंच्या अस्तित्वकालींही अनंत हें त्यांच्यांत ओतप्रोत भरलेलें असतें आणि ह्या वस्तु अनंतांतच लीन होतात. सारांश सांत जी पृथ्वी ही अनंताची एक विभूति आहे. या अनंतालाच 'शेष' ही संज्ञा प्राप्त झाली. पण या संज्ञेचें पूर्ण रहस्य विदित नसल्यामुळें 'शेष' म्हणजे नाग, सर्पजातिविशिष्ट प्राणी, असा अर्थ होऊन व 'सर्पाच्या डोकीवर वारूळ असतें' हा प्रत्यक्ष अनुभव लक्ष्यांत येऊन सर्पाच्या पाठीवर पृथ्वी आहे अशी सामान्य लोकांची समजूत झाली. असो; अनेक समजुतींपैकींच ही एक समजूत हिंदु लोकांमध्यें प्रचलित आहे असें पाहून आम्हीं पौरस्त्य आर्यलोक पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या व अतज्ज्ञांच्या उपहास्यतेचा विषय होऊन बसलों आहों! 'शेष'=अनंत हा वास्तविक अर्थ आमच्यापैकीं बहुतेक लोक विसरले व युरोपियन लोकांस हा अर्थ अवगतच झाला नाहीं, ह्मणून आमची उपहास्यता चालू आहे. असेना बापडी! आमचा उपहास झाला म्हणून पृथ्वीला अनंताचा आश्रय सोडितां येणार नाहीं; सारांश सिद्धांताला बाध येत नाहीं. सर्व जगचालक परमेश्वर हा अव्यक्तास व अनंतास आपल्या स्वाधीन करून ठेवितो म्हणून त्यास शेषशायी ह्मणतात. (विष्णूचें शय्यास्थान व पृथ्वीला आश्रय देणारे 'उरग' अर्थातच दिव्य होत.) एवंच "परमेश्वर स्वरूपांत तेहतीस कोटींचे देव, सर्व चराचर अनंत पदार्थ, सृष्ट्युत्पादक श्रीमद्ब्रह्मदेव, प्राथमिक प्रजापती आणि पृथ्वीचे व सर्व विश्वाचे आधारभूत दिव्य 'उरग' माझ्या दृष्टीस पडत आहेत. परमेशा! आपले हे अनंत हस्त, आपलीं अनंत उदरें, अनंत वदनें, अनंत नेत्र इत्यादिकांच्या योगानें आपण सर्वथा, सर्व बाजूंनीं, अनंतरूप आहां असें मला दिसत आहे; कारण आपल्या देहाला आरंभ कोठें झाला, देहमध्य कोणता आणि देह संपला कोठें याचा मला अंतच लागत नाहीं. जिकडे पहावें तिकडे विश्वरूप व त्याचा अधिपति हें दर्शन आहे. आपलें तेजही अति विलक्षण आहे. अनेक कोटी अग्निदेवता व अनेक कोटी सूर्य एकवटून जरी एकत्र केले, तथापि त्यांची सर्व प्रभा आपल्या तेजस्वी तेजापुढें फिकी पडून जाईल. या अप्रतिम तेजामुळें जें स्वरूप मला दिसतेंसें भासत आहे त्याकडेही मला बघवतनासें झालें आहे. भक्तवत्सला! या आपल्या अपरिच्छिन्न स्वरूपाच्यासंबंधें मला एक अनुमान काढितां येतें तें हें: आपण अविनाशी आहां; आपलें स्वरूप समजेल तर 'जन्मा आलीयाचें सार्थक' होईल; कारण जाणावयास योग्य अशी वस्तु म्हणजे आपलें स्वरूप होय. या यच्चावत् विश्वाला आपलाच आश्रय असला पाहिजे. शाश्वतधर्म आपणच संरक्षितां. प्राण्याचें कल्याण करून जीवयात्रा सुकर व सुखकर करूनही जन्ममरणास मारणारा तो शाश्वतधर्म होय. आपण

सनातन आहां." ( हें परमेश्वराचें वर्णन आणि 'त्वं' पदार्थाचें लक्षण हीं किती एकसारखीं आहेत, हें सुज्ञ वाचकांस सांगण्याचें कारणच नाहीं. 'त्वं' पदार्थ म्हणजे प्रत्यगात्मा आणि 'तत्' पदार्थ म्हणजे ब्रह्म या उभयतांची एकवाक्यता आहे, असें ठरविण्यासाठीं अर्जुनाकडून हा श्लोक प्रत्यक्षानुभवानुसार परमेश्वरांनीं वदविला आहे काय ? )

असो; १९ व २० व्या श्लोकांत अर्जुनानें जो आपला स्वानुभव वर्णिला आहे त्याचें काळजीपूर्वक पठन विचारदृष्टीनें केलें असतां '**चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्योऽजायत। मुखादिंद्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत। नाभ्या आसीदंतरिक्षं शीर्ष्णोद्यौः समवर्तत। पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाँ अकल्पयन्।** ( ह्या विश्वरूपाच्या मनापासून चंद्र, चक्षूपासून सूर्य, मुखापासून इंद्र व अग्नि, प्राणापासून वायु, नाभीपासून अंतरिक्ष, शिरापासून आकाश, पायांपासून पृथ्वी, कानापासून दिशा व सर्व लोक निर्माण होते झाले. ) हें पुरुषसूक्तांतर्गत विश्वोत्पत्तिप्रकरण कोणाच्या लक्ष्यांत येणार नाहीं ? असें हें अद्भुत, अदृष्टपूर्व आणि ह्मणून अति आश्चर्य आणि अत्यंत पूज्यबुद्धि उत्पन्न करणारें विश्वरूप पाहून अर्जुनास अत्यंत संतोष झाला, त्याची भक्ति दृढ झाली, त्याचा संशय निरस्त झाला आणि तो परमेश्वराचा दासानुदास होऊन गेला ह्यांत काय आश्चर्य आहे ?

( **आ** ) अशी अर्जुनाची तयारी झाली म्हणजे तो ज्ञानाला अधिकारी झाला असें पाहून त्याचा तो अधिकार दृढतर करण्यासाठीं परमेश्वरानें अर्जुनास पुढील चमत्कार दाखविला. तो चमत्कार असाः **अर्जुन** म्हणतोः "परमेश्वरा ! मला भविष्यमाण गोष्टी दिसूं लागल्या आहेत. आपल्या या शरीरामध्यें अनेक देव प्रवेश करूं लागले आहेत. दुष्टांचा नाश करून पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं ज्या अनेक देवदेवतांनीं मृत्युलोकीं अवतार धारण करून हा सर्वांतक युद्धप्रसंग उत्पन्न केला, ते हे देव आपआपलीं मर्त्यरूपें सोडून देऊन पुनः विश्वरूपांत शिरूं लागले आहेत; कारण त्यांच्याकडे सोंपविलेला कार्यभाग यथासांग सिद्धीस गेला आहे. सारांश दुष्ट लोकांचा वध झाला आहे. ज्यांस हा अतिघोर प्रसंग पाहावत नाहीं परंतु पळतांही येत नाहीं, त्यांनीं हस्तद्वय जोडून आपली स्तुति करण्यास आरंभ केला आहे. 'सर्वांचें कल्याण व्हावें' अशी इच्छा धारण करणारे व तत्प्रीत्यर्थ श्रम साहस करणारे हे महर्षि, हे सिद्ध इत्यादि साधु आपली ही अति भयानक स्वरूपोग्रता पाहून भयभीत झाले आहेत आणि 'हा काय सर्व विश्वाचें भक्षण करणारा प्रलयकालच प्राप्त झाला कीं काय ?' असें उत्पातादि लक्षणांवरून अनुमानून 'कल्याण होवो, शांति असो, पुष्टि असो' एतत्प्रीत्यर्थ अति नम्रपणानें, संपूर्ण पूज्यभावानें आपली पुष्कळशी महती गात आहेत. एकादश रुद्र, द्वादश आदित्य, अष्टवसु, साध्य, विश्वेदेव, अश्विनीकुमार, ४९ मरुत आणि संपूर्ण पितर, त्याचप्रमाणें संपूर्ण यक्ष, गंधर्व, राक्षस, सिद्ध इत्यादि उपदेव, हे सर्व आपलें हें उग्रस्वरूप

पाहून विस्मित होत्साते चित्रासारखे तटस्थ उभे राहिले आहेत. आपल्या या कराल, भयंकर, विश्वस्वरूपानें सर्वांच्या मनांत भीति उत्पन्न झालीशी दिसत आहे. प्रत्यक्ष आकाशास जाऊन भिडलेलें हें आपलें भयानक तेजस्वी विश्वरूप, भेसूर आणि चित्रविचित्र रंगांनीं अति भीतिप्रद झालें आहे. आपला हा अक्राळविक्राळ जबडा, आपले हे अतिउग्र आणि इंगळासारखे लाल असलेले डोळे इत्यादि पाहून भगवानजी! माझें धैर्य केव्हांच मला सोडून चालते झाले! मला कांहीं सुचत नाहीं; मी, अगदीं गर्भगळित होऊन गेलों आहें. कृपानिधे! प्रलयकालीन संवर्तक अग्नीप्रमाणें सर्वस्व भस्म करणारीं आपलीं पेटलेलीं हीं भयंकर व विक्राळ तोंडें पाहून माझें अंतःकरण बावरून गेलें आहे, माझें मन थाऱ्यावर नाहीसें झालें. भगवन्! दयानिधे! भक्तवत्सला! कृपा करून, मी आतां मरतों कीं काय अशी मला चिंता पडली आहे!

हरहर! हे पहा धृतराष्ट्राचे शंभर मुलगे, माझे सर्व चुलतबंधु, सारांश कौरव आपआपल्या मित्रांसहवर्तमान, युद्धास आलेल्या सर्व राजांसहवर्तमान, हे भीष्मराज, हे गुरुद्रोण, हा सकलश्रेष्ठ धनुर्धर अंगराजा, आमच्याकडील बहुतेक सर्व अवनिपाल, हे सगळेच्या सगळे हे भगवंता! आपल्या या सर्वभक्षक व सर्वसंहारकारी मृत्युमुखामध्यें जाऊन पडत आहेत. अरेरे! काय यांची ही दशा? अरेरे! आपल्यास आधार देणारा जो पर्वत त्याचा त्याग करून, त्याला सोडून देऊन, अविचारानें मार्गभ्रष्ट झालेली नदी आपल्या सर्व पाणलोटासह ज्याप्रमाणें अधिकाधिक जोरानें समुद्रामध्यें जाऊन पडते व नामशेष होऊन जाते, त्याचप्रमाणें हे पृथ्वीस अलंकृत करणारे नरवीराशिरोमणी, धर्मच्युत झाल्यामुळें आपापल्या कर्मविपाकानें, भगवंता! आपल्या या रसरशीत पेटलेल्या क्रव्यादमुखामध्यें जाऊन पडत आहेत! हाय हाय! मोठा प्रज्वलित असा स्वच्छ दिवा पाहून कांहीं तरी कमनीय पदार्थ आहे अशा भ्रामक समजुतीनें ज्याप्रमाणें पतंग हा त्या दिव्याकडे उड्या टाकीत जातो, त्याप्रमाणे हे ऐहिक सुखास भुलून सर्वस्वी नागवलेले राजे स्वतःच्या कर्मविपाकानें सिद्ध करून ठेवलेल्या सर्वांतक मृत्यूच्या जबड्यांत आपण होऊन उड्या टाकीत आहेत. दयाघन परमेशा! मला जय मिळेल कीं नाहीं, किंवा यांच्या वधापासून मला पातक लागेल की काय ही जी शंका उत्पन्न झाली होती, ती सर्व समूळ आणि सकारण नष्ट झाली. पण दीनबंधो! आपली ही असह्य प्रभा सर्व जगास व्यापून राहून सर्व प्राणीमात्रांला त्रास देणारी झाली! आतां पुरे करा. हें पारमेश्वरी तेज सहन करण्याचें अमानुष सामर्थ्य आम्हांसारख्या यःकश्चित् प्राकृत मनुष्यास नाहीं. भगवन्! आतां माझें देहभान सुटलें. प्रभो! माझ्या इंद्रियांवरील माझें स्वामित्व नष्ट झालें.

( इ ) हें असलें उग्र, कराल, घोरतर, भयानक स्वरूप धारण करणारे आपण आहांत तरी कोण हें मला कृपा करून सांगावें. मी आपल्यास शतधा प्रणिपात करितों. प्रसन्न व्हा. आपलें इतिवृत्त समजावें अशी मला दारुण इच्छा उत्पन्न झाली आहे.

आपण सर्वांचें आदिकारण असाल. पण आपलें हें उग्र स्वरूप, अद्वितीय सामर्थ्य आणि धैर्यभंजक तेज माझ्यासारख्याला समजणें शक्य नाहीं. कृपा करून आपण कोण तें मला सांगावें. पुनः एकवार मी आपल्यास नमस्कार करितों."

वरील (अ), (आ) आणि (इ) परिच्छेदांवरून 'अर्जुनाला क्षणक्षणानंतर कोण कोणत्या स्वरूपानें विश्वरूप दृग्गोचर झालें व त्याच्या मनाची स्थिति कशी बदलत गेली हें स्पष्ट दिसतें. (अ) परिच्छेदामध्यें अर्जुनास सर्वव्यापी विश्वरूपाचा दर्शनलाभ प्रत्यक्ष झाला आणि दहाव्या अध्यायांत अर्जुनास जीं विभूतिस्वरूपें सांगितलीं आहेत, तीं सर्व सार्थ आहेत आणि परमेश्वरच सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे, सांताचा उत्पादक, संरक्षक आणि संहारक तोच आहे, सर्वशास्त्र, सर्व कर्ता सर्वभोक्ता तोच असून हें भोग्य विश्व ही तोच आहे," असा अर्जुनाचा निश्चय झाला तसाच आपलाही निश्चय होणें फारसें अवघड नाहीं. अधिकारपरत्वें शाश्वत धर्माचें लक्षण यथार्थ समजून घेऊन अधिकारानुसार धर्माचें आचरण केलें व आपली श्रद्धा व निश्चय ही जोडी दृढ केली म्हणजे अभ्याससातत्यानें व एकाग्र चिंतनानें 'एक विश्वंभर मात्र आहे; आपणही विश्वंभर आहों' अशी आपली खातरजमा होईल.

## कर्मविपाक.

'(आ)' या परिच्छेदांत ईश्वरानें अर्जुनास भावी गोष्टींचें दिग्दर्शन केलें. पृथ्वीवर पापसंचय फार झाला, देहप्रीति, कर्तृत्वाभिमान आणि वासनावशता यांस पूर येऊन तीं सर्व अमर्याद झालीं व पृथ्वीचा नाश होण्याचा संभव दिसूं लागला; सारांश समाजविध्वंसक विकारांचा अतिरेक झाला, असें पाहून सर्व देवतांसह परमेश्वरानें या मर्त्यलोकीं अवतार धारण करून स्वतः अनेक दैत्यांचा, अनेक दुर्वृत्त, स्वदेहाभिलाषी, भोगैकवश, पुरुषांचा संहार केला; नंतर दुःसमाजविषयक संहाराचें काम मानवी आयुर्मर्यादेंत परमेश्वराच्या हातूनही होणें दुरापास्त होय, असें समजून व कौरवपांडवीय युद्धाचा कौरवांच्या दुष्ट कर्मानेंच ओढवलेला प्रसंग आला आहे असें पाहून भगवंतांनीं ह्या युद्धाचा फायदा घेतला आणि सर्व उन्मत्त, दुर्वृत्त, उत्पथगामी लोकांचा संहार अठरा दिवसांत करून टाकिला. हा पुढें होणारा सार्वत्रिक नरमेध अर्जुनास युद्धाच्या प्रथम दिवशींच दाखविण्यास जीं अनेक कारणें होतीं त्यांतील दोहोंचा मात्र येथें निर्देश करितों. (१) जें जें कर्म आपण केलें असेल, किंवा आपल्या हातून झालें असेल, त्याचा नियमित परिणाम झाल्याखेरीज गत्यंतर नाहीं, हें स्पष्टपणें अर्जुनास कळावें हा पहिला उद्देश आहे. कर्माचें फल कर्त्यास परिणामरूपानें येथें मिळालें पाहिजे; नाहीं तर इतरत्र तरी अदृष्टरूपानें—यालाच आपण 'नशीब' म्हणतों—मिळालें पाहिजे, असा नियम आहे. हा नियम इतका कडकडीत आहे कीं, प्रत्यक्ष ईश्वरास सुद्धां या नियमाच्या विरुद्ध जाववणार नाहीं! अशी फार कडकपणानें

व-अपवादशून्यत्वानें-या नियमाची अम्मलबजावणी होत असते. हा सर्वसाधारण नियम आपल्या सारख्या मनुष्यांच्या लक्ष्यांत नसतो, म्हणून आपल्या हातून चुक्या होतात किंवा पापकर्मे होतें. सृष्टीचे नियम उल्लंघिले असतां, नीतीचे नियमांस लाथळलें असतां, नियमद्रोही पुरुषास येथें किंवा अन्यत्र शिक्षा झाली नाहीं असें उदाहरण कोणी हुटकून काढून प्रसिद्ध केल्यास हा शोधक कोलंबस, न्यूटन, शंकराचार्य इत्यादि महाशोधकांच्या वरल्या प्रतींत बसविण्यास योग्य आहे असें मी प्रसिद्धपणें म्हणेन. शिक्षा ही झालीच पाहिजे, मग ती आज होवो किंवा पुढच्या जन्मीं होवो. भूक आहे तिच्यापेक्षां जास्त विषयोपभोग घेणें ह्या क्षुल्लक आधिभौतिक पातकापासून तों समाजविघातक पंचमहापातकां-पर्यंत कोणतेंही पातक आपण केलें, करूं दिलें, किंवा आपल्या हातून झालें तर त्याबद्दल योग्य ती शिक्षा झालीच पाहिजे, व ती शिक्षा होतेच होते. नैसर्गिक फौजदारी कायदा याप्रमाणें अतीशय कडक आहे व त्याची अंमल-बजावणीही फार कडक रीतीनें होते. चांगल्यास बक्षीस व वाईटास शिक्षा हें नैसर्गिक कायद्याचें तत्त्व अबाधित आहे. 'मला कायदा माहित नव्हता, मी परस्वाधीन होतों' इत्यादि कसलीही व कोणत्याही तऱ्हेची सबब येथें ऐकिली जात नाहीं. निसर्गाचा अगर नीतिमातेचा आपण अपराध केला असतां आपण कदाचित् सुटून जाऊं, आपल्यास पकडण्यासाठीं कदाचित् वारंट नाहीं सुट-णार, असें मानणें यासारखें मूर्खपण नाहीं. सारांश केलेल्या पापपुण्याप्रीत्यर्थ आपल्यास शिक्षा किंवा बक्षीस मिळेल हें अर्जुनानें, अर्जुनकालीन समाजानें आणि पुढील समा-जानें विसरूं नये एतदर्थ भगवंतांनीं भविष्यकालीन वधाचा प्रसंग अर्जुनास दाखविला आहे. त्या प्रसंगापासून आपण गीताभक्तांनीं असा धडा घेतला पाहिजे कीं, त्या योगें आपल्या हातून सृष्टिनियमांचें, नीतिनियमांचें व ईश्वरी नियमांचें उल्लंघन यथाशक्ति काल-त्रयींही होणार नाहीं. अर्थातच ही नियमनिष्ठा साध्य होण्यास सृष्टीचें नियम समजून घेऊन सृष्टीची व आपली चांगली ओळख करून घेतली पाहिजे, समाजाचा होईल तितका परिचय करून घेऊन व समाजरचनेची व्यवस्था पाहून त्या व्यवस्थेप्रमाणें चालण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे आणि ईश्वराची आराधना करून त्यास आळविलें पाहिजे व त्याचा अनुग्रह आपल्यावर यथायोग्य होईल असें आपलें शुद्धाचरण ठेविलें पाहिजे. खरें अद्वैतमत सिद्ध होण्याला वस्तुतः आभासिक परंतु व्यवहारतः खरी असणारी जी सृष्टि व तिची नियममाला यांचे संपूर्ण ज्ञान असल्याशिवाय वेदांततत्त्वांचा खरा पगडा बसणार नाहीं. असो; याचा विस्तार जितका करावा तितका थोडाच आहे. या निर्घृण सृष्टिव्यवस्थेचें खरें स्वरूप समजणें अत्यंत अगत्याचें आहे, हें मला कळत असून मी येथेंच थांबतो, याचें कारण सृष्टातील अनंत नियमासंबंधें माझें भरभक्कम अज्ञान हें होय. तथापि वरील अत्यंत सूक्ष्म दिग्दर्शनही जर गीताभक्तांस सृष्टीची आराधना निष्कामतेनें करण्याच्या गुणकारी सत्कार्याकडे वळविण्यास प्रेरित करील, तर मी स्वतःस धन्य मानीन! सारांश कर्मानें उत्पन्न होणाऱ्या फलपरंपरेची प्रणालिका व तिचा ओघ ह्या गोष्टी बदलणाऱ्या नव्हत, वज्रलेप आहेत, असें अर्जुनास सांगण्याचा भगवदुद्देश आहे. 'यामुळें इच्छास्वातंत्र्याला

धक्का बसतो. आपलें प्रारब्ध आपल्यापेक्षां श्रेष्ठ होऊन आपण केवळ कंदुकवृत्ति होतो,' असें मात्र कोणीं समजूं नये. झालेल्या कर्मांच्या फलाच्या प्रवाहाचा उगम बंद करणें जरी आपल्या अथवा कोणाच्याच हातांत नाहीं, **तथापि त्या ओघाची पुढील दिशा क्रमाक्रमानें फिरविण्याचें स्वातंत्र्य आपल्यास आहे.** हातांतून सुटलेल्या बाणाची गति आपल्यस फिरवितां येणार नाहीं, पण दुसऱ्या बाणाची दिशा आपल्यास ठरवितां येईल. तात्पर्य आपण प्राकृत मानवांनीं इतकाच बोध घ्यावयाचा कीं, आपण आपल्या मनानें, वाणीनें, शरीरानें जीं काय कर्माकर्मे केलीं असतील त्यांचें यथायोग्य फल आपल्यास हटकून मिळावयाचें आहे. आणि असा हा निर्घृण नियम आहे ह्मणून आपण कोणत्याही प्रकारें कोणत्याही धर्माचें उल्लंघन करूं नये.

भीष्मद्रोण हे महापुरुष तशाच दुर्योधन दुःशासनादि चांडाळचौकडी, इतर राजे, यांच्या कर्मांचा ओघ असा कांहीं जमून आला होता कीं, त्यांचा नाश कोणाच्या तरी हातून व्हावा. हा सामाजिक कर्मांचा सामाजिक ओघ व त्याचें सामाजिक फल अर्जुनास, तत्कालीन लोकांस आणि त्या लोकांचे वंशज जे आम्हीं, त्यांस कळणें अत्यंत अगत्य होय. एवंच व्यक्तिविषयक कर्म व कर्मफल आणि याप्रमाणें समाजविषयक कर्म व तत्कर्मफल हीं अबाधित राहतात. हा ओघ अनावर आहे हें अर्जुनास तर समजलेंच; तसेंच आपल्यास समजेल तर काय मौज होईल ?

भगवंताचा दुसरा उद्देश अगदींच उघडा आहे. आपल्या व्यक्तिविषयक व समाजविषयक कर्मांचा ओघ व त्यांचें फल आपल्यासारख्या प्राकृत मनुष्यास कळत नाहीं; पण तें सर्वज्ञ परमेश्वरास अथवा परमेश्वरानुगृहीत महापुरुषांस कळतें, असें येथें स्पष्टपणानें दाखवावयाचें आहे. सर्वज्ञपुरुषास भूत, भविष्यादि त्रिकालांचें ज्ञान असतें, याचा अर्थच हा कीं, सृष्टीचें, समाजाचें व ईश्वराचें ( स्वतःविषयीचें ) त्यांचें ज्ञान पूर्ण असतें; म्हणून वर्तमानकालीन स्थितीवरून मागें काय झालें असेल व पुढें काय होणार एतद्विषयक त्यांचीं अनुमानें ( अनुमानें कसलीं ? त्याचे ते सर्व प्रत्यक्ष विषयच होत. ) बहुधा वास्तविक होतात.

असो; अशा प्रकारचें भविष्य जेव्हां अर्जुनानें पाहिलें, भीष्म द्रोणादि अनेक सात्विक महात्मे, दुर्योधनप्रभृति मत्सरग्रस्त दुष्ट राजे आपआपल्या कर्मानें विश्वरूपाच्या त्या विक्राळ जबड्यामध्यें दाटून नेल्याप्रमाणेंच तेथें जाऊन पडताहेत असें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां आपला जय होणार व बंधुवधाचें पातकही आपल्यास लागावयाचें नाहीं असें मनांत येऊन त्या विश्वरूपाजवळ असणाऱ्या अर्जुनास क्षणभर मानवी आनंद झाला, हें खरें; पण तें सर्वांतक महामृत्यूचें दंष्ट्राकराली उग्रस्वरूप त्या गरीब बिचाऱ्या अर्जुनाच्या दृष्टीस पडलें तेव्हां तो अगदीं गर्भगळित होऊन गेला, त्याच्या तोंडाचें पाणी पळालें, त्याचा धैर्यपर्वत ढांसळून गेला, सारांश त्याच्या सर्व इंद्रियांनीं आपआपलीं कामें सोडून देऊन तीं स्तब्ध, स्तिमित झालीं. प्रत्यक्ष नारसिंह अवताराची अनेकपट वाढविलेली भयंकर दुसरी आवृत्तिच ही ! मग

या वेळीं अर्जुनाची दिशाभूल झाली, ज्ञानास्त झाला, दिव्य दृष्टीही विस्कलित झाली यांत काय आश्चर्य आहे? भयातिरेकानें त्याचे हात लुले पडले. त्याची बोबडी सुद्धां वळली! पण मोठ्या कष्टानें त्यानें त्या सर्वभक्षक काळास कसा तरी नमस्कार करून अडखळत अडखळत प्रश्न विचारला: 'भगवान्! क्षमा करा आणि आपण कोण आहांत व आपल्या मनांत काय आहे हें मला सांगा!' अहाहा! प्रत्यक्ष यदुनायक श्रीकृष्ण, अवतारी पुरुषोत्तम, आपल्याच प्रार्थनेवरून आपल्यास विश्वरूप दाखवीत आहे, हें सर्व भान अर्जुनासारख्या गुडाकेशानें (सावध पुरुषानें) अजीबात विसरून जावें हा काय चमत्कार आहे! अथवा चमत्कार तरी कसला? आपल्या अगर आपल्या बांधवांच्या कृत्याचे टळटळीत परिणाम आपल्यापुढें 'दत्त' म्हणून उभे राहिले म्हणजे अशीच बोबडी वळावयाची! शिवाय अर्जुनाच्या दृष्टीपुढें यावेळीं प्रलयकालीन महामृत्यूचें स्वरूप मूर्तिमंत उभें होतें!

## भगवदुत्तर.

भगवंताचें उत्तर अतीशय साधें व सोपें आहे. 'मी सर्वांतक काल आहे, (श्लोक ३३ अ० १० पहा); लोकांचा संहार करण्यासाठीं हें मीं उग्र स्वरूप धारण केलें आहे. तुझ्या साहाय्यावांचूनच वर्तमानकाळीं सगळ्यांचा नाश होणार आहे. म्हणून ऊठ; युद्ध कर; जय मिळीव; आणि अखंड राज्य कर. अर्जुना! या लाखो वीरांचा नाश माझ्या साक्षित्वानें होणाऱ्या त्यांच्या त्यांच्या कर्मानें व मत्प्रस्थापित कर्मफलानें अगोदरच झाला आहे. हे लोक मरावयाचे हें ठरलेलें आहे. तूं केवळ निमित्तमात्र आहेस. भीष्मादि सर्व अगोदरच मेलेले आहेत. तेव्हां ऊठ आणि यांस मार."

किती साधें व सरळ उत्तर आहे हें? कर्माचें फल निश्चितपणानें, निःसंदेहत्वानें, अस्खलितपणानें कसें मिळतें हें येथें अगदीं स्पष्टपणानें सांगितलें आहे. कर्तृत्वाचा अभिमान वरील श्लोकचतुष्टयानें जितका लवकर विगलित होतो, तितका दुसरा कशानेंही होत नसेल. असो; याप्रमाणें 'आपण कोण व आपण काय करणार? हें भगवंतांनीं सांगितल्यावर अर्जुनास थोडासा धीर आला आणि त्यानें ईश्वरस्तवास आरंभ केला; हें स्तोत्र उत्तमोत्तम आहे.

## अर्जुनाचें द्वितीय स्तोत्र.

हें स्तोत्र तर अपूर्व आहे. कोणत्याही देशांत, कोणत्याही कालीं, कोणत्याही धर्माच्या मनुष्यानें हें स्तोत्र भक्तिपूर्वक म्हणावें, अशी याची योग्यता आहे. ईश्वराची स्तुति, योग्य महति आणि आपली स्वतःची अल्प योग्यता व अनधिकारिता, या उभयतांचा स्पष्ट समागम व परमेश्वराविषयीं अवर्णनीय प्रेमयुक्त भक्ति ह्यांचें उत्कृष्ट स्वरूप या स्तोत्रांत अवतीर्ण झालें आहे. याचें आलोडन कितीही केलें तरी तृप्ति अशी होतच

नाहीं. अर्जुनानें परमेश्वराविषयीं म्हटलें त्याचप्रमाणें वाचकभक्तांसही या स्तोत्रास 'नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः। पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते।' 'असें म्हणावेंसें वाटतें.' असो; प्राणायाम करितां करितां कांहीं तेजोरूप दिसूं लागून मनुष्य भयभीत होत्साता पुनः स्वस्वरूपावर येऊं इच्छितो, तीच स्थिति अर्जुनाची झाली होती हें योगज्ञ वाचकांस सांगण्याची अपेक्षाच नाहीं.

(अ) " भगवन्! आपली सद्गुणमंडित सत्कीर्ति सज्जनांच्या आनंदास व आदरास पात्र होते, आपल्या भक्तवात्सल्यजन्य कीर्तीच्या अभिनव तेजामुळें स्वोदरभरणपटु जीवाधम दशदिशा पळून जातात आणि मोठमोठाले निस्पृह, निराकांक्षी, योगवेत्ते सिद्धही आपल्या महत्कीर्तीच्यायोगें आपल्या पदकमळीं स्वशिरें अर्पण करितात, हें सर्व योग्यच आहे. हे अनंता! देवाधिदेवा! आपलें अक्षरत्व आणि आपलें सदसत्परत्व, तसेंच आपलें ब्रह्मदेवपितृत्व, हे येवढाले भारदस्त गुण आहेत कीं, त्यांच्यापैकीं प्रत्येकापुढें मोठमोठ्या देवादिकांनींही आपआपलीं मस्तकें, भगवंता! या सर्वपावक पारमेश्वरी चरणधुलीनें पावन करून घ्यावीं! अहाहा! आपण आदिदेव, पुरुष, सनातन, विश्वाधार, विश्वनियामक, ज्ञानी, ज्ञान, पुरुषार्थ इत्यादि सर्व आपणच होत. आपणच विश्वंभर आहां. वायु, यम आदि सर्व दिक्पाल व लोकपाल व इतर देवता आपल्या सत्तेनें वागत आहेत. सृष्टीची उत्पत्ति, संरक्षण व संहार करणें ज्यांच्याकडे व सृष्टीस स्वच्छ व शुद्ध करणें ज्या देवतांकडे, त्या सर्व आपल्या अनुषंगानें वागणाऱ्या देवता आहेत. एवंच सर्वश्रेष्ठ देवतांसही वंदनीय असणाऱ्या भक्तवत्सल देवाधिदेवा! मी आपल्यास नमन करितों, आणखी नमन करितों, पुनः नमस्कार करून आणखी हजार वेळ साष्टांग नमस्कार करितों. जिकडे माझी ही अमर्याद दिव्यदृष्टी धांवत आहे, तिकडे मला सर्वत्र वंदनीय वस्तूचें अनुदर्शन होत आहे; म्हणून पाठीमागून, पुढून, सारांश सर्व बाजूंनीं आपल्यास नमस्कार करितों. आपलें व आपलें सामर्थ्य अनंत आहे. सर्व विश्वास आपण व्यापून टाकिलें आहे. आपणच सर्व विश्व बनून राहिले आहां.

( आ ) भगवंता! आपले मी सहस्र अपराध केले आहेत; 'हे कृष्णा! हे यादवा! हे मित्रा! अशा प्रकारच्या, बरोबरीचें नातें दाखविणाऱ्या अतिपरिचयदर्शक नांवांनीं आपल्यास किती तरी वेळ मी हटाकिलें आहे. अशा प्रकारचें वर्तन करण्यानें मी केवढ्या अज्ञानांधकारामध्यें लोळत होतोंना? बरें! भगवन्! आपला महिमा ( मोठेपणा ) मला विदित नसल्यामुळें भ्रांतीनें अगर थट्टेनें हजारों वेळ मी आपला अपमान केला आहे. जेवतांना, झोंपेच्या वेळीं, खेळत असतां मीं कित्येक वेळ आपला उपमर्द केला आहे. एकांतांत मी आपली मानखंडना केली आहे, इतकेंच नव्हे तर, अनेक लोकांच्या समक्ष, भरसभेमध्यें मीं आपल्यास टाकून बोललों आहें. दयानिधे! याची मला आपण क्षमा करावी. 'पुत्राचे सहस्र अपराध। माता काय करी तयाचा खेद?' या न्यायानें मी आपली क्षमा मागतों.

( इ ) चराचर विश्वाचें पितृत्व ( उत्पादकत्व आणि पालकत्व ) आपल्याकडेच आहे. आपलें पूज्यत्व व श्रेष्ठगुरुत्व हीं विश्वसंमत आहेत. आपल्यासारखें अतुल सामर्थ्य, अमर्याद दयालुत्व, इत्यादि गुण असणारा एकसुद्धां कोणी सांपडण्याची मुष्कील, तर आपल्यापेक्षां श्रेष्ठ असा कोण असणार? अतएव सर्ववंद्य व सर्वनियंतृक परमेश्वरा! मी आपला हा देह आणि माझें सर्वस्व आपल्या चरणीं भक्तिपूर्वक अर्पण करितों. भगवंता! ज्याप्रमाणें पिता आपल्या पुत्राचें अपराध सहन करून त्यास क्षमा करितो, मित्र आपल्या मित्राच्या चुक्या पोटांत घालितो, किंवा पति आपल्या प्रियकर पत्नीवर सदैव अनुरागच करितो, ह्याप्रमाणें आपण मला सर्व अपराधांची क्षमा करून आपल्या पदरीं घ्यावें.

( ई ) भक्तवत्सल! आपलें अदृष्टपूर्व असें हें विश्वरूप पाहून मला प्रथम पुष्कळ हर्ष झाला हें खरें; पण हें भयानक विश्वरूप दिसल्यानें माझी भीति अमर्याद झाली आहे, मला अत्यंत दुःख होत आहे; म्हणून आपलें पूर्वीचें मानवी रूप पुनः कृपा करून प्रकट करावें. माझा त्या स्वरूपाशीं समागम पुष्कळ असल्यानें तेथेंच माझी भक्ति दृढ झाली आहे. तेव्हां आपलें शंखचक्रगदापद्म यांनीं अलंकृत असें चतुर्भुज श्यामल स्वरूप प्रकट करावें. देवाधिदेवा! माझा अंत न पाहतां प्रसन्न व्हावें आणि आपलें मानवी स्वरूप प्रकट करावें.''

वरील स्तोत्रांत चार प्रकार दृष्टीस पडतात. ( अ ) या परिच्छेदांत ईश्वराची सद्गुणमंडित कीर्ति, त्याचें श्रेष्ठत्व, अनादित्व, अनंतत्व, नियामकत्व, सर्वव्यापित्व, अविनाशित्व अविकारित्व सर्वाश्रयत्व, सर्वज्ञत्व, सर्वास्तित्व, सर्वसुखत्व, इत्यादि अनेक गुणांचा उल्लेख करून अर्जुन सर्वथा नम्र झाला आहे. भक्ति दृढ होण्यास व भक्तिबीजाची पराकाष्ठा होण्यास ईश्वराचे अनंत गुणांपैकीं निदान वरील गुणांचा तरी परिचय मुमुक्षु भक्तास झाला पाहिजे. वरील गुणांचें पूर्ण मर्म समजल्याखेरीज जीवाचें ( मायोपाधिक आत्मारामाचें ) दुःशीलत्व, नीचता, कालवशत्व, प्रकृतिदासत्व, परिच्छिन्नता, क्षणभंगुरता, चंचलता, परतंत्रत्व, किंचित्ज्ञत्व, इत्यादि अवगुणांचा बोध आपल्यास व्हावयाचा नाहीं. जोंपर्यंत आपलें दुर्गुण आपल्यास समजले नाहींत व आपल्यामध्यें कांहीं वैगुण्य आहे, असें आपल्यास वाटत नाहीं, तोंपर्यंत दुसऱ्यामध्यें कांहीं चांगले गुण आहेत असें आपल्यास वाटत नाहीं. सारांश प्रीतीचा व पुढें भक्तीचा उदय होत नाहीं. यामुळें ईश्वराचे ठायीं असल्या अभिमानी जीवांची भक्ति कदाचित् असलीच तर ती सकाम असते. '**मला सुखसाधनें देण्यासाठीं ईश्वराचा जन्म आहे** असें ईश्वरापाशीं सौदा करणारा हा देहाभिमानी जीव म्हणत असतो. अर्थातच असल्या क्रयविक्रयाच्या बाजारांत खऱ्या भक्तीला ठाव मिळत नाहीं. एवंच ईश्वराच्या खऱ्या स्वरूपाचें अज्ञान पूर्ण असतें, अभिमानानें तें पूर्णतर होतें आणि विषयवासनेनें तें पूर्णतम होतें! मुक्त होण्यासाठीं दिलेल्या सर्व उपकरणांचा ( साधनांचा ) अपव्यय होऊन आपली बुद्धि,

आपली वासना, आपला अहंकार, आपलीं समनस्क इंद्रियें ह्या सर्वांचा विनियोग क्षणभंगुर देहास व देहाच्या अनुषंगानें चालणाऱ्या चंचल मनास खूष करण्याकडे, क्षणैक सुख देण्याकडे होतो व हा विनियोग मनुष्यासारखा ज्ञानवंत प्राणी डोळे उघडे ठेऊन करितो; हेंच पाप होय. आपण पापी आहोंत असें वाटत नाहीं, तोंपर्यंत भक्तीचा खरा उदय नाहीं. एकनाथ, नामदेव, ज्ञानदेव, तुकाराम, इत्यादि साधुपुरुषांच्या साहजिक उद्गारांकडे क्षणमात्र लक्ष दिलें असतां वरील विधानाची सत्यता लक्षांत येईल. असो; पापाचा खरा प्रत्यय आल्याशिवाय व श्रवणमननानें ईश्वराच्या सगुणरूपान्वित अनेक सद्गुणांचा खरा परिचय झाल्याशिवाय खरी भक्ति उदयास येणार नाहीं. गुणश्रेष्ठत्वाच्या ज्ञानाशिवाय पूज्यबुद्धीला ठाव नाहीं. हें गुणश्रेष्ठत्वाचें ज्ञान आपलें कमी झालें व जें कांहीं थोडेंबहुत आहे त्याचा उपयोग विषयसुखवृद्धीकडे (विषयोपभोगाकडे) जोरानें होऊं लागला म्हणून आपल्या नैसर्गिकतः धार्मिक हिंदुलोकांची प्रस्तुतची भक्ति 'नेगटी रंगाची' झाली आहे. धर्मानें सांगितलेल्या गोष्टी आपण करितों, पण त्यांत आपलें मनःसर्वस्व नसतें; म्हणून हल्लींच्या आपल्या धर्माचरणाला तामसीरूप प्राप्त झालें आहे. तामसी वृत्तींमध्यें सात्विक अभ्युदय होणें दुरापास्त आहे. मोहऱ्या पेरून भोपळे काढण्याच्या उद्योगांत आपण गढून गेलों आहों. आपण धर्माचरण करून ईशभक्तीचें स्तोम माजवितों म्हणजे ईश्वरास फसविण्याचा प्रयत्न करून आपण आपली स्वतःची वंचना मात्र करून घेतों! असो. या धर्मावनतीसंबंधें लिहावें तेवढें थोडेंच आहे. माझा इष्ट हेतु हा आहे कीं, अर्जुनकृत स्तोत्राचा आपण सार्थ पाठ रोज केला व त्याचें भक्तिपूर्वक मनन केलें तर उपाधिकृत जीव किती पंगू आहे, किती पापी आहे, याचा पूर्ण साक्षात्कार आपल्यास होऊन आपण क्रमाक्रमानें अधिकारानुसार, उन्नत भक्तीकडे जावयास लागूं 'पापोऽहं, पापकर्माहं, पापात्मा, पापसंभवः' असें स्नानाच्या वेळीं, व 'यद्रात्र्यां पापमकार्षं, मनसा, वाचा, हस्ताभ्यां' इत्यादि प्रातःसंध्येच्या वेळीं आपण मंत्र म्हणण्याचें जें नाटक करितों, तें सोडून देऊन 'मी पापी आहें, स्वार्थानें पाप होतें, म्हणून कालच्यापेक्षां आज मी जास्त स्वार्थत्याग करीन व परमार्थ जास्त साधीन' असा वरील मंत्राचा खरा अर्थ आपल्या मनांत बाणून तो मंत्र जर म्हटला व तदनुरूप आचरण ज्ञाते ह्मणविणाऱ्या धर्मसंरक्षकाकडून जर यथार्थ होऊं लागलें तर 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः (जसा वर्ततो लोक कल्याणकारी। जगीं वर्तती लोकही त्या प्रकारीं ॥)' या न्यायानें पुनः धर्माचा प्रसार सर्वत्र होऊन आमचा जीर्णोद्धार होईल. परमेश्वरा! असा हा खरा स्वार्थत्याग करून इतरांस चांगला मार्ग घालून देण्याचें अवघड काम ज्ञाते ह्मणविणाऱ्या आपल्या श्रेष्ठ ब्रह्मबंधूंकडून होईल काय? होईल. मात्र त्यांस आपल्या पापांची ओळख झाली पाहिजे!

(आ) या परिच्छेदांत अर्जुन आपली पापमग्नता व्यक्त करीत आहे. सर्वज्ञ सर्वसाक्षी, सर्वशक्ति, न्याय देणाऱ्या यमाचा स्वामी, सृष्टीची उत्पत्ति करणाऱ्या ब्रह्म-

देवाचा पिता, असा जो षड्गुणैश्वर्य परमेश्वर त्याची आपण कशी अवहेलना करितों, क्षणिक सुखासाठीं, परमेश्वरास कसें गुंडाळून ठेवितों, आपला आत्माराम 'नको, नको,' म्हणत असतां आपण विषयांच्या अगाध समुद्रांत अविचारानें कशी बुडी मारितों, इत्यादि अनंत पापात्मक गोष्टी अर्जुनस्तोत्रानें व्यंग्य होतात ( सुचतात ). 'आपण पापी आहोंत' असें वाटूं लागणें हीच भक्तीची पहिली भूमिका आहे. हें वर ठरविलेंच आहे. ही स्पष्ट निश्चयानें आपली पापमग्नता आपल्यास कळली म्हणजे उन्नतमार्गाकडे जाण्याला कांहीं प्रतिबंध उरत नाहीं. श्रेष्ठ वस्तूचें ज्ञान व आपल्या स्वतःच्या अज्ञानाविषयीचें आपलें ज्ञान यांचा संगम झाला म्हणजे पूज्यभाव, भक्ति इत्यादि उत्पन्न होऊन आपण सुटावयाच्या मार्गास लागतों. अर्जुनासारख्या श्रेष्ठ पुरुषास पापमग्नता भासली व ती त्यानें प्रांजलपणानें व्यक्त केली हेंच त्याच्या भक्तिश्रेष्ठत्वाचें उत्तम लक्षण होय.

( इ ) या परिच्छेदांत अर्जुनानें आपलें सर्वस्व ईश्वरीचरणास अर्पण केलें. सारांश 'मी कर्ता नव्हे, ईश्वर कर्ता आहे' 'मी विषयभोक्ता नव्हे, ईश्वरच भोक्ता आहे' असा भाव पूर्णत्वानें उदयास आला म्हणजे "सुखदुःखांची, रागद्वेषांची मातब्बरी नष्ट होऊन 'परमेश्वरप्राप्ति, ज्ञानप्राप्ति, विज्ञानप्राप्ति, ब्रह्मत्व होणें' हें जें माझें उत्तरोत्तर श्रेष्ठ कर्तव्य आहे तें तें मी अधिकारानुसार व शास्त्रविहित आणि सात्त्विकमार्गानें करीन" असाच एक निश्चय होतो. हा निश्चय झालेल्या पुरुषाचें धैर्य, कर्म, सामर्थ्य किती विपुल होतें हा अनुभव प्रत्यक्षच आला पाहिजे.

( ई ) या परिच्छेदांत परमेश्वरास सर्वप्रसिद्ध दृष्टांत देऊन आळविलें आहे. पितृ-भक्ति, मित्रभक्ति आणि पतिप्रेम या भक्तीच्या उत्तरोत्तर श्रेष्ठ पायऱ्या आहेत. शब्दाच्या पर्यायांत 'भक्ति आणि प्रेम' यांचें साहचर्य आहे.

असो; येणेंप्रमाणें स्तवन करून 'पूर्वस्वरूप मला दाखवावें' असें परमेश्वरास आळवून अर्जुनानें स्तोत्र संपविलें. इष्टकार्य झालें असें पाहून परमेश्वरांनींही आपल्या विश्वरूपाचा उपसंहार केला आणि अर्जुनाची दिव्यदृष्टि काढून घेतली.

## ईश्वरी वचन.

पण ह्या विश्वरूपाचा तिरोभाव करण्याच्या अगोदर अर्जुनाला देवाधिदेवानें एक मंत्र सांगितला तो आपण सर्वांनीं लक्ष्यांत ठेविलाच पाहिजे. तो मंत्र हाः 'अर्जुना! हें विश्वरूप तुझ्यासारख्या अप्रतिम अथवा निःसीम भक्ताशिवाय इतरांस दिसणें नाहीं. वेदाध्ययन उत्तम केलें, याज्ञिकीमध्यें निष्णातपणा संपादिला, मोठमोठालीं दानें केलीं,

**किंवा उग्र तपश्चर्या केली ह्मणून हें आद्य ( अज ), अनंत, तेजोमय स्वरूप दिसावयाचें नाहीं.'** सारांश मोठा पंडित झाला, शाहणा झाला, दानशूर झाला म्हणजे ईश्वराची भेट होते असें नाहीं. ईश्वराची गांठ पडण्यासाठीं एक **त्याला मात्र प्रसन्न केलें पाहिजे.** ईश्वराचा अनुग्रह एक निसीम, निष्काम अशा ज्ञानपूर्वक भक्तीनें मात्र साध्य आहे. उपास्यदेवतेसंबंधें पूर्ण पूज्यभाव असून त्या देवतेप्रीत्यर्थ मात्र सर्व विहित कर्में सात्विकबुद्धीनें करावयाची आणि त्या त्या देवतेच्या मंगलगुणांचें संपादन करण्याची भीष्मप्रतिज्ञा करून ही आपली प्रतिज्ञा सार्थ करावयाची, याचें नांव भक्ति होय. श्रवण, कीर्तन इत्यादि नवविध भक्ति सांगितली आहे, पण सर्वांचें तात्पर्य हें आहे कीं, अद्वैत ज्ञान उत्पन्न होण्यासाठीं 'ईश्वरास आवडतील अशीं कर्में ईश्वरीप्रेरणेनें करून त्यांचें फळही ईश्वरास समर्पण करावयाचें.' अशा या सगुणभक्तीनें चित्तशुद्धि होऊन विषयवैराग्य दृढ होतें.

असो; याप्रमाणें मंत्र सांगून श्रीकृष्णानें आपलें पूर्वस्वरूप प्रकट केलें व अर्जुनास देहभानावर आणिलें. पुनः ५४ व्या श्लोकांत वरील महामंत्र सांगून भगवान ह्मणालेः 'विश्वरूपाचें ज्ञान, विश्वरूपाचा साक्षात्कार आणि विश्वस्वरूपामध्यें प्रवेश ह्या गोष्टी अनन्य-भक्तीशिवाय होणें व्यर्थ आहे.''

## अनन्यभक्ति म्हणजे काय?

अनन्यभक्तीचीं लक्षणें सांगतातः ''परमेश्वराप्रीत्यर्थ कर्म करून परमेश्वर हाच आपलें आश्रयस्थान असा दृढ निश्चय कर. माझा भक्त हो. दुसऱ्या कोणाचेंही भजन, पूजन, चिंतन न करितां माझें (परमेश्वराचें) निष्काम आराधन कर. आणि कोणाशींही वैर धरूं नको. याप्रमाणें निष्काम, व निःसीम जी अनन्यभक्ति आहे तिचा आश्रय केला असतां मत्पदाप्रत येशील.''

हाच ब्रह्मोपदेश होय. अनन्यभक्ति म्हणजे पराभक्ति. सगुणभक्ति श्रेष्ठत्वाला पोहोंचलीं म्हणजे निर्गुणभक्तीचें ज्ञान होऊन तिची पराकाष्ठा होते. पुढें वेदांतश्रवण मनन निदिध्यासानें आत्मस्वरूपाचें व ब्रह्माचें ज्ञान होऊन आत्मा व ब्रह्म यांचें तादात्म्य समजतें व परमेश्वरी अनुग्रहानें तें तादात्म्य उमजतें. हा साक्षात्कार झाल्यावर जी समाधि-स्थिति असते तीच अनन्यभक्ति होय. ही दृढ झाली म्हणजे ब्रह्ममयता होते.

या अध्यायांत सगुण व साकार अशा अनंत विराट्स्वरूपाचें दर्शन देऊन अर्जुनाचा मोह हरण केला आणि आत्मज्ञान झाल्याशिवाय ब्रह्मैक्यता कळत नाहीं (श्लो० ४७ पहा) असें सांगितलें. येथील भक्तीचें उज्वल स्वरूप, सगुणब्रह्माचे मंगलगुण आणि जीवाची पापममता इत्यादि भाग पापविमोचक ह्मणून अत्यंत रमणीय होत.

---

## खंड १२ वा.

# बाराव्या अध्यायाचा उपसंहार.

हा अध्याय म्हणजे द्वितीय षडध्यायीचें सारसर्वस्व होय. येथें 'तत्पदार्थाचें' स्वरूप समजलें आहे, असें लक्ष्यांत ठेवून साधनें कोणतीं कोणतीं करावीं, साधनांची परंपरा कशी आणि उत्तम भक्तांची लक्षणें काय इत्यादि मनोरम विषयांची मीमांसा केली आहे.

२. अकराव्या अध्यायाच्या शेवटीं 'माझ्यासाठीं कर्म करणारा, मलाच श्रेष्ठ मानणारा, माझी अनन्यभक्ति करणारा, वैराग्यशील आणि निर्वैर झालेला माझा भक्त माझ्याकडेच येतो' असें सांगितलें. सारांश 'सर्वकर्मार्पण करणारे माझे अनन्यभक्त वैराग्य आणि द्वेषशून्यता यांनीं युक्त होत्साते माझ्या पदाप्रत येतात' असें सांगण्याचा अभिप्राय आहे. एवंच सगुण परमेश्वराची एकनिष्ठभक्तीनें आराधना केली असतां पुरुषार्थसिद्धि होते, असें सांगितल्याप्रमाणें दिसत आहे. पुनः, दुसऱ्या अध्यायापासून सहाव्या अध्यायापर्यंतच्या ५ अध्यायांचें तात्पर्य पाहिल्यास व विशेषतः दुसऱ्या अध्यायाचें रहस्य समजून घेतल्यास "निर्गुणज्ञान श्रेष्ठ आहे, आत्मा हा अज, अमर, पुराण, सनातन, निरंजन, निराकार, विकारशून्य, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी आहे" असा मथितार्थ निघतो व सातव्यापासून बाराव्या अध्यायापर्यंतच्या ग्रंथांत, 'आत्मा व परमात्मा (परब्रह्म) हे वस्तुतः एकच आहेत' असा ध्वनि होतो; आणि येथें तर सगुणभक्तीनें मोक्ष आहे असें सांगितल्यासारखें दिसतें. तेव्हां हें उघडच आहे कीं, अर्जुनासारख्या चाणाक्ष जिज्ञासूस येथें विरोधाचा भास व्हावा. 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' 'श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप' इत्यादि गीतास्मृतींतील अनेक वाक्यें व 'कैवल्यमुक्तिर्ज्ञानमात्रेण' मुक्तिउप० 'ज्ञानादेव तु कैवल्यं' इत्यादि श्रुत्युक्त मंत्र व वाक्यें यांवरूच, युक्तीनें व अनुभवशः जर व्यक्तिदृष्टीचा, भेद–दृष्टीचा, नाश आणि विश्वदृष्टीचा अथवा अभेददृष्टीचा आदरपूर्वक स्वीकार अनेक स्थळीं एककंठानें सांगितला आहे, तर श्रुतीशीं सर्वथा समन्वय असणाऱ्या भगवदुक्त श्रीमद्भगवद्गीतेंत 'सगुणाची भक्ति केली असतां' (सारांशभेद दृष्टीनें ईश्वराची आराधना केली असतां,) 'मोक्ष मिळेल' असें कसें सांगितलें? भगवंतांचें मत तरी काय आहे? निर्विकल्प ज्ञान श्रेष्ठ किंवा सगुणभक्ति श्रेष्ठ? खरा प्रकार आहे तरी काय? येथें कांहीं घोंटाळा आहे कीं काय? किंवा सर्व धर्मांकडे सामान्यतः संकोचदृष्टीनें बघणाऱ्या द्वैती लोकांच्या मताप्रमाणें 'लोकसंघचरणीं मिलिंदायमान होऊन सवंग लोकप्रियता मिळविण्यामध्यें पटाईत नसणाऱ्या **गोपाळकृष्णानें** सर्व धर्मपंथांस व धर्मपंथीयांस 'चांगलें' असें सांबळ्या गोंधाळाचें सर्टिफिकेट देऊन लोकप्रीतीचा मार्ग मोकळा करून टाकिला आहे? हें गौडबंगाल आपल्यापैकीं पुष्कळांस समजणार नाहीं,

तसेंच अर्जुनासही समजलें नाहीं; निदान सामान्य लोकांची वकिली पत्करणाऱ्या अर्जुनानें अज्ञानाचें पांघरूण घेऊन या गूढ प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं श्रीकृष्णास स्पष्ट आणि निर्भीडपणानें प्रश्न विचारला आहे. तिसऱ्या अध्यायाच्या आरंभीं व पांचव्या अध्यायाच्या आरंभीं जसे अर्जुनानें प्रश्न केले, तसाच-निदान तसल्याच तोडीचा-येथील प्रश्न आहे.

## अर्जुन प्रश्न. (सगुण कीं निर्गुण श्रेष्ठ?)

३ "अज्ञानध्वंस करून ज्ञानप्रसार करणाऱ्या व लोकांचा उद्धार करण्यासाठीं अवतार धारण करणाऱ्या दयाघन परमेश्वरा! आपल्या गेल्या म्हणजे अकराव्या व्याख्यानाच्या तात्पर्यावरून पुनः माझी मति गढूळ झाली! भक्तवत्सला! पुनः मी संशयसागराच्या अगाध लहरींमध्यें सांपडलों! आपण आतां सांगितलें कीं, 'माझी अनन्य भक्ति नित्यत्वानें करणारे **निष्काम भक्त हे योगी मत्पदाप्रत येतात.**' आणि मागें आपण अनेक वेळ असें सांगितलें आहे कीं, 'सर्व इंद्रियांस अगोचर असें जें अविनाशी व अक्षर परब्रह्म, त्याचें यथासांग **ज्ञान करून घेऊन अखंड समाधीमध्यें असणारे ज्ञानी पुरुष मात्र मुक्त होतात.**' उपाधिशून्य, अस्थूल, अनणु, अदीर्घ, अऱ्हस्व आणि अव्यक्त अशा परब्रह्माचें ज्ञानविज्ञान करून घेणारे ज्ञानयोगी श्रेष्ठ किंवा जगद्व्यापी मायेस व जगतांस उत्पन्न करून त्यांचा संहार करणारा, सर्वांचा पिता, माता, प्रभु, भर्ता असा जो सगुण परमेश्वर, त्याचें आराधन एकनिष्ठतेनें करणारे आपले जे भक्त ते श्रेष्ठ योगी? सारांश निर्गुण ज्ञानयोगी श्रेष्ठ किंवा सगुणभक्तियोगी श्रेष्ठ? हें मला आपण सांगावें?" ज्ञान श्रेष्ठ कीं कर्म श्रेष्ठ? कर्मसंन्यास श्रेष्ठ कीं कर्मयोग श्रेष्ठ? हे जसे मागचे प्रश्न आहेत, त्याच अर्थाचा हाही प्रश्न आहे. आतां या प्रश्नाचें उत्तर भगवान काय देतात तें पाहूं व त्यांतील रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न करूं.

## श्रीभगवान ह्मणाले.

४ "अर्जुना! ह्या तुझ्या प्रश्नावरूनच तुला अद्यापि यथार्थ बोध झाला नाहीं, असें दिसतें. सद्वस्तूचा किंवा ज्ञेय पदार्थाचा बोध तुला झाला असता, तर तुझा हा प्रश्नच असंभवनीय झाला असता. असो; ज्याअर्थी तुझें द्वैतभान अद्यापि नष्ट झालें नाहीं, ज्याअर्थी तुझी भेददृष्टि अद्यापि कायम आहे, त्याअर्थी तुला समजेल अशाच पद्धतीनें तुझ्या शंकेचें निरसन करितों."

५ भगवंताच्या या उत्तरपद्धतीचा विचार अलीकडील वादविवाद करणारांनीं, सर्व शिक्षकांनीं, धर्माचार्यांनीं, राजकीय पुरुषांनीं, अवश्य करावा. शिष्याची धारणाशक्ति

केवढी आहे, त्याचा अधिकार कोणत्या दर्जाचा आहे, त्याची तयारी कितपत आहे, हें पाहून उपदेशास सुरवात करावी. समजलें आहे तेंच पुनः पुनः सांगणें, झालेल्याची आवृत्ति वारंवार करणें, हें जसें अर्थशून्य होऊन शिष्याचा प्रयत्नोत्साह नष्ट करितें, त्याचप्रमाणें त्याला जें समजत नाहीं व समजण्याची शक्ति नाहीं, तें सांगितलें असतां 'अरण्यरुदनवत्' होऊन निराशाजनक होतें. कित्येक शिक्षकांस हा शिक्षणाचा मुख्य भाग समजत नाहीं. त्यांची सर्व खटपट आपली विद्वत्ता, आपलें पांडित्य, आपलें गहनज्ञान, आपला अगाध बहुश्रुतपणा, इत्यादि सर्वच्या सर्व शिष्यांच्या डोक्यांत खुपसविण्याची असते! हल्लींचे कथेकरी घेतल्यास हाच प्रकार दिसेल. पूर्वरंगामध्यें 'जीवब्रह्मैक्यासारखा' अतीशय जाडा विषय मुद्दाम काढून त्यांतच मग न समजणारीं श्रुतींचीं वाक्यें, न्यायाची घटापटादि खटपट, चित्तशुद्धीची चर्पटपंजरी इत्यादिकांस मुद्दाम घुसडून द्यावयाचें, आणि क्षणभर चकित करून सोडणाऱ्या शब्दावडंबरानें **आपल्या** विद्वत्तेची, **आपल्या** बहुश्रुतपणाची, उत्कृष्ट छाप श्रोतृमंडलावर बसविण्याचा खटाटोप करावयाचा! याचा परिणाम काय होतो बरें? श्रोतृमंडळींतील वृद्ध शास्त्री किंवा इतर तज्ज्ञ शिवाय करून बाकीची सर्व मंडळी बहुधा कुंभकर्णप्रियेला वश झालेली असते! कोठें जीवाचें क्षणभंगुरत्व आणि कोठें ही रसभंग करणारी झोंप? ही झोंप मोडण्यासाठीं मग हरिदासांस अश्लील कोट्या, पांचट गोष्टी इत्यादि अप्रासंगिक अंजनांचा प्रयोग करून निद्रा देवीस घालवून द्यावें लागतें! अनुसंधानाच्या वेळीं आपण जाऊं झालें!' असें कित्येक कथाभक्त ह्मणत असतात, हें आपण अनेक वेळ ऐकिलेंच आहे. तात्पर्य काय? अनाधिकाऱ्यांजवळ श्रेष्ठ सिद्धांतांचें प्रतिपादन सुरू केलें असतां, त्या बिचाऱ्या भांबावलेल्या श्रोत्यांस वस्तुतः कांहींच लाभ होत नाहीं. हरिदासाची बिदागी मात्र आधींच ठरलेली असल्यामुळें ती त्याच्या पदरांत पडते आणि 'हरिदास मोठे विद्वान्, बहुश्रुत आहेत' असा सर्वत्र डंका वाजतो! कथेसारख्या सुंदर संस्थेची ही दुर्दशा! ही कुतरओढ केवळ अधिकार न समजून घेतल्यामुळें होते. असाच प्रकार इतरत्रही जाणावा. पण हा प्रकार प्रायशः फारच थोड्यांस कळतो. धर्मसंबंधीं वादविवादाला अगर वितंडवादाला आरंभ येथेंच होतो. सगुणोपासना चांगली किंवा निर्गुण ज्ञान चांगलें? मूर्तिपूजा चांगली किंवा निराकार परमेश्वराचें भजन चांगलें? इत्यादि वाद प्रायशः उत्पन्नच होऊं नयेत. भूगोलाचें ज्ञान चांगलें किंवा वृक्षसृष्टीचें ज्ञान चांगलें, हा प्रश्न जसा असमंजस आहे, किंवा मंडूर चांगला अगर वसंत चांगला, हा प्रश्न जसा वेडेपणाचा आहे, तद्वतच हा धर्म चांगला कीं तो धर्म चांगला हा प्रश्न होय. शिष्यानें असला प्रश्न विचारल्यास 'चांगलें' या शब्दाचें लक्षण त्याकडून बांधवून घ्यावें; सारांश 'चांगलें म्हणजे काय' हें त्याकडून समजून घेऊन मग उत्तर देण्यास आरंभ करावा; म्हणजे इष्ट विषय त्यास त्याच्या शक्तीच्या मानानें उत्तम समजतो. हें तत्त्व श्रीमद्भगवंतास उत्तम विदित होतें असें म्हणणें म्हणजे ज्यापासून हें व इतर सर्व तत्त्वें निर्माण झालीं, प्रकट व प्रसृत झालीं त्यास आमच्यासारख्या क्षुद्र प्राण्यांनीं शिफारसपत्र देण्यासारखें धाष्टर्याचें काम होय!

असो, हें विस्तारानें सांगण्याचें कारण असें आहे. 'गीता हें सर्व मतांचें एक सगीच लटांबर आहे; गीतेमध्यें निश्चित असें कांहींच सांगितलें नाहीं,' असा लोकप्रवाद फार दिवसांपासून मी ऐकत आहें. युरोपियन किंवा भारतेतर लोकांमध्यें हा भ्रम असता तर कदाचित् क्षम्य होता; पण आमच्या देशांतील 'विद्वान्, पंडित, चतुर' ह्मणून नाणावलेल्या व गीतार्थ प्रतिपादन करण्याचा अधिकार असलेल्या कित्येक, मान्यवर पंडितांस व पंडितमंन्यांसही हा भ्रम आहे, हा विशेष पण अक्षम्य चमत्कार होय! रात्रीच्या वेळीं तारे इकडून तिकडे जातांना **दिसतात** ह्मणून तारे **फिरणारे पदार्थ आहेत** आणि पृथ्वी कधींही हालचाल करितांना **दिसत** नाहीं, ह्मणून **पृथ्वी स्थिर आहे,** असें समजणाऱ्या स्तनंधय अर्भकाप्रमाणेंच आमच्या या वावदूकांची गति होय. 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं' 'तस्माद्योगी भवार्जुन' 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' इत्यादि निरनिराळा उपदेश पाहून आमच्यांतील कांहीं, आणि परक्यांतील पुष्कळ, सरस्वतीवीर भांबावून जातात आणि 'कृष्णानें निश्चित असें कांहींच सांगितलें नाहीं' असा सिद्धांत **ठोकितात**! आमचीं पुराणें व माहात्म्यें यांचीही हीच गति आहे. हिंदु लोकांत तेहेतीस कोटी देव आहेत, कोठें विष्णु श्रेष्ठ, तर कोठें शंकर, येथें गणपती तर दुसरीकडे सूर्य, कांहीं ठिकाणीं देवी, शिवाय मार्तंड, मल्हारी, जानाई, जोखाई, ह्मसोबा इत्यादि अनेक देवांस अनेक ठिकाणीं श्रेष्ठत्व दिलेलें पाहून युरोपियन लोकांची जी सकरुण तारंबळ उडते, व ती तारंबळ पाहून आमच्यांतील कित्येक रहस्यानभिज्ञ संस्कृत पंडितांची जी त्रेधा उडते ती कांहीं पुसूं नये! बहुसाळ झाले देव। आतां कोठें धरूं भाव' ह्या अभंगोक्तीवरून प्रसिद्ध श्रीसमर्थ रामदासांनीं जो प्रथमारंभीं मात्र 'कसें करूं?' काय करूं?' हा अष्टाक्षरी मंत्र कांहीं वेळ जपून शेवटीं समन्वयाचा मार्ग काढिला, तो जाणून हे आमचे सरस्वती देवीचे नाजूक वीरशिरोमणी तर

> 'श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्नाः नैको मुनिर्यस्य वचोऽप्रमाणं ॥
> धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पंथाः ॥
>
> ( वचः प्रमाणं असा दुसरा एक पाठ आहे. )
>
> असें स्पष्ट ह्मणून हातटेंकीस येतात!

श्रीमद्भगवद्गीतेसंबंधें अशी बजबजपुरी माजावी, पुराणांसंबंधें असा घोंटाळा असावा, हें हिंदुधर्मामध्यें जन्म पावलेल्या लोकांच्या बुद्धिमत्तेच्या दारिद्र्याचें दर्शक होय. ज्या बुद्धीला **मिल्ल, स्पेन्सर**ादिकांचे ग्रंथ सुगम वाटतात, **कांट हेगेल** इत्यादिकांचें दुरवगाह ग्रंथही गोचर होतात, ती बुद्धि श्रीमद्भगवद्गीतेसारखा वाटाड्या ('ज्ञानप्लवानें दुस्तर संसारसागर तरशील' असा उपदेश करणारा मार्गदर्शक) असतांही आमच्या धार्मिक ग्रंथाचा उलगडा करितांना गोंधळून जाते. या आमच्या बाहदुरीस आम्ही काय म्हणावें? धर्मबंधनें शिथिल होण्यास जीं अनेक कारणें झालीं आहेत, त्यापैकीं

मुख्य कारण म्हटलें तर आमच्या कित्येक जुन्या व नव्या पंडितांमध्यें स्पष्टपणें दिसणारा विवेकाचा व तारतम्याचा अभाव आणि उद्योगाचें शैथिल्य हें होय.

असो! वरील सर्व घोंटाळ्याचा उलगडा एका शब्दानें होतो. तो हाः अधिकारानुसार ईश्वरी स्वरूप सांगितलें आणि त्याच हिशेबानें साधनही सांगितलें आहे. पहाः शीघ्रकोपी परंतु स्पष्टवक्ते पुरुषास शंकरमूर्ति जशी प्रिय होईल तशी पाताळयंत्री व महाकारस्थानी विष्णुमूर्ति होणार नाहीं. प्रकृतिवैचित्र्यानुसार पुरुषवैचित्र्य असतें हा सामान्य न्याय आहे. शिव, विष्णु इत्यादि केवळ प्रतीकें मात्र आहेत. यांचे गुणवर्णन काळजीपूर्वक वाचिलें असतां सामान्यतः एकच स्वरूप ध्यानांत येण्याची व्यवस्था आहे. हा ज्ञानी लोकांसाठीं समन्वयाचा मेवा केला बरें! जेथें शिव, विष्णु इत्यादि देवतांचें ज्ञान होण्याचा मुळींच संभव नाहीं, तेथें मारुति इत्यादि सामान्य व सुगम देवतांची योजना करून अत्यंत अडाणी पण उन्नति इच्छिणारे लोकांची सोय केली आहे. याप्रमाणें अगदीं गांवढ्यांपासून तों थेट महाज्ञान्यापर्यंतच्या सर्व व्यक्तींस श्रेष्ठ मार्गाकडे जाण्याची सोय गीतेसारख्या प्रमाणभूत ग्रंथामध्ये करून ठेविली आहे. हा केवढा उपकार आहे बरें?

असो; तात्पर्य असें कीं, '**स्वतःच्या तात्कालिक देहसुखापेक्षां कांहीं तरी जास्त करणें आपलें कर्तव्य आहे**' अशी मनोभावना प्रकट झाली म्हणजे हळू हळू व प्रतीप्रतीनें सात्त्विक आचरणास आरंभ होतो व त्याचें पर्यवसान पूर्ण वैराग्यामध्यें होतें. तसेंच, '**स्वतःच्या ज्ञानाहून अनंत ज्ञान सर्वत्र पसरलेलें आहे**' असा अनुभव येतो, तेव्हां पूज्यभाव उत्पन्न होऊन त्याचें पर्यवसान ईश्वरज्ञान आणि शेवटीं केवलज्ञान, यांमध्यें होतें. पशुसम क्रूर व विवेकशून्य असणाऱ्या प्राथमिक मनुष्याचीं कृत्यें क्रूर व ज्ञानही शून्यवत् असतें. पण आपण 'चांगले' नाहीं व 'ज्ञानी' नाहीं, असें त्यास वाटावयास लागतें;-ह्या जाणीवेनेंच मनुष्यप्राणी पशुपेक्षां श्रेष्ठत्वास पावला आहे.-असो; अशा काळांत त्याचे देवही क्रूर आणि तामसीच असावयाचे. जसजसा हा मनुष्य प्राणी माणसाळत जातो, तसतसे **जगदीश कृपेनें** वेळोवेळीं ईश्वरांशाचे अवतार प्रकट होऊन त्याचा धर्म शुद्ध होत जातो, ईश्वरीज्ञान वाढतें आणि त्याचें आचरण पवित्र होतें. उत्क्रांतीचा अगर परिणामतत्त्वाचा हा क्रम आहे. येथें एक निश्चित वस्तु आहे आणि ती म्हणजे जीवांचा उद्धार ही होय. हा हेतु मनांत ठेविला म्हणजे हिंदुस्थानांत देवसमाज एवढा मोठा कां? उद्धाराचे मार्गांत इतकी विभिन्नता कां? यांचा सहज उलगडा होणार आहे. हिंदुधर्माची योग्यता विशेष वाटते त्याचें कारण हेंच कीं, येथें सर्व प्रकारच्या व प्रकृतीच्या जीवांची सोय लाविलेली आहे. 'टका शेर भाजा टका शेर खाजा' किंवा सबघोडे बाराटके' या न्यायानुसार आमच्या धर्माचा विचार नाहीं. योग्यतेनुरूप धर्म सांगणें व कर्म करविणें, यांतच धर्मश्रेष्ठत्व आहे. हा मुद्दा विसरूनों

म्हणून आमच्या धर्माचें रहस्य आम्हांसच कळत नाहीं, मग तें इतरांस कोठून कळणार ? ज्याची जशी योग्यता असेल त्या मानानें त्यास पुरुषार्थ सांगावयाचा व त्यामानानेंच त्याचें कर्तव्य ठरवावयाचें; आणि तो नियमित पुरुषार्थ सिद्ध होऊन तदनुरूप आचरण सर्वदां घडूं लागलें म्हणजे त्यालाच ह्या जन्मीं पुनः श्रेष्ठतर पुरुषार्थ सांगून श्रेष्ठतर कर्तव्य त्याकडून करून घ्यावयाचें, असा हिंदुधर्माचा अंतर्गत विचार आहे. हा असा अबाधित क्रम केवलाद्वैतज्ञानापर्यंत आहे. पूर्णज्ञान झालें, अद्वैत बाणलें म्हणजे कर्तव्य संपतें. ही परंपरा दुसऱ्यांस समजूं नये व आपणही विसरून जावें ही दुःखप्रद आश्चर्याची गोष्ट आहे. ही प्रणालिका समजली तर उत्तमच झालें, न समजली तरी विश्वोद्धाराचा मार्ग असाच राहणार. 'एकाच रामबाण' औषधानें सर्व रोग बरे करण्याची यातायात करणें हें जसें गंधर्वनगरींतील कृत्य आहे, तसेंच 'एका धर्मानें व एकच कर्तव्यमार्गानें सर्व जगाचा उद्धार करीन' असें म्हणणेंही अर्थशून्य होय. अर्जुनास अद्वैतज्ञान पूर्ण रीतीनें बाणलें नाहीं म्हणा किंवा इतर अज्ञानी मुमुक्षूंची त्यानें वकीली पत्करिली होती म्हणून म्हणा, त्यानें **निष्काम सगुणभक्ति श्रेष्ठ** किंवा निर्गुणज्ञान श्रेष्ठ असा प्रश्न विचारला आहे आणि भगवंतांनीं विश्वनियमांची परंपरा मनांत आणून अर्जुनप्रश्नाचें उत्तर दिलें आहे. हा भाग गीताभक्त विश्वासपुरःसर ध्यानांत ठेवतील तर त्यांस गीतांतर्गत ज्ञानमार्ग व इतर मार्ग आणि गीतांतर्गत ज्ञाननिष्ठा व इतर निष्ठा यांचें यथास्थित ज्ञान होऊन गीतेचें अभिनवश्रेष्ठत्व त्यांच्या मनांत बाणेल आणि सात्त्विकवृत्ति उज्वलित होऊन योग्य मार्ग कोणता व योग्य निष्ठा कोणती यांचें ज्ञान होईल.

६. याप्रमाणें हें अवश्य विषयांतर झालें ! संपलें ! असो; भगवंताचें उत्तर स्पष्ट आहे. " अर्जुना ! तुझ्यासारखे भेदज्ञानी परंतु सात्त्विकभक्त असून ते जर माझें एकनिष्ठेनें, निष्कामतः आणि भक्तिपुरःसर आराधन करितात, तर तेच योगी श्रेष्ठ होतील. आतां जे योगी अचल, अविकार्य, स्थिर, सर्वव्यापी व अगोचर अशा श्रेष्ठ परब्रह्माचें इंद्रियनिग्रहपुरःसर आणि बंधुत्वाच्या वृत्तीनें-श्रेष्ठ परब्रह्माचें-**पर्युपासन** म्हणजे अभेदबुद्धीनें ध्यान, करितात, सारांश समाधिवृत्तींत असतात, ते योगी **मत्स्वरूपच** होतात, ते ब्रह्मच होतात; हेंही खरें आहे. पण हा मार्ग दुस्तर आहे; कारण, देहाशीं नित्य साहचर्यानें असणाऱ्या वासना व कर्तृत्वाभिमान इत्यादिकांच्या योगानें, इत्यादिकांच्या अडथळ्यामुळें, **अव्यक्तोपासना, ब्रह्मध्यान, समाधियोग** दुःसाध्य होतो; तेव्हां देहाभिमान कायम आहे तोपर्यंत व वासनाक्षय झाला नाहीं तोपर्यंत, निष्काम **सगुणोपासनाच** श्रेष्ठ आहे. "

हा मार्मिक उपदेश गीतावाचकांच्या मनांत बिंबेल काय ?

७. पुनः भगवान् म्हणतातः अर्जुना ! ज्यांची कर्मवासना संपली नाहीं, परंतु, ज्यांनीं सर्व कर्में ईश्वरास समर्पण करण्याचा निश्चय केला, म्हणजे ईश्वरास प्रिय होतील

अशीं कर्में निरपेक्षबुद्धीनें आरंभिलीं, तसेंच, माझें स्वरूप समजून घेऊन उपासना व ध्यान करण्यास आरंभ केला, त्यांस मी मृत्युसागरांतून उतरवून नेतो; सारांश त्यांची चित्तशुद्धि उत्तम होऊन ते अद्वैतज्ञानाच्या मार्गाला लागतात व शेवटीं मुक्त होतात.

## मार्गचतुष्टय.

( अ ) अर्जुना ! म्हणून तूं आपली ज्ञानशक्ति माझ्यामध्यें ठेव अथवा या विश्वांत एक ज्ञानरूपी परमेश्वरच काय ती **ज्ञेयवस्तु** ( जाणून घेण्याची वस्तु ) आहे असा निश्चय करून माझें स्वरूप जाणून घे; तसेंच, ' सर्वकर्ता करविता **परमेश्वरच** आहे, मोक्ष-मोक्ष करणारा तोच एक आहे, मला सन्मार्गाला लावणारा तोच एक आहे ' असा दृढ व अढळ विश्वास धारण कर. सारांश परमेश्वराचें ध्यान अखंड करावयाचें व परमेश्वराच्या उक्तीवर पूर्ण विश्वास ठेवून असावयाचें, अशी चित्तैकाग्रता करून मन समाहित कर. असें केलेंस म्हणजे तुला माझ्यामध्येंच राहण्याची योग्यता येईल आणि मग अभेदज्ञान होऊन तूं मुक्त होशील.

( आ ) हें करणें जर तुला शक्य नसेल तर हा दुसरा मार्ग पत्कर; वर सांगितल्या प्रमाणें चित्तैकाग्रता तुला असाध्य असेल तर आठव्या अध्यायांत सांगितलेल्या प्रणवाचा, ॐकाराचा, अभ्यास करावयास लाग. ॐकाराचे ठायीं सर्व परमेशगुण आहेत अशी भावना करून हळू हळू तेथें चित्त स्थिर कर. चंचल मन पळूं लागेल तर घाबरूं नको. पुनः तें आलंबनावर ह्मणजे ॐकारावर आणून ठेव. असा सारखा अभ्यास सुरू कर. कालांतरानें चित्ताची एकाग्रता होईल व तुला इष्टफल मिळेल.

( इ ) हा अभ्यास करणें हें होत नसेल, ही गोष्ट तुला दुरापास्त वाटत असेल, अभेदज्ञानपूर्वक सगुणस्वरूपाचे ध्यानाचा अभ्यास करणें तुला जड वाटत असेल, तर जें जें काय करशील, खाशील, देशील, तें सर्व परमेश्वरार्प्रीत्यर्थ मी करित आहें, मला स्वतःच्या प्रेरणेनें हें कर्म करावेसें वाटत नाहीं, परमेशप्रेरणेनें मी हें कर्म करित आहें ' असा तरी भाव अहोरात्र जागृत ठेव. इकडूनही तुझी चित्तशुद्धि होऊन अभ्यासद्वारा चित्तैकाग्रता साध्य होईल आणि ज्ञान होऊन तूं मुक्त होशील.

( ई ) हेंही करणें तुला कठिण वाटत असेल तर निदान ही मी शेवटची गोष्ट सांगणार ती तुला केलीच पाहिजे. कारण तुझा अधिकारच तसा आहे. ती गोष्ट ही: तूं जें जें कर्म करित राहशील तें तें सर्व माझ्याठायीं ठेऊन दे आणि सर्व कर्मफलाचा त्याग कर म्हणजे वासनाशून्य होऊन कर्तव्यबुद्धीनें कर्म कर. मनःसंयमन करून निर्वासनेनें कर्म करूं लागलास म्हणजे प्रथमतः अभिमान नष्ट होऊन चित्तशुद्धि होईल व पुढें इष्ट कार्य साधेल.

शेवटीं हा निश्चय होण्यासाठीं सर्वकर्मफलांचा त्याग करण्यास आरंभ केला पाहिजे पूर्वंच ( १ ) कर्म फलत्याग ( भोक्तृत्वत्याग ) ( २ ) सर्वकर्मांची ईश्वरपरायणता ( कर्तृत्वभोक्तृत्वत्याग ) ( ३ ) अभ्यासयोग ( ज्ञानपूक ईश्वरनामस्मरण ) आणि ( ४ ) ध्यानयोग ( ईश्वरत्वसंपादनाचा योग ) हे अनुक्रमें चार मार्ग आहेत. पहिला मार्ग आक्रमण करून पुढें दिशा तीच कायम ठेविली म्हणजे क्रमानें सिद्धि मिळते; आणि ध्यानयोग सुकर होतो.

या चार मार्गांच्या काळजीयुक्त पठनानंतरही ' गीतेंत गोंधळ आहे ' असें म्हणणाऱ्या लोकांच्या **अंतःकरणामध्येंच** कांहीं तरी ' गोंधळ ' खास आहे, असें म्हणणें भाग पडेल. असो; अर्जुनाचे व अर्जुनासारख्या हजारों लोकांचें इष्टकार्य सिद्ध करणारी ही उतरती श्रेणी वेदांतप्रतिपाद्य जो अद्वैतमार्ग तो अधिकारानुसार कसा साध्य करावा ह्याचें दर्शक आहे. प्रथम ज्ञानमार्ग, नंतर भेदयुक्त उपासना ( ह्यांतच अखंडध्यान, अखंड अभ्यासानंतर अखंडध्यान; कर्तृत्वाभिमानत्याग आणि वासनात्याग ) असे एकापेक्षां एक खालचा, असे मार्ग सांगितले आहेत. प्रत्येक ठिकाणीं ' सिद्धि ' दर्शक शब्दांची योजना भक्तमानसाची प्रवृत्ति कर्ममुक्तीच्या मार्गाकडे उत्साहानें वळावी एतत् प्रीत्यर्थ आहे. पण तेथील सिद्धिदर्शक शब्द व्यर्थ नाहींत. त्यांच्या योगानें पुढील पायरी सांपडण्याचें काम सुलभ रीतीनें सिद्ध होतें.

८. आणखी एक श्रेष्ठत्वपरंपरेची श्रेणी सांगितली आहे तीही वरील प्रतिपादनाचें समर्थन करितें. ( १ ) अभ्यासापेक्षां **ज्ञान** श्रेष्ठ आहे, ( २ ) ज्ञानापेक्षां **ध्यान** श्रेष्ठ आहे; आणि ( ३ ) ज्ञान व ध्यान यापेक्षां **कर्मफलत्याग** श्रेष्ठ आहे. मागील ७ व्या अंकाच्या शेवटीं कर्मफलत्याग हा कनिष्ठ म्हणून सांगितला आणि येथें तर त्याला श्रेष्ठ म्हटलें तेव्हां हा काय घोंटाळा आहे ? तर याचें रहस्य इतकेंच कीं, कर्मफलत्याग ही वृत्ति मोक्षमार्गाच्या प्रत्येक पायरीवर दृग्गोचर होते. वासनात्याग, कर्तृत्वत्याग, विषयत्याग इत्यादि सर्वत्र कर्मफलत्यागाचा संचार आहे. ज्ञानमार्गांत सर्वत्र कर्मफलत्याग हेंच मूळ बीज आहे; म्हणून अज्ञ पुरुषानें केलेला कर्मफलत्याग जसा त्याच्या चित्ताचें समाधान करून इतर त्यागाकडे त्याची प्रवृत्ति करितो, तसाच तो ज्ञानी पुरुषासही अनुभवाचे वेळीं आणि नंतर, ज्ञानत्यागाची प्रवृत्ति करितो. अभ्यास असो; ज्ञान असो वा ध्यान असो, सर्वत्र कर्मफलत्याग इष्ट आहे म्हणून त्याचें श्रेष्ठत्व वर्णिलें. या त्यागानें पहिलें काम हें होतें कीं पुरुषास शांति मिळते. असो; या त्यागाचा स्पष्ट अर्थ श्लोकाचे व्याख्येंत सांगितला आहे.

## भागवतोत्तम कोण?

९. येथून पुढें म्हणजे १३ व्या श्लोकापासून अध्यायसमाप्तीपर्यंतच्या श्लोकांत श्रेष्ठ भक्तांचें वर्णन केलें आहे. श्रेष्ठ भक्तांचे गुण कोणते असे विचारल्यास १३ पासून २०

श्लोकांचें रहस्य सांगावें. ज्याला 'परा' भक्ति म्हणून म्हणतात, जेथें उपास्य आणि उपासकाचें अखंड तादात्म्य घडून येतें ती ही भक्ति होय. ते गुण आतां सांगतों.

### श्लोक १३ व १४

( अ ) ज्याचें मन भेदशून्य झालें आहे, सर्वत्र ज्याची आत्मवृत्ति झाली, त्याची द्वैतवृत्तीच मावळून जाते; ज्यावेळीं तो देहभानावर असतो, त्यावेळीं तो जगन्मित्रत्वाच्या नात्यानें सर्वांशीं वागतो. तसेंच त्याचें दीनवात्सल्यही अपूर्व असतें. ममत्व मावळलें, अहंकार दग्ध झाला, म्हणजे तो सुखदुःखातीत होत्साता पृथ्वीसारखा क्षमाशील होतो. त्याचा निश्चय खंबीर असून इन्द्रियनिग्रह अनुकरणीय असतो. रात्रंदिवस ध्यानस्थ स्थिति, ईश्वराचेठायीं ज्ञान व विश्वास समर्पण करून तो सर्वदा संतुष्ट असतो. हाच परमेशास प्रिय होतो.

### श्लोक १५.

( आ ) जो उद्विग्न होत नाहीं किंवा उद्वेजक होत नाहीं; हर्ष, भय, क्रोध, उद्वेग यापासून जो मुक्त असतो; तो परमेश्वरास प्रिय होतो.

### श्लोक १६.

( इ ) जो निरिच्छ आहे, शुद्ध आहे, सावध आहे, उदासीन आहे, तापत्रयशून्य होऊन ज्यानें कर्मत्याग केला आहे; असा भक्त ईश्वराला प्रिय होतो.

### श्लोक १७.

( ई ) जो हर्ष, शोक, द्वेष, वासना, इत्यादिकांविरहित झाला व ज्यानें पुण्यपापात्मक कर्मांचा त्याग केला असा माझा भक्त देवाधिदेवाला प्रिय होतो.

### श्लोक १८ व १९.

( उ ) शत्रु मित्रांस सारखा म्हणजे पूर्ण निःपक्षपाती, मानापमानाचे प्रसंगीं विकार न पावणारा; शीतोष्ण असो व सुखदुःख येवो, सदैव हिमाचलासारखा एकवृत्तीनें राहणारा आणि आसक्तिशून्य असणारा; तसेंच, निंदा करा वा स्तुति करा, ज्याची वृत्ति पालटत नाहीं, जो बहुभाषण करित नाहीं, यदृच्छेनें जें मिळेल त्यांतच संतुष्ट असतो, 'माझें' असें जो कशालाच म्हणत नाहीं; सारांश गृहदारादिकांची जो अपेक्षा ठेवित नाहीं, जो स्थितप्रज्ञ आहे, तो भक्तिमान पुरुषच आत्मारामाला प्रिय आहे.

### श्लोक २०.

( ऊ ) अर्जुना! धर्म प्रवृद्ध करणारें हें अमृत जो यथेच्छ व आतृप्तीपर्यंत सेवील आणि वर सांगितल्याप्रमाणें जो माझी उपासना करील, माझ्यावर निःसीम विश्वास ठेवून जो माझा एकनिष्ठेनें आश्रय करील तो परमात्म्याचा अत्यंत प्रियकर भक्त होय.

१०. याप्रमाणें भगवंतांनीं सहा प्रकारांनीं भक्तगुणवर्णन केलें आहे. श्लोक १४, १५, १६, १७ व १९ या श्लोकांच्या शेवटीं 'स मे प्रियः' असे किंवा अशा अर्थाचे शब्द आहेत. आणि २० व्या श्लोकाच्या शेवटीं 'ते भक्ताः मे अतीव प्रियाः' असे शब्द आहेत. असो; सर्वत्र परमेश्वरास प्रिय असणाऱ्या भक्तांचीं लक्षणें पहिल्या पांच प्रकारांमध्यें सांगून शेवटीं हे सर्व भक्त मला अत्यंत प्रिय आहेत असा उपसंहार केला आहे.

या पहिल्या पांच प्रकारांमध्यें, तसेंच शेवटच्या सहाव्या प्रकारांत आणि परस्परांमध्यें श्रीरामानुजाशिवाय इतर कोणी तारतम्य केलेलें माझ्या आढळांत नाहीं. मला तर येथें तारतम्याचा भाग दिसत आहे, त्याचें निरूपण आतां करितों. प्रो॰ द्विवेदींनीं मात्र इतकें ह्मटलें आहे कीं, १३, १४ व १५ श्लोकांचें स्पष्टीकरण करणारे पुढील श्लोक आहेत. सर्व टीकाकारांच्या व सर्वज्ञ भाष्यकारांच्या अभिप्रायांहून निराळा अर्थ काढण्याचें माझें सामर्थ्य नाहीं व या टीकाकारांनीं व अजरामर भाष्यकारांनीं प्रतिपादिलेल्या अर्थाहून निराळें अर्थांतर मी काढणार आहे, असें ह्मणणें धाष्टर्यमूलक आहे. तसेंच, श्रीमच्छंकराचार्यांनीं ज्या तारतम्याकडे दुर्लक्ष्य केलें तें तारतम्य मी २० व्या शतकांत प्रकट करितों' असें ह्मणण्याचें साहस करण्यापेक्षां 'मीच कोठें तरी चुकत आहे' असें अनुमान काढणें न्याय्य, सयुक्तिक व समंजस होय. हें सर्व खरें आहे. तथापि उत्साहकारी गीता-श्लोकांचें व भाष्यामृताचें पान मोठ्या आसोशीनें कांहीं दिवस केल्यामुळें बुद्धीस जो कांहीं अल्पस्वल्प संस्कार झाला त्यानें उत्पन्न केलेल्या अभिनव बुद्धीची अनुलंघ्यप्रेरणाच इतकी बलवत्तर आहे कीं, तिच्यायोगें अवश होत्साता भगवन्मानस-पुंडरीकांतील सुंदर मकरंदाचा आस्वाद घेत घेतच दंग झालों आहे आणि तोच आस्वाद माझ्या गीताबंधूंनींही यावा अशा शुद्ध प्रेरणेनें सर्वांच्या मानसिकपत्रांपुढें हा विवेकामृत-चषक ठेवण्याची परवानगी मागत आहे! क्षमा असावी.

११. माझ्या समजुतीनें १३ श्लोकापासूनच्या पुढील पुढील श्लोकांत श्रेष्ठ व श्रेष्ठतर भक्तांचे गुण भगवंतांनीं वर्णिले आहेत. हें कसें तें आपण पाहूं.

पहिल्या श्लोकद्वयींत अशी कल्पना आहे कीं, येथें वर्णिलेल्या भक्तास पूर्ण सात्त्विक-स्थिति प्राप्त झाली आहे. माझें येथें कांहीं नाहीं व मी कर्ता नाहीं' असा त्याच्या मनाचा निश्चय झाला आहे; तथापि विश्वकल्याण करावयाचें, कोणाचा द्वेष करावयाचा नाहीं, इतकेंच नव्हे, तर विश्वांत राहणाऱ्या आपल्या योग्यतेच्या लोकांशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागावयाचें व कनिष्ठांशीं करुणदृष्टीनें वर्तन करावयाचें, असा त्याचा निश्चय झाला आहे. ह्या पुरुषाचा 'स्व' नष्ट झाल्यामुळें अर्थातच तो स्वतःच्या सुखदुःखासंबंधें समवृत्ति ठेवितो, क्षमा करितो, व सदा संतुष्ट राहतो. दृढनिश्चयानें आत्मसंयमन केलें असल्यामुळें

व परमेश्वरास सर्वज्ञानशक्ति व विश्वासभांडार अर्पण केलें असल्यामुळें त्याचें परमेश्वरध्यान अखंड सुरू असतें; सारांश एका संकुचित ' स्व ' चा त्याग करून दुसऱ्या विस्तृत ' स्व ' चा अंगिकार केला व परमेश्वरभक्ति कायम ठेविली म्हणजे एक प्रकारचा ' भक्तपणा ' येतो. हा भक्तपणा श्रेष्ठ कोटींतील आहे, हें खरें; तथापि ज्ञानसूर्याचा पूर्ण उदय येथें झालेला दिसत नाहीं म्हणून ' या विश्वांत आपल्यास **कांहीं कर्तव्य करणें आहे,** असल्या प्रकारचा अभिनिवेश या पुरुषामध्यें दृग्गोचर होतो. हे भक्त अत्यंत उदार, अत्यंत उपयोगी, मोठें लोककल्याणकर्ते हें तर खरेंच; पण अद्यापि यांच्या मनांत द्वैतबीज कायम आहे आणि परब्रह्म आणि दृश्य जगत् यांची एकवाक्यता झालेली नाहीं. यांनीं जें उत्तम काम केलें आहे तें ह्मणजे आपल्या व्यक्तिनियामक ' स्व ' ला हद्दपार करून टाकिलें हें होय. अर्थातच ज्या व्यक्तिविषयक सुखदुःखासंबंधानें आपल्या सारख्या सामान्य मनुष्यांची धडपड चाललेली असतें, ती धडपड यांस नाहीं. ह्यांचे श्रम केवळ विश्वोद्धाराप्रीत्यर्थच असतात. जगत्कल्याणाचें ( utilitarianism ) धर्मविहित व सात्त्विक श्रेष्ठ रूप तें हेंच होय. हाच लोकसंग्रह होय.

(आ) ही वरील स्थिति कांहीं वेळ अनुभवून आपलें **कर्तव्य** बजाविलें म्हणजे जी स्थिति प्राप्त होते ती १५ वे श्लोकांत सांगितली. आपण जीवादारभ्य कष्टी मेहनत करून समाजकल्याणाचा आरंभ केला; परंतु पुढें **'स्वकल्याण करणें हें ज्याच्या त्याच्या श्रमावर मुख्यतः अवलंबून आहे.** मार्ग दाखविणें मात्र महत्पुरुषाचें कर्तव्य आहे' असा निश्चय वरील भक्तांचा झाला म्हणजे ते स्वस्थ होतात. मग त्यांच्या खटपटीनें खरा किंवा खोटा त्रास कोणासच होत नाहीं. व ह्या भक्तांस ही जयापजयापासून होणाऱ्या सुखदुःखाची कटकट होत नाहीं; ह्या स्वस्थ स्थितींत सर्व प्रकारचे (स्वार्थी व सामाजिक) हर्ष, उद्वेग, क्रोध, भीति, विगलित होतात. या अवस्थेंत यांची भक्ति निराबाधत्वानें चालते. ह्यांच्या केवळ सात्त्विक आचरणाचें मात्र लोकांस अनुकरणीय उदाहरण डोळ्यांपुढें दिसत असतें. अशा महापुरुषांचें अस्तित्व राष्ट्रास हितकारी होय. ह्यांच्या केवळ अभीष्ट चिंतनापासून व शुद्ध अस्तित्वापासून ज्या लहरी उत्पन्न होतात त्या स्वयमेव लोकांमध्यें सात्त्विकतेचें बीज पेरितात; आणि एकंदरीनें यांची भक्ति अखंड चालून लोकांमध्यें ही सन्मार्गप्रवृत्ति दृढतर होते. हे भक्त वरील भक्तांपेक्षां श्रेष्ठतर होत हें सांगावयास नकोच.

(इ) याच्या पुढच्या पायरीचें वर्णन १६ वे श्लोकांत आहे. मागील दोन प्रकारांत जी कांहीं जगत्कल्याणेच्छेच्या संबंधानें थोडीबहुत चिंता आहे असें दिसतें, तिचा बराच भाग येथें नष्ट झाला आहे. 'परब्रह्म आणि आत्मा एकच आहेत' याचा थोडासा परिचय येथें झाला आहे असें दिसतें. 'स्व' च्या कर्तृत्व-भोक्तृत्वाचा पूर्णतः निरास होऊन विश्वकल्याणाचा मार्ग दाखविणें किंवा स्वस्थ असणें, याच्याही पुढची पायरी म्हणजे

इच्छाशून्यत्व प्राप्त होणें हें होय. येथील भक्तांस कसलीही वांच्छा 'असत नाहीं. हा वासनाक्षय समूळ झाल्यामुळें विषयासंबंधें यांस पूर्ण औदासीन्य प्राप्त झालें आहे. आतां अधिभौतिक, अध्यात्मिक, अगर अधिदैविक तापत्रयापासून होणाऱ्या व्यथांचें नांव सुद्धां घ्यावयास नको. 'मी होऊन एखाद्या गोष्टीस आरंभ करीन' असली वृत्ति येथें उद्भवणें शक्य नाहीं. 'जें काय होत आहे तें परमेश्वरसत्तेनें होत आहे, जीव-प्रयत्न निमित्त-मात्र आहे' असा येथें निश्चय झाला आहे. हे भक्त सर्वथा परमेश्वराधीन असतात. मानवी दंभाची, मानवी अभिमानाची रग जिरविण्यास असल्या अमोलिक भक्तांचें पृथ्वी-वरील वास्तव्य अत्यंत उपयोगी पडतें. सर्व कर्ताकरविता ईश्वर मात्र आहे असें भान येथें आहे. यांच्या हातून दुष्टाचरण होणें शक्यच नाहीं. सदाचरण होतें तेंही ईश्वर-प्रेरणेनुसार होतें, असा यांचा निश्चय असतो.

(ई) ही चवथी कडी श्रेष्ठतम कोटींतील आहे. येथें सर्व प्रकारचा हर्ष, द्वेष, शोक, आकांक्षा इत्यादिक विलीन होतात. येथें पापपुण्यही संपतें. सारांश येथें **मनाचा, बुद्धीचा, अहंकाराचा** व **वासनेचा** समूळ क्षय आहे. येथें ज्ञान-सूर्याचा प्रकाश बराच फांकला असल्यामुळें भेदज्ञान नष्ट होऊन अभेदवृत्तीचा उदय दृश्यत्वास पोहोंचला आहे. 'स्व' चा आत्मा म्हणजे प्रत्यगात्मा आणि परमात्मा हे पुष्कळच जवळ जवळ आल्याचा प्रत्यय येथें झाला आहे. म्हणजे तादात्म्य वृत्तीला अवश्य असणारे ज्ञान व गुण यांचा येथ पुष्कळच अवतार झाला आहे.

(उ) आतां परमावधीचे श्रेष्ठ भक्त म्हणजे १८ व १९ श्लोकांत सांगितलेले होत. येथील वृत्ति म्हणजे श्रीमत्ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः—'कीं गाईची तृषा हरूं! व्याघ्रा विष होऊनि मारूं! हें नेणेंचि गा करूं। तोय जैसें ॥' याप्रमाणें झालेली असते. मित्रशत्रु, मानापमान, शीतोष्ण, सुखदुःख, निंदास्तुति, हा सर्व भेद येथें पूर्णतः मावळतो. कोणत्याही प्रकारची, मग तो विषय भौतिक असो, मानसिक असो, वा कर्तव्याचा असो किंवा धार्मिक असो-येथें कोणत्याही प्रकारची आसक्ति नसते. यांची वाणीही संयमित होतें इतकेंच नव्हे तर श्रीमत् शंकराचार्य हे ब्रह्मसूत्रांच्या तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांत म्हणतात त्याप्रमाणें कसलाही प्रश्न विचारला तरी हे मौनव्रत धारण करितात. **'आहे तैसा आहे। काय तुजसी सांगूं पाहे।'** अशी यांची कायिक, वाचिक व मानसिकवृत्ति असते. मन, बुद्धि, वासना, अहंकार इत्यादिकांचा क्षय पूर्वीच झालेला असतो. आतां तर येथें ज्याला ब्रह्मज्ञान म्हणून म्हणतात त्याचाही क्षय होतो! 'मी ब्रम्ह (सच्चिदानंदघन) आहे, हें भानही येथें नष्ट होतें. येथें पूर्ण तादात्म्य झालें. येथें भक्तीची पराकाष्ठा झाली. उपासकच उपास्य होऊन गेला व उपासना संपली हाच अखंड उपासना होय. दुसऱ्या अध्यायांत

सांगितलेलें स्थितप्रज्ञत्व येथेंच पूर्णत्वास पोहोंचतें. हा भक्त परमेश्वराशीं असेल भिन्न होतो हें सांगणेंही निष्कारणच होय. परमेश्वरच जो झाला, नव्हे, परब्रह्मस्वरूपाशीं जो तादात्म्य पावला तो भक्त 'अमक्या कोटींतला' असें काय सांगावें?

(ऊ) भगवान् ह्मणतातः हें धर्मसंबंधीं अमृतपान मीं सांगितलें आहे त्या तऱ्हेनें त्या पद्धतीनें, ज्ञानी किंवा अज्ञानी मुमुक्षू सेवन करतील, सेवन करून आचरणांत स्पष्टत्वानें आणतील, जे यां माझ्या वचनांवर पूर्ण विश्वास ठेवून माझ्या आश्रयानें धर्म-मार्गाचें आक्रमण करितील, ते लोक तर मला अत्यंतच प्रिय होत. हें स्पष्टत्वानें सांग-ण्याचा भगवदुद्देश असा आहे कीं, कोणीही मुमुक्षु—मग तो नवव्या अध्यायांत ३१।३२ श्लोकांत सांगितलेल्या योग्यतेचा असो वा ३३ व्या श्लोकांतील ब्रह्मर्षि अगर राजर्षि असो—भगवद्भक्ति करूं लागला म्हणजे झालें. त्यानें निराश होण्याचें कारण नाहीं. 'भगवद्भक्ति करून सर्वांनीं मोक्ष मिळवावा.' हें भगवद्वाक्य खरोखरीच उद्धारमूलक व उत्साहवर्धक होय.

१२. माझ्या समजुतीनें वरील परंपरा भगवंतांस इष्ट होती. ही परंपरा सत्य ठरेल तर भक्तीचे मार्गही आपल्यास अवगत होतील; आणि गीतेमध्यें भक्तीचें तत्त्व किती उन्नतप्रकारचें आहे हेंही कळण्याचें उत्कृष्ट साधन आपल्यापाशीं सिद्ध राहील. हिचेंच नांव पराभक्ति होय. भक्तीची वृद्धि होत असतांनाच ज्ञानाचा उदय कसा होत जातो आणि शेवटीं अभेदज्ञानच पूर्णत्वास पावून परिणामीं तेंही कसें नष्ट होतें आणि एकच एक ब्रह्म कसें शिलक राहतें, हा या व्याख्यानाचा इत्यर्थ आहे.

'कर्मांशिवाय चित्तशुद्धि नाहीं' या सिद्धांताचा अनुवाद मीं मागें अनेक वेळ केला आहे. परोपकाराचे कर्मास व वेदविहित प्राचीन अगर आधुनिक कर्मास सुरवात केल्या-विना विषयत्यागाची महति कळत नाहीं. यज्ञयाग करणें, इष्टापूर्ति करणें, दान करणें, न्याय सांगणें, इत्यादि सर्वत्र धार्मिक व नैतिक आचरणांच्या मूळाशीं विषयत्यागाचें बीज आहे. स्वतःच्या उपभोगाचे विषय टाकून देणें आणि इतरांचा विषयोपभोग अधिकारानुसार कमी करणें या मार्गानें मात्र सात्त्विकवृत्तीचें अवलंबन इष्ट व शक्य आहे. असो; हें राजसवृत्तीमुळें उत्पन्न होणारें कर्म जसजसें सात्त्विकतर होत जातें, तसतशी चित्तशुद्धि वृद्धिंगत होते; ह्मणजे वासनेचा जोर कमी कमी होत जातो. परि-स्थितीचें तत्त्वज्ञान इंद्रियद्वारां करून घेऊं लागलें म्हणजे अहंकारवृत्तीचा उपशम होतो. 'मी कर्ता आहें' हा अभिमान,—सृष्टिरचना व सृष्टिनियम यांचा अबाधितपणा इत्यादि पाहिल्यावांचून—हा अभिमान—नाहींसा होणार नाहीं; सृष्टिव्यवस्था पाहिली म्हणजे मात्र तो अभिमान विगलित होतो व चित्तशुद्धीचें कार्य होतें. असो; याप्रमाणें चित्तशुद्धि होत असतां सृष्टीच्या अंतर्बाह्यरचनेवरून व आपल्या स्वतःच्या अंतर्बाह्यरचनेवरून 'परि-

श्वराच्या' अस्तित्वाचा बोध होतो. हा बोध होऊन भक्तीचा अंकुर फुटल्याशिवाय व पुढें पराभक्तीचा वृक्ष जोमविल्याशिवाय अभेदज्ञान होणें शक्य नाहीं. अभेदज्ञानाचा खरा गड्डा आपल्या हातीं यावा आणि आपण संसारपाशांतून मुक्त व्हावें अशी खरी इच्छा असेल तर ती पूर्ण होण्यासाठीं आपल्यास परमेश्वराचा आश्रय केलाच पाहिजे. परमेश्वराचें पूजन, भजन, ध्यान व उपासना निःसीमतेनें केल्याशिवाय ज्ञान होणार नाहीं. हें तत्त्व कित्येक वेदांती म्हणवून घेणाऱ्यांस असंमत आहेसें दिसतें; म्हणूनच परमेश्वरांनीं १० व्या अध्यायाच्या १० वे श्लोकांत 'माझें भजन नियमानें नित्य करणारांस मी बुद्धियोग देतों' व ११ व्या श्लोकांत 'त्यांचें अज्ञान नष्ट करितों' असें म्हटलें आहे. ज्ञानाची सांगता परमेश्वराच्या अनन्य भक्तीशिवाय होत नाहीं; किंवा ज्ञानास विज्ञानाचें स्वरूप परमेश्वराचे अनुग्रहाशिवाय येत नाहीं. ब्रह्मज्ञान होण्याला ईश्वरी-स्वरूपाचें ज्ञान, ईश्वरीउपासना आणि ईश्वरी अनुग्रह हीं अवश्य साधनें आहेत. कर्मानें चित्तशुद्धि होतें हें खरें; पण अंतःकरण निर्मळ होण्यास, अंतःकरणांतलि 'अहंकार,'. नेथील वासना, सारांश समूळ अज्ञान नाहींसें होण्याला सर्व कर्ता, सर्व करविता, सर्व चैतन्यघन जो परमेश्वर त्याचें ज्ञान अत्यंत आवश्यक आहे. सर्व सृष्टीचा नियामक व सर्व सृष्टीस सत्ता देणारा परमेश्वरच वंदनीय आहे, पूजनीय आहे, अशी भावना दृढ झाल्याखेरीज 'सर्वभूतहिताचे ठायीं रति' उत्पन्न होणार नाहीं. समष्टि व व्यष्टि एकच आहेत, उपाधिभेदानें भिन्नत्व येतें, उपाधि अज्ञानजन्य आहेत, असे ज्ञान होऊन सर्व पापात्मक व स्वार्थी पुण्यात्मक वृत्तींचा लय करून घेणें जर इष्ट आहे, तर समष्टीचा अधिष्ठाता जो परमेश्वर त्याची भक्ति केलीच पाहिजे. एवंच ज्ञानमार्गाला जर खरी सार्थकता यावयाची असेल, आपल्याला जर खरी शांति मिळावी असें वाटत असेल, मानवबंधूंत व नंतर जीवबंधूंत परस्पर निष्कपट प्रेम वाढावें आणि कठीण व निर्घृण संसार–यात्रा सुगम व सुलभ व्हावी हें जर इष्ट असेल व ईश्वर आणि मीं वस्तुतः एकच आहोंत, असें समजविणारें व पूर्णत्व देणारें ज्ञान करून घ्यावयाचें असेल तर ज्ञानमार्गाची बुद्धि देणारा, खरें समाधान उत्पन्न करणारा, भूतवत्सल व मृत्युसंसारसागरांतून तरून नेणारा जो सर्वसाक्षी, सर्वकर्ता, सर्वदयाघन परमेश्वर त्याचें अखंड ध्यान निष्कपट मनानें केलें पाहिजे. हेंच मुख्य साधन आहे.

## ईश्वराचे भक्त.

तात्पर्य, असें कीं, सर्व ज्ञानशास्त्रें आणि विज्ञानजन्य कर्म आणि ज्ञान, यांची परमसीमा जो भगवान् त्याच्या ठिकाणींच मनोबुद्धीचें अर्पण झालें, शास्त्राभ्यासानें सर्व ज्ञेय व विज्ञानशास्त्रांच्या अभ्यासानें सर्व विज्ञेय यांचें ज्ञान होऊन सर्वज्ञता आणि आप्तकामना प्राप्त झाल्या म्हणजे परमेश्वरानुग्रहास पात्रता येते. या वेळीं जी पराभक्ति अवतीर्ण होते तिचें चित्र या श्लोकावलींत दिलें आहे. हा पराभक्त सर्व शीतोष्णादि

विषयांपासून, तज्जन्य सर्व सुखदुःख, हर्षखेद इत्यादिकांपासून, इच्छाद्वेषांपासून, सारांश सर्व आधिभौतिक संस्कार आणि विकार यांपासून पराङ्मुख होत्साता एक आत्मस्वरूपांत निमग्न असतो हें यथास्थित रीतीनें जाणावयाचें आहे. आत्मस्थितीकडे जाणाऱ्या मुमुक्षूनें येथें दर्शित केलेली अवस्था म्हणजे सहजस्वरूप प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न अगत्य अगत्य करावा हीच तात्त्विक स्थिति आहे.

याप्रमाणें सातव्यांत परमस्वरूप व त्याची भक्ति, आठव्यांत ध्यानभक्तियोग आणि त्याचीं लक्षणें, नवव्यांत ज्ञेयस्वरूप आणि ज्ञानीभक्त, दहाव्यांत विभूतियोग व सामान्य भक्ति, अकराव्यांत सर्व भक्तांस होणारा साक्षात्कार आणि बाराव्यांत भक्तांच्या निरनिराळ्या अवस्थांचें वर्णन असून तत्त्वरूपाचें विवेचन संपविलें आहे व भक्तीचीं लक्षणेंही सांगितलीं आहेत. हेंच ज्ञानविज्ञान होय.

असो; या षडध्यायींत तत्त्वरूपाचा विचार झाला. हें स्वरूप कसें आहे, असें एकदम पहावयाचें असेल तर पुढील निष्कर्ष निघतो. ब्रह्मस्वरूप अव्यय, अव्यक्त, अक्षर, अज, अनादि, अमर, अनंत, अविकारी, अचिंत्य आणि अगोचर आहे. सारांश इंद्रियद्वारां व मनोबुद्धीच्या साहाय्यानें किंवा ईश्वरीप्रसादानें सुद्धां जें ज्ञान आपल्यास मिळूं शकतें त्याच्या पलीकडचें हें ज्ञान आहे; हें स्वसंवेद्य आहे व म्हणूनच सर्व शास्त्रें व सर्व श्रुति ह्या स्वरूपाचें ठिकाणीं पराङ्मुख होऊन 'नेति नेति,' असें म्हणण्यास प्रवर्तल्या आहेत. जें काय विधान करितां येणें शक्य आहे, त्याच्या पलीकडचें तें ज्ञान आहे. हें निर्गुणस्वरूप ह्या षडध्यायींतील प्रत्येक अध्यायांत वर्णिलें आहे, असो; आतां सगुण स्वरूप, ईश्वरीस्वरूप कसें आहे, तें पहा: तो ईश्वर सर्व, सर्वकारण, सर्वकार्य, सर्वात्मा, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वलघु, सर्वश्रेष्ठ, सर्वनियामक, सर्वभोक्ता, सर्वोद्धारक, सर्वलोकमहेश्वर, स्वभाव, सनातन, सम, प्रभु, विभु, कवि, पुराण, भूतादि, परंधाम, परंब्रह्म, परम पवित्र, परम दिव्य, भूतेश, भूतभावन, जगत्पति, दिव्य, आदिदेव, देवदेव, आणि त्याचप्रमाणें पिता, माता, धाता, पितामह, गति, भर्ता, साक्षी, निवास, निधान, उत्पत्ति, स्थितिलयकर्ता, वेद्य, ॐ, वेद इत्यादि आहे. पुनः, जेथें जेथें विभूति व श्रीमत्ता आहेत, तेथें तेथें परमेश्वरी विभूति आहे.

असो; हें तत्त्वरूपाचें निर्गुण व सगुण स्वरूप होय. निर्गुणस्वरूप हें उत्तम ज्ञानी भक्तासाठीं, सगुण स्वरूप मध्यम ज्ञानी परंतु एका सर्वेश्वराची भक्ति करणाऱ्या भक्तांसाठीं, ज्ञानी व अज्ञानी, सारांश सर्व सामान्य भक्तांसाठीं विराट स्वरूप आणि त्यांच्यापेक्षांही खालच्या प्रतीच्या लोकांसाठीं विभूति पूजा, असे निरनिराळे प्रकार निरनिराळ्या आत्मिक योग्यतेच्या पुरुषांसाठीं सांगितले आहेत. याचप्रमाणें भक्तीचे प्रकारही पुष्कळच सांगितले आहेत. पराभक्ति, अपराभक्ति, पूर्ण श्रद्धा, श्रद्धेनें सर्वेश्वराची भक्ति, श्रद्धेनें खालच्या देवतांची भक्ति, श्रद्धायुक्त परंतु सकाम भक्ति आणि केवळ राक्षसी अथवा

आसुरी भोगासक्त, इत्यादि अनेक प्रकारच्या लोकांसाठीं भिन्न भिन्न भक्तिमार्ग सांगितले आहेत. या भक्तींतच ज्ञान आणि योग व त्याचप्रमाणें कर्म यांचा योग्य तऱ्हेनें अंतर्भाव केला आहे. सारांश, कोणत्याही स्थितींतलि भक्त असो, त्याला आत्मोन्नति करण्याची एकदां प्रेरणा झाली म्हणजे त्याला प्रत्येक प्रसंगीं योग्य असा भक्तिपंथ येथें आहे. भक्ति हा मार्ग आहे, साधन आहे, साध्य नव्हे; हें ध्यानांत ठेवावयाचें आहे. भक्ति-श्रद्धायुक्त भक्ति-ही अंतःकरणास शुद्ध करून श्रेष्ठ स्थिति प्राप्त करून देते. ही अनेक प्रकारची, अनंत प्रकारची आहे; विभूतिपूजेपासून तो ॐकारोपासनेपर्यंत व ज्ञाननिष्ठ परब्रह्मोपासनेपर्यंत सर्व प्रकारची भक्ति येथें आहे. भक्तीचें विविधत्व भक्तांच्या आनंत्यामुळें उत्पन्न होतें. पूर्वसंचितानुसार व वर्तमानकर्मानुसार मनुष्याचें आत्मिकदृष्टीनें अनंत भेद होतात, त्यांच्या उद्धारासाठीं भक्तिभोक्ता व भक्तिपोषक जो परमेश्वर, त्यास हीं अनंत रूपें घेऊन अनंत मार्ग मायासाहाय्यानें उत्पन्न करावे लागतात. या अनंत मार्गोपासकांमध्यें वैर, वैषम्य, द्वेष असतां कामा नये. ज्याला जो आत्मिक उन्नतीचा मार्ग आवडेल तो त्यानें पतकरावा आणि स्वाचरणानें व स्वोपदेशानें आपला व इतरांचा उद्धार करावा, असा या षडध्यायीचा हेतु आहे. हें साधन सिद्ध झालें म्हणजे परब्रह्म आणि आत्मा एकच आहेत असें ज्ञान होऊन मुक्ति मिळते.

प्रथम परोक्षज्ञान, नंतर पराभक्ति, नंतर साक्षात्कार आणि साक्षात्काराबरोबरच अज्ञाननाश आणि मोक्ष ही परंपरा परमेश्वरांनीं ध्वनित केली आहे. ज्ञानाशिवाय भक्ति आंधळी असते आणि भक्तीशिवाय ज्ञान लंगडें असतें. ज्ञान, परोक्षज्ञान, हा बुद्धीचा, डोक्याचा विषय आहे; भक्ति-अपराभक्ति हा हृदयाचा-अंतःकरणाचा-विषय आहे. ज्ञानानें वस्तूचें स्वरूप समजतें. भक्तीनें वरिष्ठ स्वरूपाविषयीं पूज्य बुद्धि-प्रेम इत्यादि उत्पन्न होऊन तें वंद्य स्वरूप आपल्यासही असावें अशी इच्छा उत्पन्न होतें. सत्कर्म निष्कामतः करितां करितां ही इच्छा, ही श्रद्धा, अनावर झाली, एकाग्र झाली, एकांतिक झाली, म्हणजे ईश्वरसाक्षात्कार होतो म्हणजे अपरोक्ष-प्रत्यक्षज्ञान होतें. याच वेळीं विज्ञानही होतें आणि अज्ञानध्वंस होऊन ब्रह्मस्वरूप मिळतें. एवंच बुद्धीनें ज्ञान आणि हृदयानें विज्ञान यावें आणि दोघांचीही एकवाक्यता होऊन तत्त्वज्ञानविज्ञानाचें संपादन व्हावें हा भागवतधर्माचा पंथ आहे. आतां नुसतें ज्ञान झालें आणि ज्ञानस्वरूपाप्रमाणें आचरण होण्याची भक्ति नसली, तर त्या ज्ञानाचा आत्मोन्नतीला कांहीं उपयोग होत नाहीं. वेळ जात नाहीं म्हणून गंजिफा किंवा पत्ते खेळावयाचे, त्याचप्रमाणें चार घटका 'घटपटादि खटपट' करावयाची किंवा कांहीं वेळ बुद्धीची कसरत चालवावयाची इतकाच फार तर उपयोग होईल. आपली व्यावहारिक व आत्मिक उन्नति करून घ्यावयाची असेल; कुटुंबाची, समाजाची, जगाची प्रगति, ज्ञानानुसार व्हावी अशी जर इच्छा असेल; स्वतःचें व इतरांचें तापत्रय नाहींसें करून, निदान त्याची तीव्रता तरी कमी करून, सर्वत्र सत्कर्माविषयीं तत्परता व भोगाविषयीं युक्त अनादर यांचा अवतार व्हावयाचा असेल,

तर ज्ञानाच्या बरोबर भक्तीलाही आमंत्रण दिलेंच पाहिजे. तिच्याशिवाय ज्ञान अंगावें पडेल, इतकेंच नव्हे, तर तिच्या अभावीं, हें ज्ञान जीवास अनेक संकटांतही ढकलून नेईल. ग्रीसचें राष्ट्र लयास गेलें त्यास अनेक कारणें झालीं; पण मुख्य कारण हें कीं, तेथील भक्ति व श्रद्धा यांचा समूळ निःपात झाला. रोमचा प्रकार तोच; फ्रान्सची तीच दशा. आणि–पण देव करो आणि असें न होवो !–इंग्लंडमधील अमर्याद ज्ञानाची भक्तीच्या अभावीं, तीच स्थिति होईल कीं काय अशी भीति उत्पन्न होते. आमचें आर्यराष्ट्र लयास घालविण्याला अनेक कारणें झालीं असतील, पण माझ्या समजुतीनें मुख्य कारण भक्तीचा–खऱ्या भक्तीचा–अभाव, हेंच असलें पाहिजे. असो; नुसतें ज्ञान घातुक आहे, त्याचप्रमाणें नुसती भक्तिही घातुकच होय. कार्यकारणाचें ज्ञान असल्यावांचून जर भक्तीचा उदय झाला, ज्ञेयाचें स्वरूप काय आहे, हें नकळतां जर आपण भोळ्या भावानें–मूर्खपणाच्या भावानें–भक्ति करूं लागलों, तर कोण अनर्थपरंपरा ओढवेल बरें ? प्रथमतः आपण कोणाची भक्ति करितों, हें कळणार नाहीं; नंतर ती कां करीत आहों हें कळावयाचें नाहीं आणि ती कशी करावयाची हेंही आपल्यास समजणार नाहीं ! ज्या गांवीं आपल्यास जाण्याचें आहे त्या जागेचा ठावठिकाण व वर्णन तरी विदित हवें आहे. असो; हें माहीत नसेल तर आपल्यास रानावनांत हिंडावें लागेल, क्वचित्प्रसंगीं आपण फांसेपारध्याच्या तडाक्यांत सांपडूं आणि प्राणासही मुकूं ! सारांश, भक्ति करणें असली, तरी ज्ञान हवें आणि ज्ञान मिळविणे असेल तर भक्ति हवी. अर्थातच ज्ञानभक्तीचा व भक्तिज्ञानाचा उदय होत असतां चित्तशुद्धि करणारें कर्म आपल्या हातून झालें आहे व होत आहे, हें गृहीतच आहे. हा इतका विषयांतरी विस्तार केला याचा इत्यर्थ हा आहे कीं, नुसत्या कर्मानें, नुसत्या परोक्षज्ञानानें व नुसत्या अपराभक्तीनें कार्य व्हावयाचें नाहीं. येथें कर्म, भक्ति आणि ज्ञान या सर्वांचें कार्य आहे. विहित कर्म, श्रवणादि कर्म, परोक्षज्ञान, भक्ति, पराभक्ति, अपरोक्षज्ञान आणि मुक्ति अशा मुक्कामांनीं मोक्ष गांठावयाचा, असा हा पंथ आहे.

याप्रमाणें बाराव्या अध्यायाचा विचार झाला.

---

## खंड १३ वा.

# तेराव्या अध्यायाचा उपसंहार.

### अद्वैतामध्यें विचाराचें पर्यवसान.

१ पहिल्या सहा अध्यायांत त्वं पदार्थाचें, म्हणजे (तूं कोण आहेस?) या प्रश्नाचें उत्तर देऊन असें सिद्ध केलें कीं, जीव हा स्वरूपतः आणि परमार्थदृष्टीनें अज, अव्यय,

निर्गुण, निर्विकार, निरंजन, सनातन इत्यादि, अथवा सत्, चित् आणि आनंद या एकरसात्मक लक्षणांनीं युक्त आहे. दुसऱ्या षडध्यायींत तत् पदार्थाचें म्हणजे दृश्य व अदृश्य असणारें हें आभासिक विश्व आणि त्या विश्वाचा नियंता जो परमेश्वर या उभतांचें मूळस्वरूप कसें आहे एतद्विषयीं पुष्कळसें निश्चित प्रवचन करून असें ठरविलें कीं, परमार्थदृष्टीनें विश्व आणि विश्वनियंता हे एकच असून तो विश्वप्रज्ञ, विश्वव्यापक आणि विश्वव्यवस्थापक परमात्मा अज, अव्यय, निर्गुण, निर्विकार, निरंजन, सनातन इत्यादि, अथवा सत्, चित् आणि आनंद, या एकरसात्मक लक्षणांनीं युक्त आहे. एवंच आत्मा आणि परमात्मा हे वस्तुतः, आणि परमार्थतः एकच आहेत; कारण त्यांचीं लक्षणें एकरसात्मक आणि तादात्म्यपोषक आहेत, असें श्रुतिस्मृतियुक्त व अनुभवानुसार निरनिराळा उभयतांचा विचार केला असतां ठरतें; सारांश अद्वैताची, 'एकमेवाद्वितीयं' या उपनिषन्मूलक महावाक्याची, सिद्धि होते. **'तत्त्वमसि' 'अहं ब्रह्माऽस्मि' 'नेह नानाऽस्ति किंचन' 'सर्वं खल्विदं ब्रह्म'** इत्यादि स्वतः प्रमाण असणाऱ्या अनेक श्रुति एककंठानें या अद्वैततत्त्वाचा मात्र उद्घोष करित आहेत. धर्माचा व नीतितत्त्वांचा पायाही अद्वैत सिद्धांतांच्या अभेद्य शिलातलावर घातलेला आहे; राजनीतीचें, सामाजिक स्थैर्याचें व प्रगतीचें बीज अद्वैतभूमीकेमध्येंच रुजविलेलें आहे. हा आमचा पौरस्त्य विचार झाला. पण इतक्यानेंच काय झालें आहे? इंद्रियप्रत्यक्ष प्रयोगांनीं सिद्ध झालेलीं आधुनिक आधिभौतिक शास्त्रें त्यांचे द्रष्टे जे तपस्वी पंडित हे सर्व 'अद्वैत' तत्त्वांचा अनुघोष करित आहेत; फार तर काय, पण द्वैतमताचें, सेव्यसेवकभावाचें मंडन करण्याविषयीं आतुरतेनें तत्पर असणाऱ्या व ख्रिस्ती धर्माचें सशास्त्र प्रकाशन करण्यामध्यें चतुर अशा एका धार्मिक आचार्याचे खालील प्रेमोद्गार वाचिले असतां शुद्ध अंतःकरण असणाऱ्या सात्त्विक लोकांचे काळजीयुक्त विचार अद्वैतपरच होतात, हें कळून येईल.

The true natural language of devotion speaks out rather in the Poetry of the Psalmist and the prayers of Christ, declares the living contact of the Divine spirit with the human, the mystic implication of his nature with ours. and ours with his; his serenity amid our griefs, his sanctity amid our guilt, his wakefulness in our sleep; his life through our death; his silence amid our stromy force; and refers to him as the Absolute basis of all relative Existence, all else being in comparison but phantasm and shadow and he alone the Real and Essential Life."

(Martineau)

"निष्काम भक्तीची खरी व स्वयंभू स्तोत्रभाषा पाहिली असतां ती भाषा स्तोत्रपाठकांच्या हृदयोद्गारांसारखी किंवा ख्रिस्ताच्या प्रार्थनांकित स्तोत्रांसारखी बहुधा असते. ह्या भक्तिरसानें ओथंबलेल्या स्तोत्रांमध्यें जीवात्मा आणि परमात्मा या उभयतांच्या जागृत सान्निध्याचें विवरण केलेलें असतें; ह्यांत परमात्म्याचे धर्म जीवात्म्याला आहेत व जीवात्म्याचे धर्म परमात्मस्वरूपामध्यें आहेत असा साक्षात्कारप्रदर्शक गूढ अंतर्भाव असावयाचाच; तसेंच जीवाची विकारवशता आणि परमात्म्याचें निर्विकारत्व, जीवाची पापमग्नता आणि परमात्म्याचें प्रखर शुद्धत्व, जीवाची निद्रा आणि परमात्म्याची जागृती, जीवाची चंचल राजसता आणि परमात्म्याची पूर्ण निश्चल सात्त्विकता, यांचा पूर्ण विचार झालेला असतो. तसेंच त्यांत हें मायानिर्मित जें दृश्य विश्व आहे त्याचें अधिष्ठान परमात्मा आहे, हें स्थापित केलेलें असतें; आणि परमार्थदृष्टीनें पाहिलें असतां तदितर सर्व यच्चावत् वस्तू गंधर्वनगरीप्रमाणें किंवा मृगजळाप्रमाणें अयथार्थ, मिथ्या, असून तो परमात्म्या मात्र एक, सद्वस्तु व सत्य आहे, असें सिद्ध केलेलें असतें.) हा तात्पर्यार्थ मात्र आहे.

मार्टिनो.

ख्रिस्ती लोकांकडून आणखी जास्त कबूलजबाब कोणता हवा? 'या निशासर्वभूतानां' 'विनश्यत्स्वविनश्यन्तं' 'समं पश्यन्हि सर्वत्र' 'शीतोष्णसुखदुःखेषु' इत्यादि भगवंतांचीं अमोघ वाक्यें वरील मूळ व त्याचें भाषांतर वाचतांना कोणत्या गीताभक्तास आठवणार नाहींत?

कांहीं मुसलमान काय ह्मणतात तें पहाः—

"Ye who are in search of God, of God, pursue,
Ye need not search, for, God is you, is you!"

"ईश्वराचा शोध करणाऱ्या निःसीम भक्तांनो! आपला शोध पुरे करा; कारण तुम्हीं स्वतःच ईश्वर अहां!"

सेलकृत इस्लामाचे निबंध पृ० २६.

When you search Me, there search Him,
When there search Him, there search us both."

"जेव्हां माझ्याकडे तूं शोधकबुद्धीनें पाहतोस तेव्हां तुला ईश्वर दिसतो, आणि ईश्वराचें दर्शन घेतोस तेव्हां तुला उभयतांचें दर्शन होतें." पृ० ३१.

"When your essnce is free from all Stain"
(of individuality)

Then it is that your prayers are a joy.
There remains then no distinction,
Knower and known are one and the same.

" 'मी व माझें' हा अभिमान विगलित करून तूं निष्पाप झालास म्हणजे तूं शुद्ध होतोस. या स्थितींतील तुझ्या प्रार्थना पूर्णानंद देणाऱ्या असतात. मग भेदाभेद-विवेक, ज्ञातृज्ञेयविवेक, इत्यादि कोणत्याही प्रश्नाची भानगड उरत नाहीं; कारण ज्ञाता व ज्ञेय हे तादात्म्य पावतात."

असो; हे उतारे बरेच झाले. आणखीही पुष्कळ देतां येतील. पण वर दिले आहेत, इतक्यांनींच इष्टभाग म्हणजे अद्वैत सिद्धांताची सिद्धि सफल होते. परकीय आणि द्वैतवादी म्हणून नाणावलेल्या खिस्ती व महंमदी धर्मानुचरांच्या गोटांत अद्वैताचें बीज आज नाहीं उद्यां, केव्हां तरी—कसें रुजतें हें स्पष्टपणें दाखविण्यास वरील उतारे बस्स आहेत. सारांश, सद्विचाराचें पर्यवसान अद्वैतांतच होणार, आणि तें विश्वंभर झालें म्हणजे मात्र पुनः **सत्ययुगाचा** अवतार होणार; ह्या गोष्टी ध्यानांत ठेऊन पुढील उपसंहार वाचावा आणि तदनुरूप आचरण ठेऊन स्वतःचें व स्वेतरांचें कल्याण करून घ्यावें, अशी, भाविक-बुद्धीनें मुमुक्षूंस सूचना करण्याचें धारिष्ट करून इष्ट मार्गाकडे वळतो. हा इष्टमार्ग म्हणजे प्रत्यगात्मा व परमात्मा यांचें तादात्म्य होय.

**क्षेत्रक्षेत्रज्ञ.**

२ हें आपलें शरीर म्हणजे क्षेत्र (ज्ञानविषय, ज्ञेय, Object) आणि त्या शरीराचा ज्ञाता तो क्षेत्रज्ञ (ज्ञाता, Subject) होय; तसेंच सर्व क्षेत्रांचा ज्ञाता परमेश्वर असून तो प्रत्येक क्षेत्रामध्यें विचारैकगोचर आहे. हीं सर्व ज्ञानोपकरणें व त्यांचीं लक्षणें सांगून भगवान् म्हणतात कीं, हें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान विवेकपूर्वक झालें म्हणजे तेंच सर्वोत्कृष्ठ ज्ञान होतें. आतां भगवान् जें ज्ञान प्रकट करीत आहेत, तें श्रुति, स्मृति व इतर प्रमाणग्रंथ यांस मान्य आहे, इतकेंच नव्हे, तर या सिद्धांताची 'भवति न भवति' करून त्यांनीं हें ज्ञान निश्चितही करून ठेविलें आहे. या अध्यायाचें बीज अध्याय २ श्लोक २१ यांत आहे हें वाचकांनीं विसरूं नये.

**क्षेत्र म्हणजे काय ?**

३ क्षेत्र म्हणजे ज्ञानाचा विषय (phenomenal object), ज्याच्याविषयीं कांहीं तरी ज्ञान होणें शक्य आहे, संभवनीय आहे. ज्याच्याविषयीं ज्ञान असतें, तो विषयभूत पदार्थ, क्षेत्रामध्यें अंतर्भूत होतो. 'मी अमुक आहें' या अहंकारापासून तों

आपल्या मनबुद्ध्यादि पंचेंद्रियांस गोचर होणारे सर्व चराचर, स्थूलसूक्ष्म, पदार्थापर्यंतच्या यच्चावत सर्व पदार्थांची गणना क्षेत्रामध्यें होते. आपलें मन, बुद्धि, जाणीव, हीं ज्ञानाचीं सचेतन द्वारें आहेत व यांच्यायोगें आपल्यास ज्ञान होतें, अशी आपली समजूत आहे; पण ही समजूत परमार्थदृष्टीनें खरी नाहीं. जाणीव ( Consciousness ), बुद्धि, मन इत्यादि इंद्रियें किंवा उपकरणें ज्ञानदायक आहेत, हें व्यवहारांत मात्र खरें आहे; परमार्थ-दृष्टीनें हीं इंद्रियें स्वतः जड आहेत, ज्ञानशून्य आहेत आणि म्हणून ज्ञानविषय आहेत, असें सिद्ध होतें. अलीकडील शोधांनीं नेत्र, कर्ण इत्यादि इंद्रियें जडद्रव्याचीं बनविलेलीं आहेत असें ठरलें आहे. फार तर काय, पण, मन, बुद्धि इत्यादि ज्ञातृ-स्वरूपानें मिरविणारीं ज्ञानोपकरणें हीं जडद्रव्यघटित आहेत, असें अनुभववादी व उत्क्रान्तिवादी लोकांचें म्हणणें आहे व तें म्हणणें सार्थ आहे असें आधुनिक मानस-शास्त्री म्हणत आहेत.

याप्रमाणें मन, बुद्धि व इंद्रियें हीं जात्या अचेतन आहेत, यांस चेतविणारा कोणी चैतन्यरूपी आत्मा नसेल तर हीं सर्वथा जड, अचेतन आणि अज्ञानपूर्वक असणार, असें म्हणणारे सांख्य, सांख्यांच्या आधीं प्रकट झालेले उपनिषद्ग्रंथ आणि उपनिषद्रहस्य सांगणारें गीताशास्त्र हीं सर्व आजपर्यंत म्हणतच आलीं आहेत. या त्यांच्या म्हणण्यावर आपली म्हणजे आस्तिक लोकांची श्रद्धा असतेच. पण या श्रद्धेलाही एक विलक्षण पुष्टि अलीकडील सूक्ष्मदर्शक उपकरणांच्या अप्रतिम साहाय्यानें विश्वाचें प्रत्यक्ष अवलोकन सशास्त्र पद्धतीनें करणाऱ्या आधुनिक दीर्घोद्योगी व शास्त्रशौंड महापुरुषांकरवीं, मिळत आहे, ह्याचें साभिमानपुरःसर कौतुक आम्हांस किती वाटावें ? अलबत अत्यंत कौतुक वाटलें पाहिजे. असो; आतां 'मी अमुक आहें' ही जाणीव किंवा हा अहंप्रत्यय अगर अहंकार हाही जडाचाच, अज्ञानाचाच भाग आहे, हें सत्य मात्र अद्यापि सर्वसंमत झालें नाहीं. युक्ति व अनुभव सांख्यमतास अनुकूल आहेत, तथापि जाणीवेला जड वर्गात गोंविण्याचें धैर्य आधुनिक पंडितांस अद्यापि आलें नाहीं. कालेंकरून तेंही धैर्य येणार आहे, यांत शंका नाहीं. असो. तेव्हां जाणीव, 'मी अमुक आहें' हें ज्ञान, किंवा हा आभास, जड वर्गांतच अंतर्भूत होतो, हें समजून घेतलें म्हणजे अद्वैत-सिद्धांत समजण्यास बिलकूल अडचण पडणार नाहीं. पहाः '**मला सुखदुःख मिळाल्यास मी सुखी** अगर **दुःखी** होईन' असा **भोक्तृत्वाच्या** ज्ञानास किंवा आभासास जन्मादारभ्य आरंभ होतो व तसेंच '**मी कर्म** केलें असतां **मला सुख-दुःख** मिळेल, **मी आपल्यास सुखी करीन**' ह्या कर्तृत्वाच्या ज्ञानास किंवा आभासास ही जन्मल्यापासूनस आरंभ होतो. व्यवहाराचा, निसर्ग क्रमाचा, विश्वव्य-वस्थेचा जसजसा ज्यास्त अनुभव येतो व बुद्धि प्रगल्भ होत जाते, तसतसें आपल्या कर्तृत्वाच्या स्वातंत्र्यासंबंधें व स्वामित्वासंबंधें आपण साशंक होत जाऊन विश्वव्यवस्थेमध्यें आपलें कर्तृत्व 'पाव रत्तीही' नाहीं, असें आपल्यास वाटतें व तसेंच स्वातंत्र्य भोक्तृत्व

नाहीं, अशी आपली खातरजमा होत असते: सारांश (१) **आपण म्हणतो तसेंच होतें** असा नियम नाहीं, (२) विश्वामध्यें अनंत शक्तींचा कलह कांहीं एका निश्चित पद्धतीनें चाललेला आहे, त्या कलहांत आपला कर्तृत्वाचा अंश फारच थोडा आहे, (३) आपली भोगतृष्णाही आपल्या स्वाधीन सर्वशः नसून सुखदुःखांशीं आपला संबंध स्वतंत्रतेचा नाहीं, (४) जीवाच्या **भोगासाठीं** हें विश्व व्यावहारिक अस्तित्वांत आलें आहे असें नाहीं; तर अज्ञानी व सुखदुःखाच्या जाळ्यामध्यें अडकलेल्या **जीवाच्या उद्धारासाठीं**, त्याच्या प्रगतीकरितां, ही विश्वाची व्यवहारिक सत्ता आहे.' अशा प्रकारचे विचार उत्पन्न होऊं लागून, स्वतःच्या भोगविषयक कर्तृत्वाभिमानाला आळा पडतो. कालांतरानें ह्या अभिमानशून्यतेचें पूर्ण स्वरूप उद्भवलें म्हणजे ईशनिष्ठा, योगसाधन, ईशध्यान आणि अद्वैतज्ञान अशी उत्तरोत्तर श्रेष्ठ मोलाचीं फलें उत्पन्न होतात; आणि 'मी अमुक आहें' हें ज्ञान जडवर्गांत गणिलें जाऊन, जीवांचें जीवस्वरूप नष्ट होतें व आत्मस्वरूप अथवा ब्रह्मस्वरूप घडतें; सारांश तो जीव मुक्त होतो. एतावता 'क्षेत्र म्हणजे काय' या प्रश्नास काय उत्तर मिळालें बरें ! क्षेत्र म्हणजे यच्चावत् इंद्रियगोचर, मनोगोचर व बुद्धिगोचर असणाऱ्या सर्व आभासिक वस्तू, तसेंच इच्छा, द्वेष, सुखदुःख, चेतना, धैर्य इत्यादि आभासिक मनोविकार व बुद्धिविकार व ह्याचप्रमाणें मन, बुद्धि व अहंभाव हीं सर्व होत. हें क्षेत्र नाशवंत स्वरूपाचें आहे, प्रकृत्यात्मक आहे, त्रिगुणसंवलित आहे, म्हणून असत्य, मिथ्या व दोषयुक्त आहे. आतां हें असत्य, हें मिथ्यात्व व ही सदोषता **व्यवहारांत** एकाच प्रतीची आहे, असें मात्र समजूं नये. हिमाचल पर्वताच्या दृष्टीनें जरी खंडाळ्याचा माथा किंवा सिंहगडचें शिखर हीं क्षुद्र आहेत, तरी खंडाळ्याच्या शिखराची क्षुद्र उंची बंगाली उपसागराच्या खोली इतकीच आहे, असें म्हणणारा पुरुष व्यवहारांत वेडा ठरेल; कारण हिमाचलाच्या दृष्टीनें जरी खंडाळ्याचा डोंगर लहान आहे, तथापि बंगाली उपसागराच्या दृष्टीनें तो डोंगर पुष्कळच उंच आहे. त्याचप्रमाणें इच्छाद्वेष, किंवा सुखदुःख इत्यादि मानसिक द्वंद्वें एकाच मालिकेंत एकाच किंमतीनें गोंवणाऱ्या व्यावहारिक पुरुषांसही व्यावहारिक भाषेंत 'खुळा' असें उपपद जोडावें लागेल ! दोरीवरील सर्पाचा आभास भ्रांतिमूलक म्हणून खोटा, माझें स्वप्नांतील राज्यवैभव स्वप्नस्थ म्हणून खोटें, त्याचप्रमाणें जागृत व्यवहारांतील दिसणारें विश्व ही खोटें, असें म्हणण्याचा संप्रदाय आहे. मला हें म्हणावयाचें आहे कीं, ह्या खोटेपणांत ही प्रतवारी आहे. या प्रतवारीला दोन नांवें आहेत (१) व्यावहारिक सत्ता (Relative existence) व (२) प्रातिभासिक सत्ता (Illusion) अशीं दोन नांवें आहेत. पहिली सत्ता व्यवहारकालीं खरी असते. दुसरी व्यवहारकालीं सुद्धां खोटी ठरते.

* येथें ध्यानांत ठेवण्यासारखी आणखी एक गोष्ट सांगून ठेवावीशी वाटते; ती ही कीं, ईश्वराच्या निष्काम कर्मानें ही व्यावहारिक सृष्टि अनादिकालापासून चालली आहे, व ही

अनंतकालपर्यंत उत्क्रांतितत्त्वाच्या अनुरोधानें चालणार आहे. या सृष्टीची उत्पत्ति जीवांस त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार भोगप्राप्ति व्हावी, एतदर्थ चालली आहे. कर्मे करून उपभोग घेणे हे काम भूलोकीं जीव करितात. पुण्यकर्माचा उपभोग येथें संपला नाही तर तो स्वर्गलोकीं होतो आणि पापकर्मांची शिक्षा येथे पूर्णतः मिळाली नाहीं तर नरकलोकच्या यातना जीव भोगितात. सारांश, कर्मभोगासाठीं ही सृष्टि आहे असें कर्मठ म्हणतात. हे म्हणणें वेदांतवाद्यांस असंमत नाहीं. ते लोक पुढें असे म्हणतात कीं, भोग देणें हेंच काय ते सृष्टीचें काम नव्हे, किंवा सृष्टिरचनेचा हा उद्देशही नव्हे. तर भोगविन्मुख होऊन सृष्टीचे नियम शोधून काढावे, त्यांपासून व प्रचलित श्रुत्यादि प्रामाणिक ग्रंथांपासून, गुरूंपासून, ईश्वरी ज्ञानाचा लाभ करून घ्यावा आणि ज्ञानविज्ञानाच्या साहाय्याने सृष्टीच्या व सृष्टिचक्राच्या बाहेर पडून मोक्ष संपादन करावा, हाही सृष्टिस्थितीचा हेतु आहे. असो; इच्छा, द्वेष इत्यादि सहाव्या श्लोकांत सांगितलेल्या वस्तु जीवकृत आहेत. म्हणजे उपभोग घेतांना हे मनोविकार जीवाच्या अंतःकरणांत त्याच्या ज्ञानानुरोधानें उत्पन्न होतात. पण पांचव्या श्लोकांतील वस्तु निसर्गजन्य आहेत. अव्यक्त, बुद्धि, अहंकार, पंचतन्मात्रा, मन, दहा इंद्रियें व पंचमहाभूतें हीं मायोपाधिक ईश्वरानें मायेवर स्वामित्व ठेवून उत्पन्न केलीं. या सर्व महाभूतांच्या व्यापाराचें जे सामान्य ज्ञान तींच शास्त्रें होत. त्या शास्त्रांतील नियमांप्रमाणे चालले असतां सामान्यतः जीवपोषण होऊन सुख होते व त्या ज्ञानाचा अनादर केला असतां दुःख होतें. सारांश सृष्टिजन्य महाभूतांपासून आपल्यास सुख किंवा दुःख होणें हें भूतांच्या म्हणजे भूतसंबंधी ज्ञानावर अवलंबून असते. त्याचप्रमाणे कामक्रोधादिकांची स्थिति जाणावी. ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही आहे कीं, आपल्या सभोंवार असणाऱ्या अव्यक्तापासून तों शब्दस्पर्शादि विषयापर्यंतच्या अष्टविध अपरा प्रकृतीचें ज्ञान, व्यवस्थितज्ञान, करून घेणें ही कांहीं केवल माया नव्हे. फार तर काय ? पण हें ज्ञान क्रमशः ईश्वरीज्ञानाचें, आत्मज्ञानाचें अवतरण करण्यास समर्थ आहे. या ज्ञानानें बुद्धि विकसित होते. व या ज्ञानानुसार वर्तन ठेविलें तर अदृष्टाखेरीज इतर दुःखहीं होत नाहीं. पण नुसत्या भोगदृष्टीनेंच जर यांचे अवलोकन केले (अज्ञान दशेतच हे व्हावयाचें!) तर वर्तमान कर्मविपाक व अदृष्टविपाक यांचे संमेलन होऊन येथील जीव यात्रा संकटमय, संसारमय, होते. हा भाग झाला. दुसरा भाग असा आहेः एका जन्माच्या अंतकाळीं जी भावना असते, त्या भावनेनुरूप पुढचा जन्म येतो व त्यावेळीं जीव, जीवबुद्धि (विषयज्ञानशक्ति व विषयवासनाशक्ति), जो अहंकार, जीं इंद्रियें (कर्माचीं व ज्ञानाचीं), जें मन व जो शरीरसंघात ग्रहण करितो, तीं तीं सर्व त्या जीवाच्या पूर्वकर्मानुसार असतात; सारांश, देह काय तो भिन्न, बाकीचे सर्व पदार्थ व पदार्थसंस्कार होतात ते पूर्वजन्मानुरूपच असतात. आणि देह तरी भिन्न म्हणजे पूर्वदेहाचें स्मरण त्यास नसतें म्हणूनच होय. एवंच आपली शरीरसृष्टि आपल्या म्हणजे जीवाच्या कर्मानुसार होते आणि विश्वसृष्टि ही विश्वाच्या कर्माप्रमाणें उत्क्रांत अथवा अधःक्रांत होत

असते. परमेश्वराचें निष्काम कर्म म्हणजे त्याचें सनातन साक्षित्व होय. एवंच जीवाच्या पूर्वकालीन व वर्तमान कर्मांप्रमाणें त्याचें शरीर, व त्याची बुद्धि व त्याच्या वासना असतात. कोणत्याही संस्थेचें, देशाचें व विश्वाचें नियमन म्हणजे त्याची उत्क्रांति ( प्रगति Evolution ) व अधःक्रांति ( अधोगति Dissolution ) ह्या वरील नियमानुसारच चालतात. ज्ञानाच्याही अवस्थांतरांचें हेंच कथानक आहे. ह्या कथानकांत कर्मविपाकाचा व अदृष्टाचा समावेश होतो. असो; आपल्या ज्ञानाच्या योग्यतेप्रमाणें आपली जीवसृष्टि व विश्वसृष्टि असते, हेंही आतां उघड होईल. पण ह्या विश्वगत प्रकृतिनियमास एक जोराचा अपवाद आहे. तो हा कीं, जीव स्वरूपतःच आत्मिक असल्या कारणानें हे प्रकृतीचे नियम पराभूत करण्याचें त्याला केव्हांही स्वातंत्र्य आहे. म्हणजे कसल्याही अधोगतीस पावलेला जीव पुनः स्वश्रमानें आपला उद्धार करूं शकतो; आणि दृढनिश्चयानें त्या पुरुषानें योगपूर्वक, चित्तशुद्धिपूर्वक आणि भक्तिपूर्वक निष्कामकर्म करण्यास आरंभ केला तर तो तसला अभागी जीवही भाग्यवंताचा भाग्यवंत होतो. पण हा विषय येथें नको.

५ येथें भगवंतास सांगावयाचा मुद्दा हा आहे कीं, आपली दृष्टि परमार्थपर झाली, किंवा आपली मुमुक्षा प्रबल झाली म्हणजे, त्या त्या मोक्षैकगामी पुरुषानें उदरंभरण, द्रव्यलाभ, कुटुंबपोषण, कीर्ति, सुख, स्वदेशकल्याण, सुधारणा, मानवकल्याण इत्यादि, जे जे उत्तरोत्तर श्रेष्ठ पदार्थ साध्य करून मिळविण्यासारखे दिसतात तेथें किंवा यौगिक चमत्कार, ईशप्रसाद, भक्त्यानंद इत्यादि परमावधीचें सुख देणाऱ्या ज्या ज्या वस्तू श्रुतिस्मृतींत वर्णिलेल्या आहेत, त्या सर्वांचा अधिगम झाल्यानंतर, तेथेंच न थांबतां आपल्या आत्मिक उन्नतीचा क्रम तसाच पुढें चालवून, आत्मसाक्षात्कार किंवा ब्रह्मसाक्षात्कार साध्य करून घ्यावा. व्यावहारिक क्षेत्र हें आपलें स्वरूप नव्हे, हें स्पष्ट पणें कळलें पाहिजे म्हणून, भगवंताचा हा विस्तार आहे. जी जी वस्तु म्हणून ज्ञानाचा विषय आहे ( व यांतच जीवदशा, मन, बुद्धि व त्यांचे विकार, इंद्रियें, व पंचमहाभूतें व त्यांचीं स्थूलसूक्ष्म व्यक्त, व अव्यक्त स्वरूपें येतात म्हणजे परा व अपरा प्रकृति येतात. ) जो जो म्हणून अनित्यता अथवा स्वरूपभेदाचा अंश आहे, तो तो सर्व क्षेत्र नामक पदार्थ होय. कपिलसांख्यवादी, न्यायवादी, द्वैतवादी, **बुद्ध, चार्वाक,** भौतिकवादी इत्यादि सर्व प्राचीन व अर्वाचीन मतांचे 'आत्मे' या क्षेत्रलक्षणानें क्षेत्रांमध्यें अंतर्भूत होतात. सांख्यांचे भोगभोगणारा आत्मा, सुखदुःखादि लक्षणांनीं व कर्तृत्वशक्तीनें संवलित असा नैयायिकांचा आत्मा, विकार पावणारा व भक्तिसुख घेणारा द्वैतवाद्यांचा आत्मा, क्षणक्षणानें पालटणारा बुद्धांचा आत्मा, देहाबरोबर जन्ममृत्यु पावणारा चार्वाकांचा आत्मा, नैसर्गिक सृष्टि हाच भौतिकवाद्यांचा आत्मा, इत्यादि सर्व ' आत्मे ' सत्स्वरूप नसून, केवळ क्षेत्रांत अंतर्भूत होणारे आहेत, असें भगवंतांनी सांगितलें आहे, तें श्रुतिस्मृत्यादिक सिद्धांतानुरूप आहे. सारांश, ज्ञानविषयक जेवढे पदार्थ आहेत, ते क्षेत्रवर्गांत येतात. सत्तारूपानें ह्या सर्वांचें अधिष्ठान

आत्मा आहे, हें खरें; पण या पदार्थांचे जें स्वरूप बुद्धयादि अंतर्बाह्येंद्रियांस गोचर होतें, तें आत्मस्वरूप नव्हे, तें क्षेत्र आहे, हें ध्यानांत ठेविलें म्हणजे या विस्ताराचें काम झालें.

## ज्ञान म्हणजे काय ?

६ क्षेत्राचें लक्षण केल्यानंतर क्षेत्रज्ञ जो आत्मा त्याचें लक्षण व स्वरूप सांगावयाचें सोडून देऊन भगवान ज्ञानाकडे कां वळले ? याचें उत्तर असें आहे कीं, क्षेत्रज्ञानाचें स्वरूप समजण्यास अवश्य असणारें साधन जें ज्ञान, तें पूर्णपणें अवगत झाल्याखेरीज क्षेत्रज्ञाचें स्वरूप व त्याचें लक्षण कळणार नाहीं. शिवाय ज्ञान म्हणजे काय हेंही आपल्यास समजून घेणें अवश्यच आहे. आतां वेदांताचा अभ्यास करणाऱ्या मुमुक्षु विद्यार्थ्यांस हें सांगावयास नकोच आहे कीं, (वेदांताच्या पारिभाषिक शब्दांनीं बोलावयाचें म्हणजे) ज्ञान याचा अर्थ अद्वैतानुभव होय. ह्या अखिल ब्रह्मांडांत एकच तत्त्व ओतप्रोत व घनदाट पसरलेलें आहे असा निश्चय व असा अनुभव याचें नांव ज्ञान होय. हें ज्ञान आपल्या इन्द्रियमनोबुद्धींस अगोचर आहे. चित्तशुद्धी करून घेऊन व इन्द्रियमनोबुद्धीच्या पलीकडे जाऊन अथवा इन्द्रियमनोबुद्धीचे व्यापार स्तब्ध व शून्य करून योगाभ्यासानें स्वस्वरूपाचा शोध लावावयाचा आणि भक्तिमार्गानें जाऊन ईश्वरामध्यें आणि नंतर ब्रह्मस्वरूपामध्यें लीन व्हावयाचें, व्यक्तिविशिष्ट आत्मा टाकून देऊन व विश्वनिष्ठ आत्म्याचें ज्ञान संपादन करून मग ब्रह्मीं ब्रह्म होऊन जावयाचें हा ज्ञानाचा मुक्तिदायक फलोद्गम आहे. सारांश ज्ञान म्हणजे अद्वैत स्वरूपाचें पूर्ण विज्ञान होय. हें विज्ञान एकदम होणें अर्थातच शक्य नाहीं. याकरितां भगवंतांनीं श्लोक ७ ते ११ मध्यें ज्ञानसाधनांचा निर्देश केला आहे. तीं साधनें हींः अमानित्व म्हणजे (१) 'आपण मोठे नव्हों' असा परिचय; (२) अदंभित्व म्हणजे आपण मोठे नसतांही लोकांनीं आपले वरचें स्वरूप पाहून आपल्यास मोठें म्हणावें या इच्छेचा अभाव,' (३) अहिंसा म्हणजे स्वेतरांसंबंधें पूर्ण निरुपद्रवीपणा; (यांतच सत्य, अस्तेय ब्रह्मचर्य, अपरिग्रह इत्यादिकांचा समावेश होतो); (४) शांति म्हणजे सुखदुःखसहिष्णुतापुरःसर मनःशांति; (५) आर्जव म्हणजे मनाचा सरळपणा; (६) आचार्योपासना म्हणजे वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध लोकांची पूज्यभावपुरःसर सेवा; (७) शौच म्हणजे अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा; (अभक्ष्यभक्षण, अपेयपान इत्यादि अनाचार सर्वथा वर्ज करून शरीर जलमृत्तिकादिकांनीं शुद्ध ठेवणें ही बाह्य शुद्धि, आणि राग, द्वेष, तृष्णा इत्यादिकांनीं शरीर व मन विटाळूं न देणें ही अंतःशुद्धि) (८) स्थैर्य म्हणजे स्थितप्रज्ञता; (तत्त्वज्ञानाचें श्रवण, मनन, निदिध्यासन, अखंडत्वानें चालविण्याचें सामर्थ्य जेणेंकरून प्राप्त होतें तें स्थैर्य) (९) आत्मविनिग्रह म्हणजे मनःसंयमन (१०) विषयवैराग्य; (११) अभिमानशून्यता; (१२) 'दृश्य दुःखमय आहे' असें ज्ञान; (१३) निःसंगता (१४) निष्प्रेम; (ममत्वशून्यता) (१५) सदैव समचित्तता; (१६) परमेश्वराचे ठायीं अनन्य भक्ति; (१७) एकांतवास;

( १८ ) दुष्ट लोकांचा त्याग; ( १९ ) स्वस्वरूपाचें निराबाधज्ञान आणि (२०) ब्रह्मस्वरूप-परिचय हीं सर्व परोपरीचीं ज्ञानसाधनें आहेत. या सर्व वृत्तीस ज्ञान ही संज्ञा दिली आहे, ती तरी त्या ज्ञानसंवर्धक वृत्ति आहेत ह्मणून होय. पुनः ही लक्ष्यांत ठेवण्याची गोष्ट आहे कीं, ह्या सर्व वृत्तींच्या अंतर्यामीं विषयपराङ्मुखता आहे. केवळ बाह्य विषयच नव्हेत, तर अहंकारादि अंतर्विषयाची पराङ्मुखता यांत स्पष्ट गोचर होत आहे. कधीं कधीं जीव बाह्यविषयांचा त्याग करितात, पण त्यांस मानापमानाची चाड असते. कोणी कीर्तिमुख होतात, कोणी दांभिक असतात, कोणी तर इतके अभिमानी असतात कीं, त्यांस 'आपल्यापेक्षां कोणी शहाणा आहे' असें दिसतच नाहीं, कोणी मलीन वृत्तीनें राहण्यांतच भूषण मानितात, कोणाची आसक्ति पारलौकिक सुखावर असते, असे अनेक मानसिक दोष स्वार्थत्यागी पुरुषांत दिसून येतात. ह्या सर्वांचाही त्याग विहित आहे. एक ब्रह्मस्थितींत असणें हीच आशा ( मुमुक्षा ) असून इतर सर्व भौतिक, मानसिक व हृदयगत आशांचा तिरस्कार ज्यानें केला, 'तोच नर भला भला' होय. ही ब्रह्मस्थिति मिळविण्यास वरील सर्व साधनांचें अनुकूल्य हवें असतें. या साधनांनीं, या सर्वथा चित्तशोधक साधनांनीं, शुद्ध ज्ञानावर दडपण घालणाऱ्या सर्व प्रत्यवायांचा, तसेंच ममत्वाचा व वासनेचा सारांश अज्ञानाचा, नाश होतो. अज्ञान ह्मणजे मिथ्या-ज्ञान होय. 'मी देहविशिष्ट आहें' असें वाटणें, अथवा मर्यादित, आणि ह्मणूनच, मिथ्याज्ञान असणें, याचें नांव अज्ञान होय. या अज्ञानाचा नाश वर दिलेल्या २० साधनांनीं होतो. आपलें मर्यादित किंवा संकुचित विषयज्ञान काढून टाकून त्याच्या ऐवजीं अमर्याद स्वरूपाची भावना स्फुरूं लागली ह्मणजे स्वाभाविकतःच अहंकार व वासना यांचा नाश होऊन चित्तवृत्ति निर्विषय आणि पुढें ब्रह्मस्वरूप होते. हें ब्रह्मस्वरूप ज्ञान-द्वारा प्राप्त करून घेणें हा पुरुषार्थ आहे व या पुरुषार्थाची सिद्धि वरील साधनांनीं होते.

असो; हीं साधनें सिद्ध होऊन योगमार्गानें स्वस्वरूपाची ओळख झाली, भक्ति-मार्गानें परमेश्वराच्या परम स्वरूपाचें ज्ञानविज्ञान झालें, ह्मणजे स्वस्वरूप आणि परमेश्वर-स्वरूप हीं वस्तुतः, परमार्थतः, एकच आहेत असा जो साक्षात्कार होतो, त्याचें नांव ज्ञान होय. सारांश ज्ञान ह्मणजे जीवब्रह्मैक्याचा साक्षात् परिचय आहे आणि हेंच ज्ञान मोक्षद आहे ह्मणून उपनिषदांनीं व उपनिषदांचें रहस्य व्यावहारिक द्वारा प्रकट करणाऱ्या भगवंतांनीं तें ज्ञान जीवमुक्त्यर्थ प्रकट केलें आहे. आतां,

### ७ ज्ञेय ह्मणजे काय ?

तें सांगून भगवान् या विषयाची परिसमाप्ति करितात. हें ज्ञानगम्य ज्ञेय ह्मण-जेच परब्रह्म. हें अनादि, अनंत, अचिंत्य, अवर्ण्य, सदसद्विलक्षण असून स्वसंवेद्य आहे. दुसऱ्या श्लोकांत क्षेत्रज्ञ ह्मणून ज्याचा निर्देश केला तेंच हें ज्ञेय होय. हें सर्वव्यापी, सर्वदृष्टि, सर्वसाक्षी आहे, असें ह्मणणें हा केवळ व्यवहार आहे व तो समजुतीसाठीं व अज्ञानाचा

निरास करावयाकारितां उत्पन्न झाला आहे. असें पहा कीं, बिंदूला लांबी, रुंदी व उंची नसूनही अनंत बिंदूंनीं लांब असणारी रेषा उत्पन्न होते, असें आपण ह्मणतों. तसेंच रेषेला लांबी असते पण रुंदी नसते: पण या रेषांनींच लांब व रुंद असणारी पातळी उत्पन्न होते. या पातळीला लांबीरुंदी असूनही उंची नसते आणि याच पातळीपासून पुढें लांबी, रुंदी व उंची असणारे घन पदार्थ उत्पन्न होतात. म्हणजे बिंदूला कोणतेंही परिणाम नसूनही तो जसा आपण काढितों, रेषेला रुंदी नसूनही ती काढतों, त्याचप्रमाणें ब्रह्माला आकार, रंग, रूप इत्यादि कोणताही गुण नसून आपण व उपनिषदादि ग्रंथही केवळ व्यावहारिक जीवदृष्टीनें, त्यास सर्वदृष्टि, सर्वसाक्षी, सर्वगामी इत्यादि विशेषणें समजुतीप्रीत्यर्थ जोडितों. भूमितीचा व्यवहार सिद्ध करण्यासाठीं जी योजना आपल्यास करावी लागतें, तीच योजना वेदांतशास्त्रांतही करावी लागतें. ब्रह्माच्या स्वरूपाची समजूत व्यावहारिक तऱ्हेनें होऊन आपली मनोवृत्ति तिकडे वळावी, एतदर्थ मात्र ब्रह्मास सगुणस्वरूप देण्यांत येतें. हें सगुणस्वरूपवर्णन १२ ते १७ श्लोकमध्यें सर्वदृष्टींनीं आलें आहे. ह्याचा निदिध्यास भक्तिपूर्वक करून जर तत्त्वज्ञानार्थाचा निश्चय झाला व योगाभ्यासानें आत्मस्वरूप निश्चित झालें तर उपनिषदांच्या साहाय्यानें, श्री सद्गुरूच्या अनुग्रहानें व परमेश्वरच्या अनुकंपेनें आत्मस्वरूप व ब्रह्मस्वरूप एकच आहेत, असा ज्ञान-विज्ञानरूपी साक्षात्कार होऊन, ब्रह्मस्वरूपाशीं तादात्म्यच होईल यांत शंका नाहीं; हें आश्वासन या अध्यायाच्या १८ व्या श्लोकांत सर्व करुणाघन परमेश्वरांनीं दिलें आहे.

## ब्रह्म.

शुद्धाद्वैतवादी म्हणून श्रीमद्वल्लभाचार्यांनीं जो मायाविरहित, शुद्ध, अशा अद्वैतवादाचा पंथ निर्माण केला आहे, त्यास पोषक अशीं कांहीं विशेषणें वरील ब्रह्मवर्णनांत आढळतात. यावरून व कांहीं उपनिषद्वाक्यांवरून व उपनिषन्मंत्रांवरून त्यांनीं ब्रह्म हें विरुद्ध धर्मशील आहे असें सांगून मायावादाचा निरास करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्याचा सविस्तर विचार मी यथामति अन्यत्र करणार आहेंच. येथें इतकेंच सांगून ठेवावयाचें कीं, हें विरुद्धधर्मत्व केवळ आभासिक आहे. उदाहरणार्थ, आपण एकच विशेषण घेऊं. 'अचरं चरमेवच' (ब्रह्म हें अचर म्हणजे स्थिर आहे व चर म्हणजे हालचाल करणारें आहे, जिकडे तिकडे हिंडणारें आहे. ) आतां सर्व विश्व व्यापून, अंतर्बाह्य व्यापून असणारें जें तत्त्व आहे, तें वस्तुतः स्थिर, अचल, कूटस्थ असेंच असलें पाहिजे. पण तें चरही आहे असें म्हटलें आहे. तेव्हां ब्रह्माचें अचरत्व वास्तविक किंवा चरत्व खरें ? ब्रह्म सर्वव्यापी आहे, हें सर्वसंमत आहे. तेव्हां पारमार्थिक दृष्टीनें विचार केला असतां तें अचर आहे, असेंच ठरेल. त्याचें जें चरत्वसें दिसत आहे, तें आभासिक म्हणजे व्यवहारांत दिसणारी हालचाल आहे. आपल्याला व्यवहारांत सर्वव्यापी दृष्टि नाहीं, तेव्हां आपल्यास ब्रह्म हें चरच दिसणार ! पहा कीं, वर्षाकालांत विजेचा

वेळीं ढग आकाशांतून वाऱ्याच्या झोतानें इकडून तिकडे धांवत असतात हें आपण पाहतों. आतां रात्रीचा समय असला व तो शुक्ल पक्ष असला म्हणजे आकाशांतील चंद्र धांवत आहे, असें बालकांस व बालिश जनांस वाटते; ह्मणून चंद्र धांवतो, असें विधान करितां येईल काय ? तसेंच आपण आगगाडींत बसलों व तो अग्निरथ पूर्ण वेगांत आला ह्मणजे आंत बसलेल्या प्रेक्षकांस बाहेरचे वृक्ष, रस्ते, डोंगर, तारेचे खांब पळतांना दिसतात, म्हणून ते पळत आहेत, असें विधान वास्तविक होईल काय ? सारांश, हीं जशीं भ्रामक व भ्रमिष्टत्वाचीं विधानें होतील त्याचप्रमाणें ब्रह्म 'चर' आहे, हें विधान होईल. ब्रह्म स्थिर आहे, कारण तें सर्वव्यापी आहे. व्यवहारांत तें चरसें दिसतें, कारण, इंद्रियजन्य ज्ञानानें सिद्ध होणारा व म्हणून अपूर्ण ज्ञानाचा असणारा व्यवहार भ्रामक व भ्रमिष्ट स्थितींतील असतो. पुनः असें पहा कीं, आपली परिच्छिन्न बुद्धि ज्या ज्या विषयाचें ग्रहण करील त्यांच्या त्यांच्या अंतर्यामी ब्रह्मतत्त्व आहे, हें शास्त्रविचारानें त्या बुद्धीला समजलें म्हणजे पुण्यास असलेलें ब्रह्म आपल्या आधींच मुंबईस जाऊन स्थिर झालें, असें मुंबईस गेल्यावर त्या बुद्धीला दिसतें. एवंच तेंच ब्रह्म त्या बुद्धीला 'चर' प्रमाणें दिसतें व दिसेल. एवंच हा विरोधी दिसणारा विशेषणांचा व्यवहार केवळ सर्व प्रकारच्या लोकांच्या समजुतीस अनुकूल असण्यासाठीं केलेला आहे. एका प्रकारच्या विशेषणांत पारमार्थिक सत्य आहे व दुसऱ्यांत व्यावहारिक म्हणजे कालभंगुर सत्य आहे. हीं दोन्हीं सत्यें एककालीं खरीं असण्याचा संभवच नाहीं; एवंच एककालीं एकाच मुमुक्षूच्या दृष्टीनें दोन्ही सत्यें खरीं असण्याचा संभव नाहीं; शास्त्रांतही तीं खरीं नसावयाचीं. केवळ सर्वांस ब्रह्मपरिचय व्हावा म्हणून तीं 'अनुभवास अनुकूल' अशीं येथें दिलीं आहेत व उपनिषदांतही तशींच आढळतील. यावरून ब्रह्मांत वस्तुतः विरोध आहे अगर तेथें विरोधी धर्म आहेत, असें कोणासही ह्मणतां यावयाचें नाहीं. याप्रमाणेंच येथील सर्व विशेषणांचा विचार करावयाचा आहे, व तो जिज्ञासूंनीं करावा, येथें केवळ दिग्दर्शन मात्र केलें आहे.

८ याप्रमाणें दृश्य विश्व तें क्षेत्र, जीवब्रह्मैक्य स्थापन करणारें तें ज्ञान आणि वस्तुतः सदसद्विलक्षण परंतु व्यवहारिकतः सर्वव्यापी, सर्वभर, सर्वदृष्टि इत्यादि गुणविशिष्ट तें ज्ञेय असा भगवद्व्याख्यानाचा इत्यर्थ आहे. अथवा दिसतें तें सर्व क्षेत्र, दिसणाऱ्यास अंतर्बाह्य व्यापून त्याचें नियमन करणारें तें ज्ञेय ( म्हणजे व्यावहारिक सगुण, पण पारमार्थिक निर्गुण ब्रह्म ) आणि अद्वैतसाक्षात्कार तें ज्ञान असें सिद्ध करण्याचा भगवदाशय आहे; व श्रुति, युक्ति, अनुभव यांस हाच आशय सर्वशः व सर्वतः संमत आहे. सारांश अद्वैतसिद्धांताचा मूळ पाया जें जीवब्रह्मैक्य आणि विश्वेश्वरैक्यत्व त्याचें दृढीकरण तेराव्या अध्यायाच्या पहिल्या १८ श्लोकांमध्यें करून 'ज्ञान' हेंच जीवाचें व परमेश्वराचें पारमार्थिक स्वरूप आणि ज्ञान हेंच ज्ञेय, आणि ज्ञेय हेंच ज्ञान, एवंच सर्व ज्ञानस्वरूप आहे असें स्थापित केलें आहे. पारमार्थिक भाषेमध्यें बोलणें, चालणें, मानणें,

ह्या प्रकारच नाहीं; एक सत्तास्वरूपानें असण्याचा प्रकार असावयाचा. पण आपल्या व्यावहारिक पद्धतीनें बोलावयाचे अगोदर, 'संसार अनादि आहे, कार्य-कारण-परंपरा नित्य व अखंडित आहे' असें गृहीत धरून मग बोलण्यास प्रारंभ करावा लागतो. ह्या व्यवहारांत 'ज्ञान' 'ज्ञेय' आणि 'ज्ञाता' अशी त्रयी उत्पन्न झालेलीच असते. द्वैतमतानें 'ईश्वर' 'विश्व' आणि 'मनुष्य' अशी त्रयी असते. फलितार्थ एकच कीं **व्यवहारांत द्वैत निरंतरच आहे**; तथापि विश्वज्ञान, समाज-ज्ञान, लोककल्याण, नीति व धर्म इत्यादिकांचा उद्गम समाजामध्यें होऊं लागला म्हणजे हें द्वैतही मर्यादित होत जाऊन तें शेवटीं अद्वैत स्थितीस पोहोंचतें; पुनः; सर्व ज्ञानशास्त्रें व विधिशास्त्रें, तसेंच लोककल्याण, नीति, व धर्म अद्वैताच्या अभेद अशा वज्राच्या पाया-वर उभारलेले असतील तरच ते कालभंगुर अथवा स्थलभंगुर होणार नाहींत. पहा कीं, प्रत्येक लोककल्याणाचें निष्काम कृत्य, किंवा नीतियुक्त आचरण किंवा धार्मिक वर्तन या सर्वांच्या मुळाशीं स्वार्थत्याग, स्वसुखत्याग हे असून तो त्याग लोकांकरितां अथवा लोक-नियामक परमेश्वराप्रीत्यर्थ होत असावा. असें होत नसेल तर तें आचरण नव्हे, ती नीति नव्हे व तो धर्मही नव्हे. शिवाय, प्रत्येक त्यागाचें वेळीं आत्मिक उन्नति होत असते आणि ही आत्मिक उन्नति अथवा तिची पराकाष्ठा म्हणजे अद्वैतच होय. ज्ञानदृष्टीनें, कर्मदृष्टीनें, भोगदृष्टीनें, फलदृष्टीनें सर्वथा अभेदवृत्ति राहणें, आणि अभेदवृत्ति आहे असेंही भान नसणें याचें नांव अद्वैत होय. हेंच सर्व पदार्थमात्राच्या आरंभाशीं, पदार्थ अस्ति-त्वांत असतांना व शेंवटाशीं परमार्थिकतः असावयाचें आहे, हा विषय या अध्यायाच्या अठरा श्लोकांत आला आहे.

९ प्रकृति (Nature) पुरुष (Soul) आणि परमात्मा (God) ह्यांचें अना-दित्व, त्यांचे धर्म आणि परस्परसंबंध १९ ते २२ ह्या श्लोकावलींत सांगितलें आहेत. व २३ व्या श्लोकांत ह्यांच्या तात्त्विकज्ञानाची फलश्रुति सांगितली आहे. ह्या तिन्ही व्यावहारिकतः स्वयंभू पण पारमार्थिकतः एकच वस्तूंचें यथास्थित परिज्ञान करून घेणें स्वोद्धारासाठीं व जनोद्धारासाठीं अवश्य आहे.

असो; जोंपर्यंत इंद्रियद्वारा ज्ञान होत असतें तोंपर्यंत पुरुष आणि प्रकृति ही द्वयी कायम राहते, हें वर सांगितलें. सारांश व्यवहारकाळीं पुरुष आणि प्रकृति यांची जोडी अनादि असते. चेतना व चेतनेचें फल जें चैतन्य, हीं उभयतां पुरुषाधीन आहेत; बाकी सर्व रूपभेद आणि गुणभेद हे प्रकृतिजन्य म्हणजे प्रकृतीपासून उत्पन्न होऊन शेवटीं प्रकृतीमध्येंच लय पावणारे आहेत; म्हणून प्रकृतिदृष्टीनें कार्य, कारण आणि कर्तृत्व हीं सर्व प्रकृतिजन्यच आहेत. तसेंच 'प्रकृति आहे' आणि 'प्रकृतीचा स्वामी अथवा तिचा सेवक मी आहें' असें मानणारा अज्ञानी जीव हा या व्यवहारकाळांत सुखदुःख भोगणारा असतो. 'प्रकृतीचा संसर्ग झाला' असें भान उत्पन्न झालें कीं, सत्त्वरजादिक गुणांचें उपभोक्तृत्व पुरुषाला

प्राप्त होतें. एवंच उपभोगाला आणि अनेक योनींमध्यें जन्म प्राप्त होण्याला प्रकृतीची 'संगति' हें मुख्य व गौण कारण आहे. सारांश अज्ञानानें भोगप्राप्ति, जन्मसंतति आणि कर्मसंतति प्राप्त होतात. परंतु 'या आपल्या देहास व सर्व विश्वास अंतर्बाह्यतः व्यापणारा व प्रकृतिशून्य असणारा महेश्वर म्हणजे आत्माराम, परपुरुष, आहे व आपलें मूळचें, नित्याचें व शेवटचें स्वरूप तेंच आहे' अशी स्वश्रमानें, गुरुकृपेनें व ईशानुग्रहानें ज्ञानप्राप्ती झाली म्हणजे व सुखदुःख, शीतोष्णपरिचय, हे मुळस्वरूपास होत नसून निर्विकारी पुरुषाचा या प्रकृतिजन्य विकारांशीं कांहीं संबंध नाहीं, असा निश्चय होतो व तो पुरुष (तें देहविशिष्ट ज्ञानस्वरूप) हळूहळू शुद्ध, शुद्धतर आणि शुद्धतम होत जाऊन त्याला 'प्रकृतीपासून उत्पन्न होणारीं सुखदुःख, रागद्वेष, शीतोष्ण इत्यादि जोडपीं ह्यांचा संबंध प्रकृतिजन्य अज्ञान, बुद्धि, मन, इन्द्रियें, इत्यादिकांशी होतो, म्हणजे गुणांचा गुणांशीं संबंध होतो, माझा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं' असें ज्ञान उत्पन्न होतें आणि तो जीव मुक्त होतो. २३ व्या श्लोकांत सांगितलें आहे त्याचा हाच आशय आहे. व्यावहारिक पुरुषास 'हा मुक्त पुरुष' व्यवहार करितोसें दिसेल; परंतु प्रकृतिपुरुषांमधील तारतम्यज्ञान ज्यास झालें, आत्मानात्मविवेक होऊन ज्ञानस्वरूपी आत्मारामाची कांस ज्यानें घट्ट धरिली असा हा वरील जीवन्मुक्त पुरुष परमार्थतः मुक्तच असतो. सारांश, धार्मिक आचरणानें कर्मत्याग होऊन खरें वैराग्य प्राप्त झालें, शास्त्रदृष्टीनें प्रकृतिपुरुषांमधील तारतम्य समजलें, योगाभ्यासानें स्वस्वरूपाचा परिचय झाला, भक्तिदृष्टीनें हें स्वस्वरूप सर्वत्र दिसूं लागून ईश्वरसाक्षात्कार झाला, वेदांतश्रेष्ठ जो अद्वैतसिद्धांत त्याच्या श्रवणमनननिदिध्यासानें ज्याचा जीवब्रह्मभेद नष्ट झाला, अशा श्रेष्ठ पुरुषास ब्रह्मसाक्षात्कार होऊन तो मुक्त होतो. प्रारब्ध आहे तोंपर्यंत हा पुरुष देहधारण करील व देहयात्रेप्रीत्यर्थ कर्म करील; तथापि पारमार्थिकदृष्टीनें तो मुक्त झाला आहे. पुनः; व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें तरी त्याचें कर्म पवित्रच असतें. जीवन्मुक्ताचें कर्म प्रायशः भोगपोषक नसतें. शिवाय त्याचें अस्तित्वही लोकोपकारक असून त्याच्या वास्तव्यानें अनेक लोकांची आत्मिक उन्नति होत असते. 'भवोहि लोकाभ्युदयाय तादृशाम्' हें वाक्य जनकराजा, शंकराचार्य, समर्थ रामदास, श्रीतुकाराममहाराज इत्यादि जीवन्मुक्त महापुरुषांच्या चरित्रांचें प्राणभूत सारसर्वस्व होय. अर्थातच हें या महापुरुषांचें कर्म संसारपोषक न होतां संसारविमोचन करणारें असतें. असल्या पुरुषांचा व्यक्तिविषयक व भेदमूलक जन्ममरणी संसार जिवंत असतांनाच संपून जातो; ('मरणाच्या आधीं राहिलों मरूनी ॥') आणि अनादि, अनंत, एकरस असें ज्ञानपूर्ण अस्तित्व, सारांश मोक्ष, या पुरुषपुंगवांस प्राप्त होतो. असो; हें ज्ञान करून घेण्याचे निरनिराळेसे दिसणारे परंतु वस्तुतः एकमार्गानुगामी असणारे प्रचलित पंथांचा भगवान् उल्लेख करितात. (१) ध्यानयोग, (२) सांख्ययोग, (३) राजयोग, (४) कर्मयोग, आणि (५) अभेदभावयुक्तभक्तियोग असे हे निरनिराळे पंथ आहेत. गुरुमुखानें भक्तिपूर्वक श्रवण व उपदेशानुरूप व शास्त्रशुद्ध आचरण, चित्तैकाग्रता, आत्मा-

नात्मविवेक, ईश्वरभक्ति आणि समाधि ह्या 'मुक्तिनामक' देवालयाच्या श्रेष्ठ पायऱ्या आहेत. या मार्गानें दृढ निश्चय करून गेलें असतां संसारमोक्ष होतो.

१० प्रथम भावना, नंतर तिसऱ्या अध्यायांतील कर्मयोग, नंतर नवव्यांतील ज्ञानयोग, नंतर आठव्या अध्यायांतील व ध्यानयोग ह्यांत सर्वत्र उपासनेचें योग्य व एकनिष्ठ संमिश्रण असा हा मार्ग आहे. या मार्गांत क्षेत्र (Nature) व क्षेत्रज्ञ (Soul) यांचे जे गुणधर्म आहेत त्यांचें ज्ञान करून घेऊन त्यांच्या वशत्वापासून दूर रहावयाचें आहे आणि सर्व क्षेत्रें व क्षेत्रज्ञ यांत जें अविनाशी तत्त्व आहे त्याला आपलेसें करून घ्यावयाचें आहे. ब्रह्माच्या उपासनेनें भोगेच्छा अशक्त होते आणि आत्मोन्नति करण्याची इच्छा व सामर्थ्य उत्पन्न होतात. कर्मयोगानें **अंतःकरणांतील** वासना व अभिमान विगलित होतात. ज्ञानयोगानें विश्वांतील सत्सिद्धांत विदित होऊन अविनाशी **सिद्धांतांचें आकलन** होतें व शेवटीं **ध्यानयोगानें** विज्ञानसिद्धि होऊन आत्मस्वरूप संपादन होण्याची योग्यता येते आणि पुढें सर्वज्ञत्व सर्वशक्तित्व व सर्वानंदत्व यांचें अधिष्ठान जो परमेश्वर, त्यांत तादात्म्य होऊन पुढें ब्रह्मत्व प्राप्त होतें. असा हा क्रम आहे. यांतच जीवाचा उद्धार आहे, समाजाची उन्नति आहे, विद्येचा उत्कर्ष आहे, धर्म नीति इत्यादिकांचा परिपोष आहे आणि तत्त्वज्ञानाची प्रगति आहे. हीं केवळ विधानें नव्हे आहेत. हे अभंग सिद्धांत आहेत. एकच उदाहरण घेतो. आपल्यापेक्षां श्रेष्ठ असें कांहीं तत्त्व आहे असा श्रद्धापूर्वक निश्चय झाला व तें आपल्यास मिळवावयाचें आहे असा दृढ संकल्प आपण केला, ह्मणजे कर्माची, निष्कामकर्माची (हें कर्म विषयपोषक नसल्यामुळें कामक्रोध कमी होतात आणि ज्ञान वृद्धिंगत होतें) लालसा उत्पन्न होते व जीव एकनिष्ठेनें त्या तत्त्वाचें स्वरूप प्राप्त करून घेण्याचे श्रम करितो. येथें तें स्वरूप प्राप्त करून घ्यावयाचें आहे; नुसता दंभ माजवावयाचा नाहीं, किंवा आपल्या बुद्धीचें किंवा तर्कज्ञानाचें प्रदर्शन करावयाचें नाहीं. येथें स्वतःचा खरा ह्मणजे समाजाचा, राष्ट्राचा व विश्वाचा स्वार्थ करावयाचा आहे. मुक्ति साध्य करून घ्यावयाची आहे. अर्थातच निष्कामकर्म हेंच. या कर्मानें नीति स्वच्छ होते, कर्म वृद्धिंगत होतें, ज्ञान वाढतें, प्रेमपोष होऊन एकत्व सिद्ध होतें; सारांश, इष्ट गोष्टी सर्व सिद्ध होतात. असो; तेव्हां उपासना, कर्म, ज्ञान आणि ध्यान हेच उत्तरोत्तर श्रेष्ठमार्ग होत. ह्यांत अर्थातच असें अंतर्भूत होतें कीं, दृश्यविश्वाचें, क्षराक्षराचें ज्ञान अवश्य आहे.

ह्याच विषय दृढ करण्यासाठीं पुनः एकवार २५ श्लोकांत सांगतात कीं, जी जी दृश्यवस्तु आहे ती सर्व 'जीव आणि निसर्ग' यांच्या संयोगानें उत्पन्न झाली आहे. पहा कीं, नुसतें विश्व असून त्याला पाहणारा कोणी जीव नसता तर संसारच उत्पन्न झाला नसता. केवळ ईश्वर आणि सृष्टि हे दोनच पदार्थ असते. नुसता जीवच असून सृष्टि नसती तरीही संसार न होता. केवळ जीव आणि शिव हे दोन पदार्थ असते. पण

जीव म्हणजे जर 'जड अहंकार, बुद्धि, मन, इंद्रियें एतद्विशिष्ट जें ज्ञानमिश्रित अज्ञान' आहे तर सृष्टीच्या अभावीं जीव उत्पन्न होणेंच शक्य नाहीं. सृष्टीपासून, प्रकृतीपासूनच, बुद्धीत्यादि मानसिक विकार उत्पन्न होतात; जेव्हां जीवोत्पत्ति झाली तेव्हां सृष्टीची उत्पत्ति झालीच असली पाहिजे; हें उघड आहे. म्हणून सृष्टीमध्यें जी घडामोड चालली आहे ती पाहणारा कोणीं नाहीं, किंवा पाहणारा असून सृष्टि नाहीं' असा काल कल्पित करणें अशक्यच आहे. निदान सृष्टीचा नियामक जो परमेश्वर तो असलाच पाहिजे. एवंच पुरुष आणि प्रकृति किंवा ज्ञाता आणि ज्ञेय ह्या वस्तु व्यवहारभाषेनें अनादि आहेत असें ठरतें; आणि पदार्थमात्राचें अस्तित्व व त्या अस्तित्वाचें ज्ञान हीं क्षेत्रक्षेत्रज्ञांच्या संयोगानें मात्र होतात. सारांश क्षेत्रक्षेत्रज्ञांचा संयोग हें संसाराचें मूळ आहे; हा सिद्धांत होय.

## क्षराक्षरांचें ज्ञान व फलश्रुति.

यापुढें संसाराचा मोक्ष करणारे ज्ञानास अंतःकरणवृत्ति कशी लागते याचा विचार करितात. अध्यायाच्या शेवटपर्यंत हाच विषय आहे.

११ सर्व भूतमात्राचे ठायीं समत्वानें परमेश्वराचा वास आहे व जें जें विनाशी दृश्य आहे, त्याला सत्ता देणारें अविनाशी तत्त्व परमेश्वरच आहे, असें जो पाहतो, सारांश (१) सर्वत्र परमेश्वर ओतप्रोत भरला आहे (ही भक्तिमार्गाची पराकाष्ठा होय) आणि (२) तो विकारी पदार्थांत निर्विकारी, नाशवंतांमध्यें अविनाशी, असा आहे, (हें अद्वैत सिद्धांताचें मूल तत्त्व) असा ज्याचा विचारपूर्वक ज्ञाननिश्चय झाला तोच खरा विद्वान् आणि तोच आपल्या संसाराचा मोक्ष करितो, आपल्या जीवास शिवस्वरूप करितो आणि 'जन्मा आलियाचें सार्थक' करितो; (यच्चावत विकारवंत कर्मे प्रकृतीचे द्वारा होतें, शुद्धचैतन्यस्वरूपी आत्म्याचा कर्मांशीं कांहींएक संबंध नाहीं, आत्मा अकर्ता आहे, असें ज्याला ज्ञानपूर्वक समजलें, तो खरा ज्ञाता होय.) (४) या सृष्टीच्या 'घटनाविघटना' नामक सुव्यवस्थित अव्यवस्थेंत जी भेदरचना दृष्टीस पडते तिच्या मुळाशीं एकरसात्मक हें तत्त्व असून सृष्टिरचनेचें अस्तित्त्व या सत्तारूपी अव्यय द्रव्यावर अवलंबून आहे, आणि सत्तारूपी अव्ययब्रह्माच्या अधिष्ठानावर सर्व व्यावहारिक विस्तार, ही विविध सृष्टिरचना, होते असें ज्याला ज्ञानविज्ञानपूर्वक समजलें, तोच खरा विज्ञानी पुरुष होय. एवंच परमेश्वराचें सर्वव्यापित्व, अखंड अविनाशित्व, समत्व, एकरसत्व, अकर्तृत्व, सर्वसत्ताप्रदत्व आणि सर्वनियामकत्व, हें ब्रह्मस्वरूप अथवा स्वस्वरूपाचें लक्षण, स्वानुभवावरून ज्यांस समजतें, तेच खरे विद्वान् व ज्ञानी, तेच मोक्षनगरीचे रहिवासी, तेच संसाराचा स्फोट करणारे वैष्णववीर होत. तात्पर्य काय कीं, अशी एकतानता ज्यांस शास्त्रपूर्वक अनुभवानें आपली तो ह्या लोकींच ब्रह्मस्वरूप होतो. सर्व एकच आहे, असें ज्ञान होऊन ज्याचें

आचरणही अज्ञानशून्यत्वानें होऊं लागलें, त्याच्या आचरणावर शून्य पडून तो केवळ ब्रह्मस्वरूप होतो. असला पुरुष ज्ञानविज्ञानदृष्टीनें आत्मस्वरूप झाल्यामुळें त्यालाही आत्मस्वरूपाचें लक्षण तंतोतंत लागू पडतें. म्हणजे आत्मा हा अनादि आणि गुणशून्य असतो म्हणून तो जसा सर्वव्यापी आणि अव्यय असतो आणि शरीरांत वास्तव्य करूनही तो कर्मसंबंधानें निर्लेप असतो, त्याचप्रमाणें वरील जीवन्मुक्त पुरुषही कर्मशून्य आणि संगशून्य होतो. उघडच आहे कीं, सर्व विश्वभर पसरलेलें आकाश अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें त्याला जसा या विश्वांतील अनंत लेपकांचा लेप चढत नाहीं, तसेंच आकाशापेक्षांही अनंत पटीनें सूक्ष्म असणारा व सर्वत्र घनदाट पसरलेला आत्माही देहाच्या किंवा विश्वाच्या कर्मानें लिप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें भगवान् सहस्ररश्मि जसा ह्या अखिल सूर्यमंडळास प्रकाशित करितो, त्याचप्रमाणें हा तेजासही सतेज करणारा आत्मा हें यच्चावत विश्व सुप्रकाशित करितो. सारांश आकाशाप्रमाणें आत्मा हा सर्वव्यापी आहे आणि सूर्याप्रमाणं सर्वप्रकाशक आहे; तसाच तो जीवन्मुक्त पुरुष ज्ञानदृष्टीनें सर्वव्यापी आणि सर्व प्रकाशक होतो.

याप्रमाणें क्षेत्र हें जड, विकारी, एकदेशी व अंधकारपूर्ण आहे. आणि क्षेत्रज्ञ हा चैतन्यस्वरूपी, विकारशून्य, सर्वव्यापी, आणि सर्वप्रकाशक आहे, असें क्षेत्रक्षेत्रज्ञांमधील तारतम्य ज्यांस समजलें, आणि भूतें आणि त्यांची माता जी प्रकृति यांपासून निर्लेप कसें राहावें हें ज्यांस समजलें, सारांश उभयतांचें स्वरूप समजून परमपुरुषार्थ सिद्ध करण्याचीं साधनें ज्यांनीं हस्तगत करून घेतलीं, ते पुरुष जीवन्मुक्त होऊन मोक्षपदाला जातात हें सांगणें आतां अनवश्यकच होय.

१२ वरील विवेचनावरून तेरावा अध्याय अति महत्वाचा आहे आणि तेराव्या अध्यायांतच ज्ञानाची पराकाष्ठा जें अद्वैतज्ञान आणि कर्तव्याची पराकाष्ठा जें मोक्षसाधन या उभयतांचाही स्पष्टपणें ऊहापोह झाला आहे. गीताशास्त्राचें मुख्य तात्पर्य काय आहे, हें कोणास हव असेल तर त्यानें तेरावा अध्याय वाचावा. सर्वज्ञ व सर्वसाक्षी भगवंतांचा अभिप्राय काय होता व काय आहे, हे ज्यास निःशंकपणानें पाहून घेणें असेल त्यानें आचार्यकृत भाष्यासह हा सर्व अध्याय पुनःपुनः वाचावा आणि विशेषतः श्लोक २, श्लोक १२ ते १७, श्लोक २२ आणि २८ ते ३४ (पण त्यांतही ३१, ३२, ३३) हे श्लोक अवश्य वाचावेत. श्रुतीस अद्वैत इष्ट आहे. त्याचप्रमाणें भगवंतांसही तेंच इष्ट आहे. अद्वैतसिद्धांतानें मात्र येथील कठिण प्रश्नांचा, भ्रामक संशयमालिकेचा, उलगडा होऊन, परम सुखाची प्राप्ति होते. यास्तव वाचकांस व गीताभक्तांस पुनः एकदां सप्रेम विनंति करितों कीं, त्यांनीं ह्या अध्यायाचें पुनः पुनः पारायण करून यथामति अद्वैतसिद्धांत समजून घ्यावा, आणि अधिकारानुसार आचरण करण्यास लागावें. सत्कर्माचें फल केव्हांही नष्ट होत नाहीं व भगवद्भक्त कधींही बुडत नाहीं. या दोन गीतामहावाक्यां-

वर पूर्ण निष्ठा ठेऊन एकदृढतेनें जर मोक्षमार्गाचा अधिकारानुसार स्वीकार केला, तर ह्या किंवा अन्यजन्मीं सर्व अज्ञानाचा निरास होऊन मोक्षप्राप्ति होईल आणि यावज्जीव समाधान राहील. 'आम्हां सर्वांस त्या दयाघन परमेश्वरानें हा लाभ द्यावा.' अशी त्या अखिलविश्वचालकाची करुणा भाकून हें प्रकरण आटपितों.

---

## खंड १४ वा.

# चवदाव्या अध्यायाचा उपसंहार.

श्रीमद्भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायामध्यें क्षेत्रक्षेत्रज्ञाचा व त्यांनीं उत्पन्न केलेल्या संसाराचा, विस्तार करून अद्वैतसिद्धांताची स्थापना केली आणि अज्ञान आहे (अद्वैतज्ञानविज्ञान नाहीं) तोंपर्यंत व्यवहार अनादि, अनंत आहे, असें प्रमाणपूर्वक सांगितलें. आतां या अध्यायामध्यें प्राण्यांस संसारामध्यें ओढणारे जे प्रकृति–गुण आहेत, त्यांची उत्पत्ति, त्यांचें कार्य, त्यांचें धर्म इत्यादिकांचा विस्तार करून गुणातीतत्व प्राप्त झालें तरच अद्वैतज्ञान व अद्वैतविज्ञान होणें शक्य आहे; असें ठरवावयाचें आहे. त्याचप्रमाणें, गुणांचें स्वरूप समजून घेऊन त्या त्या गुणकृतबंधनापासून सुटावयाचें कसें, हेंही सांगावयाचें आहे. पुनः, क्षेत्र (जड) आणि क्षेत्रज्ञ (उपाधियुक्त आत्मा, जीव व परमेश्वर) हीं ब्रह्मस्वरूपावर विवर्त असून व्यवहारांत मात्र अनाद्यनंत आहेत हें व यांचा, प्रकृतिपुरुषांचा, संयोगवियोग व्हावयाचा तो शुद्धसात्विक व शुद्धचैतन्य परमेश्वराच्या इच्छेनुसार होत असतो, हेंही ठरवून निरीश्वरसांख्यमताचें निराकरण करावयाचें आहे.

२ पहिल्या दोन श्लोकांत गुणज्ञान व गुणातीतत्वज्ञान यांची स्तुति करून या ज्ञानानें मात्र कैवल्यमुक्ति मिळणें शक्य आहे, अर्थातच हें ज्ञान इतर सर्व ज्ञानांपेक्षां, इतर सर्व शास्त्रकलांपेक्षां, अतिश्रेष्ठ, अत्युत्तम आहे, असें सर्वज्ञ, सत्यसंकल्प व सर्वदयाघन परमेश्वरानें सांगितलें आहे.

प्रकृतीचे गुण म्हणजे प्रकृतीच्या प्रकट होण्याच्या पद्धति (Modes) होत. ह्या गुणांचें व्यवस्थित ज्ञान झालें व आपण गुणातीतत्व संपादिलें तर परमेश्वरी साधर्म्य प्राप्त होतें. उघडच आहे कीं, प्रकृतीच्या प्रकटनाचे मार्ग स्पष्ट होऊन ते गुणच कर्तृभोक्तृत्वशील आहेत, असें ज्ञान झालें म्हणजे गुणातीतत्व प्राप्त करून घेतां येतें, गुणातीत पुरुष या गुणांचा तो साक्षी होतो. हें साक्षित्व म्हणजे परब्रह्मत्व होय. अतएव गुणांचें ज्ञान अत्यंत महत्वाचें आहे.

वासनाक्षय झाल्यानंतर अद्वैतज्ञानाला दृढाभ्यासानें विज्ञानाचें स्वरूप येतें आणि मुक्ति मिळते. ह्या मुक्तस्थितीमधून पुनः जन्ममरणाची बाधा उत्पन्न होत नाहीं. श्रिवेदींनी याच्या अर्थाची फोड केली आहे, ती संस्मरणीय आहे. मुक्त पुरुषाला जन्ममरण येत नाहीं, याचा अर्थ जन्म मरणामध्यें होणारीं जीं क्षणिक सुखें व पर्वतप्राय दुःखें असतात त्यांचा गंधही मुक्त पुरुषास लागत नाहीं; ह्मणजे पारमार्थिक दृष्टीनें जो नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त झाला, जो विश्वंभर होऊन घनदाट पसरून राहिला, त्याला अर्थातच 'जाणें येणें' अथवा 'यातायात' राहतच नाही. परंतु व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें असतां जगदुद्धारार्थ जेव्हां जेव्हां परमेश्वर अवतार घेतो किंवा महात्म्यांस अवतार घेण्यास सांगतो, तेव्हां परमेश्वरास अथवा या महात्म्यास जन्मकालीन अथवा मरणकालीन दुःखांची मुळींच बाधा होत नाहीं. असो; गुणज्ञान व गुणातीत होण्याचें ज्ञान याप्रमाणें अति महत्वाचें आहे असें भगवान् ह्मणतात तें याही दृष्टीनें सर्वथा योग्यच आहे.

३ तिसऱ्या व चवथ्या श्लोकांत निरीश्वरसांख्यमताचें खंडन आहे. प्रकृति-पुरुषांचा संयोग जीवकर्मानुसार ईश्वरनियामकत्वानें व ईश्वरसाक्षित्वानें होतो, असें येथें सांगावयाचें आहे. प्रकृति म्हणजे जड आणि पुरुष म्हणजे चैतन्य या दोघांचा म्हणजे जडचैतन्यांचा संयोग, जडचैतन्यामध्यें जें जें संचितकर्म असेल त्या त्या कर्मानुसार होतो हें खरें; पण या संयोगाचें अस्तित्व किंवा नास्तित्व ईश्वराच्या नियमांनीं व ईश्वराच्या साक्षित्वानें बनून येतात. **कर्मानुसार फलोपभोग, देहप्राप्ति, इत्यादि होतात.** या सुबद्ध व व्यवस्थित ह्मणजे विचारमूलक पद्धतीवरून अप्रबुद्ध प्रकृतीला हें असलें सुखदुःखात्मक व व्यवस्थित विश्व निर्माण करितां यावयाचें नाहीं असें स्पष्ट होतें. एवंच 'प्रकृतीला कार्य उत्पन्न करण्याचें **स्वतंत्र सामर्थ्य आहे**' असें **कपिलसांख्य** म्हणतात तें असत्य आहे व 'कर्मानुसार जीवच प्रकृतीमध्यें प्रवेश करितो' हें **कर्मठलोक** प्रतिपादितात तेंही असत्य आहे. कारण कर्मफलांप्रमाणें उपभोग्य प्रकृति स्वजन्माच्या अगोदर तयार करून ठेवणें हें सामर्थ्य जीवास नाहीं, (म्हणजे जन्म घ्यावयाच्या पूर्वीच आपल्यास योग्य अशी शरीरप्रकृति निर्माण करण्याचें सामर्थ्य जीवास नाहीं किंवा कर्मासही नाहीं.) असें भगवंतांनीं सुचविलें. जडाचा अथवा चैतन्यशून्याचा चैतन्याशीं म्हणजे जडशून्याशीं स्वतःसिद्ध संयोग होणें शक्य नाहीं. कारण तीं स्वाभाविकतःच परस्पर—विरुद्ध आहेत. चैतन्यशून्याचा चैतन्याशीं व दुसऱ्याचा पहिल्याशीं संबंध जुळून येण्यास कांहीं अलौकिक कारण हवें आहे, आणि तें कारण परमेश्वर होय. एवंच परमेश्वराचें अस्तित्व कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आतां हा संयोगसंबंध कसा जुळून येतो हें ४ थ्या व ५ व्या श्लोकांत सांगितलें आहे. महद्ब्रह्म म्हणजे विराट बुद्धि असा अर्थ करून योजना अशी करावयाची: "परमेश्वर म्हणजे सगुण स्वरूप हें योग्यकाळीं 'मी पुष्कळ होईन अशी' इच्छा करितें. इच्छा

हा बुद्धीचा धर्म आहे. तेव्हां अव्यक्ताचें प्रकट स्वरूप जी बुद्धि तिला परमेश्वर प्रेरणा करितो व गर्भधारण होतें आणि सृष्टिव्यवहारास सुरुवात होतें.

पूर्व कल्पाचा प्रलय ( Dissolution ) झाला म्हणजे तत्कालीन भूतांच्या कारण-देहांत जे संस्कार उत्पन्न झालेले असतात, ते कांहीं कालपर्यंत अव्यक्तामध्यें लीन होतात, आणि प्रकट होण्याची संधि आली म्हणजे परमेश्वर हा इच्छेच्या द्वारानें या संस्कारास प्रकट स्वरूप देतो आणि पुनः सृष्टिव्यवहार सुरू होतो. आपण पाहतों कीं, सुरवंट हा कांहीं काल स्तब्ध राहतो आणि कालांतरानें त्या स्तब्धशरीरांतून पतंग निघून जातो. यावरून हें शिकावयाचें कीं, ह्या प्रलयकालीं सुद्धां अंतरंगीं अनेक प्रकारच्या शक्ति गुप्त रीतीनें कर्म करीत असतात. हें कर्म प्रकट होण्याची वेळ म्हणजे सृष्टीचा आरंभ होय. असो; तेव्हां पूर्वसंचयानुसार ठरलेल्या वेळीं श्रीपरमेश्वर इच्छेच्या द्वारानें सृष्टीचा आरंभ करितो. मग प्रथम पंचतन्मात्रा, आकाश इत्यादि अवस्थांतरानें सृष्टि उदयास येते. ह्या दृष्टीनें व्यवहारकालांत आविर्भावी व तिरोभावी सृष्टीला आदि नाहीं व अंत नाहीं हें स्पष्ट होतें. तसेंच परमेश्वर हा इच्छेचा प्रेरक असल्यामुळें बुद्धीच्या पलीकडचा, गुणातीत, आहे म्हणूनच प्रकृतीचा स्वामी व साक्षी आहे, हेंही निदर्शनास येतें.

व्यावहारिक भाषेंत जसा ईश्वर अनादि व अनंत आहे, तशीच प्रकृति अथवा जड-द्रव्य, काल, आकाश, कार्यकारणपरंपरा, हीं सर्व अनाद्यनंतच आहेत. काळाला अमक्या वेळीं आरंभ झाला असें म्हणतांच येत नाहीं, कारण काळाला आरंभ होण्यापूर्वीच्या 'काळास' काळ हीच संज्ञा दिली पाहिजे. काळ अनंत आहे म्हणजे 'काळ' संपतो, असें म्हणतांच येत नाहीं. त्याचप्रमाणें कार्यकारणपरंपरेची सांखळी अनादि व अनंत आहे. 'अमक्याचें कारण अमुक,' अशी कारणपरंपरा आणि 'अमक्याचें कार्य अमुक' ही कार्यपरंपरा व्यवहारांत संपावयाची नाहीं. अशाच प्रकारच्या विचारपद्धतीनें हें आपल्या सभोंवार दिसणारें विश्व, त्यांतील जडद्रव्यें, त्यांतील सामर्थ्यें, हीं सर्व अनाद्यनंतच आहेत. म्हणजे जडद्रव्य, काल इत्यादि सर्व व्यवहारदृष्टीनें, व्यावहारिकशास्त्रदृष्टीनें, मनुष्यकृत सिद्धांतदृष्टीनें, बुद्धीस व तर्कास गोचर असणाऱ्या ज्ञानानें, हीं सर्व तत्त्वें अनाद्यनंत आहेत, असेंच ठरतें. प्रकृति नित्य चंचल आहे हें खरें, पण या चंचलतेचें अधिष्ठान जी व्यक्त किंवा अव्यक्त प्रकृति ती नित्य आहे, असेंच मानवबुद्धीला अथवा कोणत्याही बुद्धीला वाटलें पाहिजे. घर पडलें, झाड वठलें, प्राणी मेला म्हणजे ज्या स्वरूपानें वरील पदार्थ दिसत होते, तें नाहींसें झालें, तरी ज्या घटक द्रव्यांनीं घर, झाड व मनुष्य यांची, सारांश सर्व भूतांची, घटना झाली, तीं घटक द्रव्यें अगर तें घटक द्रव्य कधींही नष्ट होणें शक्य नाहीं; निदान 'नष्ट होतात' अशी कल्पना करणें शक्य नाहीं. उघडच आहे कीं, व्यवहारांत ज्याची सत्ता, ज्याचें अस्तित्व स्पष्ट दिसत आहे, त्या पदार्थाला, पदार्थघटकाला, नष्टत्व येतें असें म्हणणें अशक्यच

होय. 'आहे' याचें कधीं 'नाहीं होणें' किंवा 'नाहींसें होतें' अशी कल्पना करणें अशक्य आहे. 'नाभावो विद्यते सतः' हें परमार्थिक दृष्टीनें सत्य आहे, तसेंच व्यावहारिक दृष्टीनेंही सत्य आहे. सारांश प्रकृति किंवा मूळप्रकृति ही व्यवहारदशेंत अनाद्यनंत आहे; तसेंच या प्रकृतीच्या संसर्गानें सुखी किंवा दुःखी होणारा जीवही अनाद्यनंतच असला पाहिजे. हल्लींच्या परिस्थितींत जे जीव किंवा ज्या जीवकोटी आहेत, तसल्या जीवकोटी निराळ्या परिस्थितींत नसतील, पण तेथें अगदीं कोणत्याही प्रकारची जीवदशा नाहीं किंवा नव्हती असें ह्मणणें अशक्य होय. याप्रमाणें प्रकृति-पुरुषांची सांख्यप्रणीत जोडी अनाद्यनंत आहे व येथपर्यंत सांख्यसिद्धांत बरोबर आहे. तसेंच या जोडीला नियमित करणारा, या जोडीवर सत्ता चालविणारा आणि 'अंतिम कल्याण' असा हेतु धारण करून या दोहोंची व्यवस्था लावणारा, उभयतांहून श्रेष्ठ, असा कोणी तरी असलाच पाहिजे. हा जो सर्वस्वामी, सर्वनियंता, सर्वज्ञानी व सर्वकल्याणकर्ता आहे, तोच ईश्वर, परमेश्वर, होय. यजमान नाहीं, असें घर सांपडावयाचें नाहीं; शिक्षक नाहीं, असा शिष्यवर्ग नाहीं; नायक नाहीं अशी सेना असावयाची नाहीं; नियंता नाहीं, असा समाज सांपडणें नाहीं. त्याचप्रमाणें 'ईश्वर नाहीं' असें विश्वही सांपडणार नाहीं. यजमानाच्या अभावीं घरास 'गृहसंज्ञा' मिळत नाहीं, त्याचप्रमाणें ईश्वराच्या अभावीं विश्वाचें विश्वत्व जाईल म्हणजे त्याचें व्यवस्थितत्व नष्ट होईल. सारांश ईश्वर अनाद्यनंत आहे, हें द्वैतवाद्यांचें किंवा सगुण ईश्वरवाद्यांचें म्हणणेंही यथार्थच आहे. व्यावहारिक दृष्टीनें, व्यवहारसिद्ध तात्त्विक दृष्टीनें, सांख्यांशीं किंवा सगुणवाद्यांशीं अद्वैताचा विरोध येत नाहीं. पण पारमार्थिक दृष्टीनें, ब्रह्मदृष्टीनें, अद्वैतदृष्टीनें व अद्वैत-साक्षात्काराच्या वेळीं व नंतर, ही 'माया आहे, प्रकृति पुरुषाची जोडी आहे, परमेश्वर आहे, सुखदुःख आहे,' असें कोणी प्रतिपादन करूं लागेल तर मात्र तें प्रतिपादन अयथार्थ आहे, अज्ञानजन्य आहे, असे म्हणावें लागेल. भूमितींतील 'समांतर रेषा' व्यावहारिक आकाशांत परस्परास मिळत नाहींत हें खरें; पण पारमार्थिक अनंत आकाशांत त्या मिळतात, हे सत्य जसें गणितशास्त्रज्ञांस माहीत आहे, त्याचप्रमाणें व्यावहारिक दशेंत अनाद्यनंत दिसणारा व असणारा ईश्वर, तसेंच व्यवहारांत लडबडणारी आद्यन्तशून्य माया, काल, इत्यादि सर्व विश्वघटकपदार्थ पारमार्थिकस्थितींत ब्रह्म होऊन जातात, हें अद्वैत सिद्धांताचें मुख्य तत्त्व गुणातीत होऊन ब्रह्मसाक्षात्कार झालेल्यासच समजतें, इतकेंच नव्हे तर श्रवणमननादिकांनीं अद्वैत शास्त्र उत्तम समजून घेतलें आहे, अशा सात्त्विक पंडितांसही समजतें. असो; तेव्हां तात्पर्य हें आहे कीं, सृष्टीचा उद्गम भगवान् सांगत आहेत ह्मणून सृष्टीच्या घटकद्रव्याच्या अस्तित्वाबरोबर परमेश्वराचें अस्तित्व गृहीत घ्यावें लागतें; व्यवहारांत मात्र परमेश्वराचें अस्तित्व गृहीत करावें लागतें; हें तत्त्व सांगणें त्यांस अवश्य वाटलें म्हणून त्यांनी तें सांगितलें आहे.

४ परमेश्वरी अंशानें जीवाची घटना होते हा विषय पुढील अध्यायांत सांगावयाचा आहे; पण या अध्यायांत 'हा विषय सिद्ध झाला आहे' अशी कल्पना करून जीवाला, देहामध्यें

वास्तव्य करणाऱ्या परमेश्वरी अंशाला, अर्थातच स्वभावतः सुखदुःखातीत असणाऱ्या आत्मारामाला, प्रकृतीचे गुण बद्धक होतातसे दिसते. त्याचें स्पष्टीकरण करितात.

## प्रकृति म्हणजे काय?

मागें तेराव्या अध्यायांत क्षेत्र अथवा 'बाह्य–ज्ञान–विषय' ह्या दृष्टीनें प्रकृतीचें परीक्षण झालें. प्रस्तुत प्रसंगीं प्रकृतीचीं घटकद्रव्यें घेऊन तद्वारा तिचें स्वरूपवर्णन करावयाचें आहे. परमेश्वर म्हणजे स्वस्वरूपाचें ज्ञान असणारा विश्वनियंता, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान विश्वाधिपति आहे असें आतांच सांगितलें. परमेश्वराच्या अत्यंत उलट, परंतु परमेश्वराच्या ताब्यांत असणारें जें शुद्ध अज्ञान त्याचें नांव प्रकृति होय. प्रकृति ही जड, अचेतन असून सृष्टीचें अधिष्ठान आहे. ज्ञानाचें, चैतन्याचें, अधिष्ठान परमेश्वर आणि अज्ञानाचें, जडत्वाचें अधिष्ठान प्रकृति आहे. ख्रिस्ती व महमदानुयायी लोकांनीं 'सेटन' (सैतान) नामक दुष्ट व तमोगुणी असुराचें अस्तित्व कल्पिलें आहे, तीच ही प्रकृति होय. पारशी लोकांचें तमोगुणात्मक '**अहिर्मन**' नामक तत्त्व तेंच हिंदुधर्मांतर्गत प्रकृतितत्त्व होय. शुद्धचैतन्य मात्र मुक्त आहे. बाकी यच्चावत् प्राणिमात्र व अचेतन वस्तु प्रकृतितत्त्वानें बद्ध आहेत. व्यवहार उत्पन्न होऊन परमेश्वराचें अस्तित्व स्थापित करितांनाच प्रकृतीचें व अज्ञानाचें अस्तित्व कबूल करावें लागतें. असो; तेव्हां अज्ञानाचें वास्तव्य अथवा अज्ञान हेंच प्रकृतितत्त्व आहे. क्षेत्र शब्दाचें लक्षण बांधतांना, आपल्यास दिसणारे, म्हणजे इंद्रियांस व बुद्धीस गोचर होणारे सर्व परिच्छिन्न पदार्थ, इन्द्रियें, मन, बुद्धि, अहंकार इत्यादि सर्वांचा अंतर्भाव क्षेत्रामध्यें म्हणजे प्रकृतीमध्यें होतो, असें तेराव्या अध्यायांत सांगितलें. आतां

## या प्रकृतीचीं घटक द्रव्यें कोणतीं आहेत?

तें पाहूं: कापिल सांख्यांनीं प्रथमतः हीं घटक द्रव्यें शोधून काढिलीं; अथवा जडद्रव्य जीवाला कोणत्या प्रकारांनीं बद्ध करतें हें सांख्यांनीं ठरविलें. ह्यांचेंच अनुकरण पुढील शास्त्रकारांनीं केलें आहे. शास्त्रकारांनीं हीं द्रव्यें अथवा गुण, तीन आहेत असें मानिलें आहे. सत्व, रज आणि तम हे ते तीन घटकावयव अथवा शास्त्रोक्त 'गुण' होते. सत्व, रज आणि तम हीं द्रव्यें मिळून अथवा हे तीन गुण मिळून प्रकृति जीवाला–दिसूं लागते. शुद्ध प्रकृतीचें स्वरूप प्राप्त होण्याला या तीन गुणांची समसमान अवस्था हवी; म्हणजे सत्व, रज, आणि तम यांचा सारखेपणा असला म्हणजे प्रकृतीला मूळ अवस्था प्राप्त होते; आणि हा सारखेपणा बिघडला, समता जाऊन विषमता प्राप्त झाली म्हणजे सृष्टिरचनेस अथवा उत्क्रांतीस सुरवात होते. सत्त्व म्हणजे ज्ञान आणि सुख; रज म्हणजे कर्म आणि दुःख व तम ह्मणजे ज्ञान आणि आळस; या सर्वांची ह्मणजे (ज्ञान+सुख+कर्म+दुःख+अज्ञान+आळस+सुखाभाव+ज्ञानाभाव+कर्माभाव= ) यांची बेरीज केली असतां 'ज्ञान+अज्ञान=०;' 'सुख+दुःख=०;' 'कर्म+आळस=०;' अशी स्थिति

झाली अथवा गुणांची समानावस्था झाली म्हणजे प्रकृतीचें मूळस्वरूप सिद्ध झालें! हें प्रकृतीचें मूळस्वरूप दृष्टीला शून्याकृति दिसतें म्हणून ती प्रकृति शून्यावस्थेंत, अव्यक्तावस्थेंत, आहे असें आपण म्हणतों. आतां कोणासही हें सहज समजणार आहे कीं, ही अवस्था म्हणजे शून्यस्वरूप आहे. स्वस्वरूपाचे ज्ञानाचा येथें पूर्ण अभाव आहे म्हणून ही ब्रह्मावस्था नव्हे. या शून्यावस्थेवर ईश्वरी ज्ञानाचा आघात हळूहळूं होऊं लागतो तेव्हां सृष्टिरूपी व्यक्तस्वरूप प्रकट होण्यास सुरुवात होते. "ईश्वरानें 'कांहीं नाहीं' यापासून अथवा 'शून्यापासून' सृष्टि उत्पन्न केली" असे खिस्ती, यहुदी, मुसलमानी धर्म म्हणतात, त्याचें तात्पर्य हेंच कीं, गुणशून्य असणाऱ्या जड द्रव्यावर परमेश्वराची अथवा ज्ञानकंदाची सत्ता सुरू होते, तेव्हां सृष्टिरचनेस-अथवा अधिक शुद्धोक्ति म्हणजे उत्क्रांतीस (Evolution)-सुरुवात होते. असो; मूळप्रकृति गुणशून्य असते म्हणून ती अव्यक्त अथवा ज्ञानागोचर असते. येथें पूर्वकर्मसंचयानुसार परमेश्वरी सत्तेनें वैषम्य सुरूं झालें म्हणजे प्रकृतीला व्यक्तत्व येऊं लागून उत्क्रांतीचीं तत्त्वें सिद्ध होतात. परमेश्वरी सत्ता सर्वव्यापी खरी, पण तिचा अंमल क्रमशः व कणशः वृद्धिंगत होत जातो व सृष्टीला उत्तरोत्तर व्यवस्थित अथवा संघटित स्वरूप येऊं लागतें. सूर्य हा प्रकाशक खरा, पण जसा तो प्रथमतः पर्वतशिखरांस प्रकाशित करून नंतर हळूहळूं सर्वांवर प्रकाश पाडितो, त्याचप्रमाणें परमेश्वर हा ज्ञानकंद व सुखनिधान खरा, पण तो सृष्टीमध्यें ज्ञानसुखाचा पर्जन्य क्रमशः व कणशः पाडित जातो. येणेंप्रमाणें गुणदृष्टीनें पाहिलें असतां जीव-सृष्टीच्या व्यवहारांत सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण दृग्गोचर होतात; अथवा सृष्टींतील सर्व परिच्छिन्न पदार्थ हे चैतन्यात्मक जीवाला सत्त्व, रज आणि तम यांचे द्वारें प्रकट होतात. प्रकृतिपुरुषाची जोडी म्हणजे ज्ञान व अज्ञानाचा संयोग होय. हा संयोग, विरुद्ध घटकावयवांचा हा संयोग, कसा झाला हें महातत्त्ववेत्ता डेक्का यास उलगडून सांगतां येईना. प्रत्येक क्षणीं परमेश्वर हा योग घडवून आणवितो असें त्याचे अनुयायी म्हणत! अद्वैतब्रह्मानें मात्र याचा उलगडा होतो. ब्रह्म हें व्यवहारदशेंत 'जीव, परमेश्वर व प्रकृति' यांचा अंतर्भाव करून त्यांचें नियमन करणारें आहे म्हणून हा संयोग होतो. असो; आतां देहामध्यें बिऱ्हाड करून राहणारा जीव हा परमेश्वरी अंश आहे, आणि त्याचा देह हा प्रकृतीचा अंश आहे म्हणून प्रकृतिपुरुषाची जोडी सजीव देहामध्यें व्यक्त दिसत आहे. ह्यांत चैतन्याचा अंश आहे तो पारमेश्वरी आहे व त्या अंशाच्याच सत्तेनें व साहाय्यानें प्रकृतिजन्य अज्ञानाचा हळूहळू निरास करावयाचा आहे. हा निरास कसा करावयाचा हा ह्या अध्यायाचा मूळ व मुख्य विषय आहे.

### सत्त्वादिक गुणांचें स्वरूप इत्यादि.

५ या तीन गुणांत सत्त्व गुण हा ज्ञानपोषक व सुखसंवर्धक आहे. जीवास सुखासक्त करणारा हाच गुण आहे. रजोगुण आणि तमोगुण यांस क्षीण करितां आलें

ह्मणजे सत्त्वगुणाचा प्रादुर्भाव होतो. आपल्या देहाचीं सर्व इंन्द्रियें प्रसन्न असलीं आणि त्यांस लीलेनें ज्ञानग्रहण करितां येऊं लागलें ह्मणजे सत्त्वगुणाचा अतिशय झाला आहे असें समजावें. ह्या स्थितींत (ह्मणजे इन्द्रियें शांत व ज्ञानोन्मुख असतांना) देहत्याग झाला तर पुढें उत्तम कुलामध्यें जन्म प्राप्त होतो. ह्या सत्वगुणाला प्रज्वलित करणारें अन्न ह्मणजे सत्कर्म होय. सत्कर्म ह्मणजे शास्त्रविहित निष्काम व निरहंकार कर्म होय, असें मागें अनेक प्रसंगीं सांगितलेंच आहे. सत्वानें ज्ञानप्राप्ति व श्रेष्ठलोकप्राप्ति होते. याच सत्वाचा अतिरेक झाला म्हणजे विषयज्ञान व विषयसुख यांविषयीं वैराग्य प्राप्त होऊन आत्मज्ञानाची गुप्त असलेली जिज्ञासा प्रकट होते आणि अभ्याससातत्यानें आणि गुरूचा व ईश्वराचा अनुग्रह होऊन अद्वैताचें ज्ञान होतें आणि पुढील अभ्यासानें प्रकृतिपराभव सर्वथा करितां येऊन शेवटीं आत्मसाक्षात्कार होतो. यावरून हें निष्पन्न झालें कीं, विषयज्ञान पूर्ण झाल्यावर विषयवैराग्य होतें; सारांश विषयाचें ज्ञान, अध्यात्मज्ञान आणि आत्मविज्ञान ह्या ज्ञानाच्या श्रेष्ठ, श्रेष्ठतर पायऱ्या आहेत आणि या मार्गानें गेलें तरच रजतमांची पराभव करितां येऊन शेवटीं विषयज्ञानांत व विषयज्ञानसुखांत गुंग करणाऱ्या सत्त्वगुणासही अर्धचंद्र देतां येतो. हें सत्त्वगुणाचें वर्णन झालें. निष्कामत्वानें प्रकृतिशास्त्रांचें (बीजगणित, भूमिति, भूगर्भ, खगोल, जीवन, मानस, सामाजिक, ईश्वरी, इत्यादि अनेक शास्त्रांचें) अध्ययन करून त्या ज्ञानामध्येंच आनंद मानणारे ते सात्विक लोक होत. या लोकांमध्यें प्रकृतिविषयकच कां होईना पण ज्ञानाची व ज्ञानसुखाची अभिरुचि उत्पन्न झालेली असते. ह्या रूचीचें पर्यवसान पुष्कळ अंशांनीं अध्यात्मज्ञानांत किंवा अध्यात्मसुखाच्या लालसेमध्यें होतें. ज्ञानसुख हें शुद्धसुख आहे आणि अध्यात्मसुख अथवा आत्मसुख प्राप्त करून घेण्याची ही पहिली भूमिका आहे. असो; या सात्विक सुखाचा परिपोष व्यक्तीमध्यें व समाजामध्यें होईल, तेव्हां व्यक्तीस व व्यक्तिघटिक समाजास शुद्ध असें सुख मिळूं लागेल. सात्विक गुण हा प्रकृतीचा श्रेष्ठ चिरंजीव आहे हें सांगावयास नकोच.

रजोगुण हा प्रकृतीचा दुसरा मुलगा आहे अथवा दुय्यमप्रतीचा अवतार आहे. हा लोभापासून उत्पन्न होतो. हा गुण उत्पन्न झाला म्हणजे हा जीवाला कर्म करण्यास लावितो. आशा ही याची जननी आहे. सत्त्व आणि तम यांचा पगडा कमी झाला म्हणजे हा प्रबल होतो; सुखाच्या आशेनें कर्म होतें पण तें दुःखमूलक, दुःखजीवी आणि दुःखफलात्मक असतें. लोभ, कर्मोत्साह, कर्मप्रवृत्ति, शांतिशून्यत्व आणि आशा हीं चिन्हें दिसूं लागलीं म्हणजे रजोगुण प्रबल झाला असें समजावें. अशा स्थितींत देहावसान झालें तर पुनः कर्मासक्त लोकांमध्यें जन्म प्राप्त होतो. विषयभोगार्थ मात्र उत्पन्न झालेल्या कर्माचा परिणाम दुःख हा आहे. कर्मप्रवर्तक रजोगुण जोरावर असला म्हणजे लोभ उत्पन्न होतो. म्हणजे लोभापासून रजोगुण उत्पन्न होतो व रजोगुणापासून लोभ अस्ति-

त्यांत येतो. लोभ म्हणजे रजोगुण होय. हे उभयतां परस्परावलंबी आहेत. जीव हा स्वतः परमात्म्याचा म्हणजे आनंदी स्वरूपाचा व ज्ञानी स्वरूपाचा अंश असतो म्हणून त्याला ज्ञान व सुख हवीं असतात; पण पूर्वकर्मानुसार अज्ञानाचा भागही त्याच्या वांट्यास आला असतो म्हणून ज्ञानविषय व सुखविषय **बाहेर** आहेत असा त्यास भास होतो आणि **विषयोपभोगच सुखसर्वस्व आहे,** असेंही त्याला वाटतें. असें वाटणें व सुखासाठीं कर्म करणें हा रजोगुण होय. लोभ येथेंच जन्मतो. असो; याप्रमाणें रजोगुण हा लोभपिता व लोभपुत्र आहे. लोभी किंवा कर्मलोलुप लोक मध्य लोकांत 'मृत्यु लोकांत' वास्तव्य करितात. हें रजोगुणाचें वर्णन आहे. येथील कर्म सकाम अथवा सहेतुक असतें. अमुक एक विषयोपभोग आपल्यास मिळावा म्हणून हें कर्म होत असतें. ह्या सहेतुक कर्माचा उदय लोभापासून होतो व त्याचें फलही लोभात्मक होतें, शरीरयात्रा सुरक्षित चालेल इतकें कर्म करणें प्रत्येकास अवश्य आहे. पण ज्ञान झालें नसलें म्हणजे शरीरयात्रेची मर्यादा अनावर होऊन मनुष्य रात्रंदिवस सहेतुक कर्म करित राहतो व कर्मदास होऊन बसतो. वास्तविकच पाहिलें तर लोभ हा मनोविकार दुष्ट नाहीं; पण अज्ञानाच्या संगतीनें ह्या लोभासही दुष्टत्व येऊन 'लोभमूलानि पापानि' असें पापपितृत्व यास मिळतें. आपल्या स्वतःच्या शरीराचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य. आपल्यास असावें, व त्याप्रमाणें आपण कर्म करावें, ही प्रवृत्ति कांहीं वाईट नव्हे; उलट ही लालसा व्यवस्थित ठेविली तर सत्वगुणपोषक होते. पुनः, अज्ञानावस्थेमधून काढून सचेतन प्राण्याचा व शेवटीं मनुष्याचा जन्म देण्यास हा लोभ, हा रजोगुणच, कारण आहे. सारांश रजोगुणाला सत्वगुणाचें साहाय्य मिळालें म्हणजे आत्मोन्नतीचें बरेंच कार्य होतें. तसेंच सत्वगुण या रजोगुणाचा सहकारी असेल तर आपल्या संकुचित देहाचें संरक्षण करून शिलक राहिलेलें कर्मसामर्थ्य प्रथम प्रथम आपली कीर्ति वाढविण्यामध्यें खर्च होतें आणि कीर्तीच्या लोभानें लोकांवर उपकार करणारीं कृत्येंही आपल्या हातून होतात. सत्वगुणाचा अधिकच प्रभाव झाला तर स्वर्गलोकीं सुख मिळेल या आशेनें सत्कर्में होतात आणि या पुढेंही सत्वगुण जोरांतच राहिला तर निष्काम कर्माला सुरवात होऊन चित्तशुद्धि होते, वैराग्य येतें आणि संकुचित स्वार्थावर सर्वथा शून्य पडतें. एवंच सत्वगुणाच्या आश्रयानें हा गुण राहतो तेव्हां तो व्यक्तीची व समजाची उन्नति करितो. पण जर याचा तमोगुणाशीं स्नेह झाला, तर मात्र तो व्यक्तीची व समाजाची हानि करितो. समाज नीचतर होत आहे, त्यांतील बहुतेक व्यक्ति उपभोगपरायण आहेत व उपभोगाप्रीत्यर्थ कलहातुर आहेत, अशी स्थिति असेल तेथें तमोमिश्रित रजोगुणाचें प्राबल्य आहे, असें समजावें. हिरण्याक्ष, हिरण्यकश्यपु; रावण, कुंभकर्ण, शिशुपाल, वक्रदंत, इत्यादि व्यक्ति ज्या समाजांत प्राबल्यानें मिरवत असतात, तो समाज तमोमिश्रित रजोगुणामें बद्ध झाला आहे, असें समजावें. तमोमिश्रित रजोगुणाच्या कारखान्यांत तयार झालेल्या दोऱ्या तोडणें फार कठिण आहे. सत्त्व गुणाच्या दोऱ्या सैल व भंगुर असतात; सात्विक रजोगुणाच्या दोऱ्या घट्ट परंतु कष्टभंगुर असतात; पण तामसी रजोगुण तोडणें भारी कठिण होतें.

तेव्हां सांगावयाचें तात्पर्य हें कीं, कर्माचा आरंभ लोभानें होतो, तरी केवळ उपभोगात्मक लोभ सोडून देऊन सत्कर्मानेंच आत्मशुद्धि होईल अशा मनोवृत्तीनें मात्र कर्माशीं सक्त असावें. ही आसक्ति पुढें ज्ञानानें निघून जाते व आपली यातायात संपते.

आतां, राहतां पैकीं तमोगुणाची मीमांसा राहिली, ती करून पुढील मार्गक्रमणास आरंभ करूं. तमोगुण हाही सात्त्विक व राजस गुणांप्रमाणें प्रकृतिजन्य आहे. अर्थातच प्रकृतीचें हें शेवटचें लेंकरूं आहे व म्हणून तिचें तें आवडतें बालक आहे! ह्याची उत्पत्ति अज्ञानापासून आहे. हा सर्व जीवास मोह घालणारा आहे. 'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ॥' प्रमाद, आलस्य आणि निद्रा या सर्वगामी अस्त्रांच्या योगानें हा सर्व जीवांस बद्ध करण्याचा प्रयत्न करितो व बहुतेक ठिकाणीं याला जय मिळतो. हा ज्ञानाचें आवरण, आच्छादन, करणारा व त्याचप्रमाणें फसविणारा असल्यामुळें हा विद्यमान असतां जीव प्रमत्त होतात आणि करूं नये ते करितात. सत्त्व आणि रज यांचा जेरि कमी झाला म्हणजे हा प्रबल होतो. ह्याचें आगमन प्रसिद्ध करणारीं अनेक निशाणें आहेत. ( १ ) सर्व इंद्रियें मंदतेज झालीं, ( २ ) कर्मेंद्रियें स्तब्ध अथवा गारठल्यासारखीं झालीं ( ३ ) उन्मत्तवत् आचरण होऊं लागलें आणि बुद्धीला मोह पडला म्हणजे तमोमहाराजांची स्वारी आली आहे असें समजावें. ह्या स्वारीच्या अमलांत मृत्यु आला तर मूढयोनीमध्यें जन्म प्राप्त होतो. ह्या गुणाचें जन्मस्थान अज्ञान आणि पर्यवसान ही अज्ञान आहे इतकेंच नव्हें, तर प्रमाद आणि मोह हेही तमोगुणाचें सहचारी आहेत. अर्थातच तमोगुणी जीवास अधम योनी प्राप्त होते. हें तमोगुणाचें वर्णन आहे. येथें अज्ञान, आळस, अकार्यकरण आणि मिथ्याज्ञान असतें. अज्ञान व आळस ही परकाष्ठेची तमोवस्था आहे. जड किंवा अचेतन स्थिति म्हणजेच ही अवस्था होय. या अवस्थेमध्यें म्हणजे पूर्ण अज्ञानस्थितींत परमावधीचें नीचत्व असलें पाहिजे. या अवस्थेंत चैतन्यशक्तीचा प्रायः पूर्णलोप झालेला असतो. म्हणजे चैतन्याचा फारच थोडा अंश येथें असतो. ज्ञान हें जर सुखपोषक आहे तर येथील अज्ञान पराकाष्ठेचें दुःखमूलक असलें पाहिजे. जीव प्रकट झाल्यानंतर ही तमोगुणाची पूर्णावस्था फारच थोडया प्राण्यास अनुभवावी लागते. मूर्च्छा येणें, झोंप लागणें, धुल्याच्या अवस्थेंत स्तब्ध राहणें, हीं या स्थितींचीं निदर्शकें आहेत. असो; या पराकाष्ठेच्या अज्ञानांतून पुढें जाण्याची जी प्रवृत्ति होते ती अंतर्यामीं जें चैतन्य गुप्त असतें, तें प्रकट होऊं लागलें म्हणजे होते. प्रथमतः या चैतन्याची प्रवृत्ति भ्रमित आणि मूढत्वाची असते; म्हणजे येथें चैतन्य प्रादुर्भूत होतें तें रजोगुणाच्या रूपानें होतें, व प्रथमतः तें पुष्कळशा चुक्या करितें. तथापि क्रमाक्रमानें व्यवस्थित कर्म होऊं लागून पुढें सात्विक कर्म होतें व सात्विकाचें पर्यवसान निष्काम कर्मामध्यें होऊन ज्ञान व तदनंतर मुक्ति मिळतात.

हा आमच्या येथील उत्क्रांतीचा पंथ आहे. पूर्ण अज्ञान, प्रमाद, अल्पज्ञान विस्तृत ज्ञान आणि पूर्णज्ञान, असा क्रम आहे; व्यवहार सुरू झाला किंवा प्रकृतिपुरुषांची जोडी ईश्वरी सत्तेनें विभक्त झाली म्हणजे प्रथमतः सर्वच अचेतन असतें, तेथें चैतन्य (परमेश्वर) चेतनारूपानेंप्रकट होतें. कांहीं हालचाल, कांहीं व्यापार, सुरू होतो. त्या व्यापारास व्यवस्थित स्वरूप प्राप्त होऊन वृक्षसृष्टि व प्राणीसृष्टि उत्पन्न होतात; नंतर परंपरेनें मानवी योनी प्रकट होऊन जीवाला पूर्णावस्था प्राप्त होण्याची, ज्ञानबलक्रिया अविर्भूत होण्याची संधि मिळते.

हें उत्क्रमण ध्यानांत ठेवणें असल्यास आणखी एक दोन गोष्टी विसरतां कामा नये. त्या ह्याः चैतन्य हें सर्वव्यापी आहे. कोठेंही चैतन्य नाहीं असें स्थलच मिळावयाचें नाहीं. ब्रह्मदेवापासून अत्यंत अचेतन अशा स्थूल पदार्थापर्यंतची कोणतीही मूर्तामूर्त वस्तु घेतली तरी येथें कोणत्याना कोणत्या तरी रूपानें चैतन्य राहत असतें. हा व्यवहाराचा विचार चालला आहे. तेव्हां दुसरा आणखी सिद्धांत करण्यास हरकत नाहीं; तो हा कीं, अत्यंत स्थूल अथवा सर्वतः अचेतन पदार्थापासून तों ब्रह्मदेवापर्यंतच्या प्रत्येक व्यक्तींत जडद्रव्य हें असतें. अचेतनामध्यें जडद्रव्यच पुष्कळ अंशानें प्रकट असतें आणि ब्रह्मदेवामध्यें चैतन्य पुष्कळशा अंशानें प्रकट असतें, हा भाग निराळा; पण सर्वत्र जड व चेतन, प्रकृतिपुरुष, यांची जोडी अनिरुद्धपणानें संचार करित आहे, हें ध्यानांत ठेवणें अगत्याचें आहे. अहंकार, बुद्धि, मन आणि इंद्रियें यांत जसा कमीजास्ती प्रमाणानें जडाचा अंश भरला आहे, तसाच स्थूल व सूक्ष्म अचेतन वस्तूंमध्येंही चैतन्याचा अंश भरला आहे. कधीं गति, कधीं उष्णता, कधीं आवाज, कधीं विद्युत्, कधीं ज्ञान, इत्यादि नाना स्वरूपें घेऊन हा चैतन्यांश प्रसंगोपात्त प्रकट होत असतो. एवंच या विश्वांत सर्वत्र जड आणि चैतन्य यांचे अनंत परिमाणांनीं घटित झालेलें मिश्रण ओतप्रोत भरलेलें आहे. मात्र तें घनदाट नाहीं. तसें असतें तर हालचालच शक्य नसती. असो, जडचैतन्याचें हें मिश्रण आपल्यापासून हजारों कोट मैल लांब असणाऱ्या सूर्यामध्यें व आपल्या जवळ अत्यंत निकटत्वानें राहणाऱ्या पृथ्वीमध्येंही भरलेलें आहे. या भव्य व अवाढव्य पोकळींत जें द्रव्य आहे, त्याचें नांव आकाश (Ether) होय. हें अमूर्त व बिनवजनाचें द्रव्य अस्तित्वांतच नसतें तर सूर्याचा किरण येथपर्यंत येणें शक्यच नव्हतें. हें तत्व युरोपियन शास्त्रज्ञांस १९ व्या शतकांत समजलेंसें दिसत आहे. सारांश जड चैतन्याचें सर्वत्र अस्तिव आहे. आणखी ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, ही सर्व विश्वव्यवस्था कांहीं ठराविक, निरपवाद, आणि सार्वत्रिक अशा नियमांनीं चाललेली आहे. या नियमांचा व्यवस्थापक परमेश्वर आहे; म्हणून या विश्वचक्रांतून अथवा जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटावयाचें असल्यास शास्त्रोक्त मार्गानें व अतिनम्रतापूर्वक ज्ञानाचें व पुढें परमेश्वराचें आराधन एकनिष्ठत्वानें केलें पाहिजे; राजसी आचरणाचा

मोर्चा सात्विक आचरणाकडे व पुढें निष्काम आचरणाकडे वळविला पाहिजे. गुणातीत होण्याचा हा पंथ आहे.

६ येणेंप्रमाणें तीन गुण, त्यांचा क्रम, त्यांचें स्वरूप, त्यांचें फल इत्यादिकांची मीमांसा भगवंतांनीं श्लोक अठरापर्यंत केली आहे; आणि या विवेचनावरून सिद्ध होणारे प्रमेय १९ व २० श्लोकांत प्रकट केलें आहे. हें तत्व अत्यंत महत्वाचें आहे. आत्मा कांहीं करित नाहीं व करवीत नाहीं, जे काय कर्म होतें तें सत्वादिगुणांकरवीं होतें आणि ह्या गुणांचा अतिक्रम केला, या गुणांस टाकून पुढें गेलें, ह्मणजे कर्म संपतें, हें पुनः एकवार येथें सांगितलें आहे. अज्ञानानें कर्म होतें; अज्ञान ह्मणजे प्रकृति होय. प्रकृति त्रिगुणात्मक आहे; तेव्हां कर्म होतें तें गुणांकरवीं, प्रकृतिकडून, अज्ञानद्वारा, होतें. कर्म ह्मणजे सकामकर्म असा अर्थ तर घ्यावयाचाच; ह्मणजे या विश्वांत ही जी हालचाल, घडामोड, दिसत आहे, ती सर्व सकाम आहे, असेंच समजावयाचें; मात्र हें विसरावयाचें नाहीं कीं, स्त्रीसाहचर्य, पुत्रपालन, पितृसेवा, कुटुंबपोषण, समाजरक्षण इत्यादि सकामी, पण, उत्तरोत्तर श्रेष्ठ पदवीचीं कर्में आपल्या हातून होतात त्यांत निष्कामत्वाचा अंश उत्तरोत्तर वाढत जातो. ज्ञानपूर्वक केलेले कर्मांत जितकी जितकी निष्कामता अधिक जितका निरभिमान अधिक, तितकें तितकें तें कर्म जास्त श्रेष्ठ असतें. पूर्णसात्विक कर्म ह्मणजे पूर्ण निष्कामकर्म होय. तमोगुण केवळ जडाचा, रजोमिश्रित तमोगुण राक्षसी, रजोगुण मानवी आणि सात्विकगुण दैवी, अशी परंपरा आहे. येथें समजावयाचें हेंच कीं, यच्चावत कर्म सत्वप्रेरित, तमःप्रेरित अथवा यांतील कोणत्याही दोन गुणांनीं अथवा सर्व गुणांनीं प्रेरित असतें. गुण नसतील तर कर्म शक्य नाहीं.

### आत्मा कर्मप्रेरक नाहीं.

सर्व संसारीकर्मांचे प्रेरक गुण आहेत. आत्मा हा गुणातीत असल्यामुळें तो ह्या कर्मांचा प्रेरक होत नाहीं; असें ज्ञानविज्ञान झालें म्हणजे आत्मज्ञान प्राप्त होऊन मुक्ति मिळते. सर्व करणारी व करविणारी प्रकृति आहे, जीवाची म्हणजे जीवाला उत्पन्न होणारी इच्छा सुद्धां प्रकृतिजन्यच असून तीही निमित्तमात्र आहे. हें जीवास समजत नाहीं आणि **माझी** इच्छा, **माझें** कर्तृत्व, **माझें** भोक्तृत्व, असें त्यास वाटत असतें, हीच माया होय. प्रथम षडध्यायींत जसा आत्मा अकर्ता आहे, असें सिद्ध केलें, त्याचप्रमाणें परमात्माही अकर्ता आहे, असें येथें सिद्ध केलें. आत्मा आणि परमात्मा दोन्ही अव्यय, अविकार्य, नित्य आणि म्हणून सर्व-व्यापी आहेत; तेव्हां त्यांकडून कार्य होणें किंवा त्यांच्यावर संस्कार होणें शक्यच नाहीं. आत्मा म्हणजे परमात्मा अव्यय व अविकार्य आहे. हें सुंदर तत्व दुसऱ्या अध्यायांत श्रुतीनें, युक्तीनें व अनुभवानें प्रकट केलें आहे; शेवटीं आत्म्याला व्यय आहे अमर तो

विकार्य आहे, असें ह्मटलें तर अनवस्था उत्पन्न होते असेंही सिद्ध केलें आहे. एवंच सर्व-व्यापी आत्मा कार्यकर्ता किंवा सुखदुःखभोक्ता नाहीं, त्याचप्रमाणें परमात्माही नाहीं, हें ज्ञानविज्ञान परमात्मप्राप्तीला अवश्य आहे व ह्मणून याला उत्तमोत्तम ज्ञान असें ह्मटलें आहे.

प्रकृतीच्या अभावीं कर्म शक्य नाहीं. आतां ज्ञान, सुख, कर्म, दुःख, प्रकाश आणि आळस हे कर्मप्रेरक आहेत, असें ठरलें. ह्या कर्मप्रेरणेंत सामान्यतः सकामत्वाचा अंश असतोच म्हणून हे सर्व गुण संसारपोषक आहेत. पहा कीं, ज्ञान हा गुण सात्त्विक आहे. अनंतविश्वांतील अपरिमित पदार्थांचें ज्ञान करून घेणें हें अनेक कारणां-करितां सदैव अवश्यच राहील. तथापि पुष्कळ प्रकारचीं शास्त्रें आपलींशीं केलीं, नवीन शोध केले व जगाच्या ज्ञानांत आणि सुखांत पुष्कळशी भर घातली, सारांश आयुर्दायाचा व्यय उत्तमोत्तम रीतीनें केला; तथापि हीं सर्व शास्त्रें व सर्व कला कोणत्या एका अद्वितीय तत्त्वापासून निघालीं आहेत, परस्परांचा एकमेकांशीं काय संबंध आहे, हें जोंपर्यंत कळलें नाहीं, जोंपर्यंत आपल्या या शरीरयष्टींतील हजारों पदार्थांस एकवट करून एकजीवत्वानें चालविणाऱ्या आत्म्याचा व त्याचप्रमाणें विश्वांतील अनंत जीवांस व अनंत वस्तूंस एका सूत्रानें निर्बाधपणानें चालविणाऱ्या परमेश्वराचा व त्याच्या पलीकडील परब्रह्माचा शोध लागला नाहीं, सारांश, क्षेत्र, क्षेत्रज्ञ आणि पुरुषोत्तम यांचा बरोबर उलगडा झाला नाहीं, तत्त्वज्ञानविज्ञान ( Philosophy, theoretical and practical ) जोंपर्यंत प्रकट झालें नाहीं, तोंपर्यंत वरील प्रचंड व वर्णनीय ज्ञानही जीवाला पुनः पुनः संसारांतच घालितें. उपाधीनें अल्पज्ञत्व आलेल्या या जीवास व जीवजनकांस जोंपर्यंत सर्वज्ञत्व आलें नाहीं, जोंपर्यंत भेदबुद्धि नष्ट झाली नाहीं, तोंपर्यंत जीवास जन्म घेतलाच पाहिजे. याप्रमाणें, नुसत्या ज्ञानासाठीं ज्ञानाचें अर्जन करावयाचें एवढा संकल्प केला व ज्ञान वाढविलें तथापि तें ज्ञान जर एकवट केलें नाहीं तर सुद्धां जर संसार उत्पन्न होतो, तर सुख, लोभ, स्वस्थता इत्यादि अनंत विषयमूलक प्रेरकांच्या स्वाधीन होऊन कर्म केलें असतां संसार उत्पन्न होईलच होईल याविषयीं काय संशय आहे? दुसऱ्या पक्षीं; नुसत्या अद्वैतज्ञानाचे सिद्धांत घोटघोटून ठेविले, पण त्यांची सिद्धता करणाऱ्या शास्त्रांचा, नीति, धर्म इत्यादिकांचा व अनेक कलांचा उदाहरणापुरता सुद्धां परिचय करून घेतला नाहीं, तर तें स्वभावतः अमोलिक असणारें तत्त्वज्ञानही कवडीमोलाचें होईल. सारांश, शास्त्र-कलांचा अभ्यास तत्त्वदृष्टीनें व तत्त्वज्ञानाच्या मार्गानें झाला पाहिजे व तत्त्वशास्त्रांचें श्रवण मनन, शास्त्रदृष्टीनें स्वानुभव येण्यासारखें झालें पाहिजे; तरच ज्ञानाचा उपयोग आहे, तरच ज्ञानाला पवित्रत्व येणार आहे आणि तरच ज्ञान शांतिपोषक होणार आहे. प्रकृतिजन्य सात्त्विक गुणांत असलें ज्ञान येत नाहीं; आणि ह्मणूनच अठराव्या अध्यायांत भगवंतांनीं "सात्त्विक ज्ञान कोणतें समजावें." या प्रश्नाला समर्पक उत्तर दिलें आहे. असो; तेव्हां केवळ एकदेशीय ज्ञानाची व त्याचप्रमाणें सुखादि कर्मप्रेरकांची जननी,

प्रकृति आहे. सर्व कर्म प्रकृतीमुळें व प्रकृतीसाठीं आहे. ह्मणजे असें: 'कर्म करा' याचा अर्थ निष्काम कर्म करा असें भगवंतांचें आग्रहपूर्वक सांगणें आहे. कर्म दोन प्रकारचें; एक निष्काम व दुसरें सकाम. निष्काम कर्म अशासाठीं करावयाचें असतें कीं, ज्या कर्मसंततीमुळें जीवास देह व इतर उपकरणें उत्पन्न झालीं, ती कर्मसंतति व देहादि व लोभ अज्ञानादि तिचीं मुळें यांचा आपल्यास निरास करण्याचें अपूर्व सामर्थ्य प्राप्त होईल. एका जातीच्या कर्माचा नाश दुसऱ्या जातीच्या कर्मानें करावयाचा आहे. अज्ञानानें व अशुद्ध मनानें जी कर्मसंतति उत्पन्न झाली तिचा नाश ज्ञानयुक्त व निर्मळ म्हणजे निष्काम कर्मानें करावयाचा आहे. आतां सकाम कर्म अज्ञानानें, प्रकृतीमुळें उत्पन्न होतें, यासंबंधें वादच नाहीं. तेव्हां प्रकृतिनिरासासाठीं जें कर्म अगर जो कर्मयोग अनुपाळावयाचा आहे, तो प्रकृतीकडून होणाऱ्या प्रेरणांकडून पाळावयाचा नाहीं, तर गुणातीत जो भगवान् याच्या प्रेरणेनें पाळावयाचा आहे. ही प्रेरणा स्वयंभु आहे असें ज्ञान 'सर्व संसारी कर्मांच्या प्रेरणा प्रकृतीकरवीं होतात' हें ज्ञान झालें ह्मणजे होतें.

आत्मा गुणांहून विलक्षण आहे, गुणातीत आहे, तेव्हां तो कर्म करित नाहीं, वा करवीतही नाहीं हें आतांच सांगितलें. हें ज्ञानविज्ञान झालें म्हणजे तो पुरुष खरा भक्त होतो व परमेश्वरस्वरूप होतो. पुढें अद्वैतज्ञानविज्ञान झालें म्हणजे तो मुक्त होतो. तेव्हां "जर खरोखरीचा मोक्ष हवा असेल, जन्ममृत्यु, जराव्याधि, दुःखकष्ट, इत्यादि उपाधिजन्य परिणाम समूळ व सकारण नष्ट करून टाकावयाचें असतील तर प्रकृतिसंभूत तिन्ही गुणांचें अतिक्रमण करून-व करितां करितांही-अद्वैतज्ञान यथाविधि समजून घ्यावें." असें १० व्या श्लोकांत भगवान् आग्रहपूर्वक व अनुकंपापूर्वक सांगत आहेत; तिकडे संसारत्रस्तांनीं सोल्हास लक्ष्य देऊन गुणातीत होण्याचा दृढ निश्चय करावा व तत्प्रीत्यर्थ अश्रांत परिश्रम करून सिद्धीही मिळवावी.

७ यापुढील सात आठ श्लोकांत गुणातीत पुरुषाचीं लक्षणें, त्याचा आचार, गुणातीत होण्याचा उपाय, इत्यादिसंबंधीं मीमांसा अर्जुनप्रश्नावरून भगवंतांनीं केली आहे. दुसऱ्या अध्यायाच्या व १२ व्या अध्यायाच्या शेवटीं, तसेंच इतरत्र पुष्कळ ठिकाणीं, जीवन्मुक्तीचीं लक्षणें दिलीं आहेत त्यांचाच पुनः येथेंही अनुवाद केला आहे.

विषयज्ञान असो वा नसो, विषयाकांक्षेनें कर्मप्रवृत्ति होवो वा न होवो विषयासंबंधें मोह असो वा नसो, ज्याला कोणत्याही स्थितींत हर्षविषाद होत नाहीं, उदासीन अथवा तटस्थ पुरुषाप्रमाणें जो राहतो, जो विषयतंत्रानें केव्हांही वागत नाहीं; कर्म होत असेल तर तें सत्त्वादिगुणप्रेरित आहे, तें प्रकृत्यभिमानी अज्ञानानें होत आहे, आत्मारामाचा तेथें यत्किंचितही संबंध नाहीं, असें निश्चितज्ञान ज्याच्या वृत्तीमध्यें दिसतें, निश्चितज्ञानाचीं चिन्हें जेथें दिसतात, तेथें गुणातीतत्व प्राप्त झालें आहे, असें समजावें. अशा

गुणातीत पुरुषाचा आचार अर्थातच सुखदुःखशून्य असावयाचा; व त्याचें मनही नित्य स्वस्वरूपामध्यें लीन असावयाचें. कांचन अथवा मृत्तिका यांची किंमत त्याला एकसारखीच असणार; प्रिय होवो, अप्रिय जावो किंवा अप्रिय होवो, प्रिय जावो, त्याच्या वृत्तींत बालाग्रही फरक पडावयाचा नाहीं; त्याचें आत्मज्ञान पूर्ण असावयाचें; स्तुतिनिंदा संबंधें, मानापमान, शत्रुमित्र, यासंबंधें जो समवृत्तिच असणार आणि सहेतुक कर्मांचा ज्यानें सर्वथा परित्याग केला आहे;–सारांश, ज्यानें कर्मसंन्यास केला व वृत्तिसंन्यासही ज्यानें केला त्याला गुणातीत असें म्हणावें. ही स्थिति प्राप्त होण्याला सर्व आणि सर्वात्मा जो सर्वज्ञ परमेश्वर त्याचें एकनिष्ठपणानें अखंड आराधन ज्ञानपूर्वक झालें पाहिजे. परमेश्वराचें अखंड आराधन एकनिष्ठेनें केलें असतां गुणातीतत्व प्राप्त होतें; आणि पुढें लवकरच मननिदिध्यासपूर्वक अद्वैतशास्त्राचा व्यासंग केला असतां दिव्यानुग्रह होऊन मुक्ति मिळतें. नुसतें अद्वैताचें शाब्दिकज्ञान उपयोगी नाहीं; सर्वव्यापि परमेश्वराचें ऐकांतिक आराधनेंवाचून अद्वैतबोध व्हावयाचा नाहीं, हें स्पष्ट करण्यासाठीं सांगतात कीं, 'ज्याच्या साहाय्यानें अमृतपूर्ण व व्ययरहित परब्रह्म मात्र आहे असें ज्ञान–विज्ञान होतें, तो परमेश्वर मी आहें, माझें ज्ञान व तादात्म्य पूर्ण झाल्याविना मुमुक्षूला मोक्षप्राप्ति होणार नाहीं,—सारांश ब्रह्म प्रतिष्ठापक मी आहें. तसेंच मी आहें, ह्मणूनच धर्माला सनातनत्व येतें.' ज्या धर्मांत गीताप्रणीत परमेश्वराचें आस्तिक्य गृहित घेतलेलें नाहीं अगर सिद्ध केलेलें नाहीं, त्या धर्माला सनातनत्व अथवा चिरस्थायित्व येणें शक्य अगर संभवनीय नाहीं; ह्याचप्रमाणें अखंड सुखाची चिरंतन अवाप्ति सुखमार्गानें करून घेणें इष्ट असेल तर परमेश्वराला अनन्यभावेंकरून शरण गेल्याशिवाय व त्याच्या आराधनानें चित्तशुद्ध करून अद्वैतज्ञान संपादन केल्याशिवाय, हें कार्य होणार नाहीं.

८ असो; याप्रमाणें सर्व ज्ञानांतील अत्युत्तम जें गुणातीत्व ज्ञान त्याचा विस्तार येणेंप्रमाणें झाला. प्रथम २ श्लोकांत श्रोत्यांची व वाचकांची जिज्ञासा प्रफुल्लित करणारी प्रस्तावना, पुढील दोन श्लोकांत ब्रह्मास्तित्व व पुरुष, प्रकृति आणि परमेश्वर यांची व्यवहारकालीन उत्पत्ति, नंतरच्या १४ श्लोकांत गुणत्रयविभाग, त्यांचें स्वरूप इत्यादि, १९ व २० श्लोकांत आत्म्याचें निर्गुणत्व आणि शेवटच्या ७ श्लोकांत गुणातीत पुरुषाचीं लक्षणें; असे अनेक विषय घेऊन परमेश्वरांनीं ज्ञानमार्ग दाखविला आहे. वाचकांनीं कृपा करून ही गोष्ट लक्ष्यांत ठेवावी कीं, येथील गुण म्हणजे प्रकृति ज्या प्रकारांनीं जीवास प्रकट होते ते प्रकार होत. मनुष्यलोकीं हे तीन गुण प्रकट होतात; अन्य ठिकाणीं हीच प्रकृति अन्यगुण प्रकट करित असली पाहिजे. आतां मनुष्य लोकीं प्रकट होणारे हे प्रकृतिगुण असोत, वा अन्य असोत, त्या गुणांस वश न होतां त्यांच्या पलीकडे गेलें पाहिजे. असें झालें तरच आत्मप्राप्ति सुलभ होते. हा उपदेश केवळ मनुष्यासच आहे असें नाहीं तर ब्रह्मदेवापासून तों थेट सूक्ष्म जंतूपर्यंतच्या प्रत्येक मुमुक्षूस हा सार्वकालिक उपदेश आहे. सारांश हा उपदेश कालस्थलाबाधित आहे,

दुसऱ्या अध्यायांतही जीवाला 'निःत्रैगुण्य=गुणातीत हो' असा उपदेश केला आहे. यावरूनही द्वैतवादी, शुद्धाद्वैतवादी आणि विशिष्टाद्वैतवादी, यांनीं असा बोध घ्यावयाचा आहे कीं, परब्रह्मांत म्हणजे मुक्तस्थितींत ज्ञान व सुख हे सात्विक गुणही असूं शकत नाहींत, मग इतर गुणकर्म इत्यादिकांची कथा काय? शिवाय जेथें ज्ञान व सुख यांचें वास्तव्य असतें, तेथें अज्ञान व दुःख यांची जोडी असावयाचीच. तेव्हां मुक्तींत ज्ञान आहे, सुख आहे, असें म्हटलें कीं अज्ञान व दुःख हीं भाऊबंदकीच्या नात्यानें तेथें येणारच! मग मुक्तीची अव्यवस्था ती काय? सारांश, गीतादृष्टीनें तरी निदान अद्वैताहून इतर पंथाला येथें व्यवस्थित थारा मिळणें शक्य नाहीं.

असो; येथें कर्तृत्व, भोक्तृत्व गुणांकडे दिलें; प्रथम षडध्यायींत शारीरिक इंद्रियांकडे दिलें. 'सारांश, गुणागुणेषु वर्तन्ते' हें ठरविलें आणि दोन्ही ठिकाणीं आत्मा व परमात्मा अकर्ता व अभोक्ता असें ठरवून त्या दोघांची एकवाक्यता या दृष्टीनें ठरविली. प्रत्येक मुमुक्षूनें हा अध्याय अवश्य वाचून त्याचें मनन ज्ञानपूर्वक करावें इतकी प्रार्थना करून हें प्रकरण आटपितों.

---

## खंड १५ वा.

# पंधरावे अध्यायाचा उपसंहार.

हा '**पुराण-पुरुषोत्तमयोग**' नामक अध्याय लहान असूनही यांत अनेक विषयांचें उद्घाटन आलें आहे, म्हणून बहुतेक गीताभक्तांस हा अध्याय प्रिय झाला आहे. व्यवहार काळीं संसाराचें नित्यत्व (२) संसारतापत्रय-विमोचनाचा उपाय, (३) ब्रह्मस्थितीचें दिग्दर्शन (४) जीवशिवांचा संबंध (५) जीवाचा जगताशीं संबंध. (६) जीवाची पुनरावृत्ति (७) ज्ञात्यांचा विवेक (८) अज्ञानी पुरुषांचा अविवेक (९) ईश्वरविभूति वर्णन (१०) जीव व जीवदशा यांमध्यें तारतम्य (११) जीव व शिव यांमधील तारतम्य (१२) पुरुषोत्तमश्रेष्ठत्व (१३) पराभक्तीचें अत्युत्कृष्ट स्वरूप (१४) ज्ञान, तसेंच कर्तव्याचरण यांचा अन्योन्य संबंध आणि (१५) मोक्षप्राप्ति, इतके अति-गहन म्हणून अत्यंत मोलवान विषयांचा ऊहापोह कोठें नामनिर्देशानें, कोठें दिग्दर्शन करून आणि कोठें थोडाबहुत विस्तार करून भगवंतांनीं या अध्यायाला सर्वथा मनोहर रमणीयत्व आणिलें आहे. वर निर्दिष्ट केलेल्या विषयमालिकेपैकीं प्रत्येक विषयाची योग्यता अशी आहे कीं, प्रत्येकाला एक एक चांगला स्वतंत्र ग्रंथ असावा. पण इतका विस्तार करण्याचा अधिकार मला नाहीं. शिवाय, गीताशास्त्राच्या विस्ताराला जी मर्यादा आंखून ठेविली आहे, तिच्या बाहेर अतिक्रमण करणें असमंजस होईल म्हणून या विष-

यांची गीताशास्त्रप्रणोदित दिशा दर्शवून प्रस्तुत अध्यायाचा समारोप करावयाचा मीं संकल्प केला आहे. कृपा करून वाचकांनीं इकडे सावधान लक्ष्य द्यावें.

गेल्या अध्यायांत गुणत्रय विभागाचा विस्तार झाला. येथें सामान्यतः गुणत्रयातीत जो भगवान् आणि भगवद्धाम जें ब्रह्म यांचा विस्तार आतांच स्पष्ट उल्लेखिलेल्या विषयांकरवां व या विषयांच्या विवेकानें व्हावयाचा आहे. प्रथमतः संसाराचे नित्यत्वाचा विचार करूं.

## व्यवहारकाळीं संसाराचें नित्यत्व.

( १ ) प्रतिक्षणीं स्वरूपभिन्नता पावणारा हा संसार व्यावहारिकदृष्टीनें **नित्य आहे.** ऐकतांक्षणीं कित्येक भगवद्भक्तांस व अद्वैतवाद्यांस 'अब्रह्मण्य' ह्मणून प्रायश्चित्त घेण्याची पाळी येईल ! 'संसार अनित्य आहे' हा असा डिंडिम आज हजारों पिढ्या आमच्या भारतवर्षांत व पश्चिमेकडील आर्यावर्तांत दुमदुमत आहे. त्यांच्यामतें संसार आणि नित्यत्व हे शब्दच विप्रतिषिद्ध, परस्परविरोधी, आहेत. परंतु थोडासा विचार शांतपणानें केला असतां सर्व निष्पापी तत्त्वज्ञांची एकवाक्यता होण्याला अडचण येणार नाहीं. व्यवहार कालामध्यें (ह्मणजे ज्ञानाची स्थिति संकुचित आहे तोंपर्यंत,) ह्या विश्वाचें **नित्यत्व अखंड व अबाधित** आहे असें मानिलेंच पाहिजे. पहाः व्यवहारकालांत आपण दोन गोष्टी गृहीत धरून विचार करीत असतो. ( १ ) प्रत्येक कार्याला योग्य असें निश्चित कारण असलेंच पाहिजे; आणि ( २ ) या विश्वामध्यें अशी कोणतीही जड वस्तु नाहीं, किंवा अशी कोणतीही शक्ति नाहीं कीं जिचा कांहीं तरी संयोगानें अस्तित्वनाश होऊन ती नामशेष होण्याचा संभव आहे.

आतां कारणाशिवाय कार्य नाहीं, हें गृहीतकृत्य इतकें अनुभवसिद्ध आहे कीं, त्याचा नुसता नामनिर्देश केला ह्मणजे पुरे; त्याच्या सिद्धीची आवश्यकताच उरत नाहीं. प्रत्येक कार्याला कारण किंवा कारणसमूह पूर्वकालींच निश्चित झालेला असतो असा आपला ठाम समज आहे व तो अनुभवानें समर्थित होतो, ह्मणून शास्त्रसिद्ध आहे. कारण दृश्य होण्यासारखें नसलें तर आपण कांही तरी दैविक कारण लावून कार्याची उपपत्ति सिद्ध करितों हें कोणास ठाऊक नाहीं ? ह्याप्रमाणें कार्यकारणसंबंध जर नित्य आहे व कार्यकारणसंबंधाचें जें आपलें ज्ञान आहे तें जीवदशा आहे, तोंपर्यंत जर नित्य आहे, तर ह्मणजे ज्ञानविषय, कार्यकारणांच्या सांखळ्ांनें घटित झालेला संसार, व ज्ञानविषयीं ( ज्ञानी जीव ) जोंपर्यंत नित्य आहेत, तोंपर्यंत संसार नित्यच असला पाहिजे; हें उघड आहे. ( २ ) जीव नित्य आहे. विषयज्ञान असणें ही जीवाची स्थिति आहे. जीवाचें ज्ञान संकुचित असतें. ह्या संकुचित ज्ञानामुळें व्यवहार उत्पन्न होतो. म्हणून हा व्यवहार आहे तोंपावेतों जीवदशा नित्य, विषयज्ञान नित्य आणि म्हणून संसारही नित्य अशी ही

परंपरा आहे. ( ३ ) ब्रह्म नित्य आहे. या ब्रह्माकडे संकुचितदृष्टीनें पाहणें म्हणजेच जगाची उत्पत्ति, स्थिति व लय उत्पन्न करणें होय. ब्रह्म नित्यच आहे व सर्वांचें अधिष्ठान आहे, तेव्हां संकुचित ज्ञानस्थितींत ( व्यवहारकाळीं ) संसार नित्य आहे; हें याप्रमाणें दोन तीन मार्गांनीं सिद्ध झालें. शिवाय व्यवहारदशेंत मूर्तांचा अगर अमूर्तांचा सर्वथा नाश होतो असें तात्त्विकदृष्टीनें मानणें शक्यच नाहीं. तेव्हां व्यवहार-काळीं संसार नित्य आहे हें सिद्ध आहे. पाश्चिमात्य तत्त्वज्ञांचे लेख पाहिले, कँट, हक्सले, स्पेन्सर यांचे सर्वमान्य ग्रंथ वाचले, तरी हेंच तत्त्व त्यांनीं सादरतः मंडित केलें आहे असें दिसेल. ज्याला आपण नाश, मृत्यु इत्यादि नांवें देतां, तो खरा नाश अगर मृत्यु नसून परमाणूंचें अगर सामर्थ्यांचें स्वरूपांतर होतें, असें अधिभौतिक सर्वमान्य शास्त्रीही म्हणतात. याच्या मतें पदार्थांच्या परमाणूंचा आत्यंतिक नाश होणें किंवा चेतनासामर्थ्यांचा नाश होणें शक्यच नाहीं. खरें आहे. घट फुटला, ज्या मातीचा तो केला होता ती माती पाण्यांत विरली, पाणी समुद्रास जाऊन मिळालें, तथापि मातीचे ते ते परमाणू विश्वांतून सर्वात्मना नाहींसें झाले, असें केव्हांही होत नाहीं. तसेंच गति, शब्द, उष्णता, विद्युत्, चुंबन इत्यादि शक्ति विश्वांतून सर्वथा नाहींशा झाल्या असेंही होत नाहीं. ज्या परमाणूंचे समुदायांनीं या विश्वाची घटना झाली आहे व ज्या साम-र्थ्यांनीं ही घटना सांवरून धरिली आहे, ते परमाणु व तीं सामर्थ्यें अनादि, अव्यय, अखंड व अनंत आहेत व असलीं पाहिजेत; पाश्चिमात्य आचार्यांचें हें म्हणणें, पौरस्त्य आर्यांच्या सिद्धांतांचा अनुवाद मात्र करितें. येथें लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट ही आहे कीं, जगताचें, विश्वाचें व संसाराचे नित्यत्व संकुचित ज्ञानावर अवलंबून आहे. या संकोचवृत्तीचा अज्ञानरूपी पडदा नाहींसा होऊन अमर्यादता प्राप्त झाली, ज्ञानी पुरुषास ज्ञानस्वरूप प्राप्त झालें, ब्रह्माचा परिचय होऊन तो स्वतःच ब्रह्मस्वरूपीं झाला म्हणजे संसार नष्ट होतो. व्यवहार अगर संकुचित ज्ञान नष्ट झालें म्हणजे परमार्थदृष्टीनें संसाराचें नित्यत्व संपलें ! सारांश, संसाराचें, अर्थातच संसारांत उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचें व जन्ममरणादि यातायातींचें, **नित्यत्व सापेक्ष** आहे हें आतां स्पष्टच झालें. हें नित्यत्व केवल नव्हे, सापेक्ष आहे. ज्ञानविज्ञान झाल्याबरोबर हें नित्यत्व नष्ट होतें. पृथ्वीच्या भागावर आपण कोठेंही उभे राहिलों तरी सामान्य मनुष्याला आपण एका सपाट चबुऱ्यावर उभे राहिलों आहों असें वाटतें. हें पाहून म्हणजे या संकुचित ज्ञानाच्या जोरावर तो ' पृथ्वी सपाट आहे व चौकोनी आहे ' असें प्रतिपादन करूं लागला, तर हल्लींच्या विसाव्या शतकांत एखादें शहरांतील शाळेंत जाणारें पोरही त्याची समजूत घालून देईल व ' पृथ्वी गोला-कार आहे ' असें त्यास कबूल करावयास लावील ! याचप्रमाणें व्यवहारांत नित्यसा असणारा संसार परमार्थदृष्टीनें मुळींच नसतो हें समजावें. संकुचित ज्ञान आणि पूर्ण-ज्ञान यांच्यामध्यें केवढा हा फरक ! आणखीही पुष्कळ उदाहरणें देतां येतील. सारांश, थोडकें ज्ञान असतां जें खरें व नित्य वाटतें तेंच अमर्याद ज्ञान झालें असतां असत् आणि अनित्य ठरतें. संसाराची स्थिति हीच आहे. हा सिद्धांत प्रकट करण्याचे

हेतूनें भगवंतांनीं प्रथम दोन श्लोकांचा अवतार केला आहे. संसाराचें स्वरूप व ज्ञान उत्तम व सुगम व्हावें एतदर्थ त्याला अश्वत्थवृक्षाचें रूपक योजिलें आहे. कठोपनिषदांत हेंच रूपक केलें आहे. या अश्वत्थवृक्षाचें मूळ वर, आणि शाखा खालीं, असा हा विपरीत प्रकार आहे ! संसाराचें मूळ ब्रह्म आणि त्याचा विस्तार म्हणजे येथें दृष्टादृष्ट असलेले भूर्भुवादि अनंत लोक होत. अश्वत्थवृक्ष अव्यय असणें ( अश्वत्थ म्हणजे उद्यां जगतो कीं मरतो याचा निश्चय करितां येत नाहीं आणि अव्यय म्हणजे ज्याच्या स्वरूपांत केव्हांही बालाग्र फरक पडत नाहीं ! ) हा जसा चमत्कार आहे, तद्वतच हा अनंतरूपी संसारही एक चमत्कार आहे ! म्हणजे या संसारांत प्रतिक्षणीं जरी अनंत घडामोडी होत आहेत, तथापि त्याच्या अंतःस्वरूपांत अथवा घटकावयांत बालाग्रही फरक पडत नाहीं. तेलाच्या अखंड धारेप्रमाणें त्याचा प्रवाह अखंड असतो. वृक्षाचें संरक्षण करणारीं पर्णें असतात त्याप्रमाणें या संसारवृक्षाचें रक्षण करणारे, त्याचें भयानक स्वरूप आच्छादून टाकणारे, मित्र म्हणजे वेद होत. अश्वत्थाचा जसा खालीं, वर, शाखाप्रसार असतो; तसाच या संसारवृक्षाचा विस्तार ब्रह्मलोकापासून तों थेट पातालांतील अधोलोकापर्यंत आहे; म्हणजे ब्रह्मदेवापासून तों गवताच्या काडीपर्यंतचे सर्व मूर्तामूर्त पदार्थ व सामर्थ्यें पारमार्थिकदृष्टीनें अनित्य परंतु व्यावहारिकदृष्टीनें नित्य व विस्तीर्ण आहेत. या संसारवृक्षाचें पोषण करणारे रस कोणते, तर सत्त्व, रज आणि तम हे गुण होत. या गुणांचा जसजसा परिपोष होत जाईल, तसतसा संसारवृक्षही जोम धरील. विषय (नानाविध उपभोग्य वस्तु) ही नूतन पल्लवी होय. ही पालवीही अर्थातच गुणत्रयाच्या परिपोषावर अवलंबून आहे. आणि वृक्षाला जशा पारंब्या फुटतात, त्याचप्रमाणें या सत्वादि गुणांच्या अनुषंगानें झालेलीं कर्मे व कर्मफलें आणि वासना ह्या वादविषयक संसारवृक्षाच्या पारंब्या होतात. याप्रमाणें मूळ, शाखा, त्यांचा विस्तार, पानें, रस, पालवी, पारंब्या इत्यादिकांनीं सज्ज झालेला संसारवृक्ष सनातन आहे. पारमार्थिक दृष्टीनें अनित्य पण व्यावहारिक अथवा सापेक्ष, संकुचित, दृष्टीनें अव्यय दिसणारा हा संसारवृक्ष खरोखरच मनोहर होय.

पण याचें खरें स्वरूप (अनित्यत्व) संसारदशेंतील लोकांस दिसत नाहीं. या जगांतील सर्व व्यवहार 'जग व संसार नित्य आहेत' अशा समजुतीवर चाललेले आहेत. जगाचें अथवा संसाराचें अनित्यत्व स्पष्ट दिसूं लागेल तर व्यवहार स्तब्ध होईल. 'संसार नित्य आहे व जन्ममरण असणें व उपभोग घेणें हाच पुरुषार्थ आहे' अशी समजूत दृढ झालेली आहे म्हणून व्यवहार चालला आहे. अर्थातच व्यावहारिक पुरुषाला संसाराचें अनित्यत्व समजत नाहीं, खरें स्वरूप समजत नाहीं. पुनः; मायेची अघटितघटनापटुता (अशक्य गोष्टी Miracles घडवून आणण्याचें सामर्थ्य व कौशल्य) इतकी मोहक आहे कीं, शेजारचीं हजारों माणसें मरत असतांही 'मी अमर आहें' असें सामान्य पुरुष समजतो व हजारों कुटुंबाची स्थिति बिघडत असतां

'मागची सर्व व्यवस्था कायम राहील' असें मानितो! आणखी; हा संसार केव्हां संपेल, ह्या जगाचा व जगत्कारणांचा अंत केव्हां होईल, हेंही आपल्यास सांगतां येत नाहीं. सर्व पदार्थांच्या आकारादिकांचा नाश होत आहे, असें आपल्यास दिसतें, तथापि सर्व विश्वाचा आत्यंतिक नाश म्हणजे काय, यांची कल्पना करणेंही असंभवनीय, अशक्य, आहे. प्रलयकालीं अथवा महत्प्रलयकालीं सर्व पदार्थ ब्रह्मामध्यें लीन होतात असें आपलें शास्त्र सांगतें; पाश्चात्यतत्त्वज्ञांपैकीं पंडितवर्य स्पेन्सरसाहेबही असेंच विधान करितात. हें कबूल केलें तरी पण ह्या पदार्थांस पदार्थत्व देणारीं जीं सामर्थ्यें आहेत, त्यांचें काय होतें? हीं सामर्थ्येंही परब्रह्माच्या ज्ञानस्वरूपांत लीन होतात काय? आणखी कालमर्यादा संपल्यावर पुढें काल आहे कीं काय?' हा काल संपतो कीं काय? पुनः आणखी; ह्या संसाराला आरंभ केव्हां झाला? पूर्वीं जर सर्व एकच ब्रह्म होतें, तर संसार किंवा संसार उत्पन्न करणारी माया आली कोठून? निराकार, निर्विकार व निरंजन ब्रह्मावर मायेची सत्ता चालली तरी कशी? ब्रह्म जर सर्वव्यापी आहे, तर मायेला राहण्याला व ब्रह्मास मोह घालण्याला सवड मिळाली तरी कशी? इत्यादि प्रश्नांस या व्यावहारिक दर्शेत समाधानकारक उत्तर देतांच येत नाहीं. पुनः एकदां आणखी; हा संसार म्हणजे व्यवहार चालला आहे कशाच्या जोरावर? या संसाराला अधिष्ठान काय? ब्रह्म हें अधिष्ठान आहे म्हणावें, तर तें कोठें दिसत नाहीं! शिवाय ज्याचें आदिकारण काय आहे हें समजत नाहीं, अंतीं परिणाम काय होणार हें ठाऊक नाहीं, त्याचें स्वरूप आपल्यास समजलें आहे, असें आपण म्हणावें तरी कसें? ज्ञानाची, विषयज्ञानाची, मर्यादा कितीही विस्तृत झाली, तरी विश्वाचें आदिकारण, अंतिम परिणाम व खरें स्वरूप जोंपर्यंत समजलें नाहीं तोंपर्यंत आपल्यास 'कांहीं समजत नाहीं' असेंच आपण म्हटलें पाहिजे. एवंच विषयदर्शनें व विषयग्रहण करण्यांत अत्यंत पटाईत अशा इंद्रिय, मन, बुद्धि इत्यादिकांच्या साह्यानें, जोंपर्यंत आपण विश्व, विश्वरचना व विश्वनियामक ईश्वर इत्यादि गूढ प्रश्नांचा विचार करित असतों, तोंपर्यंत ह्या प्रश्नांचा यथास्थित निकाल आपल्यास केव्हांही देतां येणार नाहीं. स्पेन्सर प्रभृति स्याद्वादि (Agnostics) म्हणतात त्याप्रमाणें हा सर्व भाग अज्ञेयाचा आहे. आपल्या स्कंधावर बसून प्रवास करावयास लागणें हें जितकें अशक्य आहे, तितकेंच नेत्रादिकांच्या व बुद्धीच्या साह्यानें विश्व-गूढांचा उलगडा व्यावहारिक दृष्टीनें करणें अशक्य आहे. अर्थातच 'आपण अज्ञानी आहों व असूं' असा मथितार्थ निघतो आणि सामान्य व स्थूल दृष्टीनें हें विश्व नित्य आहे असें आपण म्हणतों! अर्वाचीन शास्त्रही तेंच सांगतें आणि आपल्या व्यावहारिक विचाराचा प्रवाह त्या दिशेनें वाहतो. असो; आतां अद्वैतमताशिवाय इतर जे शास्त्र-ग्रंथ व धर्मपंथ आहेत, मग ते काळे लोकांचे असोत, अगर गोरे लोकांचे असोत; पौरस्त्य असोत, अगर पाश्चात्य असोत; प्राचीन असोत वा अर्वाचीन असोत; या सर्व शास्त्र-ग्रंथांचा व धर्मपंथांचा क्रम असा आहे कीं, तो अनुसरला असतां वरील प्रश्नांचा उलगडा कधीं

होऊंच नये. कारण उघड आहे कीं, हे ग्रंथ व पंथ 'आपण ईश्वरप्रणीत आहों' असें म्हणत असतांही मानवी बुद्धीच्या अगर अंतःकरणाच्या जोरावर वरील प्रश्नांचा उलगडा करण्याचा प्रयत्न करितात. जेथें अनंतता, अमर्यादपणा इत्यादि इंद्रियागोचर पदार्थांचें विवेचन करावयाचें असतें, तेथें बुद्धीसारख्या सांत, संकुचित व समर्याद साधनांचा काय उपयोग होणार? एका दृष्टीनें उलगडा झाला तरी दुसऱ्या दृष्टीनें संशय उत्पन्न होणारच! पहाः ईश्वर न्यायी आहे, व तो जीवाच्या योग्यतेनुसार निग्रहानुग्रह करितो, असें ह्मटल्यास त्याच्या दीनदयालुत्वास बाध येतो आणि तो दीनदयाळू आहे, म्हणजे त्याला दुःखाचा देखावा बघवत नाहीं, असें प्रतिपादिलें कीं, लागलेच परमेशाच्या निराबाध न्यायनिष्ठुरतेचा भंग होतो! सारांश मानवी किंवा अमानवी अथवा अतिमानवी संकुचित दृष्टीनें या अमर्याद प्रश्नांचा विचार केला तरी त्याला पूर्णता यावयाची नाहीं. विचारपूर्णता अथवा शंकानिवृत्ति हवी असेल, तर अद्वैतमताचेंच अनुसरण दृढश्रद्धेनें व अभंग निष्ठेनेंच केलें पाहिजे. असो; आतां हें अद्वैतमतच व्यवहारांत प्रकट करावयाचें झालें म्हणजे संसार नित्य आहे, वेदापासून तों चार्वाकापर्यंतचे सर्व ग्रंथ 'व्यवहार नित्य आहे' हें तत्त्व संमत धरून चालतात. 'अनादित्वात्संसारस्य' हें भाष्यकारांचें वाक्य किंवा 'प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि' हें सर्वज्ञ भगवंताचें वाक्य 'व्यवहारकाळीं हें विश्व व हा संसार आणि जीव अनादि व अनंत आहेत' असेंच स्थापित करितात. असो; तेव्हां सर्वदा दुःखमय असणारा संसार व्यवहारकाळीं अनादि व अनंत आहे असें श्रुति, स्मृति व अनुभव यांचे द्वारा सिद्ध झालें. आतां या दुःखसंततीपासून सुटका जर करून घ्यावयाची असेल, तर

## संसारतापत्रय—विमोचनाचे उपाय

कोणते आहेत हें शास्त्र, युक्ति व अनुभव यांचे साहाय्यानें पाहूं या. संसारतापत्रयाचें विमोचन करण्याचा पहिला उपाय म्हणजे असंग होय. असंग म्हणजे वैराग्य. वृक्षविस्तार नाहींसा करणें असेल किंवा तो समूळच उखडून काढावयाचा असेल, तर जलसिंचनाचा उपयोग न करितां परशूच्या तीक्ष्ण धारेचा जसा उपयोग करण्यांत येतो, त्याचप्रमाणें संसाररोगाचा उच्छेद करणें असेल तर भोगनिवृत्त होऊन वैराग्याची मात्राच घेतली पाहिजे. वैराग्य अभ्यासानें दृढ होतें. उद्यांच्या तरतुदीसाठीं आज विषयोपभोग न घेणें, आपल्या कर्माचें अगर श्रमाचें फल पुत्र, मित्र कलत्रादिकांस देणें, सन्मार्गानें वागून गोत्रकल्याण, जातिकल्याण व देशकल्याण अथवा विश्वकल्याण करणें, विश्वज्ञानाचें अनंत संप्रदाय प्रमाणपूर्वक वाढवून मानवीजातीचें कोटकल्याण करणें, भक्तीची पराकाष्ठा करून सर्वत्र ईश्वररूप पाहणें, एकाग्रचिंतन करणें, अद्वैतप्रतिपादक प्रमाणभूत ग्रंथांचें श्रवण, त्यांचें मनन, गुरूपदेश व आत्मस्वरूपाचा निदिध्यास श्रद्धापूर्वक चालू ठेवणें, ह्या वैराग्याच्या उत्तरोत्तर श्रेष्ठ पायऱ्या आहेत. एकएक पायरी वरती चढण्याचा जसजसा

अधिकार येतो, तसतशी निष्कामता वाढून आत्मोन्नतीचा परिपोष होतो आणि संसारताप-त्रयाचा संकोच होतो. सारांश वैराग्य हीं सांसारिक रोगावर उत्तम मात्रा आहे. या मात्रेबरोबरच भक्तिरूपी अंजन आणि ज्ञानाचा काढा मिळाल्यास संसाररोग हां हां म्हणतां नाहींसा होईल आणि तें अक्षय्य पद प्राप्त होईल कीं ज्या पदास गेलें असतां पुनः संसारविषवृक्षाची बाधा केव्हांही होणार नाहीं. दुसऱ्या, बाराव्या, व चवदाव्या अध्यायांत पुनः पुनः सांगितल्याप्रमाणें (१) मान व मोह या द्वयाचा निःशेष निरास, (२) आसक्तीनें उत्पन्न होणाऱ्या कामक्रोधादि पापकारक व पापमूलक दोषांचा अस्त, (३) अध्यात्म वस्तूचें (जी नित्यवस्तु आपल्यास अपरोक्ष, सदैव आपल्यापाशीं, आहे) 'तुझें आहे तुजपाशीं' या न्यायानें-आपल्या आत्मस्वरूपाचें,-अखंड आणि निराबाध अनुचिंतन, (४) इच्छेची पराकाष्ठेची पराङ्मुखता आणि (५) सुखदुःखांचें नामग्रहण करणाऱ्या अनंत द्वंद्वांचें समूळ व सकारण निर्मूलन, इतकी उपकरणसामुग्री हस्तगत जसजसी होत जाईल, तसतसा अद्वैतज्ञान संपादन करण्याचा अधिकार जास्त वाढून शेवटीं पूर्णज्ञान व आत्मसाक्षात्कार होईल. अज्ञानाची अत्यंत निवृत्ति झाली म्हणजे आपलें ज्ञानविज्ञानस्वरूप अथवा आत्मस्वरूप पूर्णत्वानें प्रकट होतें आणि तो देहधारी मुक्त होतो. हा पुरुष अव्यय असें जें ब्रह्मपद त्या पदाला ज्ञानविज्ञान होण्याबरोबर जातो.

**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः।...तस्मिन्दृष्टे परावरे ॥**

हा मंत्रही समानार्थकच आहे. सारांश विषयांचे सर्व प्रकारांनीं वैराग्य आणि श्रद्धा, भक्ति आणि योग यांच्या साहाय्यानें व अद्वैतश्रवणमननादिकांच्या साहाय्यानें-यांतच इतर सर्व साधनांचा अंतर्भाव होतो-ज्ञानप्राप्ति, आत्मसाक्षात्कार, होण्याला कांहीही हरकत येणार नाहीं.

येथें चवथ्या श्लोकांत 'तमेवचाद्यं पुरुषं प्रपद्ये' असा बऱ्याच पुराणप्रतींचा पाठ आहे. श्रीमद्रामानुजाचार्यांस उपलब्ध असलेला पाठ 'तमेवचाद्यं पुरुषं प्रपद्येत्' बऱ्याच दृष्टींनीं आदरणीय आहे. आचार्यांनीं 'मी त्याला शरण जातो.' असा अर्थ करून निर्वाह केला आहे. श्रीमद्रामानुजांचा पाठ घेतल्यास 'त्या पुरुषाला शरण जावें' हा अर्थ वरच्याच पंक्तींत 'परिमार्गितव्यं' (शोध करावा) असा विध्यर्थ आहे, त्याशीं समान होतो; तेव्हां येथेंही बहुधा तसल्याच अर्थी प्रयोग असावासा वाटतो. अर्थ एकच आहे. केवळ व्याकरणदृष्ट्या व पूर्वापरसंबंध पाहतां श्रीरामानुजांचा पाठ सरससा दिसतो.

**आद्य पुरुष म्हणजे पुरुषोत्तम होय.**

येथील ओष्ठ्य वर्णांची व अनुनासिक वर्णांची व अनुस्वारांची योजना लीलेनें होऊन सुंदरसा अनुप्रासनामक शब्दालंकार झाला आहे. हें गायनप्रिय आलंकारिक शास्त्र्यांस सांगावयास नको.

## ३ ब्रह्मस्थितीचें दिग्दर्शन.

'विद्वान् लोक ज्या पदाला जातात, तें पद तरी कोणतें?' हा अर्जुन प्रश्न मनांत आणून करुणाघन भगवंतांनीं ६ व्या श्लोकाचा अवतार केला, 'जेथें सूर्याच्या किरणांची गति नाहीं व अर्थातच चंद्रांच्या किरणांचा शिरकाव नाहीं, तेथें हा लोक आहे,' या विश्वरूपी विशाल व भव्य मंदिराला प्रकाशवंत करण्याला परमेश्वरी सत्तेनें अगणित सूर्यचंद्रासारखे प्रकाशवंत दीप निर्माण झाले आहेत, हें आधुनिक वाचकांस नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. आतां या अगणित सूर्य-चंद्रांच्या असंख्य किरणांचाही ज्यावर प्रकाश पडत नाहीं, तो लोक, तें ब्रह्मपद, किती तरी लांब असलें पाहिजे बरें? पण पुनः चमत्कार हा आहे कीं, तें ब्रह्मपद सर्व विश्वास अंतर्बाह्य व्यापून आहे! तर मग सूर्यचंद्राचा प्रकाश या लोकावर पडत नाहीं, याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, प्रकृतिजन्य प्रकाशानें आत्मज्ञान होतें अगर आत्मपद मिळतें असें नाहीं; तर आत्मज्ञान-ज्योतीनें व आत्मसत्तेनें प्रकृतिजन्य प्रकाशकांस प्रकाशात्मकता प्राप्त होते. अर्थात् प्रकृतिजन्य सूर्यादिकांस आत्मलोक प्रकाशित करितांच येणार नाहीं. हा ब्रह्मलोक असा आहे कीं या लोकास जो गेला तो पुनः कधीं-कधींही-परत यावयाचा नाहीं. उघडच आहे कीं, सर्व विश्वाला सत्ता देऊन पुनः त्या विश्वाचें उपादन कारण म्हणून दिसणारें व त्यास अंतर्बाह्य व्यापून पुनः स्वतः एकरसत्वानें स्थिर व अचल असणारें जें ब्रह्म त्यांतच जीवाचा ज्ञानरूपी ठेवा जाऊन मिसळला अथवा तद्रूप झाला, तादात्म्याप्रत पावला, तो पुनः उपाधींच्या राज्यांत कशाला येईल? ज्ञानविज्ञान झालेला पुरुष पुनः जन्माला येत नाहीं असें प्रत्येक प्रामाणिक उपनिषदाचें रहस्य आहे. स्मृति, पुराणें, इतिहास हाच सिद्धांत एककंठानें सांगत आहेत. भारतादि ग्रंथ हेंच म्हणतात. युक्तीनेंही तेंच ठरतें. अनंताला सांतत्व येणें केव्हांही शक्य नाहीं, असें आधुनिक, अनुभवश्रद्ध तात्विक लोकही म्हणतात. आपल्यास प्रत्यक्ष अनुभवही तसाच आहे. पहा कीं, आपलें नियमन करणारा ज्ञानस्वरूपी प्रत्यगात्मा, केव्हां तरी कामक्रोधादिकांनीं लिप्त होतो काय? तसा प्रकार असता तर आपल्याजवळ प्रतिबिंबितरूपानें नित्य सहवास करणारी चैतन्यशक्ति, विवेकशक्ति आहे, तिच्यावर, प्रत्यगात्म्यावर, आपण केव्हांही भिस्त ठेविली नसती. विवेक जागृत जर सदैव आहे, विवेक जर अविकार्य आहे, विवेकाला जर वृद्धिक्षीणता इत्यादि धर्म लागू पडत नाहींत, तर आपला आत्मा अविकृत, अजर व म्हणून अमर आहे, असें चार्वाकास सुद्धां म्हणावयास नको काय? आणि अविकृत व अमर राहणारी वस्तु अनंत व विश्वंभर पाहिजे. एवंच श्रुति, युक्ति आणि अनुभव यांची एकवाक्यता आहे. याप्रमाणें ब्रह्मपद आहे. येथें गेलेला प्राणी-प्राणी हा शब्द मोठ्या मुष्किलीनेंच घालावयाचा, कारण ब्रह्मस्थितींत प्राणीत्व नाहीं.—पुनः कधींही परत येत नाहीं. अनंताचें ज्ञान होऊन आपण अनंत झालों म्हणजे सदैव अनंत स्थितींतच राहतों; येथें, मन,

बुद्धि इत्यादिकांचा प्रवेश नाहीं. येथें पूर्ण आनंद, पूर्ण ज्ञान आणि पूर्ण वस्तुत्व असतें. 'असतें' ह्या एकवचनी क्रियापदाचा उपयोग बुद्धिपूर्वक केला आहे; कारण, पूर्ण आनंद तेंच पूर्ण ज्ञान व पूर्ण ज्ञान तेंच पूर्ण वस्तुत्व होय. हेंच परमेश्वराचें धाम आहे. हें धाम म्हणजे ब्रह्म होय. ईश्वर हा निर्गुणब्रह्माचा व्यावहारिक अवतार अथवा प्रकटस्वरूप आहे, हें मागें अनेक प्रसंगीं ध्वनित केलेंच आहे.

## शिव व जीव.

४ जीवास भासणारा आत्मा हा शिवाचा, परमेश्वराचा, एक अंश आहे व तोच वस्तुत; जीव नसतांना जीवाचें स्वरूप घेतल्यासारखा दिसतो. हा अंश सनातन आहे. त्यालाच सूत्रात्मा असें नांव आहे. आतां येथें एक वास्तविक शंका अशी निघेल कीं, परमेश्वर जर अनंत आहे, जर अनंताला अंश असणें शक्यच असेल तर तो अंशही अनंतच असला पाहिजे. या आक्षेपकाचें म्हणणें सर्वार्थी खरें आहे; म्हणजे अनंत परमेश्वराला अंश नाहींत, व अघटित घटना करून अंश निर्माण केलेच तर ते अंशही अनंतच असले पाहिजेत. पण व्यावहारिक अथवा सांसारिक पद्धतीनें पाहावयाचें झालें म्हणजे प्रत्येक जीव हा परमेश्वरी अंशच आहे, कारण त्याला चैतन्याची एकच कळा लाधलेली आहे. ख्रिस्तीधर्म असेंच म्हणतो; महंमदी धर्म हेंच सांगतो. आपण सर्वजण परमेश्वरी कला आहोंत, हें 'आपण अमर असावें, पूर्णप्रज्ञ असावें व सुखी असावें' अशी आपली इच्छाच आपल्यास स्पष्ट सांगत आहे. शिवाय आपल्या अधिकारपरत्वें आपण कोणताही विषय घेतला असतां त्याचें ज्ञान करून घेण्याचें आपल्या **ज्ञानशक्तीस** सामर्थ्य नाहीं, असें कधींही होत नाहीं. शरीर, इन्द्रियें, मन, बुद्धि इत्यादि कंटाळतील; त्यांस अगोचर असे विषय येतील; पण केव्हांही पहा, आमची ज्ञानशक्ति अखंड तारुण्यांत, अखंड जागृतींत व अखंड आनंदांत असते. ही ज्ञानशक्तिच बुद्धि इत्यादिकांस प्रकाशिते. इच्याकडे दुर्लक्ष करून जेव्हां जीव संचितानुसार उत्पन्न झालेल्या विकृत बुद्धीच्या, किंवा मनाच्या अथवा इन्द्रियांच्या अथवा शरीराच्या लगामीं लागतो, तेव्हां संसारांत जास्त जास्त अडकतो. असो; परमेश्वराचा, परमात्म्याचा एक अंश म्हणजे जीव होय. हें वाक्य व्यावहारिक आहे, पारमार्थिक नव्हे, हें तज्ज्ञांस सांगणें नलगे. जेथें जेथें म्हणून धर्मसंस्थापना झाली, तेथें ईश्वर हा पिता आणि जीव हा पुत्र असाच संबंध सांगितला आहे. गीताशास्त्रांतही 'पिताऽहं सर्व लोकस्य' असें प्रभूंनीं म्हटलें आहे. देहदृष्टीनें हें ठीकच आहे. पण विचारवंत जीवांस असें उमगेल कीं चैतन्ययुक्त जीव हा परमेश्वराचा अंशच असला पाहिजे. या अंशाबरोबर प्रकृतीचाही अंश 'जीवास' प्राप्त झाल्यामुळें, प्रकृतिपुरुषाची—त्यांच्या अंशांची, संसृष्टि झाल्यामुळें—आत्म्याला जीवत्व प्राप्त झालें. ही जीवदृष्टि झाली. आणि आत्मा व परमात्मा वस्तुतः एकच आहेत: ही दिसणारी प्रकृति मिथ्या आहे; मी व परमेश्वर एकच आहोंत;—नव्हे!—मीच परमेश्वर आहे अथवा परमेश्वरच मी आहें,

सर्व ब्रह्म आहे, अशी जी दृष्टि, हा जो अनुभव, ही परमार्थदृष्टि आहे. देहदृष्टि असेल तोंवर दासबुद्धि असते; जीवबुद्धीनें ईश्वरांशत्व स्पष्ट होतें आणि आत्मदृष्टीनें अभेद होतो. जीव व शिव यामध्यें संबंध काय ? या प्रश्नाला उलट प्रश्न असा कीं, ' विचारणारा कोण आहे ? विचारणारा द्वैतवादी असेल तर सेव्यसेवकसंबंध, श्रीमद्रामानुजपंथी असेल तर अंशांशीसंबंध आणि अद्वैतसिद्धांती असेल तर तादात्म्यसंबंध, अशीं तीन उत्तरें निघतात. **विचारणाराच्या अधिकारानुरूप उत्तरें मिळणें** हें जरासें चमत्कारिक दिसतें. पण ज्यांनीं मुलांस शिकविण्याचा फलद्रूप प्रयत्न केला आहे, ज्यांनीं ॲसिड ( Acid ) शब्दवाच्य पदार्थांचीं लक्षणें ज्ञानोत्तर काळीं कशी बदलत गेलीं हें पाहिलें आहे, ज्यांनीं ज्योतिषाचा थोडाबहुत अभ्यास अर्वाचीन पद्धतीनें केला आहे, इष्टराशिक गणीत ज्यांनीं पाहिलें आहे त्यांस वरील उत्तरानेकत्वाविषयीं आश्चर्य वाटावयास नको. ' संध्याकाळ होत आहे, असें एकच वाक्य उच्चारल्याबरोबर चोर, जार व शिष्ट पुरुषांच्या मनांत तीन प्रकारचे विचार कसे उत्पन्न झाले हें संस्कृत वाचकांस विदितच आहे. फार लांब कशाला ? ही भगवत्प्रणीत गीता घेतली तर श्लोक अगर शब्द न बदलतां अनेक भाष्याचार्यांनीं अनेक अर्थांचा निष्कर्ष केला आहे असें दिसतें ! होयना ? असाच प्रकार जीवशिव संबंधाचा होय.

## आत्मा आणि प्रकृति.

५. आत्मा आणि प्रकृति यांचें व्यावहारिक साहचर्य झालें म्हणजे आत्म्याला व्यवहारांत जीवदशा येते, हें आतांच सांगितलें. हा आत्मा संकुचित दशेला येऊन पोहोंचला, उपाधिविशिष्ट झाला, म्हणजे तो आपल्याला अनुरूप असें मन व पंचज्ञानेंद्रियें प्रकृतीपासून पैदा करितो. पूर्वजन्मकृत कर्माकर्मावरून ही अनुरूपता ठरत असते. एखाद्या पुष्पकोशावरून वारा वाहत गेला म्हणजे तो जसा आपल्याबरोबर त्या पुष्पकोशाचा गंध अथवा दुर्गंध दुसरीकडे नेतो, त्याचप्रमाणें हा जीवभूत आत्मा एक शरीराचा त्याग करून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करूं लागला म्हणजे पूर्व शरीरांत तयार झालेलीं इंद्रियें, तन्मात्रारूपानें म्हणजे अत्यंत सूक्ष्मरूपानें दुसरीकडे नेतो. एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत प्रवेश ज्याच्या साहाय्यानें आपण करितों त्या देहाला कारणदेह म्हणतात. असो; हा जीव इंद्रियांवर व मनावर स्वामित्व ठेऊन त्यांच्या द्वारा सर्व विषयांचें उपभोग घेतो. पण उपभोगानें ज्ञानशक्ति कमी होते व उपभोगेच्छा जास्त वाढते असा प्रत्यक्ष अनुभव आहे. उपभोग घेणें अगर विषयवैराग्यानें ज्ञानशक्ति वाढविणें हें प्रत्येक जीवाच्या मर्जीवर आहे. बंध अथवा मोक्ष प्रत्येक जीवाच्या हातांत प्रतिक्षणीं आहे व चांगल्या अगर वाईट मार्गानें जावयाला प्रत्येक जीवास पूर्ण स्वातंत्र्य आहे, हें येथील **ईश्वर** शब्दानें सुचविलें.

आतां ' मनःषष्ठानि ' या शब्दानें मन आणि पांच ज्ञानेंद्रियेंच घ्यावयाचीं अगर मन, चित्त, बुद्धि, स्मृति, वासना आणि अहंकार हे सहा मानसिक भेद घ्यावयाचे, अशी

मला स्वतःला शंका आहे. इंद्रियेंच केवळ घेतलीं असतां मना पुढचे जे हे पांच विकार त्यांचा पुनर्जन्माचे इतिहासांत कोठेंच निर्देश होत नाहीं. पुनः; असें सिद्ध करितां येतें कीं, जीव आपल्याबरोबर बुद्धि, चित्त, स्मृति इत्यादिकांच्या तन्मात्रा ह्मणजे सूक्ष्म अंश नेत असतो. 'बुद्धिःकर्मानुसारिणी' असें सुभाषित सर्व प्रसिद्ध आहे. पण, 'मनः-षष्ठानि' हें इन्द्रियांचें विशेषणच इष्ट आहे, नाम नाहीं; नाम असतें तर वाक्यांत कोठें तरी 'च' हे उभयान्वयी अव्यय उपयोजिलें असतें. शिवाय कोणत्याही प्रामाणिक ग्रंथांत वरील नूतन अर्थाचा ध्वनि नाहीं; हें खरें आहे, तथापि 'मन' या शब्दांतच वरील नवसूचित पंचपदार्थांचा समावेश करावयाचा नसेल तर 'षष्ठ'चा अर्थ मी सविनय सुचवीत आहे, त्याचा विचार तज्ज्ञांनीं करावा. वरील पंचपदार्थांचा संनिवेश झाला पाहिजे हें उघड दिसत आहे. तेव्हां 'मन' शब्दांत तरी यांचा समावेश व्हावा किंवा 'मनः-षष्ठानि' याचा नवीन अर्थ तरी देण्याची व्यवस्था करावी. कर्मजन्यबुद्ध्यनुसार आपला पुढील जन्म नियमित होतो हें जर खरें आहे तर बुद्धिचित्तत्यादि व्यावहारिक मनो-भेदांचा स्पष्ट अथवा उपलक्षणानें कोठें तरी उल्लेख असला पाहिजे; असें मला वाटतें. याचा विचार सूज्ञ लोक करोत.

## पुनर्जन्माची पुनः एकदां वाटाघाट.

पुढील मजकूर दुसऱ्या अध्यायांतच प्रथमतः प्रविष्ट केला होता. पण तेथें त्याचें विशेष प्रयोजन नाहीं, असें पाहून त्या पुनर्जन्मास येथें आमंत्रण देऊन आणिलें आहे.

कर्म करून फलाची अकांक्षा धरणाऱ्या प्राण्यास पुनः जन्म येतो असें हिंदुधर्माचे प्रमाणभूत असणारे ग्रंथांत म्हणजे श्रुति, स्मृति, इतिहास पुराणें वगैरे ग्रंथांत अनंत वेळां प्रतिपादन केलेलें आढळतें. फलेच्छाविरहित कर्म केलें असतां व स्वस्वरूपाची ओळख झाली असतां मुक्ति मिळते, आणि सकाम कर्म केलें तर जन्ममरणाच्या फेऱ्यांत प्राणी सांपडतो व कर्मनाश होईपर्यंत तो तसाच संसारसागरांत हेलकावे खात राहतो, असें हिंदुधर्माचें सांगणें आहे. ग्रीसमध्यें पायथॅगोरस व प्लेटोनामक महातत्त्ववेत्ते होऊन गेले त्यांचेही मत असेंच होतें. समजत नाहींत अशा कारणांनीं प्रथमतः मनुष्य जन्मास येतो आणि येथील कर्माकर्माप्रमाणें त्याला पुढें सुखदुःख मिळतें असें ख्रिस्ती लोकांचा पैगंबर ख्राइस्ट व मुसलमान लोकांचा पैगंबर महमद यांचें म्हणणें आहे. खाल्डिया, इजिप्ट, आसिरिया वगैरे अत्यंत जीर्ण व सद्यःकालीं नामशेष झालेल्या धार्मिक लोकांचें म्हणणें हिंदुलोकांसारखेंच म्हणजे कर्मनाश व स्वरूपज्ञान होईपर्यंत जन्ममरण सुटत नाहीं असेंच होतें. बुद्धाचेंही मत असेंच. सारांश या जगांत आजपर्यंत जे मोठमोठे धर्म होऊन गेले व त्यांपैकीं जे अद्यापि प्रखर अगर मंद तेजानें त्या त्या लोकांत उन्नतीचा मार्ग पात्रापात्रानुसार दाखवीत आहेत त्या सर्वांचें हें म्हणणें आहे कीं, 'या लोकीं व

एकाच जन्मांत सत्कर्माचें अगर दुष्कर्माचें पूर्ण फळ मिळणें शक्य नाहीं, म्हणून येथील देह टाकल्यावर प्राणी अन्यत्र जातो, तेथें एकंदर कर्माकर्मांचा आढावा निघून नंतर त्यास सद्गति अगर यातनामय स्थिति प्राप्त होते.' ख्रिस्ती धर्माप्रमाणें पुढील सुख-दुःख देहास न मिळतां आत्म्यास मिळतें, ह्मणून पुनर्जन्म मानणाऱ्या 'खुळ्या हिंदूस' ख्रिस्ती व मुसलमान लोक हंसतात, पण व्यावहारिक न्यायाच्या दृष्टीनें पाहिलें असतां हिंदुलोकांचीच समजूत विशेष समंजस आहे असें दिसून येईल. ॲडम नामक ईश्वराचा मानसपुत्र व प्रथम प्रजापति आपलें सर्व आयुष्य ईश्वराच्या भजनांत घालवितो काय? आणि कोठें त्याच्या बायकोची जिज्ञासावृत्ति उच्छृंखळ होऊन ईश्वराची आज्ञा एकदां मोडल्याबरोबर सर्व मानवी प्राण्यांस–नव्हे सर्व प्राणीमात्रांस अथवा स्थावरजंगमवस्तुमात्रास मृत्यूची शिक्षा होते काय? एका अपराधाबद्दल येवढी जबरदस्त शिक्षा सर्वज्ञ आणि सर्वदयाघन प्रभूच्या दरबारीं व्हावी, तसेंच अमुक प्राणी पापमग्न आहेत, असा न्यायाच्या दिवशीं त्यांच्या कपाळास लागलेला डाग ईश्वरास समजल्याबरोबर अनंतकालपर्यंत त्या त्या प्राण्यास यमयातना भोगाव्या लागाव्या, हेंही समंजस आणि तारतम्यशील मनुष्यास एकदम समजण्यासारखें नाहीं. या अभेद्य पण बुद्धिशून्य न्यायमालेपेक्षां आमची पुनर्जन्माची समजूत बरी असें माझ्यासारख्या स्थूलबुद्धि पुरुषास वाटतें. पूर्वजन्मींच्या कर्माप्रमाणें हा जन्म मिळतो व या जन्मांतील पापपुण्याच्या आढाव्यावर पुढील जन्म येतो, व पुढें केव्हां कधींकाळीं साधुसंतांची भेट झाल्यामुळे संसाराचा वीट आला, निष्कामवृत्ति झाली, गुरूच्या अनुग्रहानें ब्रह्मस्वरूपाची ओळख होऊन आपणच ब्रह्म असा साक्षात्कार झाला, म्हणजे मोक्ष मिळतो, अशी आमची खाशी व्यवस्था आहे. सुधारण्याचे मनांत आणल्यास भाविक हिंदु लोकांच्या मतें सर्व प्राणीमात्रांस याप्रमाणें ईश्वरानें सवलत दिलेली आहे. त्याचप्रमाणें एकास चांगली स्थिति, दुसऱ्यास वाईट स्थिति असा पक्षपाती व्यवहार दिसतो त्यासही उत्तर द्यावयास सांपडतें कीं, ज्याच्या त्याच्या कर्मानुसार प्रत्येकास सुख किंवा दुःख मिळतें. तेव्हां ख्रिस्ती किंवा इतर धर्मियांनीं केवळ हंसण्यासारखा आमचा वेडसर धर्मपंथ नाहीं, निदान पुनर्जन्माचा विषय तरी नाहीं, असें वाटतें. सर्वमान्य भगवद्गीतेमध्येंही पुनर्जन्माच्या सत्यतेविषयीं अनेक वेळ उल्लेख आला आहे व आमच्या लोकांचीही समजूत याच प्रकारची आहे. ज्याचें कर्म तो भोगतो व असें नसतें तर जगांत फार अनर्थ झाले असते असें आमच्यांतील श्रेष्ठ पुरुषांचें ह्मणणें आहे व तें ह्मणणें सर्वांशीं खरें आहे.

हा एकादृष्टीनें म्हणजे भाविकधर्मदृष्टीनें विचार झाला. आधुनिक शास्त्रीयदृष्टीनें विचार करावयाचा म्हटला म्हणजे विशिष्ट व्यक्तीस पुनर्जन्म येतो किंवा कसें हें पाहिलें पाहिजे. पूर्वजन्माचें स्मरण जाग्रदवस्थेमध्यें राहतें तर पुनर्जन्माचा उलगडा करण्यास धर्माची अगर शास्त्राची अपेक्षाच राहिली नसती. पण आपल्या सर्वांच्याच दुर्दैवानें अगर सुदैवानें तशी स्थिति नाहीं ह्मणून धर्मवचनांवर व अनुमानादिप्रमाणांवर

आपल्यास अवलंबावे लागत आहे. असो; अनुभवजन्य सिद्धांत सांगणाऱ्या शास्त्रांचें असें एक प्रमेय आहे की जें जें म्हणून कार्य आहे, तें घडवून आणण्यास या विश्वसृष्टीतील प्रत्येक गोष्ट कारणीभूत होत असते. दुसरें एक प्रमेय असें आहे की प्रत्येक प्राणी जन्म पावतो, तो आपल्या पितरांच्या, कुलाच्या, जातीच्या, देशाच्या व मानवी प्राण्यांच्या शारीरिक व मानसिक गुणधर्मानुसार अवतीर्ण होत असतो. मुलाच्या रंगरूपावरून व आवाजावरून जर सामान्यतः त्याचे आईबाप व जाती ही ओळखितां येतात; मनुष्याच्या पापपुण्यान्वयें एकवीस मागील व एकवीस पुढील पिढयांस दुःखसुख भोगावें लागतें अशी जर समजूत आहे; व्यवहारांत व लग्नविधीचे वेळीं जर आपण हिंदुलोक आईबापांच्या कुलशीलावरूनच वधुवरांचे गुणधर्म सामान्यतः ठरवितो व ' जाती तशी पोती ' असें म्हणतो; आधुनिक प्रसिद्ध महाडकर ज्योतिषी हे मुलाच्या चेहऱ्यावरून बापाची व बापाच्या चेहऱ्यावरून मुलाची, जन्मपत्रिका बहुतकरून बिनचूक तयार करीत असत; व्यक्तीवरून देशांतील लोकांच्या गुणधर्मांचें व देशावरून व्यक्तींच्या गुणधर्मांचें संकीर्तन जर आपण पुष्कळ वेळां करितों; विद्येनें, विचारानें, संगतीनें, उपदेशानें व प्रपंचांतील अनेकविध प्रसंगांनीं मनुष्याची दानत सुसंस्कृत अगर अपकृत होतें असें जर प्रत्यहीं आपण पाहतों; तर आपल्यास असें म्हणावयास नको काय की मनुष्य जे जे कर्म करितो अगर जे जे फल इहलोकीं त्यास प्राप्त होतें, तें तें सर्व येथील देशकालवर्तमानादि उपाधीच्या नियमानुसार प्राप्त होतें व तसें प्राप्त झालेंही पाहिजे. त्याचप्रमाणें आईबाप शरीर देतात हे प्रत्यक्ष अनुभवावरून जर आपल्यास स्पष्ट दिसतें, तर आईबापच मानसिक वृत्ति देत नाहीत हें सिद्ध करण्यास हल्ली आहे त्यापेक्षां अनेकपट सबळ पुरावा प्रस्तुतच्या चौकसकाळांत असला पाहिजे. आतां मातापितरें सशक्त असलीं व मुलाची जोपासना त्यांनीं यथाशास्त्र केली म्हणजे मुले सशक्त होतात हा जसा अनुभव आहे, तसा ' आईबाप बुद्धिमंत व नीतिवंत असले तर मुले तशीच निपजतात असा अनुभव नेहमींचा नाहीं,' असें कोणी म्हणेल त्या अक्षेपास आज मी इतकेंच म्हणतों कीं अमृततुल्य अन्न आपल्या सामर्थ्यापेक्षां जास्त खाल्लें तर ते जसें विषसम होतें, तद्वतच शरीराची काळजी न करितां आईबापांनीं विचाराचे श्रम अत्यंत केले तर मुलेही शरीरानें व मनानें अशक्त होण्याचा संभव आहे; अथवा शारीरिक व मानसिक श्रमांचें व उपभोगाचें असें अद्यापि एक प्रमाण ठरलें नाहीं कीं, ज्यांच्या योगानें शारीरिक श्रमाचा व उपभोगांचा मनावर व मानसिक श्रमांचा व उपभोगांचा शरीरावर उत्तम परिणाम होऊन पूर्वपिढीपेक्षां पुढची पिढी जास्त शक्तिवंत आणि जास्त विचारवंत निघेल; इतकेंच काय ते स्पेन्सरसाहेबांचे म्हणण्याप्रमाणें मला आज म्हणतां येतें. तथापि उलट पक्ष खरा धरूनही म्हणजे आईबाप बुद्धिवंत असतील तर मुलें मंद व आईबाप मंद बुद्धीची असतील तर मुले चलाख निघतात, असा नियम खरा धरूनही हेंच सिद्ध होतें कीं, आईबापांच्या कर्माप्रमाणें मुलें निपजतात, असा जर आजचा अनुभव आहे तर प्राण्यास पूर्वजन्म असतो व त्यामध्यें केलेल्या कर्मानुसार त्यांचे कर्म असतें व त्याला सुखदुःख मिळतें, असा पुरावा नसतां आग्रह कां धरावा ? असा प्रश्न उत्पन्न होतो.

पूर्वजन्माच्या कर्माप्रमाणें ह्या जन्मांतील उपाधि असतात असे धार्मिक लोकांचें म्हणणें आहे व येथील परिस्थितीच्या धोरणाने मनुष्य कर्म करितो व त्या मानानें त्यास सुख-दुःख मिळते असे आधुनिक उत्क्रांतिशास्त्राचें म्हणणे आहे. पूर्वमताप्रमाणे व्यक्तीचें सुखदुःख व्यक्तीच्या पूर्वकर्माप्रमाणें उत्पन्न होते असे आहे व हल्लीचे मत व्यक्तीचें सुख-दुःख व्यक्तीच्या येथील कर्मावर, जातीच्या कर्मावर आणि अधिभौतिक स्थितीवर अव-लंबून असते असे आहे. पूर्वींच्या व हल्लींच्या मतात आत्मा सारखाच कायम आहे पण तो विकारशून्य आहे ह्मणून त्याचा विचार उभयपक्षींही करणे अवश्य नाहीं. तेव्हां पूर्वपक्षाप्रमाणे राहतांपैकीं वासनामय देह हा कायम असतो व तो वासनानुसार व कर्मा-नुसार जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडतो असे सिद्ध होते. त्यातही हल्लीचे थिआसोफिस्ट हे आपल्या महात्म्याच्या आज्ञेवरून असे ह्मणतात कीं, वासनामय देह हा अगर लिंगदेह हा देहपात झाल्यावर थोड्या दिवसाच्या आतच नष्ट होतो व कारणदेह अगर जीवांचे संचित मात्र कायम राहून कर्मोपभोग घेण्यासाठी प्राण्यास पुनः देहप्राप्ति होते! आधुनिक पक्षाचे असे ह्मणणे आहे कां, कांहीएक विशिष्ट प्रकारची रासायनिक क्रिया झाली, ( हिलाच ते चैतन्यविशिष्ट रासायनिक क्रिया ह्मणतात. ) ह्मणजे पूर्वपिढीच्या इहलोकांतील शारीरिक व मानसिक कर्मानुसार जीव उत्पन्न होतो. सारांश, ह्या लोकाच्या ह्मणण्याप्रमाणें बाप आणि पूर्वपिढी हा मुलाचा पूर्वजन्म आणि त्या मुलांची मुलें व पुढील पिढी हा त्याचा पुढील जन्म होय, अशी ही परंपरा आहे. यांतील खरा पक्ष कोणता व खोटा कोणता ह्याचें तारतम्य पाहण्याचें हे स्थळ नव्हे, निदान सद्यःकाली तसें कर-ण्यास माझी तरी तयारी नाही. मात्र इतकें सांगून ठेवणे येथे अवश्य दिसतें कीं, आधु-निक पक्षाच्या समर्थनार्थ उपनिषदांतील अनेक वचनें अवतीर्ण करितां येतील. त्यांपैकीं कांहींचा मात्र येथे उल्लेख करितो.

ऐतरेयोपनिषदामध्ये तीन जन्म सांगितले आहेत ते येणेप्रमाणे:—

"पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति। यदेतद्रेतस्तदेतत्सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजः संभू-तमात्मन्येवाऽऽत्मानं बिभर्ति तद्यदा स्त्रियां सिञ्चत्यथैनज्जनयति तदस्य प्रथमं जन्म॥ तत्स्त्रिया आत्मभूयं गच्छति यथा स्वमङ्गं तथा, तस्मादेनां न हिनस्ति साऽस्यैतमात्मान-मत्र गतं भावयति ॥ सा भावयित्री भावयितव्या भवति तं स्त्री गर्भं बिभर्ति सोऽग्र एव कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयति स यत्कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयत्यात्मानमेव तद्भावयत्येषां लोकानां संतत्या एवं सन्तता हीमे लोकास्तदस्य द्वितीयं जन्म ॥ सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयते अथास्यायमितर आत्मा कृतकृत्यो वयोगतः प्रैति स इतः प्रयन्नेव पुनर्जा-यते तदस्य तृतीयं जन्म" ( ऐ० आ० २ अ० ५ ख० १ )

ह्या उतारा प्रस्तुत प्रकरणास फार उपयोगी आहे. व या उताऱ्यांतही पुनर्जन्माचा निर्देश आहे; तथापि आपला मुलगा ह्मणजे आपलेच दुसरें जन्म असा जो तिसऱ्या मंत्रांत

अर्थ आणिला आहे तोच विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. आचार्यही भाष्य लिहि-तांना म्हणतातः 'कोणत्या कारणासाठीं आपणच आपल्याला पुत्ररूपानें उत्पन्न करून घेऊन त्याचें संगोपन करितो? ह्याचें उत्तर असें कीं, ह्या पुत्रपौत्रादि लोकांचा उच्छेद होऊं नये म्हणून?' यावरून उपनिषत्काराचें ह्मणणें कोणत्या धोरणाचें आहे हें स्पष्ट दिसतें. **'आत्मा वै पुत्रनामासि'** हें वाक्य तर सुप्रसिद्धच आहे.

यापेक्षांही स्पष्ट अभिप्राय कौषीतकी उपनिषदांत आहे.—बाप मुलाला ह्मणतो

**अङ्गादङ्गात्संभवसि हृदयादधि जायसे। आत्मा वै पुत्रनामासि॥**

माझ्या प्रत्येक अंगापासून तुझा संभव होत आहे, तुझी उत्पत्ति होत आहे. माझ्या हृदयापासूनच किंवा माझ्या सूक्ष्मदेहापासूनच तुझी उत्पत्ति पूर्ण होत आहे. पुत्रा! यापुढे तूं माझें संरक्षण करणारा हो. नंतर पित्याचें शरीर पुत्राच्या वाचेमध्यें डोळे, कान, मन यामध्यें शिरतें झालें असें सांगून पितापुत्राच्या संवादाचें अव-तरण करितात.

**वाचं मे त्वयि दधानीति पिता। वाचं ते मयि दध इति पुत्रः।**

पिता—हे मुला, माझी वाणी मी तुझ्यामध्यें ठेवितों.

पुत्र—तुझी वाणी मी ग्रहण करितों.

अशाच प्रकारचें प्राण, चक्षु, श्रोत्र, अन्नरस, **कर्मे सुखदुःखें आनंद,** रति उत्पादन शक्ति, चलनवलनशक्ति धीशक्ति (बुद्धि, अंतःकरणवृत्ति) प्रज्ञा, मन, ज्ञान-विषय आणि इच्छाविषय ह्या सर्वांचा न्यास व न्यासग्रहणविधि सांगितला आहे. तो इतका स्पष्ट आहे व आधुनिकशास्त्रांसही प्रमाणभूत होणारा आहे कीं, हा भाग प्रत्येक समं-जस आणि पूर्वजाभिमानी पुरुषानें निष्पापबुद्धीनें वाचावा असें सांगितल्यावांचून मला राहवत नाहीं. या प्रकरणाला संप्रत्तिप्रकरण (संप्रदानप्रकरण) असें म्हटलें आहे!

आतां बृहदारण्यक उपनिषद पहाः—

पुत्राला विद्यासंपन्न करून व त्यास संसार रथाचा धुरंधर करून स्वतः मरणास तयार झालेला मनुष्य.

**"अस्माल्लोकात्प्रैत्यथैभिरेव प्राणैः सह पुत्रमाविशिति"**

'मनुष्य ह्या लोकास सोडून जातो, मरतो, तेव्हां ह्याच आपल्या प्राणासह (आचार्य म्हणतात; आपली वाणी, मन व प्राण यांच्यासह) तो पुत्र शरीरांत प्रवेश करितो, त्यास व्यापून टाकितो! आचार्य या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ एक प्रमाणवाक्य घेऊन म्हणतातः—ज्या पित्याला असा सुविद्यासुसंस्कृत पुत्र आहे तो पिता ह्या लोकामध्यें, पृथ्वीवर, पुत्ररूपानें राहतो, मरत नाहीं असेंच मानावें.' वर ऐतरेय उप-

निषदांतील अवतरण घेतलें आहे त्यांतही 'तो त्याचा दुसरा आत्मा पुण्यकर्मासाठीं ह्या लोकामध्यें प्रतिनिधिरूपानें, पुत्ररूपानें येथें राहतो. पुत्राचें लक्षणच आचार्य सांगतात कीं, वडिलांचें जें उणें असेल तें भरून काढून जो त्याचें संरक्षण करितो तोच खरा पुत्र होय. पुत्रत्वाची खरी कर्तव्यसीमा हीच होय.' आणखी पहाः—

"**स पुत्रैणैवास्मिल्लोके प्रतितिष्ठति**" (*तो पुत्राच्या योगानेंच ह्या मनुष्य-लोकांस जिंकितो, वश करितो, असा आचार्योंनीं अर्थ केला आहे. असो; 'तो ह्या कर्म-भूमींत पुत्ररूपानें राहतो.' असा अर्थ होईल काय?*)

आणखीही पुष्कळ उतारे देतां येतील, पण विस्तारभयास्तव इतकेच देतों.

ह्या वरील श्रुतिवाक्यांवरून असें दिसत नाहीं काय कीं अत्यंत प्राचीनकाळीं आमच्या पूर्वजांस आधुनिक उत्क्रांतितत्त्वांचा सुगावा लागला होता! सृष्टींतील लाखो वस्तूंचें एका दिशेनें परीक्षण केल्यानंतर उत्क्रांतितत्त्वाची कल्पना निघून तिनें विचारी पुरुषांचीं अंतःकरणें आकर्षित केलीं व सहज उलगडा न करितां येण्यासारख्या ज्या अनंत गोष्टी आहेत, त्यांपैकीं पुष्कळांच्या स्वरूपाचें उद्घाटन ह्याच कल्पनेनें उत्तम प्रकारचें केलें ही आनंदजनक सुवार्ता होय व ह्याबद्दल डार्विन, हक्सले, स्पेन्सर वगैरे आधुनिक महर्षींचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे; पण जगाचा अनुभव ज्या वेळीं बाल्यावस्थेंत होता, आज स्पष्ट झालेल्या गोष्टी ज्या वेळीं अत्यंत मुग्धावस्थेंत होत्या, आजचीं उपकरणें ज्यावेळीं अस्तित्त्वांत नव्हतीं, सामान्य पोरासोरांस जें आज समजतें, त्याची कल्पना सुद्धां ज्यावेळीं करितां येण्यासारखी नव्हती, अशा मानवी जातीच्या बाल्यावस्थेंतही ज्यांनीं आपल्या अद्वितीय आणि म्हणूनच प्रासादिक बुद्धि-प्रभावानें, आजही कौतुक उत्पन्न करणारें, उत्क्रांतितत्त्व शोधून पुढील पिढीच्या हितासाठीं प्रकटही केलें, त्या उपनिषत्कारांस जर कोणी प्रेमभरानें अवतारी पुरुष म्हटलें तर त्याला कां हंसावें! *अवतारी पुरुषांचीच त्यांची खरी योग्यता होय!*

*असो; तेव्हां आधुनिक मतास उपनिषदांचा आधार आहे. व्यवहारांत या आधु-निकतत्त्वानें 'अनर्थ उत्पन्न होतील; पुढें जन्म नाहीं, आपण मेल्याबरोबर संसारयात्रा संपते; असें तत्त्व प्रकट झाल्यास लोक दुराचारी होतील,'* अशी कांहीं पापभीरु सद्गृह-स्थांस शंका येते, नव्हे-भीतीही वाटते. पण या मत्त्वस्थ संतांनीं मानवी वृत्तींचें परीक्षण यथार्थ केलें नाहीं असें मला कष्टानें म्हणावें लागत आहे. माझ्या सत्कर्मानें बायकामुलांचें कल्याण होईल व माझ्या दुष्कर्मानें त्यांचा संसार बिघडेल, वंशाची उन्नति करणें अगर अवनति करणें ह्या गोष्टी येथील दृश्यजगांत माझ्या कर्मावर पुष्कळच अवलंबून आहेत, अशी मानवी मनाची समजूत व खातरजमा झाली तर मनुष्याची स्वार्थपरायणताच सदैव उच्छृंखल होत राहील असें निदान मला तरी वाटत नाहीं. पापकर्म केलें असतां

आपल्यास यमयातना भोगाव्या लागतील असें धार्मिक बुद्धीनें समजत असतें तरी बायकांमुलांसाठीं खोटें बोलणारे व चोऱ्या करणारे अनेक लोक सांपडणार नाहींत काय ? पण माझ्या प्रत्येक कृत्याचा परिणाम मुलांवर व इतरांवर होत आहे व त्याचें फळ इहलोकीं मला व त्यांस भोगावें लागेल असें स्पष्टपणें समजलें असतां अनेक लोक पापापासून परावृत्त होतील असें मला वाटतें. आपल्या कृत्याबद्दलचा विचार आपल्यास प्रतिक्षणीं सुखदुःख देतोच, पण अंतकालचा समय येऊन ठेपला असतां व आपण आतां निःशेष नाहींसे होणार असें समजलें असतां—म्हणजे अशा दारुण प्रसंगीं –मनुष्य जेव्हां आपल्या कृत्यांचा झाडा आपल्या मनास देत असेल, जेव्हां प्रत्येक क्षण युगाप्रमाणें भासून आपल्या आयुष्याचें चित्र जसेंच्या तसें आपल्या समोर प्रत्यक्ष येऊन उभें रहात असेल; तेव्हांचें होणारें समाधान किंवा होणारी तळमळ अगर झालेला पश्चात्ताप हीं सर्व पापपुण्याच्या अढाव्याप्रमाणें अनंतकाळांत होणाऱ्या यमयातना किंवा अनंतकाळ होणारें स्वर्गसुख एका क्षणांत कशावरून एकवट होत नसेल ? या मरणासन्न प्राण्यास युगाप्रमाणें भासणाऱ्या क्षणिक कालांत होणारें सुखदुःखच स्वर्गनरकादिवासा-प्रमाणें आहे असें आमच्या पूर्वजांचें मत कशावरून नसेल ?

असो: हे दोन्ही पक्ष सुज्ञ समंजस वाचकांपुढें निष्पापबुद्धीनें मांडिले आहेत. उपनिषदांचे मंत्रद्रष्टे पुनर्जन्मावर विश्वास ठेवित होते यांतही शंका नाहीं. तथापि सभोंवार असणाऱ्या विश्वासचक्राचा भेद करून अनुभूत गोष्टींचा उलगडा स्वाभाविक रीतीनें करण्यासाठीं अनुमानाच्या निरामय आकाशांत जेव्हां ते सयुक्तिक कल्पनाशक्तीनें भराऱ्या मारूं लागले, तेव्हां त्या वरदी व असामान्य ऋषींच्या अलौकिक आणि प्रासादिक कल्पनासामर्थ्याला हे विचार सुचलेले आहेत व त्या विचारांस सार्थ करण्याचें श्रेय एकोणिसाव्या शतकांत साता समुद्राच्या पलीकडे राहणाऱ्या तत्त्ववेत्त्यांनी घेतलें आहे. विधात्याची अघटितघटना ती हीच होय. याप्रमाणें प्रस्ताव करून प्रस्तुत विषयाचा दुसरा भाग उल्लेखितों.

श्रीमद्भगवद्गीतेच्या या पुस्तकाच्या वाचकांस स्मरण असेलच कीं, अध्याय २ श्लोक २२ ची मीमांसा करीत असतां 'पुनर्जन्माची वाटाघाट' या सदराखालीं प्रस्तुत विषयासंबंधें मला जीं काय प्रमाणें त्यावेळीं उपलब्ध झालीं, त्या सर्वांचें दिग्दर्शन पृ० ३८४ ते पृ० ३८८ पर्यंतच्या पृष्ठांमध्यें केलें आहे. या मीमांसेचें काळजीपूर्वक अवलोकन ज्यांनी केलें असेल, त्यांस त्यावेळीं निदान इतकें तरी कळून चुकलें असेल कीं, 'पुनर्जन्माचा' प्रश्न जितका सोपा आहे, असें वाटते, तितका तो सुलभ नसून सर्व साधक बाधक प्रमाणांचा ज्ञानपूर्वक व काळजीपुरःसर ऊहापोह केल्यावांचून कोणत्याही–विचारी–पुरुषास ह्या प्रकरणीं निश्चित असा अभिप्राय देतां येणार नाहीं. पूर्वकालीन प्रेरित अथवा प्रासादिक सिद्धांतांचा व आधुनिक अनुभवजन्य सिद्धांतांचा मेळ बसतो कीं नाहीं, त्यांची एक-

वाक्यता होण्याचा संभव आहे की नाहीं, हें पहावें आणि तीन वर्षांपूर्वी माझा उत्क्रांतितत्त्वाकडे जो विशेष ओढा होता, त्याचा अतिरिक्त संस्कार नाहींसा होण्यास जीं बलवत्तर कारणें झालीं, तीं बरोबर आहेत की नाहात, यांचीही सामाजिक न्यायासनासमोर पुनः चौकशी करावी, असा हेतु मनांत धरून या अध्यायास विशेषतः प्रस्तुत असणाऱ्या विषयाकडे वळतों.

२ उत्क्रांतितत्त्वाला अनुसरून जीं प्रमाणें त्यावेळीं मला सुचलीं होतीं, त्यांचा थोडक्यांत हा सारांश आहे: ( १ ) ह्या लोकीं होणारें प्रत्येक कार्य येथील कारणापासून उत्पन्न होतें. ( २ ) प्रत्येक प्राण्याचे गुणधर्म त्याच्या परिस्थितीला अनुसरून असतात. ( ३ ) पुनर्जन्मास अनुकूल असा अनुभवजन्य पुरावा नाहीं. ( ४ ) बाप आणि पूर्वपिढी हा प्राण्याचा पूर्वजन्म व मुलगा आणि पुढील वंशज हा त्याचा उत्तरजन्म, होय. ( ५ ) सनातन हिंदुधर्माप्रमाणें वागणाऱ्या हिंदूंच्या टोळक्यांत ' पुनर्जन्म नाहीं ' हें वेड शिरल्यास अनर्थ होण्याचा संभव आहे, असें कांहीं पापभीरु लोक म्हणतात, तें म्हणणें निराधार आहे. हे ते पांच मुद्दे होत. ह्या मुद्यांवर आधुनिक उत्क्रांतितत्त्वाच्या पुरस्कर्त्या स्पेन्सर, हक्सले, इत्यादि महातपस्वी व महाकुशल बुद्धिवंत पंडितांचे अभिप्रायास अनुसरून बरेंच ' भवति न भवति ' मीं केलें व ख्रिस्ती शकाच्या एकोणिसाव्या शतकाच्या आमदानींत धुरंधरत्वानें प्रकट झालेल्या उत्क्रांतिवादाला आमच्या येथील पुराण, सनातन, प्रामाणिक व ईश्वरप्रणीत उपनिषदांचा पाठपुरावा मिळत आहे, हें अभिमानास्पद ' शुभ वर्तमान ' हीं त्या वेळीं प्रकट केलें. असो; ' पुनर्जन्म नाहीं ' असें म्हणणारा पक्ष खरा नसावा, खरा असणें असंभवनीय आहे, खरा नसलाच पाहिजे, खरा नाहीं, अशी माझी खातरी झाली आहे व ही खातरी होण्याला भगवत्प्रणीत ग्रंथच कारण झाले आहेत, असें प्रांजलपणें कबूल करून मी ठरविलेल्या मार्गक्रमणाला लागतों.

( १ ) ह्या लोकीं जीं जीं म्हणून कार्यें होतात, तीं सर्व ह्या लोकांतच विद्यमान असणाऱ्या कारणांपासून उत्पन्न होतात, हें तत्त्व जसें आधुनिक काळीं मान्यता पावलें आहे, तसेंच तें पुराणकालीं ही सन्मान्यच होतें. योग्य कारणाशिवाय कार्यनिष्पत्ति होत नाहीं, हा सिद्धांत आजमितीस जितका प्रबल झाला आहे, तितका किंबहुना, त्यापेक्षां जास्त जोरानें वरील सिद्धांत प्राचीन संतांमध्यें प्रकट झाला होता. असो: प्राण्याचा जन्म, त्याचे अंतर्बाह्य गुणधर्म व त्याची परिस्थिति, त्याची परिसमाप्ति, या सर्व गोष्टी पूर्व कर्मानें म्हणजे पूर्वपिढीतील लोकांच्या सुक्तासुक्त कर्मानें ठरतात, हें म्हणणें उभयपक्षांसही मान्य आहे. प्रश्न इतकाच आहे की, ' अमुक प्राण्याला विशेष स्थिति प्राप्त होते, की काय? ' ह्या प्रश्नाला आधुनिक लोकांजवळ उत्तर नाहीं. ' सर्व विश्वामध्यें चैतन्य हें गूढत्वानें अथवा प्रकट स्थितीनें ओतप्रोत भरलेलें आहे. आणि यदृच्छेनें आधिभौतिक तत्त्वांचें संमेलन होऊन जीवदशा प्राप्त होते व परिस्थित्यनुसार त्या यदृच्छाजनित जीवाला

सुखदुःखाची आवाप्ति होते ' असें **हक्सले साहेब**, आधुनिक उत्क्रांति तत्वाचें महा-धुरंधर पुरस्कर्ते व महाभाष्यकार ह्मणत असत. पण हें **म्हणणें** काय उपयोगी? भूतार्थाचा, असणाऱ्या स्थितीचा व परिस्थितीचा निर्णय चालला असतां, तेथें यदृच्छा, आकस्मिक संयोग, किंवा अघटित घटना, इत्यादि काल्पनिक पुराव्याचा उपयोग व्हाव-याचा नाहीं. यदृच्छा ही प्रस्तुत प्रकरणीं अप्रस्तुतच होय. ' कसा तरी जीव उत्पन्न होऊन त्याला परिस्थित्यनुरूप सुखदुःख भोगावें लागतें' हें ह्मणणें आस्तिक तत्वज्ञानाला शोभत नाहीं. पण हक्सले, स्पेन्सर इत्यादि विद्वन्मंडळ मुळींच नास्तिकवादी, निदान स्याद्वादी; तेव्हां त्यांस हें बोलणें कदाचित शोभेल. पण ईश्वरावर व त्याच्या निःपक्षपाती दयालुत्वास निश्चित बुद्धीनें विश्वास ठेवणाऱ्या आमच्या-सारख्या लोकांस ' यदृच्छेचा ' कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. पुनः या जगाच्या व्यवस्थेमध्यें सर्वत्र जर सुसंगतपणा दिसतो, कोठेंही यत्किंचित्, पाव रतीइतका, देखील जर दोषांचा अंश दिसत नाहीं, जीवाची उन्नतावस्था करण्याकडे जर प्रत्येक महाभूताची प्रवृत्ति आहे; तर असली ही निर्दोष, निर्मळ व उन्नतकारी व्यवस्था अचेतन महाभूतीं-करवीं किंवा आकस्मिक यदृच्छेनें झाली नाहीं, हें खास आहे. सारांश ईश्वरप्रणीत ही व्यवस्था असली पाहिजे. तेव्हां प्राण्यास जी विशिष्ट शारीरिक व मानसिक अवस्था प्राप्त होते, ती सकारण असून ती ईशसाक्षित्वानें होत असली पाहिजे. येथें एकाच जातींतील-उदाहरणार्थ-मनुष्य जातींतील-कांहीं जीव स्वभावतः-जन्मतांच-हुषार, कुशाग्रबुद्धीचे, पापभीरू, सशक्त आणि धैर्यवंत असतात; आणि बाकीचे पुष्कळ वरील जीवांच्या उलट स्वभावाचे असतात. असें कां होतें? उत्क्रांतिवादी नास्तिक ह्मणेल कीं, आईबापांच्या शारीरिक, मानसिक, सांपत्तिक व नैतिक स्थित्यनुरूप मुलांचे स्वभाव घडतात. पण हें ह्मणणें अनुभवाला जुळत नाहीं. उत्तम सुबुद्ध आईबापांचीं मुलें अगदीं सामान्य होतात. इतकेंच नव्हे, तर सुबुद्ध, सदाचरणी आणि पापभीरू मातापितरांच्या उदरीं अप्रबुद्ध, दुराचरणी आणि पापलोलुप पुत्र जन्मास येतांना कोणीं पाहिलें नाहींत? शिवाजी महाराजांच्या पोटीं संभाजी व्हावा? अकब-राला सेलिम पुत्र असावा? फार लांब कशाला, गेल्या पिढींत अथवा त्यांच्या मागच्या पिढींत जे मोठेमोठे महाराष्ट्रनायक होऊन गेले त्यांच्या पुत्रपौत्रांची जर आपण चौकशी केली, तर आपल्या नजरेस काय पडेल बरें? असेंच नाहीं कां पडणार, कीं जेथें बाप अतिशय हुशार आहे, तेथें सामान्यतः मुलगा सामान्यच आहे. पुनः; साक्रेटिस, सीझर, ख्राइस्ट, न्यूटन, स्पेन्सर व आमच्या इकडील बुद्ध, शंकराचार्य, तुकाराम, बाळाजी विश्व-नाथ, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादिकांच्या वडिलांमध्यें असे काय उत्तम गुण होते कीं, ज्यांच्यायोगें उत्क्रांतितत्वानुसार हीं श्रेष्ठ मानवरत्नें त्यांच्याच उदरीं जन्मास यावीं? सारांश आईबापांच्या चांगलेवाईटपणावरच मुलांचे चांगलें वाईटपण अवलंबून आहे असा नियम निघत नाहीं. फार तर काय सांगावें? पण एका आईबापांचे पोटीं उत्पन्न झालेले पुत्र सुद्धां निरनिराळ्या स्वभावाचे, निरनिराळ्या शीलाचे व निरनिराळ्या कर्तृ-

त्याचे निपजतात. पहिले बाजीरावास बाळाजी उर्फ नानासाहेब, व रघुनाथराव उर्फ दादासाहेब असे पुत्र झाले. एकानें अष्टपैलूपणाच्या राजकीय मुत्सद्देगिरीनें मराठी साम्राज्याचा अतोनात उद्धार केला व दुसऱ्यानें तेंच राज्य हातांतील हिरकणीच्या खड्या-येवढें संपुष्टांत आणून ठेवण्याची सामग्री तयार केली! जुळीं मुलें सुद्धां एकास्वभावाचीं व एका शीलाचीं नसतात. तात्पर्य असें कीं, आईबाप शरीर देणारे, शारीरिक गुण देणारे हें खरें; पण मानसिक संपत्तीचा बराच भाग लुप्तरूपानें कोठून येतो? यदृच्छा ईश्वरी राज्यांत नाहीं. तसेंच एकास चांगली सामग्री देणें व त्याच योग्यतेच्या दुसऱ्यास वाईट सामग्री देणें हें ईश्वराच्या निःपक्षपाती सत्तेमध्यें संभवत नाहीं. तर मग श्रुति, स्मृति, पुराणें, सांख्य, बुद्ध, अद्वैतवादी, ख्राइस्ट, इत्यादि अधिकारसंपन्न लोक स्वानुभवानें जें सांगतात तेंच आपल्यास खरें मानिलें पाहिजे. म्हणजे प्रत्येक प्राण्यास पूर्वजन्म असतो, असें जे लोक सांगतात, त्यांचें म्हणणें आपल्यास मान्य केलें पाहिजे. इच्छेपासून कर्म, कर्मापासूनच कर्मफळ, फळापासून इच्छा हें जसें आवर्त दशांशी व्यवहाराचें चक्र चालतें, पाण्याची वाफ होणें व वाफ ही पुनः ढगांत जाऊन ती पावसाच्या रूपानें पाणी होऊन प्रकट होणें, हा जसा प्रकार चालतो, इच्छेपासून कर्म, कर्मापासून उष्णता, गति, विद्युत्, ध्वनि, चुंबकता इत्यादि सामर्थ्यें उत्पन्न होऊन पुनः हीं सामर्थ्यें इच्छेच्या रूपानें प्रकट होतात, हें जसें पुनरावर्तन चालतें, वृक्षापासून बीज, बीजापासून वृक्ष हें जसें रहाट-गाडगें चालतें, त्याचप्रमाणें पुनर्जन्माचें रहाटगाडगें चाललेलें आहे. हा जन्ममरणाचा रहाट केव्हां फिरावयास लागला, याचें उत्तर व्यावहारिक व मनुष्यकृत शास्त्रानें कधींही देतां येणार नाहीं. हा प्रकार अनादि आहे. हा प्रकार अनंतकाल असणारा आहे. असो; सध्यां एवढी गोष्ट ध्यानांत ठेवावयाची आहे कीं, या लोकीं विद्यमान असणाऱ्या कारणांपासूनच या लोकीं कार्यपरिणति होते; पण बापानें केलेलीं कृत्यें मुलाच्या स्वभावाला कारण होतात असें, जे उत्क्रांतितत्त्ववादी म्हणतात, तें मात्र सर्वथा सगळें उत्तर नाहीं. आईबाप आपल्या मुलास कांहीं जिनगानी देतात, हें खरें; पण तेवढ्यानेंच भागत नाहीं. त्या मुलाच्या अंगांत बापानीं दिलेल्या गुणाव-गुणापेक्षां आणखी कांहीं गोष्टी जन्मतःच येत असतात. त्या गोष्टी त्या मुलानें आपल्या पूर्वजन्मकृत सुकृतदुष्कृतानें उत्पन्न करून आपल्याबरोबर आणिलेल्या असतात. सारांश, पुनर्जन्म आहे, असा निश्चय झाला म्हणजे मात्र सर्व गोष्टींचा उलगडा होतो; इतर वादानें होत नाहीं. पूर्वजन्मकृत पापपुण्यें हीं या लोकींचींच असतात; तेव्हां लौकिक कारणांपासून लौकिक कार्यें झालीं पाहिजेत, हा सिद्धांत अबाधित राहून पुनः पुनर्जन्माची सत्यता आपल्या प्रतीतीस येते. युक्तिवादानें व श्रुतिसाहाय्यानें पुनर्जन्म पक्षच खरा आहे, हें मी आतांच सिद्ध करणार आहे.

(२) 'प्रत्येक प्राण्याचे गुणधर्म त्याच्या परिस्थितीस अनुरूप असतात' हा सिद्धांत खरा आहे व खोटा आहे. 'वारा येईल तशी पाठ दिली पाहिजे' ह्या मताचा

जे प्राणी अंगिकार करितात त्यांच्या संबंधानें वरील सिद्धांत खरा आहे, आणि आपणां-पैकीं पुष्कळ लोक याच तत्त्वाचे अनुगामी असतात. पण कृश होऊन उपासमारानें प्राणांतिक अवस्थेस पोहोंचलेला सिंह जसा वाटेंत पडलेलें हड्डक चघळित बसत नाहीं, त्याचप्रमाणें वारा फिरला तरी पाठ न फिरविणारे गृहस्थही या पृथ्वीतलावर चमकतात. या सत्वशील गृहस्थांचे जन्म केवळ स्वतःस अगर स्वकुळास अथवा स्वजातीस किंवा स्वदेशासच भूषण होतात असें नाहीं, तर रोन तितके मानवजातीस भूषण होऊन बसतात. उत्क्रांतिवाद खरा आहे व या विश्वांतील अनेक उपलब्ध असलेल्या गोष्टींचा उत्क्रांति-वादानें बरोबर उलगडा होतो. या वादांतच आपल्यास असें आढळून येईल कीं, जे प्राणी परिस्थितीच्या उलट गेले, तेंच जगले व तेच उन्नतस्थितीस येऊन पोहोंचले. एक-जात्यात्मक अत्यंत सूक्ष्म जंतूपासूनच हल्लींची ही विविध, विचित्र व विलक्षण जीवसृष्टि निर्माण झाली आहे, असें त्यांचें मत आहे. हें वैचित्र्य कालस्थलपरिस्थित्यनुसार उत्पन्न होतें; तसेंच हें वैचित्र्य व ही विविधता, त्या त्या सूक्ष्म जीवाच्या स्वतःसिद्ध म्हणजे स्वाभाविक गुणांपासूनही होते. हा स्वभाव अगर हें गुणांचें मंडळ जीवाला त्याच्या पूर्व-कृत कर्मांपासूनच मिळालें असलें पाहिजे. सारांश अज्ञानकाळांत आणि अज्ञकोटींत जीवांचे गुणधर्म बरेच कालदेशवर्तमानास म्हणजे परिस्थितीस धरून असतात; पण ज्ञानी काळांत आणि ज्ञानी जीवकोटींत आपले बरेच गुणदोष आपल्या स्वतःच्या परिस्थितीस अननुरूप कर्मामुळें प्राप्त होतात, असें मानिल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

( ३ ) पूर्व जन्मास अनुकूल असा पुरावा नाहीं. म्हणजे पूर्वजन्मींचें स्मरण आपल्यास नाहीं. हा मुद्दा खरोखर महत्त्वाचा आहे. स्मरण असतें तर हा तंटा उत्पन्न होण्याचें कारणच नव्हतें. पण भूत, प्रेत, पिशाचें, यांचा अनुभव ज्यांस आहे व भूतेंखेतें काढितात ते लोक ज्यांनीं पाहिले आहेत, त्यांचा अनुभव 'पूर्वजन्म आहे,' असाच आहे. योगबलानें अथवा आत्मोन्नतीच्या मार्गानें ज्यांनीं अमानुष शक्ति प्राप्त करून घेतली आहे, त्यांचें सांगणें 'पुनर्जन्म आहे' म्हणून आहे. अनुभव येत नाहीं, इतक्याच मुद्यावर जर प्रस्तुत वाद मिटावयाचा असेल तर 'पृथ्वी फिरते व सूर्य स्थिर नाहीं' असा अनुभव आपल्यास केव्हांही नाहीं, म्हणून 'पृथ्वी स्थिर आहे आणि सूर्यच फिरतो' असें आपणांस म्हणावें लागेल. आगगाडींत बसल्यानंतर सभोंवतालचीं झाडें व डोंगर फिरतातसे दिसतात म्हणून जर झाडें व डोंगर फिरतात असें म्हणावयाचें, तर 'मृगजळाच्या लाटांतील पाण्यानें शेतें पिकतील, असें अनुमान काढावयास काय हरकत आहे? 'आपण आहों' असें आपल्यास **वाटण्याहून जास्त** 'आपल्या आत्म्याचा' तरी आपल्यास काय अनुभव आहे?' कांहीं नाहीं. तेव्हां आत्मा नाहीं असें म्हणण्याची पाळी आली!-इंद्रियजन्य एवंच अनुभवप्रमाणावरच सर्व भिस्त ठेवून चालत नाहीं व चालावयाचें नाहीं.

( ४ ) आपला बाप हा पूर्वजन्म आणि आपला पुत्र हा आपला पुढील जन्म असें म्हणणें सामाजिक दृष्टीनें कांहींसें खरें ठरेल. पूर्वपिढी अव्यवस्थित असेल तर पुढील

पिढी कांहींशीं वाईट होईल, पुष्कळच वाईट होईल हें खरें; पण 'वाईट झालें' असें एका पिढीस वाटूं लागल्याबरोबर सत्पुरुषांचा व महापुरुषांचा जो अवतार होऊं लागतो, तें काय पूर्वपिढीच्या अन्यायाचरणाचें फल समजावयाचें कीं काय? नाहीं. वरील म्हणणें प्रत्येक प्रमाणाच्या विरुद्ध होईल. बापाचा अनाचार पाहून मुलास जर दुर्गुणाचा तिरस्कारयुक्त तिटकारा आला तर तो काय बापाच्या **दुराचाराचा परिणाम काय?** बाप कंजूष असला तर सामान्यतः मुलगा उधळ्या होतो हा जर बापाच्या केवळ कंजूषत्वाचा परिणाम, तर सूर्यप्रकाश अंधारानंतर येतो, म्हणून सूर्यनारायण हाही अंधारोपंताचा मुलगा असें आपण समजावें कीं, काय? आणि म्हणून आपल्यास अंधाराकरवीं उजेड मिळतो, असें समजावें कीं काय? असेंच असेल तर अंधारोपंतास आभारप्रदर्शक अभिनंदनकारीं पत्रकें पाठविण्यास आपण आतां तरी आरंभ केला पाहिजे!

(५) 'पुनर्जन्म खरा नाहीं' असें ठरल्यास ह्या ठरण्यानेंच केवळ अनाचार कदाचित् वाढणार नाहीं; पण त्या ठरण्याबरोबर ईश्वराच्या दयाघनत्वाचें व निःपक्षपाती न्याय्यत्वाचें बिरुद ढांसळून पडेल, हें वरील विचारांच्या पोषकांस व समर्थकांस कळलें पाहिजे होतें. व्यक्तीला येणाऱ्या सुखदुःखाचे आकस्मिक प्रसंग, सदाचरणी पुरुषांची हालअपेष्टा व दुराचरणी पुरुषांची बडेजावी, इत्यादि अनेक गोष्टींचा सयुक्तिक उलगडा करणें कठिण पडेल; नव्हे अशक्यच होईल. चार्लस दी सेकंड, जार्ज दी फोर्थ, दुसरा बाजीराव, व मल्हारराव गायकवाड, इत्यादिकांच्या दुष्ट, नीच, अधम, पातकी, दुराचारांची 'इतिश्री' त्यांच्या मृत्युलोकच्या रंगभूमीवरून निष्कांत होण्यानें मात्र जर व्हावयाची असेल, त्यांचें विषयलोलुप अंतःकरण त्यांच्या जीवज्योतीबरोबरच मालवलें गेलें असेल; तर, दुधांत अगर पाण्यांत एखादें विष विरवून टाकल्यानंतर, त्या विषाचा विषारीपणा विरण्याबरोबर नाहींसा झाला व नाहींसा होतो असें आपल्यास अनुभव-विरुद्ध प्रतिपादन करावें लागेल. तसेंच कॅन्मरास झालेली देहांत शिक्षा किंवा ख्राइस्ट याचा झालेला अन्यायी धर्मच्छळ व मृत्यु, हें खचीत त्यांच्या त्यांच्या **अपूर्व पुण्याईचें फल नव्हे. त्यांचे हाल त्यांच्या** देहनाशाबरोबर नष्ट झाले. पण त्यांनीं केलेलीं पुण्यें नष्ट झालीं नाहींत. भट्टपादाच्या पर्वतपातानें त्याची देहयात्रा संपविली असेल, पण त्याची जीवयात्रा येवढ्यानेंच संपली नाहीं हें खास आहे.

१. असो; तेव्हां पूर्वस्थळीं जें काय म्हटलें होतें, त्याचें निरसन वरील विवेचनानें होण्यासारखें आहे. आतां प्रथम युक्तिवादाचे मुद्दे सांगून मग श्रुतिस्मृतींकडे वळूं.

(अ) ज्यांचें आयुष्य निष्काम पवित्राचरणांत गेलें आहे त्यांनीं महात्मे सद्गुरूच्या साहाय्यानें योगाभ्यास केल्यानंतर त्यांस पूर्वजन्माचें स्मरण होतें व ते पूर्वजन्माची हकीकत सांगतात. असल्या सिद्धांत स्थापन करण्याचा या पुण्यश्लोकांस कांहीं एक हेतु नसतांना व हे ज्ञानी लोक पूर्ण शुद्धीवर असतांना जेव्हां पुनर्जन्म खरा आहे, असें सांग-

तात, तेव्हां 'तें सब झूट आहे' असा शेरा ठोकण्यापूर्वी 'झूटी बात' करण्याचें प्रयोजन काय असावें, हें निर्मळ बुद्धीनें शोधून काढून नंतर मग शंकेखोर आक्षेपकांनीं आपलें तर्क-जाल पसरण्यास सुरुवात करावी. पूर्वजन्माचें स्मरण नाहीं म्हणून तो नाहीं असेंही ह्मणतां येत नाहीं. कारण आपल्या लहानपणीं ज्या हजारों गोष्टी आपण केल्या व लाखों गोष्टी ऐकिल्या, त्यांचें स्मरण नष्ट झालें म्हणून आपण त्या सर्व खोट्या गोष्टी असें मानूं कीं काय? तसें झालें तर आपण विस्मृत झालेल्या लहानपणांत कधींच नव्हतों असें आपल्यास ह्मणावें लागेल! पतंगाला घुल्याच्या स्थितीची आठवण नसेल, किंवा दारूच्या निशेंत व वायूच्या झटक्यांत आपण काय बोललों व काय केलें याचें स्मरण मद्यप्यास अगर ताप आलेल्या मनुष्यास नसेल म्हणून त्या मद्यप्याचें उन्मत्त वर्तन व त्या वायुवश पुरुषाची दांडगाई या नष्ट होत नाहींत. सारांश स्मरण नसणें हा मुद्दा नाहीं व कित्येक साधुसंतांस पूर्वजन्माचें स्मरण असतेंही. पण त्यांच्या गोष्टीवर विश्वास ठेवणें हेंही पृच्छकाच्या आत्मोन्नतीवर अवलंबून असावयाचें आहे.

(आ) आईबाप शरीर देतात; म्हणजे शारीरिक गुणदोष व कांहीं मनोविकार 'आईबापांनीं दिलेली टेव' ह्मणून आपल्यास मिळतात. पण आत्मिक योग्यता अथवा विवेकशक्ति व शमदमादि यांचें लहानमोठें गांठोडें हें ज्याचा तो बरोबर आणितो, असें मानिल्याखेरीज व्यवहारांत आईबाप व पुत्रपौत्र यांच्या **आत्मिक रचनेंत** जो फरक सर्वत्र दिसतो, त्याचा उलगडा होणें शक्य नाहीं. शारीरिक सुस्थिति अगर दुःस्थिति देतां घेतां येईल, पण ज्ञानाचें परिग्रहण करण्यास 'अहंवृत्ति' हवी लागते. आईबाप आपल्यास कान देतील; ऐकण्याची शक्तिही देतील. पण ऐकलेलें **समजण्याची शक्ति ज्याची त्यास हवी असते.**

(इ) 'आपला देश परतंत्र, ह्मणून आपण सुतकी आहों' असें माझिनी नवव्या वर्षी म्हणूं लागला, शिवाजी महाराजांनीं आपली धर्मोद्धाराची व राज्यस्थापनेची मंत्रमाला दहाव्या वर्षीच ओढण्यास आरंभ केला, शंकराचार्यांनीं बारा वर्षांच्या आंत सर्व वेदशास्त्रांचें अध्ययन केलें, ज्ञानेश्वर महाराजांनीं १६ वे वर्षाच्या पूर्वीच ज्ञानेश्वरी सारखा दिव्य ग्रंथ तयार केला, धाकटा मिल्ल तिसऱ्या-चवथ्या वर्षीच लाटिन व ग्रीक भाषेंत बोलूं लागला, केटो हा चवथ्या वर्षी परकीय देशाचे लोकांस कस्पटासमान मानूं लागला, रामदासांनीं लहानपणींच लग्नाच्या वेळीं 'यःपलाय' केलें, इत्यादि अनेक महाविभूतींच्या अनेक अद्भुत गोष्टी सांगतां येतील या इतक्या लहान वयांत वरील पुरुषांनीं जें स्वभावविलक्षणत्व दाखविलें याचें स्पष्टीकरण कसें? आईबापाचा उपदेश व मुलांचें वर्तन हीं अगदीं उलट होतीं असें बहुतेक श्रेष्ठ पुरुषासंबंधें ह्मणण्यास हरकत नाहीं. एका ब्राह्मणाच्या मुलानें लढाईच्या खात्यांत शिरण्याचा हट्ट धरावा व तेथें जाऊन उत्तम प्रतिष्ठा मिळवावी हें आईबापांच्या शीलांविरुद्ध असतांना कसें झालें? याला समाधान-

कारक उत्तर एकच कीं, पूर्वजन्मरूप घटित झालेलें त्यांचें प्रारब्ध (स्वभावघटना) कांहीं निराळें होतें.

(ई) एकाच गुरुजवळ सारख्याच ग्राहकशक्तीचे विद्यार्थी शिकत असतात. घरचें बाळपणीचें शिक्षणही सामान्यतः सारखेंच असतेंना ? पण एकाला भाषाविषयाचा अत्यंत नाद लागून त्यानें भाषापंडित व्हावें, पण गणितशास्त्रांत अगदीं सामान्य प्रतीची वाहवा मिळवावी आणि दुसऱ्यानें प्रतिभास्कराचार्य होऊन जगताला आपल्या गणितकोविदत्वानें चकित करून सोडावें, पण भाषाविषयामध्यें मात्र त्यानें बुद्धिमांद्य दाखवावें, हा विचित्र प्रकार कां उत्पन्न व्हावा ? दोघेही सारखेच बुद्धिवंत, दोघेही सारखे एकनिष्ठ अभ्यासी असतांना असा विपरीत प्रकार दृष्टीस पडतो, याचें उत्तर हेंच कीं, त्या प्रत्येकाची आनुपूर्वी निराळी आहे व असली पाहिजे. प्रथमतःच एकाला भाषेचा नाद व दुसऱ्याला गणिताची हौस कां उत्पन्न व्हावी ? एकाची वैय्याकारणदृष्टी व रसिकदृष्टि व दुसऱ्याची तर्कदृष्टी लहानपणींच प्रखर असण्याचें कारण त्यांच्या पूर्वजन्माची कर्मविलक्षणता हें होय. एवंच बुद्धिवैचित्र्य हें पूर्वकर्मसंस्काराचें फळ आहे असें म्हटल्याविना गति नाहीं.

(उ) 'ईश्वर आहे, व तो न्यायी आणि शहाणा आहे' असें प्रत्येक आस्तिकवादी कबूल करितो. खरा व समंजस नास्तिक या सृष्टींत असणें शक्य नाहीं. नास्तिक म्हणून जे दिसतात व नास्तिक म्हणवून घेण्यांत ज्यांस अभिमान वाटतो, असे कांहीं तुरळक लोक आपल्यास आढळतात, हें खरें; पण विचारी व नेहमीं गंभीर वृत्तीनें राहणारा मनुष्य नास्तिक असणें शक्य नाहीं. पहा कीं, 'ईश्वर नाहीं' असें प्रतिपादन करणारांतील सर्व सृष्टि हिंडून तिचा पूर्णपणें शोध करून मग आपल्या मनाची खातरी करून घेतलेले कितीकसे नास्तिक आहेत ? मुळींच नाहींत. आतां यावरही प्रतिपक्ष होईल व 'अस्तिकांनी तरी कोठें ईश्वर पाहिला आहे ?' अशी उलट शंका निघेल; हिचें निराकारण करण्याचें हे स्थळ नव्हे. येथें इतकेंच सांगतों कीं, जड व अचेतन सृष्टीमध्यें अनंत अघटित कर्में निर्दोष रीतीनें व पूर्ण व्यवस्थानिष्ठपणानें होत असलेलीं जर आपल्या दृष्टीस पडतात, तर त्या सृष्टीचा शास्ता व नियंता कोणी तरी असलाच पाहिजे व त्याचें सामर्थ्य तर्कबाह्य, त्याची दयालुता अमोघ, त्याचा न्यायीपणा शंकास्पदशून्य, त्याचें ज्ञान अभंग, असलें पाहिजे. सारांश 'ईश्वर आहे व तो न्यायी आहे' हें अनुमानानें स्पष्ट ठरतें. आतां असल्या दयाघन व न्यायप्रिय ईश्वराच्या हातून कांहीं लोक आसुरी प्रकृतीचे व्हावे व कांहीं दैवी संपत्तीनें युक्त अशा जन्मास यावे, एकाला साधुकुलांत जन्म यावा आणि दुसऱ्याला नीच कुलांत जन्म यावा, असा पक्षपात कां होतो ? पक्षपात तर ईश्वराच्या दरबारीं नसलाच पाहिजे. याला उत्तर पूर्वजन्मीचें कर्म हें होय. पुनः दुष्कर्माबद्दल शिक्षा व सत्कर्माबद्दल बक्षीस या गोष्टी आपल्या लहानशा

व क्षुल्लक मानवी संस्थेंत सुद्धां दृष्टीस पडतात; अर्थातच परमेश्वराच्या निःपक्षपाती दरबारांतही सुष्टदुष्टांचा निकाल यथायोग्य रीतीनें ह्मणजे विश्वसंरक्षण व विश्वोन्नति ह्या दृष्टींनींच झाला पाहिजे. स्वर्गांतील निग्रहानुग्रहाची काय व्यवस्था आहे ती न पाहतां, आणि अनेक प्रकारच्या व अनेक योग्यतेच्या सुष्टांस सुख देण्यासाठीं एक व एक प्रकारचेंच नंदनवन सर्वज्ञ प्रभूनें तयार करून ठेविलें आहे, आणि सर्व व सर्व प्रकारचीं पातकें क्षालन करण्यासाठीं एकच नरककुंड तयार करून त्यांतच पापी लोकांस अनंत काळपर्यंत ठेवण्याची व्यवस्था समंजस परमेश्वरानें केली आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या धर्मग्रंथांस अंमळ एकीकडे ठेवून मी इतकेंच ह्मणतो कीं, ईश्वराची शिक्षा व बक्षीस देण्याची पद्धति ह्मणजे त्या त्या प्राण्यास पुनः जन्म देऊन त्यास पापपुण्यानुसार सुखदुःखें भोगावयास लावावयाची, असा सुव्यवस्थित प्रकार ईश्वराच्या दरबारीं असावा असा तर्क करण्यास पुष्कळच जागा आहे.

( ऊ ) 'जन्मास आलेल्या मनुष्याचा आत्मा ( जीव ) अमर असतो' असें जे धर्म प्रतिपादितात, त्यांस हें संमत असलेंच पाहिजे कीं, अमरवस्तु कधींही जन्मास येणें शक्य नाहीं. जी वस्तु अमर आहे, ती अनादि व अनंत असलीच पाहिजे. मानवी जीव अमर आहे ह्मणून जर अनादि आहे, तर तो इहलोकीं जन्मास येण्याच्या पूर्वी होता कोठें ? असतापासून सत होत नाहीं हा सिद्धांत आपण प्रभूच्या साहाय्यानें मागेंच ठरवून टाकिला आहे. तेव्हां तो जीव पूर्वी विद्यमान असलाच पाहिजे. अर्थातच तो कोणत्या तरी शरीरांत पूर्वी असून त्याच्या कर्मानुसार त्याला पुनः जन्म मिळाला पाहिजे हें मागच्या प्रतिपादनावरून उघड होत आहे. कारण, निर्विकल्प असणाऱ्या जीवाला सुखदुःखाची स्थिति यदृच्छेनें अथवा केवळ आपल्या सत्तेच्या जोरानें देणें, हें विश्वपालक ईश्वराला तर मुळींच करितां येणार नाहीं. सारांश, तो जीव पूर्वी कर्मबद्ध असल्या कारणानें या जन्मीं सुखदुःखाचा भोक्ता झाला आहे.

( ऋ ) येथें, कांहीं जीव उगीच येऊन पहिल्या वर्षाच्या आंतच निजधामास जातात असा प्रत्यक्ष अनुभव आहे; ख्रिस्ती, मुसलमान इत्यादि द्वैतवाद्यांच्या धर्मपंथांत या बालकांच्या मृत्यूचें **स्पष्टीकरण** केलेलें मला आढळलें नाहीं. पुनर्जन्मवाले ह्मणतील कीं, अपघातानें मेलेले जीव, पूर्वजन्मांची देहयात्रा पुरी करण्यासाठीं येथें येऊन दुसरा योग्य देह पाहण्यासाठीं निघून जातात. पुनः; एका जन्मांत जीवाला ज्ञान तें काय मिळणार व शंभर वर्षांच्या आंतच त्यांतील पन्नास वर्षे निद्रेंत व खाण्यापिण्यांत गेलीं, कांहीं बालपण व वार्धक्यामध्यें गेलीं; तेव्हां शंभरांपैकीं ज्ञानोपयोगी सरासरीनें फार तर ३० वर्षेंच सांपडणार ! या ३० वर्षांत ज्ञानसंचय तो कितीसा होणार ? जीवाला तर शिव व्हावयाचें आहे ! तेव्हां ही आत्मिक उन्नति ज्ञान-साहाय्यानें करण्यास जन्माची ३० हजार वर्षे पुरणार नाहींत; मग ३० वर्षांची काय कथा ? शिवाय येथून जाणाऱ्या

जीवाला अत्यंत अज्ञानी जातींत जन्म आला, तर ज्ञानाची गोष्टच पुसावयास नको ! यापेक्षां पुनर्जन्माचें मत स्वीकारलें म्हणजे जन्मोजन्मीं संचित होणाऱ्या ज्ञानाचा सांठा वृद्धिंगत होऊन ईश्वराचे हेतु सिद्धीस जातात व जीवाची सुटका होते.

( ऋ ) " 'पुनर्जन्म आहे' असें म्हटलें म्हणजे एक गर्भित अर्थ असा निघतो कीं, या सृष्टींत जीवांची संख्या नियमित आहे. हें खरें असल्यास मनुष्य प्राण्याची संख्याही नियमित व स्थिर असली पाहिजे. ती तशी नाहीं म्हणून पुनर्जन्म नाहीं " अशा अक्षेपास उत्तर हें कीं, ही जीवसंख्या नियमित आहे, हें खरें; पण ती अनंत आहे. तसेंच सर्वच जीव एकदम जन्म घेतात असें नाहीं. सुकृतदुष्कृताचें फल मरणानंतर नियमित कालपर्यंत भोगून नंतर प्रत्येक जीव आपल्या आत्मिक उन्नतीप्रमाणें आपल्यास योग्य अशा देशांत व कुटुंबांत जन्म घेतो. हें खरें असल्यास मनुष्यवृद्धि होण्याला कांहीं एक हरकत नाहीं.

याप्रमाणें आनीबिझेंट बाईच्या प्रासादिक ग्रंथावरून व ग्रंथाच्या साहाय्यानें बुद्धिवादाचा एक मजला तयार झाला. आतां सिनेट साहेब काय म्हणतात तें पाहूं, व नंतर श्रुतिस्मृतींच्या आधाराकडे वळूं.

४. मि. सिनेट, मिसेस् आनीबिझेंट व इतर सर्व थिआसफिस्ट लोकांचें असें म्हणणें आहे कीं, पुनर्जन्म आहे, असें गृहीत घेतलें तरच मानवी जन्मांतील व इतर जन्मांतील अनेक गूढ प्रश्नांचा उलगडा नीटपणें होतो; इतर सद्यःसूचित कोणत्याही कल्पनेनें होत नाहीं. प्रकाशाच्या संबंधानें 'आंदोलन' वल्पि ( Undulation theory ) जशी प्रकाशाचे सर्व प्रश्नांचा निकाल सयुक्तिकपणानें करिते, तद्वत्च पुनर्जन्माची कल्पना या जीवगुह्यांचा उलगडा करिते. भिन्न जीवांस भिन्न सुखदुःखांचा जन्मल्याबरोबरच अनुभव घ्यावा लागतो. हें सुखदुःख निःपक्षपाती ईश्वर उगीच्या उगीच निःपाप अथवा निःपुण्य जीवावर लादणार नाहीं. त्याचप्रमाणें अनेक कर्मांचें फल येथें मिळत नाहीं, असाही अनुभव आहे. पण केलेल्या सूक्ष्मासूक्ष्म कर्मांचें फल इहलोकीं मिळत नाहीं, असा जीवितावधीपर्यंतचा जर अनुभव आहे, तर येथील आयुर्दाय संपला म्हणजे त्या त्या प्राण्यास तें तें सुखदुःख कोठें तरी भोगलेंच पाहिजे. हें भोगण्यास शरीर हवें. तेव्हां प्राण्यानें एक देह टाकिला, तरी त्याला सुखदुःखाच्या उपभोगासाठीं, आत्मिक उन्नति करून घेण्यासाठीं व मुक्त होण्यासाठीं अन्यत्र कोठें तरी जन्म घेऊन जीवविमोचन केलेंच पाहिजे. ही कल्पना गृहीत घेतल्याखेरीज ईश्वराच्या न्यायीपणाची खरी साक्ष पटत नाहीं. कर्माचा नाश भोगाशिवाय होत नाहीं. यालाच आमचे लोक कृतप्रणाश म्हणतात. कर्म केल्याशिवाय म्हणजे कारणाशिवाय सुखदुःखादि कार्य उत्पन्न होत नाहीं. याला 'अकृताभ्यागम' म्हणतात. कारणाशिवाय कार्योत्पत्ति

नाहीं व प्रत्येक कारणापासून योग्य वेळीं व योग्य प्रसंगीं कार्योत्पत्ति झालीच पाहिजे, हा अनुभवसिद्ध सिद्धांत आहे, व या सिद्धांताचें समर्थन ' पुनर्जन्म ' गृहीत घेतल्याखेरीज होत नाहीं.

आतां सृष्टींतील व्यवस्था पाहिली असतां असें दिसून येतें कीं, एक विशिष्ट स्थिति प्राप्त झाल्यानंतर पुनः ती विशिष्ट स्थिति मागें फिरत नाहीं; म्हणजे विशेष स्थितीला सामान्यस्वरूप प्राप्त होत नाहीं. उदाहरणार्थ, स्तन असणारे प्राणी हा वर्ग पाठीला कणा असणाऱ्या प्राणीजातीचा एक विशेष आहे. तेव्हां स्तन्यप्राणी कितीही अधम स्थितींत गेला, तरी त्याला प्राप्त झालेले स्तन नाहींतसे होणें शक्य नाहीं. वानरापासून मनुष्य प्राणी झाला आहे. आतां मनुष्य कितीही नीचावस्थेला प्राप्त झाला, तरी तो पुनः वानरकोटींत शिरणार नाहीं. दह्याचें जसें पुनः दूध होणें शक्य नाहीं, साखरेचा ऊंस होणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें मनुष्यकोटींत राहूं लागलेला जीव पुनः पशुपक्ष्यादि कमी योग्यतेच्या योनीमध्यें कधींही जावयाचा नाहीं, असें थिआसफिस्ट म्हणतात. हिंदु सांप्रदायिक पद्धतीप्रमाणें मनुष्य नीच धर्माचें आचरण करील, तर तो नीचयोनींत शिरेल, म्हणजे वाघ, कुत्रा, हरिण, किडा, किंबहुना धोंडा सुद्धां होईल, असें पुराणादि ग्रंथांचें, स्मृतींचें व श्रुतींचें म्हणणें आहे. हा वाद एकीकडे ठेवला नाहीं, तरी ' पुनर्जन्म ' होतो, ह्या मुख्य प्रश्नासंबंधानें उभय मतांत ऐक्य आहे. जन्म प्राप्त होऊन देहित्व मिळणें ही संकोचस्थिति आहे. संकोचस्थितींत सुखदुःखांचा प्रत्यय आहे. जसजसें आत्मस्वरूप निवृत्तिरूपी कर्माच्या योगानें विकसित होत जातें, तसतसा आपल्या संकुचित वृत्तीचा विकास होतो, आणि होतां होतां हा विकास अमर्याद प्रमाणाला गेला म्हणजे मोक्ष मिळतो. समर्याद वस्तूला निर्मर्यादत्व मिळणें ही गोष्ट अर्थातच अनेक, प्रायः अनंत, जन्मांच्या साहाय्यानें होणारी आहे. अनंत जन्मांच्या पुण्यशील वर्तनानें निर्मळ चित्त होऊन मोक्ष मिळतो हा सिद्धांत समंजस आहे; तसा इतर कोणताही सिद्धांत असणें शक्य नाहीं. पूर्वीचें आपलें कर्म शून्य असतांही, येथें सर्व दयाघन व न्यायप्रिय ईश्वर आपल्यास सुखदुःख भोगावयास लावितो, असें कांहीं धर्म म्हणतातः म्हणोत ! पण ' ईश्वरी लीला अगाध आहे, ती आम्हां मानवांस समजणें अशक्य आहे, ' एवढ्यावरूनच अकृतागमाचा आणि कृतप्रणाशाचा उलगडा होत नाहीं. असो; पुढील सर्व विवेचन मिसेस् आनीबिझेंट बाईच्या प्रतिपादनास अनुकूल असेंच आहे.

५. युक्तिवादाची असल्या वादांत फारशी मातब्बरी नसते. पण आपण जर बारीक दृष्टीनें पाहिलें, तर आपल्यास आढळून येईल कीं, या विश्वांतील यच्चावत् पदार्थांचें रूपांतर क्षणोक्षणीं चाललेलें आहे. कोणताही पदार्थ नष्ट होत नाहीं, त्याचें रूपांतर होत असतें, असा आपला अनुभव आहे. हें जर सर्व जड पदार्थांसंबंधें खरें

आहे, तर चैतन्यासंबंधें तरी हें कां खरें नसावें ? पदार्थांच्या शक्तींचा अथवा पदार्थांमध्यें प्रकट होणाऱ्या शक्तींचा नाश होत नाहीं हेंही आपल्यास स्पष्ट दिसतें आहे. गतीला उष्णतेचें, उष्णतेला प्रकाशाचें, प्रकाशाला विद्युतचें स्वरूप प्राप्त होत असतें, हे कोणास विदित नाहीं ? सारांश पदार्थांचा नाश होत नाहीं, याप्रमाणेंच शक्तींचाही नाश होत नाहीं. ह्या शक्ति म्हणजे चैतन्याचें अत्यंत आदिम अथवा स्थूल स्वरूप आहेत; तेव्हां चैतन्याचा नाश होणेंही शक्य नाहीं. जीव म्हणजे चैतन्य आणि जड यांचा संयोग आहे. तेव्हां जीवाचा अत्यंत नाश होणें शक्य नाहीं. पुनः; आपल्यास येथें सुरवंटासारखे अनेक प्राणी दाखवितां येतील कीं, जे ह्या लोकींच आपला एक देह येथें टेऊन अन्य देहाचें धारण करितात. तेव्हां आपल्या डोळ्यांदेखत जर नेहमीं देहांतर चाललेलें आहे, मानवी युक्तीला जर हें संमत आहे, ख्रिस्त, बुद्ध इत्यादि धर्मसंस्थापकांस जर पुनर्जन्माचें तत्त्व मान्य होतें, हें मत गृहीत केल्याखेरीज जर अनेक कूट प्रश्नांचा उलगडा सोपपत्तिक करितां येत नाहीं, आणि श्रुतिस्मृति इत्यादिक अपौरुषेय ग्रंथांचा आधार जर 'पुनर्जन्मास' आहे, तर हेंच मत खरें असलें पाहिजे अशी कोणाही हिंदूची खातरी झाल्याशिवाय राहणार नाहीं. आतां "क्षयरोगानें अगर इतर कोणत्याही सावकाश प्राण घेणाऱ्या रोगानें झिजून मरणाऱ्या मनुष्याच्या शारीरिक शक्तीबरोबरच मानसिक शक्ति क्षीण होतात व त्याबरोबरच त्याची अहंवृत्ति व ज्ञानगृहण करण्याचें सामर्थ्य कमी होत जाऊन शेवटीं तें नष्ट होतें, तथापि '**आपण एकदां या पृथ्वीवर वास केला आहे**' हें त्या आसन्नमरणीं पुरुषाचेंही ज्ञान नष्ट होत नाहीं, किंवा तें ज्ञान नष्ट होणें शक्य नाहीं" असें, प्रसिद्ध तत्त्ववेत्ते, उत्क्रांतिवादाचे शंकराचार्य आणि 'स्याद्वादी' लोकांचे अग्रणी, स्पेन्सर साहेब, आपल्या शेवटच्या ग्रंथांत म्हणतात ! सारांश, निष्कल व निर्विकल्प ज्ञान नष्ट होत नाहीं, असा त्यांचे म्हणण्याचा निष्कर्ष काढल्यास तो फारसा चुकीचा होणार नाहीं. असो; पुनर्जन्माच्या विरुद्ध उत्क्रांतिवाद आहे. पण तो उत्क्रांतिवादही अद्वैत सिद्धांताचा अनुयायी होण्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं आहेत ! केवळ विचारदृष्टीनें म्हणजे ईश्वरप्रणीत ग्रंथांचा आधार न घेतांही जर युरोपियन तत्त्ववेत्ते अद्वैत सिद्धांताकडे वळूं लागले आहेत, दोन हजार वर्षेंपर्यंत ज्ञानमार्गाचा उहापोह केल्यानंतर व सृष्टिव्यवस्थेचें स्थूल व कांहीं सूक्ष्म नियमांचें ज्ञान झाल्यानंतरही जर विचाराचा ओघ अद्वैत सिद्धांताकडे वळतो, तर आमच्या प्राचीन पौरस्त्य आर्यांच्या तत्त्वज्ञानाची बहादुरी नव्हे काय, कीं ईश्वरप्रणीत ज्ञानाच्या जोरावर त्यांनीं असें कांहीं विचारप्रणयन सिद्ध करून ठेविलें कीं, हजारों वर्षेंपर्यंत सार्वत्रिक विचाराचा व अनुभवाचा संतत ओघ ह्या त्यांच्या विचारसमुद्रामध्येंच येऊन मिळावा ! 'जड वस्तु नश्वर नाहीं' हें तत्त्व हुडकून काढण्यास हजारों वर्षें लागलीं, तें तत्त्व तर आमचें नेहमींचें बाळकडू आहे ! स्पेन्सर साहेबांनीं नवीन शोधून काढलेलीं उत्क्रांतीचीं व अपक्रांतीचीं रहस्यें 'उत्पत्ति व प्रलय' यांतच अंतर्भूत होतात. 'जीवाचा नाश होत नाहीं' हें तत्त्व ख्रिस्तप्रणीत आहे हें खरें; पण त्यांच्या धर्मांत या तत्त्वाचा पूर्ण विचार

नसल्यामुळें म्हणजे जीवास केव्हांना केव्हां तरी मोक्ष मिळेल, हें आदितत्त्व पाश्चिमात्य लोकांस विदित नसल्यामुळें 'पुनर्जन्मा' चा शोध त्यांस लावितां आला नाहीं. 'पुनर्जन्म' असावा असं ह्मणणारीं पंडितरत्नें युरोपमध्यें पैदा झालीं नाहींत, व होणार नाहीत असें नाहीं; पण यूरपक्षेत्रांत धार्मिक विचार रुजतील अशी मऊ जमीन न सांपडल्यामुळें वरील 'पुनर्जन्माचें बीज' तेथें चांगलेसें रुजलें नाहीं.

६. आतां श्रुतिस्मृतीकडे वळावयाचें. याच्या अगोदर 'पुनर्जन्मा' विरुद्ध ह्मणून ज्या कांहीं श्रुतींचा उल्लेख केला होता, त्यांच्या संबंधानें हें सांगणें अवश्य दिसतें कीं, ह्या श्रुतींचा उल्लेखिलेला अर्थ चुकीचा नव्हता. फक्त त्या अर्थाची योजना मात्र पूर्णदृष्टीनें झाली नव्हती. उदाहरणार्थ, 'माझा पुत्र हाच माझा दुसरा जन्म' असें जेथें ह्मटलें आहे, तेथें म्हणणाराचा भाव असा आहे कीं, माझ्या शरीराची, मनाची व आत्मिक उन्नतीची जशी मी काळजी घेतों, तशीच, हे पुत्रा! तुझीही घेईन; तसेंच, माझे वाडवडिलांकडून जे अधिकार मला प्राप्त झाले, ते तूं माझेंच स्वरूप आहेस ह्मणून, तुलाही प्राप्त होतात आणि व्यक्तिशः पुरुष देह सोडून गेले, तरी कुटुंब मरत नाहीं व कुटुंबांत जे पुत्र होतात, तेच त्या कुटुंबधर्माचे प्रवर्तक होतात. आणखी, आईबाप शरीर देतात हें खरें; पण अहंकारापासून तों स्थूल शरीरापर्यंतच्या सर्व वस्तूंस प्रभूंनीं 'क्षेत्रांतच' अंतर्भूत केलें आहे, तेव्हां इकडूनही कांहीं अडचण नाहीं. सारांश, त्या त्या श्रुतींचा हेतु पुनर्जन्माचा प्रतिषेध करावा असा नव्हता; तर विसाव्या शतकांत शास्त्रीय सामर्थ्याच्या जोरावर जे प्रामाणिक सिद्धांत अवतीर्ण होतील, त्याचें समर्थन अगाऊ करावें, एवढाच आहे.

७. आतां पुनर्जन्माचें समर्थन करणाऱ्या श्रुति अनेक आहेत, त्यांतील थोडक्यांशा मंत्रांचा मात्र निर्देश करितों.

**ऐतरेय**—स इतः प्रयन्नेव पुनर्जायते.

**बृहदारण्यक**—शुक्रमादाय पुनरेतिस्थानं ॥
स ईयतेऽमृतो यत्रकामम् ॥
तदेव सक्तःसह कर्मणेति लिंगं मनो यत्रनिषिक्तमस्य ॥
तस्माल्लोकात् पुनरैति। तेषां न पुनरावृत्तिः

**नृ० पूर्वतापिनी**—स मृत्युं जयति.

**छांदोग्य**—वेत्थ, यथा पुनरावर्त्तते.
एतमध्वानं पुनर्निवर्त्तते,
नच पुनरावर्त्तते. ( वासु० ४ वेळा )
सोऽब्धत्वसोऽइति पुनरुत्पादनमेवास्य.

**कठ**—त्रिकर्मकृत्तरति जन्ममृत्यू
यस्माद्भूयो न जायते
सस्यमिव जायते पुनः
न पुनरावर्त्तयेत्.

**मुंडक**—जरामृत्युं पुनरेव यंति.

**प्रश्न**—त एव पुनरावर्त्ततेः एतस्मान्नपुनरावर्त्तन्ते.
सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्त्तते.

**गर्भ**—जन्म जन्म पुनः पुनः; पुनर्जातः पुनर्मृतः मृतश्चाहंपुनर्जातो
जातश्चाहं पुनर्मृतः

**मुक्ति**—पुनरावृत्तिरहितां मुक्तिः पुनर्जन्मकरी प्रोक्ताः
पुनर्जन्मांकुरं त्यक्त्वा, जन्मांतरशताभ्यस्ता.

**कालाग्नि**—न स पुनरावर्तते; तस्मात्समाचरेन्मुमुक्षुर्नैपुनर्भवाय.

**कैवल्य**—पुनश्च जन्मांतरकर्मयोगात् तदा न स्मरति जन्ममरणानि.

**ब्रह्मबिंदु**—पुनर्जन्म न विद्यते.

**क्षुरिक**—पुनर्जन्म योगयुक्तस्य जायते.

**रामोत्तरतापिनी**—स जन्मांतरितान्दोषान्नाशयति.

आणखीही पुष्कळ अनुकूळ उतारे देतां येतील. गीतेमध्यें तर दुसऱ्या, चवथ्या, सहाव्या, सातव्या, तेराव्या, सोळाव्या, व इतर अध्यायांत जन्मानेकत्वाबद्दल पुष्कळच उल्लेख आले आहेत. इतर स्मृतींतून उतारे द्यावयाचे, पण हेच उतारे माझ्या अजमासा-पेक्षां जास्त झाल्यामुळें मी त्या भानगडींत पडलों नाहीं. भारतांत तर पुष्कळ कथा पुनर्जन्मावर अवलंबून आहेत हें सुविदितच आहे.

येणेप्रमाणें प्रथमतः युक्तीनें हा पुनर्जन्माचा प्रश्न सिद्ध करून नंतर प्रामाणिक शास्त्र-प्रमाणांपैकीं कांहीं उद्धृत केलीं. सुरवंटांचें प्रत्यक्ष प्रमाण आहे, यावरून सर्व प्रमाणें श्रुतींसच अनुकूल आहेत. जीवांचा उद्धार होण्याला जन्मसहस्रही पुरत नाहीं, म्हणून ही पुनर्जन्माची व्यवस्था आहे. असो; हा प्रश्न बरोबर सुटला नाहीं असें कोणा समंजस गृहस्थास वाटल्यास, त्यांनीं जुन्या व नव्या करारांचे, पायथागोरसच्या चरित्राचें, मिसेस आनीबिझांट नामक विदुषीचें व सिनेट साहेबांच्या ग्रंथांचें अवलोकन अवश्यमेव करावें. अलीकडील शास्त्रें हीं पुनः त्याच तत्त्वांचें मंडन करित आहेत, या दृष्टीनें वनस्पतीशास्त्र व प्राणीशास्त्र अवश्य वाचावें, ही सूचना स्मरणार्थ करितों व हा विषय येथें संपवितों.

## पुनर्जन्म.

असो; हा जो विचार येथपर्यंत केला त्याचें तात्पर्य हें आहे: जीव हा परमेश्वराचा अंश असून तो कर्मभूमींत आला, याला कारण त्याचें वासनाबंधन होय. ही वासना त्यास केव्हां उत्पन्न झाली हें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. कारण हा संसार **व्यावहारिकतः अनादि आहे.** पहा कीं, कुंभार माती घेऊन एक घट तयार करितो. आतां त्या घटाच्या उत्पत्तीपूर्वीं त्या घटविशेषाचा अभाव होता. हा **अभाव** केव्हां उत्पन्न झाला? अर्थात त्याचें उत्तर न्यायाच्या भाषेनें द्यावयाचें झणजे तो **अनादि** आहे. ज्या काळाला आरंभच नाहीं, त्या काळापासून तो घटविशेषाचा प्रागभाव आहेच आहे. तसाच हा संसार अनादि आहे. बाकी परमार्थतः असत् संसार उत्पन्नही झाला नाहीं व झणून त्याचा कधीं नाशही होत नाहीं! बरें, ब्रह्माला हे उपाधिघटित जीवस्वरूप कां प्राप्त झालें? अद्वैताच्या भाषेंत हा प्रश्नच असमंजस होय. माया हीं असत्य अथवा मिथ्या आहे; झणून मायाजन्य जीव-उपाधि, तीही असत्यच आहे. तेव्हां सत्याला असत्याचा लेप तो काय होणार? चित्रांतला पाऊस तो काय भिजवणार? पुनः; ब्रह्म निर्लेप आहे. तेव्हां, अळवाच्या अथवा कमलाच्या पानावर जरी एखादा जलबिंदु पडला, तथापि त्या पानाला जसा त्या जलाचा संपर्क लागत नाहीं, त्याचप्रमाणें परमार्थतः ब्रह्माला उपाधींचा स्पर्श होत नाहीं. आतां व्यावहारिकतः पाहिलें,-संसारांत उत्पन्न झालें असतां, पाहिलें, तर या प्रश्नाचा विचार करणाराच मुळीं उपाधिग्रस्त आहे. या उपाधिग्रस्त जीवानें आपल्या उपाधिरूप बुद्धीच्या साहाय्यानें निरुपाधिक ब्रह्माचा शुद्ध विचार करावयाचा प्रयत्न करणें म्हणजे, एखाद्या जन्मांधानें तीक्ष्णदृष्टि पुरुषाच्या डोळ्यांची पारख करण्यासारखें किंवा सूर्यप्रकाशावर व्याख्यान देण्यासारखें असमंजस होय. जेथें वेद, श्रुतिमंत्र '**नेति नेति**' झणणार, जेथें प्लेटो, कांट, हेगेल, स्पेन्सर इत्यादि तत्त्ववेत्ते हात टेंकणार, तेथें आपण केवढाही चंग बांधून उत्तर देण्यास लागलों, तरी काय होणार? आणखी, जीव उपाधिबद्ध आहे, हा प्रत्यक्ष अनुभव आहे; उपाधित्याग केला असतां,-उपभोगदृष्टि टाकून दिली असतां, वासना व अहंकार यांचा संन्यास केला असतां-सुख लागतें, ज्ञान स्थिर होतें, व अस्तित्व प्राप्त होतें, हा अनुभव आहे; मग या व्यवहारतः निरुत्तर प्रश्नाचा विचार करून फायदा काय? उपाधीचें कारण वासना व अहंकार हें अनुभवानें कळलेलें आहे, तेव्हां कारणदृष्टीनेंही विचार करण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं.

व्यवहार संपत नाहीं, तोंपर्यंत कर्म संपत नाहीं; व कर्म हें कर्मफल भोगिल्याशिवाय नष्ट होत नाहीं; कार्यकारणनियम सदा अबाधितच असतात; असा विश्वास असेल, तर राहिलेल्या कर्मांचा व कर्मफलांचा उपभोग घेतलाच पाहिजे. हा संपला व ज्ञान झाल्यामुळें नवीन कर्म झालें नाहीं, तर जन्ममृत्यूचें चक्र थांबतें. मुक्त झालेल्या

प्राण्यास पुनः जन्ममरण नाहीं. संसार ह्मणजे जन्ममृत्यु अनादि आहे तर तो अनंतही असावा, असें कोणी ह्मणेल; पण हें ह्मणणें बरोबर नाहीं. मृत्तिकेच्या घटाचें उदाहरण घेऊन आतांच दाखविलें कीं, अनादि वस्तु ही केव्हां केव्हां सांत असते. तसेंच पुनः कोणी विचारील कीं मोक्ष झाला तरी पुनः जन्म येणें शक्य आहे. हें मिथ्या आहे; पहा कीं, एखादा घट आपण आपल्या देखत फोडिला तर आपल्यासमक्ष त्या घटविशेषाच्या अभावास आरंभ झाला; आणि हा अभाव कधींही नाहींसा होणें शक्य नाहीं. एवंच कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी शंका घेण्यास जागा उरत नाही.

## ज्ञानी पुरुषाचा विवेक व अज्ञानी पुरुषाचा अविवेक.

८. मागच्या परिच्छेदांत स्पष्ट करून सांगितलेंच आहे कीं, जीव हा कर्माच्या उपाध्यनुरूप शरीरान्तर करितो व जन्ममरणामध्यें सांपडतो. आतां हा जन्मांतर अथवा देहांतर करित असतां, सारांश '**मरत**' असतां, तसेंच जगत असतां व गुणांची उपाधि आपल्यामागें लावून घेऊन त्याच्या प्रेरणेनें विषयाचा उपभोग घेत असतांही ह्या सर्व जन्ममरण, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि उपाधींपासून **जीव, आत्मांश** अथवा **आत्मा वस्तुतः** हा निराळा आहे, हा आत्मा उपाधीच्या संसर्गानें लिप्त होत नाहीं, आत्मा कांहीं करित नाहीं व कांहीं भोगीत नाहीं, असें ज्ञानी लोक समजतात. ज्यांचें बुद्धिरूपी डोळे ज्ञानांजनानें दिव्य झाले, सारांश, अद्वैतज्ञानाच्या परिपाकानें, ईश्वरानुग्रहानें व गुरुकृपाप्रसादानें ज्यांस अद्वैताचें ज्ञानविज्ञान झालें, त्यांस मात्र असें अनुभवपूर्वक ज्ञान होतें कीं, ज्याला अज्ञानी लोक 'मी, मी' असें ह्मणून 'तो मरतो, तो जगतो, तो करितो व तोच भोगितो' असें मानितात, तो आत्मा, या सर्व देहरूपी म्हणजे क्षेत्ररूपी, अथवा अहंकारापासून तों थेट स्थूलदेहापर्यंत अस्तित्वांत आहेतशा दिसणाऱ्या उपाधिरूपी असद्वस्तूंपासून भिन्न, निराळा, अथवा विलक्षण आहे. उपाधि सद्वस्तु नव्हेत; हें आपण कैक वेळ समजून चुकलों आहों; आत्मा हीच काय ती एक सद्वस्तु आहे, हेंही आपल्यास गीताशास्त्रानुरोधानें समजलें आहे.

भगवान् ह्मणतातः हे नुसतें समजून उपयोगी नाहीं. तर शास्त्रज्ञान होऊन तज्ज्ञानपूर्वक ज्यांची तपश्चर्या ध्यानरूपानें अथवा कर्मरूपानें विज्ञान होण्यासाठीं चालली आहे, त्या लोकांस मात्र, त्या ज्ञानयोग्यांस मात्र, हा जीवात्मा आत्मस्वरूपामध्यें दिसतो. सारांश, जीव हा प्रत्यगात्मा, परमात्मा, आहे, असें ज्ञानविज्ञान केवळ शास्त्रज्ञानपूर्वक योगारूढ पुरुषांस मात्र होतें. नुसतें शब्दज्ञान, परोक्षज्ञान होऊन कांहीं उपयोगी नाहीं. त्याचा अनुभव आला पाहिजे. 'अनुभवावीण चावटीची बोली' अशा अर्थाचें एक तुकाराममहाराजांचें वाक्य आहे त्याचा तरी अर्थ हाच होय. 'अहंब्रह्माऽस्मि' (मीच ब्रह्म आहें) हें ज्ञान होण्याला या जन्मीं अगर पूर्वजन्मांत केलेल्या निष्काम सत्कर्मांनीं

चित्तशुद्धि, शास्त्रसंपादित व गुरुमुखानें प्राप्त झालेलें ज्ञान, व ईशस्वरूपीं अखंड निष्काम भक्ति आणि योगविहित ध्यानधारणा यांच्या निरंतर योगानें चित्ताची पूर्ण शुद्धि व मुमुक्षा अवश्य आहेत.

अद्वैतज्ञानाचे शास्त्रीय बोल पांडित्याच्या जोरावर उत्तम तऱ्हेनें प्रतिपादन करणारें बोलघेवडे दांभिक लोक या शुद्ध व संस्कृत अद्वैतशास्त्राच्या नांवावर व नांवाखालीं हजारों नीचपणाचीं कृत्यें स्वतःचें पोट जाळण्यासाठीं, अथवा कामवासनेची शांति करण्यासाठीं करीत असतात. हे लोक मोठे विद्वान असतील, यांची तर्कशक्ति अद्भुत असेल, यांची निष्ठुरवादपद्धति निरुत्तर असेल, यांची वाणी मधुर असेल, यांचे यज्ञयाग, यांची पूजाअर्चा, यांचें जपजाप्य, यांचें शिष्टाचरण, बाह्यतः डोळ्यांत धूळ टाकणारें व मनास चकित करून सोडणारें असेल, पण यांची विद्वत्ता, वक्तृत्व, वादपटुत्व, तर्कशौंडत्व, यज्ञयागादि तप, हीं त्यांचा स्वतःचा व त्यांच्या जाळ्यांत अडकवणाऱ्या बायाबापड्यांचा घात करण्यास कारण होतात. हे नीच लोक क्षणिक अथवा क्षणभंगुर विषयसुखप्राप्त्यर्थ दुसऱ्यांस मोहांत पाडून त्याचा व आपला घात करितात. अथवा, दुसऱ्या जीवांचा या नराधमांनींही काय घात करावयाचा आहे ह्मणा! ‘आपण या नाडलेल्या बायाबापड्यांस खूप चकविलें!’ असें मूर्खपणानें मानणारे हे नीच आणि ह्मणून अज्ञानी, अथवा अज्ञानी ह्मणून नीच राक्षस आपल्या मनांत खुशालतात व कांहीं वेळ आणि कधीं कधीं सर्व वेळ जगही यांची वाहवा करून यांस नरकपर्यवसायी शाबासकी देत असतें! पण या मोहांध पुरुषास ‘आपण मात्र चुकतों आहों, बुडतों आहों’ हें समजत नाहीं. आतां अज्ञानानें अथवा भक्त्यतिरेकानें झालेलें बायाबापड्यांचें पाप वस्तुतः सत्यमूर्ति ईश्वराच्या न्यायनिष्ठुर व्यवस्थेनें फारशा दंडास पात्र होणार नाहीं, ह्मणजे अर्थातच भाविक लोकांनां अज्ञानवशात् केलेल्या पापाबद्दल त्यांस फारसा भुर्दंड भरावा लागणार नाहीं; ह्मणजे हे भाविक लोकही फारसे फसले जात नाहींत, हें उघड आहे. पण ज्यांनीं त्यांस फसविण्याचा ज्ञानपूर्वक, जाणूनबुजून, प्रयत्न केला, त्यांस होणाऱ्या शिक्षेचा विचार कोण करूं शकेल? सारांश, हे दुष्ट, अधम, पातकी, दुराचारी, दांभिक आपल्यास मात्र, आपल्या ‘जीवास’ मात्र, साफ फसवितात आणि त्या जीवास ह्मणजे स्वतःस यातना भोगण्यास लावितात. ज्ञान आहे परंतु अनुभव नाहीं व अधिकार नाहीं ह्मणून अनुभव येणें शक्य नाहीं, अशा लोकांस ते काय स्वतः बडबडतात, त्यावर श्रद्धा नसते, आस्तिक्यबुद्धि नसते; या कारणानें त्यांचे कामक्रोध उग्र व घातुक असतात. हेच लोक विमूढ, हेच अकृतात्मे, हेच अचेतस होत. यांनीं आपल्या पायाकरवीं हजारों तीर्थयात्रा केल्या, हातांकरवीं कर्णासारखें दान देवविलें, कानांकरवीं पोथीपुराणें ऐकिलीं, किंवा जीभेकडून हजारों गीतापाठ करविले, लाखों यज्ञयाग केले किंवा घोर तपश्चर्या केली, तरी काय निष्पन्न होणार? विश्वामित्रासारख्या ऋषीनें साठ हजार वर्षें लोहपिष्ट भक्षण करून मोठी तपश्चर्या केली, पण परिणाम काय? उर्वशीच्या एका नेत्रकटाक्षास भुलून

त्या तपश्चर्येची मार्ता केली व कांहीं वेळ गोंडा घोलणाऱ्या कुलंग्या कुतऱ्याच्या जन्माला मात्र गेला!! चित्तशुद्धि नाहीं तर सोन्यासारख्या ज्ञानाचा काय उपयोग? श्रद्धा नाहीं, तर धन्वंतरीसारख्या दिव्य वैद्यानें अमृत पाजिलें तरी मृत्यूच यावयाचा! सारांश काय की, ज्ञान तर अवश्य हवेंच; पण त्या त्या ज्ञानाच्या आधीं चित्तशुद्धि व श्रद्धा हीं अवश्य, अवश्य हवीं आहेत. दुष्टमनस्क पुरुषाच्या हातीं ज्ञान ह्मणजे माकडाच्या हातीं कोलीतच होय! या साठींच प्रभूंनीं अठराव्या अध्यायाच्या ६७ व ७१ श्लोकांत श्रद्धा, निर्मत्सरबुद्धि व तपःशीलता यांचा विशेष गौरव केला आहे.

असो; पण जे ज्ञानचक्षु आहेत, जे योगी आहेत, व ज्यांचा पवित्र ध्यानयोगाभ्यास अखंड चालू असल्या कारणानें ज्यांस आत्मसाक्षात्कार अनुभविण्याची वास्तविक योग्यता प्राप्त झाली आहे, त्या लोकांस मात्र 'आत्मा हा उपाधीहून विलक्षण, 'अज, नित्य, शाश्वत, पुराण, कर्तृत्वभोक्तृत्वशून्य व जन्ममरणशून्य' आहे, असे समजतें व असे उमजतें. यांचें ज्ञान, यांची भक्ति, व यांचें कर्म आत्मपर मात्र असतें. पण जे अज्ञानी आहेत, अथवा ज्ञानी असून श्रद्धाशून्य आहेत, त्यांचें बाह्यात्कारी जरी सर्व नाटक चाललेलें असतें, तरी अंतःकरणशुद्धि झाली नसल्या कारणानें ह्मणा, अथवा श्रद्धाशून्यत्वानें ह्मणा, त्यांस 'आत्मा मरणारा, जन्म घेणारा, जगणारा, करणारा व भोगणारा' असें वाटत असतें, व ह्या 'जन्ममरण घेणाऱ्या आत्म्याला सुख व्हावें,' अशी आशा धरून ते यज्ञयागादि करितात; पण मुद्दा मुळांतच चुकलेला असतो, ह्मणून त्यास सुख होत नाहीं ते नाहींच, आणि त्या त्यांच्या 'आत्म्यांस' ह्मणजे देहोपाधीस अपरंपार दुःखार्णवांत गटंकळ्या खाव्या लागतात. देहाहून आत्मा निराळा आहे, हे ज्ञान अधिकारपरत्वें करून घेऊन त्यावर दृढ व अभंग श्रद्धा ठेविली, व मोह घालणाऱ्या क्षणिक सुखास न भुलतां श्रद्धाविहित आचरण करून पुनः चित्तशुद्धि केली, तरच हा जन्ममरणात्मक दीर्घ प्रवास आपल्यास कंठतां येणार आहे. श्रद्धापूर्वक ज्ञानविज्ञान होणें कठिण तर खरेंच; तथापि सद्गुरूपदिष्ट शास्त्रविहित मार्गानें चालण्याचा दृढनिश्चय करून जर आपण मार्ग क्रमण्यास सुरुवात केली, तर आपल्या हातून यथाशक्ति व यथाधिकार जे मार्गक्रमण होईल, तें आपल्या पदरांत पडेल आणि वरच्या वर्गांत जाण्याला परवानगी मिळेल.

असो; अद्वैतभाषेच्या पद्धतीनें वरील विस्तार कदाचित् आगंतुक आहे असें वाटण्याचा संभव आहे. पण जोंपर्यंत अद्वैतवादी संकल्पविकल्पास पात्र आहे, सूक्ष्मासूक्ष्म विचार करण्याचें भान त्याला आहे, '**मला** हें विवेचन अप्रस्तुत व अशास्त्रीय **वाटतें**' असा अहंकार जोंपर्यंत त्याला आहे, सारांश, देहात्मधी जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत माझ्या समजुतीनें तो पूर्ण अद्वैती झाला नाहीं; व जोंपर्यंत तो तसा झाला नाहीं, तोंपर्यंत शास्त्रविहित आचरण व त्या त्या आचरणावर पूर्ण श्रद्धा ह्या गोष्टी आवश्यक

आहेत, असें मला वाटतें व माझ्यासारखेंच पुष्कळ इतरांसही असेंच वाटत असेल म्हणून हा विस्तार केला आहे. ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं, हें जितकें खरें आहे, तितकेंच खरें हें आहे कीं, त्या ज्ञानाला विज्ञानत्व येण्याला श्रद्धा व श्रद्धाविहित आचरण इष्ट व अवश्य आहे. अद्वैती ह्मणविणाऱ्या वेदांत्यांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ' त्याच्या जीवाची सुटका व्हावी व ती सुखानें व्हावी अशी त्यांची इच्छा आहे, तशी सुटका जगाचीही व्हावी आणि तीही पण सुखानें व्हावी अशी ईश्वरी योजना आहे.' तेव्हां स्वतःच्या जीवविमोचनाच्या नांवावर, पण स्वतःच्या देहाप्रीत्यर्थ, जें पाप आपण करितों अथवा दुसऱ्यास आपल्या देहोपभोगाप्रीत्यर्थ दुःखांत घालितों, तें दुःख प्रत्यक्ष रीतीनें दुसऱ्यास होतेंसें दिसतें; पण वस्तुतः तें दुःख स्वतःच्याच बोकांडीला बसत असतें. हें कदाचित् त्यांस येथें किंवा आतां समजणार व उमजणारही नाहीं, पण असा काळ व असें स्थळ खचित् असलेंच पाहिजे कीं, जेथें व जेव्हां प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें व आल्या नंतर त्यांच्या डोळ्यांत उत्तम अंजन पडेल.

सत्यप्रतिज्ञ पुरुष तो होय कीं, जो बोललेलें स्वतः खरें करून दाखवितो, आणि नुसती सत्यप्रतिज्ञत्वाची स्तुतिच करित नाहीं. ह्याचप्रमाणें ज्ञानी पुरुष तोच होय कीं, चित्तशुद्धि होऊन ज्याला अद्वैतज्ञानाचा बोध झाला आहे, व त्या बोधानुसार उमज पडे तोंपर्यंत त्याचें विहित आचरण होत आहे. एकदा उमज पडला, ' राममय वृत्ति झाली, ' अहंकार, बुद्धि, मन व इन्द्रियें सप्राण आत्मस्थितींत जाऊन तदाकार झालीं-तादात्म्य पावलीं-भूतभविष्यवर्तमान नष्ट झालें, स्थलाभास विरून गेला, देहस्थितीवर शून्य पडलें, ह्मणजे मग त्याच्या त्या देहाला शुद्ध काष्ठमयत्व प्राप्त होतें व होणार. मग मात्र पापपुण्य नाहीं. लंगड्या मनुष्यास मदत करणारी व आंधळ्यास वाट दाखविणारी काठी मदत करून अथवा वाट दाखवून जसें पुण्य संपादन करित नाहीं, त्याचप्रमाणें गाईस अगर अनाथास मारण्यासाठीं हातांत घेतलेली काठी पापसंचयही करित नाहीं! ह्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या देहाची व्यवस्था आहे. प्रारब्धयोगानें कांहीं काल तो देह हालचाल करील. सतार छेडतांना उपयोजिलेली नखी वर उचलल्यानंतर आंदोलन करणारी तार हालचाल करतेना? साप मारिला, बकरें मारलें किंवा एकदम एखाद्या मनुष्याचें डोकें उडविलें असतांही, कांहीं क्षणपर्यंत जसा त्या सापाचा अथवा बकऱ्याचा देह हालचाल करितो, मनुष्याचें धड धडपडत असतें, तद्वतच ही ज्ञानी मनुष्याच्या देहाची हालचाल होय. एकदम आपल्यापुढें कोणी टाळी वाजविली, ह्मणजे भिण्याचें कारण नसूनही आपले डोळे मिटतात, आपल्या मागें कोणी एकदम ओरडलें असतां आपण जसें एकदम दचकतों, एकदम जागा केलेला पुरुष आपली जन्मभाषा बोलतो, व्यसनी पुरुष मनांत नसतांही आपल्या अंमली पदार्थांचें सेवन करितो, कवाईत शिकलेला शिपाई खुणेचा हुकुम ऐकल्याबरोबर संवईची कवाईत करितो, त्याचप्रमाणें ज्ञानविज्ञानी पुरुषाच्या देहाला सदाचरण करण्याची मात्र संवय लागून गेल्या कारणानें त्याच्या

त्या इच्छाशून्य झालेल्या जीवाच्या काष्ठवत् देहाकडून सदाचरणच व्हावयाचें. एका वळणावर घटलेला हात त्याच वळणाचें अक्षर काढील. दुसऱ्या तऱ्हेचें अक्षर काढण्यास मनःपूर्वक खटपट केली पाहिजे. पण ज्ञानी पुरुषांचें मनच नष्ट झालेलें असतें म्हणजे ज्ञानमय झालेलें असतें, म्हणून मनःपूर्वक—संकल्पविकल्पपूर्वक—आचरण करणें त्यांस शक्यच नसतें; म्हणून त्याच्या देहाकरवीं पापाचरण होण्याचा संभव नाहीं. मनानें संकल्प केला व बुद्धीनें निव्वळ संवयीच्या जोरावर निश्चय केलाच, तरी ज्ञानी पुरुषाच्या मनास सत्संकल्प करण्याचें व बुद्धीस सम्यक् निश्चय करण्याचें 'व्यसन' लागलें असल्यामुळें, त्यांचें संकल्पविकल्प व निश्चय लोकहितकारीच व्हावयाचे आणि संकल्पविकल्प व निश्चय जाऊन नुसता देहच राहिला, तर तो जड असल्यामुळें पापपुण्यविरहितच असावयाचा आहे. असो; याचा विचार प्रभूंना अठराव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकांत पुनः एकदां केलाच आहे, त्याचें स्मरण माझ्या अद्वैती मित्रांस देऊन मी त्यांची रजा घेतों.

## ईश्वरविभूतिवर्णन.

येथें १२।१३।१४ व १५ श्लोकांत प्रभूंनी आपल्या तेजात्मक विभूतीचें वर्णन दिग्दर्शन रूपानें केलें आहे. सर्व जगतांस आपल्या तेजानें प्रकाशित करून त्यांस ज्ञानगोचर करणारें जें सूर्यतेज आहे, जें चंद्रतेज आहे, व जें अग्नितेज आहे, तें सर्वहि प्रभूच्या सत्तेनें मात्र निर्माण होणें शक्य आहे. प्रभुतेजानें सूर्यचंद्रादि प्रकाशमान होऊन दुसऱ्यास प्रकाश देतात; पण प्रभुतेजावर प्रकाश पाडणारें, प्रभुतेजाला प्रकाशित करणारें, दुसरें तेज नाहीं! सर्वांचें आणि म्हणून सर्व तेजाचें अधिष्ठान जो प्रभु, त्याला कोण प्रकाशित करील? अर्थात त्याचा तोच होय. अग्नीचें तेज घर्षणानें प्रकट होतें, चंद्राचें तेज स्वतःसिद्ध नसून उसनें आणिलेलें आणि सूर्याचें मात्र तेज स्वतःसिद्ध आहे, असें प्राचीन व अर्वाचीन ऋषि म्हणतात. गतीपासून उष्णता उत्पन्न होते, हें हल्लीं प्रत्यक्ष प्रमाणांनीं व अनुमानानें ठरलें आहे. आतां सूर्यबिंबांत जें तेज प्रत्यहीं प्रकट होतांना दिसतें, तें कां स्वयंभू आहे, अगर तेथेंही घर्षणाचा अथवा दाह्य पदार्थांचा मोठा कारखाना असून त्या योगें हें उत्पन्न होतें, अथवा पूर्वकाळीं तेथें घर्षणजन्य उष्णता परिपाकास गेली होती पण ती प्रत्यहीं कमी होत आहे व सूर्यबिंब प्रत्यहीं निवत आहे, तथापि प्रायः अपरिगणनीय तेजाचा स्वामी सूर्य आहे, अशा अनेक उपपत्तींसंबंधें युरोपियन ऋषींत-(म्हणजे विश्वज्ञानाची निःसीम भक्ति एकनिष्ठेनें करणाऱ्या तत्त्वज्ञांत) मोठें रण माजून राहिलें आहे. आमच्या सर्वज्ञ प्रभूंनी एक गोष्ट ठाम सांगून टाकिली आहे कीं, हें सूर्यतेज स्वयंभू नाहीं; तें परमेश्वराच्या सत्तेनें उत्पन्न झालेल्या उपाधींच्या साहचर्यानें तेथें वास करीत आहे. असो; भगवान् म्हणतातः मी पृथ्वीमध्यें व भूतांमध्यें सूर्यकिरणरूपानें अथवा गुरुत्वाकर्षणरूपानें शिरून सर्व जगतें व त्यांवर विराजमान होणारीं चराचर भूतें यांस आपल्या आकर्षणरूपी सामर्थ्यानें आपआपल्या

स्थानीं स्थिर करितों. न्यूटननें गुरुत्वाकर्षणाची उपपत्ति शोधून काढिली ती हीच नव्हे काय ? शून्य आकाशांत फिरणारी पृथ्वी व दुसरे ग्रहगोल, तसेंच पृथ्वीवर व इतर गोलांत हालचालीचा व्यापार करणारे जीव, या सर्वांस मी आधारभूत होतों हा सिद्धांत लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. तसेंच रसात्मक सोम होऊन मी चंद्ररूपानें सर्व औषधांचें पोषण करितों, हेंही वाक्य गीताभक्तांनीं विसरूं नये. रात्रीच्या समयीं सर्व वनस्पती 'कारबानिक आसिड' बाहेर टाकून 'आक्सीजन' म्हणजे प्राणवस्तूचें शोषण करून पुष्ट होतात, हें तत्त्व सिद्धांतरूपानें नुकतेंच प्रकट झालें आहे. ह्याच सिद्धांतांचें तर प्रभूंनीं १३ व्या श्लोकांत दिग्दर्शन केलें नाहींना ? ते ह्मणतात; मी वैश्वानर नामक अग्नि होऊन प्राण्यांच्या देहामध्यें शिरतों आणि प्राण व अपान या उभयतांच्या साहाय्यानें प्राणी जें चतुर्विध अथवा चारी प्रकारचें अन्न सेवन करितात, त्याचें पाचन करितों. याप्रमाणें प्राण्यांचें अन्नपाचन, त्यांचें जीवन ज्या वनस्पती, त्यांचें पोषण आणि त्यांचें व्यापार व त्यांचें वास्तव्यस्थान या सर्वांस आधार एका परमेश्वरी तेजाचा मात्र आहे. यांतच 'सामर्थ्यांचें अव्ययत्व ( Conservation of Energy )' नामक आधुनिक तत्त्वाचें दिग्दर्शन आहे, असें मला वाटतें.

असो; परमेश्वर शेवटीं सांगतातः सर्वांचे हृदयात्म्याचे ठायीं नियामक-शक्तिरूपानें, मनोरूपानें, ज्ञानरूपानें, स्मृतिरूपानें व तर्करूपानें मीच असतो. म्हणजे सर्वांची विवेकबुद्धि ( Conscience ) ज्ञान ( Conception ) मन ( Perception ) स्मृति ( Memory ) व अपोहन ( Faculty of Inference or Judgment ) मीच आहें. तात्पर्य, ज्ञान हें वस्तुतः एकरूपच असून मानसिक सामर्थ्यांचें अव्ययत्व निराबाध आहे. अध्यात्मिक शक्तींचें अव्ययत्व व त्याचप्रमाणें अध्यात्मिक सामर्थ्यांचें अव्ययत्व सांगून पुनः ते ह्मणतातः सर्व प्रामाणिक शास्त्रांनीं वेद्य अथवा ज्ञेय वस्तु, तसेंच त्यांचा कर्ता म्हणजे ज्ञानरूपीईश्वर व त्यांचा जाणणारा अथवा ज्ञाता, मीच आहें. सारांश, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या तिन्ही वस्तूंचें, या त्रिपुटीचें, आदिस्थान मीच आहें.

याप्रमाणें सर्व तेजांचा अथवा अधिभौतिक सामर्थ्यांचा आदिउगम व आदिस्थान, सर्व अध्यात्मिक शक्तींचें आदिपीठ, आणि सर्व अधिदैविक शक्तीचें अथवा ज्ञानांचें दैवत, परमेश्वर आहे. सर्व शारीरिक ( Physcial ) मानसिक ( Mental ) व आत्मिक ( Spiritual ) वस्तूंचें आदिस्थान, वसतिस्थान आणि विलयस्थान परमेश्वर आहे असें झालें. एवंच सर्वत्र सच्चिन्मय परमात्मा ओतप्रोत भरलेला आहे असें सिद्ध झालें.

अपोहन याचा अर्थ कोणी अज्ञान अथवा ज्ञानासंभव करितात तो कितपत ग्राह्य आहे हें भाष्यावरून स्पष्टच आहे.

[४०९]

## जीव व जीवन यांमधील तारतम्य.

१० येथील विश्वरचनेंत 'पुरुष' शब्द दोन वस्तूंस लावितात. क्षरालाही पुरुष म्हणतात व अक्षरालाही 'पुरुष' म्हणतात. 'रामा स्थूल पुरुष आहे' येथें देहास, 'रामाला दिसलें नाहीं' येथें इंद्रियांस, 'रामाला संशय आला' येथें मनास, 'रामानें निश्चय केला' येथें बुद्धीस, याप्रमाणें क्षर म्हणजे विनाशवंत जे देह, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादि पदार्थ त्या सर्वांस पुरुष शब्द उपयोजिण्याची वहिवाट आहे. हा क्षर पुरुष होय. हा विनाशी आहे, हें मागें अनेक वेळां सांगितलें आहे. जीवाचें हें खरें स्वरूप नमून क्षरवर्गांत येणारे सर्व पदार्थ निवळ उपाधि आहेत. परंतु अज्ञानानें आपण त्यांस पुरुषत्व देतों. तत्त्वसंशोधन करावयाचें आहे व अज्ञानाचा नाश करावयाचा आहे, म्हणून या 'लौकिक' दुष्ट दुराग्रहाचा निरास करणें भाग पडलें आहे. असो; हें क्षर म्हणजे सर्व दृश्य चराचर भूतें होत. या भूतांच्या, व विशेषतः चरभूतांच्या, देहेंद्रियादिकांस अधिष्ठानभूत असणारा जो 'अक्षर', त्यालाही 'पुरुष' ही संज्ञा आहे. या अक्षराला कूटस्थ असे म्हणतात. हा कूटस्थ म्हणजे सूत्रात्मा होय. एखाद्या माळेच्या मण्यास आधारभूत दोरा असतो, त्याला सूत्र असें म्हणतात. आतां अनेक अथवा अनंत शरीरे ज्या एका जीवनकलेला प्राप्त होतात, ती जीवनकला म्हणजे चैतन्यांश होय. एका चैतन्यांशाला जन्म प्राप्त होऊन तो संसारांत पडला असतां त्याला जे अनेक अथवा अनंत देह प्राप्त होतात, ते त्याच्या कर्मानुसार होतात. पण हे देहेंद्रियादिक सर्व उपाधि त्या एका चैतन्यांशाला–कूटस्थाला–अथवा 'अक्षराला' होतात. हा चैतन्यांश देपहारैच्छिन्न असतो. याचें स्वरूप बदलतें, परंतु याची एकात्मता मोडत नाहीं. हा चैतन्यांश म्हणजेच जीव होय. याला 'कारणदेह' असें म्हणण्यालाही कांहीं हरकत नाहीं. असो; तेव्हां हा जो चैतन्यांश किंवा जीव, हा दुसरा 'अक्षर' नामक पुरुष होय, क्षर म्हणजे स्थूल व सूक्ष्म देह, आणि अक्षर म्हणजे कारणदेह, होत. इतकेंच कीं, या कारणदेहांत चैतन्यांश रहात असतो, म्हणून हा अमर आहे व अक्षर आहे, परंतु अव्यय नाहीं. हा अक्षर उपाधीच्या स्वाधीन म्हणजे परतंत्र आहे. तसेंच हा कारणदेह परिच्छिन्न आहे. येणेंप्रमाणें क्षर आणि अक्षर हे दोन पुरुष आहेत, व यांचा संबंधही आतां स्पष्टच असा आहे कीं, क्षरात्मक देहाचा त्याग करून अक्षरात्मक देहाचें भान ठेवावें व तदनुसार वर्तन राहावें. देह हा अक्षर नव्हे, जीव अक्षर आहे हा यांमधील संबंध आहे. जीवन नाशवंत व जीव अमर आहे. 'अमर आहां, अमर आहां। खरें कीं पहा खोटें हें.'

तुकाराम.

## जीव आणि शिव.

११ जीव हा अक्षर म्हणजे अमर आहे, पण अव्यय नाहीं. आतां जीवाच्या पलीकडे असणारा, जीवास जीवत्व देणारा सर्व विश्वाला आधारभूत असून सर्व विश्वभर

पसरून असलेला, सर्व विश्वांचा व सर्व जीवांचा नियामक, व स्वभावतः अविकारी व अविनाशी असा जो परमेश्वर, तो शिव होय. प्रत्येक देहामध्यें क्षरपुरुष, अक्षरपुरुष आणि पुरुषोत्तम, ह्यांचें ठाणें आहे. अज्ञानकाळीं आपण 'क्षर' पुरुष आहों, असें आपल्यास वाटतें; पण या क्षरासच आपण उत्तम असें अज्ञानकाळीं समजतों. थोडेसें ज्ञान व विशेषतः शास्त्रज्ञान झालें, म्हणजे 'अक्षरा' चें भान होतें; आणि पूर्णप्रज्ञत्व प्राप्त होऊन ज्ञानविज्ञान झालें म्हणजे आपणच 'शिव' 'पुरुषोत्तम' होतो. क्षर आणि पुरुषोत्तम यांमध्यें एका 'अस्तित्वाशिवाय' दुसरें साम्य नाहीं. अक्षर आणि पुरुषोत्तम हें उभयतां चैतन्ययुक्त आहेत, अमर आहेत. पण जीव परतंत्र आहे, शिव स्वतंत्र आहे; अक्षर परिच्छिन्न आहे, आणि शिव सर्वव्यापी आहे. व्यवहारकाळीं जीव अल्पज्ञ आणि अल्पानंदी असतो. तसेंच आपण मर्त्य आहों, असें त्यास वाटतें. शिव सर्वज्ञ व सर्वानंद असून अमर आहे. पण उभयतांही ज्ञानी व आनंदी व अमर आहेत. हें या दोघांत साम्य आहे. जीवाला शिव होतां येईल. मात्र त्यानें उपाधींचा ज्ञानपूर्वक त्याग केला पाहिजे.

## पुरुषोत्तमश्रेष्ठत्व.

१२ उत्तम पुरुष म्हणजे परमात्मा होय. तिन्ही लोकांच्या अंतर्यामीं अखंडत्वानें राहून जो सर्व लोकांत ओतप्रोत भरलेला आहे, ज्याच्या सत्तेनें ह्या अनंत त्रैलोक्याचे सर्व व्यवहार चालतात, जो स्वतः अव्यय म्हणजे निर्विकार असून पुनः सर्वांचा स्वामी, नियंता व साक्षी आहे, तो परमात्मा होय. हें परमात्मस्वरूपाचें लक्षण समजतांक्षणींच आपल्यास ज्ञान होईल कीं, वर जे दोन क्षर व अक्षर असे पुरुष सांगितले, त्यापेक्षां हा तिसरा पुरुष श्रेष्ठ आहे. कारण (१) क्षर म्हणजे नाशवंत जे पदार्थ आहेत, त्यापेक्षां अव्यय, षड्विकारहीन पदार्थ श्रेष्ठ असलाच पाहिजे. इतकेंच नाहीं, तर क्षर आणि हा तिसरा पुरुष यांमध्यें तुलनाही करितां येणें शक्य नाहीं. क्षराच्या फार पलीकडचा हा परमात्मा नामक पदार्थ आहे. उत्पत्ति, वृद्धि इत्यादि सहा विकार जे क्षराच्या अंगभूत आहेत, त्यांचा याला स्पर्शही नाहीं. याची साहजिक वृत्ति सदैव एकरसात्मकच असते. (२) पुनः, कूटस्थ म्हणजे ज्याला अनेक जन्म प्राप्त होतात तो सूत्रात्मा 'निर्विकार असतो, खरा;'–त्याचें मूळचें स्वरूप बदलत नाहीं हें खरें;–पण तो संकुचित स्थळीं, एका वेळीं एका देहास धरून राहणारा आणि उपाधींच्या व परमेश्वराच्या आधीन आहे. त्रैलोक्यामध्यें अप्रतिहत संचार करून त्रैलोक्यधारणाचें अगर नियमनाचें सामर्थ्य त्याला नाहीं. ह्मणून सूत्रात्मा जरी परमार्थतः अविकार्य आहे, तथापि तो संकुचित स्वरूपाचा आहे, परतंत्र आहे, व कालस्थलपरिच्छिन्न आहे, व संस्कारानुसार उत्क्रांत व अपक्रांत होणारा आहे, ह्मणून त्या कूटस्थापेक्षांही परमेश्वर श्रेष्ठ आहे. अर्थातच पुरुषोत्तम हें नांव त्यालाच योग्य

आहे. व्यवहारामध्यें व वेदांमध्यें पुरुषोत्तमाचें श्रेष्ठत्व वरील कारणांकरितां मानितात. जीव ( soul ) अमर आहे, असें ख्रिस्तीशास्त्र सांगतें: कारण काय कीं, तो जीव परमेश्वराचा अंश आहे. हें कारण ७ व्या श्लोकांत आलेंच आहे. पण पुनः येथें सांगितलें कीं, जीव अनाद्यनंत आहे, कारण स्वशुद्धीकरितां अनेक देह धारण करून संस्कृत होईपर्यंत जीवाला आत्मस्वरूप प्राप्त होणें शक्य नाहीं. व जीवास आत्मस्वरूप मिळावयाचें आहे हा सिद्धांत आहे. सारांश, अनेक जन्मांच्या साहाय्यानें परिशुद्धि होऊन सिद्धि मिळाल्याखेरीज, त्या अजरामर सूत्रात्म्याला सर्वात्मत्व येत नाहीं. जीव हा शुद्धचैतन्यस्वरूप नाहीं, ह्मणून त्याला जन्ममरण आहे. हें ज्ञान ख्रिस्ती लोकांनीं घेण्यासारखें आहे, असें वाटतें. असो; पुरुषोत्तम सर्वज्ञ, सर्वकर्ता, सर्वमंगलगुणस्वामी, स्वतंत्र, अपरिच्छिन्न आहे ह्मणून तो सर्व पुरुषांत उत्तम आहे हें ठरलें.

## पराभक्ति.

१३ प्रभु १९ व्या श्लोकांत ह्मणतातः अर्जुना! क्षराच्या अत्यंत विपरीत असणारा ह्मणजे अविनाशी व अविकार्य असणारा, आणि अक्षर जो जीव ह्मणजे ज्ञानाचा अंशरूपानें अधिकारी असणारा सचेतन प्राणी, त्याहून अतिशय श्रेष्ठ असा जो सर्वातीत आणि सर्वश्रेष्ठ पुरुषोत्तम, त्याचें यथार्थस्वरूप जो जाणतो, ईश्वर सर्वज्ञ, सर्वव्यापी, अव्यय, निर्विकार, निरंजन, निर्विकल्प इत्यादि अनेक मांगलिक गुणांनीं व्यावहारिक स्थितीमध्यें युक्त असतो असें ज्याला ज्ञान झालें आहे, आणि हें ज्ञान होत असतां ज्याचें सर्व अज्ञान, समूळ व सकारण नष्ट झालें आहे, असा ईश्वरी भक्त लवकरच अध्यात्मशास्त्रांच्या श्रवणमनननिदिध्यासानें सर्वज्ञ होतो, आणि सर्वत्र ( म्हणजे सशक्तिक पंचमहाभूतें, मन, बुद्धि, अहंकार इत्यादिकांचें ठिकाणीं ) परमेश्वराचें अखंड स्वरूप त्यास दिसूं लागून, तो सर्वत्र व सर्वदा परमेश्वराची अंतःकरणसर्वस्वानें व पूर्णश्रद्धेनें भक्ति करितो. विषयांवरून मन सर्वथा काढून विषयाला सत्ता देणारा जो परमेश्वर, त्याचें तो ध्यानरूपानें अखंड भजन करीत असतो. ही भक्ति अगर ही भक्तीची जी पराकाष्ठा, तिलाच पराभक्ति असें ह्मणावयाचें. आपल्या आत्म्यासह सर्व विश्व परमेश्वरमय आहे, असें ज्ञानविज्ञान होऊन विषयापासून पूर्ण पराङ्मुखता झाली आणि नित्य व अखंडत्वानें समाधीची अवस्था अथवा साम्यावस्था स्थिर होऊन तीच साहजिक अवस्था झाली असतां पराभक्ति प्रकट होते. येथें आनंदाची मर्यादा संपते. ज्ञानही लंगडें पडून पाठीमागें राहतें. येथें केवळ सत्तारूपानें अथवा ब्रह्मरूपानें साहजिक अवस्था प्राप्त होते. ह्या समाधीला कायमपणा आला, सत्तारूपानें राहणें हीच साहजिक अवस्था होऊन आनंदाचें भान नाहीं, ज्ञानाचें ज्ञातृत्व नाहीं, तर आनंदरूप, ज्ञानरूप असणारी जी सत्ता, अस्तित्व, तेंच स्वरूप प्राप्त होतें. हेंच पूर्णत्व होय. समरस किंवा एकरस म्हणतात, तें हेंच. अभेदभक्ति ह्यालाच ह्मणावयाचें. पराभक्ति करण्याचें कारण हेंच कीं, सर्व विश्वाला

व्यवहारकाळीं उत्पन्न करून व संरक्षण करून त्याचा लय करणाऱ्या, अथवा ज्याच्या साक्षित्वानें विश्वोत्पत्तिस्थितिलय चालतात त्या, परमेश्वराचें ह्मणजे कारणस्वरूपाचें ज्ञान झालें म्हणजे विश्वज्ञान होतें. ईश्वरच कर्ता व करविता, फलदाता व फलभोक्ता आहे या ज्ञानानें, जीव कर्ताभोक्ता आहे अशा ज्या अज्ञानजन्य भावना असतात, त्या नष्ट होतात. ईश्वर जसा सत्यसंकल्प, सत्यप्रिय, सत्याचरण करणारा आहे, तो जसा उदार आहे, तो जसा पापशून्य आहे, तसेंच सत्यनिष्ठ उदार व पापशून्य आपण व्हावें, अशी इच्छा ईश्वरस्वरूपज्ञानानें व भक्तिजन्यविज्ञानानें होते. सारांश, पूर्वजन्मसंस्कारांनीं जें अज्ञान आपल्यास प्राप्त झालें असतें, त्याचा निरास भक्तीनें मात्र होण्यासारखा आहे. शास्त्रीयज्ञानानें स्वरूप मात्र कळेल ह्मणजे शाब्दिकज्ञान तेवढें होईल. आपणही तसेंच व्हावें अशी इच्छा नसेल, तर तें ज्ञान निरुपयोगी होईल. साधनचतुष्टयांत शमदमादि-षट्काचें साधन करण्याचा उपदेश केला आहे त्याचा अर्थ हाच कीं, परमेश्वरभक्तीनें ह्या सर्व षट्काचा लाभ करून घ्यावा, आणि मग ज्ञानार्जनास लागावें. खऱ्या भक्तीनें ज्ञान वाढतें आणि खऱ्या ज्ञानानें भक्ति वाढून शेवटीं ज्ञानाला विज्ञानाचें स्वरूप अधिगत होतें आणि प्राणी मुक्त होतो. ज्ञान हें कैवल्याचें मुख्य साधन तर खरेंच; पण केव्हां? त्याला पराभक्तीची जोड मिळेल तेव्हां. परंतु त्याला जर कां भक्तीची जोड मिळाली नाहीं, तर प्रभूंनीं बाराव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानाचा मार्ग अतिदुष्कर होतो.

उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः।
तथैव ज्ञानकर्माभ्यां जायते परमं पदं ॥

(पक्ष्याला दोन्हीकडे पंख असले ह्मणजे जसा तो अमर्याद आकाशांत अनिरुद्ध पणानें अभिसंचार करितो, त्याचप्रमाणें प्राण्याला ज्ञान आणि भक्तिरूपी कर्म यांचें अपरिमित साहाय्य असलें ह्मणजे परमपदाला जाण्याचें त्याचें काम सहज व लीलेनें होतें.)
योगवासिष्ठ.

असो; तेव्हां पराभक्तीचें स्वरूप, पराभक्तीचा हेतु व पराभक्तीचें फल या एकोणिसाव्या श्लोकांत सांगितलें आहे. कर्माचें पर्यवसान भक्ति, भक्तीचें पर्यवसान ज्ञान आणि ज्ञानाचें पर्यवसान मोक्ष आहे. कर्मानें इहलोक व परलोक व सामान्य देवता प्रसन्न होतात; भक्तीनें परमेश्वराला वश करितां येतें; आणि ज्ञानानें मोक्ष मिळतो. हें ज्ञान मिळविण्याला व विज्ञान संपादन करण्याला भक्ति व तिची पराकाष्ठा पराभक्ति हीं अवश्य साधनें आहेत. भक्तीशिवाय मोक्षमार्ग चढूं पाहील तो फसेल.

## ज्ञान आणि कर्म.

१४ 'ज्ञान होतांक्षणीं जीव कृतकार्य होतो' हें भगवंतांचें वाक्यच, 'ज्ञान हें मात्र आशापाशाला तोडणारें शेवटचें शस्त्र आहे,' असें स्पष्टपणानें सांगत आहे. 'मी पूर्ण आहे,

सर्वव्यापी आहे, अजर आहे, अमर आहे, सुखदुःखातीत आहे, निर्विकार आहे, निरंजन आहे, असें ज्ञान झालें, म्हणजे मग आशेला कांहीं स्थळच उरत नाहीं. ब्रह्मज्ञान झालें म्हणजे आशा मरते. आशा मेली म्हणजे आपलें कर्तव्य संपतें.

'हा संसारच जीवाला तारणाचा मार्ग दाखविणारा आहे' असें विधान केल्याबरोबर हजारों अद्वैतवादी, हजारों धार्मिक, माझ्यावर क्रुद्ध होतील हें मला विदित आहे; तथापि मी पुनः असें म्हणतों कीं, येथील संसार हाच नीट रीतीनें केला तर तो आम्हांस तारक होतो. पहा कीं, 'माझ्याकरितांच हें सर्व विश्व निर्माण झालें आहे, असें ह्मणणारा अज्ञानी जीव कांहीं वेळ येथें राहिला, व त्याला जगाचा, जीवनाचा व समाजाचा थोडासा अनुभव आला म्हणजे स्वसुखाकरितांच कां होईना, पण तो दुसऱ्याची सोय पाहूं लागतो; ह्मणजे विश्व हें माझ्या उपभोगाकरितां आहे, तसेंच दुसऱ्यांच्याही उपभोगाकरितां आहे, अशी त्याची समजूत होते. ही समजूत प्रायः कुटुंबांत प्रथमतः होते. स्वतःचें सुख क्षणभर एकीकडे टेऊन बायकापोरांची काळजी करणें हें काम तो मायेनें करितो खरा; पण हीच माया, तो जीव थोडासा विचार करणारा असेल तर, त्याच्या आत्म्याची सीमा विस्तृत करणारी होते. 'मला मूल व्हावें' ही आशा अज्ञानी पुरुषाला संसारबंधांत जास्त घालील, पण ज्ञान्याला ती सोडविण्यास कारण होईल. मुलाचे लालनपालनांतच दया, क्षमा, उपकार इत्यादिकांचें शिक्षण आपल्यास मिळतें. पुष्कळ लोक हें शिक्षण घेत नाहींत, हा संसाराचा दोष नव्हे. पुनः, आपल्या उदरपोषणास लागणारे पदार्थ थोड्या श्रमांत आपल्यास मिळावें एतदर्थ आपल्याला सृष्टीचें स्वरूप नीटपणानें समजून घ्यावें लागतें, व हें स्वरूपाविष्करण चालत असतांनाच सृष्टिकर्त्याच्या अभंग व्यवस्थेची ओळख होऊन, त्यांजविषयीं खरी पूज्यबुद्धि व खरें स्वरूपज्ञान आपल्यास होतें. हें ज्ञान **आपण करून घेतलें नाहीं,** ह्मणून ही **बिचारी सृष्टि** दोषास पात्र आहे की काय? सारांश, ज्ञानदृष्टि जर प्रथमपासूनच जागृत ठेविली, तर आपलें कुटुंब, आपला देश, हीं पंचमहाभूतें आपल्या पंथक्रमणास उत्तम प्रकारें साहाय्य करितील. पण मध्ययुगांतील आमचे पूर्वज अत्यंत भ्याड झाले ह्मणून ह्मणा, किंवा अज्ञानानें त्यांस ज्यास्त घेरिलें ह्मणून ह्मणा, अगर अद्वैतपंथासारख्या उत्तम सिद्धांतावर स्थापित केलेला धर्म त्यांच्या आटोक्याच्या बाहेरचा झाला ह्मणून ह्मणा, कोणत्या तरी कारणानें आमच्या कडील पूर्वजांस संसाराचें व विश्वाचें अत्यंत भय वाटूं लागलें, आणि म्हणूनच स्त्रीपुत्रांविषयीं, बांधवांविषयीं, विश्वाविषयीं त्यांनीं आपलें अनुदार विचार प्रकट केलेले दृष्टीस पडत आहेत. आशा व कर्म ह्या वस्तु प्रामाणिकतः चांगल्या आहेत; पण योजक जर अज्ञानी भेटला तर मात्र त्यांच्याचमुळें बंधनही ज्यास्त होतें. मोक्षाची आशा, मुमुक्षा, उत्तम आहे. परोपकाराचीं स्वार्थप्रशामक कर्में चांगलींच होत. सर्व आशा नष्ट करणें याचा अर्थ उपभोगाची आशा नष्ट करणें हा आहे. **सकामकर्माला** अधिकारपरत्वें रजा द्यावयाची आहे, हें तारतम्य ध्यानांत न राहिल्यामुळें आम्हीं श्रीमंत

असूनही दरिद्री झालों ! आमच्या प्राचीन पूर्वजांनीं या विश्वोदरांत शिरून आपल्या धैर्यवंत तर्कवितर्कांनीं व प्रमाणसिद्ध कल्पनांनीं जे अद्वितीय शोध लाविले, जे सुखदायक पदार्थ उत्पन्न केले, जीं शास्त्रें व ज्या कला प्रकट केल्या,—कीं ज्याच्याकडे पाहिल्याबरोबर अलीकडील शोधकांनीं, शास्त्रज्ञांनीं व तत्त्वज्ञांनीं तोंडांत बोटेंच घालावीं !—त्या सर्वांवर पाणी पडून 'आमच्या खापरपणज्यांच्या खापरपणज्यांचे खापरपणजे बुद्धिमान होते' **ह्या सांगण्याच्या मात्र गोष्टी**-काहण्या, राहिल्या ! ज्ञानदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम इत्यादि साधुपुरुषांनीं थोडीशी उचल केली, पण सर्वच देश अज्ञानाच्या निबिड अंधकारांत व मृत्युनिद्रेमध्ये घोरत पडला असल्यामुळें वरील विद्युत्प्रयोगाचा उपयोग झाला नाहीं. 'कर्म सोडावें' ही शास्त्रशुद्ध पण अज्ञानजन्य इच्छा, कर्मप्रतिबंधक झाली. पण आशेमुळें कर्म तर सुटेना, ह्मणून सामान्य प्रतीचीं मात्र कर्में राहिलीं. सामान्यतः कौटुंबिक संसाराची प्रगति झाली नाहीं; विश्व ज्ञानाला आम्ही आंचवलों; आणि उत्तम देश, उत्तम हवा, उत्तम नद्या, उत्तम जमीन, उत्तम पर्वत, उत्तम समुद्र अशी उत्तम सामग्री, उत्तम पूर्वजांनीं ठेवलेली उत्तम विद्या, आमच्याजवळ असतांही आम्ही 'अभाग्याच्या घरी बाबा कामधेनु आली । परि ती ओढाळ म्हणुनि बाबा ! बाहेर घालविली।' अशी आपल्या अज्ञानीपणाने स्थिति करून आमच्या देशाचें, धर्माचें व ज्ञानाचें आम्हीं मातेरें केलें ! आह्मांस लाधलेली ब्रह्मविद्याच निर्विकार आहे, ह्मणून आमचें अज्ञान सर्वभक्षक मृत्युपेक्षांही अत्यंत पापकारी होतें, तरी ती विद्या स्वतःच्या सामर्थ्यानें जिवंत राहिली; आणि मला वाटतें कीं, आमच्या चिरंजीव परंतु सद्यःकाळीं जीर्ण झालेल्या देशास जर कोणी पुनः तारुण्यावस्थेप्रत नेऊन पोहोंचवील, तर ही आह्मांस सुदैवानें लाधलेली ब्रह्मविद्या मात्र हें तें काम करील. मात्र तिची भक्ति निष्कामबुद्धीनें झाली पाहिजे. 'ती ब्रह्मविद्या **आमची** आहे' असा अभिमान झाला कीं, संपलेच सगळें. असो; तेव्हां मला आतां सांगावयाचें तें हेंच आहे कीं, संसार वाईट नाहीं, बायकापोरें वाईट नाहींत, हें विश्व वाईट नाहीं, आपली म्हणजे आपणां सर्वांची केवळ उपभोगेच्छा मात्र वाईट आहे. ही उपभोग-इच्छा आपल्या स्वतःच्या अधिकाराप्रमाणें कमी करण्याचा प्रयत्न करावयास लागू या; संसार चांगला खरा; पण तो साधला ह्मणजे पुरुषार्थ झाला, आपण श्रीमंत झालों म्हणजे कृतकृत्य झालों, कीर्तिवंत झालों ह्मणजे चाऱ्ही पुरुषार्थ साधले, असें न मानितां संसारस्थिति ही स्वगोत्राला व स्वजातीला उन्नति करणारी पहिली पायरी आहे. श्रीमंती शारीरिक **उपभोगांकरितां** नव्हे, तर जास्त उपभोग घेऊन **जास्त काम करण्याकरितां**, जास्त ज्ञान संपादनाकरितां आणि अनाथसंरक्षणाकरितां आहे, कीर्तिचा उपयोग ज्ञानप्रसार व आत्मोन्नति यासाठीं आहे, असें ज्ञान संपादूं लागूं या. विश्वशास्त्राचा अभ्यास मनुष्यहानि करण्याकरितां नाहीं, जीवप्रगतीकरितां आहे; 'जीवप्रगति म्हणजे आत्मोन्नति होय,' ह्या पूर्वकालीन मंत्राचा जप करावयास लागूं या; म्हणजे आपण मोक्षाच्या मार्गाला लागूं. अज्ञानस्थितींत आपण वैराग्याचा

प्रयत्न करितो, म्हणून आपल्यास मोक्ष तर मिळत नाहींच, पण आपली सांसारिक सुखाची मात्र निराशा होते. सारांश, या जगांत कोणतीही वस्तु स्वभावतः वाईट नाहीं; अज्ञानी लोक कोणत्याही वस्तूला विरूप करतील व त्याप्रमाणें त्यांनीं आपला संसाराला व विश्वाला वाईट केलेंही आहे. आम्ही संसाराशीं व विश्वाशीं वैर धरिलें, म्हणून आम्हांस त्यांनीं हातचें सोडून दिलें आहे. धर्म असूनही आम्ही अधार्मिक बनलों आहों. खरा धर्म आमच्यापाशीं असून त्याचें आम्ही नाटक करितों! हा प्रकार अनाधिकारी लोकांनीं कर्म सोडिलें म्हणून झाला. सारांश, कर्म करावें, संसार करावा पण फलाशाविरहित या दोहोंचा आश्रय घ्यावा. कर्म वाईट नाहीं, फलाशा वाईट आहे. अतएव कर्माधिकाऱ्यांनीं विहित कर्मच करावें असें सांगून सर्व ज्ञानविज्ञान झालें म्हणजे सर्व कर्मकर्तव्य-संपतें, असें प्रभूंनीं सांगितलें आहे.

## मोक्ष.

१५ सर्व अध्यायाचा उपसंहार करण्याचा हेतु मनांत आणून भगवान् शेवटच्या श्लोकांत म्हणतातः हे निष्पाप अर्जुना! येवढावेळपर्यंत तुला जें हें ज्ञान, मोक्षज्ञान, शोकमोहविभंजकज्ञान, अत्यंतानंदावाप्ति, सर्वज्ञता व सर्वव्यापिता संपादन करून देणारें ज्ञान, व तें ज्ञान संपादन करण्याचा मार्ग, हें सर्व तुला शास्त्रमार्गानें सांगितलें. हें ज्ञान, त्याचे मार्ग, व त्याची शास्त्रशुद्ध प्रणालिका ह्या सर्व गोष्टी अत्यंत गुह्य आहेत. ह्या सर्वांचें ज्ञान ज्याला उत्तम झालें तोच ज्ञानी होतो, आणि तो विहितमार्गानें आचरण करीत गेला ह्मणजे त्याला विज्ञान होऊन तो कृतकृत्य होतो. मग त्याला कांहींएक करावयाचें उरतच नाहीं. आत्मज्ञ, आत्मरति, आत्मक्रीड झाल्यानंतर पुरुषाला 'करावयाचें असें कांहीं उरत नाहीं' हें प्रभूंनीं दुसऱ्या अध्यायांत स्पष्टपणें प्रतिपादिलेंच आहे. ही कृतकृत्यता हें समाधान, ही समाधिस्थवृत्ति, ह्याचेंच नांव **मोक्ष** होय.

मोक्ष ह्मणजे सुटणें, बंधांतून सुटणें, संसाराच्या, जन्ममरणाच्या, सुखदुःखांच्या बंधांतून सुटणें, यांचेंच नांव मोक्ष होय. संसार, जन्ममरण अथवा सुखदुःखें हीं अज्ञानानें, संकुचित ज्ञानानें उत्पन्न होतात. 'मी अपूर्ण आहे, ह्मणून मला पूर्ण झालें पाहिजे' ही स्थिति प्रत्येकास ह्मणजे प्रत्येक अज्ञानी जीवास अनुभवावी लागते. 'विषयांचा लाभ झाला असतां सारांश,विश्वगत सर्व विषय **मला एकट्याला स्वामित्वाच्या** अधिकारानें उपभोगावयास सांपडले तर मी पूर्ण होईल' असें वाटणें याचें नांव अज्ञान; आणि शरीरयात्रा चालेल मात्र, इतकाच उपभोग घेऊन बाकीचें सर्व कर्म ज्ञानार्जन करून आत्मिक उन्नति करावयाची, व 'आत्म्याचा शोध करून त्याचें स्वरूप समजून घ्यावयाचें' असें वाटणें याचें नांव मुमुक्षुता होय. पहिली इच्छा प्रबळ झाली ह्मणजे सुखदुःखात्मक कर्म, जन्ममरण, संसार किंवा बंधन प्राप्त होतें; आणि दुसऱ्या इच्छेनें तेंच बंधन सुटतें. संसारांत पडणें अगर त्यांतून सुटणें हें जीवाच्या पौरुषत्वावर अवलंबून आहे, हें तत्त्व गीतेचा जीवप्राणच होय.

पुरुषोत्तमयोग यथासांग सिद्ध झाला झणजे मोक्ष मिळतो, हें या अध्यायाचें सार आहे. हें शास्त्र गुह्यतम आहे, हें झणण्याचें कारण उघडच आहे कीं, ( १ ) कर्मानें मुक्ति मिळते, ( २ ) भक्तीनें मुक्ति मिळते, ( ३ ) ज्ञानानें मुक्ति मिळते, ( ४ ) योगानें मुक्ति मिळते, इत्यादि प्रत्येक पंथाचे अनुयायी—आपआपल्या मताच्या प्रथमस्थापकाचे पूर्ण हेतु मनांत न आणितां आपलाच मार्ग श्रेष्ठ आहे, असें—अज्ञानानें व आग्रहानें प्रतिपादन करीत असत. ज्ञानाशिवाय कर्म अथवा भक्ति अथवा योग व्यर्थ होतात, कर्माशिवाय भक्तीचें रहस्य कळत नाहीं, योगाशिवाय ज्ञानाला विज्ञानस्वरूप येणार नाहीं, इत्यादि प्रत्येक पंथाची एकांगता व ज्ञान-भक्ति-योग-तपइत्यादिकांनीं घटित जो परमार्थ त्याची सर्वांग सुंदरता त्या त्या पंथवाल्यांस न कळल्यामुळें सर्व भारतवर्षभर आणि सर्व पृथ्वीवर अज्ञान व दुराग्रह यांस ऊत आला होता. अनेक पंथ प्रचलित झाल्यामुळें अश्रद्धेनें आपलें बिऱ्हाड कायमचेंच केलें होतें. सारांश, खरा मोक्षमार्ग प्रलुप्त झाला होता; झणून परमेश्वरांनीं ह्या आतां १५ व्या अध्यायांत प्रगट केलेल्या गुप्तमार्गाला गुह्यतममार्ग असें झटलें आहे. ' शारीरिक व मानसिक सर्व स्वार्थपर कर्मास अर्धचंद्र मिळाल्याशिवाय, उदारचरिताचा उदाहरणरूपानें अनुभव येऊन साक्षात्कार झाल्याशिवाय, मनोनिग्रह होऊन चित्ताला एकाग्रता प्राप्त झाल्याशिवाय, आणि अद्वैतच आहे, असें ज्ञान झाल्याशिवाय कृतकृत्यता येत नाहीं, ह्या तत्त्वाचें उद्घाटन उपनिषद्रूपानें व उपनिषत्साहाय्यानें परमेश्वरास करावयाचें होतें, एकदेशी मतांची संकुचितस्थिति दाखवून त्यांचाही होईल तो उपयोग मोक्षशास्त्रांत करून घ्यावयाचा होता, नास्तिकमतांचा संहार करावयाचा होता, झणून गीताशास्त्राचा अवतार प्रभूंनीं केला आणि तेथेंच पराभक्तीचें उत्कृष्टत्व दाखवून तिचा उपयोग मोक्षशास्त्राला कसा होतो, हें पंधराव्या अध्यायांत सांगितलें.

---

## खंड १६ वा.

# सोळाव्या अध्यायाचा उपसंहार.

या अध्यायाचा अवतार प्रकृतीचें स्वरूप विशद करण्यासाठीं झाला आहे. नवव्या अध्यायामध्यें दैवी, आसुरी व राक्षसी अशा तीन प्रकारच्या प्रकृतींचा उल्लेख केला आहे, तो गीताभक्तांच्या लक्ष्यांत आहेच. आतां सत्त्व, रज व तम या तीन गुणानुरूप व्यक्त होणाऱ्या दैवी आणि आसुरी व राक्षसी प्रकृतींचा विस्तार करून दैवी प्रकृतीच्या पुरुषास मात्र संसारमोक्षाची, संसारांतून सुटण्याची, पात्रता आहे आणि आसुरी अगर राक्षसी प्रकृतींच्या लोकांस ही पात्रता नाहीं, असें सिद्ध करून दाखवावयाचें आहे. पंधराव्या अध्यायांत पुरुषोत्तमयोग सांगितला आहे. ह्या पुरुषोत्तमयोगाचा आपल्याला अधिकार

आहे की नाहीं याचा निर्णय स्वतः अगर गुरुकरवीं करितां यावा व मुमुक्षूस मोक्षाचा मार्ग स्पष्टपणानें समजावा, एतदर्थ या अध्यायाची योजना आहे. "दुःखांमध्यें अनुद्विग्न चित्तानें राहणारा" इ. स्थितप्रज्ञ पुरुषाचीं लक्षणें व 'वेदशास्त्रांतील केवळ उपभोगप्रकरण मात्र आहे' इ. अविद्वानांचीं लक्षणें, दुसऱ्या अध्यायांत सूत्ररूपानें सांगितलीं आहेत, त्यांचाच विस्तार करून मोक्षमार्ग सुकर करावा हाही या अध्यायाचा उद्देश होय.

सर्व अभेदकारक व अभेदरूप ब्रह्म आहे; येथें रागद्वेषाचें प्रयोजन नाहीं; पूर्वसंचितानें जें यथाकालीं प्राप्त होईल, त्यावर सुखदुःखविरहित उदासीनपणानें निर्वाह करावा आणि आत्मस्थितींत सर्वदां असावें हें ज्ञानाचें कार्य आहे. ज्ञानपूर्वक सुखदुःखातीत होणें, ब्रह्मीं ब्रह्म होऊन जाणें हाच मोक्ष होय. असो; तेव्हां या मोक्षदात्री ज्ञानाची उत्पत्ति कशी होते, उत्पत्तीचीं साधनें कोणतीं, उपाय कोणते, प्रतिबंधक गोष्टी कोणत्या, त्यांचा स्पष्ट उल्लेख येथें केला आहे; ह्मणून हा अध्याय विशेष उपयोगाचा होय.

## ज्ञानाचीं साधनें.

( १ ) ज्ञान हा जर प्रकाश आहे, तर अर्थातच ज्ञान ज्या साधनांनीं होतें त्यांसच प्रकाशक ह्मणावयास हवें. 'द्यु' (प्रकाशणे) या धातूपासून 'देव' 'दैव,' 'दैवी' हे शब्द निघाले; तेव्हां त्या सर्वांचा अर्थ प्रकाशपर, ज्ञानपरच घेतला पाहिजे. सारांश दैवीसंपत्ति म्हणजे 'ज्ञानप्रकाशक सामग्री' असा अर्थ झाला. शिवाय 'देव' हे प्रकाशस्वरूप, सात्विकप्रकृतीचे आहेत, असा धर्मशास्त्रसिद्ध सिद्धांत आहे. तेव्हां दैवी, ज्ञानप्रकाशक व सात्विकप्रकृतीच्या विभूति कोणत्या त्याचा निर्देश यथाक्रम पहिल्या तीन श्लोकांत केला आहे.

तेराव्या अध्यायांत ज्ञानसाधनें सांगून येथें दैवीसंपत्ति सांगितली; त्या साधनांत व या दैवीसंपत्तीच्या लक्षणांत समान लक्षणें आहेत, तीं एकीकडे करून बाकींच्या लक्षणांचा विचार केला तर तेराव्या अध्यायांतील लक्षणांची दिशा ज्ञान साध्य करणाऱ्या साधनांची दिसते आणि सोळाव्या अध्यायांतील लक्षणाची दिशा आत्मोद्धारक आणि समाजास—समाजसंघटनेस—अनुकूल अशा नीतीची दिसते. एकीकडे गुरुपूजा, अनन्यभक्ति इत्यादि ज्ञानसाधनें आहेत आणि दुसरीकडे दया, यज्ञ, सत्य, दान इत्यादि सदाचरणवर्धक लक्षणें आहेत. नीतियुक्त वर्तन आणि ज्ञानाची भक्तिपूर्वक आस्था अशी दैवीसंपत्ति असल्यावर मोक्षाचा किल्ला सर होणार नाहीं असें कोण ह्मणेल? पुनः, पहिल्या दोन श्लोकांतील लक्षणें भगवंतांस मान्य अशा ज्ञानलक्षणी ब्राह्मणांची दिसतात. असलीं लक्षणें असणारे तेच ब्राह्मण होत. यांनांच ज्ञान, विज्ञान, आस्तिक्य इत्यादिकांचा संग्रह केला की, हे श्रीकृष्णाचे ब्राह्मण होतात. तिसऱ्या श्लोकांतील पहिलीं

चार लक्षणें क्षत्रिय जातीस शोभणारीं आहेत, व शेवटचीं दोन वैश्यांस अवश्य आहेत. सारांश, तिन्ही वर्णांस अवश्य असणारीं दैवीसंपत्तीचीं लक्षणें कोणतीं असें विचारल्यास येथें त्याचें उत्तर आहे. हीं सर्व साधनें मोक्षदायी आहेत. शूद्राचें सात्त्विक लक्षण म्हणजे 'नातिमानिता' होय.

एकंदर सव्वीस विभूति सांगितल्या आहेत व त्यांतच इतर समानधर्मी विभूतींचा अंतर्भाव होईल अशी योजना केली आहे. या सर्वांची आपण एक यादी केली आणि त्यांत सामान्यत्वानें कोणता गुण राहतो असें पाहिल्यास हें सहज ध्यानांत येईल कीं, 'विषयपराङ्मुखता' हें सर्वांचे अधिष्ठान आहे. सामान्यतः इंद्रियगोचर पदार्थांपासून तों थेट अहंकारापर्यंतचे सर्व पदार्थ 'क्षेत्र,' 'ज्ञानविषय' आहेत, असें या पुस्तकाच्या वाचकांस पुनः सांगण्याची अपेक्षा राहिली नाहीं. ह्या सर्व विषयांचा अनुक्रमानें, यथाशक्ति, यथाधिकार, **त्याग** करण्याचा उपक्रम ठेविला असतां विषयनिवृत्ति बाणेल, आणि जसजशी ही विषय पराङ्मुखवृत्ति बाणत जाईल, तसतसा या तीन श्लोकांत सांगितलेल्या गुणांचा उदय होत जाईल, हेंही सांगावयास नकोच. विषयविरक्त पुरुष भयशून्य होतो. (त्याला कशाचीही भीति नसते व तोही कोणाला भीतिप्रद होत नाहीं.) त्याची फलाशा व अहंकार हीं नष्ट होतात, शास्त्राध्ययन आणि ब्रह्मचिंतन यामध्यें मात्र तो रत झालेला असतो, दान, दम, यज्ञ, स्वाध्याय, तप, सरलता, परपीडावृत्तीचा लय, यथार्थ व हितकर भाषण, क्रोधशून्यता, विषयावर अनासक्ति, शांति, दोषदृष्टिशून्यता, भूतमात्राचें ठायीं प्रेम व अनुकंपा, लोलुपतेचा अभाव, आचारविचारामध्यें मृदुता, व मधुरता, जनमनलज्जेची चाड, व्यर्थ उद्योगाचा अभाव, प्रगल्भता, सहिष्णुता, धैर्य, द्वेषराहित्य आणि अहंकारशून्यता, हे सव्वीस गुण देवमाणसांमध्यें, दैवीप्रकृतीच्या पुरुषांमध्यें, सात्विकप्राण्यांमध्यें, दिसलेच पाहिजेत. पुनः, विषयपराङ्मुखता म्हणजे विषयांचा उपभोग घेण्यासंबंधें अनासक्ति होय. आपली जी आत्मिक, मानसिक, शारीरिक व सांपत्तिक योग्यता असेल, त्यापेक्षां कमी,–निदान त्या मानानें तरी,– उपभोग घेण्याची आशा ठेवणें हें धर्मविहित आहे. आहे ती स्थिति सुविचारानें ओळखून घेऊन त्याप्रमाणें आपली आशा, वासना, कामना, लालसा इत्यादि **नियमित** करणें व उपभोगाकडेच चित्त न ठेवितां प्रथमतः विषयज्ञान व नंतर स्वरूपज्ञान यांकडे मनोवृत्तींचें सुकाणूं फिरविणें हें सात्विकमार्गाचें **आक्रमण** करणाऱ्या मुमुक्षूचें पहिलें अवश्य कर्तव्य आहे. आपले उपभोग नियमित करून आपला उद्योग आपण ज्ञानोपयोगी करूं लागलों म्हणजे दुसऱ्याविषयीं दया, मार्दव, अक्रोधता, उपकारबुद्धि इत्यादि उत्पन्न झाल्याच पाहिजेत. शरीररक्षणास व मनःस्वास्थ्यास मात्र अवश्य असणारे उपभोग घ्यावयाचें असा निश्चय झाला म्हणजे तो पुरुष सत्यवादी, तेजःपुंज, धैर्यशील, स्थिरबुद्धीचा, शांतवृत्तीचा असणें हें नीटच आहे. सारांश, ज्ञानमार्गानें अत्यंत सुखाचा आस्वाद घेऊं इच्छिणाऱ्या मुमुक्षूला आपली विषयोपभोगाची लालसा नियमित केलीच पाहिजे. आपल्या लोकांचें तेज

कमी झालें, आपलें धैर्य अस्तंगत झालें, आपली क्षमावृत्ति बुडाली, दया नष्ट झाली, स्थैर्य गळालें, सत्य लुप्तप्राय झालें, मनःशुद्धि व शरीरशुद्धि नामशेष झाली, त्या सर्वांचे आदि-कारण पाहूं गेल्यास आपली उपभोगतृष्णा वाढली आणि ज्ञानतृष्णा कमी झाली हे होय. आपण जे शारीरिक अगर मानसिक कर्म करितों, त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व फलांचा आपण उपभोग घेऊं लागतों, शिल्लक नाहींशी होते, यामुळें व आपण ज्या योग्यतेचें कर्म करितों, त्या कर्मापासून निसर्गतः उत्पन्न होणाऱ्या फलापेक्षां जास्त योग्य-तेच्या फलाची अपेक्षा आपण करितों म्हणून, दुःखरूपी अवदशा आपल्या पाठीमागें लागली आहे. ही साडेसाती जी आपल्यास त्रास देते याचें कारण उपभोगाची इच्छा बलवत्तर होऊन ज्ञानलालसा कमी झाली हें होय. कोणत्याही ऐतिहासिक राष्ट्राच्या अवनतीचें कारण पाहिले असतां असें स्पष्टपणें दिसेल कीं, त्या त्या दुर्दैवी राष्ट्रांत उपभोगेच्छा अनावर होऊन योग्य कर्माची आवड व ज्ञानाची भक्ति, कमी झालेली होती. उघडच आहे, आपल्याजवळ असलेल्या भांडवलावर जितकें अन्न मिळवितों, त्यापेक्षां जास्त खाऊं लागलो तर कांहीं तरी दिवसांनीं 'चार खुंट जहागीर हमारी' म्हणण्याची पाळी यावयाचीच! पण सात्विक प्रकृतीच्या पुरुषाची व राष्ट्राची गोष्ट निराळी असते. त्यास उपभोगाची इच्छा कमी असते व ज्ञानोप-योगी कर्माची आवड जास्त असते. याप्रमाणें जसा जसा सात्विक पुरुष अगर सात्विक राष्ट्र श्रेष्ठ व श्रेष्ठतर उत्क्रांतीत शिरण्याचा संभव निश्चित होतो, तसतसे विषय व विषयोपभोग नीरस होऊन स्वरूपज्ञान होऊं लागतें; ईशानुग्रह व गुरुकृपा यांनी तें दृढ होतें; श्रवण, मनन व निदिध्यासानें स्वरूपज्ञानाला विज्ञानाचें वळण लागून तो पुरुष अगर तें राष्ट्र ब्रह्ममय होतें. असो; या अध्यायाच्या पांचव्या श्लोकांत 'दैवी संपत्ति मोक्षाचें साधन आहे' असें म्हटलें आहे तें आमचे गीताभक्त विसरणार नाहींतच. यावरून गीताभक्तांच्या लक्षांत येईल कीं, सात्विकप्रकृतीला 'दैवी' प्रकृति असें भगवंतांनी म्हटलें तें सर्वथा यथार्थ आहे. जन्मतः अगर गुणतः जो उदार प्रकृ-तीचा असतो त्यालाच दैवीसंपत्तीचा लाभ होतो, हें आतां सांगण्याची अपेक्षाच नाहीं.

## आसुरी संपत्ति.

( २ ) ४ थे श्लोकांत आसुरी संपत्तीचीं चिन्हें सांगून पुढें ७ व्या श्लोकापासून सामान्यतः एकविसाव्या श्लोकापर्यंत आसुरी संपत्तीचें वर्णन विस्तारानें केलें आहे. हें वर्णन विशेषतः माझ्या देशबंधूंनीं अवश्य वाचून त्याचा विचार करावा. ही आसुरी संपत्ति बद्धक म्हणजे जन्ममरणांत घालणारी आणि दुःखमूलक आहे. येथें राजसी अगर मानवी प्रकृतीचा विचार कां केला नाहीं, अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. रजोगुण हा सकामत्व व साभिमानत्व देणारा आहे. म्हणून तोही आसुरी वर्गांतच ढक-लिला आहे. सात्विक आणि असात्विक असे दोन भाग केले म्हणजे राजसगुणांचा

अंतर्भाव आसुरी संपत्तीमध्येंच होतो. आपले असु म्हणजे प्राण, यांसच आकर्षण करणारा तो हिंसात्मक असुर होय; त्याची संपत्ति ती **आसुरी** संपत्ति होते. ही संपत्ति स्वार्थप्रेरक आहे, आणि म्हणूनच बद्धक आहे.

आसुरी म्हणजे राक्षसी प्रकृतीचे जे लोक आहेत, त्यांस स्वतःच्या अज्ञानानें करावें कोणतें आणि टाकावें कोणतें, हें कांहींच समजत नाहीं. त्यांचें मन शुद्ध नसतें, शरीर अस्वच्छ असतें; त्यांस शिष्टाचारांची ओळखही नसते. सत्य बोलणें हें त्यांस वावडें होय. हे महानास्तिक असतात. हें जगत् शून्यापासून झालें आहे, याला अधिष्ठान कांहीं नाहीं, याला नियंता कोणी नाहीं. हे जगत् केवळ स्त्रीपुरुषांच्या उपभोगात्मक प्रेरणेनें उत्पन्न झालें आहे, असें ते म्हणतात. सारांश हे आसुरी लोक अज्ञानी, अविचारी, सत्यभ्रष्ट व आचारभ्रष्ट असतात. भोग भोगण्यासाठीं जन्म आहे आणि ते भोग पुरविण्यासाठीं आपल्या शिवाय इतर सर्व चराचर वस्तु उत्पन्न झाल्या आहेत, हा यांचा समज असतो! यांच्यामध्यें नीतिविघातक, समाजविघातक, गुण ओतप्रोत भरलेले असतात. आपला उत्कर्ष व दुसऱ्याचा घात हे या आसुरांचे कर्मप्रेरक होत. आपल्याशिवाय दुसरा शहाणा नाहा, दुसरा कुलवान नाहीं, आपणच सर्वश्रेष्ठ म्हणून आपणच सर्व उपभोग घ्यावा हीं त्यांचीं मतें होत. हे सात्त्विक लोकांचे वैरी असतात. अर्थातच हे व्यक्तिशः आणि समाजशः अधोगतीस जातात. **ईश्वर नाहीं, धर्म नाहीं, शिष्टाचार नाहीं, कामाशिवाय अन्य पुरुषार्थ नाहीं** असें मानणारा तो **महानास्तिक होय.** हेच देहात्मवादी होत.

( ३ ) देहात्मवादाचा विषय मोठा दांडगा आहे. देह अथवा क्षेत्र म्हणजे काय याची मीमांसा करून सर्वज्ञ प्रभूंनीं तेराव्या अध्यायांत व सातव्या अध्यायांत असें ठरविलें आहे कीं, आत्म्याशिवाय बाकीचे सर्व पदार्थ 'क्षेत्रा' मध्यें अंतर्भूत होतात. येथें ब्रह्मदृष्टीनें विचार कर्तव्य नाहीं, किंवा ब्रह्मज्ञाच्या भाषेमध्येंही बोलावयाचें नाहीं. त्याच्या भाषेंत बोलण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ आहे, आणि यदा कदाचित बोलतां येतें असें गृहीत धरलेंच, तर आत्म्याशिवाय दुसरी वस्तू ह्या किंवा अन्य कोणत्याही सृष्टींत नसते, नाहीं, व असणें शक्य नाहीं, असें म्हटलें पाहिजे. असो; आपण सध्यांच्या विचारव्यवस्थेसाठीं हें सर्व आत्म्यापासून स्थावरांत सर्व इन्द्रियगोचर पदार्थ सत्य आहेत अशी क्षणभर कल्पना करूं या, आणि चार्वाक पंथापासून शेवटपर्यंत जाऊन काय नियम होतो, तो पाहूं.

( अ ) '**चार्वाक** नामक महानास्तिक असें म्हणतो; ( अ ) आमचें शरीर हाच आमचा आत्मा; ( आ ) जीव ही एक देहाची रासायनिक उपाधि आहे. मरण हा मोक्ष होय. ( इ ) स्वर्ग, देव, यज्ञयाग इत्यादि वेदोक्त कर्में लुच्चे लोकांनीं गरीब लोकांस फसविण्यासाठीं काढलेले कल्पित पदार्थ आहेत; कारण या वेदोक्त कर्मांचीं फलें दृग्गोचर

नाहींत. ( ई ) दिसते किंवा इन्द्रियांच्या अनुभवास येतें, ती गोष्ट प्रमाण होय. सारांश, प्रत्यक्ष हेंच काय तें प्रमाण आहे. आपल्या शरीरास उपभोग देणारा जो काम तोच एक पुरुषार्थ आहे. सारांश देह हा आत्मा आणि देहोपभोग हा पुरुषार्थ; हा या मताचा सारांश आहे. अनुभव हा चार्वाकवाद्यांचा 'वेद' अगर पवित्र पुस्तक आहे.

'प्रत्यक्ष प्रमाणच तेवढें खरें आहे' हें ह्मणणें कदाचित् खरें मानतां येईल. पण 'इन्द्रियप्रत्यक्ष तेवढेंच खरें' असें ह्मणणें कधींही खरें मानतां येणार नाहीं. ( १ ) तसें मानिलें तर 'मृगजळ' खरें व 'न दिसणारा बाप खोटा' असें ह्मणण्याचा प्रसंग येईल. पुनः ( २ ) सुखदुःखाचा अनुभव घेत असतां, विषयांचें ज्ञान करून घेत असतां व इतर कर्म करीत असतां, इन्द्रियागोचर पण अनुभव घेणारा, ज्ञाता व कर्ता कोणी तरी निराळा स्वतंत्र आहे असें मानावें लागतें. ( ३ ) आणखी; इन्द्रिय प्रत्यक्षच खरें असें मानिल्यास 'स्मरण' कसें रहातें व होतें याची मीमांसा करितां येत नाहीं. ( ४ ) आणखी एकदां; देहस्थिति व देहस्वरूप बदलत जातें, परंतु ज्याला देहात्मवादी 'मी' असें म्हणतो, तो 'मी' बदलत नाहीं. हे सत्य इन्द्रियप्रत्यक्ष नव्हे, म्हणून असत्य नव्हे. पुनः; ( ५ ) या सृष्टींत पदार्थाचें रूपांतर होतें. कोणताही पदार्थ अगर कोणतीही शक्ति अजीबात नाहींशी होत नाही. यावरून या देहात्मवाद्याचा देह पडला तरी त्याचे रूपांतर होईल; तसेंच ज्याला तो 'मी' असें ह्मणत होता त्या देहाचें रूपांतर होईल; तो नाहींसा होणार नाहीं. ज्या घटकावयवांनीं देह बनला गेला ते घटकावय जसे नष्ट होत नाहींत, त्याचप्रमाणें ज्या घटकावयवांनी ( उपाधींनी ) त्याचा जीव बनला आहे तेही नाहींसे होत नाहींत. सारांश, मरण हा मोक्ष नव्हे, रूपांतर आहे. सर्वात्मना नाश नव्हे. ( ६ ) पुनः आणखी एकदां; प्रत्येक जीवानें जर निश्चय केला कीं, आपली इच्छा पूर्ण करावयाची, वाटेल ते होवो, वाटेल तें करून आपली इच्छा तृप्त करावयाची; तर त्याचे हेतु सफल होणार नाहींत. अनेक अथवा अनंत जीवांच्या अनंत इच्छा जोरानें प्रकट होऊन फलद्रूप होण्याची खटपट सुरू झाली तर मारामारी, रक्तपात, इत्यादि होऊन समाजविध्वंस होईल व ज्या इच्छाशांतीप्रीत्यर्थ त्यानें एवढी खटपट केली, ती इच्छाशांतीही होणार नाहीं. एवंच कोणत्याही दृष्टीनें चार्वाक पंथ खरा म्हणजे सत्य म्हणजे नित्य आहे, असें ठरत नाहीं.

खरा नास्तिक कोणीच नसतो, असें आहे. तथापि या जगांतील बरेच लोक व केव्हां केव्हां सर्व लोक चार्वाक पंथाचे अनुसरण करीत असतात. पहा कीं, 'पाप' करण्याची जेव्हां जेव्हां प्रवृत्ति होते, तेव्हां तेव्हां देहात्मवादाशिवाय दुसरा प्रेरक किंवा पापप्रवर्तक विद्यमान असत नाहीं. केव्हां केव्हां हा देह नुसत्या एका व्यक्तीचा असेल, केव्हां कौटुंबिक देह असेल, केव्हां राष्ट्रीय असेल; पण या व्यक्तीच्या देहाला, कुटुंब-देहाला,

राष्ट्रीय देहाला, अनात्मिक उपभोग देण्यासाठीं जेव्हां व्यक्ति, कुटुंब किंवा राष्ट्र प्रवृत्त होतें, तेव्हां हे सर्व प्रवृत्त झालेले लोक देहात्मवादीच नसतात काय ?

( ४ ) देहात्मवादाचें स्थूल स्वरूप वर सांगितलें. यानंतर पुढचे लोक म्हणजे इंद्रियांस आत्मा मानणारे, मनास आत्मा मानणारे, बुद्धि हाच आत्मा ह्मणणारे, अहंवृतीला आत्मा समजणारे, असे पुष्कळ आहेत. या सर्वांचें परीक्षण करणें म्हणजे एक तत्त्वज्ञानाच्या उत्क्रान्तीचा मोटा थोरला ग्रंथच लिहावा लागेल. हें करणें तर सध्यांच प्रस्तुत नाहीं. आतां सांगावयाचें म्हणजे इतकेंच कीं, या गीतानिश्चित क्षेत्रांत ज्या ज्या ह्मणून दृश्य अथवा ज्ञेय पदार्थांचा अंतर्भाव होतो, त्या प्रत्येकांस आत्मा हें नांव देणारे तत्त्वज्ञ प्रत्येक देशांत उत्पन्न झाले आहेत आणि त्यांनीं आपलें मत स्वबुद्धीनें मंडित करून त्यावर आपआपल्या आचरणाची मीमांसा बसवून टाकलेली आहे. या जगांत अथवा विश्वांत एकच परमेश्वर असतां आणि त्या सच्चिदानंद दयाघनाची व आपली भेट व्हावी, त्याचा साक्षात्कार व्हावा व आपल्यास अखंड सुखप्राप्ति व्हावी असा प्रत्येक जीवाचा अंतस्थ व बाह्य हेतु असतांही अनेक अथवा अनंत मतांची स्थापना होते; याचें कारण हे कीं प्रत्येक तत्त्वज्ञ पुरुष, आपल्या स्वतःस जे ज्ञान देशकालप्रसंगानुरूप व पूर्वजन्मानुरूप प्राप्त झालेलें असते, त्याच्या जोरावर कोणत्या तरी अनात्मक वस्तूस ईश्वरत्व देऊन त्या त्या वस्तूची प्राप्ति म्हणजे पुरुषार्थसिद्धि होय, असें मानितो; हें होय. अगदीं कनिष्ठ ह्मणून मानिलेल्या वृक्षपाषाणपूजेपासून, व पितरपूजेपासून, तों थेट स्वव्यतिरिक्त व कल्पिलेल्या ईश्वरविषयक अत्यंत श्रेष्ठ कल्पनेपर्यंत जी जी ह्मणून कल्पना करितां येईल तीच श्रेष्ठ आहे, असें मानण्यास आरंभ झाला, म्हणजे कोणते तरी एक धर्ममत प्रचलित होऊन तेंच मत प्रसृत होतें, आणि अभिमानानें 'स्वमतच खरें आहे' ह्या कल्पनेला जोर आला म्हणजे इतर कल्पितमतांशीं वैरानुबंध उत्पन्न होऊन द्वेष, छल, रक्तस्राव इत्यादिकांमध्ये ह्या वैराचें पर्यवसान होतें. ही सर्व मतें अपूर्ण असून एक अद्वैत मतच खरें आहे हे सिद्ध करण्याचा हा प्रसंग नव्हे; तसेच स्वतःच्या संकुचित देहाची व दगडापाषाणांची, पितरांची, इंद्रियनिर्दिष्ट, मनोनिर्दिष्ट बुद्धिनिर्दिष्ट आणि अहंकारनिर्दिष्ट देवतांची अनन्य पूजा अगर उपासना अनन्यभावाने केल्याशिवाय नितांततः सत्य जी आत्मपूजा अथवा आत्मोपासना, इच्या ठायीं अनन्य भक्ति ही उत्पन्न होण्याचा संभव नाहीं, हेंही सिद्ध करण्याचा हा प्रसंग नव्हे. आतां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, पारमार्थिक दृष्टीनें जरी आत्मव्यतिरिक्त दुसरा सत्य पदार्थच संभवनीय नाहीं, तथापि व्यावहारिक दृष्टीनें विषयापासून अहंकारापर्यंत जे जे म्हणून अनंत पदार्थ भिन्नभिन्नसे आपल्या अज्ञानानें अथवा संकुचित ज्ञानानें आपल्यास दृग्गोचर होतात, त्यापैकीं कोणताही एक पदार्थ श्रेष्ठ मानून त्याचे ठिकाणीं भक्ति ठेविली तर आपली आत्मिक उन्नति होईल हें खरें; पण केवळ परमार्थ दृष्टीनें तो तो पुरुष असुरवर्गांतच गणिला जाईल हेही खरें आहे. ह्या आसुरी पुरुषाच्या आचाराचें, त्यांच्या विचाराचें व त्यांच्या आशा-

कल्पलतांचे वर्णन भगवंतांनी अध्यायाच्या शेवटपर्यंत केले आहे. हें वर्णन वाचीत असतां येवढा मात्र खबरदारी ठेवावी की, ईश्वर आहे असे समजण्याने अनीश्वर वाद्यांचे आचारविचाराकडे, एकेश्वर वाद्यांने अनेक देववाद्यांच्या आचारविचाराकडे व निराकारवाद्याने मूर्तिपूजकांच्या आचारविचाराकडे दृष्टी द्यावी, म्हणजे आपल्यापेक्षां कमी उत्क्रांत झालेले लोक आसुरीपंथांत आहेत, अशी त्यांची समजूत होईल. सारांश, कोणत्याही अनात्मक वस्तूस ईश्वरत्व दिले असतां जे असभ्य आचार, अश्लील उच्चार व अपूर्व विचार उत्पन्न होण्याचा खास संभव आहे, या सर्वांचा निर्देश भगवंतांनी या 'आसुरमीमांसेत' केला आहे, असे समंजस वाचकाच्या दृष्टोपत्तीस येईल. या पुस्तकाच्या गीताभक्तांस हे सांगण्याची आवश्यकता हीच आहे का, आमचा जो म्हणून पुरुषार्थ निश्चित असा ठरला असेल त्याला आपण एकनिष्ठ राहिलो तर मात्र तदनुसार आपले आचारविचार सर्वथा असतात. कधी कधी आपल्या विचारांमध्ये व आचारांमध्ये जो फरक पडतो व पडतोसा दिसतो, आचारविचारांमध्ये वैषम्य दिसते, याचे कारण आपल्या निश्चित पुरुषार्थाच्या कल्पनेची शिथिलता हे होय. असो. प्रत्येक पुरुषाने स्वतः अगर तज्ज्ञगुरुसाहाय्याने आपला पुरुषार्थनिश्चय स्वाधिकारानुरूप ठरविला असता व तो पुरुष या पुरुषार्थाला एकनिष्ठ असला तर त्याच्या आचारविचाराची दिशा ठरेल आणि मग तो आत्मिक सोपानाच्या कोणत्याही पायरीवर असला तरी ('बोले तैसा चाले' असे त्याचें वर्तन होऊन) स्वाधिकारानुसार त्याचे आचरण सात्विक होईल आणि या सात्विक वृत्तीच्या साहाय्यानेच जास्त ज्ञान म्हणजे जास्त अधिकार संपादन करून घेऊन तो पुढील पायऱ्या चढण्यास समर्थ होईल. हे त्याचे उत्क्रमण चालले असतां त्याच्या खालच्या पायरीवरचे लोक त्यास आसुरी वृत्तीचे दिसतील; पण तो खरोखराच सात्विक असेल तर या खालच्या लोकास वर आणण्याचे सात्विक उपाय योजून तो सात्विकवृत्तीचा प्रसार करील. असो, आसुरी पंथाचा विचार चालला आहे, म्हणून आसुरी दृष्टीनें उत्क्रांतीचा मार्ग अवलोकन केला. दैवी दृष्टीने पाहूं गेल्यास आपल्यापेक्षां श्रेष्ठ आत्मिक उन्नतीचे लोक 'दैवी' संपत्तीचे दिसतील हें उघड आहे.

(५) याप्रमाणे भगवन्मतानुसार 'आसुर' शब्दाचा अत्यंत विकास करून या अध्यायांतील सातपासून अध्याय परिसमाप्तीपर्यंतचे श्लोक वाचावे अशी माझी गीताभक्तांस सविनय प्रार्थना आहे. आसुर शब्दाचा अत्यंत विकास केला, म्हणजे आपल्या स्वतःस अद्यापि केवढी थोरली मजल मारावयाची आहे, याचा अजमास होऊन आपला अभिमान विगलित होईल आणि मानवी दृष्टीनें 'आसुर' शब्दाचा संकुचित अर्थ केला म्हणजे आपल्या इतके जे सुदैवी नाहींत, त्यांच्याविषयीं अनुकंपा उत्पन्न होऊन त्यांचा स्वशक्तीप्रमाणे उद्धार करण्याची आपल्यास भगवदिच्छेनुसार प्रेरणा होईल. याप्रमाणे एकीकडून अभिमानाची शांति व दुसरीकडून अनुकंपेची वृद्धि होत जाऊन आत्मिक उत्क्रांतीचा मार्ग सुलभ होत जाईल, असें वाटल्यावरून 'आसुर' शब्दाची येथे जास्त फोड करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

(६) असो; भगवान् ह्मणतातः या आसुरी लोकांस कार्य कोणतें, अकार्य कोणतें, हें कांहीं समजत नाहीं. सूक्त, असूक्त, बरें, वाईट, इत्यादिकांचा विधिनिषेध त्यांस नसतो. त्यांस देहबुद्धिची अगर मनःशुद्धीची अपेक्षा नसते. त्यांचे आचार अमंगल असतात. त्यांस सत्याची चाड नसते. विश्वाच्या उत्पत्तिस्थितिलयाविषयींच्या त्यांच्या कल्पना अर्थातच भ्रामक व भ्रममूलक असतात. 'या विश्वाला कांहींच आधार नाहीं, शून्यापासून तें उत्पन्न झालें आहे. त्याला नियंता कोणी नाहीं, स्त्रीपुरुषांच्या संयोगानें तें उत्पन्न झालें आहे; आपली कामशांति करणें हाच पुरुषार्थ आहे.' हें त्यांचें मत होय. पूर्वी नास्तिक होऊन गेले व पुढें जे होतील, त्या सर्वांच्या आक्षेपांच सार वरील छोटेखानी वाक्यांत आहे. ह्याचप्रमाणें जे जे म्हणून अनात्म-वादी आहेत म्हणजे 'सर्वं खल्विदं ब्रह्म, अहंब्रह्माऽस्मि' हा अखंड व अबाधित सिद्धांत ज्यांस संमत नाहीं, असे जे लोक आहेत, त्यांच्या मतांचेंही सार वरील लहानशा वाक्यांत आलें आहे. पहा कीं बुद्धि हाच आत्मा आहे, असें मानणारा द्वैतवादी महा-पंडित आहे अशी कल्पना करूं या. त्यांस विचारलें, 'कायहो ! सृष्टि कां उत्पन्न झाली ?' तर बहुधा 'परमेश्वरानें लीलाविग्रहासाठीं ही सृष्टि उत्पन्न केली' असे त्याचें उत्तर येईल. म्हणजे सर्व दयाघन परमेश्वरानें स्वतःच्या मनोरंजनार्थ अथवा कामशांतीप्रीत्यर्थ हजारों, अनंत, चराचर वस्तूंस निर्माण करून त्या त्या जीवाला सुखदुःखाच्या अथवा व्यावहारिक अनुभवानुसार अत्यंत दुःखाच्या महासागरांत लोटून दिलें आहे, असें ह्मणण्याचें, असें विधान करण्याचें, त्यानें पर्यवसान असेल ! सारांश; सर्व कृपाघन जो परमेश्वर त्यानें आपलें मनोरंजन करण्यासाठीं हा सर्व पसारा पसरून जीवास त्रिविध तापत्रयांत ढकलिलें आहे व जीव दुःखाग्नींमध्यें कसें चरफडत व हांरपळत आहेत याची मजा तो बघत बसला आहे असा त्याचे ह्मणण्याचा अर्थ होईल ! बरें ! आह्मास हें कांहीं समजत नाहीं; ईश्वराची व्यवस्था अनिर्वचनीय आहे; त्याचे अंतस्थ हेतु आह्मां पामर मानवांस समजणें अत्यंत असंभवनीय आहे, असें प्रतिपादन करणारे सत्यप्रिय द्वैतवादी तत्त्वज्ञ कांहीं असतील, त्यांच्या ह्मणण्याचा अर्थ हाचना 'कीं हें काय गौडबंगाल आहे, ही काय **ईश्वरीमाया** आहे, हें आपल्यास समजत नाहीं' इकडूनही त्यांस मायावादाचा आश्रय करावा लागतो, आणि केवळ बुद्धिवादावर भरंवसा ठेवितां येत नाहीं. सारांश ज्या बुद्धीवर त्यांनीं भरंवसा ठेविला ती निराधार होऊन विश्वाला, जीवाला व स्वतःला असाधुत्व व अप्रतिष्ठत्व येतें. एवंच विश्वोत्पत्ति कशी झाली, त्याला आधार काय, वि-श्वाचा नियंता कोण, हेतु काय, हें, परमेश्वराची कांहीं तरी कल्पना करून बुद्धीच्या जोरावर वाद करूं इच्छिणाऱ्या द्वैतवादी कठ्या भक्तांसही समजत नाहीं असें झालें ! सारांश, सात्विक मूर्तिपूजकांच्या दृष्टीनें जरी हे निराकार पण सगुण भगवंताचे भक्त श्रेष्ठ कोटीमध्यें येतात तरी अद्वैत सिद्धांताच्या तत्वाप्रमाणें हे नास्तिकच ठरतात ! तात्पर्य प्रभूंची वाक्यें इतकीं प्रसरणशील आहेत कीं, कोणताही अनाद्वैतवादी येथें आला तरी तो आत्मदृष्टीनें नास्तिक वर्गामध्येंच यावयाचा !

असो; आत्मिकसिद्धांताच्या पूर्णदृष्टीनें पाहिले असतां कोणताही अनात्मवादी घ्या; तो नष्टात्मा व अल्पबुद्ध असून नेहमीं उग्र म्हणजे अज्ञानजन्य तामसी कर्मे करणारा असतो, असें दिसेल. तो विश्वाचें अकल्याण करणारा ह्मणजे त्यास आत्ममार्गापासून भ्रष्ट करणारा असतो. हा विश्वाचा शत्रूच होय. इच्छेची तृप्ति करणें हा याचा पुरुषार्थ. आतां इच्छा अगर काम हा अग्निरूप असून त्याला कितीही खावयास घातलें तरी त्याची तृप्ति होत नाहीं; इतकेंच नव्हे पण, जितकें अधिक सर्पण अग्नीमध्ये घालावें तितका तो जास्त प्रज्वलित होऊन जास्त अन्नाची अपेक्षा करितो, हें सुप्रसिद्धच आहे. ह्या नास्तिक पुरुषास दंभ व मान अत्यंत असतो; कारण आपल्यास सर्व गोष्टींचा उलगडा झाला आहे असे त्यांस उगीच्याउगीच वाटत असतें. कांहीतरी अतात्त्विक, अनात्मिक सिद्धांतांचें प्रणयन करून हे लोक आपले कामुक आचार चालवीत असतात. अर्थातच 'कामातुराणां न भयं न लज्जा' या न्यायानें त्यांचे आचरण अमंगल असतें. या मृत्युलोकीं देह ठेवीपर्यंत किंवा विश्वाचा प्रलयकाल येईपावेतों त्यांची इच्छा वृद्धिंगत होत असल्यामुळे त्या त्या कामपूरणाची चिंता अथवा चिंतन त्यांचे मागें लागून त्यांची सर्व जीवयात्रा दुःखमय व कष्टमय होत असते. कामशांति हेंच 'जन्मा आलियाचें सार्थक आहे,' हाच पुरुषार्थ आहे, असा त्यांचा दृढनिश्चय झाला असल्यामुळे व 'तुझें आहे तुजपाशीं' ही जी वस्तुस्थिति हिचा पूर्वजन्मकृतकर्मानें उत्पन्न झालेल्या अज्ञानानें विसर पडल्यामुळें 'मला हें हवें, तें हवें; हे मिळाले म्हणजे मी सुखी होईन, ते नाहींसें झालें म्हणजे माझे दुःख संपेल' अशा अनेक हेतुरूपी अनंत विंचवाच्या नांग्या शरीरांत सणसणत असल्यामुळें रात्रंदिवस हा पदार्थ कसा मिळेल, ही आशारूपी चिंता आणि तो पदार्थ दुसऱ्या कोणी घेतला असतां घेणाराचा द्वेष, यामध्यें त्यांचा आयुष्यक्षय होतो, असें दुर्धर व दुःसह तापत्रय असतांही पुनः अनावर इच्छेची तृप्ति करण्यासाठीं हे नास्तिक लोक अन्यायानें द्रव्यसंचय करून पुष्कळसे पदार्थ मिळवितात, हें आश्चर्य नव्हे काय! पण कामरूपी ब्रह्मसमंधानें झपाटलेल्या या तामसी मनुष्यानें कांही केलें तरी त्यांत आश्चर्य तें कसलं! 'हें मला मिळालें, ठीक झालें; भला त्या अमक्याला मी फसविला! तें दुसरें, उद्यां मिळवितो; त्या अमक्याचें पागोटें उद्यां लुबाडितों; तो माझा वैरी नव्हे काय? कसा त्याचा मी लबाडीनें फडशा पाडला! दुसऱ्याचीही अशीच फें फें करून त्यास लंब करितो.' हे ह्या तामसी पुरुषाचे विचार! अथवा तो बिचारा ह्या विकारजाळ्यांत अडकलेला असतो! "सर्व विश्व माझ्या ताब्यांत आहे किंवा असावें; सर्व विश्व माझ्याच उपभोगाकरितां निर्माण झालें आहे; मी सर्वज्ञानसंपन्न आहे; सर्व शक्तिमान् आहे; सुखी, कुलीन, संपन्न असा माझ्यासारखा मीच होय! माझी सरशी कोणाला करितां येणार?" ह्या अभिमानानें व या वासनांनीं त्यांचें चित्त मलीन होऊन गेलेलें असतें. हा भोगातुर पुरुष म्हणत असतो कीं, 'मी यज्ञ करीन, दानें देईन आणि या कृत्यांपासून उत्पन्न झालेल्या पुण्याचा मी उपभोग घेईन. सारांश कर्तृत्व आणि भोक्तृत्व अथवा अहंकार आणि वासना यांच्यामुळें त्याचें चित्त भ्रमावयास लागलेलें

असतें आणि आमिषाच्या आशेनें मत्स्य जसा धीवराच्या जाळ्यांत सांपडतो किंवा धान्य-कणाच्या लालचीनें पक्षी फांसेपारध्याच्या फांसांत गुंतून पडतो, याप्रमाणें बाह्यवस्तुपासून सुख घेऊं इच्छिणाऱ्या या राजसी पुरुषांस कर्तृत्वाभिमान व वासनापाश हे आपल्या जाळ्यांत अडकावून कामभोगामध्यें गर्क करून सोडितात आणि शेवटीं त्यास तामसवृत्तींत म्हणजे अधोगतीस नेतात. तामसवृत्तीचा व राजसवृत्तीचा परिणाम याप्रमाणें अत्यंत भयंकर आहे. सात्विक लोकांप्रमाणेंच हे यज्ञयागही केव्हां केव्हां करितात. पण उभयतांच्या हेतूंमध्यें केवढें अंतर! सात्विक पुरुष यज्ञ करितो, तो निष्कामबुद्धीनें, वैराग्याच्या इच्छेनें, बाह्यसुखाची वासना कमी व्हावी म्हणून, करितो, आणि पुनः ईश्वरच सर्व कर्ता करविता आहे असें ध्यान ठेवितो. यामुळें त्याचें चित्त निर्मळ होतें. गंगेचें जल जसें स्वच्छ व प्रसन्न असतें, स्फटिकमणी ज्याप्रमाणें स्वच्छ पण निर्मळ असतो, त्याचप्रमाणें ह्या सात्विक पुरुषांचें चित्त धुतल्या तांदुळासारखें स्वच्छ, निर्मळ आणि प्रसन्न होतें. पण जगामध्यें सामान्यतः राजसी व तामसी लोकांचीच गर्दी मोठी असते. ह्यांनीं जर कधीं सत्कर्म केलेंच तर त्याची प्रथमतः टिमकी त्यांच्याचकरवीं सर्व जगभर व्हावयाची! येवढेंसें सत्कृत्य झालें कीं हे 'बडे' लोक बेडकाप्रमाणें फुगून 'मी मोठा, मी ज्ञानी' इत्यादिक वृथा कल्पनांनीं उन्मत्त व्हावयाचे. यांतच धन आणि मान्यता यांची मिळवणी झाली ह्मणजे तर कांहीं बोलायची सोय नाहीं! तेव्हां यांचे यज्ञयाग किंवा यांचीं सत्कृत्यें ह्मणजे वस्तुतः नांवांचीं व दांभिकपद्धतीचीं असतात. सारांश, हे आसुरी वृत्तीचे लोक अभिमान, बळ, गर्व, काम, क्रोध इत्यादिकांस आश्रय देऊन राहतात. आणि उन्नतीच्या मार्गांत वाटमारे दरवडेखोरांचा धंदा करणारे जे कामक्रोधादि षड्रिपु त्यांस आश्रय देऊन किंवा या वाटपाडे लोकांचा आश्रय करून ते पुरुष अथवा पुरुषाधम तामसवृत्तीच्या खोल अगाध दऱ्यामध्यें बुडी मारून बसतात आणि सर्वविश्वंभर जो कामक्रोध-शून्य परमेश्वर याचा विरोध करितात! ह्मणजे पापी मनुष्य कितीही पापमग्न झाला असला तरी त्याची कधींही नष्ट न होणारी विवेकबुद्धि त्यास जेव्हां सदुपदेश करिते अथवा दुष्कर्माबद्दल त्यास रागे भरते, तेव्हां या पापी पुरुषाला तिचा तिटकारा येतो व तो तिचा मत्सर करूं लागतो! Conscience makes cowards of us all (विवेकबुद्धि आपणा सर्वांस भेकड करिते!) असें एक वाक्य आंग्लकविमुकुटमणीनें आपल्या एका पापोन्मुख पात्राच्या तोंडीं घातलें आहे; त्याचा अर्थ तरी हाच होय. अत्यंत राजसीवृत्तीच्या पुरुषाला अत्यंत सात्विक पुरुषोत्तमाबद्दल द्वेष उत्पन्न होणें व त्याबद्दल मत्सर उत्पन्न होणें हें साहजिकच होय.

(७) ह्या वेळपर्यंत आसुरीवृत्तीच्या लोकांचें विस्तरशः वर्णन झालें. या आसुरी वर्गांत राजस व तामस लोकांचा अंतर्भाव होतो, हें मागेंच सांगितलें आहे. आशेच्या पाठीमागें जो लागला, कामुकवृत्तीची ज्यानें कांस धरिली, त्याचें पर्यवसान काय होतें हें येथें स्पष्टपणें दाखविलें आहे. दैवी संपत्तीच्या साहाय्यानें मोक्ष मिळतो आणि आसुरी

संपत्तीच्या योगें पायांत शृंखला पडून बंधन प्राप्त होतें, असें जें भगवंतांनीं पांचव्या श्लोकांत सांगितलें आहे, तें सप्रमाण आहे अशी वाचकांची खातरी होईल. भिंतीसारख्या उंच व लंबाकार कडयावरून धोंडा जसा एकसारखा खालींच पडत जातो त्याप्रमाणें आसुरी लोक कामक्रोधादि देवशत्रूंचा आश्रय करून केवळ तमःपूर्ण नरकास जाण्याचें अगर जन्ममरणरूपी दुःखद संसारांत मग्न होण्याचें मात्र श्रेय घेतो! सारांश, उपभोगशून्य कर्म निरभिमानानें झालें असतां तें ज्ञानोपयोगी होतें व पुढें ज्ञान मिळून मोक्ष मिळतो; आणि उपभोगाचें कर्म अभिमान पुरःसर केलें असतां संसाराचें लोढणें गळ्यांत पडतें. निष्काम कर्म विचारवश असतें आणि सकाम कर्म विकारवश असतें. निष्काम कर्म प्रथमतः अवघड परंतु परिणामीं हितकर असतें, पण सकामकर्म प्रारंभीं गोड परंतु परिणामीं नाशकारक असतें. निष्कामकर्म करावें असें प्रत्येक धर्मग्रंथ व साधुसंत सांगतात आणि सकामकर्म करावें असें प्रत्येक 'अहंमन्य' पुरुष म्हणत असतो. अहेतुक कर्माचरणांत नीतीचें रससारस्व आहे असें नीतिशास्त्री म्हणतो; सहेतुक कर्मानें आपल्या स्वतःस मात्र सुख होईल असें दुष्टनीतिप्रवर्तक शकुनि ह्मणतो. सारांश, सात्विक ह्मणजे निष्काम सत्कर्म हें ज्ञान वाढवून अपरिमित सुख देईल आणि राजसतामस अथवा सकामकर्म ज्ञान नष्ट करून अपरिमित दुःख देईल.

(८) हिंदुधर्माच्या ह्मणजे अर्थातच गीताशास्त्राच्या अथवा सनातन धर्माच्या नीतीचा हा वर सांगितलेला दैवी संपद्रूपी पाया आहे. नीत्यात्मक आचरणाला शास्त्रसिद्धांतांनीं बद्ध करितां येईल कीं नाहीं, सारांश नीतिशास्त्र शास्त्रशुद्धपद्धतीनें सजवितां येईल कीं नाहीं असा एक आधुनिक प्रश्न आहे. प्रो० सिज्विक नामक एक नामांकित नीतिमीमांसाविशारद पुरुष नुकताच इहलोक सोडून गेला. ह्या पंडितानें 'नीतिपद्धति' या नांवाचा सर्वप्रसिद्ध ग्रंथ लिहिला आहे. हा विद्वान शास्त्री असें प्रतिपादन करितो कीं, 'ज्या अर्थी मनुष्यप्राण्याला वर्तनस्वातंत्र्य प्राप्त झालें आहे आणि ज्या अर्थी कोणत्या वेळेस तो काय करील याचा नेम नाहीं, त्या अर्थी नीतिपद्धतीला शास्त्रीयस्वरूप कधींही येणार नाहीं.' तसेंच, अनुभववादी जे लोक आहेत ते 'मनुष्याला वर्तनस्वातंत्र्य नाहीं' असें मानितात. ह्या सर्व प्रश्नांचा ह्मणजे प्राचीन अथवा अर्वाचीन अथवा अर्वाचीन काळीं जे जे काय प्रश्न उत्पन्न झाले व भविष्यकालीं जे प्रश्न उत्पन्न होण्याचा वास्तविक संभव, त्या सर्व प्रश्नांचा विचार करूनच गीताशास्त्रांत असा सिद्धांत सांगितला आहे कीं, सकाम अथवा कामुक वर्तनाच्या संबंधानें मनुष्यप्राणी अथवा सर्व जीवजाति परतंत्र आहे. पण निष्काम वर्तनाच्या संबंधें तो पूर्ण स्वतंत्र आहे. विषयसेवनांत पारतंत्र्य आहे; विषयपराङ्मुख होण्यांत स्वातंत्र्य व्यक्त होतें. पूर्वकर्मानुसार उत्पन्न झालेल्या वासना जीवास वश करितात हें खरें; पण जीवाला व विशेषतः मनुष्य प्राण्याला जी विवेकशक्ति प्राप्त झाली आहे, तिच्या सहाय्यानें मनुष्यप्राणी विषयपराङ्मुख होऊं शकतो. ही विवेकशक्ति निर्मळ, एकरूप, शुद्ध व स्वच्छ आहे. हिचा उदय

झाला म्हणजे मनुष्याला प्रसंगवश होण्याचें कांहीं कारण नाहीं. सूर्यप्रकाश झाला म्हणजे चांगले वाईट पदार्थ प्रकाशित होतात, तेव्हां कांहीं अत्यंत स्वच्छ अथवा लखःलखीत दिसतात; व कांहीं निस्तेज अथवा मलीन दिसतात, हा अनुभव आपल्यास आहे. आतां मलीन असणारे पदार्थ मलीन दिसतात, हा दोष जसा सूर्याचा नव्हे, त्याप्रमाणें दुष्ट मनुष्याची विवेकशक्ति स्वच्छ व निर्मळ असतांही त्याचें आचरण दुष्ट असल्यामुळें दुष्टच दिसतें; हाही दोष विवेकशक्तीचा नव्हे. पाण्यानें ओतप्रोत भरलेल्या सरोवरांत जाऊन जर आपण एक कळशीभरच किंवा तांब्याभरच पाणी आणिलें, तर हा दोष जसा त्या प्रभूत जलसंचयाचा नव्हे, त्याचप्रमाणें आपल्या सर्वांच्या अंतर्यामी साक्षित्वानें राहणारा जो परमेश्वर अथवा आत्मा आहे, त्याचा स्वच्छ, निर्मळ, उद्धारकारी प्रकाश पडला असतांही जर आपण आपल्या वासनांस बरोबर घेऊन **आत्मारामाचा प्रकाश घेण्याची खटपट केली नाहीं,** तर पूर्वकर्मजन्य वासनोपाधींनीं त्या आत्म्याचा प्रकाशही **आपल्यास** मलीनतर होऊन आपणच संकटांत पडूं. सांगावयाचें तात्पर्य असें की, प्रत्येक जीवास व विशेषतः मनुष्यप्राण्यास उत्तम प्रकारचें स्वातंत्र्य देणारी शक्ति प्रत्येक जीवाजवळ असते व त्या शक्तीचा उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य प्रत्येक जीवास व मनुष्यास असतांही ते वासनांच्या आधीन होऊन राहिल्यामुळें व विषयवासना नेतील तिकडे जाण्यांतच परम सुख आहे असें त्याला मोहातिरेकानें वाटत असल्यामुळें तो सर्वथा पराधीन होतो व बुडतो. असला पराधीन जीव आणि अचेतन पदार्थ, यांत जीवांस होणाऱ्या दुःखाव्यतिरिक्त दुसरा फारसा फरक नाहीं. चंडवायूच्या झोतानें भुस्कट जसें वारा नेईल तिकडे अवश होऊन जातें, त्याचप्रमाणें वासनांच्या सामर्थ्यानें अज्ञानी जीव वासना ओढून नेतील तिकडे परवश होऊन जातो. सर्वात्मना व सर्वथा परिस्थितीला वश होणें आणि परिस्थिति बदलण्याचें सामर्थ्य असतांही ती क्षणिक सुखासाठीं न बदलणें, बदलविण्याची स्फूर्ति न होणें, ह्याचेंच नांव नरक होय. एवंच विषयोपभोगाच्या वासना ह्या जीवास परतंत्र करितात, हा जो आधुनिक पंडितांनी हजारों नवीन शोध लावून काढिलेला सिद्धांत तो गीताशास्त्राचा अनुवादच आहे. पाठीमागील क्षणाच्या स्थितिवरून पुढील क्षणाची स्थिति निर्माण होते, कारणशून्य असें कार्य जगांत कधींही उत्पन्न होत नाहीं, हें जितक्या जोरानें व आवेशानें आज विद्वान् लोक प्रतिपादन करित आहेत, तितक्याचें जोरानें व आवेशानें गीताकार सर्वज्ञ भगवान् जगाच्या वेशीवर उभेराहून सांगतात कीं 'बाबांनो! ह्या नश्वर विषयांचा उपभोग घेऊन त्यांत कां तुम्ही एकदां रमूं लागला, म्हणजे तुम्हीं सर्वथा कर्मवश होऊन जिकडे वासना व कर्मे नेतील, तिकडे तुम्हास बिनहरकत जाणें लागेल. कर्मापासून फळ, फळापासून वासना, वासनेपासून पुनः कर्मे, असें रहाटगाडगें एकदां सुरू झाले म्हणजे तुमची सुटका विषयोपभोगी मार्गानें कधींही व्हावयाची नाहीं. योग्य कर्मांचें योग्य कर्मफळ, योग्य फळापासून योग्य वासना आणि या वासनेपासून योग्य कर्म, हें चक्र अखंडित चालणार आहे. सावध

रहा. विषयभोगानें तुम्हास कधींही या कारणकार्यशृंखलेचा एक दुवाही तोडितां येणार नाहीं.' हाच कार्यकारणसंबंध होय. पुन. दुसराही एक डिंडिम भगवद्वाक्यें असे दुमदुमतो आहे कीं, "बाबानो! जर कधीं तुम्हांस विषयवैराग्य झालें तर, विषयाचा कधां वीट आला तर,—मग तो संतांची भेट झाल्यामुळें, सद्गुरूचा अनुग्रह झाल्यामुळें किंवा संकटकाळीं परमेश्वरानें तुम्हांस तुमच्या हांके सरसा हात दिल्यामुळे उत्पन्न होवो;--परमेश्वराकडे जाण्याचा, आत्मारामाची भेट घेण्याचा, स्वस्वरूप पाहाण्याचा, मुख्य पुरुषार्थ साधण्याचा, सारांश स्वतंत्र होण्याचा एकच मार्ग आहे. या मार्गांत पुष्कळ पायऱ्या आहेत. **अधिकार ओळखून घेऊन आपल्या पायरीच्या वरची पायरी आक्रमण करण्याची खटपट विषयपराङ्मुखतेनें करा.** तुमच्या बायकोवर, तुमच्या मुलांवर तुमची स्वाभाविकत:च प्रीति असते, नव्हे? ही पुष्कळ अंशीं निष्काम असते, ती सर्वांशा निष्काम करा आणि तुमचे आईबाप जिवंत असतील, तर त्यांची निःसीम अशी निष्काम भक्ति करावयास लागा. कृतज्ञता ही सन्मार्गाची पहिली उतारपेठ आहे. तुमच्या मुलावरील तुमचें निष्काम प्रेम हें विषयपराङ्मुखतेचें पहिलें चिन्ह आहे. परमार्थाच्या आघाडीचें हे पहिलें निशाण आहे. निष्काम पितृभक्ति आणि निष्कारण पुत्रप्रेम हा पहिला पारमार्थिक भगवा झेंडा होय.' नंतर गोत्रप्रेम, जातिप्रेम, अनाथप्रेम, देशभक्ति या वरच्यावरच्या पायऱ्या आहेत. पूर्वकालीन यज्ञयागादिक कर्मे निष्कामतः करा आणि अन्नसंतर्पण करा किंवा आधुनिक पद्धतीनें मान्य केलेलीं देवालय बांधणें, दानधर्म करणें, विद्येच्या प्रसाराम मदत करणें, इत्यादि कर्मे करा; पण तीं निष्काम बुद्धीनें व निरभिमानानें करा. तुमच्या कुलाचें जें दैवत असेल त्याच्यावर तुमची भक्ति असेल तर ठीकच झालें; नाहीं तर ज्या कोणत्या दैवतानें तुमचें मन शांत, प्रसन्न व निर्मल होत असेल त्या दुसऱ्या कोणत्याही दैवताची मन:पूर्वक आराधना करण्यास लागून इष्टदेवतेचें ध्यान मनात आणण्याची खटपट करा. तुम्हास संध्या करण्याचा अधिकार असेल तर कोणा तरी श्रद्धालु तज्ज्ञाकडून संध्येचा अर्थ समजून घेऊन ओंकार स्वरूपाचें ध्यान करण्यास शिका. सर्व कर्ता करविता ईश्वर आहे ही भावना दृढ धरा. येणेंकरून तुमचा अभिमान विगलित होईल. सुखदुःखासंबंधें बेफिकीर असा. परमेश्वरास वाटेल त्या रीतीनें, तो तुमची क्षणोक्षणीं कसोटी पाहत आहे; तेव्हां सुखाला हरखूं नका, किंवा दुःखाला भिऊं नका. सुखाचा अंगीकार किंवा दुःखाचा प्रतिकार करणें झालें तरी ईशानुज्ञेप्रमाणें करा. कोणत्या तरी ग्रंथाचें व विशेषतः गीतेचें रोज सार्थ पारायण करीत चला. जो काय तुमचा धंदा असेल तो नीट मन लावून व ज्ञानपूर्वक परंतु निष्पापबुद्धीनें, कर्तव्यबुद्धीनें, करा. दिवसांतून एक तासभर तरी परमेश्वराचें चिंतन करीत जा. ध्यानमार्ग जसा जसा आक्रमाल तसा तसा **पराभक्तीचा** उजेड तुमच्या हृदयांत फांकेल. पुढें उपनिषदादि ग्रंथ आचार्य भाष्यासह गुरुमुखानें वाचण्यास लागून ज्ञानमार्गाकडे वळा. ब्रह्मानुचिंतन करूं लागला म्हणजे व विशेषतः ब्रह्मसाक्षात्कार झाला

ह्मणजे तुमची हृदयग्रंथी फुटेल, तुमचे सर्व संशय तुटतील आणि तुह्मी सुदुखःखविरहित होऊन व स्वतंत्र होऊन मुक्त व्हाल. हा मार्ग एकाच जन्मांत कठिंतां येईल असें नाहीं. अनेक, किंबहुना हजारो जन्म तुह्मास घ्यावे लागतील, पण घाबरूं नका; 'सत्कर्माचा, निष्कामबुद्धीनें केलेल्या सत्कृत्याचा, कधींही नाश होत नाहीं.' हा दुसरा जाहिरनामा आहे. मींच सर्व जीवांस ही सनद दिली आहे. व सनदेंतील बक्षिसें मिळविण्याचें सामर्थ्य व स्वातंत्र्य दिलें आहे. मात्र इच्छा, श्रद्धा आणि दृढनिश्चय हीं हवीं आहेत." एवंच सर्व धर्मपंडितांस व विशेषतः ख्रिस्ती धर्मपंडितांस आवश्यक वाटणारी जी वर्तनस्वतंत्रता तीही गीतेमध्यें प्रणीत केली आहे.

याप्रमाणें खरा संसारी तो खरा परतंत्र आणि खरा मुमुक्षु तो खरा स्वतंत्र, हा भेद इतर धर्मकारांच्या चांगलासा लक्षांत न आल्यामुळें वर्तनस्वातंत्र्यासंबंधें जी केव्हां केव्हां भ्रांति उत्पन्न होते, त्या भ्रांतीचा निरास येथें केला आहे. पारतंत्र्य एकदम नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें स्वतंत्रताही एकदम मिळत नाहीं. पहा कीं मुलाच्या सुखा-साठीं स्वतःचा उपभोग टाकणारा बाप कधीं कधीं कुलाचा घात करण्यास प्रवृत्त होतो; किंवा कुलाच्या सुखासाठीं एकदां कुलपती सर्व जातीच्या, किंबहुना सर्व देशाच्याही नाशास उद्युक्त होतो. अशीं उदाहरणें आहेत. कुलाचा नाश केला तर देशाचें संर-क्षण होतें किंवा कुलाचें संरक्षण केलें तर देश ठार बुडतो; असा प्रसंग आला असतां काय करावें? उपभोगदृष्टि बंधांत घालणारी आहे, हें आपल्यास विदित आहे. तेव्हां **कुलाचा उपभोग वाढण्यासाठींच** जर आपण देशाचें सुख बुड-वीत असलों, तर आपण मोठें पातक करितों असें होणार आहे, हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. आतां कुलाचा उपभोग हाच आपल्यास पुरुषार्थ वाटत असेल तर त्याच्या सुखवृद्ध्यर्थ आपण सात्विकमार्गानें (कोणाचा घातपात न करितां) झटावें आणि बाकीच्या कोणच्याही भानगडींत पडूं नये. हें केवळ एक उदा-हरण आहे. अनेक उदाहरणें घेतल्यास नीतीवर एक ग्रंथच लिहावा लागेल. तात्पर्य सांगावयाचें इतकेंच आहे कीं, आपला अधिकार ओळखून, आपलें सामर्थ्य किती आहे तें पाहून व भोंवतालची परिस्थिति काय आहे, तें पाहून आपण आपलें वर्तन विषयपराङ्मुख होईल असें करावें. हा सात्विकमार्ग आहे. याच्या उलटचा मार्ग आसुरी होय. या मार्गांत कर्तृत्वाचा अभिमान, वासनांचें मोहजाल व अभंग अज्ञान यांची कमीजास्त प्रमा-णानें वसति असते. या मार्गांत प्रथमतः मात्र सुखाचा एक बिंदु ठेवला आहेसें दिसतें. पुढें दुःखपरंपरेस, चिंतामग्नतेस आणि कार्यव्यग्रतेस आरंभ होतो.

### जीवाचे शत्रु.

(९) 'याचा परिणाम' प्रभु म्हणतातः 'फार भयंकर आहे.' आपल्या स्वतःच्या हिता-साठीं अथवा क्षणिक सुखासाठीं इतरांच्या सुखाचा व्याघात करणारे दुष्ट नराधम निरंतर

संसारचक्रामध्यें, जन्ममरणाच्या दुःखत्रयरूपी रहाटगाडग्यामध्यें, सांपडतात. शेवटीं त्यांस आसुरी म्हणजे राक्षसी योनी प्राप्त होऊन ते निरंतरचे परमेशशत्रु होतात. परमेश्वराच्या घरीं नित्य व अखंड आनंद आहे. राक्षसांच्या घरीं अर्थातच निरंतरचें व अभंग असें दुःखच असलें पाहिजे. या कामपरजीवांस परमेश्वराची कधींही आठवण न झाल्यामुळें उत्तरोत्तर ते अधमयोनींप्रत जातात आणि शेवटीं नरकवासांत राहतात! ह्या नरकवासाला, या अधोगतीला, जाण्याचे तीन दरवाजे आहेत. काम, क्रोध आणि मोह, हे ते तीन दरवाजे होत. लोभ, मद आणि मत्सर यांचा अंतर्भाव वरील दरवाजांतच होतो. या दरवाजांतून एकदां आंत शिरलें ह्मणजे जीवांचा नाश झाला ह्मणून समजावें. वाघाच्या गुहेंत एकदां शिरलें ह्मणजे निशःस्त्र भ्याड मनुष्यास जसें कधाही परत येतां यावयाचें नाहीं, त्याचप्रमाणें विषयोपभोगी आणि विवेकशून्य पुरुष या मन्मथदरींत शिरला ह्मणजे तो पुनः धडपणें परत येण्याची अशाच नको. ह्मणून शहाण्या माणसानें विषाची परीक्षा न पाहतां काम, क्रोध आणि मोह यांचा सर्वथा त्याग करण्याचा प्रयत्न करावा. हे चोर कामरूप असल्यामुळें परमार्थाच्या पंथास कोठें आडवितील याचा नेम नाहीं. हे तीन जीवशत्रु जीवनाशाचें कारण आहेत. काम हा ब्राह्मणांचा, क्रोध हा क्षत्रियांचा व मोह हा वैश्यांचा, असे हे तीन वर्णांचे तीन शत्रु होत. हे केवळ ठग आहेत. तेव्हां जितका यांच्यांशीं प्रसंग न येवेल तितकी खटपट आपण करावी. ही खटपट ह्मणजे उपभोगाचा यथाशक्ति त्याग करण्याचा बोध करून घेणें ही होय. असो; हे अंधारनगरींत शिरण्याचे दरवाजे जर आपण टाळिले तर आपलें स्वहित ह्मणजे स्वरूपसाधन करण्याला फारसे श्रम लागणार नाहींत. उपभोगाचा मार्ग सुटला ह्मणजे ज्ञानमार्ग दृग्गोचर होतो. ही प्रापंचिक देहयात्रा कंठित असतां प्रत्येक पावलागणतीं दोन बाजूकडे दोन रस्ते फुटलेले दिसतात. उपभोगाच्या विचित्र व रमणीय दिसणाऱ्या रस्त्यावर 'नरकाची वाट' अशी अक्षरें लिहिलीं आहेत; पण तीं पुसट पुसट असल्यामुळें 'सुखाची वाट' आहे, असा भ्रम होऊन जीव फसतो, म्हणून सावध असावें. ज्या वाटेवर 'परब्रह्माची वाट' अशी पाटी लागली आहे, ती वाट खडबडित व खांच खळग्याचीशी वरून दिसत असल्यामुळें आपला नवशिक्या परमार्थी पांथ ही वाट सोडून दुसरीकडे जाईल हा संभव आहे, पण धीर न सोडतां आपल्या अंतर्यामीं जो स्वच्छ दीप प्रकाशत आहे, त्याच्या उत्साहकारी उजेडानें आपण मार्ग क्रमण्यास लागावें. दृढ निश्चय असला ह्मणजे प्रभु म्हणतातः "त्यास उत्तम गति प्राप्त होईल." सारांश त्याला ईश्वरीस्वरूप प्राप्त होऊन तो ब्रह्मच होईल. त्याला पूर्ण स्वातंत्र्य मिळेल. त्याची यातायात अथवा जन्ममरणाचे 'येरझारे' चुकतील. परागति प्राप्त झाल्यावर त्याला पुनः वाट चालण्याचे श्रम पडणार नाहींत. 'मग तो मुक्तचि झाला नलगे त्याला करावया करणी.'

(१०) तेविसावा आणि चोविसावा ह्मणजे शेवटले दोन श्लोक अतिशय महत्वाचे आहेत. **शास्त्रविधी** आणि **कामकारता** या उभयतांमधील विरोध प्रभूंनीं फारच मनोहारक व हृदयभेदक चातुर्यानें प्रकट केला आहे.

## [ ४१२ ]

### शास्त्र म्हणजे काय?

शास्त्र म्हणजे ईशनिर्मित वस्तूमात्राचें यथास्वरूप सर्व सामान्य सिद्धांत. हे सिद्धांत परमेश्वर आपल्या या अभिनव सुंदर सृष्टींत उत्कटत्वानें प्रकट करितो खरें; पण आपल्या सारखे उपभोगवादी जे लोक आहेत त्यांनीं आपलें बुद्धिसर्वस्व उपभोगाच्या ज्ञानशून्य कार्यांत मग्न केलें असल्यामुळें ते सिद्धांत आपल्यास दिसत नाहींत. आतां उपभोगाकडे दुर्लक्ष्य करून जे चतुर व समंजस लोक सृष्टीचें, जीवाचें व परमेश्वराचें अवलोकन ज्ञानदृष्टीनें करितात त्यांच्यावर ईशानुग्रह होऊन त्यांस सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयाविषयीं यथार्थ ज्ञान होतें व जीवाचें व परमेश्वराचें स्वरूप कांहींसें समजून ते कांहीं सिद्धांत ईशप्रेरणेनें प्रकट करितात. हे जे सर्व सामान्य सिद्धांत ईशप्रेरणनें प्रकट होतात तें एक शास्त्र होय आणि त्या शास्त्रापासून जे आचरणाचे नियम निर्गमित होतात, निघतात, तो विधि होय. असो; तेव्हां शास्त्र म्हणजे काय व विधि म्हणजे काय हें आपल्यास समजलें. आतां फार प्राचीनकाळीं आपल्या या आर्यभूमींतील आपले पूर्वज आपलें ब्रह्मचर्य म्हणजे स्वाध्याय पुष्कळ दिवसपर्यंत कायम ठेऊन सृष्टीचें निरीक्षण करीत असत. विवाह झाला तरी सामान्यतः वनांतील कंदमूलांवरच निर्वाह करून ते ज्ञानतपश्चर्येचें कर्तव्य फार जोरानें व नेटानें करीत असत. यामुळें त्यांस ईश्वर प्रसन्न झाला व या महाज्ञानभक्ताकरवीं परमेश्वरानें वेदमंत्र, उपनिषन्मंत्र, पुष्कळशा स्मृति स्वप्रेरणेनें प्रकट करविल्या. गीता तर प्रत्यक्ष भगवंतांनींच प्रकट केली. असो; तेव्हां प्राचीनकाळीं ज्ञानमार्गाचें प्राबल्य फार व उपभोगाचें प्राबल्य कमी झणून या भरत वर्षांत अनेक भौतिक व आत्मिक शास्त्रांचा उदय झाला. पुढे कांहीं शतकें गेल्यानंतर एक महाविलक्षण प्रतिकार्य होऊन उपभोगाची लालसा बलवत्तर झाली आणि ज्ञानमार्गालीं शिथिलता आली. ज्ञानमार्गाचा प्रवर्धक व प्रवर्तक झणून जो एक वर्ण निराळाच काढून ठेविला होता, त्यानें म्हणजे ब्राह्मणवर्णानें आपला स्वधर्म अथवा वर्णधर्म सोडून देऊन उपभोगाच्या परधर्मांत ते शिरले. याप्रमाणें ह्या धर्मशिक्षक व धर्मप्रवर्तक लोकांनींच जेव्हां वासनाप्रेरित कर्माचा स्वीकार केला, तेव्हां बाकीचे राष्ट्रही उद्योग सोडून उपभोगाच्या कासेस लागले. अर्थातच ज्ञानाचा अस्त आणि अज्ञानाचा उदय झाला व परमेश्वरी स्वरूप ओळखिण्यास आपले ज्ञाननेत्र मंदतेज झाले. उपभोगाची हौस उत्पन्न झाली. हा पापमार्ग होय. कलियुगाचा आरंभ येथेंच झाला. असो; हल्लीं सुद्धां आपली प्रवृत्ति उपभोगमार्गाकडे केवढी जबरदस्त आहे, हें वरवर पाहिलें तरी सहज लक्षांत येण्यासारखें आहे. निर्णयसागर छापखान्यांतून 'सुभाषितसंग्रह' या नांवाचा बराच मोठा थोरला ग्रंथ कित्येक दिवसांमागें बाहेर पडला आहे. या ग्रंथांत स्त्रियांच्या उपभोग्यत्वाला, त्यांच्या कुचांना, नेत्रांना व इतर अवयवांना किती पृष्ठ अर्पण केलीं आहेत हें जर सहज पाहिलें, मम्मटकृत काव्यप्रकाशांतील अलंकारांखालीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांत काम–महाराजांनीं व त्यांच्या परिवारानें किती भाग व्यापला आहे

हें जर सहज पाहिलें, एखाद्या 'गायनपटु' हद्दूखांचे गायनांतील संस्कृत भाग आटपलासा झाल्यावर 'एखाद्या प्राकृत' चीजेवर-'हं मदंगा लावु नका कर' या पद्यावर-कशा उड्या पडतात हें पाहिलें तर, आमची रसिक मंडळी आज मित्तीला कोणीकडे धांव मारित आहे, याचें बरेंच दिग्दर्शन होईल. अर्थातच हा संपादकांचा दोष नव्हे. ज्यांच्यासाठीं हे ग्रंथ लिहिले गेले त्यांच्या कामरतत्वाचा हा दोष होय. असो: झाली गोष्ट ती साल-गुदस्त. आतां यापुढें तरी उपभोगशीलता कमी होऊन ज्ञानमार्गाचें मागसलेलें पाऊल पुढें पडावें असा आमच्या मनाचा कल होईल काय? प्रसंग फार आणीबाणीचा परंतु आप-ल्यास अनुकूल असा आहे. ईशकृपेनें इंग्लिश लोकांसारख्या ज्ञानप्रिय आणि स्वातंत्र्य-भक्त लोकांशीं आपला नित्यसमागम झाला आहे. उपभोगाचें मुख्य साधन जी संपत्ति-देवी तिचीही आज मित्तीस आपल्यावर पूर्ण वक्रदृष्टि आहे. तेव्हां 'वाहत्या गंगेंत हात धुण्याची' पर्वणी साधून जर आमची मंडळी व विशेषतः ब्राह्मण लोक उपभोग-वृत्तीचा त्याग करतील आणि ज्ञानवृत्तीचें पाणीग्रहण करतील तर आपण आपल्या पूर्ण ज्ञानतेजानें जगांत जमकूं लागूं; हा केवळ आनुषंगिक लाभ होय. आपण ज्ञानमार्गाचें सेवन केल्यास वाढत जाणाऱ्या अधिभौतिक सुखदुःखाची किमन कमी होऊन आपण ईश्वरचरणाजवळ जाऊं व पुढें ब्रह्मानंदाच्या आत्यंतिक सुखसागरांत यथेच्छ बुडया मारावयास लागूं, हा बरीक बहुमोल लाभ होय.

## कामदास.

असो; शास्त्र व नियम यांचें उल्लंघन करून केवळ आपल्या विकारोत्पन्न लहरींच्या अनुज्ञेनें मात्र जे वागतात, सारांश ज्याचें वर्तन अत्यंत अनियमित व वासनाप्रेरित असतें त्या लोकांस कोणत्याही प्रकारची सिद्धि होत नाहीं, हें त्याच्या स्वतःच्याच उदाहरणावरून स्पष्ट होते. त्यांस अधिदैविक सुख तर नाहीच, पण अधिभौतिक अथवा अध्यात्मिक सुखही मिळत नाहीं; आणि शेवटीं त्यांस गतीही चांगल्या प्रकारची लाभत नाहीं. उघडच आहे. सृष्टीचे नियम अथवा सृष्टिकर्त्या परमेश्वराच्या आज्ञा, यांचें जो उल्लंघन करील त्याला जय कोठून, सुख कोठलें आणि उत्तम गति तरी कशी प्राप्त होणार? पहा कीं, सूर्यासारख्या उत्तम प्रकाश देणाऱ्या उज्वल तेजोराशीच्या दैवी किरणांचा आंत प्रवेश न होई अशा तजविजीनें ज्यानें आपल्या घराची सर्व दारें, खिडक्या, गवाक्षें इत्यादि बंद केलीं आणि उजेड येईल या भीतीनें सर्व घरास आंतून बाहेरून लोखंडांच्या पत्र्यांचें आस्तर घातलें आणि नंतर घरांत एक लहानशी भिकार पंती ठेवून अथवा एक काजवा ठेऊन ज्यानें आपल्या गृहकृत्यास सुरवात केली, त्याला त्या अंधेरांतील कृत्यांत सिद्धि काय मिळणार, सुख कसलें होणार आणि त्याचा पुरुषार्थ काय साध्य होणार! याचप्रमाणें सृष्टिरूपी प्रज्वलित दीप आणि ईशकृत तेजःपुंज व अप्रतिहत सूर्यचंद्ररूपी वेद-शास्त्र यांचा धिःकार करून आपल्या स्वतःच्या तुटपुंज्या ज्ञानाची मिणमिणीत व वासना-

रूपी वाऱ्याचे झोतानें क्षणक्षणा हलणारी दिवली घेऊन जो देहयात्रा अथवा जीवयात्रा करावयास लागला त्याला त्याच्या अज्ञानानें कधींही जय मिळावयाचा नाहीं; ज्या सुखासाठीं ज्यानें शास्त्रप्रणित राजमार्ग सोडून आडरानांतील रस्ता धरला, तें सुखही त्यांस लाभणार नाहीं; सारांश या गरीब बापड्या वराकाचा जो कामरूपी पुरुषार्थ तोही त्यास मिळणार नाहीं; मग धर्म, अर्थ किंवा मोक्ष यांची गोष्ट कशाला?

( ११ ) म्हणून अर्जुनाला व अर्जुननिमित्तानें भूत, भावी व वर्तमान मनुष्यप्राण्यास भगवान् सांगतातः "बाबा! कोणतें कृत्य करावें, कोणतें करूं नये हें ठरविण्यास शास्त्रासारखें दुसरें प्रमाण नाहीं. शास्त्रांत परमेश्वराच्या अनुग्रहानें सृष्टीचा व्यापारक्रम व आत्मा हे वर्णिलेले असतात. सारांश सृष्टिस्थिति व आत्मिकस्थिति यांचे सिद्धांत शास्त्रावरून समजतात. तेव्हां आपली सद्यःकालीं उत्पन्न झालेली जी विकाररूपी वासना इचा त्याग करून "शास्त्र काय आज्ञा करीत आहे, तें प्रथमतः नीट समजून घे आणि नंतर तुझी खात्री झाली तर शास्त्राप्रमाणें तुझ्या वर्णास या समयीं जें योग्य कर्म ( युद्ध ) आहे तें कर." शास्त्र काय आहे, तें नीट समजून त्याप्रमाणें स्वकर्तव्याचें आचरण करण्यास सांगणारा हा उपदेश किती तरी सरळ आहे! आधीं 'काय करावयाचें' याचा नीट व शास्त्रज्ञानपूर्वक विचार करून जर आमची मंडळी कोणतेंही काम अंगावर घेतील तर केवढी बरें मजा होईल.

## सारांश.

(१२) याप्रमाणें दैवी संपत्ति म्हणजे अधिकारानुसार विषयपराङ्मुखता व आसुरीसंपत्ति म्हणजे विषयसन्मुखता होत. या दोन प्रकृतींचा विचार झाला आणि शास्त्रोक्त कर्तव्य निष्कामबुद्धीनें केलें तर सिद्धि प्राप्त होईल आणि कोणतेंही काम विकारवश असणाऱ्या आपल्या स्वतःच्या, तुटपुंज्या, ज्ञानाच्या जोरावर केलें असतां आपली फटफजिती होऊन दुःख मात्र आपल्या पदरीं पडेल असा निश्चय ठरला. अधिकारानुसार प्राप्त झालेलें कर्तव्य निष्कामबुद्धीनें व निरहंकारानें ज्ञानपूर्वक करावें तरच सिद्धि प्राप्त होईल हें या अध्यायाचें सार आहे.

---

## खंड १७ वा.

# सतराव्या अध्यायाचा उपसंहार.

गेल्या अध्यायांत प्रभूंनीं असा सिद्धांत ठरविला कीं, आपली आत्मिक उन्नति करविण्यास उपयोगी जी चित्तशुद्धि, ती संपादन करून देणारें कर्म जर आपल्या हातून

बरोबर व यथासांग करून घ्यावयाचें असेल, तर आपल्यास शास्त्रज्ञान म्हणजे ईशप्रणित ज्ञान अवश्य हवें. शास्त्र-ज्ञान नसेल तर आपण आपल्या विकारास वश होऊन अधोगतीस जाण्याचा संभव असतो; याकरितां शास्त्रज्ञान, वेदशास्त्रोक्तज्ञान, अवश्य हवें. आतां हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, नुसतें वेदशास्त्र-'घोकंपट्टीचें' ज्ञान उपयोगी नाहीं. हें ज्ञान जिवंत असून आपली वृत्ति उन्नत करण्याच्या उपयोगीं पडणारें असलें पाहिजे. तसेंच नुसता सार्थ वेद आपल्यास येत असला तरी उपयोगी नाहीं. ज्या ज्या योगानें आपल्या मनावर संस्कार होऊन तें मन दिवसानुदिवस विषयपराङ्मुख होईल, मन ईश्वराकडे वळेल व तत्त्वरणारविंदीं उत्तम एकनिष्ठा उत्पन्न करून आपल्या आचरणास दैवी स्वरूप देईल, अथवा मागील अध्यायांत सांगितलेल्या दैवी संपत्तीचें उगमस्थान होईल, तें ज्ञान पाहिजे आहे. अभेद उत्पन्न करणारें शास्त्रोक्त ज्ञान हवें आहे, येथें नुसत्या ज्ञानाची महति नाहीं. ईश्वरी साक्षात्कार, भेदाभेदशून्यता आणि ईश्वराजवळ नेणारी श्रद्धा ह्या संपाद्य गोष्टी आहेत. सारांश, शास्त्रोक्त ज्ञानानें उत्पन्न होणारी सात्त्विक व पुढें पुढें सत्त्वगुणातीत श्रद्धा, अभेदबुद्धि व ज्ञानविज्ञान ह्या गोष्टी आपल्यास मिळावयाच्या आहेत. नुसतें पांडित्यप्रदर्शक ज्ञान-मग तें अद्वैतज्ञान असो अथवा वेदशास्त्रोक्त ज्ञान असोः तें त्याज्य आहे.

## श्रद्धेच्या जाति.

मागील अध्यायांचा हा थोडक्यांत सारांश आहे. प्रस्तुतच्या अध्यायांत स्वाभाविक असणारी, आपल्या जन्माबरोबर उत्पन्न होणारी, जी साहजिक श्रद्धा, असंस्कृत श्रद्धा, तिचा विचार करावयाचा आहे. 'दैवी संपत्ति मिळवून देणारें कर्म शास्त्रज्ञानपूर्वक कर,' असें ऐकून अर्जुन म्हणतोः 'देवा! सगळ्यांसच शास्त्राचा अभ्यास करण्याचें सामर्थ्य कोठून असणार? या विश्वांत हजारों जीव असे आहेत कीं, ज्यांस शास्त्रज्ञान संपादून घेणें दुष्कर, प्रायः अशक्यच आहे, पण त्यांच्या अंतःकरणांत जी साहजिक श्रद्धा असते, जो सहजभाव असतो, कुलपरंपरेनें जी निष्ठा उत्पन्न झालेली असते, तिला जर शास्त्रसंस्कार झाला नसेल, तर त्या निष्ठेची, भावाची अथवा श्रद्धेची किंमत आपण आपल्या या उन्नतीच्या दरबारांत काय ठरवाल? शास्त्रमार्ग सोडून देऊन स्वभावतःच विकारवश झालेली किंवा शास्त्रज्ञान असतांही त्याचा जाणून बुजून अनादर करून वृत्तिलंपट झालेली अहंमन्य पंडित-मंडळी ही कदापि क्षम्य नाहीं, ही मंडळी अधोगतीस जाणार, हें सर्व ठीक आहे. पण शास्त्रज्ञान करून घेण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें ज्यांचें मन सुसंस्कृत झालें नाहीं, असे लोक जर श्रद्धालु असतील तर त्यांची श्रद्धा कां सात्त्विक होईल, कां राजस होईल, किंवा तामस होईल?' सारांश, जन्मादारभ्य असलेली असंस्कृत श्रद्धा आत्मोन्नतीस कांहीं उपयोगाची आहे कीं नाहीं असा प्रश्न आहे.

[ ४३६ ]

## स्वभावाची कुलपरंपरा.

१ स्वभाव म्हणजे आपल्या पूर्वजन्मार्जित पुण्यापुण्य संचयानें उत्पन्न होणारी मनोघटना म्हणजे ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति यांची योजना होय. हिंदुशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं, प्रकृति, कर्म, वित्त, विद्या आणि मृत्यु ही पांच मनुष्याच्या जन्माबरोबरच उत्पन्न होतात. प्रकृत्यादि पंचक हें पूर्वकर्मविपाकाचें फल असतें. ह्या पांचांनीं घटित ज्ञान व वासना याचेंच नांव स्वभाव होय. आपला स्वभाव सात्त्विक, किंवा राजस किंवा तामस असणें हें आपल्या पूर्वकर्मावर अवलंबून आहे. आपण आपल्याबरोबर आणलेल्या स्वभावास कुलपरंपरागत अथवा देहपरंपरागत प्राप्त झालेल्या ज्ञानाचे संस्कार मिळून तो बरा वाईट होण्याचा संभव आहे, त्याचप्रमाणें उत्तम तऱ्हेचें शास्त्रीयज्ञान आपल्यास झालें तर, तो उत्तम रीतीचा सात्त्विक होणें हेंही संभवनीय आहे. पण हा सर्व प्रकार आपल्या जन्माबरोबर येणाऱ्या वासनेप्रमाणें होत असतो. मागें पंधराव्या अध्यायाच्या उपसंहारांत सिद्ध केल्याप्रमाणें प्रत्येक जन्मीं जें जें कर्म आपल्या हातून होतें, त्या कर्माचा परिणाम मग हें कर्म मानसिक असो वा शारीरिक असो–आपल्या शरीरावर व मनावर होत असतो. दुधांत शर्करेचा अथवा लवणाचा खडा टाकतां क्षणीं जसा त्यामध्यें विकार व्हावयाचा हें निश्चित ठरलेलें आहे, त्याप्रमाणें प्रत्येक चांगल्या अगर वाईट कृत्याचा परिणाम आपल्या शरीरावर व मनावर व्हावयाचा हेंही ठरलें आहे. शरीरावर होणारे परिणाम तर स्पष्ट दिसतातच. आतां, मनावर परिणाम व्हावयाचा ह्मणजे मनाचें कर्माप्रमाणें स्वरूप बदलावयाचें. वाईट विचारांनीं किंवा वाईट शब्दोच्चारांनीं मन प्रक्षुब्ध होतें; व चांगल्या विचारांनीं व चांगल्या शब्दोच्चारांनीं मन शांत होतें; हा सर्वप्रसिद्ध अनुभव प्रत्येक जीवाला क्षणोक्षणीं येत असतो. असो; याप्रमाणें मन हें प्रत्येक क्षणीं कर्मानुसार संस्कृत होतें अगर विकृत होतें; आणि जसें तें संस्कृत अगर विकृत झालें असेल, त्याप्रमाणें वासना चांगल्या अगर वाईट उत्पन्न होतात. चांगल्या वासना ह्मणजे आपल्या जीवास निरंतरची सुस्थिति असावी ही इच्छा व त्या इच्छेस वास्तविक स्वरूप देणारें कर्म करण्याचें सामर्थ्य होय; वाईट वासना म्हणजे जीवाला कसें तरी व कसलें तरी सुख मिळावें, अशी इच्छा व तदनुसार कर्म करण्याचें सामर्थ्य होय. असो, तेव्हां प्रत्येक सद्वासना आपल्या जीवास सद्रूपाकडे नेत असते व प्रत्येक दुर्वासना असद्रूपाकडे नेत असते. पुनः चांगलें कर्म करण्याची इच्छा प्रकट करण्याचें सामर्थ्य व स्वातंत्र्य, जीवाला आहे. म्हणून चांगलें कर्म करण्याची इच्छा धरणें व चांगलें कर्म करणें यांनीं सद्वासना प्रोत्साहित होतात व पुढें सद्वासनानुसार सत्कर्म करण्याची आपल्यास बुद्धि होते, ही बुद्धि आपण झोंपी गेलों, मूर्च्छित पडलों ह्मणून जशी नाहींशी होत नाहीं, त्याचप्रमाणें आपण जरी मेलों, तथापि ही बुद्धि नष्ट होत नाहीं म्हणून जन्मतः जी बुद्धि आपल्याबरोबर येते, तिचें नांवही स्वभाव होय. यावरून वाचकांच्या लक्ष्यांत अर्थातच एक दोन गोष्टी येतीलः एक तर आपल्या शारीरिक अथवा मानसिक कर्माप्रमाणें आपली बुद्धि फिरते ह्मणून आपण नेहमीं सत्कर्म ( म्हणजे जीवाची

जन्ममृत्यूच्या तापत्रयापासून मुटका करणारें कर्म ) करण्याचा प्रतिक्षणीं मनापासून प्रयत्न करावा आणि जीवाला यातना भोगण्यास लावणारें जें दुष्कर्म, त्याचा त्याग करावा; दुसरी गोष्ट ही कीं, मरतेवेळीं आपल्या मनांत जी वासना असेल, ती आपल्या पूर्वकर्मानेंच घडलेली असावयाची तेव्हां मरावयाच्या अगोदर व समजूं लागल्यानंतर आपल्या हातून असें कर्म होत असावें कीं, ज्या योगें मरणाच्या वेळीं आपल्यास सहज सद्वासनाच उत्पन्न होईल. कर्म आणि त्याचें फळ यांचा कार्यकारणसंबंध जर अबाधित आहे, म्हणजे अमुक एक कर्म केलें असतां त्याचें अमुक फळ व्हावयाचें हें जर निश्चित ठरलेलें आहे, तर कर्मविपाकानुरूप प्रत्येक क्षणीं उत्पन्न होणाऱ्या वासना कर्माबरहुकूम असल्याच पाहिजेत. मरणसमयीं अत्यंत असह्य वेदना होत असतां व मनाची तंद्री सर्वथा त्या वेदनांकडे लागली असतां मनांत उत्पन्न होणारी वासना कर्मानुरूपच असली पाहिजे. गोष्ट अशी आहे कीं, एका नास्तिक विद्वानाचा मरणसमय येऊन ठेपला, तेव्हां जवळच्या मंडळींनीं हरीचें नांव घेण्यास त्या गृहस्थाला हरतऱ्हेनें सांगितलें. पण प्राचीनकर्माचा जोर इतका बलवत्तर कीं, त्या गृहस्थाच्या तोंडून 'वैद्यराज! आपणच माझे देव आहां' असे मोठ्या कष्टानें शब्द निघाले! सारांश पूर्वकर्म चांगलें नसेल तर वासना कधींही चांगली व्हावयाची नाहीं, व तेंच कर्म चांगलें असेल तर वाईट वासना कधींही व्हावयाची नाही, म्हणून मरणसमयीं कर्मानुसार वासना होते आणि त्या वासनेप्रमाणें पुढें जन्म प्राप्त होतो. एवंच पुढील जन्म चांगला अगर वाईट प्राप्त करून घेणें, हे मनुष्याच्या पौरुषेयावर ह्मणजे कर्मावर अवलंबून आहे, ही गोष्ट जर वाचकांच्या लक्ष्यांत आली, त्यांनीं कृपा करून जर ही लक्ष्यांत ठेविली. इतकेंच नव्हे, तर ह्या गोष्टीवर त्यांची पूर्ण श्रद्धा बसून तदनुसार त्यांचें आचरण होऊं लागलें तर त्यांच्या कर्माला शास्त्रशुद्धता येऊं लागून त्यांच्या वासना दैवी होतील आणि पुढें पुढें त्यांस उत्तमोत्तम जन्म प्राप्त होऊं लागून, ते लवकरच जन्ममरणातीत अथवा दुःखातीत होतील. असो; सांगावयाचें तात्पर्य हें आहे कीं, जन्मतांक्षणीं आपल्यास जो स्वभाव प्राप्त होतो, तो आपल्या कर्मानुसार प्राप्त होतो. परमार्थतः आपल्या जन्मस्वभावाचे आपणच जनक आहों! अथवा आपला स्वभाव ह्मणजे आपल्या कर्माचा पुत्र होय! आतां

## श्रद्धा ह्मणजे काय.

२ याचा थोडासा विचार करूं. श्रद्धा ह्मणजे विश्वास, दृढ विश्वास होय. अमुक कर्म केलें असतां अमुक फल प्राप्त होईल, या विश्वरचनेमध्यें अमुक अमुक स्थिति निश्चित आहे व ती स्थिति अमुक मार्गानें गेलें असतां ज्ञानवश होणारी आहे व यथासांग कर्म केलें असतां खास रीतीनें मिळणारी आहे; या ठिकाणीं म्हणजे या सिद्धांतावर जो दृढ, अभंग, अभेद्य, विश्वास असतो, याचें नांव श्रद्धा. आतां, नुकतेंच आपण असें ठरविलें कीं, जीवाला जो स्वभाव प्राप्त होतो, तो त्याच्या पूर्वकर्मा-

नुरूप असतो. या स्वभावाला बुद्धि असें ह्मणतात. या बुद्धींतच ज्ञानसामर्थ्य इच्छा-सामर्थ्य यांचा अंतर्भाव होतो. या जगांत अवतीर्ण होऊन हें जग पाहण्यास आरंभ केल्यानंतर हें जग समजण्याचें जें सामर्थ्य व ह्या अनुभवापासून सामान्य सिद्धांत काढण्याचें जें सामर्थ्य असतें त्यास ज्ञानसामर्थ्य ह्मणावें; आणि सिद्धांत काढल्यानंतर अमुक स्थिति चांगली म्हणजे निरंतरचें सुख देणारी व ह्मणून ती आपल्यास हवी, व दुसरी स्थिति वाईट म्हणजे निरंतरचें दुःख देणारी व ह्मणून ती आपल्यास नको, असे जे मनांत विकार-मिश्रित विचारतरंग येणें, याचें नांव इच्छासामर्थ्य आहे. असो; या स्वभावांत अंतर्भूत होणाऱ्या ज्ञानसामर्थ्यानें व इच्छासामर्थ्यानें आपल्यास या विश्वांतील चमत्कार कळून निश्चित स्थिति कोणती आहे हें समजतें व ती निश्चित व सुखद अथवा मनाला शांतता देणारी स्थिति आपणास हवी, अशी दृढ व बलवत्तर इच्छा होतें. अमुक एक वस्तु-स्थिति कळणें व अमुक मार्गानें ज्ञानपूर्वक गेलें असतां ती इष्टस्थिति आपल्यास प्राप्त होईल, असा निश्चय स्वानुभवानें अगर आप्तवाक्यानें उत्पन्न होणें, याचें नांव श्रद्धा आहे. अर्थातच तर मग आपल्या स्वभावापासून श्रद्धेची उत्पत्ति आहे.

'हल्लीं आपल्या देशांत श्रद्धा नाहींशी होत चालली, श्रद्धा नष्ट झाली,' अशी ओरड सुरू आहे. याचा अर्थ काय बरें असावा? श्रद्धा म्हणजे पूर्वकर्मानुरूप घडून आलेल्या स्वभावापासून उत्पन्न होणारा वस्तुस्थितिविषयक विश्वास होय, हें आतांच आपण पाहिलें. हा विश्वास आपल्या स्वतःच्या अनुभवानें व आप्त म्हणजे यथार्थ सांगणाऱ्या गृहस्थाच्या वाक्यावरून आप्तवाक्यावरून दृढ होतो. सारांश, आपलें पूर्वजन्मींचें वासनारूपानें अवतीर्ण झालेलें कर्म व ज्ञान, आपला ह्या जन्मींचा अनुभव आणि इष्टमित्रांचा व सत्यान्वेषी गृहस्थांचा आणि परमेश्वरप्रेरित मुनींचा अनुभव, या सगळ्या घटकावयवांच्या मिश्रणानें आपली ही वस्तु तयार होते. आतां हल्लीं असा प्रसंग प्राप्त झाला आहे कीं, अनुभव, प्रत्यक्ष अनुभव, आल्याखेरीज नुसत्या पूर्वऋषींच्या ह्मणण्यावर विश्वास बसत नाहीं. कारण, आमच्या नुकत्याच निवर्तलेल्या दोनतीन शतकांच्या पूर्वजांनीं **खरें रहस्य समजून घेतल्याशिवाय** परंपरागत आचरणाचा स्वीकार केल्यामुळें व हल्लींच्या धर्मशासक मंडळींचाही तोच क्रम सुरू असल्यामुळें सामान्य अशा कित्येक धार्मिक आचरणांचें इंगीत लोकांस कळलें नाहीं, व सध्यां कळत नाहीं. पुनः, हल्लींच्या मनूंत ज्या युरोपियन राष्ट्राशीं आपलें लग्न लागलेलें आहे, तेथें व इतर युरोपियन राष्ट्रांत ऋषि सृष्टीची तपश्चर्या करण्यांत तपेंच्या तपें खर्च करित असल्यामुळें यूरोपखंडांत व युरोपियन राष्ट्रांत, ज्ञानाला अधिभौतिक व अध्यात्मिक ज्ञानाला, बाह्य दृष्टीनें ऊत आला आहे, असें दिसतें. अर्थातच सृष्टिसंबंधीं ह्या युरोपियन ऋषींचीं वाक्यें अनुभवास अत्यंत अनुकूल असतात. आमच्या येथें अनुभवशून्य बोलणें आणि यूरोपियनराष्ट्रांतील अनुभवयुक्त बोलणें यामध्यें अर्थात विरोध पडतो. सृष्टिविषयक जे सिद्धांत आपल्या देशांत प्रच-

लित आहेत त्यांचा अनुभव येत नाही व युरोपियन सिद्धांत अनुभवाच्या कसोटीस उतरतात, याचा परिणाम उघडच असा होतो की, युरोपियन लोकांच्या अनुभविक सिद्धांतावर एतद्देशीय लोकांचा विश्वास बसतो व आपल्याइकडील अनुभवशून्य, शाब्दिक अथवा पोपटपंची करणाऱ्या आर्जवी पंडितांच्या जुनाट झालेल्या सिद्धांतावर आपला विश्वास बसत नाही. आतां धडधडित सामान्य गोष्टीवरील विश्वास उडाल्या-बरोबर अर्थातच अत्यंत श्रेष्ठ, अभंग, अभेद्य, कालस्थलातीत आणि म्हणूनच समज-ण्यास अतिगहन अशा एतद्देशीय पारमार्थिक सिद्धांतांविषयीं व परमेश्वराच्या अस्तित्वा-विषयींही मन शंकाकुल झाले, यांत काय आश्चर्य आहे! पुनः, सृष्टिविषयक शास्त्रांवर भरंवसा ठेऊन तदनुसार वर्तन केल्याकारणानें युरोपियन राष्ट्रें अत्यंत जोरांत येऊन संतति, संपत्ति, सत्ता, विद्या, कला, शोभा, अधिभौतिक सुख इत्यादि सामान्य जनांस इष्ट दिसणाऱ्या वस्तूंचें माहेरघर होऊन बसलीं आहेत; आणि आम्ही मात्र 'देवाचे लाडके परमार्थ ज्ञानी' असे म्हणवून घेणारे वसिष्ठ, विश्वामित्राचे पुत्रपौत्र अठराविश्वे दरिद्रांत लोळत असल्यामुळें दुःखाच्या तापत्रयानें होरपळून जात आहोंत! जेव्हां सामान्य लोकांच्या नजरेस ही गोष्ट येते तेव्हां त्यांचा हिंदुशास्त्रावरील, हिदुपुराणांवरील, हिदुवेदांतग्रंथांवरील विश्वास अजीबात उडतो, यांत त्यांचा तरी काय दोष आहे! आणखी; आपल्या देशांत जे धर्मोपदेशक म्हणून मिरवितात त्यांचें म्हणणे, सर्वसंगपरित्याग केलेले संन्यासी व बैरागी, वेदपारं-गत ब्राह्मण, परंपरागत पुराणिक, सांप्रदायिक हरिदास, इत्यादिकांचे आजमितीचें वर्तन अथवा दुर्वर्तन पाहिले म्हणजेही आपल्या देशांत अश्रद्धेचें बीज कसें रुजलें असावें याची मीमांसा करण्यास फार लांब जावयास नको आहे. 'सर्व नगराभोंवती धावळ्या पसरल्या असतां शत्रूला चढाई करून शहरांत शिरतां येणार नाहीं' असें गंभीरपणानें रावबाजीस फसविणाऱ्या ब्राह्मणवर्गी हितशत्रूंची गोष्ट सोडून दिली तरी, 'नारायण, नारायण' म्हणून पैशाचा व्यापार करणारे भगवे संन्यासी, वाटेल तसला नैसर्गिक अथवा निसर्ग-विरुद्ध अविचार करणारे गोमावी, थोंडभट्टी करून दक्षिणेप्रीत्यर्थ वाटेल तें करण्यास सज्ज होणारे वेदशास्त्रोन्मत्त ब्राह्मण, राधाकृष्णाच्या शारीरिक लीलांचें वर्णन करि-तांना शृंगाररसाची वहार उठवून देणारे नटवे व नाटकी पुराणिक, वैधव्यपंकांत रुतलेल्या आयाबायांस 'गुपित उपदेश' करून या बिचाऱ्या अनाथांच्या संपत्तीची व अब्रूची राखरांगोळी करणारे हरिदास, 'सर्वच ब्रह्म आहे' या सबबीवर अत्यंत गलिच्छ व किळस आणणारें दुराचरण करणारे खाऊ व बोलघेवडे वेदांती इत्यादिकांचें ज्ञान आणि आचरणांतर्गत अज्ञान ही जोडी पाहिल्यानंतर ज्याला म्हणून यत्किंचित् बुद्धि आहे तो पुरुष या नराधमांचा द्वेष करूं लागला व या मानवी राक्षसांच्या तोंडातून आल्यामुळें विषमय झालेल्या सिद्धांतांविषयीं श्रद्धाशून्य झाला, तर त्यांत त्याचा काय दोष आहे? असो; या अशा दोन तीन कारणांनीं आमच्या येथें हल्लीं अत्यंत अश्रद्धा उत्पन्न झाली आहे. ज्यादिवशीं धर्मप्रचारक ब्राह्मणवर्गानें ज्ञानाची व आपली फारकत करून घेतली व

उपभोगार्थ आपलें लग्न लाविलें, त्या दिवशीं अश्रद्धेचें बीज आमच्या देशांत रोंविलें गेलें. असो; झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. आतां आपला मार्ग सुधारला पाहिजे. हल्लींची अश्रद्धा हीही आपली साह्यकारिणी होणार आहे; कसें ह्मणाल तर पहाः जें बोलणें अनुभवाच्या कसोटीस उतरत नाहीं, त्याच्यावर श्रद्धा बसत नाहीं. योग्य ज्ञानाविरहित जें बोलणें असतें, तें अनुभवाविरुद्ध असतें. तेव्हां आपण आपली ज्ञानाची, अनुभवानें खरें ठरलेल्या त्या ज्ञानक्षेत्राची मर्यादा व शक्ति वाढवीत गेलें पाहिजे, व जे आपल्यास उत्तम समजलें व निश्चित अनुभवास आलें तेंच बोललें पाहिजे व सिद्ध करून दाखविलें पाहिजे, म्हणजे आपल्या वाक्यावर विश्वास बसेल. कारण अनुभवयुक्त बोलण्यावर विश्वास बसलाच पाहिजे. एवंच हल्लींची अश्रद्धा म्हणजे ज्ञानाच्या प्राप्तीबद्दल हाकाटी आहे. ज्ञान अधिभौतिक असो, अध्यात्मिक असो, किंवा अधिदैविक असो, ज्ञान ही एक सर्वमान्य व सर्वसंग्राह्य वस्तु आहे ज्ञानाच्या अभावीं पतनशीलता येते. ज्ञानाच्या अभावीं नास्तिकपणा उत्पन्न होतो. नास्तिकपणा जास्त वाढला ह्मणजे धर्मवेडेपणा माजतो. पहा कीं, या जगांत कोणत्याही प्रकारची व्यवस्था नाहीं, कार्यकारणांचा येथें संबंध नाहीं, हें जग आकस्मिकतः उत्पन्न झालें व आकस्मिकतः लयास जाणार, असें वाटावयास लागणें याचें नांव नास्तिकपणा होय. अव्यवस्था आहे, नियमन नाहीं, नियंता नाहीं, कार्यकारण नाहीं, हीच नास्तिकांची वृत्ति. कोणत्याही कारणापासून वाटेल तें कार्य उत्पन्न होईल असें 'जगांत व्यवस्था नाहीं' असें ह्मणणाऱ्या नास्तिकासच वाटावयाचें. एवंच नास्तिकपणा व धर्मवेड यांचा याप्रमाणें पितापुत्राचा संबंध आहे. असो; हा नास्तिकपणा घालविण्यास व या विश्वामध्यें सर्वत्र व्यवस्था आहे, असा निश्चय घडवून आणण्यास ज्ञानासारखें दुसरें साधन नाहीं. ज्ञानी मनुष्याच्या शंका विश्वव्यवस्थेच्या नियमांवरील विश्वास दृढ करण्यास कारणभूत होतात. तात्पर्य, ज्ञान वाढलें ह्मणजे विश्वास दृढ होतो अथवा श्रद्धा उत्पन्न होते. श्रद्धा दृढ असली म्हणजे ज्ञान वृद्धिंगत होतें. ज्ञानवृद्धीनें सत्कर्मवृद्धि श्रद्धापूर्वक होते, सत्कर्मानें श्रेष्ठस्थिति प्राप्त होते आणि एकंदरींत याप्रमाणें व्यक्तीची व समाजाची उन्नति ज्ञानवृद्धीनें होते; ही आत्मिक उन्नति होय. सारांश ज्ञान असेल तशी श्रद्धा, श्रद्धा असेल तसें कर्म, कर्म असेल तशी वासना आणि वासना असेल तसा स्वभाव आणि स्वभावानुसार ज्ञान व श्रद्धा अशी ही परंपरा आहे. असो; आतां सर्व प्रकारचें ज्ञान वाढविण्याची सद्यःकालीं खटपट करणें अत्यंत इष्ट आहे. सृष्टिज्ञान केवळ ज्ञानदृष्टीनें वाढविलें ह्मणजे अध्यात्मिक ज्ञानास-वेदांतज्ञानास-जोर येतो, आणि जन्ममरण चुकण्याचा संभव उत्पन्न होतो.

## श्रद्धाप्रकार.

३. याप्रमाणें ज्ञानानुरूप कर्म व कर्मानुरूप स्वभाव आणि स्वभावानुरूप श्रद्धा अशी परंपरा लागते. ह्या परंपरेला विघ्न करणारे प्रसंग आले, तरी ही सांखळी जशीच्या तशीच राहते. आतां, स्वभाव तीन प्रकारचे म्हणजे सात्त्विक, राजस आणि तामस

असे असतात; तेव्हां स्वभावाची मुलगी श्रद्धा इचेंही स्वरूप तीन प्रकारांनीं गोचर होतें. श्रद्धा सात्विक, राजस किंवा तामसी असते, हें अर्जुनाच्या प्रश्नास उत्तर दिलें. शास्त्रविधि समजून न घेतां आल्यामुळें अथवा शास्त्रीय ज्ञान समजण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें जे ज्ञानशून्य राहिले, **त्यांची श्रद्धा तीन प्रकारची असते,** असें हें उत्तर आहे. ज्ञानपूर्वक श्रद्धा असेल तर तिचें स्वरूप एक प्रकारचेंच असेल म्हणजे तें स्वरूप सात्त्विकच असलें पाहिजे, हें आतां सांगावयास नको आहे. सद्वस्तूचें यथार्थ ज्ञान होऊन त्या ठिकाणीं दृढ विश्वास बसणें आणि सद्वस्तूकडे जाण्याचा अहर्निश प्रयत्न करणें ही सात्त्विक श्रद्धा होय. असो; अज्ञानी परंतु श्रद्धालु अथवा भाविक पुरुषाची श्रद्धा तीन प्रकारची असते. स्वतः अनुभव नाहीं, परंतु सद्गुरूवर विश्वास आहे ह्मणून, किंवा आईबापांवर विश्वास आहे ह्मणून, अथवा ग्रंथांवर भोळा विश्वास अथवा भाव आहे ह्मणून, गुरु सांगतील त्या वचनांवर, आईबाप करतील त्या उपदेशावर, किंवा ग्रंथ प्रतिपादितील त्या सिद्धांतांवर, यांची श्रद्धा असते. ही श्रद्धा ज्ञानपूर्वक झालेल्या श्रद्धेपेक्षां कमी दर्जाची असते. सारांश, स्वाभाविक श्रद्धा शास्त्रीय श्रद्धेची अगदीं धाकटी बहिण आहे. ज्ञान नसल्यामुळें ही अल्लड वृत्तीनें राहते. अर्थातच हिला जसा सोबती भेटेल, त्याप्रमाणें हिची वृत्ति होते. या अल्लड बाईचा सोबती म्हणजे जन्मतः प्राप्त झालेला स्वभाव होय. हा स्वभाव जसा असेल, तशी वृत्ति नैसर्गिक श्रद्धेची असते.

## स्वभाव तशी श्रद्धा.

४ आपल्या पूर्वकर्मानुरूप जे जे संस्कार आपल्या मनावर होतात, त्या त्या प्रमाणें आपली वासना होत असते, हें अनेकशः सांगण्यांत आलें आहे. वासना हीच जीवाची प्रकृति, हाच स्वभाव होय. शारीरिक स्थितींचा येथें विशेष विचार कर्तव्य नाहीं, म्हणून केवळ मानसिक विकारवासना, यांचा मात्र येथें उल्लेख केला आहे. वासना ह्मणजे स्वभाव; आणि जसा स्वभाव असेल तशी श्रद्धा असते, हें आतांच आपण पाहिलें आहे. तेव्हां जीव हा जन्मापासूनच श्रद्धापूर्ण असला पाहिजे. जसा स्वभाव असेल, जशी अंतःकरणवृत्ति असेल, तशी त्याची श्रद्धा असली पाहिजे हें उघड आहे. त्याच-प्रमाणें ज्याची जशी श्रद्धा असेल, त्याप्रमाणें त्याची अंतःकरणवृत्ति असते; सारांश ज्याची श्रद्धा सात्त्विक असते, तो पुरुष सात्त्विक, ज्याची राजस असते तो राजस, आणि तामसी श्रद्धा असेल त्याचा स्वभाव अथवा तो स्वतः तामसी असतो. ज्याच्या त्याच्या इष्टतम-पुरुषार्थाप्रमाणें त्याचा स्वभाव असतो. एवंच, जो पुरुष सात्त्विक असतो, त्याची श्रद्धा ह्मणजे त्याचा इष्ट पुरुषार्थ सात्त्विक असून त्याचें वर्तनही सात्त्विक असतें; किंवा ज्याचा इष्ट पुरुषार्थ व वर्तन आणि वर्तनक्रम सात्त्विक असतात, ह्मणजे श्रद्धा सात्त्विक असते, तो स्वभावानेंही सात्त्विक असतो. याप्रमाणें भगवंताचें अर्जुनास उत्तर

मिळालें. 'ज्ञानसंस्कृत नसूनही जे श्रद्धापूर्वक यजनयाजन करितात, त्यांच्या श्रद्धेची आत्मिक किंमत काय ?' हा अर्जुनाचा प्रश्न आहे. त्याला प्रभूंनीं उत्तर दिलें तें असें: ज्ञानसंस्कृत श्रद्धा नसते, ती स्वाभाविक श्रद्धा होय. स्वभाव हा पदार्थ पूर्वजन्मकृत श्रद्धा पापपुण्याचरणांप्रमाणें घटतो. या स्वभावानुसार श्रद्धा असते. श्रद्धा म्हणजे 'कांहीं तरी इष्टतम वस्तूंचें अस्तित्वज्ञान आणि त्या इष्टवस्तूकडे जाण्याचे अखंड प्रयत्न' होय. या श्रद्धेवरून पुरुषाचा स्वभाव कळतो, अथवा स्वभावावरून त्याची श्रद्धा समजते.

येथें एक गोष्ट विशेषतः लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे; ती ही: प्रभु ह्मणतात कीं, येथें जो जो ह्मणून जीव उत्पन्न होतो, त्याला आहे ती स्थिति संमत नसून दुसरी कांहीं तरी सुखमय स्थिति असावी, असें वाटत असते; व तो ती स्थिति प्राप्त व्हावी एतदर्थ अखंड-श्रम करीत असतो. योग्य श्रम नसतील तर वरील इष्टतम वस्तुप्राप्त्यर्थ होणाऱ्या इच्छेला 'श्रद्धा' असें नांव मिळणार नाहीं. असो; तेव्हां मनुष्याचें नेहमींचें आचरण व त्या आचरणाचें तत्त्व पाहिलें असतां, तो सात्त्विक अगर राजस अथवा तामस आहे, हें कळून येतें. आपली वृत्ति काय आहे हें पाहणें झाल्यास, आपल्या इच्छा कसल्या असतात व आपलें आचरण कोणत्या वळणाचें असतें हें गुरुद्वारा अथवा आपण स्वतः पाहून तो आपला स्वभाव उत्पन्न करण्याची खटपट करावी, हें प्रभुवाक्य प्रत्येकानें नित्य स्मरणांत ठेवावें. परिणामावरून कारण शोधण्याचा हा सुलभ मार्ग आहे.

### यज्ञ तशी श्रद्धा.

५ प्रभु म्हणतातः "जे देवप्रणीत अथवा देवांप्रीत्यर्थ यज्ञयाग करितात, ते सात्त्विक होत; कारण, देव हे सात्त्विक आहेत. यक्षराक्षसांप्रीत्यर्थ यजन करणारे राजस आहेत; आणि भूत, प्रेत, पिशाचें इत्यादिकांस वाममार्गानें प्रसन्न करून घेणारे लोक तामसवृत्तीचे आहेत, असें जाण. यांच्या पलीकडचाही एक वर्ग आहे. तो कोणता ह्मणशील तर, आसुरी लोकांचा. दांभिक, अभिमानी, व कामक्रोधादिकांनीं उन्मत्त असणारे हे आसुरी लोक शास्त्रनिषिद्ध मार्गानें तपश्चर्या करण्यास आरंभ करून, हें ज्ञानशून्य अथवा नष्टात्मे लोक आपल्या शरीराचें ठायीं वास्तव्य करणारीं जीं पंचमहाभूतें आणि अंतर्यामाचे ठायीं वास करणारा जो परमात्मा या उभयतांसही त्रास देतात. सारांश, शास्त्रनिषिद्ध मार्गानें अंतर्बाह्यतः अनेक कष्ट सोसून शरीरास कृश करितात, व अंतरात्म्याला दुःख देतात. हे लोक आसुरी होत." येथें प्रभूंचा कटाक्ष हटयोगावर आहे, हें सांगावयास नकोच आहे. दुसरी एक गोष्ट अशी: शरीराला दुःख न देतां व पंचमहाभूतास प्रक्षुब्ध न करितां अंतरात्म्यास सुख देणारे ते सात्त्विक पुरुष होत; अंतरात्म्यास सुख देण्यासाठीं शरीराला कष्ट देणारे व शरीराला कष्ट देण्यासाठीं अंतरात्म्यास दुःख देणारे राजस लोक होत; शरीरास कायतें सुख व्हावें एतदर्थ अंतरात्म्यास अत्यंत दुःख देणारे ते तामस

आणि शरीरास व अंतरात्म्यास अत्यंत दुःख देणारे ते आसुरी; असा भगवंतांनीं निष्कर्ष काढिला आहे. तिसरी एक गोष्ट; 'भूतग्राम' या शब्दावरून असें तात्पर्य निघूं शकेल कीं, 'हें आपलें अधिभौतिक' म्हटलं जाणारें शरीर हें पंचमहाभूतांनीं घटित आहे, हें तर खरच; पण या शरीराच्या घटकावयास हजारों सूक्ष्म जंतु आहेत, असाही एक गूढार्थ निघण्याचा संभव आहे. हा संभव जर खरा ठरेल, तर सद्यःकालीं 'प्रत्येक दृश्य पदार्थ हा हजारों, लाखों, जीवांच्या संग्रहानें घटित होतो, अनंत जीवांचा तो संघात आहे' असें प्रो. हक्सले इत्यादिकांचें जें म्हणणें आहे, व जें खरें ठरूं पाहत आहे, व ज्यावरून ही जीवसृष्टि अचेतनसृष्टि पूर्ण चैतन्यमय आहे असें ठरत आहे, त्याला सर्वज्ञ भगवंतांच्या वाक्यानें जबरदस्त पाठिंबा मिळणार आहे. याचा विचार आधुनिक शास्त्रज्ञांनीं व भगवद्भक्तांनीं करावा.

## कर्म तशी श्रद्धा.

६. याचप्रमाणें पुढील श्लोकांत प्रभूंनीं आहार, यज्ञ, तप, दान इत्यादिक व्यवहारिक व पारमार्थिक आचरणप्रकार घेऊन त्यांचे सात्त्विकादि त्रिविधभेद निर्णित केले आहेत.

आयुर्वृद्धि करून तेज वाढविणारे आणि शरीरास अखंड आरोग्य आणि मनाला स्थिर आल्हाद देणारे जे जे मधुर आहार आहेत ते सात्त्विक आहार होत. सात्त्विक पुरुषाला हेच आहार आवडतात. सात्त्विकाचें आहारसेवनही अतिरिक्त अथवा उपासमार होण्यासारखें नसतें. यामुळें त्याचें शरीर सतेज, त्याची कांती उत्तम, व अंतःकरण प्रसन्न आणि प्रेमळ असून तो निरोगी असतो व त्याच्या मनाला सामान्यतः कोणतीही चिंता नसते. आहारानें प्रकृति बिघडावयाची नाहीं, किंवा मनाला काळजी लागावयाची नाहीं, ही खबरदारी तो नित्य ठेवितो, अथवा हें आचरण त्याला अत्यंत प्रिय असतें. 'शरीर चांगलें तर मन चांगलें' असें म्हणतात, याला 'अन्नं ब्रह्म' या उपनिषद्वाक्यानें पुष्टि येते.

राजसी वृत्तीच्या पुरुषाला प्रिय आहार म्हणजे कोणते? तर अति उन्हून, अतिशय तिखट, अति रुक्ष, व अति दाह करणारे आहार त्याला प्रिय असतात. रसरसित निखाऱ्यावर कढी आमटीच्या वाट्या ठेऊन वाफ निघत असतां त्याचे सप्रेम भुरके मारणारे, भातांत, भाजींत, भज्यांत, मिरच्यांचे काकडे लावून त्यांचें आल्हादानें सेवन करणारे, कडबोळी, थालपिटें, यांच्यावर झोड उठविणारे, घसा भाजत जाणारी शुक्राचार्यांचीं पेयें आखंड सेवून गटारतीर्थांत अवभृतस्नानें करणारे पुरुष कोणीं पाहिले नाहींत?' शिवाय या असल्या जळजळीत खाद्यपेयांनीं जीभ भाजणें, अवरोध होणें, उदरादिक

रोगांस बिऱ्हाड करून देणें इत्यादि आहारविहाराचे परिणाम कोणाच्या अवलोकनांत आले नाहींत ? सारांश, हे आहार प्रकृतीची खराबी करणारे आणि मनाला उद्वेग अगर उन्माद उत्पन्न करणारे ह्मणून वर्ज होत. ' our teeth are cutting our grave ' ( आपले दांत आपली गर्ता प्रत्यही खणीत असतात ) हें ह्मणणें अक्षरशः खरें आहे. ज्याची प्रकृति राजस आहे, त्याच्या जिभेला रुचि नसल्यामुळें त्याला तिखटामिठाचे ह्मणह्मणीत पदार्थ आवडूं लागतात. पण या पदार्थांचें अतिरिक्त सेवन केलें ह्मणजे रोगाला निराळें आमंत्रण पाठविण्यास नको असतें. असो; रुचि नसेल तर योग्य औषधोपचार करावा; पण या यमकिंकरांच्या सपाट्यांत सहसा सांपडूं नये.

तामसी प्रकृतीच्या पुरुषाला चव हा पदार्थच माहीत नसतो; अथवा बेचव ही त्याची चव होऊन बसते. चार चार दिवसांचें शिळें, वाळलेल्या लांकडासारखें शुष्क झालेलें दुर्गंधी येत असलेलें, कुजलेलें, दुसऱ्यानें खाऊन उरलेलें आणि यज्ञास न चालणारें असें अन्न तामसी पुरुषाला अत्यंत प्रिय असतें. शिळें, वाळलेलें, बुरसा आलेलें, वास येत असलेलें अन्न खाऊं नये, असें सांगण्यासाठीं तामसी अन्नाचा उल्लेख केला आहे. शिवाय खाण्यापिण्यावरून तामसी पुरुष ओळखण्याचीं हीं चिन्हें आहेत. **दुसऱ्याचें उष्टें अन्न कधींही खाऊं नये**, ही गोष्ट ध्यानांत ठेवावी. आपल्या बायका नेहमीं उष्टें खातात हें प्रेमदर्शनाचें अथवा पातिव्रत्याचें चिन्ह असेल कदाचित् ! पण हें असें करणें प्रभूंस तरी इष्ट नाहीं. मद्यमांसादिक पदार्थही वर्ज करावे.

सारांश, आपलें अन्न सरस, सात्त्विक आणि स्निग्ध असावें. ह्या प्रमाणें आहारमीमांसा झाली. प्रकृति चांगली ठेऊन ज्ञानप्राप्ति करून घेणें इष्ट असेल तर सात्त्विक अन्नाचें सेवन करूं लागावें. ही सात्विक अन्नाची प्रीति जर जडली, तर आपली प्रकृति ह्मणजे आपला स्वभावही सात्विक बनण्याचा संभव आहे. सात्विक मार्गाचें साधन करण्याला सात्विक आहार हें उत्तम औषध आहे. सात्विक अन्नाचें सेवन आणि सात्विक देवतांचें भजनपूजन हे आचार प्रकृति सात्विक करून पुढें सात्विक ज्ञानसंपादनाचे मार्ग होतात.

आतां देवांप्रीत्यर्थ होणारे जे सात्विक यज्ञ त्यांचा उपक्रम करितात. शास्त्रांत जो विधि सांगितला आहे, त्याची माहिती तज्ज्ञांकरवीं करून घेऊन, मन प्रशांत ठेवून आणि कोणत्याही फलाची आकांक्षा न करितां ज्या इष्ट यज्ञाची परिसमाप्ति होते, तो यज्ञ सात्विक होय. ' आपलें हें कर्तव्य आहे, हें कर्तव्य आपण केलें नाहीं तर आपली आत्मिक उन्नति कमी होईल, ' अशा दृष्टीनें या यज्ञाची परिसांगता होते. माझा जो आत्मिक अधिकार आहे, तो संभाळणें असेल तर मला अमुक एक सात्विक कृत्य केलेंच पाहिजे, अशा मनःसमजुतीनें हें कृत्य होऊन शेवटीं तें ईश्वरार्पण होत असतें; म्हणून त्याला सात्विकत्व प्राप्त होतें. सारांश, सात्विक पुरुषाची वृत्ति सामान्यतः निष्काम

आणि त्याची ईशभक्ति प्रायः निराकांक्ष असते. सूर्याचा धर्म प्रकाश देण्याचा आहे; पाण्याचा धर्म खालच्या प्रदेशाकडे वाहत जाण्याचा आहे: त्याचप्रमाणें सात्विक पुरुषाचा धर्म निष्कामतः यज्ञयागादि करण्याचा असतो. पण जे राजसवृत्ति लोक असतात, त्यांचे यज्ञयाग सकामतः केलेले असतात; शिवाय अमक्यानें ' यज्ञ ' केला, अशी सर्वतोमुखीं प्रसिद्धि व्हावी, अशासाठीं, म्हणजे आपण मोठे धार्मिक आहोंत, असा डौल होण्यासाठीं यांची ही खटपट असते; या मंडळींचें ईश्वरभजन, व ईशपूजन जीं असतात तीं स्वतःच्या अगर इतरांच्या आत्मिक उन्नतीप्रीत्यर्थ असतात. आपल्या धार्मिकतेची टिमकी सर्वत्र वाजावी एतदर्थ राजस पुरुषांस यज्ञ करण्याची प्रेरणा होते. एवंच सर्वत्र कीर्ति व्हावी आणि आपल्यास पुष्कळसा विषयोपभोग मिळावा, यासाठीं जे यज्ञ केले जातात, ते सर्व राजस यज्ञ होत. या प्रकारच्या यज्ञांनीं कांहीं उपभोग मिळतील व कांहीं वेळ लोकांमध्यें डौलानें मिरविण्यासही सांपडेल; पण ' यज्ञ म्हणजे जो स्वार्थत्याग, तो कांहींएक न होतां, चित्ताची शुद्धि संपादित न होतां, जन्ममरणाचें चक्र मात्र या दीक्षितांच्या मागें लागेल ! अर्थात ते दुःखांत पडतील. जो यज्ञ विधिपूर्वक होत नाहीं जेथें अन्नसंतर्पण नाहीं, मंत्र नाहींत, दक्षिणा नाहीं आणि श्रद्धाही नाहीं, त्या यज्ञाला तामसी यज्ञ म्हणतात. असल्या यज्ञांपासून लाभ तर कोणताच नाहीं, पण यथासांग कर्म झालें नाहीं, म्हणून मोठी थोरली हानि मात्र होते. याप्रमाणे ईश्वराप्रीत्यर्थ विधिपूर्वक यज्ञ कर्तव्यदृष्टीनें होतात ते अज्ञानी पुरुषानें श्रद्धापूर्वक केले म्हणजे त्या यज्ञाला सात्विक स्वरूप येतें: शारीरिक अथवा मानसिक फलाकांक्षा मनांत ठेवून श्रद्धापूर्वक जरी यज्ञ केला तरी फलदृष्टि आहे, म्हणून ह्या यज्ञाला राजसस्वरूप येतें; आणि विधि नाहीं, मंत्र दक्षिणा, अन्नसंतर्पण इत्यादि कांहीं नाहीं आणि श्रद्धाही नाहीं, असले यज्ञ राक्षसी अथवा तामसी होत.

आतां तप आणि दान यांचा विचार करूं. तपामध्यें शारीरिक, वाचिक आणि मानसिक असे तीन भेद आहेत. जे सामर्थ्यानें, ज्ञानानें अधिकारानें आपल्यापेक्षां सर्वतोपरि श्रेष्ठ आहेत, त्यांचे ठायीं नम्र आचरण, स्नानमुखमार्जनादि सर्व शौचविधि ऋजुता, कडकडित ब्रह्मचर्य आणि हिंसाशून्यता हीं शारीरिक तपाचीं अंगें आहेत. या तपामध्यें स्वतःच्या शरीराची शुद्धि, स्वतःच्या शरीराची बलवृद्धि, आणि सेव्य पुरुषांची शरीरद्वारा सेवा करण्याची बुद्धि, ह्या गोष्टी संस्मरणीय आहेत. ब्रह्मचर्यव्रत ही सात्त्विक तपाची पहिली व सर्वश्रेष्ठ पायरी आहे. ब्रह्मचर्याला ऱ्हासकाल प्राप्त झाला म्हणजे देशाची अवनति सुरू झाली असें समजावें. आपल्या हल्लींच्या म्हणजे 'वडिलोपार्जित' व स्वसंपादित भिकार चाळ्यांनीं आपल्या राष्ट्रीय ब्रह्मचर्यावर असे दुर्धर घाले आपण घालितों आहों कीं, त्या ब्रह्मचर्याचा चुराडाच होऊन जावा. आपल्या मुलानें लवकर मुलांचा जनक व्हावें म्हणून आपण मुंज झाल्यानंतरचा ब्रह्मचर्यकाल संपुष्टांत आणून सोंवळें राहण्याचें व नेमस्त आहारविहाराचें व्रत तर कर्मी केलें, मुलाचें विचार पोषक

व्हावें ह्मणून त्यास काव्य-नाटकांचा परिचय तर करून दिला, स्त्रीविरहाचें अघोर संकट बिचाऱ्यास सोसूं लागूं नये ह्मणून त्याच्या तर्फेनें सरकारदरबारांत भांडून समागमसुख त्याला लवकर मिळेल या करितां भगीरथ प्रयत्न तर केले: पण इतकें केलें तरी अद्यापि ब्रह्मचर्यव्रत आमच्या देशांत जिवंत आहे, हें आश्चर्यच नव्हे काय? ब्रह्मचर्याचा, आपल्या वीर्याचा अतिरिक्तपणें सारखा अपव्यय चालला असतांही देशांत जोम, बुद्धि व नीति वाढेल याची आपण आशा धरितों, तेव्हां केवढा वरें आपली बहादुरी समजावी? वाचकहो! सर्वज्ञ प्रभूंनी आपल्यास इशारत दिली आहे कीं, खाण्यापिण्यामध्यें अहिंसा आणि इतरत्र ब्रह्मचर्य व्रताचें अनुपालन, ही दोन जर शाबूत ठेवाल, तर तुम्हाला सात्विक क्रमानें ज्ञानमार्गाला जायला बिलकुल पंचाइत पडणार नाहीं. पण ब्रह्मचर्यासंबंधें, एकपत्नीव्रतासंबंधें, अत्यंत सावध असले पाहिजे. सारांश दुसऱ्यास सन्मान देण्यासाठीं शरीर लवविणें, स्वतःचें शरीर शुद्ध ठेवणें, सरळ मार्गानें जाणें, अनाठायीं वीर्यपात न करणे आणि अभक्ष्यभक्षण वर्ज करणें पश्चत्तापास कारण करून न घेणें हीं शारिरिक तपाचीं प्रधान अंगें आहेत. या सर्वांमध्यें उपभोगाचा त्याग, निदान उपभोगामध्यें नेमस्तपणा आणि आलस्याचा त्याग ह्यांचा अंतर्भाव आहे. आतां वाचिक तप घेऊं: सत्य, प्रिय, हितकर आणि मनास न झोंबणारें बोलणें हें वाणीचें तप होय. आपल्यापैकीं पुष्कळ लोक सत्य बोलत असतील, कदाचित् तें प्रियकर हितही साध्य करून देणारें असेल, पण तें काळजास घरें पाडणारें नाही, अंतःकरणास झोंबणारें नाहीं, असें व्हावयाचेंच नाहीं. 'वेळ निघून जाते, पण बोलणें राहतें' अशी म्हण प्रत्येकास ठाऊक असतां, टोंचून बोलण्यानें मित्राचे शत्रु होतात हें माहीत असतां, उपरोधानें ऐकणाराला अत्यंत विषाद होतो, असें विदित असतांही, आपलें उद्वेगजनक बोलणें व लिहिणें यांची शुक्लचंद्रकलेप्रमाणें वृद्धिच होत आहे, याला काय ह्मणावें? सारांश ही नवीन पडत चाललेली पद्धति अत्यंत घातुक आहे. आपल्या तामसी वृत्तीनें सत्यलोप झाला, बुद्धीच्या मंदपणानें हिताहित संबंधीं ज्ञान नष्ट झालें, तरी दुसऱ्याचा मनोभंग होईल असें बोलण्याची संवय आपली नाहींशी होत नाहींना? बरें! स्वाध्यायाचा, आपल्यास जें शिकावयाचें आहे त्याचा, अभ्यास तरी जोरानें चालला आहे ह्मणावें तर तोही कांहीं प्रकार नाहीं! मग वाणीच्या तपश्चर्येचें नांव तरी कशाला आपण घ्यावें? असो मित्र हो! वाणीचें तप सात्त्विक क्रमाचा मार्ग सोपा करितें, ह्या भगवद्वचनावर लक्ष्य ठेऊन तरी आपण त्या पुरश्चरणास लागूं या. आतां मानसिक तप पहा कसें आहे तें: मन प्रसन्न ठेवणें, सदा सौम्यवृत्ति धारण करणें, मितभाषण करणें, आत्मसंयमन करणें, आणि चित्तशुद्धि करणें ह्यांचा मानसिक तपश्चर्येंत निवेश होतो. हीं सर्व आपापल्या परीनें पथ्य व हितकर आहेत. चित्तशुद्धि झाली, म्हणजे अभिमान विगलित होतो व वासनांचा नाश होतो, हें या पुस्तकाच्या वाचकास सांगावें नलगे. चिंता संपली म्हणजे मनःप्रसाद होतो व वासना मेली ह्मणजे चिंतेचें राज्यही संपतें. 'मानापमानाचे गोवें, गुंडाळूनि ठेवावें' असे श्रीमद्भक्तावतंस तुकोबा महाराज सांगतात; तसें केलें ह्मणजे सौम्यता प्राप्त होते. चंद्र हा

जसा सर्व लोकांस प्रियकर, तसा सौम्य पुरुष हा सर्वांस व आपल्या स्वतःस प्रियकर होतो. 'फार बोलूं नये, मितभाषणी असावें' हा उपदेश पथ्यकर आहे. आत्मसंयमन हें चित्तशुद्धि झाली म्हणजे साध्य व्हावयाचें. असो; तेव्हां मानसिक तपांत चित्तशुद्धि हें मुख्य अंग आहे. येथें हा पुनः उपभोगाचा सर्वथा नाश, दान उपभोगांत नेमस्तपणा, अवश्य आहे. वाणीचा उपभोग प्रिय, हित आणि सत्य बोलण्यांत करावा, किंवा स्वतःचा अभ्यास वाढविण्यांत करावा; त्याचप्रमाणें मनाचा व्यापार सदैव ज्ञानाकडे करून स्वपरहित साधावें, हा प्रभूंच्या उपदेशाचा मथितार्थ आहे. आतां ह्या कायिक, वाचिक व मानसिक श्रद्धायुक्त तपश्चर्येचे तीन भेद आहेतच. वरील तिन्ही प्रकारचें तपाचरण, फलाकांक्षाविरहित झालें तर त्याला सात्त्विक, डौल वाढविण्याप्रीत्यर्थ आणि आढ्यता मिरविण्याप्रीत्यर्थ झालें तर राजस, आणि अज्ञानानें अगर दुराग्रहानें स्वतःची पीडा वाढविण्याकडे अथवा दुसऱ्याचा नाश करण्याकडे याचा विनियोग झाला, तर त्याला तामस, असें म्हणावयाचें. सारांश, वर ज्या तीन प्रकारच्या तपश्चर्या सांगितल्या, त्यांच्या विनियोगाप्रमाणें प्रत्येकीचे तीन भेद होतात. सनकादिकांच्या तपांसारखें, जे तप जगताच्या हितार्थ उपयोगी पडतें, तें सात्त्विक तप होय. सनकादि मानसपुत्र ज्ञानी होते, हें खरें आहे. त्यांचें उदाहरण केवळ समजुतीसाठीं घेतलें आहे. विश्वामित्राचें तप स्वतःची पूज्यता वाढावी, स्वतःस मोठा सत्कार मिळावा एतदर्थ होतें; आणि रावणादि राक्षसांची ही त्रिविध तपश्चर्या जगताला पीडा देण्याच्या हेतूनें झाली व शेवटीं ती स्वतःसच हानिदायक झाली. एवंच परोपकारक तपश्चर्या सात्त्विक, स्वोपकारक तपश्चर्या राजस, आणि परापकारक व स्वापकारक तपश्चर्या तामस, असा यामध्यें विशेष आहे.

## दान तशी श्रद्धा.

७ आतां दानप्रकरण आटपलें म्हणजे श्रद्धायुक्त परंतु शास्त्रज्ञानशून्य कर्मांचें व्याख्यान बहुतेक संपलेंच म्हणावयाचें. ( अ ) देश, काल व पात्र पाहून एखादा आकस्मिक प्राप्त झालेल्या अकिंचन पुरुषाला केवळ कर्तव्यबुद्धीनें जें आपण दान करूं, तें सात्त्विक म्हणजे निरपेक्ष दान होय. पात्रापात्र विचार पाहून योग्य प्रसंगीं जो निरपेक्ष परोपकार होतो तो सात्त्विक परोपकार होतो. पण हा मी या गृहस्थावर उपकार करीत आहें तेव्हां हा गृहस्थ माझ्यावर प्रत्युपकार करील, किंवा या दानाचें पुण्य मला लागून त्याचें फल या जन्मीं अगर पुढील जन्मीं अमुक मिळेल, असा हिशेब करून जें दान करितों तें दान आणि पुनः दान देतेवेळीं आपल्यास मोठे कष्ट होतात, पैसे जातात म्हणून चित्ताला हुरहूर लागते, तें दान ही दोन्हीं राजसी होत. दानाचें फल काय मिळावयाचें तें मिळेल, हें खरें; पण या असल्या व्यापारी दानानें जन्ममरण मात्र शिरावर बसेल. अर्थात चित्तशुद्धि कांहीं एक व्हावयाची नाहीं. सारांश या दानानें

कालाचा व श्रमाचा अपव्यय मात्र होतो. यापुढें तामसी दान सांगावयाचें. भलत्या ठिकाणीं, भलत्या वेळीं, भलत्या मनुष्यांस जें दान आपण तिरस्कारानें व उन्मत्तपणानें देतों तें दान तामसी होय. चार शिव्या हांसडून चांगल्या धव्याकव्या भिकाऱ्याच्या पदरांत चार दाणें टाकावयाची जी आपली पद्धति, ही तामसी होय. आपल्या दातृत्वाचा परिणाम ज्यांस आपण कांहीं देतों, त्यांच्यावर कसा होतो याचा सारासार विचार करून दान देणें ह्याचें नांव देश, काल व पात्र बघणें होय. एखाद्यावर आकस्मिक प्रसंग येऊन तो दीन झाला व त्याला यथास्थित मदत केली असतां त्याची मानसिक व शारीरिक स्थिति सुधारण्याचा संभव आहे असें आढळल्यास मात्र त्याला दान करणें हें उचित आहे. पण दुर्दैवानें आपल्या हल्लींच्या पडत्या काळांत हा सारासार विचार राहिला नाहीं, ह्मणून वर्तमान काळीं आपलीं बहुतेक सर्व दानें राजसी किंवा तामसी होतात.

असो; एथपर्यंत यजन, आहार, यज्ञयाग, तप आणि दान यांचा विचार झाला. ज्ञान नसतांही पूर्वपरंपरागत जी पद्धति तिला अनुसरून, व पूर्वजन्मीच्या सुकृतदुष्कृतानुरोधानें जो स्वभाव आपल्यास प्राप्त झाला त्याला अनुसरून, असणाऱ्या श्रद्धेनें आपल्या हातून यजनादि जीं पारमार्थिक ह्मणून कर्मे होतात, त्यांची मीमांसा झाली. इष्टदेवताराधन, आहारविहार, यज्ञयाग, तप आणि दान, हीं सामान्यतः पारमार्थिक कृत्यें आहेत. आहारविहारांचा जो यांत समावेश केला तो केवळ परमार्थाला अनुरूप शारीरिक स्थिति ठेवण्यास कोणते आहार इष्ट आहेत तें सांगण्यासाठीं केला आहे. आहारविहारांचा सात्विक किंवा राजस-तामसी याचा उलगडा प्रभूंनीं केला, त्याचें तात्पर्य हें कीं, निरपेक्षबुद्धीनें जीं स्वेतर कल्याण करणारीं व त्या कल्याणाचें प्रोत्साहन करणारीं कर्में हीं सात्विक ह्मणजे चित्तशुद्धि करणारीं आहेत; स्वतःला या लोकीं अगर स्वर्गीतरीं उपभोग देणारीं व उपभोगाला उत्तेजन देणारीं जीं कामुक कर्में आहेत, तीं राजसी अथवा जन्ममृत्यु देणारीं आहेत; आणि स्वतःचा लाभ न करितां दुसऱ्याचें नुकसान करणारीं जीं अज्ञानजन्य कृत्यें आहेत तीं दुःख पर्यवसायी म्हणजे तामस आहेत. यावरून असा निष्कर्ष काढावयाचा कीं, ज्ञानमार्गाला नेणारीं कर्में सात्विक, जन्ममृत्यूचें अगर संसाराचें चक्र कायम ठेवणारीं राजस आणि दुःखकारक जन्म देणारीं तामस कृत्यें आहेत. कांहीं एक प्रकारची श्रद्धा असून ज्ञान जर मुळींच नसेल, व ज्ञानमार्गाकडे वळावें अशी इच्छा असेल, तर सात्विक मार्गाचा आश्रय यथाशक्ति करावा, हें सांगण्याचा प्रभूंचा उद्देश आहे. या जगांत लाखों मनुष्यें अज्ञानी आहेत, त्यांचा उद्धार व्हावा, एतदर्थ ह्या प्रश्नाचा इतका विस्तृत उहापोह भगवंतांनीं केला आहे. सर्वांसच शास्त्रप्रमाणें आपआपलें प्रापंचिक अथवा परमार्थिक कर्तव्य करण्याचें सामर्थ्य अज्ञानवशात् नसतें. आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा प्रत्येकाला असते, पण मार्ग विदित नसल्यामुळें तें अंधेरांत चांचपडत असतात. या लोकांना, या अज्ञानी व ह्मणून अभागी लोकांनाही स्वशक्त्यानुसार परमार्थाकडे जातां

येण्याची सुकरता व सुलभता असावी, व असें सौकर्य व सौलभ्य भगवंतास इष्ट आहे हें सर्वांस कळावें, एतदर्थ ही मीमांसा आहे.

( ६ ) श्रद्धा नाहीं असा पुरुषच सांपडणें अशक्य आहे. कांहीं तरी इष्ट वस्तु आहे व ती मिळण्याचा मार्गही आहे आणि हा मार्ग आपल्यास साध्य आहे, अशा प्रकारची श्रद्धा प्रत्येक जीवाला असते. कोणी वेदशास्त्रांस मानीत नसतील, कोणाची देवावर श्रद्धा नसेल, कोणास कोणताच धर्म पसंत नसेल, व असणें संभवनीय आहे; नव्हे, असले पुरुष माझ्या स्नेहीवर्गांत आहेत. पण त्यांस इष्ट अशी कोणतीच वस्तु नाहीं, ती इष्ट वस्तु मिळविण्याचा मार्ग त्यांस ठाऊक नाहीं, व ही अत्यंत इष्ट वस्तु संपादण्याचा मार्ग त्यांस साध्य नाहीं, अशी मात्र त्यांची समजूत नाहीं. 'सद्यःस्थिति बरी नाहीं, अमुक स्थिति येईल तर चांगलें; व हें चांगलें घडवून आणण्याचा मार्ग अमुक आहे व तो साध्य आहे ' असें प्रत्येक मनुष्य-मग तो धर्मनास्तिक असो वा नसो-म्हणत असतो; श्रद्धापूर्वक म्हणत असतो. सारांश, प्रभु ह्मणतात त्याप्रमाणें पुरुष हा **श्रद्धामय** आहे. श्रद्धाविरहित पुरुष असणें शक्यच नाहीं. अद्वैतासिद्धांतावर श्रद्धा नाहीं, हिंदुधर्मावर श्रद्धा नाहीं, कोणत्याच धर्मावर श्रद्धा नाहीं, असे पुरुष असतात; पण ज्यांस मुळीं कोणताच पुरुषार्थ इष्ट नाहीं असा पुरुष अत्यंत विरळा; किंबहुना नाहींच. आपल्या धनसंचयाला परिमिति नसावी, किंवा आपली सत्ता अनियंत्रित असावी हा **अर्थ** नामक पुरुषार्थ, किंवा ( २ ) आपल्या सर्व उपभोगाच्या सकल इच्छा परिपूर्ण व्हाव्या हा **काम** नामक पुरुषार्थ, या पैकीं निदान एक कोणता तरी पुरुषार्थ प्रापंचिक जीवांमध्यें अढळालाच पाहिजे. प्रापंचिक म्हणजे स्वतःच्या उपभोगात्मक अर्थाचें संपादन हरप्रयत्नानें करणारा पुरुष असतो, तो खरा स्वार्थसाधु होय. दुसऱ्याच्या लाभालाभाचा प्रसंगविशेषीं बिलकुल विचार न करितां आपलें कार्य हरतऱ्हेनें सिद्धीस नेणारा तो प्रापंचिक पुरुष होय. हा पुरुष उपभोगांची पूर्ति व्हावी अशी तरी इच्छा करील, किंवा स्वतःची सत्ता, कीर्ति, सामर्थ्य, अमूप असावें अशी तरीं इच्छा करील. कोणतीही इच्छा त्यानें केली, तरी तो त्याचा पुरुषार्थ होतो; आणि हा पुरुषार्थ साध्य करण्याला जे मार्ग आहेत, ते साध्य करून घेण्याचा तो प्रयत्न करितो. या प्रयत्नामध्यें त्याची जी मनोवृत्ति असते, ज्या मनोवृत्तीच्या जोरदार प्रेरणेनें तो हा प्रयत्न करण्यास प्रवृत्त होतो, तीच त्याची **श्रद्धा** होय. ( ३ ) स्वार्थाचा त्याग यथाशक्ति करून चांगली सात्त्विक स्थिति मिळविणें व पुढें अत्यंत सुखाचा अनुभव घेणें, या मार्गाला नेणारा तो **धर्म** नामक पुरुषार्थ आहे; आणि अत्यंत सुखाची, अत्यंत ज्ञानाची व अत्यंत सत्त्वाची स्थिति प्राप्त करून देणारें मोक्षशास्त्र, मोक्षाचा मार्ग दाखवितें; हा चवथा **मोक्ष** नामक पुरुषार्थ होय. हे पारमार्थिक पुरुषाचे पुरुषार्थ होत. आतां जो मुक्तच झाला, ज्याला ब्रह्मसाक्षात्कार होऊन हृदयग्रंथी सुटली व संशय तुटले, त्या साधु पुरुषाला पूर्णसिद्धि प्राप्त झाल्याकारणानें इच्छा नसते, पुरुषार्थ नसतो व म्हणून श्रद्धाही नसते, हा भाग नीटच आहे.

पण असल्या पुरुषांची जीवांत गणना करणेंच मुळीं प्रशस्त नाहीं. जो शिव झाला त्याला जीवाचे नियम काय होत ? तेव्हां, जीवस्थितीला प्रारंभ करून मुक्तांच्या अलीकडील जेवढी मंडळी, ती सर्व श्रद्धावंत असलीच पाहिजे. ह्या सगळ्यांची श्रद्धा पूर्वकर्मार्जित स्वभावानुसार असते. याच श्रद्धेला सात्त्विक स्वरूप येऊन ज्ञानाचा संस्कार मिळत चालला कीं, त्या मनुष्याची आत्मिक उन्नति होत चालली, असें समजावें, याचा विचार सोळाव्या प्रवचनांत केला आहे. येथें असंस्कृत श्रद्धेचा व तत्प्रेरित ' पारमार्थिक ' कर्माचा विचार केला आहे, आणि हा विचार अज्ञानी लोकांच्या विशेष उपयोगी आहे. देवताराधना, आहार, यज्ञ, तप आणि दान ह्या कृत्यांस सात्विकत्व देण्याचें प्रत्येकाच्या आहारांत आहे. पात्रापात्राचा विचार करून दानधर्म करणें, त्या दानधर्मांत फलाचा अभिलाष न ठेवणें, आणि कर्तव्यबुद्धीनें दान देणें हें प्रत्येक पुरुषास साध्य आहे. तप, यज्ञ, आहार यांचीही अशीच स्थिति आहे. देवतापूजनानें, सात्त्विक देवतांच्या निष्कामपूजनानें, आपली आत्मिक योग्यता वाढते आणि पुढें ज्ञानयोग्यता प्राप्त होते, हें नीटच आहे. सात्त्विक श्रद्धा व सात्त्विक श्रद्धेचीं कर्में, हा सर्व प्रापंचिक परमार्थाचा अगर पारमार्थिक प्रपंचाचा मार्ग आहे. प्रपंचांत राहून परमार्थ साधण्याचा हा ' ओनामा ' आहे. आपल्या अपत्यांवर जी निष्कामप्रीति असते, तिचाच व्यास वाढवीत जाणें, हा ज्ञानमार्गाचा रस्ता आहे. पितृऋणाच्या फेडीसाठीं जें श्राद्धपक्ष आपण करितों, त्याचाच यज्ञयागादिकांमध्यें विस्तार होतो, हाच प्रकार सर्वत्र आहे.

सारांश आहारविहार, यज्ञ, तप आणि दान हीं मुख्यतः कर्मांचीं मुख्य अंगें आहेत. आहारविहारानें स्वतःचें पोषण होतें. यज्ञानें सर्व विश्वाधिष्ठित देवतांस प्रसन्न करून घेऊन विश्वनियमांस पोषक असें जगद्धितकारी आचरण होतें. तपश्चर्येनें स्वतःचें व इतरांचें ज्ञान व बल वृद्धिंगत होऊन आचरण सुधारतें आणि दानानें अनाथ लोकांचें पालनपोषण होतें. सारांश, आचरणाचीं हीं प्रधान अंगें आहेत; आणि परमेश्वरांनीं या अंगाचा सात्त्विकादि त्रिविध रीतीनें विचार करून त्यांस पर्यवसानीं शास्त्रीय स्वरूप कसें येतें, तें दाखविलें आहे. श्रद्धा असेल तर ज्ञान प्राप्त होतें, असें नवव्या अध्यायांत सांगितलें त्याचें येथें समर्थन केलें आहे. -पूर्वसंचिताप्रमाणें श्रद्धा आणि श्रद्धेनुसार दृष्ट-पुरुषार्थ आणि तत्साधक कर्म, आणि तज्जन्य ज्ञान आणि मनःसंस्कार अशी कार्यकारण-परंपराही दिली आहे. बाकीचा विचार उपसंहारांत केलाच आहे.

आणखी एक संबंध सांगून हा संबंधविस्तार आटपूं. या अध्यायांत व पुढें अठराव्या अध्यायांत सात्त्विकादि गुणांच्या प्रभावानें आपली नित्य, नैमित्तिक, व्यावहारिक व पारमार्थिक कर्में कशीं होतात, हें सांगून सात्त्विक गुणच ज्ञानोपयोगी आहे व नवव्या अध्यायांत सांगितलेल्या राजयोगास उपयोगी आहे असें दाखविलें आहे. कारण, राजयोग साध्य झाला तरच अभेदाचा प्रत्यक्ष अनुभव येणार आहे. श्रद्धा हा अंतः-

करणाचा धर्म आहे; आणि श्रद्धेनुसार कर्म होतें, हें आतांच सांगितलें आहे. चित्तशुद्धि व्हावयाची, ती श्रद्धेनुसार व्हावयाची आणि राजयोग पुरःसर जो आत्मसाक्षात्कार व्हावयाचा तो तिन्ही देहांशीं असंगवृत्ति ठेवून ज्ञानाभ्यास वाढेल, तेव्हां होणार. हे तीन देह म्हणजे स्थूल, आणि कारणदेह होत; अथवा याचे पांच विभाग करितां येतात ते हेः—अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय कोश, असे पांच कोश आहेत. अन्नमय कोश=स्थूलदेह; आनंदमय कोश=कारणदेह; आणि बाकीचे तीन कोश म्हणजे सूक्ष्म देह, असेही प्रभाग होतात. अथवा पुढील कोष्टक पहावें म्हणजे बरोबर व्यवस्था कळेल.

| देह (तीन) | कोश (पांच) | तत्त्वें (सात) |
|---|---|---|
| (१) स्थूल | (१) अन्नमय | (१) आपला दिसणारा देह [स्थूल] |
| (२) सूक्ष्म | (२) प्राणमय<br>(३) मनोमय<br>(४) विज्ञानमय | (२) लिंगदेह<br>(३) प्राण<br>(४) काम<br>(५) मन [चित्तचतुष्टय] |
| (३) कारण | (५) आनंदमय | (६) बुद्धि<br>(७) आत्मा |

याप्रमाणें तीन देह, किंवा पांच कोश किंवा सात तत्त्वें आहेत. यांत स्थूल, **लिंग** आणि **प्राण** हे प्रतिशरीरांत भिन्न भिन्न असतात. **मन, बुद्धि** व **आत्मा** हे सर्वव्यापी असतात; पण ज्या शरीरांत ते असतात., तद्रूप ते भासत असतात. **काम** हा खालच्या प्रतीचा भाग आहे, व तोच राग-द्वेष, हर्ष-शोक या वृत्तींचें स्थान आहे. काम मध्यबिंदूच्या स्थानीं आहे. तोच याला स्थूलादि पहिल्या त्रयीनें आपल्याकडे प्रबलत्वानें म्हणजे मनबुद्धि आदींस निर्बल करून ओढिलें तर जीव आत्महीन होऊन अधोगतीस जातो; आणि मनबुद्ध्यादि दुसऱ्या त्रयीनें प्रबलत्वानें म्हणजे पहिल्या त्रयीचा पाडाव करून कामास आपल्याकडे खेंचिलें, तर जीव ऊर्ध्वगतीस जातो. अर्थातच जीवाला मोक्ष हवा असेल तर त्यानें या 'कामांत' म्हणजे मध्यबिंदूच्या ठिकाणीं सात्त्विक गुणांचा व सात्त्विक कर्मांचा, सारांश दैवीसंपत्तीचा भरणा केला पाहिजे. हा भरणा भरपूर झाला म्हणजे मनबुद्ध्यादि सर्वव्यापी त्रयीस जोर येऊन तीं तत्त्वें जीवाला ऊर्ध्वगतीला नेतात. पण रजोगुणाचा अगर तमोगुण उत्कर्ष या मनोमय कोशांत होईल, तर तिसऱ्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें पापबुद्धि उत्पन्न होऊन जीवाची हानि होते. असो; तेव्हां सतराव्या

अध्यायांत सात्त्विक श्रद्धेचें जें महात्म्य सांगितलें त्याचें तात्पर्य 'कामाच्या' ठिकाणीं म्हणजे सूक्ष्म देहांतर्गत कोशांत सत्त्वगुणाचा अभ्युदय व्हावा हें आहे.

पंधराव्या अध्यायांत जे क्षर आणि अक्षर असे दोन पुरुष सांगितले आहेत, त्यांत क्षर म्हणजे स्थूल देह, लिंगदेह आणि प्राण हीं तत्त्वें होत. हीं क्षर म्हणजे स्वरूपांत पावणारी, कांहीं कालपर्यंत 'पुरुषत्व' पावणारीं, आहेत. आणि अक्षर म्हणजे काम मन, बुद्धि ( Reason ) आणि आत्मा हीं तत्त्वें होत. हीं तत्त्वें सर्वव्यापी आणि म्हणून स्वस्वरूप अखंड धारण करणारीं असतात हें खरें. यांसच अक्षर म्हणावयाचें. हीं तत्त्वें ( आत्मरामाशिवाय बाकीचीं सर्व ) उपाधिविशिष्टत्वानें स्वरूपांतर पावतात. पण ज्याला उपाधि नाहीं, तो पुरुषोत्तम होय. हाच आत्मा होय.

या सतराव्या अध्यायांत अज्ञानी पण श्रद्धालु जनांनीं कोणत्या मार्गानें जावें म्हणजे त्यांची आत्मिक उन्नति होईल, हें सांगितलें आहे.

## ॐ तत्सत् आणि कर्मशुद्धि.

१. आतां सर्वथा इष्ट जी सात्विक वृत्ति, तिचा अवतार राजस व तामस पुरुषांमध्यें व त्यांच्या कर्मांमध्यें व्हावा, एतदर्थ सुलभ व सुकर उपाय सांगितला आहे. या उपायानें इतर मोठमोठ्या गोष्टींचीही सांगता होत असते. भगवान् म्हणतातः ॐतत्सत् हा मंत्र अति महत्वाचा आहे. ॐ, तत्, सत् ही ब्रह्माची तीन नामें होत, असें श्रुति, स्मृति, पुराणें म्हणतात. 'ॐ इति ब्रह्म' 'तत्त्वमसि' 'सदेव सौम्यदमग्र असीत्' ह्या मंत्रावरून ॐ तत् आणि सत् हीं ब्रह्माचीं तीन नांवें आहेत असें स्पष्ट होतें. पुढें भगवान सांगतातः 'पूर्वकालापासून, अनादि कालापासून ब्राह्मण वेद आणि यज्ञ यांची उत्पत्ति, स्थिति, आणि प्रवृत्ति ॐतत्सत् पासून आहे. ब्राह्मण, वेद, यज्ञ यांस विहितत्व प्राप्त झालें आहे, तें ॐतत्सत् या मंत्रानेंच होय. म्हणून, वेदवेत्त्या कर्मठ पुरुषांचें यज्ञकर्म, तपाचरण आणि दानक्रिया या सर्वांस विधित्व प्राप्त होतें; आपलीं सर्व कर्मे विधिपूर्वक यथासांग पूर्ण होतात, याचें कारण ॐ या पवित्र अक्षराचा आदीं व अंतीं उच्चार होय. 'यथासांग तें कर्म कांहीं घडेना' या रामदासोक्तीप्रमाणें आपल्या हातून यथाविधि व यथासांग कर्म होणें प्रायः अशक्यच आहे. 'कर्म यथोक्तविधीनें यथासांग झाल्याविना कर्मफळ मिळत नाहीं: तेव्हां ॐचा उच्चार करावा, म्हणजे कर्माची सांगता होते, असें श्रुतिस्मृति म्हणतात.' ॐ हें ब्रह्माचें नांव; तेव्हां ब्रह्मस्मरण करून कोणत्याही कृत्याला आरंभ केला, म्हणजे जें कांहीं न्यून असेल त्याला संपूर्णता येते. (२) तसेंच, मुमुक्षू लोक यज्ञ, दान तप हीं निरनिराळीं कर्में करितांना फलाकांक्षा ठेवीत नाहींत, आणि तत् हें जें ब्रह्मवाच्य नाम, त्याचा उच्चार करून क्रियाकर्माला आरंभ करितात. 'सर्वच ब्रह्म आहे' असें मनांत आणून ते शास्त्रोक्त निष्काम कर्माला आरंभ करितात. अर्थातच चित्तशुद्धि हें जें निष्कामकर्मफल, तें त्यांस सहज रीतीनें

मिळतें. ( ३ ) अस्तित्व दाखवावयाचें असलें, चांगलेपणा व्यक्त करावयाचा असला, त्याचप्रमाणें शिष्टसंमत कृत्याचा उल्लेख करावयाचा असला, म्हणजे 'सत्' या शब्दाचा, या ब्रह्मनिर्देशाचा, उपयोग करितात. सत् म्हणजे ( १ ) आहे; ( २ ) चांगलें आहे; आणि शिष्टसंमत आहे, असे तीन भिन्न अर्थ होतात; ह्याचप्रमाणें ( ३ ) यज्ञ, दान आणि तप यांची स्थिति व यज्ञदानादिकांसंबंधी सर्व कर्मे यांलाही 'सत्' ह्मणतात. 'सत्' हें ब्रह्मव्यंजक नांव आहे. हेंच नांव अस्तित्वाचें, योग्यकर्माचें आणि शिष्टसंमत आचाराचेंही आहे. तसेंच व्यवहारांतील दृश्य वस्तूंस आपण 'आहे' असें भ्रांतीनें म्हणतों. ही भ्रांति ध्यानांत ठेऊन जर आपण कर्म करूं लागलों, तर तें ब्रह्मपरच कर्म होईल. आणखी; यज्ञदानादिकांस ही 'सत्' च म्हणतात. या विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, कोणतेंही कर्म ॐ, किंवा तत् किंवा सत् या ब्रह्मव्यंजक नांवाचा उच्चार करून आरंभिलें असतां व त्या नांवास योग्य अशी श्रद्धा आपल्यास सहज मिळाली असतां त्या कर्मास 'सात्विकता' प्राप्त होते, त्याची सांगता होते व त्यानें चित्तशुद्धि होते. ह्मणून भगवान् ह्मणतात कीं, तामसी किंवा राजसी पुरुषानें ॐ याचा सार्थ उच्चार श्रद्धापूर्वक करून कर्माला प्रारंभ केला, तर त्या त्याच्या कर्माला सात्विकता प्राप्त होऊन तें ज्ञानमार्गांतील प्रतिबंध दूर करण्यास समर्थ होतें. यांतील या त्रयींतील-एक एक नांव हें समर्थ आहे, मग सर्व नामांचा एकदम उच्चार केला असतां फल अवश्यमेव प्राप्त होईलच होईल, हें काय सांगावें? 'हरिः ॐ' या अक्षरांचा उच्चार करून आपल्या सर्व वेदोक्त कर्मास आरंभ होतो, व 'तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु' या मंत्रानें शेवट होतो, हें प्रत्येक ब्राह्मणास विदित असलेंच पाहिजे. आपआपल्या अधिकारानुसार जें कांहीं वर्णाश्रमोक्त कर्तव्य असेल, तें कर्तव्य करण्याच्यावेळीं ॐ या अक्षराचा सार्थ उच्चार श्रद्धापूर्वक करावा, व कर्म संपलें म्हणजे 'तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु' असें म्हणावे, म्हणजे आपल्या त्या कर्तव्याची शास्त्रोक्त सांगता होऊन त्या प्रत्येक कर्माला — स्वसंरक्षणासाठीं विहित असलेलें युद्ध हा एक रणयज्ञच आहे—सात्विकता प्राप्त होते, आणि आपली चित्तशुद्धि होते; म्हणजे आपला अभिमान विगलित होतो व आपली वासना नष्ट होते. ही चित्तशुद्धि ह्मणजे निर्मळ स्लेटपाटी होय. या पाटीवर ज्ञानाचा शुद्ध प्रकाश पडला, ह्मणजे आत्मस्वरूपाचें ज्ञान होऊन विज्ञान होतें आणि तो पुरुष मुक्त होतो. सात्विकता मिळविण्याला ॐकाराचा उच्चार हें सुलभ साधन आहे. हा उच्चार मात्र ॐकाराचा अर्थ समजून घेऊन व श्रद्धापूर्वक झाला पाहिजे. सारांश शास्त्रज्ञानशून्य श्रद्धेला जर 'ॐतत्सत्' या मंत्राची सार्थ जोड मिळून आपल्या हातून विहित कर्म झालें म्हणजे तें कर्म शास्त्रशुद्ध होतें, हें ध्यानांत ठेवावयाचें आहे.

८ 'अर्जुना!' भगवान् ह्मणतातः 'श्रद्धेचा गंधही नसून, बिलकुल श्रद्धा नसतांना आपल्याकडून जें होमहवन होतें, जें दान आपण देतों, जें तपाचरण, करितों किंवा जें

कांहीं दुसरें वेदोक्त कर्म करितों, तें हवन, दान, तप किंवा कर्म ' असत् ' ह्मणजे खोटें, अभावात्मक, व निंद्य होय. या कर्मापासून येथेंही फलप्राप्ति कांहीं होणार नाहीं व मेल्यावर ही कांहीं प्राप्ति व्हावयाची नाहीं. ' अश्रद्धापूर्वक केलेलें प्रत्येक कर्म व्यर्थ होतें. त्याचा या जन्मीं किंवा परजन्मीं कांहीं उपयोग नाहीं.' हें प्रभूंचें वाक्य आपण सर्वांनीं नीट लक्ष्यांत ठेवावें. श्रद्धाविरहित पुरुष या जगांत नाहीं, असें मीं सांगितलें आहे, तें लक्ष्यांत असेलच. आपल्या स्वतःस किंवा आपला ज्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे अशा दुसऱ्या कोणांस ज्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव आला असेल, त्या गोष्टीवर सुजाण अथवा भ्रमित नसलेल्या पुरुषाचा विश्वास बसलाच पाहिजे. हा विश्वास ह्मणजे श्रद्धा होय. न साध्य झालेल्या एखाद्या साध्य गोष्टीची अपेक्षा असून, ती वस्तु प्राप्त होण्याला मार्ग कळलेला असतो व त्या ज्ञानमार्गानें जाण्याची बलवत्तर इच्छा असते. त्याला श्रद्धा ह्मणावें. असली इष्ट वस्तु, असला मार्ग व असली बलवत्तर इच्छा प्रत्येक पुरुषाला त्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें असते; ह्मणजे श्रद्धा नाहीं असा पुरुष नाहीं, हें खरें; पण आपल्याला ज्या वस्तूचा मुळींच अनुभव नाहीं, ज्याचा मार्ग ठाऊक नाहीं, व मार्ग साध्य आहे असे माहित नाहीं, अशा वस्तूवर आपला विश्वास सुद्धां बसणें कठिण आहे; मग श्रद्धेचें नांव कशाला ? वस्तु खरी आहे, मार्ग असून तो सुगम आहे, असें आपल्याला प्रत्यक्ष कळलें असतां त्या खऱ्या वस्तूवर आपला विश्वास व पुढें श्रद्धा बसतें. अर्थातच आपल्या समजुतीच्या बाहेरच्या ज्या गोष्टी आहेत, त्यांवर आपली श्रद्धा बसणें अत्यंत अशक्य आहे. वस्तु खऱ्या असतील; पण त्या आपल्यास जर समजतच नाहींत, तर त्या आपल्यास काय होत ? यज्ञ, दान, तप इत्यादिकांनीं चित्त-शुद्धि होत असेल किंवा स्वर्गलोकीं मोठें सुख मिळत असेल, हें सर्व खरें असेल; पण आपल्या समजुतीच्या आटोक्याबाहेरच्या जर त्या गोष्टी असतील तर-त्यांची समजूत पडण्यासारखें आपलें बुद्धिसामर्थ्यच नसेल तर-,आपण यज्ञ केले, दान दिलें अगर तपाचरण केलें असतां त्या त्या आचरणापासून आपल्यास कांहींएक लाभ होणार नाहीं. आपली जर श्रद्धा नाहीं, तर अर्थात फलही आपल्यास मिळणार नाहीं. श्रद्धेचें खरें फल मनःशुद्धि हें आहे. श्रद्धा नाही तर मनःशुद्धि होणार नाहीं. ज्या वैद्यावर आपला भरंवसा नाहीं, त्या वैद्याचे औषधानें गुण येत नाहीं हें सर्वांस माहीत आहे. आपल्या वडिलांनीं ' स्नानसंध्या कर ' म्हणून आज्ञा केली असतां जितक्या श्रद्धेनें आपण स्नानसंध्या करूं व जितकें त्या स्नानसंध्येचें फळ आपल्यास येईल, तितकें फळ स्नानसंध्या न करणाऱ्या एखाद्या आपल्या शत्रूनें तोच उपदेश केला असतां येणार नाहीं. ' उपदेश कोणाचाही घ्यावा ' हा उपदेश उत्तम आहे. पण हा उपदेश खरा आहे असें समजण्याची अक्कल तरी आपल्यास पाहिजे, किंवा जो आपल्यास उपदेश करितो त्यावर आपला पूर्ण विश्वास अथवा पूर्ण श्रद्धा पाहिजे. मिळून आपल्यास समजत नाहीं, अशी गोष्ट कोणी जर आपल्यास करायला सांगितली, तर अनुभवाशिवाय श्रद्धा बसणार नाहीं, आणि श्रद्धा विरहित कर्माचें फल आपल्यास येत

नाहीं. तेव्हां ज्याचा जितका अधिकार असेल, जितकी समजूत असेल, जितकी त्याची श्रद्धा असेल, त्याच बेतानें त्याला कर्म करण्याला सांगणें हाच इष्ट मार्ग आहे.

१० सारांश, अश्रद्धायुक्त कर्म व्यर्थ असतें. श्रद्धायुक्त परंतु अज्ञानकृत कर्मांत राजस, तामस असे तीन भेद त्या त्या कर्त्याच्या बुद्धीच्या मानानें होतात; आणि ज्ञानयुक्त कर्में सात्त्विक होऊन निर्मळ करितात, असा हा कर्मकांडाचा व कर्मकांडांतून ज्ञानकांडांत जाण्याचा मार्ग आहे. या मार्गाच्या तळाशीं व पुढें सर्वत्र श्रद्धेचा पाया असेल, तर पुढचा प्रवास सुसाध्य आहे. श्रद्धा नसेल तर, श्रद्धा असेल त्यापेक्षां श्रेष्ठ दरजाचीं कामें हातांत घेतलीं तर, तीं तीं कर्में व्यर्थ होतील. श्रद्धेची कांस अनुभवपूर्वक धरणें हें प्रत्येक मुमुक्षूचें कर्तव्य आहे. प्रत्येक जीव केव्हांना केव्हां तरी मुक्त व्हावयाचाच; लवकर किंवा उशीरा हा प्रश्न आहे. लवकर परमार्थमार्गाची ओळख झाली तर दुःखापत्ति कमी होईल, उशीरा ओळख पटली, तर दुःखाचे डोंगर डोक्यावर घेऊन पुष्कळ युगें तळमळत राहावें लागेल, हा सिद्धांत आहे; आणि लवकर ओळख आपल्या माहितीच्याच मार्गानें व्हावी म्हणून प्रभूंनीं अज्ञानी लोकांकरितां या अध्यायाची योजना केली आहे. श्रद्धा असेल तेंच कर्म करावें; फल मिळेल, श्रद्धा दृढतर होईल, सात्त्विकता मिळेल, पुढें ज्ञानविज्ञान होऊन मुक्ति मिळेल, हें प्रत्येक समंजस पुरुषानें ध्यानांत धरून मार्ग क्रमण करण्यास सुरवात करावी. अश्रद्धेनें दंभ माजतो, द्वेष उत्पन्न होतो, तामसवृत्ति होते आणि फलागम होत नाहीं. आपला अधिकार सद्गुरूकडून नीट समजून घेऊन तदनुसार श्रद्धा धरावी, कल्याण होईल.

ॐतत्सत्

---

## खंड १८ वा.

# अठराव्या अध्यायाचा उपसंहार.

१ हा अध्याय सर्व गीताशास्त्राचा उपसंहार आहे, असें मागें अनेक वेळां सांगितलें आहे तें वाचकांच्या ध्यानांत असेलच. अर्थातच मागील सर्व अध्यायांत जे विषय आले त्या सर्वांची एकवाक्यता करून शेवटचा निकाल सांगण्याचें काम या अध्यायाचें आहे. दुसऱ्या अध्यायामध्यें विषयप्रवेश आणि अठराव्यामध्यें विषयसमारोप ही गीतांतर्गत व्यवस्था अलीकडील स्पेन्सरप्रभृति लेखकांनीं उद्धृत केली आहे, आणि विषयाच्या समजुतीला ही व्यवस्था फार उत्तम आहे हें सांगावयास नकोच. आतां या अध्यायांत जे विषय प्रधानभूत म्हणून मला वाटतात त्यांचा येथें अवतार करून आठराव्या अध्यायाची परिसमाप्ति करितों.

## त्याग व संन्यास.

२ प्रपंच आणि परमार्थ यांमध्यें अनेक विशेष आहेत त्या सर्वांचें मूळ वरील दोन शब्दांत आहे. त्याग ह्मणजे आपल्या स्वतःच्या कर्मानें प्राप्त झालेली उपयोगी वस्तु बुद्धिपुरस्सर टाकून देणें होय. संन्यास शब्दानें नित्यनैमित्तिक व फलद्रूप होणाऱ्या कर्मांचा परित्याग करणें असा अर्थबोध होतो. दुसऱ्या, पांचव्या व चवदाव्या अध्यायामध्यें संन्यासाचें स्वरूप सांगितले आहे. तो संन्यास जीवन्मुक्ताकरवीं अगर मुमुक्षु लोकांकरवीं आचरिला जातो. त्याचा प्रस्तुत विचार कर्तव्य नाहीं. आतां केवळ गौण संन्यासाचा म्हणजे प्रपंचांत राहत असून परमार्थाकडे दृष्टि वळविणाऱ्या लोकांनीं केलेल्या संन्यासाचा विचार कर्तव्य आहे. हा संन्यास ह्मणजे काम्यकर्मापासून निवृत्ति होय. आणि त्याग ह्मणजे जीं जीं कर्में आपल्या हातून होतात, त्या त्या कर्मांपासून उत्पन्न होणारीं जीं फलें त्यांचा बुद्धिपुरस्सर परित्याग करणें होय. आतांच वर ह्मटल्याप्रमाणें प्रपंच आणि परमार्थ यांचा भेद पाहूं. प्रपंचांत प्रत्येक सुखपोषक वस्तूचा संग्रह करावासा वाटतो; कारण त्या त्या वस्तूच्या संग्रहानें आपल्यास जास्त उपभोग मिळेल अशी कल्पना असते. प्रापंचिकाला भोगाची इच्छा अनावर असते व या इच्छाप्रेरणेनें कर्म करून तो पुरुष उपभोग्य वस्तूंचा संग्रह करीत असतो. विषयोपभोगाची अनावर इच्छा व विषयभोग म्हणजे प्रपंच होय. येथें '**मी शरीर**' याचें व '**माझें अमुक, माझें तमुक**' या वृत्तीचें प्राबल्य असतें. '**मी उपभोग घेण्यासाठीं** मात्र येथें आलों आहे व माझ्या प्राचीन अगर अर्वाचीन कर्तृत्वानें मात्र उपभोग मिळावयाचे आहेत' हा अस्सल ( केवळ ) प्रापंचिकांचा सिद्धांत आहे. उपभोग-विषयोपभोग-हा पुरुषार्थ आणि वस्तु-शरीर-इंद्रियें, मन, बुद्धि हीं सर्व उपभोग साधनें आहेत. ही प्रापंचिकाची गोष्ट झाली. पण उपभोग हा पुरुषार्थ नव्हे, उपभोग व तज्जन्य सुख हीं क्षणभंगुर आहेत, पुरुषार्थ या व्यतिरिक्त कांहीं तरी निराळा असला पाहिजे, अशी प्रापंचिक सुखाच्या नीरसत्वानें अनिश्चितत्वानें व क्षणभंगुरत्वानें ज्याची वृत्ति झाली तो परमार्थास लागतो आणि त्याग करण्यास सुरवात करितो. आपल्या स्वतःच्या कर्मानें प्राप्त झालेल्या अगर आपल्या स्वाधीन असलेल्या वस्तु निरपेक्षबुद्धीनें पुत्रकलत्रास-भाऊबंदास-जातीस-देशास-विश्वास परमेश्वरास-अर्पण करण्याची आणि जयापजयानें होणाऱ्या सुखदुःखास स्ववश करण्याची प्रवृत्ति, हिलाच पारमार्थिक भाषेंत निवृत्ति असें ह्मणतात. सर्वकर्मफलत्याग तो हाच होय. कर्म करावयाचें व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलाची, सुखदुःखाची अपेक्षा बिलकुल ठेवावयाची नाहीं, याचें नांव त्याग होय. व्रतें, वैकल्यें, यज्ञ, तप इत्यादि कर्में करावयाचीं, पण त्यांपासून उत्पन्न होणारें फल निष्कामबुद्धीनें दुसऱ्यास अर्पण करावयाचें, याला त्याग असें ह्मणतात. पण हल्लींचा त्याग विलक्षणच आहे! 'तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु' हा मंत्र प्रत्येक कर्माचे शेवटीं आपण म्हणतों, पण 'दीर्घायुष्यमस्तु, समृद्धिरस्तु, पुत्रपौत्रादिवंशवृद्धिरस्तु' इत्यादि आशीर्वाद मोठ्या कळकळीनें ऐकतों व त्याप्रमाणें व्हावें अशी आपली इच्छा असते; ह्मणून आपण

केलेलें पुण्यकर्म देखील प्रापंचिक म्हणजे उपभोगात्मक होतें. भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग । ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥ १ ॥ (तुकाराम.) हा त्याग नव्हे, हा धर्म नव्हे; हा दूरदर्शित्वात्मक प्रपंच आहे. असो; तेव्हां आपल्या कर्मफलाचा व तज्जन्य मनोवृत्तींचा जाणूनबुजून व निष्कामबुद्धीनें होत असणारा त्याग परमार्थसाधक आहे. 'फलच नको, तेव्हां फलद्रूप होणारें कर्म तरी सकाम वृत्तीनें कशास करावें ?' असा मनाचा ग्रह होऊन काम्य म्हणजे फलेच्छाप्रेरित जेवढीं कर्मे आहेत, त्यांचा त्याग करणें याचें नांव संन्यास होय. एवंच वस्तुतः पाहतां कर्मफलत्याग आणि सकाम कर्मत्याग हीं एकच आहेत; उभयतांमध्यें फलत्याग आहेच. एकामध्यें ह्मणजे संन्यासामध्यें **काम्यकर्मत्याग** आहे, विहित नित्यनैमित्तिकांचा स्वीकार आहे, आणि दुसऱ्यामध्यें ह्मणजे त्यागामध्यें काम्यकर्मत्याग नाहीं, पण फलत्याग आहे. हाच काय तो विशेष आहे. पण उभयतांची फलश्रुति एकच आहे. **त्याग**—सर्व कर्मफलत्याग (कर्में करावयाचीं सर्व, पण फल घ्यावयाचें नाहीं, एकाचेंही.) **संन्यास**—काम्यकर्मत्याग (काम्य कर्में सोडावयाचीं) त्यागांत फलत्याग आहे. संन्यासांतही आहे, कारण नित्यनैमित्तिकांस फल नाहीं.

वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं, हल्लींच्या धर्मभ्रष्ट कालांतील आपले संन्यासी लोक आपण 'काम्यकर्माचा' त्याग केला असें दाखविण्यासाठीं भिक्षावृत्तीचा अवलंब करितात खरें; पण त्यांची काम्यवृत्ति अथवा कामुकता सर्वथा नष्ट झालेली नसते. भिक्षा तरी **हवीच** असते **ना** ? यासाठीं हिंडणें हें काम्यकर्म झालें. एवंच भगवें वस्त्र परिधान करून व शेंडी-जानवें परित्यक्त करून शेवटीं **टीचभर** खळगी भरण्यासाठीं त्यांस हिंडावें लागतेंच ना ? हा खरा संन्यास नव्हे, दुय्यम प्रतीचा सुद्धां संन्यास नव्हे. पुष्कळ संन्यासी पाहिले तर ते प्रापंचिकच दिसतात, कांहीं थोडे सत्पुरुष मात्र संन्यास शब्दाला सार्थ करणारे असतात. मग ते शिखासूत्र काढोत वा ठेवोत ! असो; काम्यकर्मांचा म्हणजे धन मिळावें, कीर्ति व्हावी, इत्यादि व्यावहारिक कर्मांपासून तों पुत्रकामेष्टि इत्यादि श्रौतस्मार्तकर्मांपर्यंतच्या सर्व **फलरूपीकर्मांचा** त्याग केला काय किंवा कर्मांपासून होणाऱ्या फलाचा त्याग केला काय, फलश्रुति एकच आहे. आणि ह्मणून 'त्याग व संन्यास' हे शब्द भगवंतांनीं या अध्यायांत समानार्थकत्वानें उपयोगिले आहेत. खरा त्याग अथवा खरा संन्यास पुरुषाला परमार्थी करितो; यांचा अभाव असला म्हणजे पुरुष प्रपंचामध्यें पडतो.

## त्याग म्हणजे काय ?

३ वर त्यागाचें लक्षण असें दिलें कीं, 'बुद्धिपूर्वक स्वकर्मफलावर व तज्जन्य सुखदुःखावर निष्कामबुद्धीनें पाणी सोडणें' ह्मणजे त्याग करणें होय. "आतां दुसरा

एक सिद्धांत मागें आपण ठरवून ठेविला आहे कीं, 'कर्म केलें असतां त्याचा योग्य परिणाम घडलाच पाहिजे.' कर्म ह्मटलें कीं फल आलेंच. फलाची इच्छा करा किंवा करूं नका. शक्य असेल तर ह्या फलाचा पुरुषार्थसाधक त्याग करा; पण फलोत्पत्ति होणारच. फलोत्पत्ति आत्मस्वरूपाला बद्धक आहे; तेव्हां कर्म करून आत्मस्वरूपाला बंधांत घालणें हें अनुचित कृत्य करण्याचे सोडून देऊन मुळींच कर्म न करणें हा उत्तम पक्ष आहे. यच्चावत् कर्म दुष्ट आहे; अतएव कर्माचा–सर्वकर्माचा त्याग–प्रत्येक पुरुषानें करावा," असें ह्मणणारा एक पक्ष आहे. 'मुळींच कर्म न करितां स्वस्थ असावें' हा त्या मताचा इत्यर्थ आहे. 'वेदान्त म्हणजे कर्माचा अभाव' हें मत पुष्कळ दिवसांपासून आमच्या येथें स्वैर संचार करीत आहे. याच्याच जोडीचें पण याच्या उलट असणारें दुसरें मत असें आहे कीं, 'वेदांत्यानें वाटेल तेव्हां वाटेल तें करावें, त्याला पापपुण्य इत्यादि कांहीं नाहीं.' या दोन मतांनीं अथवा अपमतांनीं वेदांताची, तत्त्वज्ञानाची इतकी सैतानी पायमल्ली केली आहे, सन्मतांचें इतकें मातेरें केलें आहे–अथवा वेदांत, तत्वज्ञान, सत्सिद्धांत यांचीं पायमल्ली कशानें होणार? तेव्हां, –वेदांत पढणाऱ्या व पढविणाऱ्या लोकांची अशी नेभळी अवस्था होऊन गेली आहे कीं, कांहीं बोलावयाची सोय नाहीं. पूर्ण अर्थ न समजल्यामुळें, कित्येक पढतमूर्ख वेदांती बोलतात त्यावरून, किंवा कित्येक वेदांत्यांच्या राक्षसी आचारांवरून, हल्लींच्या चौकस सामान्य लोकांत व विद्वान् लोकांत वेदांताविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला यांत कांहीं नवल नाहीं. असो; हा परिणाम पुढें होणार असें सर्वज्ञदृष्टीनें मनांत आणून भगवंतांनीं ३ ते १२ श्लोकांची योजना केली आहे.

ह्या श्लोकाचा मथितार्थ सांगण्यापूर्वी वाचकांच्या सोईसाठीं एक गोष्ट नमूद करून ठेवावी असें वाटतें, ती हीः आपल्या सभोंवार जी ही अनंत व अवाढव्य सृष्टि दिसत आहे, हिचा उपयोग दोन दृष्टींनीं करून घेतां येतो. एक उपभोगदृष्टि व दुसरी ज्ञानदृष्टि. आतां, असा एक सर्वसामान्य नियम आहे कीं, उपभोगदृष्टि अतिरेकानें प्रबल झाली तर ज्ञानदृष्टि निर्बल होते, आणि ज्ञानदृष्टि फार्जाल जोरावर झाली तर उपभोगदृष्टि निःसत्त्व होते, उपभोगदृष्टि जास्त झाली ह्मणजे ज्ञानाचा संकोच होतो व ज्ञानदृष्टि पुष्ट झाली म्हणजे उपभोग संपुष्टांत येतात. असो; आतां हल्लींच्या आपल्या धर्मभ्रष्ट कालांत कर्माचा लघुत्तम काढल्यानंतर मिळणाऱ्या उपभोगाची इच्छा अनावर झाली आहे, आणि म्हणूनच ज्ञानाची सीमा अत्यंत आकुंचित झाली आहे. हल्लीं आपल्यास जें काय ज्ञान मिळतें–मग तें पौरस्त्य असो वा पाश्चिमात्य असो–तें सर्वथा उपभोगात्मक इच्छेचें दासानुदास होऊन राहिलें आहे. पूर्वकालीं ह्मणजे व्यांस, वशिष्ट, वामदेव, विश्वामित्र यांच्या काळीं **ज्ञानवृद्धीसाठीं उपभोग घेणारे पुरुष होते**; आतां, **उपभोगवृद्धीसाठीं ज्ञानाचा स्वीकार होत असतो!** 'ज्या ज्ञानानें खायाला मिळत नाहीं' तें ज्ञान कुचकामाचें, अशी आमची समजूत दृढ झाली आहे. सर्व उपभोगाचें आदिस्थान खाणें हें आहे, ह्मणून 'खाणें' या लक्षणेनें सर्व उपभोग्य अर्थाचा मीं उल्लेख केला आहे.

आह्मीं सध्यां सर्वथा पोटोबाचे दास झालों आहों; आणि ह्मणूनच आमच्या जवळ असलेलें व आह्मीं उराशीं घट्ट धरून ठेवलेलें आमचें आदिकालीन ज्ञानभांडार हळू हळू आह्मांस सोडून जाऊं लागलें आहे आणि चालू असलेला क्रम आणखी कांहीं शतकें चालेल तर आम्हांस योग्य रीतीनें सगर्व करणारें आमचें सनातन वैदिक तत्त्वज्ञान हें सुद्धां आम्हांस सोडून जाईल. ह्मणून सर्वांची–सर्व गीताभक्तांची–सविनय प्रार्थना करितों कीं, प्रत्येक सत्पुरुषानें **परमेश्वरास अनन्य भावानें शरण जावें आणि आपल्यास 'ज्ञानदृष्टि देण्यासाठीं मात्र जीव व जीवन दे'** असें त्याला नम्रपणानें आळवावें. ही अशी एकनिष्ठ प्रार्थना होऊं लागली व या एकनिष्ठ प्रार्थनेप्रमाणें आपलें एकनिष्ठ आचरण झालें तर या जन्मीं सुद्धां आपली–आपल्या समाजाची–ज्ञानदृष्टि प्रखर होईल. जेवण्यासाठीं ज्ञान मिळवावयाचें नाहीं, तर **ज्ञानप्राप्तीसाठीं जेवावयाचें आहे.** 'आधीं पोटोबा आणि मग विठोबा' याचा अर्थ पोटोबाचें मात्र आराधन करावयाचें असा नाहीं. पोटोबाचें आराधन विठोबाच्या प्राप्तीसाठीं करावयाचें आहे. असो; तेव्हां आम्ही बहुधा उदरंभरी मात्र झालों, याचें पर्यवसान असें झालें कीं, आमचें ज्ञान कमी झालें आहे, आमच्या मनोवृत्ति अनुदार झाल्या आहेत आणि ज्या पोटोबाचें आराधन करावयाचें हा आमचा संकल्प तो संकल्प सुद्धां ज्ञानाभावामुळें सार्थ होणें सर्वथा संकटमय झालें आहे; हें सत्य जितकें लवकर आम्हांस समजेल व समजून उमजेल तितकें आमचें व्यावहारिकदृष्टीनें सुद्धां कल्याण होणार आहे; मग परमार्थदृष्टीनें होईल यांत शंकाच नाहीं. हें विश्व जीवाच्या उपभोगासाठीं निर्माण केलें आहे हें जितक्या अंशांनीं खरें आहे त्याच्या अनंत पट अंशांनीं हें खरें आहे कीं, जीवानें येथें ज्ञान मिळवून आपली आत्मिक योग्यता वाढवावी यासाठीं विश्वाची ईशयोजना आहे. हा **जीवधर्म** आम्ही मानव व विशेषतः आर्यभूमिस्थ मानव विसरलों ह्मणून आमची राष्ट्रीय स्थितिच काय पण सामाजिक, कौटुंबिक स्थिति व व्यक्तिविषयक स्थिति सुद्धां बिघडून जाऊन धर्मभ्रष्ट स्थितींत आम्हीं आपली कष्टमय जीवयात्रा यथाकथंचित् कंठित असें राहिलों आहों. असो, ज्या ज्ञानाशिवाय कैवल्य प्राप्त होत नाहीं, तें ज्ञान तर राहिलेंच एका बाजूला, पण ह्या विश्वाचें व विश्वगत पदार्थांचें पवित्रकारी ज्ञान आम्हांस नसल्यामुळें आमच्या गरीबी संसारास लागणारे साधे पदार्थ सुद्धां आम्ही **बाहेरून मागवीत असतों. केवळ मजूरी करणें हा** मात्र बिनअकलेचा व बिनभांडवली धंदा आमचा असा बनवून राहिलों आहों ! ! वाचकहो, आपली उपभोगतृष्णा वाढली त्याचे हे सर्व परिणाम बरें ? कृपा करून ध्यानांत ठेवा कीं, उपभुक्त पदार्थ एका उपभोगाबरोबर नष्ट होतो आणि तो नष्ट होतांक्षणींच तज्जन्य-सुखही संपतें. पण ज्ञानाचीं साधनें जीं कर्णनेत्रादि ज्ञानेंद्रियें, मन आणि बुद्धि, यांचे जे विषय आहेत, ते ज्ञानदृष्टीनें पाहिले असतां उत्पन्न होणारें ज्ञान अधिक कालपर्यंत, अनंतकालपर्यंत टिकणारें आहे: तेव्हां आपल्या पूर्वजांस सुख होईल, निदान आपलें कल्याण होईल ह्मणून तरी या सिद्धांताकडे लक्ष देऊन कर्णनेत्रांचें ज्ञानग्रहणसामर्थ्य

वाढवावयाचें, त्यांची योग्यता वाढवून मनाची व बुद्धीची योग्यता वाढवावयाची हें मत धरून जर तपश्चर्येला आरंभ केला नाहीं, तर आपल्या सुदैवानें आपल्यास पूर्वजद्वारा प्राप्त झालेलें ज्ञान-भांडार व्यर्थ होईल. पुनः; उपभोगतृष्णा ही कामक्रोधादिकांस उत्पन्न करिते व कुटुंबांत, समाजांत, राष्ट्रांत आणि जगांत भिन्नता, विस्कलितपणा उदयास आणिते. पहाः एकाच भाकरीच्या तुकड्याभोंवतीं दहापांच कुत्रीं जमलीं असतां त्यांच्यांमध्यें व परस्परांत कशी कडाक्याची दुही माजते बरें? पण हीच ज्ञानदृष्टि असली म्हणजे एकच ज्ञानदायक पदार्थ अनेक निरभिमानी ज्ञानभक्तांस एकत्र करितो! ज्ञानयोगानें सर्वांमध्यें मित्रत्व वाढून कुटुंब, समाज, राष्ट्र व जगें संघटित होतात. म्हणून आपल्यास वारंवार सांगावयाचें कीं, ज्ञान वृद्धिंगत करण्याचा सुसंगत प्रयत्न करा; उपभोगाचे पदार्थ, **ज्ञानवृद्धि करणाऱ्या उपभोगाचे पदार्थ,** तुमच्या स्वाधीन आपोआप होतील. आणखी एकदां, उपभोगाकडेच आपली तंद्री लावून आपण उपभोगग्रस्त झालों, नित्य उपभोगाचीच लालसा धरिली तर बुद्धि, मन, इन्द्रियें आदि आपल्या सर्व **ज्ञानवृत्ति शारीरिक** होतात. शिवाय, आपल्या या भोगतृष्णेनें आपल्यास उपभोगाचें अथवा उपभोगसाधनांचें मात्र अंतकाळीं ध्यान राहील आणि नंतर आपल्यास अथवा आपल्या जीवास कमी प्रतीच्या योनींत जन्म घ्यावा लागेल; अर्थात् पशुपक्ष्यादिकांची अवनत व सर्वथा परतंत्रत्वाची स्थिति प्राप्त होऊन पुनः जन्ममरणाचे भवचक्रांत आपल्यास पडावें लागेल. आपल्यासारख्या जाणत्या पुरुषांस आपल्या पूर्वजांची अपकीर्ति व्हावी, आपल्या समाजाचें व राष्ट्राचें अकल्याण व्हावें आपलीं मुलें उपाशी मरावीं, आपलीं ज्ञानेंद्रियें शारीरिक व्हावी व आपल्याला पशुयोनी मिळावी हें तर इष्ट नाहीं. म्हणून आपण आपली भोगवृत्ति कमी करून ती ज्ञानाच्या ताब्यांत राहील, असें केलें तर मात्र उत्तरोत्तर आपली व आपल्या समाजाची स्थिति उन्नत होत जाईल.

४ असो; हें अंमळ विषयांतर झालें. आतां मूळ श्लोकांकडे आपण आपलें लक्ष वळवूं या.. भगवंतांनीं तिसऱ्या श्लोकांत कापिलसांख्य व वेदांतीसांख्य या मताचा उद्धार केला आहे. कापिलमतानुयायी लोक म्हणतात कीं 'कर्म तेवढें दुष्ट आहे' व 'म्हणून मुमुक्षूनें कर्म करूं नये. **प्रत्येकानें सर्वकर्मपरित्याग करावा** असें यांचें मत केवळ दोष दाखविण्यास्तवच येथें अवतीर्ण केलें आहे. 'यज्ञ, दान आणि तप हीं कर्मे केव्हांही टाकितां उपयोगी नाहीं,' **पूर्णज्ञानविज्ञानस्थितींत सुद्धां कर्म टाकितां नये.** हें कर्मठ मत होय. येथेंही अतिरिक्तत्वाचा दोष आहेच. असो; या दोन्ही मतांचा पूर्ण विचार तिसऱ्या अध्यायांत केला आहे आणि येथें या दोन्ही आग्रही दुर्मतांचा विध्वंस करून असें ठरविलें आहे, कीं, चित्तशोधण्यासाठीं कांहीं कालपर्यंत प्रत्येक मुमुक्षूला अधिकारानुसार कर्म करावेंच लागेल; पण चित्त निर्मळ अथवा विमल झालें म्हणजे कर्मांची अपेक्षा राहत नाहीं. पण त्यानें पुढें सुद्धां कर्म टाकून देऊं नये. लोकसंग्रहासाठीं त्यानें युक्त राहून कर्म केलें तरी तें बद्धक होत नाहीं. सहाव्या अध्यायांतही

योगप्रकरणीं योगारुरुक्षु, योगारूढ आणि युक्त इत्यादिकांचें तारतम्य पाहतांना असेंच सिद्धांतात्मक विधान भगवंतांनीं केलें आहे. दुसऱ्या अध्यायांतील ' कर्मण्येवाऽधिकारस्ते... ' या श्लोकामध्यें ह्याच विषय आहे. सारांश, ' कर्म, त्याचें लक्षण, त्याची आवश्यकता ' इत्यादि विषयांचें आवाहन दुसऱ्या आध्यायांत सूत्ररूपानें करून, तिसऱ्या चवथ्या, पांचव्या व सहाव्या अध्यायांत त्यांचा विस्तार केला आणि अठराव्या अध्यायांत पुनः उपसंहाररूपानें त्यांचा अवतार केला आहे. भगवान् म्हणतातः 'यज्ञ, दान आणि तप हीं कर्में-अभिमान सोडून आशाशून्यत्वानें केलीं असतां, हीं कर्में-बुद्धिवंत लोकांचीं अंतःकरणें संस्कृत करितात व ते पुरुष मोक्षसोपान चढण्याला अधिकारी होतात. अतएव यज्ञ, दान आणि तप हीं कर्में जरी नित्य नव्हेत, तथापि तीं नित्य व लोकसंग्राहक कर्तव्यें ( Virtues ) आहेत असें मानून प्रत्येकानें तीं कर्में अवश्य केलीं पाहिजेत. ह्याचप्रमाणें नित्य म्हणून जी श्रुतिस्मृतिविहित कर्में ( Duties ) आहेत, त्यांचा त्याग तर सर्वथा विघातक होय.

यावरून, या भगवन्मतावरून, तात्पर्य असें निघतें कीं, ज्याला इंग्रजींत Duty ( कर्तव्यकर्म ) ह्मणतात, तीं नित्यकर्में प्रत्येकानें चित्तशोधन होईपर्यंत केलींच पाहिजेत; हीं नित्यकर्में तो जर न करील तर धर्मशास्त्रानुसार तो दंडास प्राप्त होईल अथवा भगवंतांच्या भागवतीधर्मानुसार बोलावयाचें ह्मणजे तो आपली आत्मिक योग्यता कमी करून घेईल. पुनः दुसरें असें कीं, ज्याला इंग्रजींत Virtues ( सद्गुण ) असें ह्मणतात तीं ' पावन ' कर्में निष्कामत्वानें व निःसंग बुद्धीनें केलीं असतां तो तो कर्ता धर्मदृष्टीनें मोठें बक्षीस मिळवील अथवा तो आपली आत्मिक योग्यता जास्त वाढवील. नित्यकर्माचरणानें आपली आत्मिक योग्यता कायम राहते पण पावनकर्माचरणानें आपली योग्यता श्रेष्ठ व श्रेष्ठतर होते. खरेंच आहे. ( १ ) तपाचरणानें आपलें मन व बुद्धि एकाग्र राहून ज्ञानसंचय होतो. आतां, ही तपश्चर्या वशिष्ठादिकांची असो किंवा टिंडलस्पेन्सरप्रभृतींची असो; ज्ञानविषय मात्र निराळा. बाकी तपाचरणाची पद्धति एकच असें आपल्यास ह्मणावें लागतें. तपाशिवाय ह्मणजे एकाग्र झालेल्या कुशाग्र बुद्धीनें इष्टविषयाचें ज्ञानदृष्टिपूर्वक पर्यालोचन दीर्घकालपर्यंत साधारतः केल्याशिवाय इष्टविषयज्ञान सिद्धच होत नाहीं. असो; पण असल्या प्रकारची एकनिष्ठ विश्वामित्री तपश्चर्या आपल्यास आमच्या येथें सहजगत्या कोठें तरी दिसतें काय? आरंभशूरत्वामध्यें बरीक आमची बहादुरी बघून घ्यावी, पण फलोदयापर्यंत अवघड कामाचा पिच्छा पुरविणारे भगीरथ आपल्या या देशांत प्रायः आज मित्तीला नाहींतच, असें ह्मटलें पाहिजे.

ही तपश्चर्या तपोनिष्ठाची उपभोगतृष्णा कमी करून त्याचें मन सुसंस्कृत करिते व तें लोकसंग्रहाकडे व आत्मस्वरूपाकडे वळविते, यांत शंकाच नाहीं. ( २ ) ह्याचप्रमाणें दान हें कर्म घ्या. दान ह्मणजे आपल्या साक्षात् अगर परोक्ष स्वकर्मानें आपल्या

स्वाधीन असलेली वस्तु निर्लोभ मनानें व निरभिमानपणानें दुसऱ्यास सर्वथा अर्पण करणें होय. या दानपद्धतीनें उत्तरोत्तर आपली उपभोगतृष्णा कमी होत जाऊन आपलें चित्त निर्मळ विषयविरक्त होत जातें हें सांगावयास नकोच.

आतां आपल्या येथें सुद्धां दानपद्धति आहे; पण प्रथमतः ती निष्काम नाहीं. उदाहरणार्थ गंगातीरीं एक दोन पैसे देऊन आपण अनंत जन्मींचीं पातकें जाळण्याची हांव धरीत असतों. किंवा सध्यांच्या जन्मीं अलोट कीर्ति आणि पुढील जन्मीं पुष्कळ संपत्ति मिळेल अशी आशा करीत असतों! पुनः, या पद्धतींत अभिमानशून्यता नाहीं. ' मी असें दान केलें तसें केलें ' असें सांगत फिरण्याची आह्मांला भारी हौस! एवंच निर्मळ चित्तानें, उपभोगवितृष्णेनें हें ज्ञान होत नाहीं, शिवाय दुसऱ्याच्या तात्कालिक विपत्तीचा नाश करण्यापलीकडे आपण फारसें कांहीं करीत नाहीं. ह्मणजे आम्ही हिंदु लोक जात्या कोमल मनाचे असल्या कारणानें एकादा भिकारी विवळून ओरडला कीं, त्यास मूठपसा दाणे देऊन टाकितों, हें कांहीं खोटें नव्हे; पण ज्याच्या योगानें विपत्तीच नष्ट होईल असें दान करण्याची, ह्मणजे इंद्रियें, मन व श्रद्धेसहित बुद्धि हीं प्रफुल्लित होऊन जास्त कार्यक्षम व ज्ञानपर होतील, जास्त शुद्ध होतील, जास्त ईश्वरपर होतील, अनाथसंख्या कमी होईल असें दान आह्मी करीत नाहीं, नव्हे काय? अधिभौतिक तापापासून अनाथांस मुक्त करण्याची खटपट करणें हें तर चांगलेंच! पण आधिदैविक व अध्यात्मिक दुखांचा आवेग कमी करण्याचें प्रयत्न करणें हें जास्त श्रेयस्कर नव्हे काय? एवंच दानपद्धति मनःशुद्धि करणारी खरी; पण हल्लींच्या आपल्या धर्मभ्रष्ट कालांतील आमची पद्धति कामना व अभिमान वाढविणारी होऊन पुनः तापत्रय वाढविणारी मात्र झाली आहे.

असो; भगवान म्हणतात तशी दानपद्धति सुरू झाल्यास आपल्या स्वतःचें व स्वेतरांचें चित्त सुनिर्मळ होऊन मोक्षाची वाट सुलभ होईल यांत कांहीं शंका नाहीं. आतां तिसरें कर्म राहिलें तें यज्ञात्मक कर्म होय. यज्ञ म्हणजे आपल्या स्वतःच्या साक्षात् परोक्ष कर्मानें प्राप्त झालेल्या संपत्तीचा विनियोग करणें म्हणजे ती संपत्ति विश्वव्यवस्थापक ह्मणून ज्या देवता मानिल्या आहेत त्यांस अग्निद्वारा अर्पण करून ऋणमुक्त होणें होय. हें याज्ञिककर्म तर प्रस्तुतकालीं प्रायः लुप्तच झालें आहे. तेव्हां त्याविषयीं येथें विचार करण्याचें कारण नाहीं. केवळ इतकेंच ह्मणावयाचें कीं समकालीन कांहीं आपन्न प्राण्यांस सहाय केलें असतां जर मनःशुद्धि होते, तर सर्वकालीन व सर्वस्थलीन प्राण्यांचा योगक्षेम अधिकारानुसार चालविणाऱ्या देवतांस तुष्ट करण्याचा प्रयत्न निर्मळ मनानें केला असतां आपली चित्तशुद्धि जास्तच निर्मळ होईल. मग ही तुष्टि पूर्वप्रणीत हवनादिरूपानें करा किंवा मोठमोठालीं धर्मालयें विद्यालयें, रुग्णालयें अगर प्रदर्शनालयें काढून करा, फलश्रुति एकच आहे.

असो; तेव्हां **हीं चित्तशोधक कर्में प्रत्येकानें केलीं असतां त्याची मोक्षयात्रा सुलभ होईल म्हणून या कर्मांचा त्याग करूं नये आणि नित्य-कर्मांचा त्याग तर मुळींच उपयोगी नाहीं, हें भगवन्मत होय.** वेदविहित नित्यकर्मांचा त्याग केला असतां म्हणजे तीं कर्में करण्याचें टाकून दिलें असतां होणारा त्याग **तामस** होतो. हा त्याग मोहप्रेरित होतो, अज्ञानप्रेरित असतो, म्हणून याला **तामस त्याग** म्हटलें. गप्पा मारायला बसलें असतां संध्योपासना अजीबात विसरून जाणें याचें नांव तामसी त्याग होय. सद्यःस्थितीस लागूं असणारीं अशी असलीं आणखी अनेक उदाहरणें देतां येतील. असो; हा अज्ञान-जन्य त्याग आहे. **राजस** त्याग म्हणजे नित्य अगर नैमित्तिक कर्म करितांना शरीरास अगर मनास आयास होतात, म्हणून तें तें कर्म करावयाचें नाहीं हा होय. क्षणभंगुर शरी-राला दुःखं होऊं नये, म्हणून परमेश्वराकडे नेणाऱ्या कर्मांचा त्याग करावयाचा, हा राजस त्याग होय ! गणित शिकण्याला भारी आयास पडतात म्हणून गणिताचा नाद सोडून देऊन परीक्षा बुडवावयाची याला **त्याग** कोण म्हणेल? म्हटलेंच तर तो राजस त्याग आहे असें म्हणावें. पण प्राप्त झालेलें किंवा धर्मविहित असलेलें कर्म सुख-कर असो वा दुःखकर असो, सुकर असो वा दुष्कर, कोणताही संशय मनांत न ठेवितां धीर व सुज्ञ पुरुष वासना व अभिमान **ह्या द्वयींचा त्याग करून** तें प्राप्त कर्म करितो तो **खरा त्यागी** होय. कर्म करावयाचें पण वासनेचा व अभिमानाचा स्पर्शही होऊं द्याव-याचा नाहीं, याचें नांव सात्त्विक त्याग ! हाच खरा त्याग होय. कारण पहा कीं, देहधारी व देहाभिमानी पुरुषाला कर्म–त्याग समूळ व सर्वथा करणें अशक्यच आहे. तेव्हां कर्म करून कर्मफलाचा त्याग करणें म्हणजे नित्य व यज्ञदानादि कर्में निष्कामत्वानें करून आपलें चित्त शुद्ध करून घेणें हें जीवाचें मुख्य व त्याच्या आटोक्यांतील काम आहे आणि तें काम ह्या सात्त्विक त्यागानें साध्य होतें. कापिलसांख्य व आधुनिक कांहीं वेदांती यांस असें वाटतें कीं, सर्वांचें जीव सारख्याच योग्यतेचे आहेत. एक कर्म सोडून दिलें कीं प्रत्येकास ज्ञानाचा अधिगम होईल. पण हें मत खोटें आहे. प्रत्येक पुरुषाच्या जीवाची आत्मिकस्थिति भिन्न असते व ही भिन्नता नित्य व यज्ञदानादिक कर्में केल्याशिवाय व आपलीं इंद्रियें विषयलोभशून्य केल्याशिवाय मोडावयाची नाहीं. म्हणून हीं कर्में स्वतःकरितां अगर लोकसंग्रहासाठीं कांहीं कालपर्यंत केलींच पाहिजेत. **चित्त-शुद्धि झाली व त्या चित्तशुद्धीचें खरें स्वरूप आपल्या सहचाऱ्यांस कळलें व वळलें म्हणजे कर्म करण्याचें कारण नाहीं.** या सिद्धांतान्वयें सदैव कर्मपूजा करणाऱ्या कर्मठांचेंही मत निराकृत झालें. **'मी पूर्ण आहें,'** असा ब्रह्मप्रत्यय अभंग झाला व हा प्रत्ययही सर्वथा मावळून ज्ञानरूप झालें म्हणजे कर्म संपलें. तोंपर्यंत **कर्म केलें पाहिजे** आणि **फल टाकिलें पाहिजे**, हा खरा त्याग होय. असल्या त्यागी पुरुषाला म्हणजे आशाशून्य व अभिमानशून्य जीवाला तें सात्त्विकत्यागपूर्वक केलेलें कर्म मुळींच बद्धक होत नाहीं. मात्र जे आशा व अभिमान न टाकणारे जीव आहेत

त्यांस त्यांच्या कळकट चित्तानें प्रेरिलेलें कर्म बद्धक होऊन तें त्यांस कर्मफलयोग्य स्थिती भोगावयास लाविते. सारांश, उपाधिग्रस्त चित्तानें केलेलीं कर्में बद्धक होतात आणि निर्मळ चित्तानें केलेलीं कर्में विमोचक होतात. हीं संसारविमोचन करणारीं कर्में सात्विकत्यागात्मक असतात. हीं कर्में अशा व्यवस्थेनें **करणें** हाच संन्यास होय. कर्मफलत्याग व कर्मसंगत्याग, हे दोन त्याग खंबीर असले ह्मणजे संन्यास सिद्ध होतो. एवंच केवलाद्वैत वेदांत **कर्मत्याग सांगत नाहीं तर कर्मफलत्याग** व **कर्मसंगत्याग विहित करून कर्माचरणानें कर्मसंन्यासाचें** फल मिळतें असें सांगतो. पांचव्या अध्यायाच्या प्रारंभीं हाच विषय आहे. असो; गीताभक्तांनीं विशेषतः लक्ष्यांत ठेवावयाचें काय तें सांगतो. प्रत्येक जीवाला मी देह, मी इंद्रियें, मी मन, मी बुद्धि, किंवा हीं सर्व मीच आहें, अशी अज्ञानजन्य भ्रांति असतें व त्याचप्रमाणें मला कर्तृत्वसामर्थ्य आहे अशी भ्रांति असते. तसेंच **मला** अमुक विषय मिळाला तर मला सुख होईल, अमुक विषय मला दुःख देईल अशी आशा किंवा भय असतें. हें भ्रांतिपटल दूर करण्यासाठीं व ही अशा अगर भय दूर करण्यासाठीं निष्काम व निःसंग कर्म सांगितलें आहे. विहितकर्मानें हें भ्रांतिपटल दूर होईल व आशाभयांची दुक्कल नष्ट होईल. पण केव्हां? जेव्हां दुसऱ्या व इतर अध्यायांत सांगितल्याप्रमाणें मी देहादिभिन्न आहे अशी ठाम खातरी होईल व 'आशा विस्तृत करून ती पूर्ण करावी व सुखोपभोग घ्यावा' हें, अज्ञान दूर होऊन फलाशा व सुखाशा नष्ट केली तरच खरें समाधान होणार असा निश्चय होईल, तेव्हां सर्व अज्ञान नष्ट होईल. मी देहादि भिन्न आहे हा प्रत्यय क्षणोक्षणीं येतो तरी अज्ञान कायम राहतें. याला कारण पूर्वकर्मानें सिद्ध झालेली आपली जीवदशा होय. हिला सुसंस्कृत करावयाचें असल्यास शास्त्रांचा, (जीवांचा व जीवातीतांचा अनुभव संग्रहित केलेल्या ग्रंथांचा) एकनिष्ठ पाठ केला असतां आपल्या स्वप्रत्ययाला बळकटी येऊन कर्तृत्वाचा अभिमान विगलित होतो. फार लांब कशाला? नुसत्या आधुनिक अनुभवसिद्ध शास्त्रांचें वरवर अवलोकन केलें तरी जीवाची दुर्बलता अथवा दुबळेपणा स्पष्ट होऊन "ज्याला आपण 'मी' असें नांव देतों, तो कर्ता नाही" हें स्पष्ट होईल.

हाच विषय १३ व्या व १४ व्या श्लोकांत उपसंहारजन्य जो वेदांत त्याच्या प्रतिप्रस्थापनेमध्यें सहज आला आहे. भगवान् ह्मणतातः कर्मसंपादक अशीं पांच कारणें अथवा कारणपंचक कोणतें आहे तें पहा. सुखदुःख, रागद्वेष, इत्यादि द्वयींचें आश्रयस्थान जें शरीर तें एक कारण; तसेंच 'मी अमुक' असा अभिमान धरणारा हें दुसरें कारण; तसेंच (३) अंतर्बाह्य ज्ञानेंद्रियें (४) कर्मेंद्रियें आणि (५) विश्वकर्म. हीं तीन मिळून पांच कारणें होत. यांच्या संहतीशिवाय एकही कर्म सिद्ध होऊं शकत नाहीं. उपभोगजन्य सुखदुःख अगर रागद्वेषांचें अधिष्ठान जें शरीर तें असल्याशिवाय, सारांश प्रेरकांच्या स्थानाच्या अभावीं, कोणतेंच कर्म होऊं शकत नाहीं. याचप्रमाणें कर्तृत्वाभि-

मान व ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें असल्यावांचून कर्मसिद्धि होणें नाहीं. ह्या गोष्टी आबालवृद्धांस विदित असतांही त्यांच्या हातून प्रमाद होतो व नास्तिक लोक 'शरीरच सर्व कर्में करितें,' नैय्यायिक 'कर्ता जीव कर्म करितो,' बौद्ध 'इंद्रियें कर्म करितात,' आणि सामान्य लोक दैवावर भिस्त ठेवितात, हा काय लहान चमत्कार आहे ? हें सर्ववादी अप-सिद्धांती किंवा एकदेशी—सिद्धांती आहेत, हें स्पष्टच आहे. असो; आतां दैव म्हणजे काय ? याचा विचार करून पुढें जाऊं.

## दैव म्हणजे काय ?

५. दैवावर इतकें लिहिलें गेलें आहे, ह्या दैवाच्या वादासंबंधानें इतकी भवति व न भवति झाली आहे, कीं वरील विषयमूलक वादग्रंथांचा नुसता नामनिर्देश करीत बसलों तरी सुद्धां प्रस्तुत ग्रंथासारखे अनेक ग्रंथही पुरणार नाहीत ! श्रीमद्भग-वद्गीतानुषंगानें मला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, एकंदर विश्वांत म्हणजे इतर सर्व जगांत व पृथ्वींत ( सर्व खंडांत ) जीवांचें व सृष्टिशक्तीचें अव्याहत कर्म चाललें आहे; **त्या सर्वांचा संग्रह म्हणजे दैव होय.** आपलें कर्म तत्तत्कालीन फलोन्मुख विश्व-कर्माला अनुकूल असलें म्हणजे आपल्यास सुखप्रद अशी कर्मसिद्धि होते व प्रतिकूल असलें म्हणजे विपरीत प्रकार होतो. ह्या फलोन्मुख असणाऱ्या ( प्रायः आपल्या सम-कालीन व समस्थलीन असणाऱ्या, कालविशिष्ट व स्थलविशिष्ट विश्वकर्माला दैव असें म्हणावें. आतां ज्या चाणाक्ष लोकांस विशिष्ट विश्वकर्माचा ओघ कसा वाहत आहे, हें चांगलें समजतें त्यांस सदोदित विजयप्राप्ति होते व ज्यांस हा आढावा काढितां येत नाहीं ते लोक सामान्यतः फसतात. केव्हां केव्हां आकस्मिक रीतीनें दुःखाघात अथवा सुखावाप्ति होते हें खरें; पण सर्व पूर्वकारणांचा पूर्ण विचार केला असतां अकस्मिकत्वाची अकस्मिकता विलुप्त होते हेंही खरें आहे. आतां 'अ' स विनाकारण सुखावाप्ति व 'आ' ला विनाकारण दुःखप्राप्ति कां होते हा फलमीमांसेंतील प्रश्न आहे, कर्मकारणमीमांसेचा प्रश्न नव्हे. सारांश, आधुनिक शास्त्रांमध्यें Other things being equal ( दुसऱ्या सर्व गोष्टी यथास्थित आहेत असें गृहीत धरल्यास, म्हणजे विश्वकर्म अनुकूल असल्यास ) असें ज्ञान-पूर्वक म्हणण्याचा जसा अवश्य परिपाठ पडला आहे, त्याचप्रमाणें प्रेरकांचें (wills) अधि-ष्ठान शरीर, अभिमानी जीव, इंद्रियसामुग्री इत्यादिकांचा संग्रह असला तरी त्यांत विश्वकर्माचा अंतर्भाव करणें अत्यंत इष्ट आहे; असें भगवंतांनीं दर्शविलें आहे. ( सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेः ज्ञानवानपि । अ० ३ श्लो. ३३ ) हें विश्वकर्म देवसाक्षीनें सजीव व निर्जीव भूतां-कडून होतें, म्हणून याला दैव म्हणावयाचें. असो; कोणतें सूक्ष्म किंवा असूक्ष्म असें कायिक, वाचिक वा मानसिकही कर्म घेतलें तरी ह्या पांचांचा संग्रह येथें अवश्य असतो. ह्यांतील एकाचा जरी अभाव असला तरी कर्म होणें शक्य नाहीं. तिसऱ्या, चवथ्या व इतर अध्यायांतून प्रसंगानुसार असें सांगितलें आहे कीं, कर्म म्हणजे दिलेल्या एका

क्षणाच्या पूर्व क्षणांत दृश्य विश्ववस्तूंमध्यें जी व्यवस्था अगर मांडणी असते, त्या मांडणी-मध्यें अगर व्यवस्थेमध्यें झालेले सर्व फेरफार होत. हे फेरफार अगर हा भिन्नभाव, ज्या पूर्वव्यवस्थेनें होतो ती या भिन्नभावाचें **कारण** आणि जो फेरफार अगर भिन्नभाव होतो तो **परिणाम** होय. तेव्हां कोणतेंही कर्म होण्यास या कारणपंचकाचा संग्रह अवश्य पाहिजे हें भगवंतांस सांगावयाचें आहे. शिवाय हें सांगण्याचा असा मतलब आहे कीं, केवळ, निर्गुण, निरंजन, निर्विकल्प जो आत्मा त्याचा अंतर्भाव या कारण-पंचकांत होत नाहीं. आत्मा कर्ताच नाहीं तेव्हां तो भोक्ताही नसतो व नसला पाहिजे; हें उघड झालें. अर्थातच इष्टानिष्ट किंवा मिश्रित फलावाप्ति ज्यांस होते ते जीव अज्ञानानें आशा व अभिमान ह्या द्वयीला वश झालेले असतात; ह्मणूनच होते. व ह्मणूनच कर्तृत्वभोक्तृत्वाचे अधिकारी आपण झालों असें त्यांस अज्ञानानें वाटून ते कर्म-बद्ध होतात. पण ज्ञानानें कर्तृत्वभोक्तृत्व नष्ट झालेले महात्मे कर्मबद्ध होत नाहींत. सारांश, संन्यासी अगर त्यागी लोकांस कर्म बद्धक होत नाहीं व इतरांस तें बद्धक होतें, याचें कारण त्यागी लोकांनीं-या साधु पुरुषांनीं-अज्ञानजन्य आशा व अज्ञानजन्य अभि-मान यांचा उच्छेद केलेला असतो आणि सामान्य लोक आशाबद्ध व अभिमानवश असतात हेंच होय. म्हणून ज्या ज्या आत्मिक अवस्थेमध्यें जीव असेल त्यानें आपली स्थिति कायम ठेवण्यास आणि ती वरिष्ट प्रतीची करण्यास जो प्रयत्न केला पाहिजे तो त्या अवस्थेचा अभिमान सोडून देऊन आणि विषयफलाचा अभिलाष सोडून देऊन मुमुक्षूनें शास्त्रविहित नित्यकर्म व पावककर्म केलें पाहिजे. असें कर्म पुष्कळ कालपर्यंत ह्मणजे आशासर्वस्व व अभिमानसर्वस्व नष्ट होईपर्यंत केलें पाहिजे. हा अभिमान व ही आशा नष्ट होत असतां, अगर अज्ञानदुर्गाचा विध्वंस चालला असतां, ऐक्यज्ञानाचा उदय होत येतो: आणि अज्ञान संपलें, संशय फिटला, हृदयग्रंथी तुटली कीं, ब्रह्मीं ब्रह्म सामावून जातें. हा ब्रह्मात्मैक्यभाव झाला म्हणजे मात्र कर्म संपतें. ह्मणून सांख्यांचें कर्मविरुद्ध मत व कर्मठांचें कर्मावश्यकताप्रतिपादक मत, ही दोन्ही आग्रही मतें आहेत, असें दाखवून भगवंतांनीं त्यांतील ग्राह्यांश मात्र घेतला, तो हा कीं, अज्ञा-नावस्था फिटेपर्यंत अगर अंतःकरण व बाह्यकरण शुद्ध होईतोंपर्यंत भागवतधर्मविहित कर्म करावें हा कर्मठ मताचा ग्राह्यांश घेतला, आणि अज्ञान संपलें म्हणजे कर्मच संपतें. तेव्हां 'कर्म करा, अगर करूं नका' असें सांगण्याची आवश्यकताच राहत नाहीं, हा सांख्य मताचा ग्राह्यांश घेतला. हीच भागवतधर्माची मुख्य रहस्यभूमिका आहे. 'आत्मा कर्ता आहे' हें नैयायिकांचें मत त्याज्य म्हणून अनादरिलें; पण अज्ञानस्थितींत जीव कर्ता आहे म्हणून नित्य व पावककर्माचा स्वीकार केला. **तो कर्ता आहे ह्मणून भोक्ता आहे** ही सांख्यमताची दुरुस्ती केली. त्याचप्रमाणें कारणपंचक सांगतांना चार्वाक, नैय्यायिक, बौद्ध व सामान्य लोक यांच्या मतांत जो सत्यांश आहे तेवढा घेऊन असें ठरविलें कीं, शरीर, कर्तृत्व-भोक्तृत्वाभिमान, करणद्वय ( ज्ञानेंद्रियें व कर्में-द्रियें ) आणि विश्वकर्म ह्या पंचकडीच्या सहाय्यानें कर्म होतें. पण कारणपंचकांत

आत्मा सत्तारूपाशिवाय जास्त नाहीं म्हणून तो येथें कारणात्मरूपानें नाहीं; अर्थातच तो कर्ता, भोक्ताही नाहीं, आणि शेवटीं अद्वैत मत हाच खरा सिद्धांत आहे, हें सांगण्यासाठीं तो अधिष्ठान नाहीं, तो कर्ता नाहीं, तो इंद्रियें नाहीं, तो चेष्टा नाहीं, व तो दैवही नाहीं असें १६ व १७ श्लोकांत ठरविलें. शिवाय, १४ व्या श्लोकांत कर्मकारणांची मालिका मांगतांना अधिष्ठानादिकांचा, दैवासह स्पष्ट उल्लेख केला, यावरून जीव आपली स्वतःची आत्मिकयोग्यता वाढविण्यास समर्थ आहे, स्वतंत्र आहे, असें सांगून जीवस्वातंत्र्याचा कायमचा निकाल केला. अशा प्रकारें ही श्लोकावली मोठ्या उपभोगाची, कर्मप्रोत्साहक, निराशाभंजक आणि शांतिसंपादक झाली आहे, आणि निष्काम कर्माचरणाचें महत्त्व सांगून ज्ञानाचें अवश्य जें नैष्कर्म्य तें व लोकसंग्रह आणि आत्मोद्धाराचें ज्ञान कसें प्राप्त करून देतें याची ही प्रणालिका सांगितली. त्याचप्रमाणें ज्ञानवादी लोकांच्या शास्त्रीय परंतु एकदेशी कल्पनांचा विचार करून त्यांतील ग्राह्यांश घेतला आहे म्हणून ही श्लोकावली फारच महत्त्वाची झाली आहे. असो; या श्लोकावलीतील अंतिम श्लोक अद्वैतमतप्रस्थापक आहे. ज्याची अहंकारबुद्धि म्हणजे कर्तृत्व—भोक्तृत्वबुद्धि—तसेच जीवत्व सर्वथा स्वतंत्र आहे हे विसरूं नये, अशा प्रकारची बुद्धि नष्ट झाली आहे व ज्याची बुद्धि विषयसंगानें अथवा कर्माचरणानें मुळीच लिप्त होत नाहीं-सारांश, आशा व अभिमान मिळून उत्पन्न होणारी अज्ञानजन्य दुःखें जेथें सर्वथा अस्तंगत झालीं, म्हणजे जो सर्वथा निरंजन आणि निर्विकल्प ब्रह्मस्वरूपाप्रत पावला, ज्याचें ब्रह्मतादात्म्य झालें, त्याच्या हातून जरी सर्व विश्वाचा नाश झाला-असें होणें माझ्या स्वतःच्या समजुतीनें शक्यच नाहीं म्हणा-पण प्ररोचनासाठीं मात्र गृहीत धरूं या—त्याच्या करवीं सर्व विश्वगत वस्तूंचा विध्वंस झाला तरी त्याला ह्या अनंत हत्यांबद्दल जबाबदार धरतां येत नाही किंवा त्यांबद्दल त्याला बंधनही प्राप्त होत नाहीं. ब्रह्मज्ञ पुरुषाला केवळ ब्रह्मदृष्टि प्रधान असल्यामुळे व वस्तुगत ब्रह्मस्वरूपाशीं तो तादात्म्य पावला असल्यामुळें लौकिकदृष्टीची कार्यकारण परंपरा तो मुळीच लेखीत नाहीं. व वास्तविकरीत्या तो बद्धही होत नाहीं. सर्वज्ञ सर्वगत आणि सदामुक्त झालेल्या म्हणजे सच्चिदानंदस्वरूपीं रममाण होणाऱ्या पुरुषांच्या हातून जीवदृष्टीचें कर्म होणेंच अशक्य आहे, तर तो **कर्मकर्ता** असतो कीं नाहीं व तो **कर्मबद्ध** होतो कीं नाहीं, हा वादच अप्रस्तुत आहे. लौकिकदृष्टीनें 'तो कर्मकर्ता व कर्मफलभोक्ता असला पाहिजे,' असें म्हणतां येईल व लौकिकसुखसंचय अगर दुःखसंतति-यांच्या प्रमाणानें व प्रामाण्यानें त्याला म्हणजे त्याच्या देहाला बक्षीस अगर शिक्षा मिळेल; पण देहाच्या सत्तारूपाशिवाय बाकीच्या सर्व देहस्वरूपापासून जो निराळा झाला त्याला त्या देहाची पर्वा मानण्याइतकें अवधान तरी कोठें असणार आहे ? असो; तेव्हां तात्पर्यार्थ हा कीं, मुक्त झालेला पुरुष कर्मातीत होतो. ( २ ) तसेंच ज्ञानात्मक कर्म भवतारक आहे आणि उपभोगात्मक कर्म बद्धक आहे, हें वाचकांना कृपा करून नीट समजून घ्यावें.

## ज्ञानादि आणि त्रैगुण्य.

६ असो, सारांश हा कीं, पाठीमागील श्लोकावली मोठ्या महत्वाची आहे असें सांगितलें, त्याचप्रमाणें १८–४८ ही श्लोकसंततीही अत्यंत महत्वाची आहे. येथें अनेक विषय व अनेक उपविषय यांचा संग्रह झाला आहे. ह्या सगळ्या विषयांचा यथास्थित विचार करून त्यांवर ठाम असा अभिप्राय देणें हें माझ्या अल्पशक्तीच्या बाहेरचें काम आहे. केवळ विचारप्रगतीस्तव मला उपयोगी वाटणाऱ्या कांहीं कांहीं विषयांचा उल्लेख करून ह्या श्लोकावलीचा मी निरोप घेणार आहें.

७ येथील १८ वा श्लोक तर विशेष महत्वाचा आहे. या श्लोकांत कर्मप्रेरक आणि कर्मसंपादक साधनें यांचा उल्लेख केला आहे. ज्ञान, ज्ञेय ( जाणण्याची वस्तु Object ) आणि परिज्ञाता ( जाणणारा, देहादिकांचा अभिमानी पुरुष Subject ) ही त्रिपुटी भारी महत्वाची आहे. ही त्रिपुटीच ज्ञानपोषक अथवा कर्मपोषक होते, हें कसें तें आतांच सांगतों.

पण अगोदर एका वादाचा निकाल करून मग पुढें जाऊं. यूरोपखंडांमध्यें उत्पन्न झालेल्या तत्वज्ञांचे ज्ञानदृष्टीनें तीन वर्ग होतात. कांहीं तत्वज्ञ असें म्हणतात कीं आपल्यास ज्ञेया ( Object ) चें मात्र साक्षात् ज्ञान होतें. परिज्ञाता म्हणजे जाणणारा ( Subject ) आपल्यास विदित होतो, तो केवळ ज्ञेयावरून परोक्षतः होतो. सारांश **ज्ञेयच काय तें एक आहे.** ज्ञान व परिज्ञाता ह्या मनोवस्था ज्ञेयापासून उत्पन्न झाल्या आहेत. या तत्वज्ञमन्यांस आपण प्रोफेसर सिज्विक प्रमाणें ज्ञेयैकवादी Materialists म्हणूं. यांच्या मतें बाहेरील पदार्थ ( Object ) च मन आदि उपकरणें उत्पन्न करून नंतर परिज्ञाता अगर Subject उत्पन्न करितो. मन आदि ज्ञेयांचेच प्रकार आहेत व ज्ञान होतें तें ज्ञेयांचेंच होतें. ज्ञान व परिज्ञाता हीं ज्ञेयाचीं, Matter ची, विश्वाचीं अपत्यें, कार्यें आहेत म्हणून कारणाचा Object चा, Matter चा विचार केला म्हणजे तत्त्वशोधनाचें काम आटपलें. ज्ञेयाचा मात्र हे विचार करणार म्हणून यांस Materialists चार्वाकपंथी, लोकायत म्हणावयाचें. मात्र चार्वाक आणि प्रस्तुतचे नास्तिक यांत विशेष इतकाच कीं, चार्वाकाचीं जीं कांहीं वाक्यें उपलब्ध आहेत; त्यांवरून तो पराकाष्ठेचा उपयोगी–भोगभोक्ता–अतएव ज्ञानद्वेष्टा असावा, असें मला वाटतें. पण अलीकडच्या पाश्चात्य नास्तिकांची स्थिति भिन्न आहे. ते ज्ञानभक्त आहेत. ( २ ) नंतर दुसरा असा एक पंथ आहे कीं जो 'केवळ **परिज्ञाता** ( जाणणारा Subject ) सर्व कारण आहे व हें अवाढव्य विश्व त्याच्या कल्पनासृष्टीचे तरंग आहेत' असें म्हणतो. बौद्धांमध्येंही असा एक पंथ होता. यांस ज्ञातृवादी अथवा Subjective Idealists म्हणावयाचें. 'मी आतां हीं अक्षरें लिहीत आहें, त्यांतील अक्षरें, लेखणी माझ्यासमोर

पुस्तकें आहेत ती, त्यांतील मजकूर, मी ज्या पेटीवर लिहीत आहें ती पेटी, व बसलों आहें ती खोली इत्यादि सर्व पदार्थ माझ्या कल्पनेनें मी उत्पन्न केले आहेत, मुळांत ते पदार्थ नाहीत, असें म्हणणारा हा पंथ आहे. याला वर सांगितल्याप्रमाणें Idealists म्हणतात. बौद्धांप्रमाणें हे ज्ञातृवादी सर्वच नेश्वरवादी नाहींत. असो; (३) आतां तिसरा पंथ ज्ञानवाद्यांचा. आपल्यास बाह्य पदार्थांचें स्वरूप गोचर होतें ते आपल्या मनोविकृतीनुसार होते. आपल्यास बाह्य पदार्थ काय आहे हे वस्तुतः समजत नाहीं व ज्या नेत्रादिक इंद्रियद्वारास मनाला पदार्थ गोचर होतात व बुद्धीला कारणविचार समजतो, तीं इंद्रियें, मन व बुद्धि हीं वस्तुतः काय आहेत हेंही समजत नाहीं. सारांश, बघतो कोण हे माहीत नाहीं, बघतो काय हे माहीत नाहीं, मात्र बघणें अथवा ज्ञान हें मात्र गोचर होते. हें बघणें अगर ज्ञान हें **करणसंघटनेवर अवलंबून** आहे; स्वयंभू नाहीं; म्हणून आपलें ज्ञान सापेक्ष आहे. निरपेक्षज्ञान आपल्यास नाही. एवंच जगांत सापेक्ष-ज्ञान् काय ते आहे असे म्हणणारा एक पंथ आहे यांस Relativists सापेक्षवादी म्हणतात. तसेंच, विषयज्ञान आणि विषयज्ञाता हीं **ज्ञानाचीं** दोन टोकें आहेत; ज्ञाना-शिवाय या दृश्य विश्वातही दुसरें कांहीं नाहीं असें म्हणणारा एक पंथ आहे, त्यास Abs lutists केवलज्ञानवादी म्हणतात. असे निरनिराळे पंथ जे अलीकडील मनूत ज्ञानविस्तार झालेल्या यूरोपखंडांत निर्माण झाले आहेत व पुढेही होतील, त्या सर्वांचा एका श्लोकार्धांत उल्लेख करून, हे सर्व पंथ एकदेशी आहेत असें भगवंतांनीं सुचविले आहे.

श्रीकृष्णाची म्हणजे उपनिषदांची कर्मोपस्थिति वरील सर्व वादांचा अंतर्भाव करून त्यांस एकरसत्व देते. अद्वैताचे, केवलाद्वैताचे, ज्ञेय (ज्ञानविषय) हें ज्ञानरूप आहे. यालाच हे ग्रंथ ब्रह्म असे म्हणतात. ब्रह्म हें ज्ञानरूप, ज्ञानच आहे, हें ज्ञान केवल (Absolute) आहे म्हणून त्याची ओळख दुसऱ्या कोणत्याही बाह्य साधनाने होत नाही. त्याला जाणणारे तेंही ज्ञान आहे, एवंच ज्ञान हा परिज्ञाता, ज्ञान हेंच ज्ञेय आणि ज्ञान हाच फलविपाक आहे. ही अशी स्थिति असणें याचें नांव अद्वैत अथवा केवलाद्वैत आहे. येथें ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता हे सर्व एकरूप असतात. सर्व प्रकारचे वाद येथें मिटतात. शून्यवाद हा सव्याघातक आहे असे समजून त्याचा विचार न करितां चार्वाकवाद, सौगतवाद, सांख्यवाद इत्यादि घेतले तरी ते सर्व एकदेशी आहेत. कोणी ज्ञेयवस्तूच ज्ञान व ज्ञाता यांचें स्वरूप निश्चित करितें, कोणी ज्ञातृस्वरूपानुरूप ज्ञेय-स्वरूप व ज्ञानस्वरूप निर्माण होतात, असें म्हणतात व कोणी 'ज्ञानच काय तें आहे,' ज्ञेय व ज्ञाता आहेत कीं नाहीं, असतील तर ते कोणत्या स्वरूपाचे आहेत, हें समजत नाहीं, असें म्हणतात. पण गीताकारांस या सर्वांचा अंतर्भाव करून अस्तित्व हें ज्ञान-रूप आहे, ज्ञान हें अस्तित्वरूप आहे आणि उभयतांही आनंदरूप आहेत, असें सांगा-वयाचें आहे हें केवलाद्वैत होय. व्यवहारांत मात्र ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता यांचा संग्रह झाला म्हणजे कर्मचोदना होते हें म्हणणें ठीकच आहे. ज्ञेयाचा ज्ञातावर, ज्ञात्याच

ज्ञेयावर व उभयतांच्या ज्ञानावर संस्कार होतो व नंतर म्हणजे या तिन्ही वस्तूंच्या प्रचोदनानें कर्म होतें. हें कसें तें मागें सांगितलेंच आहे. तात्पर्य व्यवहारांत काय किंवा परमार्थांत काय या तीन निरनिराळ्या दिसणाऱ्या वस्तूंचा संगम होतो तेव्हां व्यवहारांत कार्य उत्पन्न होतें आणि परमार्थांत तिन्ही वस्तूंला एकात्मता प्राप्त झाली म्हणजे केवलज्ञान होतें. एवंच एकदेशीपणा कोठेंही शक्य नाहीं.

भगवंतांनीं, विषयज्ञान, विषय आणि विषयज्ञाता **ही त्रयी कर्मप्रचोदक आहे,** यांशिवाय कर्मसंचार होत नाहीं, असें स्पष्ट सांगितल्या कारणानें गीतावाचक सहजीसहज अनुमान काढतील कीं, आत्म्याकडे कर्मप्रचारकाचें काम मुळींच नाहीं. हें अनुमान खरें आहे, हें आत्म्याविषयीं या भगवद्गीतेंत जेथें तेथें जे अनेक उल्लेख आले आहेत, त्यांवरून स्पष्ट होतें. भेदज्ञानास आरंभ झाल्यानंतर कर्मास आरंभ होतो. कारण भेदज्ञान परिच्छिन्न ( Finite ) अवस्थेमध्यें उत्पन्न होतें, आपण अल्पसत्ताक, अल्पज्ञ आणि अल्पसुखी आहों असें सज्ञान अवस्थेमध्यें वाटूं लागतें; पण त्याच वेळीं 'मी आहे' असें वास्तविक असणाऱ्या स्वस्थितीबद्दलचें भानही अंतर्भूत असतें. असो; ही स्थिति विचारकालीं असते तशीच सर्व काळ असावी म्हणजे निरुपाधिक स्थिति आपल्यास असावी अशी या श्लोकानें आशा उत्पन्न होते; व या आशेच्या समाधानार्थ कर्म करण्याची जी प्रवृत्ति होते ती जीवाच्या आत्मिकस्थितीच्या अनुसार होत असते. सारांश, पूर्वकर्मानुसार जीवाला जी बुद्धि व जी वासना, जीं अंतःकरणें व बाह्यकरणें प्राप्त झालीं असतील तदनुसार तो उपभोगाकडे, विषयाज्ञानाकडे किंवा आत्मज्ञानाकडे वळतो. असो; तेव्हां विषय, विषयज्ञान व विषयपरिज्ञाता हे कर्मप्रचोदक ( motives ) आहेत.

हें कसें तें पहा. आत्मा हा सर्व आहे, सर्वव्यापी आहे, सर्व सुखी आहे व सर्वकाळ आहे. व्यावहारिक समजुतीसाठीं मात्र हीं कांहीं विशेषणें घेतलीं आहेत. वस्तुतः तो निर्गुणच आहे. असो; सांसारिक जीवाचें पारमार्थिक स्वरूप आत्मात्मक आहे हें अनेक वेळ सांगितलें आहे. तेव्हां सांसारिक म्हणजे अज्ञानी जीवाला भीतीनें आपण एकदेशी, परिच्छिन्न आहों असें वाटतें आणि ह्मणून तो सर्वव्यापी, सर्वसुखी व सर्वकाळी होण्याचा प्रयत्न अहर्निश स्वज्ञानानुसार व स्वादृष्टानुसार करित असतो. तेव्हां कर्म प्रचोदक कोण ? ( १ ) विषय हा एक कर्मप्रेरक आहे. विषय पुढें आला म्हणजे त्याचें सुखकारी ( २ ) ज्ञान ( ३ ) विषय ज्ञात्याला होतें. हें **ज्ञान** झालें म्हणजे आपल्यास तें सुख हवें ह्मणून **ज्ञाता** त्या विषयाचा उपभोग घेण्यासाठीं **कर्म** करितो. उघडच आहे कर्माचे उत्पादक ज्ञेय, ज्ञान, आणि ज्ञाता हे होत. ज्ञात्याचें ज्ञान पूर्वसंस्कृतीवर अवलंबून असतें. उत्तम संस्कृति असल्यास निष्काम कर्मांचा व शास्त्रीय ज्ञानाचा उद्भव होतो. कमी दर्जाची संस्कृति असल्यास सकाम

कर्मांचा व विषयोपभोगाचा उद्भव होतो आणि संस्कृति नसेल तर घातकारी कर्मांचा व उपभोगाचा जन्म होतो. व्यवहार संपला व पारमार्थिक संस्कृतीला आरंभ होऊन तिला परिपक्वता आलेली असली म्हणजे सकाम व्यापार बंद होतो, निष्काम कर्मांचा अतिशय होतो व केव्हां केव्हां कर्मही संपतें.

तसेच करणे ( Instruments ), कर्म आणि कर्ता हे कर्मसंपादक आहेत. करणें म्हणजे कर्मसाधनें चांगली वाईट असतील, त्याप्रमाणे कर्म बरें वाईट होते हें सर्वसंमतच आहे. पण कर्मसाधनांवरच सर्व अवलंबून आहे, कर्ता व कर्मांचे गुण हे अत्यंत गौण, किंबहुना शून्यवृत्ति असतात, असे आग्रहानें प्रतिपादन करणारा एक दुबळा पक्ष प्रस्तुतकाली उत्पन्न झाला आहे. 'परिस्थितिच चांगली नाहीं तर आमच्या येथें साधु, विद्वान, शोधकर्ते, राजकारस्थानी, लढवय्ये कोठून उत्पन्न होणार असे दीनरवानें कंठ फोडून ओरडणारा एक कर्मदुर्बळ पक्ष समाजाच्या अवनतींत अस्तित्वांत येत असतो. असो; तो पक्ष खरा नव्हे, व कर्मगुण व कर्ता हे प्रधान नसले तरी सहकारी आहेत हें सांगण्यासाठीं १८ व्या श्लोकाचे उत्तरार्ध आहे. ' 'आमच्या स्वाधीन कांहीं नाहीं, काय होणार तें पूर्वीच ठरून गेले आहे, आम्ही जीव ह्मणजे कालरात्रीनामक दंपत्यांनीं खेळण्यासाठीं घेतलेल्या पटावरील सोंगटी होत' असे हल्लींचा [illegible] झालेला आमच्या येथील 'दैववादी पक्ष' व युरोपातील Fatalist's नामक पक्ष ह्मणत असतो; हे मिथ्या आहे. कर्म व कर्ता ही करणांइतकीच प्रबलें आहेत व कर्मसंपादनास तिघांची आवश्यकता आहे असे सांगण्यासाठीं हें श्लोकार्ध अवतारिले आहेत. म्हणजे असेः कोणतेंही कर्मफल मिळविण्याला कर्म केलें पाहिजे व यथासांग कर्म होण्यासाठीं (मग ते कर्म वैदीक असो, शास्त्रीय असो वा व्यावहारिक असो) कांहीं तरी क्रिया, क्रिया करणारा जीव (यालाच कर्ता ह्मणतात) व इष्टफल मिळविण्यास अवश्य असणारीं उपकरणें यांचा संग्रह अवश्य झालाच पाहिजे. उपकरणे उत्तम असतील तर कार्य सिद्धि चांगली होईल, हें सांगावयास नकोच आहे. पण उपकरणें उत्तम असूनही त्यांचा उपयोग करणारा कर्ता नसेल किंवा कर्ता कुशल नसेल व त्याचप्रमाणें तो क्रिया करण्याला, उद्योग करण्याला, अनुकूल नसेल, तर उत्तम करणें असून उपयोग काय? कर्त्यांच्या कौशल्यावर व उपकरणांच्या उत्कृष्टतेवर कर्मांचा उत्कृष्टपणा निश्चित होत असतो; तथापि कर्त्यानें उद्योग केलाच पाहिजे. तसाच तो कुशल ही हवा. हिंदुस्थानांत ज्ञान मिळविण्याचीं साधनें उत्तम असतां व आमच्या पूर्व पूर्वजांनीं या साधनांचा उत्तम उपयोग करून आमच्याजवळ अपूर्व ज्ञानसंग्रह तयार करून ठेविला असतां केवळ केव्हां कर्ते पुरुषांच्या अभावामुळें व केव्हां कर्ते पुरुषांनीं उद्योग केला नाहीं म्हणून आमच्या येथील आधि भौतिक ज्ञानविषय ( वृक्ष, प्राणी, खनिजसंपत्ति इत्यादि ) शास्त्रीयविषय व आत्मिकविषय आह्मांस परकीय पुरुषांनीं केलेल्या परकीय भाषेंतील पुस्तकांवरून समजून घ्यावें लागे

आहेत; कारण काय ? कर्ते पुरुषांचा अभाव व ज्ञानविस्ताराची अप्रीति ! तसेंच, ( २ ) कर्ता असेल पण उपकरणेंच नाहींत, तरी कार्योत्पत्ति होणार नाहीं. सात्विक कर्ता असेल तर तो उपकरणें उत्पन्न करील; पण नसल्यातरी उपकरणांशिवाय कार्यसिद्धि होणार नाहीं. आणि ( ३ ) कर्ता व करणें आहेत, पण ती राजपुत्रांप्रमाणें 'स्वस्थ' बसणारीं आहेत, क्रिया करणारीं नव्हेत: असें असेल तरीही कार्योत्पत्ति व्हावयाची नाहीं. ज्ञानाच्याप्रगतीवर कर्ता, कर्म आणि करण यांची उत्कृष्टता वाढत असतें हें सांगावयास नकोच आहे. तात्पर्य, कोणत्याही कार्याचें संपादनाला कर्ता, कर्म व करण, हें तीन 'क' कार अवश्य हवेत.

या दोन त्रयींपैकीं 'ज्ञान, कर्म आणि कर्ता' या त्रयींचे गुणधर्म पाहून आत्मस्थितीची योग्यता ठरविण्याचा भगवत्संकल्प आहे. कारण ज्ञेय ( विषय ) आणि करणें यांस सात्त्विकादि गुण लागणें शक्यच नाहीं, आणि ज्ञाता ही 'ज्ञान व कर्ता' या जोडींत येतोच म्हणून या तिहींस वर्ज केलें आहे. ही योग्यता निश्चित करण्यासाठीं प्रकृतीचे घटक ( सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण ) घेऊन सात्त्विकज्ञान, सात्त्विक कर्म आणि सात्त्विक कर्ता, हे शब्द कोठें लावावे, हे सांगितलें. सात्त्विकज्ञान ह्मणजे आत्मैक्यज्ञान, पूर्णज्ञान ( Philosophic knowledge ) तत्त्वज्ञान होय. निरनिराळ्या दृश्य पदार्थांच्या अंतर्यामी एक वस्तु कोणती आहे. व सर्व पदार्थांस अर्थत्व देणारी सर्वसामान्य वस्तु कोणती आहे, हे ज्या ज्ञानाच्या द्वाराने प्रकट होतें ते सात्त्विकज्ञान होय. एकाच जातीच्या अनेक गोष्टी पाहून त्यावरून जो सिद्धांत अगर जे नियम तर्कशास्त्रद्वारा व अनुभवद्वारा सिद्ध होतात, त्या नियमांस शास्त्र ह्मणतात आणि अनेक शास्त्रांचे सिद्धांत ज्या ज्ञानानें अभंग व अव्यय असें स्वरूप घेऊन एकवट होतात, ते तत्त्वज्ञान, सात्त्विकज्ञान, ऐकात्म्यज्ञान, होय.

आसक्तिशून्य, मनोवृत्तिशून्य आणि कामशून्य मनोवृत्तीनें केलेलें शास्त्रविहित, कर्म सात्त्विक कर्म असतें. हें असलें कर्म ज्ञानपोषक व उद्धारक असतें ह्मणून त्याला सात्त्विक कर्म असें ह्मटले. खरे सात्त्विकज्ञान तेथील कर्मही सात्त्विकच असावयाचें; आणि या ज्ञानजन्य कर्माचा कर्ताही आसक्तिविरहित, निरभिमानी, व सुखदुःखातीतच असावयाचा; कारण प्रेरणाच सात्विक आहे. सारांश, सात्विकज्ञान, सात्विककर्म आणि सात्विककर्ता ही त्रयी इहलोकीं जीवन्मुक्त स्थितींतच दृश्य व्हावयाची. शिवाय हा सात्विक कर्ता धृति आणि उत्साह यांनीं सदैव युक्त असतो. हे गुण निराशेमध्यें नसतात, तर **आशाशून्य स्थितींत असतात.** कारण सुखदुःखांचें घोडें, मानापमानाचें गोवें, अहंकाराचे फांसे एकदां सुटले, तुटले, किंवा फुटले म्हणजे धृतीला खचविणारें, उत्साहाला मंद करणारें दुसरें काय आहे ? असो; तेव्हां मुमुक्षूनें दृढ हृद्‌ व शास्त्रसिद्ध नियमांनीं सात्विकज्ञान संपादन करून सात्विक कर्में सात्विक कर्तृत्वानें करण्याचा आरंभ करावा.

[४७१]

## राजसज्ञान, राजसकर्म, राजसकर्ता.

सर्वत्र भिन्नभाव आहे, वस्तुमात्र भिन्न आहेत, कोठेंच कांहीं सामान्यतत्व नाहीं, असें सांगणारें ज्ञान राजस होय. हें व्यक्तिविषयक ज्ञान होय. ज्ञानाची ही अत्यंत बाल्यावस्था आहे. सर्व पदार्थ परस्परभिन्न आणि 'मी जीव' सर्वांहून भिन्न, अशी या ज्ञानाची निरीक्षणपद्धति आहे. सर्वत्र वैषम्य आहे, सर्वत्र वैरभाव आहे, असें ज्ञान असलें ह्मणजे तेथील कर्मही सकाम आणि साहंकारच असतें. भेदभाव ह्मणजे 'मी-तूं-पणा.' 'मी सर्वश्रेष्ठ आहें' ही वृत्ति ह्मणजे अहंकार होय. पुनः; ज्ञेय माझ्याहून भिन्न, सुख माझ्याहून भिन्न, तेव्हां विषय हवे, सुख हवें, अशी इच्छा होणें याचेंच नांव सकामता होय. शिवाय सकाम कर्माला आयासही बहुत असतात. कारण, विषयापासून सुख होणार ही आशा कर्म करण्यास लाविते, त्या कर्माचे आयास, 'कर्म सिद्ध नाही झालें तर?' ही भीति दुःखद होय. पुनः; फल मिळालें व सुख झालें कीं तें सुख संपतें व दुसऱ्या विषयाची हांव असते, आला दुःखाचा फेरा! कर्म सिद्ध झालें नाहीं कीं दुःखच. एवंच सर्व दुःखमय आहे. तेव्हां मनाला केव्हांही शांतता नसते. सुख-दुःखादि दपल्यांचा अस्त झालेला नसल्यामुळें व त्यांपासून होणारा मनोविभ्रम नाहींसा करण्याचें सामर्थ्य बुद्धीला आलेलें नसल्यामुळें प्रत्येक कर्मांत सुखाची आशा व दुःखाची भीति पूर्णत्वानें कायम असतात. विषयांची क्षणभंगुरता अनुभवपूर्वक विचाराशिवाय समजत नाहीं. राजस कर्म व राजस कर्ता आणि राजस ज्ञान, या सर्वांत सुखदुःखांचा विचार करणारी तसेंच, आशा व भीति बाळगणारी मात्र बुद्धि असते, तत्त्वविचार करणारी नसते, म्हणून राजस कर्ता कामुक, लुब्ध, फलेप्सु, हिंसात्मक, मलीन मनाचा आणि हर्षशोकांस वश असणारा असतो. उघडच आहे. भोगप्रिय पुरुष कामुक, लोभी व फलाची इच्छा धरणारा असणारच. पुनः, भोग नियमित असतात; तेव्हां एका तुकड्यावर दोन तीन कुत्र्यांचें लक्ष असलें म्हणजे जसा भांडणास आरंभ होऊन हिंसात्मक कर्में होतात, तशींच भोगप्रिय पुरुषांच्या हमरीतुमरीत व्हावयाचीं! पुनः एकदां; भोग मिळाला ह्मणजे हर्ष आणि मिळाला नाही ह्मणजे शोक हे परिणाम भोगलुब्धाच्या मस्तकावर बसावयाचे! असो; तेव्हां **भेदज्ञान** असलें ह्मणजे परिच्छिन्नता येऊन अथवा परिच्छिन्न स्थितींत भेदज्ञान होऊन भोगेच्छा निर्माण होते आणि सर्व कर्म आणि सर्व कर्तृत्व दुःखात्मक होतें. वाचकांस हें सांगावयास नकोच आहे कीं, राजस ज्ञानाला विचारी स्वरूप मिळूं लागलें ह्मणजे क्रमशः सात्त्विक स्वरूप प्राप्त होऊन संसारी दुःखांचें नियमन होऊं लागतें.

### तामसता.

असो; तामसज्ञान, कर्म आणि कर्तृत्व ही त्रयी सदा जडकारी ( जडत्व देणारी ) व सदा दुःखकारी आहे. येथें विचार नाहीं, अनुभव नाही व पुनः परोपदेशही व्यर्थ

आहे. पण इतक्या तामसी अवस्थेंत अत्यंत रानटी लोक सुद्धां नसतात; मग आमचे कांहींसें सुधारलेलें म्हणजे माणसाळलेले हिंदुबांधव कोठून असणार? म्हणून तामसी गुणाचा येथें विस्तार करीत नाहीं.

आतां केव्हांही समाजामध्यें अत्यंत सात्त्विक अथवा जीवनमुक्तावस्थेंतील साधु पुरुषही थोडेच असावयाचे. भरणा, मोठा भरणा काय तो राजसज्ञानाचा, राजकसर्माचा व राजसकर्त्याचा असतो; मात्र कांहीं राजसांस सत्त्वाचा व कांहींस तमाचा कमीअधिक स्पर्श झालेला असतो. आमच्या देशाच्या हल्लींच्या स्थितींत येथें तमोविशिष्ट राजसकर्ते व तमोविशिष्ट राजसकर्म अतिशय व यामुळें आम्हांस प्रस्तुतसमयीं त्रिविधताप निर्घृण-पणानें पोळीत आहेत, ही जाळपोळ नाहींशी होऊन सत्वाचा अंश अधिक करावयाचा असेल, तर विश्वज्ञानाचा, शास्त्रज्ञानाचा व तत्वज्ञानाचा संचार आहे, त्यापेक्षां पुष्कळ पटीनें अधिक केला पाहिजे. ज्ञान, खरें ज्ञान, शरीराचा, मनाचा व बुद्धीचा उद्धार करणारें ज्ञान, अधिकारानुसार विस्तीर्ण होईल तर आमच्या येथें पुनः अष्टसिद्धि राबूं लागतील. इतकेंच नव्हे, तर परमेश्वर व परमेश्वराच्या विभूति या आर्यदेशांत माहेरघर म्हणून सुखानें व मोकळेपणानें एककालीं राहत व राबत असत, त्याही आपला अज्ञातवास सोडून देऊन पुनः आनंदानें राहूं लागतील. एकच गोष्ट अवश्य आहे, आणि ती ही कीं, येथें तत्वज्ञानाचा खरा फैलाव झाला पाहिजे; अथवा विषयाशेचा क्रमशः त्याग करून आपण ज्ञानदृष्टीनें स्वस्वरूपाकडे वळलें पाहिजे. तात्पर्य, 'मी ब्रह्म आहे' हें ज्ञानविज्ञान निदान या ज्ञानाचा श्रीगणेशा तरी अवतीर्ण झाला पाहिजे. एकमतानें व्यवहार व एक-मतानें परमार्थ वाहूं लागला कीं, ही आमची अवनतस्थिति ओहोटूं लागली म्हणून समजावें. हें होण्याला अहंकार सुटावयास हवा व वासना नष्ट व्हावयास हवी आणि अहंकारवासनाद्वयाचा नाश होण्यास अद्वैतीय तत्वज्ञान कळलें व वळलें, पाहिजे. एवंच अद्वैतज्ञानावर आमच्या स्वतःची, कुटुंबाची, जातीची, देशाची, जगाची व विश्वाची सुधारणा अवलंबून आहे. कर्मदृष्टीनें, ज्ञानदृष्टीनें, निष्काम कर्म करून ज्ञान वाढविणाऱ्या भागवत धर्मदृष्टीनें जो पुढें जाईल तो टिकेल, जो मागें पडेल तो फसेल आणि जडावस्थेंत शिरेल. असो; आतां भगवंतांनीं

## बुद्धि, धृति आणि सुख.

यांचे सत्वादि गुणानुसार यथाक्रम परीक्षण करून सात्विक गुणाचीच प्रशंसा केली आहे. सात्विक बुद्धि यथार्थ ज्ञान देऊन यथार्थ कर्म करविणारी, राजसी बुद्धि अनिश्चित ज्ञान देऊन व्यग्रमनस्क व व्यर्थ परिभ्रमण करावयास लावणारी, आणि तामसी बुद्धि निश्चयानें विपरीत ज्ञान देऊन अविहित कर्में करविणारी असते. ज्ञानाचा समजुतीशीं संबंध आहे आणि बुद्धीचा कार्य करण्याचे कामीं संबंध आहे. ज्ञानास (Intelligence)

आणि बुद्धीस ( Talent ) असें ह्मणावें. तसेंच, आत्मस्वरूपाकडे लक्ष्य ठेवून प्राणादिकाच्या क्रिया यथासांग करविणारी ती सात्विक, विषयफलाकडे लक्ष्य ठेवून धर्म, काम, अर्थ इत्यादिक पुरुषार्थांकरितां क्रिया करविणारी ती राजस, आणि क्षणभंगुर फलाकडे लक्ष्य देऊन सदैव दुःखात्मक कर्में करविणारीं ती तामसी धृति जाणावी. येथेंही मुख्य धोरण आत्मस्वरूपाकडे आहे. आणि आत्म्याला प्रसन्न करून प्रकट करविणारें तें सात्विक, विषयफल देऊन क्षणैक रमविणारें राजस व आत्मस्वरूपासंबंधें मोह उत्पन्न करणारें तें तामस सुख आहे, असा भगवदाशय आहे. येथेंही आत्मसुखासारखें सुख नाहीं असें सांगितलें आहे.

येणेंप्रमाणें ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति आणि सुख या कर्मप्रेरक व कर्मसंपादक पदार्थांचा विचार करून सत्व, रज आणि तम हे गुण भिन्नत्वानें अथवा मिश्र होऊन जीवाच्या शारीरिक पण विशेषतः मानसिकस्थितीचे घटक होतात, हें सांगण्यासाठीं ह्या ज्ञानादि कर्मप्रेरकांचा व कर्मसंपादकांचा येथें अवतार केला आहे. जीवाच्याच काय, पण विश्वगत सर्व पदार्थांच्या मागें कर्मचक्र लागलेलें आहे. पण जीवाला ' मी आहें ' असा स्पष्ट–निदान अस्पष्ट–तरी बोध असतो; ह्मणून जीवाच्या व विशेषतः मनुष्याच्या कर्मांचा विचार करूं लागतांक्षणींच, मनुष्याचें ज्ञान, त्याचे कर्तृत्व, त्याची बुद्धि, त्याची धृति व त्याची सुखकल्पना, यांचा–या विषयांचा–विचार अवश्यतःच प्राप्त होतो. एक कर्म शब्द उच्चारिला कीं त्याचा कर्ता, त्या कर्त्याचें ज्ञान, त्या कर्त्याचें तत्कर्मसामर्थ्य ( इच्छा-desire ), त्या कर्त्याची धृति ( will ), त्या कर्त्याला प्राप्त होणारें फल, इत्यादिकांचा विचार अवश्य केलाच पाहिजे. सारांश, जें दृश्य आहे, तेथें प्रकृति आपल्या गुणांसह वास्तव्य करून कर्मास उत्पन्न करीत असते. ज्ञानात्मक कर्म सात्विक असून उद्धारक असतें, सुखदुःखात्मक कर्म राजसी असून संसारांत घालितें, आणि अज्ञानात्मक कर्म तामस आणि अधोगर्तास नेणारें असतें. असो; हा कर्मविस्तार येवढ्याचकरितां सांगितला कीं, त्याच्या ज्ञानानें विहित कर्म कोणतें तें शास्त्रज्ञानपूर्वक कळावें आणि प्रथम षड्ध्यायींत सांगितलेल्या भागवती कर्मयोगसाधनानें चित्तशुद्धि होऊन मोक्षपदाला जाण्याचा मुमुक्षूला अत्यंत इष्ट असणाऱ्या पुरुषार्थाचा मार्ग स्पष्ट व्हावा.

## विश्वांतील मनुष्यविभाजन.

याप्रमाणें कर्ममीमांसा झाल्यानंतर अर्थातच कर्मवैषम्य अस्तित्वांत आणल्यासारखी दाखविणारी जी माया ( सृष्टिव्यवस्था व वर्णव्यवस्था, ) तिच्या संबंधानें विचार करणें इष्ट झालें. भगवान् सांगतात कीं, येथें जो जो ह्मणून प्राणी—विशेषतः मनुष्यांचा विचार कर्तव्य आहे ह्मणून मनुष्यप्राणी—जन्मास आला, तो आपल्या पूर्वसंचित कर्मानुसार स्वस्वभाव धारण करून जन्म घेतो. संसार अनादि आहे, तेव्हां कर्माला प्रारंभ

केव्हां झाला हें आपणासारिख्या परिच्छिन्न ज्ञानी प्राण्यांनीं विचारणें योग्य नाहीं. जन्म कर्मानें येतो व जन्मांत कर्म घडतें, पुनः जन्म येतो, असें हेंच रहाटगाडगें अखंड चालू आहे व जोपर्यंत बुद्धिजन्य विषयज्ञानाचें भान आत्मभिन्नत्वानें आहे, तोंपर्यंत जन्म कर्माचें चक्र सुरूच राहणार. याचा विचार पंधरावे अध्यायांत झालाही आहे, म्हणून त्या वरच हवाला देतो. असो; तेव्हां प्रत्येक मनुष्य जन्मतःच सत्त्व, रज आणि तम या गुणांचे अंश पूर्वकर्मानें मिळवून घेऊन येतो. *जन्मास येतांक्षणीं मनुष्याचें मन परीटघडी-प्रमाणें स्वच्छ असतें, असें कांहीं लोक ( मिल्ल इत्यादि पाश्चात्य तत्ववादी )* म्हण-तात, तें खोटें आहे. प्रत्येक जीव आपल्या स्वभावासह जन्मास येतो.. आईबाप व आपली जाति या स्वभावाला राहण्यास घरें म्हणजे शरीरें देतात व त्याचप्रमाणें इंद्रि-यांचें, मनाचें व बुद्धीचें सूक्ष्म घरही तयार करून देतात. पण यांत राहण्यास येणारा प्राणी स्वभाव घेऊन म्हणजे आपली पूर्वकर्मार्जित मालमत्ता ( स्वभावघटना ) घेऊन आपल्या स्वभावास योग्य अशा कुलांत, जातींत व देशांत जन्माला येतो. एवंच प्रत्येक मनुष्य हा कमीअधिक प्रमाणानें त्रैगुण्याचें कवच घेऊन येतो. या गुणांच्या कवचा-प्रमाणें **वर्णभेद** होतात.

## वर्णभेद.

मनुष्यजातींत चार वर्ण आहेत, हें विधान मागें एकदोन वेळ प्रसंगानुसार आलेलें आहे. ह्या वर्णांची घटना त्यांचे त्यांचे स्वभावमूलक जे गुण, त्यांअन्वयें परमेश्वरानें केली आहे. गुणाप्रमाणें कर्म असतें, हें आतांच सांगितलें आहे. पुनः एकदां ही सरणी सांगतो. पूर्वजन्मांतील व ह्या जन्मांतील कर्मानें मनावर अथवा जास्त शुद्ध रीतीनें बोलावयाचें म्हणजे कारणदेहावर कांहीं विशिष्ट संस्कार झाले म्हणजे कारणदेह मृत्युसमयीं आपल्या निरुपयोगी झालेल्या स्थूलदेहास सोडून देतो, व पुढें तो कारणदेह आपल्यास अनुकूल—म्हणजे आपल्या आत्मिक स्थित्यनुरूप कर्म करण्यास अनुकूल—असा देह शोधून काढून तेथें जन्म घेतो. *ह्या नवीन देहप्रवेश स्वभावास अनुरूप असा असतो.* तेव्हां पूर्वसंस्काराप्रमाणें जन्म येथील जन्मामध्यें जीं सूक्तासूक्त कर्में आपण आपल्या स्वभानुसार व आपल्या स्वातं-त्र्यानुसार करितों त्याप्रमाणें कारणदेहावर संस्कार होतात, आणि त्या संस्कारास म्हणजे स्वभावास अनुरूप असा जीर्ण झालेला वर्तमान देह नसल्यामुळें तो जुन्या वस्त्राप्रमाणें फेंकून देऊन जीव हा नवा घेतो म्हणजे त्याला पुनः जन्म येतो. पूर्वजन्मसंस्कारांस **'संचित कर्म'** असें म्हणतात व पुढें जन्म देण्यास सिद्ध होणारें त्याला **'क्रियमाण'** असें म्हणतात. असो; तेव्हां कर्म-जन्म-कर्म-जन्म, अशी ही आवर्ताची यात्रा आहे. कर्माप्रमाणें फल व फलाप्रमाणें कर्म हाच कर्माचा सर्वसाधारण नियम आहे. अमुक मनुष्य अमुक प्रसंगीं काय करील हें आपणांस त्याच्या स्वभावाची पूर्ण माहिती असेल तर सांगतां येतें, हें या नियमाचें परिपोषक उदाहरणच होय. असो; या जन्माबरोबर आलेल्या स्वभावाच्या निकषानें ( test ) मनुष्यांचे चार विभाग करितां येतात.

१. जेथें सात्विकगुणाची पूर्ण अथवा पूर्णकल्प वसति आहे, जो स्वभाव सात्विक आहे तो ब्राह्मणस्वभाव होय. मागें सांगितल्याप्रमाणें या सात्विक स्वभावाचीं कर्में शम, दम, तप, सहिष्णुता, सरळपणा, ज्ञान, विज्ञान आणि आस्तिकता–हीं होत. हींच ब्राह्मणाचीं कर्में आहेत व तीं स्वभावसिद्ध आहेत. सारांश, **विषयसुखाचें अत्यंत वैराग्य**, ( २ ) **निष्काम कर्म**, आणि ( ३ ) आस्तिकभावासह **ज्ञानविज्ञान संपादन् करण्याची अमर्याद इच्छा**, हीं ब्राह्मण्याचीं मुख्य अंगें आहेत. भोगविराग, कर्तव्योत्साह आणि जिज्ञासा हीं ब्राह्मणांचीं–सत्वस्वभावाचीं–लक्षणें आहेत. 'तपोऽर्थमायुः' असें श्री भवभूति कविवर्यानें म्हटल्याप्रमाणें तपाचरण हे ब्राह्मण्याचें 'बिरुद' आहे. समाजामध्यें हे सात्विक लोक आपल्या जोरकस अस्तित्वानें सत्वगुणाचा उत्कर्ष करून 'सत्ययुगाचा' अवतार सुलभ करितात. समाजाची उन्नति सत्वगुणानुरूप ठरत असते. समाज अगर राष्ट्र हें एकवट, एक जीव, होण्याला सत्वगुणच कारण आहे. एवंच समाजांत जितके कर्तव्यतत्पर आणि ज्ञानसंवर्धक ब्राह्मण जास्त असतात, तितका तो समाज जास्त नीतिमान्, जास्त परहितकारी, जास्त ज्ञानी, जास्त ज्ञानोत्सुक आणि जास्त संघटित असतो. 'ब्राह्मण्याचें संरक्षण केलें म्हणजे विश्वाचें संरक्षण होतें,' असें आचार्यांनीं पहिल्या गीतेच्या उपोद्घातांत म्हटले आहे, तें वरील विवेचनान्वयें अक्षरशः व अर्थशः खरें आहे, असें दिसेल. असो; तेव्हां पूर्ण सत्वगुणांचा जो संघ त्याला ब्राह्मणवर्ण हें नांव प्राप्त होतें. हा पहिला वर्ण होय. गुणानें व कर्मानें हाच वर्ण सर्वश्रेष्ठ आहे.

( २ ) या सत्वगुणांत रजोगुणाची बरीचशी भेसळ झाली, अहंकार व वासना यांचा गौणरूपानें कां होईना, पण उदय झाला म्हणजे क्षत्रियवर्ण निर्माण होतो. या सत्वप्रधान रजोगुणांत शौर्य, तेज, धैर्य, दक्षता, धर्म्य-युद्धप्रियता, दानशूरता, आणि शासनसामर्थ्य हे प्रकार आविर्भूत होतात. 'मी महत्कार्यें करून कीर्ति मिळवीन, लोककल्याण करीन, शत्रूपासून माझ्या बांधवांचें संरक्षण, दक्षतेनें व शौर्यानें, करीन, आणि धनानें व दंडानें मी आपली सत्ता सर्वत्र प्रस्थापित करून लोकांस सुख देईन' अशा प्रकारचा अहंकार व असली वासना येथें प्रकट होतात. वर्णाचा क्षत्रिय हा स्थूल विषयसुखाचा म्हणजे कीर्तिसुखाचा, शासनसुखाचा, परोपकारजन्यसुखाचा भोक्ता आहे. याची वासना स्थूल विषयोपभोगाच्या लालसेनें मलीन झालेली नसते. याचा अहंकार ही 'मी सुंदर आहें, श्रीमंत आहें' असा नसून 'मी कीर्तिवंत आहें, मी जगकल्याणार्थ जन्म घेतला आहें' अशा प्रकारचा असतो. वरील सत्वगुणी ब्राह्मणांत हा अभिमानही नसतो व ही वासनाही नसते. ब्राह्मण लोककल्याण करितात व क्षत्रियही करितात; पण एकीकडे तें कृत्य सहज, निरभिमानानें व कामशून्यतेनें होत असतें व क्षत्रियाचें कर्म सहेतुक व साभिमान होत असतें. 'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी' हें श्रीरामदास समर्थांनीं शिवाजी महाराजास उपदेशिलेलें क्षत्रियाचें कर्म (कर्तव्य–) प्रेरक आहे,

आणि 'नाहीं स्वरूपीं मी ब्रह्म हा ताठा । वृत्तीच्या लाटा ।...स्फूर्ति, स्फुरण, स्फोरकता गाळुनि । निर्विकल्प स्वस्वरूप गाठा ।' हें श्रीमन्महाराज **ज्ञानरूप मार्तंड माणिक प्रभूचें मुमुक्षूंस** अनुशासन आहे. तात्पर्य काय कीं, ब्राह्मण हे सर्वोपरी ज्ञान-भांडार आणि शुद्धकर्मोपदेशक आणि क्षत्रिय हे ब्राह्मणोपदेशाचें ग्रहण करून कीर्ति-लाभासाठीं यशोदयप्राप्तीचीं कामें करणारे त्यांचे हस्तक होत. ब्राह्मण हे समाजाचें मुख व क्षत्रिय हे समाजबाहु होत असें पुरुषसूक्तांत म्हटलें आहे, तें सर्वपरीनें सत्य-सिद्धांतमय आहे. ब्राह्मण हे बुद्धि (Intelligence) आणि क्षत्रिय हे सत्कर्मेच्छा (Right will) होय.

(३) याच्या खालचा तिसरा वर्ग म्हणजे तमोमिश्रित रजोगुण हा होय. हा वैश्य वर्णाचा घटक आहे. येथें स्थूलविषयासंबंधें अहंकार व वासना आहेत. येथील ज्ञान स्थूलोपभो-गाच्या वासनेनें व देहात्मक अभिमानानें कलुषित झालेलें आहे. तथापि येथें रजोगुण प्रधान असल्यामुळें सुखोत्पादक व दुःखविनाशक कर्में करण्याची अत्यंत हाव आहे. सारांश वैश्यवर्ण हा स्थूलसंपत्तीचा उत्पादक वर्ग अथवा वर्ण आहे. कृषिकर्म (यांतच सर्व कृषिकलांचा अंतर्भाव होतो), गोसंरक्षण आणि व्यापार हीं यांचीं कामें होत. समाजांतील ब्राह्मण्य खंबीर असलें, क्षत्रिय जोरकस असून, आंतून बाहेरून समाज शांततासुख अनुभवीत असला म्हणजे कृषिकर्म, गोरक्षण व व्यापार हीं शारीरिक यात्रा सुकर करणारीं कार्यें उत्तम रीतीनें चालतात, नित्यशः कांहीं ज्ञानसंपादक ब्राह्मण निसर्गदेवीच्या आराधनानें तिला प्रसन्न करून तात्विकज्ञानांखेरीज शरीरसुखाचीं, शरीरवृद्धीचीं व शरीरसंपत्तीचीं अनेक साधनें प्रकट करीत आहेत, राजानुशासनानें सर्व समाज सुयंत्र चालत असून ज्याच्या कर्माचें फल त्याला मिळत आहे, अशी स्थिति असली म्हणजे पदार्थोत्पत्तीला व व्यापाराच्या भरभराटीला काय विचारावें ! ब्राह्मण्याच्या निश्चायक सात्विक वर्तनानें, क्षत्रियांच्या कीर्त्येक-लुब्धतेनें, या तमोमिश्रित रजोगुणाच्या वैश्य वर्णांतही सात्विक रजाचा व शुद्ध सात्विकाचा अवतार होऊन ह्या तृतीय वर्णाचें ज्ञान, नीति व स्वावलंबन वाढतात आणि समाजाच्या प्रगतीसही हा वर्ण एक कारण होतो. वैश्यांनीं उत्पादन करावें, क्षत्रियांनीं सोईकर कर घेऊन त्या त्या वर्णाचें व त्यांच्या मालमत्तेचें संरक्षण करावें आणि शरीरयात्रेपुरती मात्र दाक्षिणा-- गुरुदक्षिणा--घेऊन ब्राह्मणांनीं सर्व वर्णांस उपयोगी पड-तील अशीं निसर्ग देवाची शास्त्रें व आत्मस्वरूपाचे सिद्धांत प्रकट करून स्वाचरणानें समा-जाची उन्नति करावी, हा या त्र्यैवर्ण्याचा मुख्य उद्देश आहे. संपत्तीचें उत्पादन एका वर्णाकडे, संरक्षण दुसऱ्याकडे, आणि शारीरिक, मानसिक व आत्मिक उन्नति करणें हें तिसऱ्याकडे, असें भगवन्निर्मित श्रमविभाजन आहे.

(४) आतां, राहतांपैकीं शेवटचा वर्ण राहिला. हा वर्ण शूद्रांचा होय. अधि-भौतिक संपत्तीचें उत्पादन कसें करावें, किंवा संरक्षण कसें करावें अगर शास्त्राभ्यास कसा

करावा हें ज्याला मुळींच समजत नाहीं किंवा हें ज्ञान होण्याचा संभव नाहीं तो शूद्र होय. दुसऱ्याच्या देखरेखीखालीं, तो सांगेल तसें मात्र काम करणें, याचें नांव सेवा हें होय. येथें पूर्ण तामसीपणा यावा; पण मनुष्यांत पूर्ण तामसत्व क्वचितच सांपडतें, म्हणून या तामसीपणांत कांहीं थोडा रजोगुणांचा अंश असतो. स्वतःच्या अकलेनें कांहीं करावयास येत नाहीं, तो पक्का शूद्र होय. अर्थातच याचें कर्म म्हणजे सेवाकाराचें कर्म असतें. अत्यंत मतिमंद लोक शूद्रवर्णांत येतात. हे शूद्र म्हणजे चालकीं व हंसकीं यंत्रेंच होत!! कुदळीनें, तरवारीनें किंवा लेखणीनें वैश्य, क्षत्रिय किंवा ब्राह्मण अनुक्रमें आपआपला कर्मे करून घेतात, तशींच शूद्रांकडूनही करवून घ्यावयाचीं!. हे शूद्र एक प्रकारचीं करणें म्हणजे उपकरणेंच होत. ज्याला ज्ञान नाहीं, मर्दुमकी नाहीं, कलाकौशल्याचा अधिगम नाहीं, तो शूद्र होय. वरिष्ठ प्रकारच्या पुरुषार्थाची कल्पना नाहीं, अंगामध्ये कोणत्याही प्रकारचें सामर्थ्य नाहीं, स्वतंत्रपणानें एक लहानसाही धंदा ज्यांस चालवितां येत नाहीं. त्यांनी उदरपरित्राणार्थ सेवाधर्म करूं नये, तर काय करावें? शूद्र ते हेच होत.

याप्रमाणें ब्राह्मणादि वर्णांचें लक्षण, त्यांचे स्वभाव व त्यांचीं कर्मे यांचें विवेचन झालें. यावरून हें स्पष्ट होईल की, भगवंतांस वर्णभेद हे इष्ट होते; पण हे वर्णभेद गुणभेदावरून मात्र ठरवावे, असा त्रिकालज्ञ भगवंताचा निश्चय दिसतो. परमार्थाकरितां काय किंवा व्यवहारांत काय स्वभावाप्रमाणें कर्म कोणतें करावयाचें हें ठरत असेल, तरच सर्व समाजरथ सुयंत्र चालतो व चालेल. वैराग्य धाणलेल्या व ज्ञानलोलुप परोपकारी व्यक्ति जर ब्राह्मणत्व घटवूं लागल्या, तर अर्थातच समाजामध्यें त्यांची योग्यता आत्मिक दृष्टीनें श्रेष्ठ होऊन त्यांच्यावर सर्व समाज व त्याची उन्नति, यांची जबाबदारी येईल. वैराग्य हें ब्राह्मणाचें लक्षण आणि ज्ञानसंपादन व विस्तार हें त्याचें स्वभाविक कर्म असलें पाहिजे. आतां वैराग्य म्हणजे घरादारावर तुलसीपत्र ठेवून व अंगास राख लावून रानावनांत गेलें पाहिजे असा भाग नव्हे. अध्ययन व अध्यापन यांकरितां शरीर जिवंत ठेविलेंच पाहिजे म्हणून शरीरयात्रेसाठीं मात्र परिग्रह बाळगावयाचा, किंवा दया, औदार्य, परोपकार इत्यादि जे सद्विकार त्यांनीं प्रेरित केलेलीं कर्मे आपल्या हातून होऊन आपली चित्तशुद्धि व्हावी एतदर्थच स्त्रीग्रहण व मुलांचें संगोपन करावयाचें, हे सद्धेतु धारण करून त्यांनीं संसार केला तरी प्रत्यवाय नाहीं. हा त्यांचा संसार म्हणजे काम्यकर्मांचा त्याग आणि नित्यकर्मांचें सेवन होय. असो; तेव्हां असलें हें वैराग्य आणि ज्ञानसंपादनप्रसारार्थ आमरण अखंड प्रयत्न, जेथें स्पष्ट दिसतात, तेथेंच खरें ब्राह्मण्य वास्तव्य करीत असतें. कीर्तीसाठीं, परोपकारासाठीं धैर्य व शौर्य वाढविणारे दानशूर सत्ताधीश क्षत्रियच होत. यांचेही ठिकाणीं एक प्रकारचें वैराग्य असतें. हे केवळ खाण्यापिण्यासारख्या स्थूल विषयोपभोगासाठीं मात्र जगत नसून कीर्ति, परोपकार, शौर्य, सत्ता इत्यादि अस्थूल, सूक्ष्म, विषयोपभोगासाठीं जीव धारण करीत असतात. 'आपल्या समाजास स्वतंत्र करावें व त्यावर आपली सत्ता असावी' असें या निसर्गतःच शूर व

महानुभव पुरुषांस वाटत असतें. 'न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः' (भी ना मरणाला मी भीति मला मात्र अपयशाची हो!) किंवा (Death before dishonour) हें त्या क्षत्रियांचें परंपरागत कुलव्रत असतें. सारांश रजोमिश्रित सात्विक-गुण जेथें वास करितात, तें कुल किंवा तो समाज क्षत्रिय होय. यांचीं मुलें क्षत्रिय होण्याचा पुष्कळ संभव आहे, पण ते तसे होतीलच असा मात्र नियम नाहीं. कारण गुणानुसार वर्ण ठरतो. वैश्यवर्णानें उपभोगसंपत्ति वाढवावी आणि तिचा ब्राह्मणांनीं ज्ञानदृष्टीनें उपयोग करून घ्यावा, आणि क्षत्रियांनीं त्या संपत्तीचें संरक्षण करून ब्राह्मण-सहाय्यानें तिची ज्ञानमार्गद्वारा पुनः वृद्धि करून जीवितयात्रा सुलभ करावी; व आपणांस, वैश्यांस व यथासंभव शूद्रांस ज्ञानमार्गाला लावावें: आणि संपत्तिवैपुल्यानें हीन, दीन, विकलांग मनुष्यांची उपजीविका करवून नित्यशः आंतील व बाहेरील शत्रूंचा निःपात करावा अशी ही भगवंतांस इष्ट असणारी वर्णव्यवस्था आहे. या संस्थेचा पाया स्वार्थ-त्यागावर बांधलेला आहे व कळसही स्वार्थत्यागाचाच आहे. एवंच सर्व समाजसंस्था स्वार्थ-त्यागानें बद्ध झालेली आहे; आणि हा त्याग जोरावर असतो तोंपर्यंत समाजही जोरानें चालतो. असो; तेव्हां गुणाप्रमाणें वर्णव्यवस्था होते, ही नैसर्गिक सरणी भगवंतांनीं सांगि-तली. तेव्हां अशी शंका येईल कीं, या वर्णभेदानें कांहींस ज्ञान होतें व कांहींस होत नाहीं म्हणून शूद्रादिकांस भवसागरांतून तरून जाण्याला मार्ग नाहीं कीं, काय? याकरितां व कोठेंही पक्षपात नाहीं, हें दाखविण्याकरितां

## स्वधर्मच श्रेष्ठ आहे.

हें अभिनव तत्त्व सर्व जनांच्या उद्धाराकरितां श्रीभगवान सांगतात. आपल्यास पूर्वकर्मसंस्कारानुसार जो स्वभाव प्राप्त झाला, त्याला अनुरूप जीं कर्मे आहेत तीं एक-निष्ठेनें केलीं आणि त्या कर्मांचें कर्तृत्व व फल हीं दोन्हींही सर्वजनक आणि सर्वव्यापी जो श्रीभगवान् याला समर्पण केलीं ह्मणजे आत्मिक योग्यता वाढून सिद्धि अथवा चित्तशुद्धि प्राप्त होते, व पुढें ज्ञान होऊन मोक्षप्राप्ति होते. ब्राह्मणानें ज्ञानसंवर्धनाचें, क्षत्रियानें प्रजापालनाचें, वैश्यानें संपत्तिसंपादनाचें, व शूद्रानें परिचारकाचें व्रत धारण करून आपलें कर्तृत्व व फलवासना परमेश्वरास अर्पण करून टाकावीं. हें भक्तिपूर्वक अर्पण ह्मणजे श्रीपरमेश्वरपूजा आहे. **आपणांस स्वभावप्राप्त झालेलें विहित कर्म करणें हाच स्वधर्म आहे.** स्वभावव्यतिरिक्त आपण दुसरें कर्म केलें तर तो परधर्म होतो, आणि हा नेहमीं भयावह आहे; कारण तो चालविणें आपला स्वभाव नव्हे; आणि तो आपल्यास केव्हां गोत्यांत घालील याचाही नेम नाहीं. आतां आपल्या स्वभावानुरूप असणारें कर्म दुसऱ्याच्या दृष्टीनें कदाचित दोषमय असेल, पण तें स्वस्वभावास अनुकूल असेंच असतें; ह्मणून तें टाकून देऊं नये. कारण कर्म तेथून दुष्ट ह्मणजे अहंकारवासनाजन्यच असतें. तेव्हां हें स्वभावानुकूल कर्म त्यागून दुसरें घेतलें तरी तेंही दुष्टच असणार. सारांश, अग्नीची

उत्पत्ति धूमाशिवाय सामान्यतः होत नाहीं, त्याप्रमाणेंच ज्ञानमार्गाकडे जाण्यास आपल्यासारख्या अज्ञ मनुष्यांनीं आरंभ करणें तोही वासनाविशिष्ट कर्मे केल्याशिवाय होत नाहीं. आत्मदृष्टीनें प्रत्येक कर्माची योग्यता सारखीच आहे, म्हणून आपल्या स्वभावास अनुकूल असें कर्म करण्यास आरंभ करावा; आणि कर्मजन्यदोष आपल्यास लागूं नयेत म्हणून सर्व कर्म, त्याचें कर्तृत्व व त्याचें फल श्रीहरीस अर्पण करावें. तात्पर्य, कर्तृत्वाचा अभिमान व फलाची वासना त्यागण्याचा प्रयत्न परमेश्वरप्रार्थनापूर्वक करावा. कोणतेंही **कर्म वाईट नाहीं: पण आपली वासना व आपले हेतु वाईट असतात.** आतां, एका कर्मानें संपत्ति मिळते, दुसऱ्यानें सत्ता मिळते, व तिसऱ्यानें पूज्यता प्राप्त होते हें खरें; पण या संपत्तीचा, सत्तेचा किंवा पूज्यतेचा **उपभोग घ्यावा** किंवा **अभिमान बाळगावा**, अशी वृत्ति झाली की तें कर्म बिघडलें, तो कर्ता बुडाला आणि त्याचे हेतूसही दुष्टत्व आलें असें होतें. एवंच उपभोगतृष्णा दुष्ट आहे व ती वैश्यवर्णांत जास्त असते, क्षत्रियवर्णांत बरीच कमी असावी आणि ब्राह्मणवर्णांत तिचा गंध सुद्धां नसावा!! पण असें कोठें होते? सर्वत्रच उपभोगदृष्टीनें आपली सत्ता बसविलेली असते; यामुळें सर्वच कर्मे दुष्ट होतात. तेव्हां निदान आपल्यास करितां येईल, तें कर्म करून त्यावरील तरी अहंकारवासना सोडण्यास शिकावें. हाच खरा स्वधर्म आहे. यानेंच परमेश्वरी मार्ग सोपा होणार आहे. यानेंच समाजास संघटित स्वरूप येणार आहे. आपला स्वभाव कसला आहे हे आपल्यास, आपल्या निष्पाप मातापितरांस–निदान आपल्या हितैषी गुरूंस–आपल्या चालण्याबोलण्यावरून व आपल्या विचारांवरून कळतें. तेव्हां आपण कोण व आपला वर्ण कोणता, हे प्रत्येकानें निःपक्षपातपणानें ठरवून घ्यावें आणि मग ज्या वर्णाचे आपण ठरूं, त्या वर्णास विहित असणारी कर्मे करण्यास आपण लागावें. सामान्यतः आपल्या जन्मावरून आपला वर्ण ठरतो असें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. पण प्रस्तुतकालीं जन्मावरून वर्ण ठरविण्याला अनेक अपवाद येऊं लागले आहेत. हरभट्ट पटवर्धनाचीं मुलें क्षात्रकर्मकुशल निघालीं आणि पेशवेकुलांतील, क्षत्रियकुलांतील, रघुनाथराव भटाचा मुलगा–दिवटा बाजीराव हा–पराकाष्ठेचा भागुबाई झाला व त्यानें आपलें भट्टीप्रभुत्व गाजविलें!! असे आणखी हजारों दाखले देतां येतील. तेव्हां आपला जन्म कोठेंही झाला असला तरी आपण आपला स्वभाव पारखून घ्यावा. हें काम सोळा वर्षांच्या आंत खास करितां येईल. सारांश, आपली स्वभाव परीक्षा झाल्यानंतर आपल्या स्वभावास योग्य अशा विशिष्ट विद्येचा किंवा शास्त्राचा अभ्यास करून स्ववर्णविहित कर्म करावें. हा सृष्टिसंचाराचा (Economy of nature) भगवन्निर्मित नियम आहे. हाच स्वधर्म आहे. आपल्या वासनांप्रमाणें आपला वर्ण ठरतो हें विसरतां कामा नये. त्या वर्णांतही अनंत पायऱ्या असतात, अनेक प्रती लागतात; पण सामान्यप्रमाणांवरून आपला वर्ण ठरविण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. आतां, वर्णावर्णांतच रोटीबेटीव्यवहार व्हावे किंवा कसे हा प्रश्न विचारणीय आहे. तथापि, लोकमत अनिश्चितच आहे तोंपर्यंत ठाम असा सिद्धांत माझ्या सारख्यास सांगतां येणार नाहीं. रोटी-

बेटीव्यवहार हे प्रेमाचें दर्शक व जातीचें संवर्धक लक्षण आहे. यांत परमेश्वरी अथवा मोक्षाचा साक्षात् फारसा संबंध नाहीं. पुनः, देशाचारान्वयें हे संबंध घडत असतात व हा देशाचार एकदम मोडणें हें शास्त्रास व भगवंतांस इष्ट नाही. तथापि आचार नेहमीं फिरतात व प्रस्तुतचा समय तर असा आहे कीं, त्या रोटीबेटीच्या आचारास स्थिरता राहणें कठीण झालें आहे. तेव्हां एक विचाराचीं, एक अथवा अनुकूळ स्वभावाचीं व सम. कर्मातच कुशल असणारीं जोडपीं अधिकाधिक होऊं लागतील तर वर्णसंकर झाला आहे, त्याची पिछेहाट होऊन वर्णव्यवस्था जोरावेल, दंपत्यकलह नष्ट होईल, आणि समाजाचा रथ स्थिर होईल. समाज हा रथ आहे: परमेश्वर त्या रथांत बसला आहे, ब्राह्मण हे त्या-रथाचे सारथि आहेत, क्षत्रिय ह्या दोऱ्या आहेत, वैश्य हे अश्व आहेत आणि शूद्र हे चकें आहेत. हा समाजरथस्थ परमेश्वर स्वस्वरूपाला जावयाचा असेल तर–( हें व्याव-हारिक लिहिणें आहे. परमेश्वर सदैव स्वरूपांतच असतो. ) रथ चांगला हवा, सारथि-वर्ग कुशल हवा, दोऱ्या बळकट हव्या, घोडे उत्तम हवे आणि रथाचीं चाकेंही धड-भाकट हवींत. आपल्या समाजरथाची प्रस्तुत काय व्यवस्था आहे, हें ज्याचें त्यानें अजमावून पहावें आणि हा रथ भलत्या मार्गानें अधोगतीस लागला आहे, असें वाटेल तर समाजाच्या प्रत्येक अवयवानें आपलें कर्म कोणतें आहे, तें ओळखून घेऊन–आपला स्वभाव आपल्यापाशीं असतोच–त्याप्रमाणे शास्त्रविहित कर्म करण्यास लागावें. आपल्या शरीरयात्रेस लागणाऱ्या कर्माच्या चौपट ज्या वेळी प्रत्येक व्यक्ति शास्त्रविहित कर्म करूं लागेल व सामान्यतः सर्वांच्या कर्माबरोवर स्वार्थत्यागाचेही अमृत वर्षू लागेल, त्या वेळीं हा आपला समाज स्वधर्माच्या पायावर येईल: आणि एकदां समाज स्वधर्माभिमंत्रित झाला म्हणजे त्या रथाच्या पुढे अगर प्रत्येक व्यक्तीच्या घरीं अष्ट ऋद्धिसिद्धि राबूं लागतील हें सांगण्यास माझ्यासारखा अल्पमतीच हवा आहे काय ?

हा भागवत धर्म होय. स्वार्थत्याग हा या धर्माचा पाया आहे व या धर्माचा मुकुटमणिही तोच आहे. स्वार्थत्यागाची महति समजण्यास शास्त्राचें अवलोकन व तत्त्व-ज्ञानाची निदान शाब्दिक ओळख तरी हवी. नुसत्या नीतितत्त्वांनीं, राजकारस्थानाच्या गुह्य गोष्टींनीं, धर्माच्या पुण्याईनें किंवा विद्या, कला, शास्त्रें यांच्या अभ्यासानें स्वार्थ-त्यागाचें पूर्ण रहस्य कळावयाचें नाहीं. याला तत्त्वज्ञानाची, अद्वैततत्वज्ञानाची, केवलाद्वैत-तत्त्वज्ञानाची निदान शाब्दिक तरी ओळख हवी असते. याकरितांच म्हणजे ब्राह्मणासून तों थेट शूद्रातिशूद्रापर्यंत सर्वांस तत्त्वज्ञानाची थोडीशी तरी ओळख व्हावी म्हणून पुरा-णादि व भारतादि ग्रंथ प्रवर्तले आहेत. यांच्या योगें संसाराची अस्थिरता व दुःखमयता सर्वांच्या नजरेस व अनुभवास येऊन विमुक्त होण्यासाठीं स्वधर्मानुसार व आत्मिक-योग्यता वाढवून प्राप्त झालेल्या वरिष्ठ धर्मानुसार व त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार ते ते लोक स्वार्थत्याग करूं लागतात. असो; तेव्हां प्रत्येकाची चित्तशुद्धि करणारा जो भागवत-धर्म त्याची आज्ञा आपणांपैकीं सर्वांस अशी आहे कीं, **प्रत्येकानें आपला पूर्वकर्म-**

**संस्कृतस्वभाव पारखून घेऊन जो आपला वर्ण ठरेल त्या वर्णास विहित असें कर्म करावयास लागावें आणि अहंकार व वासना यांचा खराखरा त्याग परमेश्वरचरणीं करावा: या स्वच्छ आचरणानें चित्तशुद्धि होईल आणि आपली आत्मिक योग्यता ज्ञानपूर्वक व श्रेष्ठकर्मपूर्वक श्रेष्ठतर होऊन मोक्षाचा मार्ग सुलभ होईल. हा प्रत्येकाचा स्वधर्म आहे. इतर वर्णांचें कर्म करणें हा**–आपला स्वभाव अनुकूल नसेल तर–**परधर्म आहे.**

याप्रमाणें तिसऱ्या, चवथ्या व पांचव्या अध्यायांत कर्मयोग, ब्रह्मार्पणयोग आणि कर्मसंन्यासयोग, इत्यादि विषय आले. त्यांत कर्म शब्दाची सर्वांस समजेल अशी मीमांसा होणें राहिली होती, ती होऊन विहित कर्म करणें आणि तें परमेश्वरास अर्पण करणें हाच स्वधर्म आहे, असें ठरलें. शिवाय समाजपरिपोष व विश्वसंघटना–हीं याच स्वधर्मानें होणार असेंही ठरलें. पुनः जन्माबरोबरच आपण एक विशिष्ट स्वभाव आणीत असतो, या विधानानें नास्तिक व पुनर्जन्म न मानणाऱ्या सर्व पंथांचें निराकरण झालें. आणि शेवटीं आपली स्वतःची योग्यता स्वार्थत्यागानें व सात्त्विक गुणसंपादनानें वाढवून, मोक्षमार्ग दाखविणाऱ्या पंथाचें स्पष्ट दर्शन झालें.

### चित्तशुद्धीनंतर ब्रह्मप्राप्ति व तिचे उपाय.

वर सांगितल्याप्रमाणें स्वधर्माचरण झालें म्हणजे चित्तशुद्धि होते. ही शुद्धि पूर्णत्वानें झाली, स्वकर्माचें संबंधाचें अहंकारविलोप आणि वासनानिःपात झाले म्हणजे सर्वत्रच आसक्तबुद्धि होते. कोठेंही आसक्ति राहत नाहीं: मन, बुद्धि, प्राण, इंद्रियें आपल्या स्वाधीन राहतात; व सर्वत्र निस्पृहता प्राप्त होते. शास्त्रपठन, तत्वज्ञानश्रवण, स्वकर्मार्पणानें आलेली शांतता इत्यादिकांच्या योगानें विषयसंगावर व विषयवासनेवर शून्य पडून आपलीं अंतःकरणें व बाह्यकरणें आपल्या स्वाधीन होतात व मग तीं आपल्यास स्वस्वरूपाचे ठिकाणीं लावितां येतात. हीच नैष्कर्म्यसिद्धि होय. अथवा कर्मगंधापासून मोक्ष तो हाच होय. हा पांचव्या व अठरा अध्यायांतील प्राथमिक सप्तदश श्लोकांचा उपसंहार अठराव्या अध्यायाच्या ४९ व्या श्लोकांत आणिला आहे. पुनः सांख्य व कर्मयोगांचे एकदेशी अभिमानी व्यर्थ वाद करितात, त्यांचेंही समाधान यांत आहे. **कर्म केल्यावांचून चित्तशुद्धि नाहीं व ही चित्तशुद्धि मोक्षज्ञानाचा उपाय आहे, हें** विधान दोन्ही मतांतील सत्यांश भाग ग्रहण करून असत्यफल्गु टाकून देतें. अहंकारवासनात्याग हाच संन्यास होय. हा संन्यास सिद्ध झाला म्हणजे नीतीला, अंतःकरणांतील व बाह्य आचरणांतील तत्वांस खरें स्थैर्य येऊन नैष्कर्म्यसिद्धि अथवा कर्मबंधविमोचन सहजच होतें.

## विषयोपसंहार.

या श्लोकावलींत सर्व गीताशास्त्रार्थ सूत्ररूपानें, संक्षेपानें आला आहे. ज्ञानाची पराकाष्ठा जें ब्रह्म ( अ० २, २३, ७, ८ ) तें ( १ ) **ब्रह्म**, ( २ ) **आसक्तबुद्धि** ( २, ६, ४, ५, ६, १४, १५ इ. ) ( ३ ) **जितात्मत्व** ( ५, ६ ) ( ४ ) **स्पृहा-शून्यत्व** ( ३, ५, ६ इ. ) यांच्या साहाय्यानें ( ५ ) **संन्यासत्व** ( १८ प्राप्त होऊन **नैष्कर्म्यसिद्धि** होते व नंतर **ब्रह्मज्ञान** ( २, १३, १४, १५ व द्वितीय षडध्यायी इ० ) प्राप्त होतें. **५१ वे श्लोकांत पहिल्या व तिसऱ्या षडध्यायीचा अंत-र्भाव; ५२ मध्यें** ( २, ६, ७, ८, ९, १२, १४, १६; ) ५३ मध्यें ( ८, १६, इ. ) ५४ मध्यें ( ७, १४ व ७-१२ इ० ) आणि ५५ मध्यें ( ७ ते १२ व २, १३, १४, १५ इ० ) असा हा सूत्ररूपी उपसंहार आहे. ५६ मध्यें तोच विषय एका प्रसादात्मक श्लोकांत आणि आहे.

### ब्रह्मप्राप्तीस ध्यानयोग हें पहिलें साधन.

ब्रह्मप्राप्ति म्हणजे ज्ञानाची परानिष्ठा अथवा पराकाष्ठा होय. ही मिळविण्याचा पहिला उपाय **ध्यानयोग** आहे. याचा विस्तार ६ व्या अध्यायांत, ८ व्या व १२ व्या अध्यायांत झालाच आहे. आतां उपसंहाररूपानें सांगावयाचें म्हणजे इतकेंच आहे कीं, **निर्मळ** ( अहंकार व वासना यांनीं वियुक्त ) **बुद्धि** ( ही आतां ज्ञानमयच असणार ) ( २ ) ज्ञानदृष्टीनें **मनोनिग्रह**, ( ३ ) विषयोपभोगदृष्टीचा सर्वथा **त्याग** ( ४ ) उपभोगदृष्टि गेल्यावर अस्तंगत होणारें **रागद्वेष यांचा नाश** ( ५ ) वरील गोष्टी सिद्ध झाल्या म्हणजे सहजच समाजांत राहून सुद्धां येणारा व प्राप्त होणारा **एकांतवास,** ( ६ ) **मिताहारविहार** ( ७ ) **तनु, मन, वाणी यांची ध्येय वस्तूकडे नंद्रीः** इतकीं साधनें सिद्ध झालीं म्हणजे **पराकाष्ठेचें वैराग्य प्राप्त होतें: अहंकार, बल, दर्प** इत्यादि परिग्रहांचा पूर्ण त्याग होतो आणि ध्यानयोग सिद्ध होतो. या योगांत विषय-दृष्टीचें ममत्व नाहींसें होऊन उत्तम शांति प्राप्त होते आणि **ब्रह्मकल्पस्थिति मिळते.**

हा ध्यानयोग अति महत्वाचा आहे. हा ध्यानयोग नित्य हवा म्हणजे अखंड शांति मिळते. शांत पुरुष मोठ्या जत्रेंत असला तरी एकटाच असतो; कारण त्याचें चित्त ध्येय वस्तूंत लीन होऊन गेलेलें असतें. स्वस्वरूपाच्या ध्यानांत लीन झालेल्या पुरुषाचे आहारविहार नियमित असतात, त्याचे शोकमोह नष्ट झाले असतात, सर्व इंद्रियें दमन झालेलीं असतात, इत्यादि गोष्टी सहज, सहजरीतीनें, समजण्यासारख्या आहेत, म्हणून त्यांचा विस्तार येथें करीत नाहीं.

येथें कांहीं लोक योग्यास अरण्यवास, निराहार, मूकव्रतधारण इत्यादि अवश्य आहेत, असें म्हणतात. पण हें म्हणणें ठीक दिसत नाहीं. **विषय नाहींसे करून**

**विषयाशा नाहींशी करण्याचा प्रयत्न करणें** ह्मणजे तोंड दाबून धरल्यानें आह्मांस मौनव्रताचें पुण्य लागतें, असें **म्हणण्यासारखें आचरटपणाचें आहे.** श्रीभगवंतांनीं दुसऱ्या अध्यायाच्या ५९ वे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विषयाच्यामध्यें राहून निर्लेप राहणें हें अधिक श्रेयस्कारी आहे. नपुंसकानें ब्रह्मचारी ह्मणवून घेणें किंवा अठरा विश्वे दरिद्र घरीं नांदतें आहे अशा सुदामजीनें 'आपण सर्व चैनबाजीच्या वस्तूंचा त्याग केला आहे' असें ह्मणणें हें जितकें हास्यास्पद आहे, तितकेंच विषयांच्या राज्यांतून दूर जाऊन व मग अरण्यवास पतकरून 'आपण विषयाशा मारिली' असें ह्मणणें हास्यास्पद आहे. पुनः, मनाला विषयच हवे असतील, तर तें मन अरण्यांतही कल्पनासृष्टि उत्पन्न करून त्यांतच रममाण होऊन बसेल!! वायकांत राहूनही शुकाचार्य ब्रह्मचारी राहिले आणि अरण्यवास पतकरल्यानंतर नुसतें ऊर्वशीचें दर्शन झाल्याबरोबर विश्वामित्र ऋषिमहाराज कुतऱ्यासारखे निलाजरे झाले!! विषय नष्ट केल्यानें कांहीं थोडा चांगला परिणाम होईल कदाचित्, नाहीं असें नाहीं ह्मणत मी; पण **विषयाची निःसारता कळल्यानंतर जें विषयवैराग्य प्राप्त होतें त्याची योग्यता 'कांहीं आणीक' आहे.** तेव्हां 'नको सेवूं वन : नको गांवूं अन्न।' हा जो तुकाराम महाराजांचा उपदेश आहे तोच यथार्थ आहे. असो; विषयाची निःसारता करण्यास एक शास्त्रपठन आणि दुसरा, तत्वज्ञानाचें श्रवण, हेच उपाय आहेत. या साठींच अध्याय १३, १४, १६ यांची योजना आहे. या उपाया-नंतर ध्यानयोगाची महति उत्पन्न होते. ध्यानयोगाला पूर्णत्व येऊन पूर्ण शांतिसुख मिळूं लागलें म्हणजे **ब्रह्मीभाव** प्राप्त होतो. येथें सर्व शोक, सर्व मोह आशा विनष्ट होतात.

ध्येय वस्तूशीं एकाग्र एकतानता झाली, जिकडे तिकडे ध्येय वस्तुच दिसूं, भासूं लागली, म्हणजे अर्थातच सर्वत्र समदृष्टि होते, शत्रुमित्रभाव असंगत होतात, उच्चनीचपणा संपतो, आणि आत्मस्वरूप बुद्धिगोचर होतें. योगाचें काम येथें संपलें. पण हें काम होत असतां आपल्या वर्णज्ञानाप्रमाणें आपण जी ध्येय वस्तु धरिली असते तिचें स्वरूप विस्तीर्ण होऊन तिचे परिच्छिन्न गुण नष्ट होतात आणि एकच वस्तु ओतप्रोत भरलेली आहे, असा दृढ निश्चय होतो. हा निश्चय झाला, भेदभाव संपला, शत्रुमित्रभाव आटपला, रागद्वेष तुटला म्हणजे सर्वव्यापी, सर्वसाक्षी, दयाघन, सर्वज्ञ सर्वकल्याणगुणमंडित अशा परमेश्वराचें स्वरूप आपल्या बुद्धीस गोचर होऊन त्या मंगलस्वरूपावर आपली पराकाष्ठेची भक्ति दृढ होते. द्वितीय षडध्यायांत व तृतीय षडध्यायाच्या १५ व्या अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें परमेश्वराचीं सर्व रहस्यें आपल्या बुद्धीस (यांतच जाणणारी व करणारी अशा दोन्ही बुद्धींचा अंतर्भाव होतो) गोचर होतात, आणि आपल्यास अत्यंत इष्ट जो परमेश्वर त्याचें गुणसंकीर्तन करण्याचा अखंड व भक्तिपुरःसर छंद लागून परमेश्वराचे सद्गुण आपल्यांत अवतीर्ण व्हावे अशी बळकट इच्छा होते व कालानें ते गुण आपल्यास प्राप्त होतातही. याप्रमाणें देव एकच आहे असा निश्चय होऊन विमलचित्त झालेला मनुष्य देवाप्रमाणें वागूं लागतो. हीच पराभक्ति होय.

या भक्तीचा परिणाम काय होतो हें तृतीय षडध्यायीच्या उपसंहारभूत ५५ व ५६ श्लोकांमध्यें सांगितलें आहे. त्याचें रहस्य सांगण्यापूर्वी श्रीरामानुजादि एकेश्वरवादी लोकांचें एक तत्त्व सांगून ठेवणें इष्ट दिसतें. तें तत्त्व हें आहे. जीवाची भक्ति कितीही परमावधीची झाली ध्रुव, प्रल्हाद, इत्यादिकांसारखा तो उत्तम पराभक्त झाला, या भक्ताचें ज्ञान कितीही अमर्याद असलें, तरी श्रीपरमेश्वराचें तादात्म्यस्वरूप पराभक्तांसुद्धां प्राप्त व्हावयाचें नाहीं. देव आणि भक्त यांच्यामध्यें जो सेव्यसेवकभाव आहे तो अखंडमुक्तस्थितींत सुद्धां तसाच रहावयाचा; सारांश तादात्म्यस्थिति केव्हांही प्राप्त व्हावयाची नाहीं. तो ईश्वराच्या लोकीं जाईल, ईश्वराजवळ राहील, ईश्वरीस्वरूप प्राप्त करून घेईल, पण ईश्वरतादात्म्य कधींही पावणार नाहीं. तो मुक्त होईल, नित्यानंदांत तो असेल, पण तो ईश्वर होणार नाहीं. परिसानें लोखंडाचें सोनें होईल, पण लोखंडास परिसत्व कधींही मिळावयाचें नाहीं. हा केवलाद्वैतवादी लोकांचा सिद्धांत होय. ह्या सिद्धांतास प्रमाण काय? असें विचारल्यास हे आचार्य श्रुति, युक्ति आणि अनुभव इत्यादि प्रमाणें देतात. पण मला असें वाटतें कीं, या लोकांस श्रुतीच्या अर्थाची पुष्कळच ओढाताण करावी लागते. ‘अहं ब्रह्माऽस्मि’ ‘तत्त्वमसि’ ‘सर्वं खल्विदं ब्रह्म’ ‘ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति’ इत्यादि सिद्धांती महावाक्यांचा उत्तान व सहज अर्थ सोडून देऊन ह्या लोकांस अनर्थकारी अर्थाचें ग्रहण करावें लागतें. पुनः, ‘ज्याचें ध्यान आपण एकाग्रतेनें करितों, तेंच आपण होतों’ हा आर्यलोकांचा जो मानासिक शास्त्रीय सिद्धांत, त्यास हरताळ लागते आणि चिंतनसातत्यानें कीटकास कोळीपणा प्राप्त होतो हा प्रत्यक्ष अनुभवही व्यर्थ होतो. पुनः आणखी; सर्व तऱ्हेचें वैराग्य संपादन करून घेऊन जे आपण निष्कामबुद्धीनें परमेश्वराचें आराधन व ज्ञानाचें उपार्जन करितों, तें केवळ सुखाच्या, ज्ञानाच्या आणि सत्तेच्या आशेनें करितों असें नाहीं, तर आपलें जें केवलस्वरूप आहे, तेंच निखशः असावें, विषयाचा कसलाही संबंध नसावा, इच्छा, बुद्धि, इंद्रियें, प्राण व शरीर यांसही ब्रह्मस्वरूप प्राप्त व्हावें या स्वाभाविक इच्छेनें त्या पुरुषाची तपश्चर्या चाललेली असते; व हें उघडच आहे कीं, ही तपश्चर्या केवलत्व प्राप्त होईपर्यंत अनिर्बाध चालणार. वस्तुतः जें सांतत्व आपलें कधींही नव्हतें, तें अज्ञानजन्य सांतत्व अथवा त्याचा आरोप ज्ञानप्रभेनें नष्ट करून अनंतांत रहावयाचें, सारांश, सच्चिदानंदाच्या पलीकडे जाऊन ब्रह्मी ब्रह्म होऊन असावयाचें, हा पुरुषार्थ आहे व तो साध्य करण्यासाठीं हा सर्व खटाटोप आहे. ‘सांत वस्तूला (Finite thing) अनंतत्व (Infinity) कसें मिळेल?’ ही शंका घेण्याचें कारण नाहीं. सांत, परिच्छिन्न, मर्यादित इत्यादि सर्व शब्द परिच्छिन्न, मर्यादित व सांत दृष्टीमुळें, सांत मनामुळें व सांत बुद्धीमुळें उत्पन्न झाले आहेत. ही संकुचित दृष्टि मावळली कीं, सांतत्व संपतें. कर्म, आणि ज्ञान हीं साधनें संकुचित बुद्धीला विकसित करितात व अमरत्व देतात. हा अनुभव आहे. पहा कीं, उष्णतेच्या योगानें जर जलबिंदूचें गुरुत्व नष्ट होऊन तो पृथ्वीच्या आकर्षणास न जुमानितां हवेस खालीं ढकलून देतो आणि पांच सात कोस वर जातो. विजेच्या योगानें जर शब्दाची मर्यादित गति अमर्याद करितां

येतें, योगाच्या साहाय्यानें जर अमेरिकेंत काय होत आहे हें येथें बसून सांगतां येतें, तर हीं अगर यापेक्षां वरिष्ठ अशीं वेदशास्त्रोक्त साधनें एकनिष्ठेनें अवलंबिलीं असतां आभासी सांतास अनंतत्व येणार नाहीं हें कशावरून ? आणि पुनः कोणतीही वस्तु-निदान जीव तरी-सांत नाही ! तेव्हां बुद्धि हेंच ज्ञानाचें अंतिम साधन म्हणून मानणारे आचार्य आहेत, त्यांचे बोल जरी कांहीं कालपर्यंत खरेसे दिसतात व असतात तथापि अंतिम प्रश्नांची अंतिम मीमांसा चालली असतां बुद्धीस मागे ठेवून आत्म्याचा आश्रय केला म्हणजे सांतत्व व त्याबरोबरच परिछिन्नत्व व मर्यादित्व यांस कायमची रजा द्यावी लागतें. पहा कीं, ' मी आहें–' हे अखंड ज्ञान आहे, म्हणून बुद्धयादिकांचें अस्तित्व व व्यापार चालतात. तेव्हां उत्पन्न झालेली व कलोदरांत गडप होणारी बुद्धि आत्म्याचा शोध कसा लावणार ? आत्मशोधाचे वेळीं बुद्धीस रजाच दिली पाहिजे. एवंच श्रीरामानुजाचार्यांचें मत तात्विक नव्हें असें मला वाटतें. जीवाचें अधिष्ठान जो आत्मा तोच अनंत आहे म्हणून व जीवास सांतत्व देणारी जी परिच्छिन्न बुद्धि तिचा नाश करून जीव-आत्मा पुढें गेला म्हणजे तो ब्रह्मच होतो: हा सिद्धांत आहे.

असो; तेव्हां ५४ व्या श्लोकांत सांगितलेली पराभक्ति पराकाष्ठेस गेली म्हणजे परमेश्वराचें तात्विक स्वरूप, त्याची तात्विक विस्तृति इत्यादिकांचें तात्विक ज्ञानविज्ञान होऊन हा ज्ञानी भक्त परमेश्वराशी व पुढें ब्रह्माशीं ज्ञानदृष्टीनें तादात्म्य पावतो. ही जीवन्मुक्त स्थिति होय. या स्थितांत म्हणजे परमेश्वरस्थितींत त्यानें केलेलीं कर्मे प्रतिबद्धक होत नाहींत; इतकेंच नव्हे, तर देहपातानंतर तो भक्त शाश्वतपदाप्रत–मुक्तीप्रत–जातो. ही **केवलमुक्ति** आहे. येथें जाणेयेणें संपतें. येथेच मुख्य गीताशास्त्रार्थही संपला. यावरून गीताभक्तांच्या लक्षांत सहजच येईल कीं, गीतेचा मुख्य हेतु, मुख्य पुरुषार्थ म्हणजे मुक्ति व मुक्तिमार्ग सांगण्याचा आहे.

आतां श्लोक ५५ व ५९ यांतील मतलब समजून घेऊं या परमेश्वराचें व परब्रह्माचें तात्विक स्वरूप पराभक्तीच्या साहाय्यानें समजलें म्हणजे परमेश्वराशीं व परब्रह्मांशीं एकात्मता होण्याला उशीरच लागत नाहीं. परमेश्वर सर्वत्र भरला आहे व तसाच तो माझ्यामध्येंही आहे, परब्रह्म हें ज्ञानरूप आहे व तें सर्व दृश्याचें अधिष्ठान आहे म्हणून माझेंही अधिष्ठान तेंच आहे असें पराभक्तीच्या साहाय्यानें कळून वळलें म्हणजे 'माझें, तुझें' हा प्रापंचिक अथवा शास्त्रीय भेदाभेद नष्ट होऊन परब्रह्म स्वरूपाशीं माझें तादात्म्य होतें. देहपाताच्या आधींच हें तादात्म्य झालें तर तो जीवन्मुक्त पुरुष शरीरपातापर्यंत प्रपंचांत राहतोसा दिसतो तरी तो ब्रह्मलोकींच राहत असतो. ममत्व सुटल्यामुळें व अभिमान नष्ट झाल्यामुळें व परब्रह्माशीं ज्ञानदृष्टीनें ऐकात्म्य झाल्यामुळें, त्या जीवन्मुक्तानें या लोकीं कसलेंही कर्म केलें ( अभद्र कर्म या पुरुषाच्या हातून होतच नाहीं ) तरी तें कर्म बद्धक होत नाहीं. कारण त्या कर्मोला नैष्कर्म स्वरूप प्राप्त झालेलें असतें.

( अध्याय ४ पहा ). सारांश, अर्जुनाला येथें असा बोध करावयाचा आहे कीं, मानव संरक्षणासाठीं व धर्मसंरक्षणासाठीं दुष्ट ह्मणजे कोणत्याही प्रकारचें सत्कर्म न करितां केवळ आपल्या क्षणिक उपभोगी लालसेनें दुसऱ्या निष्पापी लोकांचें अपरिमित अकल्याण करणाऱ्या नास्तिक लोकांचा संहार त्यांनींच उत्पन्न केलेल्या युद्धांमध्यें आपल्या हातून झाला तर कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाहीं. तें कर्म स्वोपकारक व राष्ट्रोपकारक आणि विश्वसंसारक होऊन सत्वगुणांचा परिपोष करितें. पण असल्या कर्त्याला जर पराभक्तीची जोड मिळाली असेल, सर्व भूतांचे ठायीं समबुद्धि झाली असेल, हर्षविषाद, सुखदुःखादिकांचा सर्वथा उपरम झाला असेल, अहंबुद्धि, ममत्वबुद्धि यांचा सर्व प्रकारें अस्त झाला असेल, तर असल्या महासंताच्या करवीं युद्धादि प्रसंग घडला, तर तोही विश्वसुख पोषकच होतो. तें कर्मबद्धक होत नाहीं. हा अभिप्राय लक्ष्यांत ठेऊन अर्जुनानें युद्धाला आरंभ करावयाचा आहे.

## मुक्तिमार्ग.

( अ ) "अंतःकरणपूर्वक सर्व कर्में मला ( परमेश्वराला ) समर्पण कर म्हणजे अर्थातच सर्व अभिमान व सर्व वासना यांचा क्षय होईल. नंतर ( आ ) मी म्हणजे परमेश्वर सर्वाधार, सर्वशरण आणि सर्व–परायण आहे असें नित्य ( भक्तिपूर्वक ) ध्यान ठेव. हें असें तुझें ध्यान असले म्हणजे तुझें वर्तन समष्टिभावाचें होऊन नीतीचे सर्व सन्मार्ग तुला प्रकट होतील. नंतर ( इ ) सुखदुःख, जयापजय, लाभालाभ इत्यादिकांकडे दुर्लक्ष करून एक आत्मचिंतनामध्यें मात्र अव्यग्र व एकाग्रचित्तानें मनाला गुंतवून टाक. एकाग्रतेच्या योगानें विषयसंगाचा निःशेष होऊन तुझें अंतःकरण शुद्ध व निर्मळ होईल आणि ( ई ) वेदशास्त्रांत दिग्दर्शित केलेलें सर्वव्यापी आत्मतत्त्व तुला क्रमशः गोचर होऊं लागेल. निष्काम कर्म, अनासक्तबुद्धि, एकाग्र ध्यान आणि पराभक्ति यांच्या साहाय्यानें तूं शुद्ध झालास, तुझा अहंकार मेला ह्मणजे उपनिषत्प्रणीत आत्मतत्त्व तुला परमेश्वरीप्रसादाच्या साहाय्यानें प्रत्यक्ष होईल. हाच साक्षात्कार होय. हा झाला ह्मणजे हृदयग्रंथींचा भेद व सर्व संशयांचा उच्छेद होऊन तूं प्रत्यक्ष परंतु अज्ञेय, व स्वानुभूत परंतु अनिर्वचनीय अशा ब्रह्मपदाला जाशील; मुक्त होशील; अनंत व सर्वव्यापी, अव्यय व अक्षर होशील. जीवदृष्टीनें वरील फलश्रुति सांगितली आहे, हे चाणाक्ष वाचकांस सांगावयास नकोच. असो;

## मिथ्या अहंकाराच्या स्वाधीन

झालास तर मात्र तुझा नाश होईल. कर्तृत्व, अकर्तृत्व तुझे एकट्याचे स्वाधीन आहे, अशी तुझी कल्पना असेल तर ती मिथ्या आहे, हें तिसऱ्या व्याख्यानांत व ह्या शेवटच्या

व्याख्यानांत तुला स्पष्ट करून दाखविलें आहे. पुनः, हा तुझा अहंकार सुद्धां क्षणिकच आहे, कारण तुझें पूर्वसंचितच असें आहे कीं, तुला युद्ध केलेंच पाहिजे. वाघाला किंवा सिंहाला केवढीही क्षणिक उपरति झालेली असली, तरी तो मूळ पदावर हा जावयाचाच; कारण त्याची ती उपरति ज्ञानपूर्वक झालेली नसते. तुझे पूर्वजांचें ब्रीद व तुझें शिक्षण हीं सर्व क्षात्रकर्मालाच अनुकूल आहेत. हा दुर्जनविध्वंसकारी, प्राप्त झालेला, लोकोपकारक आणि सामाचे सर्व उपाय थकले ह्मणूनच अवश्य झालेला क्षात्रधर्म तुला अनुसरलाच पाहिजे. आतां मात्र आपल्या या क्षणिक ह्मणजे अज्ञानमूलक अहंकाराच्या जोरावर ' मी युद्ध करीत नाहीं ' असें जें ह्मणतो आहेस, तेंच थोडासा तुला डिंवचला कीं, तूं युद्ध करावयास लागशील. अज्ञान तें हेंच होय. अर्जुना ! जितकें अज्ञान जास्त, तितका तो तो जीव प्रकृतीच्या आधीन जास्त असतो. अज्ञानानें पारतंत्र्य, प्रकृति-तंत्रता प्राप्त होते, आणि ज्ञानानें तो तो जीव प्रकृतीच्या राज्यास उलथून टाकितो. सारांश, तुझें प्राक्तन, तुझें अदृष्ट तुला युद्धाकडे ओढून नेईल, आणि तेव्हां तरी तुला भिमूटपणें युद्ध करावेंच लागेल. बाबा ! ज्या मायामोहानें तुला या क्षणीं दया उत्पन्न झाली आहे, तोच मोह तुझ्यामध्यें क्रोध उत्पन्न करून तुझ्याकडून वेळीं अवेळीं जीवहत्या करवील. तेव्हां पुढें मोहवश होऊन जें तुला करावेंच व बद्ध व्हावेंच लागणार, तेंच आज ज्ञानपूर्वक करण्यास व कर्मविमुक्त होण्यास कां लागत नाहींस ? "

## ईश्वर आणि माया.

"अर्जुना ! तुला वेळोवेळीं सांगितलेंच आहे कीं, सर्वव्यापी ईश्वर हा सर्व-साक्षित्वानें प्रत्येक भूताच्या अंतर्यामीं रहात असतो. तो मायेचा स्वामी आहे म्हणून त्याच्या आज्ञेनुसार ही दैवी माया जीवमात्रास त्याच्या त्याच्या इच्छापूर्वक झालेल्या कर्माप्रमाणें जन्ममरणाच्या व सुखदुःखाच्या यंत्रावर फिरवीत असते. सर्वसम श्रीपर-मेश्वर मायेचा अधिष्ठाता आहे म्हणून येथें पक्षपात, विषमता अगर निर्घृणता नसतात. इच्छापूर्वक झालेल्या कर्माचें फल व पूर्वकर्मानें उत्पन्न झालेलें अदृष्ट अगर दैव अथवा विश्वकर्मफल या दोन शक्तींच्या सपाट्यांत जीव सांपडतो, व मायेच्या योगानें तो फिरत असतो. ह्या मायाचक्रांतून जर तुला सुटावयाचें असेल तर त्या सर्वज्ञ, दयाघन श्रीपरमेश्वराला शरण जा, म्हणजे संकुचित स्वार्थाचा अधिकारानुसार त्याग करून विस्तीर्ण आत्मस्वरूपाच्या प्रेरणेनें शास्त्रविहित कर्म करावयास लाग. अर्जुना ! सर्व-साक्षी देवाला शरण जावयाचें तें सर्वभावांनीं म्हणजे अहंकार, बुद्धि, मन, इंद्रियें, शरीर व धन इत्यादिकांसह शरण जा. हीं सर्वच्या सर्व त्यांचे पदकमला अर्पण कर म्हणजे तुझी तळमळ, तुझा शोकमोह इत्यादि नष्ट होऊन तुला उत्कृष्ट शांति मिळेल आणि मायेच्या तान्यांतील जें जन्ममरण त्यांतून सुटून तुला शाश्वत स्थान मिळेल."

याप्रमाणें परमेश्वरांनीं अर्जुनाला ज्ञानरहस्य सांगून ' विचार कर आणि जें चांगलें दिसेल तें कर ' अशी आज्ञा केली आणि अर्जुनावर परमेश्वराचें उत्कट प्रेम होतें ह्मणून त्याला ६५ वे श्लोकांत आज्ञा केली कीं, ' तूं हें मत नास्तिकांस सांगूं नको. '

टामसन याचे ६५ व्या श्लोकावरील विचार अथवा विकारमूलक उद्गार संतोषदायी नव्हेत. ' ज्याला श्रद्धा नाहीं, तपश्चर्या नाहीं, शिष्यपणाचा धर्म विदित नाहीं, ज्याला निंदा करण्याचें मात्र ठाऊक आहे, अशा पुरुषास गीतोपदेश करूं नये ' ही भगवत्सूचना टामसन साहेबांस विषाप्रमाणें कटु वाटत आहे! वरील प्रतिबंधक वाक्यावरून " हे काल्पनिक तत्वज्ञ आपल्या 'ब्राह्मणी मुकटयावर' गेले " असें या साहेबांस वाटतें. वादप्रतिवादाला 'कृष्ण भ्याला' असेंही विचारस्वातंत्र्याच्या साम्राज्यांत फडकणाऱ्या साहेबजींस वाटतें. ' या गीताप्रणीत धर्मानें सर्वत्र बेबंदशाही होऊन वैदिक धर्माचा प्रलय होईल, अशी या धर्मस्थापकांस भीति पडल्यामुळें, त्यानें ह्या गीताप्रवाहास बंधारे घातले, असा या टीकाराचा तर्क आहे! वाहवा! एका वाक्यानें केवढी मौज केली ही!' गारोडयाच्या लहानशा पोतडींतून, गारोडयानें ' चल चल ' ह्मटल्याबरोबर जसा सबंध संसार बाहेर पडतो, तशी गत वरील छोटेखानी वाक्याची झाली! तर मग काय आमच्या साहेबांच्या मनांत असें होतें, कीं गीता समजण्याची मानसिक व आत्मिक शक्ति नसणाऱ्या मनुष्याच्या डोळयांतही या कठिण शास्त्राची गूढ रहस्यें सपशेल खुपसावी? तानसेनाचें गाणें ते गांवढळापुढेंही गाऊन दाखविणार किंवा उत्तम रत्नाची पारख करण्यास जन्मांधाला सांगणार काय? ख्राइस्टप्रणीत तत्वें सर्व जगभर पसरण्याचा परिणाम Crusades ( धर्मयुद्धें ) झाला,—पंधरा सोळा शतकांतील मनुष्यभक्षक धर्मक्रांतीमध्यें उद्भव झाला—हें साहेबांस माहीत नाहीं, असें नाहीं. पण जातिभेद प्रपादणाऱ्या भटाभिक्षुकांच्या धर्माचा विचार करितांना मुद्याच्या गोष्टी लक्ष्यांत ठेवल्या, तर अंगीकृत कार्याची कड घेतल्याचें श्रेय येत नाहीं. मुळांत ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि शब्द नसतांना जसे हे निर्मूळ वृक्ष त्यांस दिसूं लागले, तशी शूद्रासंबंधेंही त्यांची पांचावर धारण बसून ' अन्याय, अन्याय ' ह्मणून ओरडण्यास त्यांनीं आरंभ केला. झालें! सर्वत्र ' बामणी काव्याची ' कहाणी सुरू झाली! असो; पण कोणतीही कला, कोणताही धंदा, कोणतेंही शास्त्र, अधीत करावयाचें, ह्मणजे त्याला कांहीं शारीरिक, मानसिक व आत्मिक योग्यता असावी लागतें, हें प्रत्येकांस विदितच आहे. आतां सर्व कला, सर्व शास्त्रें, सर्व रहस्यें, यांचा संग्रह करणाऱ्या तात्विक ग्रंथांचा अभ्यास करण्याला वरील योग्यता विशिष्ट प्रकारच्या हव्या आहेत, हेंच साहेबांस कां समजूं नये? दुर्दैव भगवंतांचें! भगवंतांनीं **गुणांची** योग्यता मागितली आहे. जातीची, देशाची कालाची योग्यता मागितली नाहीं. माकडाच्या हातीं कोलीत दिलें ह्मणजे जसा अनर्थ होतो, तसाच गीतेसारखा सर्वसंग्राहक ग्रंथ अयोग्य पुरुषाच्या हातीं पडेल तर अनर्थ होतो व व्हावयाचाच! हें कृष्णास विदित होतें. असें असतांही जातिभेदाचा नसता राक्षस उभा करून, त्याच्या

नांवावर प्राच्य आर्य लोकांस व त्यांच्या धर्मसंस्थापकांस वाटेल तसें बोलावें व त्यांच्या संबं धानें हवे ते आरोप प्रसिद्ध करावे हें विलायती चोखंदळांस वैभवकारी नव्हे. असो; अर्जुन भगवंताचा लाडका म्हणून त्याला

## अत्यंत गूढ रहस्य

सांगितलें, तें हें: "नित्य माझें, सर्वसाक्षी परमेश्वराचें चिंतन करीत जा; माझी अनन्यभक्ति कर; सर्व यज्ञ मला अर्पण कर आणि मला नमस्कार कर. हें व्रत चालू ठेविलेंस तर तूं मत्स्वरूपालाच पावशील. हें माझें सांगणें वास्तविक आहे व तूं मला प्रिय आहेस म्हणूनच तुला हें सांगत आहें. बाकीचे सर्व क्षुद्र धर्म सोडून देऊन भागवत-धर्माचा प्रणेता व विश्वनियंता जो मी त्या मला शरण ये म्हणजे तुझीं सर्व पापें नष्ट होतील. यापुढें तुझें शोक करण्याचें कारण संपलें." सारांश, भगवंतांच्या म्हणण्याचें रहस्य हें कीं, श्रीपरमेश्वराला शरण जाऊन त्याच्या प्रीत्यर्थ सर्व विहितकर्में तद्भक्तिपुरःसर केलीं आणि त्याचें अखंड चिंतन चालू ठेविलें व इतर सर्व क्षुद्र व संकुचित धर्मांचा व धर्मप्रेरक बुद्धींचा परित्याग करून एका भागवतधर्मानुसार आपली मनोवृत्ति आणि आपलें वर्तन ठेविलें म्हणजे ईश्वरीप्रसाद होऊन जीव मोक्षाप्रत जातो. मोक्षमार्गानें जात असतांनाही जीव हा स्वतःचें कल्याण, समाजाचें कल्याण, विश्वाचें कल्याण आणि आत्म-स्वरूपाचें कल्याण करण्यास समर्थ असतो. हें सामर्थ्य त्यास आत्मस्वरूपाकडे जात असतांना येत असतें. जीव हा स्वतःचें कल्याण (म्हणजे भोगसंपत्तीची वृद्धि व तिचा उपभोग) हें व्यावहारिक ज्ञानानें करीत असतो; पण तेंच ज्ञान सकामकर्माचें प्रेरक झाले तर समाजांत विद्वेष वाढतो व स्वतःचें व्यावहारिक अकल्याण होतें, पण प्रत्येक व्यक्ति उपभोगवृद्धीपेक्षां इतरांच्या सुखाप्रीत्यर्थ निष्काम कर्म करूं लागली म्हणजे कुलनीति, कुल-धर्म, जातिनीति, जातिधर्म उद्भवतात. तदनंतर स्वार्थत्यागमूलक व ज्ञानप्राप्तिपूर्वक सामाजिक नीतिचीं तत्वें उत्क्रांतीद्वारा प्रकट होऊन सामाजिक कल्याण करणारी नीति-तत्वें कर्मप्रेरक होतात व तीं कर्त्याचें कल्याण करून समाजांत संघट्टन उत्पन्न करितात. परंतु पुनः, समाजबाह्य लोकांशीं प्रसंग येऊन समाज–समाजामध्यें विद्वेष उत्पन्न होतो व समाजाचें अकल्याण होण्याचा संभव असतो. तसेच युद्धप्रसंग उत्पन्न होतात व परापहार करण्याची बुद्धि प्रबल होते. अर्थातच ही समाजविध्वंसक व जीव-प्रणाशक पद्धति जगचालक परमेश्वरास सहन न होऊन तो कोणा तरी मानस–पुत्रास श्रेष्ठस्वार्थत्यागमूलकतत्त्वें प्रकट करण्याची प्रेरणा करितो. हाच धर्मांचा उद्गम होय. जे समाजसंरक्षक धर्म संकुचित स्वरूपाचे असतात, त्यांची उत्क्रांति होऊन ईश्वरानुग्रहानें जगद्ध-र्मांची संस्थापना होते. या धर्मांत स्वार्थत्यागाची पुष्कळच वृद्धि होते व त्यामुळें नीतितत्वें व व्या-वहारिक ज्ञान यांस बरेंचसें सात्विक स्वरूप प्राप्त होतें. सारांश, जितका विषयोपभोगाचा हव्यास कमी तितका ज्ञानप्रसार अधिक होतो; व सकारणकर्म, सात्विककर्म, निष्कामकर्म

यांचा संचय जास्त वाढत जातो. निष्कामकर्मसंचय जितका अधिक तितकी सामाजिक स्थिति जास्त संघटित असते. असो; ही विश्वधर्माचीं अगर भागवतधर्माचीं तत्वें विश्व-नियमांवर स्थापित झालेलीं असतात. ह्या धर्मास अनन्यभावानें शरण गेलों, म्हणजे जीवाची परमावधीची उत्क्रांति होते. पुढें अद्वैत प्रतिपादन करणारीं तत्वें उद्भूत होऊन स्वार्थत्यागाची परमावधि, ज्ञानाची परिसमाप्ति, भक्तीचा शेवट आणि कर्माची निःशेषता होते. यानें स्वतःचें म्हणजे विश्वाचें आत्यंतिक, अनंतकालीन व परममांगलिक कल्याण होतें आणि जीव स्वतः मुक्त होतो व तो साधु पुरुष विश्वास मुक्तीचा मार्ग दाखवितो. हा भगवंतांचें बोलण्याचा आशय आहे.

## फलश्रुति

सांगण्याचे अगोदर हें गीताशास्त्र कोणास सांगूं नये हें सांगतातः ' हें ज्ञान तपस्वी नसेल, भक्त नसेल, श्रद्धालु नसेल व ईश्वरावर प्रेम करणारा नसेल त्यास सांगतं कामा नये. कारण हे लोक त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहींत व त्याचा शब्दच्छलानें दुरुपयोगही करितील. ' तात्पर्य, ईश्वरप्राप्तीचा मार्ग कंठण्यास तपश्चर्येचें ( ज्ञानाचें व ज्ञानपूर्वक चिंतनादि कर्मांचें ), भक्तीचें ( योगपूर्वक अपराभक्तीचें व पराभक्तीचें ) व श्रद्धेचें साहाय्य अवश्य आहे. ईश्वराचा मार्ग ह्मणजे व्यवहारज्ञान, शास्त्रज्ञान, नीति, धर्म, विश्वज्ञान व पूर्ण स्वार्थत्याग आणि अद्वैतज्ञान यांचें प्रगामी उद्भावन होय. असो; हें ज्ञान भगवद्भक्तांस प्रकट करणारा, पुरुष परमेश्वराचा प्रिय भक्त होऊन मुक्त होतो. तसेंच ह्या शास्त्रांचें अध्ययन व अध्यापन करणारे गुरुशिष्य हेही ज्ञानयज्ञानें परमेश्वराला संतुष्ट करून त्यास प्रसन्न करून घेतात व मुक्त होतात. आणि ह्याचप्रमाणें श्रद्धालु व ईशभक्ति करणाऱ्या जीवानें हें ज्ञान नुसतें ऐकिलें तरी तो पुण्यसंचय करून सज्जन्मास येतो व जन्मांतरीं हाच व्यासंग ठेवल्यास पिपीलिका मार्गानें मुक्त होतो.

शेवटीं ' त्वां हें लक्ष्यपूर्वक ऐकून घेतलेंस ना ? व तुझा अज्ञानमोह नष्ट झाला ना ?' असें अर्जुनास विचारून व धनंजयाचें ' होय ' असें उत्तर ऐकून घेऊन श्रीकृष्णांनीं गीताशास्त्राची परिसमाप्ति केली.

## संजयाचे उद्गार

आहेत, त्यांचा मथितार्थ इतकाच आहे कीं, ' जेथें श्रीयोगेश्वर श्रीकृष्ण व जेथें महाकार्यकर्त्या अर्जुनाचा समागम होतो, सारांश, जेथें उत्तमोत्तम ज्ञान, आणि महोत्सुक कार्यकर्ता असतो, तेथे दैवीसंपत्ति, विजय, संपन्नता आणि अभंगनीति व अखंड ज्ञान यांचा वास असतो.'

श्रीमद्भगवद्गीतेच्या **पहिल्या अध्यायांत** ' अधिकारानिर्णय ' दुसऱ्या अध्यायांत **' अभेद, अद्वैतज्ञान** आणि भेदमात्र मिथ्या आहे, असें सिद्ध करणारा **'बुद्धियोग'**. तिसऱ्यांत अपरोक्ष ज्ञानाला अनधिकारी परंतु मुमुक्षु लोकांसाठीं **कामशून्य कर्मप्रतिष्ठा,** चवथ्यांत विश्वज्ञान व **अंतर्ज्ञानसहित कर्मप्रतिष्ठा, पांचव्यांत कर्तव्यकर्म करून कर्मसंन्यास**, सहाव्यांत शमदमात्मक योगमार्ग सांगून पहिल्या षट्कांत 'त्वं' पदाचा अर्थ म्हणजे निर्विकार, निरंजन, निर्लेप, अज, नित्य, सर्वव्यापी, सर्वज्ञ व स्वानंदी आत्मा होय, असें ठरविलें. दुसऱ्या षट्कांत ' तत् ( ब्रह्म ) ' **पदाची सिद्धि व लक्षणें** सांगून **भक्ति** व **उपासना** यांचें **रहस्य सांगितलें.** सातव्यांत **परमात्मस्वरूप** व त्याचें ज्ञान सांगून आठव्यांत ' ब्रह्म ' व ' कर्म ' म्हणजे काय यांचा उलगडा केला. नवव्यांत **राजयोग** सांगून व ज्ञान, भक्ति, योग इत्यादिकांची फलद्रूपता एकरसात्मक आहे असें प्रतिपादून दहाव्यांत **' सर्वब्रह्मांड परमेश्वरविभूतिमय आहे** व म्हणून समाधिप्रापक ध्यानास योग्य आहे ' हें परोक्षतः सांगितलें; व अकराव्यांत ' विश्वरूप ' दाखवून ' तत् ' स्वरूपाच्या अपरोक्ष ज्ञानासह जीवाच्या **कर्तृत्वभोक्तृत्वाची किंकरता** सिद्ध केली. बाराव्यांत **'भक्तियोगाचें रहस्य, भक्तीचे मार्ग निर्गुणपर्यवसायी सगुणभक्तीचें वर्म** ' इत्यादि सांगून ' तत् ' पदाचें व्याख्यान संपविलें.

तिसऱ्या षडध्यायींत **' तत् '** व **' त्वं '** हे **अभिन्न, एकच,** आहेत असें सिद्ध करून **सर्व कर्मसंन्यासाचें गुह्य सांगितलें.** याचसाठीं तेराव्यांत प्रकृतिस्वरूप **व प्रकृतिपुरुषविवेक उद्धृत करून** चवदाव्यांत ( १ ) **प्रकृतिगुणांची सर्व दिशांनीं मीमांसा** केली व पंधराव्यांत ( २ ) **गुणातीत व मायातीत पुरुष पुरुषोत्तमच होय, हें सिद्ध** केलें. सोळाव्यांत मोक्षास अनुकूल असणारी **दैवीसंपत्ती व तत्प्रतिकूल** असणारी **आसुरीसंपत्ति यांचें वर्णन केलें.** सतराव्यांत **आहारविहारादि कर्मांची उपस्थिति करून गुणानुसार आहारविहाराचे धर्म सांगितलें;** अशासाठीं कीं, मुमुक्षूनें आपले आहारविहार नियमित व शास्त्रोक्त करावें. अठराव्यांत सर्व **गीताशास्त्राचा उपसंहार करून व ' अभेद, अद्वैत ' हेंच मुख्य तत्त्व व मुख्य सिद्धांत** असें ठरवून, निः-शंकता बाणवून, अभेदानुभव झाला म्हणजे सर्वकर्मसंन्यास आपोआप होतो, असें दाखविलें. हा अद्वैतपर उपदेश बाणला तेव्हां अर्जुनाचा शोकमोह नष्ट होऊन तो स्वधर्मप्रणीत कर्तव्य निष्काम बुद्धीनें करावयास व सत्कर्म करून ईश्वराला संतुष्ट करण्यास सिद्ध झाला, हें सांगणें म्हणजे सर्व लोकांस विदित असलेलें, पुनरुक्त करणें आहे.

या जगांत दोन प्रकारचीं माणसें असतात. आपला उद्धार करून घेणारीं तीं दैवी व आपला अधःपात करणारीं तीं आसुरी माणसें होत. दैवी मनुष्यांत ' अभेद ' हें

प्रमाणतत्त्व असतें; आसुरी मनुष्यांत ' भेद, व्यक्ति ' हें मुख्य तत्त्व असतें. जे अभेदवादी आहेत, ते हळूहळू स्वार्थत्याग करून, ज्ञानपोषण करून, आणि व्यक्तीचें व समाजाचें खरें हित करून स्वरूपसुखाचा आस्वाद घेण्यास योग्य होतात. आणि जे व्यक्तिवादी आहेत, ते अहमहमिकाजन्य मारामारीला उत्पन्न करून सदैव दुःखामध्यें मग्न असतात. सरतेशेवटीं, प्रेमपूर्वक कर्म करणाऱ्या राष्ट्रांत चिवटपणा असेल तर दैवीप्रकृतीचा जय होऊन दैवी साम्राज्य होतें; आणि तोफा, तरवारी, बाण, अस्त्रें इत्यादि वस्तु नामशेष होऊन व तुरुंगाच्या भिंती कोसळून जाऊन त्यांच्या मोबदला प्रेम, मार्दव, आर्जव इत्यादिकांचा विस्तार होतो. हा विस्तार व्हावा, एतदर्थच धर्माची, अभेदमूलक व उन्नतकारी धर्माची व विश्वासकरी आत्मज्ञानोपादानाची आवश्यकता आहे. भूलोकावर स्वर्गसुख संपादन करणें इष्ट असेल तर समाज संघटन करून व्यक्तीचा उद्धार करणाऱ्या धर्माची व तत्प्रसारक नीतीची आणि प्रामाणिक विश्वज्ञानाची अपेक्षा आहे. नीति एका जन्माचा फार तर विचार करते; तेव्हां सर्व जन्मांचा विचार करणाऱ्या धर्माचें पाठबळ असल्याशिवाय ऐहिक नीतीला कसलेंही फलोत्पादक सामर्थ्य असणार नाहीं. पुनः धर्मालाही अद्वैतज्ञानाचें साहाय्य हवें असतें. याचप्रमाणें ज्ञानाचा म्हणजे विद्या, कला, शास्त्रें, मंत्र, तंत्र इत्यादिकांचा सात्विक परिपोष व्हावयाचा असेल तर विश्वनिरीक्षण, आत्मनिरीक्षण, अवश्य हवें. आणि या सर्वांची एकवाक्यता केवळ अद्वैत ब्रह्मज्ञानानेंच करितां येते म्हणून तत्वज्ञान, ब्रह्मज्ञान, ( Philosophy ) हे सांख्यास ( शास्त्रांस=Sciences ) आणि योगाला ( Ethics. politics and arts ) अत्यंत अवश्य आहे. हीच आवश्यकता सर्व साक्षी गीताकारास वाटली आणि त्यानें हा सनातनधर्मस्थापक अद्वितीय ग्रंथ निर्माण केला. अर्थातच याचें वाचन, अध्ययन, मनन, निदिध्यास केला, व तदनुसार आचरण केलें तर स्वतःचें निर्विशेष कल्याण व विश्वाचा उद्धार हीं होतील.



# भाग नववा.

## युरोपियन तत्त्वज्ञानाची त्रोटक हकीकत.

ही जी मी पुढें 'तत्त्वज्ञानाची हकीकत' देत आहे ती स्थलाभावामुळें त्रोटक अस्पष्ट व अमनोरंजक होणार असें मला माहित आहे. तथापि येथील विचारसरणी परकी असल्यामुळें समजावयासही कठिण जातें असा माझा अनुभव आहे. तथापिही हा इतिहास देण्याचा उद्देश इतकाच आहे कीं, यूरल नदीच्या पश्चिमेकडे तत्त्वज्ञानाचा उद्गम, विकास व परिपोष कसा होत गेला, त्याच्या किती शाखा झाल्या, त्यांत मोठमोठे तत्त्वज्ञानी कोण झाले, याची अगदी अंधुक कल्पना तरी माझ्या मराठी भाषा मात्र जाणणाऱ्या गीताबंधूस व्हावी ! परमेश्वर हा उद्देश सफल करो !

**साक्रेटिस** म्हणून एक महासाधु **अथेन्स** शहरीं होऊन गेला. ह्या सत्पुरुषाच्या जोडीला आमचे **तुकाराममहाराज** फार चांगले शोभतील. साक्रेटिस फारसा श्रीमंत नव्हता, तरी अथेन्स येथील मुलांस फुकट शिकविण्याचा त्यानें क्रम सुरू केला. साक्रेटिस नुसतें शिकवीत नसे, तर मुलांस शहाणे करी, व त्यांस विचारपाठे न पढवितां **विचार कसा करावा,** साधकबाधक पक्ष पाहून सत्यग्रहण कसें करावे, सारांश, नित्यानित्य विवेक कसा करावा हें त्यांच्याशीं त्यांस समजेल अशा पद्धतीनें वाद करून त्यांस शिकवित असे. **ज्ञानी पुरुष सात्विक असतो** आणि **सात्विक गुण शिकवितां येतील अशी त्याची समजूत होती.** तो आस्तिकवादी, जीव अमर आहे असें मानणारा, सर्व कर्तव्य चोख रीतीनें करणारा, कामक्रोधादिकांस आपल्या ताब्यांत ठेवणारा, परोपकार करणारा एक अत्यंत ज्ञानी महंत होता. या महापुरुषाचा **प्लेटो** हा पट्टशिष्य होय. ग्रीसच्या तात्विक इतिहासांत प्लेटो हा तत्वज्ञ शककर्ता झाला. प्लेटोच्या आधीं नित्यवादी, अनित्यवादी, असे पुष्कळ वादी पुरुष होऊन गेले होते. तसेंच त्याच्या आधीं वादविवादाची पद्धतिही जय्यत झाली होती. असो; प्लेटोचे गुरूजी साक्रेटिस ( सुक्रतुः ) हे या वादविवादाच्या पद्धतींत मोठे पट्टीचे पंडित होते. साक्रेटिसशीं वाग्युद्ध खेळत असतां कोणाची त्यावर केव्हांही सरशी झाली, असें जन्मांत कधींही झालें नाहीं. त्याचे प्रतिपक्षी चिडत, रागावत व त्याचा दीर्घद्वेष करीत; पण या बिचाऱ्याला मात्र राग असा कधीं शिवलाच नाहीं. प्लेटोही असल्या गुरुजींच्या तालमींत पढला असल्यामुळें तो उत्तम वाद्कुशल झाला. तसेंच ग्रीक लोकांत सामान्यतः सौंदर्याचा, ललिताचा अभिनिवेश असे, त्याप्रमाणें प्लेटोही सौंदर्यभक्त, अभियुक्तांचा भक्त होता. यानें आपल्या **गुरुजींच्या स्मरणार्थ म्हणून** पुष्कळ विषयांवर 'गुरुशिष्यसंवाद लिहून ठेविले आहेत. या संवादांत बहुधा साक्रेटीस हा नायक असतो. विषयाची समजूत पड-

ण्याला हे संवाद फार उपयोगी आहेत. तसेंच त्यांतील भाषासौष्ठव, रचनाकौशल्य इत्यादि सर्व इतकें बहारीचें वठलें आहे कीं, तें केवळ अपूर्व होय. या वाग्द्वंद्वांत प्लेटोनें आपलें तत्त्वज्ञान प्रकट केलें आहे. प्लेटोचें तत्त्वज्ञान म्हणजे पूर्वगत सर्व पाश्चात्य तत्वज्ञांच्या मतांचा स्वीकार करून, व त्या सर्वांस आपल्या तात्त्विक गुटिकेनें एकरसत्व देऊन तें अवघड तत्त्वज्ञान श्रुतिमनोहर करणारें एक अपूर्व, अद्वितीय ज्ञानयंत्रच होय.

कर्ममार्गांतील म्हणजे व्यवहारांतील नीतीच्या प्रश्नांचा निकाल लावित असतां प्लेटोच्या तत्वज्ञानाचा उदय झाला. खरी विद्या कोणती, उत्तम देशाभिमान कशाला म्हणतात, सर्वकालीं मान्य ठरतील अशीं नीतीचीं तत्वें कोणत्या प्रकारचीं असतात, ईश्वरमान्य धर्म कसा असतो, वास्तविक लोककल्याण म्हणजे काय, ह्या व्यवहारिक प्रश्नांचा उलगडा करितां करितां तत्त्वज्ञान प्रकट झालें. पुढें असें दृष्टोपत्तीस आलें कीं, दृश्य विषय आणि द्रष्टा हे दोन्हीं चंचल अस्थिर, असल्यामुळें दृश्याचें ( phenomenal) ज्ञान सापेक्ष ( relative ) असतें; अर्थातच मोक्षमार्गाची नीति सांगण्याचें अवघड कर्म या सापेक्ष ज्ञानाचे हातून होणें शक्य नाहीं. तेव्हां दृश्याच्या नादीं न लागतां अज, नित्य, शाश्वत व अचंचल असे जें एक कल्प्य ( ideal ) विश्व आहे त्याचें ज्ञान करून घेऊन तद्वारा मोक्षमार्ग सुधारावा असें प्लेटोनें ठरविलें. ' हें नित्य व अचंचल विश्व अतींद्रिय व अग्र बुद्धिग्राह्य आहे. तें एकात्मक, शाश्वत आणि सत् आहे व दृश्य विश्व हें संकीर्ण, चंचल व उद्भूत आहे. मानवी बुद्धीस सुद्धां ह्या नित्य विश्वाचें ज्ञान अभ्यासद्वारा मिळत नाहीं, तर तें ज्ञान तिला अनुस्मरतें ( स्मरणगम्य होतें. ) ह्या स्मरणगम्य कल्प्यविश्वांत जाति, भाववाचक जाति ( Ideas ) असतात. प्लेटोनें या भाववाचक जाति स्पष्ट केल्या त्या अशाः मनुष्य ही व्यक्ती आणि मनुष्यत्व ही जाति, वृक्ष ही व्यक्ति आणि वृक्षत्व ही जाति; याचप्रमाणें इतर भाववाचक जाति (Ideas) समजाव्या. प्लेटो म्हणे कीं, जीवानें स्वर्गांत पाहिलेल्या या जातींचें त्याच्या बुद्धीस प्रत्यभिज्ञान होतें. येथें या जातींचा परस्परसंबंध म्हणजे प्रधानगौणत्वाचा किंवा सहचारित्वाचा असतो, म्हणजे मनुष्यत्व ही जाती ( Idea ) जीवत्वाच्या दृष्टीनें गौण आहे, पण ब्राह्मणत्वाच्या दृष्टीनें प्रधान आहे. पण मनुष्यत्व आणि पशुत्व या सहचारी आहेत. पुनः, मनुष्यत्व आणि मनुष्य ( जाति आणि व्यक्ति ) यांमध्यें बिंबप्रतिबिंबाचा संबंध आहे; किंवा खरें ह्मटलें म्हणजे अंशांशी संबंध आहे. जातीचा व्यक्ति हा अंश आहे. जातिज्ञानानें ( Knowledge of Ideas ) सत्तेचें ( Is चें ) ज्ञान होतें. या जाति अनंत आहेत. या सर्वांत प्रमुख जाति सौभद्राची ( The Highest good ) आहे. हें सौभद्र आमच्या ब्रह्माप्रमाणेंच बाकीच्या जातीचें नियामक, पोषक आणि आविर्भावक आहे. हें सर्वांस सत्ता देणारें, सर्वशक्तिवंत व सर्वसाक्षी आहे. पण हें जर सर्व जातींस सत्ता देतें तर तदितर जातींत सत्ता नाहीं, असें होतें. अर्थात् त्याचें अस्तित्व संपुष्टांत येतें. प्लेटोस हा घोटाळा आवरतां येईना. आमच्या ब्रह्माशिवाय व मायावादाच्या साहाय्याशिवाय हा प्रश्न सुटेल

कसा? असो; जीव ( Soul ) हा अमर असून आत्मा ( spirit आणि दृश्य phenomena ) यांच्यामध्यें आहे. याला सत्त्व ( Reason ) रज ( will ) आणि तम ( Appetite ) ह्या किंवा ह्या पैकीं कांहीं उपाधि पूर्वसंचित कर्मानें प्राप्त झालेल्या असतात. या उपाधीनुसार वर्णोत्पत्ति होते. उपदेशक, संरक्षक व सेवक हे तीन प्लेटोक्त वर्ण होत. हे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य सर्व इमानीं असले तर समाज सुरळीत चालतो. शहाण्या माणसानें अगर साधूनें वनांतच जाण्यास नको. समाज-व्यवस्था जीर्णोद्धार करण्यासाठीं आहे. ज्ञानाचाही उदय त्यासाठींच आहे. हें सर्व ठीक झालें, पण आदेहकालपर्यंत योगपूर्वक उपासना नाहीं, तोंपर्यंत मोक्ष मिळणें शक्य नाहीं. प्लेटोला आमचा योग व आमची भक्ति यांची ओळख नव्हती. सारांश, प्लेटोला जातिरूपानें ( Ideas ) ब्रह्मस्वरूपाचें थोडेंसें आकलन झालें होतें. सर्व ब्रह्मज्ञान त्यास मिळालें असतें तर त्याचा घोटाळा झाला नसता.

•अरिस्टॉटल हा प्लेटोचा पट्टशिष्य होय. 'बापसे बेटा सवाई' या न्यायानें अरिस्टॉटलनें स्वगुरूवरही ताण करून तत्त्वज्ञानाचा मार्ग पुष्कळ सोपा केला. शिवाय आजमित्तीस युरोपियन लोकांत व मुसलमान लोकांत जीं काय शास्त्रें, नीतिमीमांसा व शासनमीमांसा उपलब्ध आहेत, त्यांचा उगम अरिस्टॉटलच्या बुद्धिविलासापासूनच झाला आहे. हें प्लेटोस खरोखर भूषणावह होय. असो; युरोपियन न्यायशास्त्राचा ( Logic) कर्ता व प्रणेता **अरिस्टॉटलच** होय. पदार्थ-जाति ( Categories ) यानेंच ठरविल्या आणि अनुमान ( Deductive ) व अनुगम ( Inductive ) हे अनुमितीचे दोन प्रकार यानेंच निर्माण-अथवा प्रकट केले.

प्लेटोस जातिव्यक्तींमध्यें व गौणप्रधानजातींमध्यें जो संबंध ठरवितां येईना, तो अरिस्टॉटलनें कायमचा ठरविला. जाति ही व्यक्तींच्या बाहेर रहात नसून व्यक्तींतच असते व तिच्या सत्तेनें व्यक्तीला-दृश्यस्वरूपाला अस्तित्व-आविर्भूतत्व-प्राप्त होतें. व्यक्तीला जीं निरनिराळीं स्वरूपें प्राप्त होत असतात तीं स्वरूपें ह्मणजे एक परिणामपरंपराच होय. या परंपरेमध्यें जाति (Idea) आपलें स्वरूप आविर्भूत करिते. हाच अविकृत परिणामवाद होय. जाति हें कारण, अनेक कार्यपरंपरा उत्पन्न करून पुनः आपण स्वतः अविकृत राहते; हाच आमच्या इकडील शुद्धाद्वैत्यांचा अविकृत परिणामवाद आहे. परिणाम ह्मणजे ( Develohment ). प्रकृति ह्मणजे जातीचें अव्यक्त स्वरूप आणि व्यक्ति ह्मणजे जातीचें व्यक्त स्वरूप होय ! जडांश ( Matter ) रूपाचा ( Form ) नित्य संबंध आहे. आपल्याला वस्तु दिसतात, त्यांत जड हें उपादान कारण आहे व रूप ( Form ) हें स्वरूप-कारण आहे. स्वरूप जातीवरून ठरतें आणि पदार्थास व्यक्त करितें. जाति नित्य आहे; पण व्यक्तस्वरूपाच्या साहाय्यानें ती इंद्रियगोचर होते. **दृश्य विश्वांत, मायेंत ( Phenomena ) वस्तूला, जातीला, व्यक्तत्व प्राप्त होणें,**

हाच काय तो एक विश्वव्यापार चालला आहे, हा अॅरिस्टॉटलचा मुख्य सिद्धांत आहे. ही चराचर व्यापार उत्क्रांतीच्या नियमानुसार चाललेला आहे, ईश्वरसृष्टींत एक स्वरूप-कारणच निरनिराळ्या रूपांनीं **प्रधान** असते व जीवसृष्टींत **उपादान, निमित्त-स्वरूप** आणि **इष्ट कारणें प्रधान असतात.** सर्वत्र नित्य, अव्यक्त, जातीला व्यक्त स्वरूप अगर स्वरूपें प्राप्त होणें हा विश्वव्यापार चाललेला आहे. आतां हें जाति-तत्वच ( Genus ) स्वांतर्गत भिन्न वस्तूंच्या ( Species or Individuals ) स्वरू-पाचा व गुणाचा निश्चय करूं शकतें ह्मणून शास्त्राला आरंभ होतो; तसाच वस्तुतत्त्वच जेव्हां स्वगुणांचा निश्चय करूं शकतें, तेव्हांही शास्त्रप्रारंभ होतो. एवंच वस्तूंच्या भिन्न गुणाविर्भावाला जशी वस्तु अवश्य असते, तशीच वस्तुजाति ही वस्तूंच्या आविर्भावाला अवश्य असते व सामान्य विशेषजाति, उपजाति व उपोपजाति असे वर्ग निर्माण होऊन निरनिराळे वस्तुविकासाचे सिद्धांत ठरवितां येतात. शास्त्राला वस्तुज्ञान व जातिज्ञान अवश्य आहे. पण एकच वस्तु व तिचें लक्षण आणि वस्तुजाति व तिचें लक्षण, यांवरूनच अॅरिस्टॉटलनें शास्त्रारंभ ठरविल्यामुळें सर्व सृष्टींत व तिच्या निरनि-राळ्या आविर्भूत स्वरूपांत नित्यनियमांचें साम्राज्य आहे व असतें हें अॅरिस्टॉटलच्या ध्यानांत आलें नाहीं. सामान्य विशेषाच्या दृष्टीनें जेवढें शास्त्रनियम प्रकट झाले, तेवढेंच शास्त्र असा अॅरिस्टॉटलचा ग्रह असल्यामुळें, शास्त्र ह्मणजे ज्ञातृज्ञानाच्या साहाय्यानें ठर-लेले नियम असा अर्थ झाला. ज्ञेयज्ञानाचा ( Objective Knowledge ) येथें फारसा विचार झाला नाहीं.

अॅरिस्टॉटलचें 'शुद्धस्वरूप' ( Pure Form ) व प्लेटोचा 'आनंद' ( The Highest Good ) हीं एकच होत. तें शुद्धस्वरूप नित्य, अविकारी, अचल, मुक्त, सर्वव्यतिरिक्त, अजड व सर्वकर्तृत्व, ज्ञानस्वरूप असें आहे. हें शुद्ध अस्तित्व आहे. सर्व कल्पना येथें अस्तित्वरूपांत आहेत. सारांश हाच देवेश्वर होय. सारांश, अॅरि-स्टॉटलनें आत्मैक्यत्व, **परमात्मा** स्थापित केला. तो जडविलक्षण आहे. जडावर तो कार्य करितो, याचा अर्थ जडाला ईश्वराकडे जाण्याची प्रवृत्ति होते हा होय. जड ( अव्यक्त प्रकृति ) हें **व्यापार्य** परंतु **व्यापारकर्तृ** नव्हे. ईश्वर हा **व्यापारकर्ता** पण **व्यापार्य** नव्हे. इतर सर्व वस्तु ( प्रकृति ) व्यापार्य व व्यापारकर्त्या आहेत. ह्या प्रकृतींतील सर्व चराचर वस्तु परस्परसंबद्ध असून त्यांचीं नित्यशः उत्क्रांति होत असून व श्रेष्ठ, श्रेष्ठतर स्वरूप त्या प्राप्त करून घेतात व शेवटीं 'शुद्धस्वरूपाप्रत' जातात. ईश्वर हा अस्तिरूप व ज्ञानरूप असल्यामुळें वस्तूंच्या उत्क्रांतींतही अस्तिरूप व ज्ञानरूप हीं क्रमशः वस्तूंत मिळतातच.

**जीव हा अशरीर आहे. मानसिक व्यापार हे शारीरिक व्यापाराहून विलक्षण व त्या व्यापारास स्वरूप देणारे आहेत. जीव ज्ञानस्वरूपी, वास्तविक आणि शरीरनियामक आहे.**

त्याचें प्रथम स्वरूप वनस्पतिसृष्टींत गोचर होतें. तेथें तो गत्यात्मक (Mechanical) व रासायनिक (Chemical) व्यापार करीत असून इष्ट अशीं अन्नपरिपाकाची व प्रजोत्पादनाचीं कार्यें करीत असतो; प्राणिकोटींतील जीव स्वयंभूतःच इष्टगामी असतो. त्याला इच्छा (Desire) असते व सुखदुःख हे गतिप्रचोदना करितात. म्हणजे सुखदुःखामुळें व सुखदुःखा-साठीं तो हाचचाल करितो. येथें अस्मितेचा, जाणीवेचा (Consciousness) उद्भव होतो. मनही उद्भूत झालेलें असून पदार्थज्ञानासह संख्या, गति इत्यादिकांचें ज्ञान होतें. मनुष्य कोटींत **विवेकाचा उद्गम** होतो, प्रचोदनेला (Impulse) इच्छेचें (will) स्वरूप येतें; म्हणजे प्रचोदनेमध्यें इष्टकार्याचें स्वरूप व त्याचीं साधनें यांचा विकास स्पष्ट झालेला नसतो. इच्छा किंवा मनीषा उद्भूत झाली म्हणजे आपल्यास काय करावयाचें आहे त्याचें स्वरूप तें घडवून आणण्याचीं साधनें आणि तें कार्य करावयाचें हा मनःसंकल्प ही सर्व मालिका स्पष्ट असतें. असो; कल्पनाशक्ति कर्तृत्वशील (Active) होते आणि विवेकही कार्यक्षम होतो. नीतीचें व अनीतीचे प्रश्न येथें उत्पन्न होतात; आणि स्वतःच्या बुद्धियोगानें कर्तव्यकर्माचरण केलें म्हणजे सुख मिळवितां येतें. तत्वविचार करणें व कर्तव्यकर्म करणें अथवा श्रीकृष्णाच्या सिद्धांतानुसार सांख्य व कर्मयोगाचें संमेलन निष्कामवृत्तीनें करणें मनुष्यजन्मांतच अभ्यासानें शक्य व सुखकर होतें. नीतीचें पर्यवसान राजनीतीमध्यें होतें. नीति, राजनीति, ललितकला यांची वाढ मनुष्यकोटींतच होऊं शकते.

पण शास्त्रज्ञान व तत्त्वज्ञान वृद्धिंगत करणें हें मनुष्याचें आद्य व मुख्य कर्तव्य आहे. ब्रह्मज्ञान झालें असतां दिव्य दृष्टि येऊन ज्ञानरूप प्रकट होतें आणि परमेश्वराच्या शुद्ध व निर्मळ आनंदाच्या ज्ञानरूपांत जीवाचें ज्ञानरूप मिळून जातें हा तत्त्वज्ञानाचा महिमा होय.

**अरिस्टॉटलच्या** मरणानंतर अनेक पंथ (सुखवादी-Epicurians, सद्गुण वादी-Stoics, स्याद्वादि Sceptics इत्यादि) झाले. पण अरिस्टॉटलचा ज्ञान-मार्ग जशाचा तसा कायम राहिला. कांहीं फेरफार झाले, पण ते येथें नमूद करण्या-सारखे नाहींत. तर्कवितर्क मात्र बरेच वाढले.

पुढें नुसत्या मानवी ज्ञानाचा विकास कितीही झाला तरी सद्गुण वाढत नाहींत व खरें सुखही मिळत नाहीं, नुसतें पांडित्यप्रदर्शन मात्र होतें, व अनाचार वाढतो, असें आढळून आलें; तेव्हां ईश्वराची व धर्माची मदत मिळवून समाधानाची प्राप्ती करून घ्यावी, हें मत उत्पन्न होऊन खिश्चियानिटीचा प्रसार झाला. कारण त्या वेळीं अनाचार फारच माजला होता व **जीजस**प्रणीत धर्म, हा नवा, तरुण, शुद्ध व सात्विक असून मनोवृत्तींचें समाधान करणारा होता. या धर्मानें ग्रीक लोकांचे तत्वज्ञानाचा अंगीकार केला, आणि लोकांवर व पंडितांवर आपली छाप बसविली.

**फायलो** नामक तत्ववेत्ता म्हणतो कीं, मनुष्यांचे सद्गुणाचा उद्भव व स्थिति त्यांच्या अंतःकरणांतील नियामकाकडून ( logos ) होते. स्वत्याग केला आणि ईश्वर-स्वरूपांत मिळण्याचा प्रयत्न केला म्हणजे ईश्वरी ज्ञान होतें. **'ईश्वर पाहण्यास ईश्वरच झालें पाहिजे'** ब्रह्म वेद ब्रह्मैवभवति ईश्वरत्व मिळवावयाचें असल्यास जीवानें निष्क्रिय व चिंताशून्य झालें पाहिजे. हीच समाधी होय. **प्लोटिनस** म्हणतो कीं, समाधि ही विचारापेक्षां श्रेष्ठ आहे ( श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ). कारण विचार हें कर्म, जिज्ञासाजन्य आहे. पण समाधि हें ईश्वरी ज्ञना असून ईश्वरस्वरूपांत रममाण झाल्यानंतर मिळणारी विश्रांति आहे. हें समाधिसुख मिळण्याला ईश्वरी कृपा तर हवीच; पण मनुष्यानेंही विषय व विषयवासना यांचा त्याग केला पाहिजे; तसेंच इतर सर्व विचारांचा त्याग करून त्यानें अंतर्यामीं दृष्टि करावी. तसेंच प्रेम, सत्य व श्रद्धा या साधनांनीं समाधि साधावी. श्रद्धा ही सर्व श्रेष्ठ आहे. हिच्या साहाय्यानें ईश्वराशीं एकात्मकत्व होऊन अखंड सुखाची अवाप्ति होते. प्लाटिनस तिसऱ्या शतकांत झाला. **यानें पुनर्जन्मही कबूल केला आहे.** परमात्मा हा एकच असून अनेकांचा अंतर्भाव करणारा आहे. स्वतःच्या सामर्थ्यानें तो विश्व उत्पन्न करितो. सारांश हें विश्व ईश्वरविचारांची लीला आहे, जीवाचा आत्मा ईश्वरांश आहे. एवंच सर्वच आत्ममय आहे. परमात्मा हा सच्चितांच्या पलीकडचा, अनंत, निराकार, दृश्य व चिंत्य विश्वांच्या पलीकडचा, स्थाणु व ज्ञानातीत आहे. वेदांता जवळ जवळ हें मत येतें नाहीं ?

श्रद्धाळु ख्रिस्तीलोक मात्र ईश्वर सगुण व नित्यकर्तृत्वशील आहे, असें म्हणत असत.

प्लाटिनसच्या मताप्रमाणें "प्रकृति ( matter ) हें आत्मिक ( सत् ) नाही व जड ( असत् ) ही नाहीं. प्रकृति ही अनात्मिक आहे असें तो म्हणतो. प्रकृतिच पापाचें मूळ आहे. आतां प्रकृति जर नाहींच आहे, तर पापही नसलें पाहिजे. हल्लीं ज्याला आपण पाप म्हणतों, **तो पुण्याचा अभाव आहे. जीवाला विषयाची इच्छा होणें हें पाप आहे:** जीवानें आपली आत्मस्थिति सोडली व विषयेच्छा धरिली म्हणजे तो पापकर्मा होतो."

या त्रोटक विवेचनावरूनही प्लाटिनस वेदांताच्या किती जवळ आला होता, हें स्पष्ट होईल.

उत्तरेकडील व्रात्य व रानटी लोकांनीं रोमन बादशाही पालथी घातल्यानंतर सर्व यूरोपभर अज्ञानसमुद्र पसरतो कीं, काय, अशी भीति पडण्यास कारणें जिवंत होती; पण ख्रिस्तमतांचा स्वीकार या रानटी औदिच्य लोकांनीं केल्यामुळें पूर्वीचें तत्त्वज्ञान जिवंत राहिलें. या तत्वज्ञानांत अयुक्त धर्मविधींची भेसळ होऊन पूर्वीचें शुद्ध स्वरूप राहिलें नाहीं हें खरें; तरी पण सर्वच स्वाहाकार व्हावयाचा तो बंद होऊन निदान ज्ञानमार्गाचा

कांहीं अंश जिवंत राहिला. पण काय ? तो ज्ञानमार्ग धर्माध्यक्षांच्या हातांत सांपडला; त्यास कोणी विचारणारा राहिला नाहीं; सर्व गृहस्थ धर्मबंड झाले, यामुळे पांडित्यप्रदर्शन व उदरंभरण हेच दोन हेतु कायम राहून तत्वज्ञान मलीन झाले, त्याची प्रगति खुंटली, शोध करण्याला तपश्चर्या अस्तंगत झाली आणि धर्मप्रवृत्ति करणारे 'भिक्षुक लोक' उन्मत्त, अनाचारी व धर्मभोळे झाले. ह्या इतक्या गोष्टी झाल्या, तथापि पांडित्यप्रदर्शनासाठीं ज्या मोठाल्या सभा होत, व तेथे वादविवाद होत त्या सभांत शब्दांची, लक्षणांची, तर्कवादाची छाननी होऊं लागल्यामुळे, वादाची व शोधांची शस्त्रास्त्रे तीक्ष्ण, तेजस्वी व लखलखीत राहिलीं. हा सर्व ख्रिस्तीधर्माचा युरोपियन जगावर उपकार आहे. पुढे १५ व्या शतकांत रोमन बादशाही सर्वथा नष्ट झाल्यामुळे हे धर्मप्रवर्तक व धर्मप्रचारक आपआपलें चंबुगवाळे आटपून सर्व यूरोपभर पसरले. तेव्हां शिक्षणाचा, ज्ञानाचा व तत्त्वज्ञानाचा पुनर्जन्म होऊन इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, जर्मनी, डेन्मार्क इत्यादि तरुण देशांत ज्ञानप्रसार लोकच्छंदानुरूप झाला व त्याला निराळेंच स्वरूप येऊन ज्ञानांत, शास्त्रांत व तत्वज्ञानांत एक मोठी क्रांति कायमची झाली. याच वेळा नवीन शोध करण्याची हौस उत्पन्न होऊन अमेरिका खंड सांपडले, हिंदुस्थानास जाण्या येण्याचा नवाच मार्ग निघाला, इत्यादि गोष्टींनीं नवीनच तयार होणाऱ्या ज्ञानवृक्षास उत्तम प्रकारचा मालमसाला घातला गेला आणि ज्ञानवृक्ष झपाट्याने वाढण्याला सुरवात झाली. पूर्वज्ञानावर अश्रद्धा व नवीन ज्ञान मिळविण्याची अतोनात हौस उत्पन्न झाल्यामुळे वरील मनक्रांतीस विशेषच जोर आला. ह्या नवीन पंथांतील तत्त्वज्ञान समजून घेऊन हे प्रकरण आटपूं.

प्रथम मनुष्यप्रणीत शास्त्रांनीं धर्मोपसिद्धांताविरुद्ध बंड केले. प्रत्येक पुरुष स्वतः **विचार करूं लागला.** रोमची किंवा पारिसची ज्ञानसत्ता इतर देशांनीं झुगारून दिली व प्रत्येक राष्ट्र पुनः सर्व गोष्टींचा विचार करूं लागले. धर्माध्यक्षांत वादविवाद युद्धे सुरू झालीं. ह्याच वेळीं छापण्याची युक्ति निघाल्यामुळे सरस्वती देवीचा दरबार सर्वांस खुला झाला; ऐहिक जगाच्या व्यवस्थेत ( तत्वमीमांसेत ) पुष्कळांनीं मन घातलें; ( १ ) राजकीय प्रश्नात मन घालून काम करणें, ( २ ) सुधारणेचीं वस्त्रोपवस्त्रें स्वीकारणें, ( ३ ) यूरोपच्या बाहेर युरोपच्या सुधारणेचे साम्राज्य स्थापन करणें, आणि ( ४ ) नवीन ललितकलांस उत्तेजन देणें—या नवीन ऐहिक तत्त्वज्ञानाच्या कांहीं गोष्टी होत. धर्माचें बंधन नाहींसे झाल्यामुळे निदान शिथिल झाल्यामुळे प्रथम प्रथम अनाचारही झालें. पण नवीनच आलेल्या पाण्यावरच्या बुडबुड्याप्रमाणे हे अनाचार क्षणभंगुर होते. वरील सर्व विषयांचा स्वीकार करून पुनः तत्त्वज्ञान **स्वस्वरूपाचा शोध करावयास लागलें** हें सांगावयास नकोच. असो. या ज्ञानाच्या पुनर्जन्माने प्रथम विश्वज्ञानाकडे आपलें तरुण लक्ष लावण्यास सरस्वती भक्तांनीं आरंभ केला. पुढे उडी मारावयाची असली म्हणजे जसा उडी मारणारा जवान कांहीं पावलें मागे जातो, त्याप्रमाणे या कालांतील नवीन पंडितांनी लॅटिन भाषेतील सारस्वतावर भिस्त न ठेवितां ग्रीक तत्वज्ञानाचा

अभ्यास शुद्ध ग्रन्थाच्या साहाय्यानें म्हणजे ग्रीक भाषा शिकून केला. (१) ग्रीक अध्यात्माचा मध्यकालीन लोकांनीं केलेला घोंटाळा मोडणें, (२) कांहीं गोष्टी आधारा शिवाय गृहीत घेऊन त्यांपासून अनुमानें काढण्याची पद्धति बंद करणें, (३) सुंदर भाषेत स्वविचार प्रकट करणें हीं या नवीन पंथांचीं मुख्य कामें होतीं. या वेळीं सामान्यतः नास्तिकपणा जोरावत नव्हता, तरी धर्माचें जें जुन्या पद्धतीनें प्रवचन होत असे त्यावर कोणाचा फारसा विश्वास नव्हता. 'सर्व विश्व सुंदर व सजीव आहे, तें एकात्मक आहे, तें ईश्वरी इच्छेचें एक व्यक्त स्वरूपच आहे, ईश्वरच त्याचें उपादान कारण व निमित्त कारण आहे, विश्व हें ईश्वरी स्वरूपाचें जन्मशील रूपांतर आहे, ईश्वर सर्वज्ञ सर्वसाक्षी आहे' इत्यादि कल्पना पुनः या वेळीं हळूहळू प्रकट झाल्या. मनुष्यानें स्वस्वरूप जाणिलें म्हणजे त्याला विश्वज्ञान होते, तसेंच आपल्यास शक्ति, ज्ञान व इच्छा आहे, ह्यावरून परमेश्वर सर्वशक्ति, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वनियंता व सर्वमंगल गुणगणात्मक असला पाहिजे, हेंही मत प्रकट झालें. सृष्टि हें ईश्वर स्वरूप आहे, ह्मणून अज्ञेय ईश्वराचें स्वरूप सृष्टांतच पाहण्याचा छंद उत्पन्न होऊन गणित, ज्योतिष, शारीरिक शास्त्रांचा शोध जास्त जोरानें झाला. **ब्रुनो, क्यांपेनला, बोहिमी** हे या चळवळीचे प्रवर्तक होत. तथापि अध्यात्माचें (metaphysics) वर्चस्व अद्यापि बरेंच कायम असल्यामुळें प्रकृतीच्या राज्यांत जे नवे प्रयोग, नवे शोध व नवे सिद्धांत येणें अवश्य होते तें काम शिथिलपणानें मात्र झालें. पण हा ग्रंथ लवकरच आटपला आणि शास्त्रीयपद्धतीची व प्रयोगाची सुरवात अवतीर्ण होऊन ज्ञानमार्गास नवीनच दिशा लागली. **केप्लर, ग्यालिलियो, न्यूटन** यांनी गणित व ज्योतिषामध्यें पुष्कळच मतक्रांती केली. **बेकन** हा प्रयोगशास्त्राचा मुख्य प्रणेता आहे. **डेकार्ने** अर्वाचीन युरोपियन तत्वज्ञानाचें जनकत्व संपादन केलें आणि **स्पायनोझा व लाग्निज** या दोघांनीं डेकार्चे मताला परिपक्वता देऊन तें मत पुष्ट केलें.

## तत्वज्ञानाची पद्धति.

**बेकन**नें अनुमिति पद्धतीवर (Deductive Method) हत्यार उचलून असें सिद्ध केलें कीं, नवीन शोध करावयाचे असतील तर अनुमिति पद्धतीला कायमची रजाच दिली पाहिजे. कारण अनुभवाचा विचार न करणारी अनुमिति अर्थातच शोध करण्याचे कामीं कुचकामाची आहे. नवीन शोध करण्यास व्यक्तिशः पदार्थांचीच आराधना केली पाहिजे; मनांतील सांप्रदायिक दुराग्रह असतात त्यांचा म्हणजे जात्यभिमान, स्वाभिमान, विद्याभिमान इत्यादि अभिमानांचा त्याग करून विशुद्ध मनानें 'सृष्टीनिरीक्षण व अनुभवशोधक प्रयोग' या पद्धतीचा स्वीकार केला पाहिजे आणि सृष्टीनें आपलीं रहस्यें सांगावीं अशी इच्छा असेल तर तिची आराधना एकनिष्ठेनें केली पाहिजे. ही अनुगम पद्धति (Inductive method) होय. अन्वयव्यतिरेकानें

या पद्धतीला शास्त्रीय स्वरूप येतें. जेथें धूम असतो तेथेंच अग्निही असतो. हा **अन्वय** होय. याचप्रमाणें जेथें अग्नी नसतो तेथें धूमही नसलाच पाहिजे, हा व्यतिरेक **होय.** अन्वयव्यतिरेकानें पदार्थांचें स्वरूप समजतें. सृष्टीचा परिचय करून घेऊन सामान्य, सामन्यतर व सामान्यतम सिद्धांत हुडकून काढिले पाहिजेत तरच मनुष्यजीवित्वाचें सार्थक्य व ईश्वरीशक्तीच्या ज्ञानाचा विस्तार होईल.

याच वेळीं होकायंत्र, बंदुकीची दारू, छापण्याची कला, इत्यादि नवीन कलांचा शोध लागल्यामुळें '**ज्ञान संपादिलें असतां मनुष्य हा प्रकृतीचा नियंता होईल**' या **बेकन**च्या ह्मणण्याला पुष्टि येऊन सर्व शोधकपुरुषांचें चित्त सृष्टिपरीक्षणाकडे लागलें. पण ही सकाम भक्ति झाली. सकामत्व आलें कीं स्वरूपज्ञान संपलेंच ह्मणून समजावें. सुदैवानें निष्कामतः सृष्टीचा शोध करणारे लोक याच वेळीं उत्पन्न झाले. त्यांच्या निष्काम श्रमाचें फल ह्मणजे युरोपांत आज जी आधिभौतिक उन्नति झाली आहे ती होय. या चळवळींत कांहीं नास्तिक तत्वज्ञ '**टालस**' सारखे झाले व 'पदार्थ ह्मणजे गत्यात्मक अवस्थांतरें, त्यांचें कारणही गत्यात्मक व कार्यही गत्यात्मकच! एतावता तत्वज्ञान ह्मणजे पदार्थगतागताचे संग्रहात्मक ( Synthetic ) सिद्धांत होत!' असेंही नास्तिक सिद्धांत प्रकट झाले.

डेकार्ट हा उत्कृष्ट गणिती होता. गणिताचें ज्ञान हेंच काय तें निश्चितज्ञान आहे, असा त्याचा समज होता. त्याचा हेतु असा होता. 'असें एक परात्पर व ध्रुवतम तत्त्व अनुगम पद्धतीनें ( Induction ) व पृथक्करण पद्धतीनें ( Analysis ) शोधून काढावयाचें कीं, ज्याच्या योगानें व संग्राहक पद्धतीच्या ( Synthesis ) साहाय्यानें सर्व ज्ञेयाचा व ज्ञानाचा उलगडा होईल.' हें तत्त्व पृथक्करण पद्धतीनें शोधून काढण्यासाठीं **डेकार्टनें** आपल्या स्वतःच्या ज्ञानाचें परीक्षण केलें. 'निरनिराळीं मतें सर्वच एककालीं खरीं असण्याचा संभव नाहीं, प्रत्येक वेळीं पदार्थांचें भिन्न ज्ञान होतें, गणितांतील सिद्धांत खोटे होण्याचा संभव आहे,' इत्यादि प्रकारें सर्व ज्ञानाविषयीं साशंकता प्रकट करितां करितां शेवटीं 'मी संशयी, संशयखोर आहे' हा प्रश्न विचारतांक्षणींच 'मी आहे' व मी आहें याचें भान मला आहे, हा सिद्धांत अर्थापत्तीनें निश्चित ठरतो; कारण **मी असल्याविना**, माझें अस्तित्व असल्याशिवाय, मला संशय घेतां येणें अथवा माझ्या अस्तित्वासंबंधें साशंक असणें शक्यच नाहीं. सारांश अस्तित्वाचें व जाणीवेचें अस्तित्व ठाम आहे. याच्या योगानें प्रत्यक्ष अनुमितिप्रमाणें काम करूं शकतील. पण अनुमितीला किंवा इंद्रिय प्रत्यक्षाला '**अस्मिता**' '**ज्ञातता**' **सिद्ध करितां येणें शक्य नाहीं.** तें आत्मप्रत्यक्ष ( Intuitive ) ह्मणून सत् आहे. असले जे आत्मप्रत्यक्ष सिद्धांत असतात तेच कायते खरे असतात. 'आतां मी परिछिन्न आहे ह्मणून अपूर्ण आहें. अपूर्णाची कल्पना पूर्णाशिवाय येणें शक्यच नाहीं. मी पूर्ण

नाहीं व मी सभोंवार ज्या वस्तु पाहतों, त्याही पूर्ण नाहींत; तेव्हां मजमध्यें असलेली पूर्णाची कल्पना पूर्ण पुरुषानें–पुरुषोत्तमानेंच उत्पन्न केली असली पाहिजे. तेव्हां पूर्ण असा ज्ञाता–परमेश्वर–असला पाहिजे. (२) ईश्वर पूर्ण आहे ह्मणून तो मला फसविणार नाहीं; म्हणून माझी पूर्णाची कल्पनाही खरी असली पाहिजे. (३) तसेंच माझ्या विवेकबुद्धीला ज्या स्पष्ट आणि निश्चित सिद्धांतवस्तु, जे सिद्धांत दिसतात, तेही पूर्ण ईश्वराच्या सत्यत्वानें व सत्यत्वामुळे खरेच असले पाहिजेत. गणिताचे सिद्धांत स्पष्ट व निर्मळ असतात; तेव्हां ते सर्व खरेच असले पाहिजेत. (४) इतर शास्त्रांत इतकें सत्य असणें शक्य नाहीं; तेथें खरें खोटें ह्मणणें आपल्या विवेकावर नव्हे, तर इच्छेवर अवलंबून असतें. हें डेकाचे सिद्धांत होत.

ह्या पद्धतीला **स्पायनोझानें** परिपक्व दशेस आणून एक नवीनच तत्त्वज्ञान सिद्ध केलें. डेकानें सांगितल्याप्रमाणें स्वच्छ व निश्चित सिद्धांत घेऊन त्यांच्या साहाय्यानें स्पायनोझा हा नीतिशास्त्रावर एक ग्रंथ लिहिता झाला. व गणिताचा निश्चितपणा व स्वच्छपणा या शास्त्रांत गोंविता झाला. एकरूपात्मक ईश्वरी तत्वापासून सर्व वस्तु उत्पन्न होतात व ईश्वराच्या सत्यसंकल्पी मनांत ज्या कल्पना (ideas) उद्भूत होतात, त्यांच्या दैवी उत्पत्तीनें असा कांहीं अद्भुत कार्यभाग होतो कीं, त्या कल्पनांचा मनुष्याच्या मनांत अवतार होतो व त्या आपले सत्यत्व प्रस्थापित करितात. जशा क्रमानें वस्तु उत्पन्न होतात, तोच क्रम तत्त्वज्ञानाचा धरला ह्मणजे तत्त्वज्ञानाचें काम झालें असें स्पायनोझा ह्मणत असे.

**लायब्निझ** हाही डेकाचाच अनुयायी आहे. शोध करितां करितां याला असें आढळून आलें कीं, विवेकबुद्धीला प्रत्यक्ष असणारे (१) सामान्यसिद्धांत हे नित्यसत्य असतात; तसेंच **आपल्या इंद्रियांस सत्य** (स्वच्छ व निश्चित असतात ह्मणून) **वस्तु दिस**तात. (२) पहिली सत्यें विरोधशून्य असतात. उदाहरणार्थ 'सर्व हें आपल्या एका भागापेक्षां मोठें असतें' याच्या उलट आपल्याला कल्पनाही करितां येत नाहीं. **ह्मणून ज्याच्या उलट विवेकबुद्धीला कल्पनाही संभावितां येत नाहीं, तो सिद्धांत अत्यंत व निरुपाधिकतः खरा होय.** पण 'पृथ्वी फिरते' याच्या उलट विवेकबुद्धीला कल्पना करितां येईल. ही **कल्पना**च असेल, वस्तुस्थिति तशी नसेल हा प्रश्न निराळा; पण उलट कल्पना करितां येते, ह्मणून असले सिद्धांत सोपाधिकसत्यत्वाचे (सापेक्षसत्यत्वाचे) असतात. ही गणिती व प्रयोगीपद्धतीची त्रोटक हकीकत आहे.

## वस्तु आणि कारणता.

या गणिती व प्रयोगी पद्धतीनें जादु, भविष्यकथन व किमया इत्यादिकांस रजाच घ्यावी लागली! 'जड सृष्टीच्या मागें चिद्रूपी सामर्थ्य आहे' अशी जुनी कल्पना

लयास गेली. विश्वामध्यें जी उत्क्रांति होते, तिचीं कारणेंही विश्वगतच असलीं पाहिजेत व जर मनुष्याला कार्यकारणभावासंबंधानें प्रत्यक्षज्ञान मिळवावयाचें असेल, तर त्यानें विश्वगत कारणांचा शोध केला असतां तीं त्यांस सांपडतील. ' ईश्वरी इच्छा अगर ईश्वरी हेतु कळण्यास मनुष्याजवळ कांहीं साधन नाहीं. ' हें बेकन ग्यालिलियो आणि डेका याचें मत होतें. स्पायनोझा, स्पष्ट ह्मणे कीं, ईश्वराच्या नित्यस्वभावानुरूप जीं नित्य कार्यें अपरिहार्यतः व्हावयाचींच, तेथें ईश्वराचा हेतु अमुक होता व तो मनुष्यासंबंधें अमुक होता, ' हें मनुष्यास कळतें असें ह्मणणें, यासारखा मूर्खपणा दुसरा कोणताही नाहीं. **ईश्वराचा हेतु म्हणून एखाद्या गोष्टीचा उलगडा करूं पाहणें हें शास्त्र नव्हे.** या सृष्टीच्या व सृष्टिगत पदार्थांच्या उत्पत्तिस्थितिलयाची जी घडामोड चालली आहे, याला कारण सृष्टींतील सामर्थ्येंच होत; निदान, तींच मात्र सामर्थ्यें कळण्याची शक्ति मानवी प्राण्यास आहे; ईश्वरी हेतु मानवी प्राण्यास कळतो अथवा कळेल असें ह्मणणें म्हणजे निवळ साहसी मूर्खपणा होय, असेंही या मंडळीचें मत होतें.

याच वेळीं अंतर्विश्व व बाह्य विश्व—चित्त आणि जड, ज्ञान व ज्ञेय–यांमध्यें घटस्फोट झाला. या दोहोंमध्यें केवळ गुणभेद आहे इतकेंच नव्हें, तर जातिभेद, स्थितिभेद व गतिभेदही आहेत, असें ठरलें. म्हणजे ज्ञात्याचे व ज्ञेयाचे गुण निरनिराळे आहेत इतकेंच नव्हे तर उभयतांचा जातिभेद व कर्मभेदही आहे. मानसिक जगांत चिद्विकारांचे व्यापार होतात, बाह्यजगांत ते नसतात. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादि गुण पदार्थांमध्यें नसतात. ह्या सर्व मानसिक चिद्विकारांच्या क्रिया आहेत. शब्दादिकांची प्रकटता होते, तो देखील मानसिकच व्यापार होय. जडाचे खरे व मुख्य गुण म्हणजे त्याचा आकार, ( वर्तुळ, लांबोडा, वगैरे ) लांबीरुंदी, त्याची स्थिति ( उभा, बसलेला, पडलेला इत्यादि) आणि गति हे होत. 'अभेद्यता' (Impenetrability) हाही जडाचा गुण आहे. ' आकाश व काळ हे मनाचे धर्म असल्यामुळें गणितशास्त्राला सत्यत्व प्राप्त होतें, व पदार्थांचें ज्ञान करून घेतां येतें. आत्मिकज्ञान ईश्वरीप्रेरणेनें मात्र शक्य आहे; असें हाब्स ह्मणत असे.

डेकार्टच्या मतें विश्वांत दोनच पदार्थ आहेत; एक आकाशव्याप्य ( सर्वजड ) व दुसरा चिद्व्याप्य विचार ( जाणीव; Consciousness ); जडात्मक व ज्ञानात्मक, असे दोन पदार्थ होत. जडाला ज्ञान नाहीं व ज्ञानाला जडत्व नाहीं. हे परस्परविरोधी आहेत. जडांत व्यापकता व विकार्यता आहेत ह्मणून तें सत्य आहे व अस्मिता हा मनाचा धर्म आत्मप्रत्यक्ष आहे, ह्मणून मन सत्य आहे. या परस्पर विलक्षण चिज्जडांस अधिष्ठान पूर्ण सत्यत्वानें असणारी वस्तु म्हणजे परमेश्वर होय. चित् व जड हीं दोन्हीं परिच्छिन्न, सावधि (Finite) आहेत, ईश्वर निरवधि, अपरिच्छिन्न (Infinite) आहे.

चित्ताचे व जडाचे जे निरनिराळे विकार त्यांस गुण ( Attributes ) असें ह्मणावें. आकारादिभेदानें जड वस्तूंचें अनेकत्व सिद्ध होतें. जाणीवेच्या भेदानें निरनिराळीं मनें ( जीव ) सिद्ध होतात. म्हणजे जीवांचें अनेकत्व ठरतें.

**स्पायनोझा** हा डेकार्टचा पट्टशिष्य होता. डेकार्टचें मत ह्यानेंच परिणत केलें, हें आतांच वर सांगितलें. आकाश व चैतन्य ह्या दोन्ही वस्तु परस्पर विलक्षण व परस्पर व्यतिरेकी (Independent of each other) आहेत, हें गुरु डेकार्टचें मत शिष्याला मान्य होतें, पण त्यानें प्रतिपादिलें कीं, जडाची जी अनंत संतति आहे व आकारगत्यादिकांनीं जे अनंत भेद होतात, ती संतति व ते भेद हे केवळ **व्यापकतेचे प्रकार** होत. त्याचप्रमाणें जाणीवेचे कल्पना, इच्छा, संकल्प इत्यादि अनेक भेदांनीं जी मनाची अनंत संतति अस्तित्वांत येते ती केवळ **जाणीवेचे** भिन्न **प्रकारच** होत. तेव्हां या परिच्छिन्न **प्रकारांस** 'वस्तु' असें कसें म्हणतां येईल? वस्तु म्हणजे ती होय की, जिचे ( १ ) व्यापकता व ( २ ) जाणीव हे गुणधर्म आहेत. अर्थातच असली वस्तु म्हणजे निरवधि परमेश्वरच होणार. सारांश, **परमेश्वर ही वस्तु** आहे. व्यापकता व जाणीव हे परमेश्वराच्या अनंत गुणांतील **दोन मनुष्यगोचरगुण** होत; आणि इतर सर्व परिच्छिन्न पदार्थ हे त्या दोन गुणांचे **प्रकार** होत. ईश्वराचे व्यापकता व जाणीव हे गुण स्वरूपानें व्यक्तिशः व सर्वशः एकरसात्मकच आहेत, म्हणजे उदाहरणार्थ ईश्वराच्या जाणीवेंत बुद्धि, इच्छा इत्यादि भेद नाहीं व व्यापकतेंत आकार, गति इत्यादि भेद नाहीं. 'तो आहे' यापेक्षां ईश्वरासंबंधें जास्त कांहीं सांगतां यावयाचें नाहीं.

परिच्छिन्न पदार्थांचें व त्यांच्या अवस्थांचें मानवीज्ञान उन्नत झालें ह्मणून तें आकाशव्यापकता व जाणीव या दोन्हींमध्यें अंतर्भूत होतें. दोन्हींही अपरिच्छिन्न ईश्वराचे गुण आहेत हें आतांच सांगितलें. ईश्वरास वर्णावयाचें झालें तर 'तो हें नाहीं, तें नाहीं ( नेति, नेति ) असेंच ह्मटलें पाहिजे. पण तो सर्वज्ञ, सर्वव्यापक आणि सर्वाधिष्ठान आहे, ह्मणून तो गुणस्थापक व प्रकारभेदकही होतो. प्रकारभेदानें प्रत्येक गुण ईश्वराचें अनंतत्व घेतो. म्हणजे जाणीवेचे अथवा आकाशाचे इतके अनंत भेद आहेत, इतके अनंत प्रकार आहेत कीं, जाणीवेला 'अनंत' मानिल्याशिवाय गत्यंतर नसतें. ह्याच प्रकार आकाशाचा आहे. एवंच सर्व पदार्थांत अनंत ईश्वर आहे व सर्व पदार्थ ईश्वरांत आहेत. तोच त्यांचें उपादान व निमित्तकारण आहे; सर्वच तो आहे. हेंच **स्पायनोझाचें** अद्वैत होय.

जगांतील सर्व व्यापार गत्यात्मक आहेत; कारण व कार्य गत्यात्मक असतात हें वर सांगितलेंच आहे. डेकार्टनें ठरविलें कीं, विश्वांतील गतीचा संचय अगणित परंतु निश्चित आहे. गति एका स्वरूपांतून दुसऱ्या स्वरूपांत जाईल, इतकेंच;

पण नवीन गति उत्पन्न होणें शक्यच नाहीं. खनिजसृष्टि, वनस्पतिसृष्टि, जीवसृष्टि कोणतीही सृष्टि घेतली तरी हाच नियम लागू पडतो. जाणीवेच्या राज्यांतही या शारीरिक ( Physical ) गतीनें प्रवेश करून इच्छा, सुख आणि दुःख हे विकार उत्पन्न केले. वरील विकार इंद्रियांवर झालेल्या पदार्थांच्या आघातानुसार, उत्पन्न होतात, असें बेकन व हाब्स यांनीं ठरविलें. डेक्का हा सर्व मनोवृत्ति, आश्चर्य, राग द्वेष, इच्छा, सुख आणि दुःख यांपासून उत्पन्न करितो, पण या सहांचा उगम तो आत्मप्रत्यक्ष सत्यापासून करितोसें दिसतें. नाहीं तर व्यापकता व जाणीव या परस्पर-विरोधी गुणांचा अघटित म्हणून चमत्कारिक संयोग मनुष्याच्या मनोभूमिकेवर होऊन जडाचा जाणीवेवर संस्कार होतो असें डेक्का म्हणतो असें होईल ! पण स्पायनोझा हाब्सचें अनुकरण करून मनोवृत्तींचा उगम बाह्य गतिसंचयांतच करितो.

या तत्वज्ञानांत, गतिसंचयाच्या नियमितेंत ( Conservation of motion ) अर्थातच मानवी 'इच्छास्वातंत्र्याला' जागाच राहत नाहीं. म्हणजे अर्थ असा कीं, गतिसंचयाचें प्रमाण निश्चित आहे ( Conservation of energy ) असें ठरविलें. गतिसंचय निश्चितप्रमाणाचा आहे, असें ठरलें म्हणजे तात्विक दृष्टीनें इच्छा स्वातंत्र्याला ( नवीन गत्युद्भवाला ) जागाच राहत नाहीं, संधिच मिळत नाहीं. एक ईश्वर कायतो स्वतंत्र आहे. मानसिकशास्त्रदृष्ट्या कोणीच स्वतंत्र नाहीं. नीतिदृष्टीनें इतकें मात्र शक्य आहे कीं, विवेकानें आपले रागद्वेष शांत व नियमित करण्याचा पुरुषार्थ ध्यानांत ठेवितां येईल.' सारांश इच्छा स्वतंत्र नाहीं असें स्पायनोझा म्हणतो.

ईश्वर हा सर्व परिछिन्न वस्तूंचें अधिष्ठान आहे. तो सर्व-कारण आहे; म्हणजे त्याच्या स्वरूपापासून-त्या अधिष्ठानापासून-परिछिन्नाला अस्तित्व येतें. परिछिन्नाचा परिछिन्नावर संस्कार होतो व ते एकमेकांचा उत्पादक-कारणें होतात, तसा ईश्वर हा उत्पादकदृष्टीनें जगताचें 'कारण' नाहीं; तर 'तीन बाजूंनी झालेली आकृति तो त्रिकोण असें लक्षण ठरविलें म्हणजे जसें त्यांतील तीन अंतःकोनाची बेरीज दोन काट-कोनाबरोबर असते,' हें सत्य अनुमान-लक्षणस्वरूपावरूनच अनिर्वाहपक्षानें प्राप्त होतें' त्याचप्रमाणें ईश्वराच्या स्वरूपलक्षणावरूनच पदार्थांचे गुणधर्म ठरतात. हा स्पायनोझाचा सिद्धांत आहे. आतां व्यापकता व जाणीव हे ईश्वराचे गुण असून त्यांत ईश्वर ओतप्रोत भरला आहे, हें जर खरें आहे, तर व्यापकतारूपी ईश्वरी तत्वांत कांहीं प्रकारभेद झाला कीं, जाणीवेच्या ईश्वरी-तत्वांत-जाणीवरूपी ईश्वरीतत्वांत-तसला-त्यास योग्य असा-प्रकारभेद झालाच पाहिजे. म्हणजे व्यापकतेंत जो प्रकारभेद होईल, त्यास जाण-णारा भेद जाणीवेंत झालाच पाहिजे; कारण दोहोंतही ईश्वरीतत्व सामान्यत्वानें स्थित आहे. आपल्या जाणीवेला जें ज्ञेय ( Object ) दिसतें तसलीच वस्तुस्थिति बाह्यपदार्थांत अस्तित्वरूपानें असतें. सारांश व्यवहारज्ञान व परमार्थज्ञान यांत भेद नाहीं.

लायब्निझनें या पंथाला अध्यात्मिक स्वरूप दिलें. नव्या गत्यात्मक ( Mechanical ) पंथाची व ईश्वरी संकल्पाची ( Teleology ) एकवाक्यता करणारा, शास्त्रीय व धार्मिक पंथांचें ऐक्य जुळवून आणणारा हा लायब्निझ होय. गत्यात्मक शास्त्र वाढवितां येईल तितकें वाढवावें; पण निमित्त कारणाचा नाश झाला तरीही चतुरतादर्शक सृष्टि आपल्या अलौकिक चमत्कारांनीं परिपूर्ण भरलेली दिसत आहे, यावरून त्यांतील ईश्वरीकर्तृत्व सदैव जागृत असतें हें ठरविण्याचा त्याचा हेतु होता. तसेंच या जगांत जो गत्यात्मक व्यापार चालला आहे तो केवळ **साधनरूप** व सापेक्ष आहे; पण ईश्वर हा साधक व निरपेक्ष असून त्याच्या इच्छेनें हा व्यवहार चालला आहे; हें त्याला अध्यात्मदृष्टीनें ठरवावयाचें होतें. तेव्हां 'कारण ह्मणजे अस्तित्व, व पूर्णत्वः' 'द्रव्य हें नित्यस्वरूपीं अस्तित्वः' आणि 'विपरिणाम, परिच्छिन्नत्व व विशेषता हे द्रव्याचें प्रकार होत' हीं लक्षणें त्यानें ठोकून दिलीं तसेंच सृष्टिव्यापार ईश्वरीकर्तृत्वानें चालतो, द्रव्य हें योजनादर्शक सामर्थ्य ( Force ) आहे व ईश्वर हा उत्पादक कर्ता आहे, असें लायब्निझनें ठरविलें. अर्थातच द्रव्यामधील सामर्थ्य जडशून्य झालें. जडव्यापकता व गत्यात्मकता ह्याही आतांच सांगितलेल्या जडशून्य सामर्थ्याचा परिपाक झाला, सारांशदृष्टीनें पदार्थांतील द्रव्य अध्यात्मिक (Spiritual) झालें. एवंच स्पष्ट आणि निर्मळ ज्ञान पदार्थ म्हणजे जडशून्य सामर्थ्य असें समजतें आणि अस्पष्ट आणि अंधुकज्ञान त्याच पदार्थास व्यापक बुद्धीनें पहातें. आकाश व काळ हें याच सामर्थ्याचे परिणाम असल्यामुळें ह्या आकाशरूपी पदार्थाची गणितात्मक ( निश्चित्त ) सत्यता नष्ट झाली. ईश्वरानें विश्वसुखासाठीं विश्व विशिष्ट प्रकारचें केलें ह्मणून आकाश व काळ यांस प्रस्तुतचें स्वरूप प्राप्त झालें. अर्थातच पदार्थही ईश्वरेच्छेनुसारच उत्पन्न झालेले आहेत. सर्व विश्व हें सजीव आहे. जीव हा मूळस्वरूपांत एकच पण उपाधिभेदानें भिन्न होतो. **प्रत्येक पदार्थ** विश्वप्रतिबिंब आहे. विश्वसामर्थ्याला उपाधिसंगम झाला म्हणजे परिच्छिन्नत्व येतें. तसेंच प्रत्येक द्रव्यालाही परिच्छिन्नत्व याच उपाधिकारणानें येतें. सारांश, प्रत्येक पदार्थ हा इतर सर्व पदार्थांचें प्रतिरूप आहेः 'अनेकांत एकत्व आहे.' हे लायब्नीझचे सिद्धांत आहेत. प्रत्येक द्रव्यांश हा विश्वाचा फोटो ( अति सूक्ष्म पण हुबेहुब चित्र ) आहे. ह्या द्रव्यांशाच्या अनंत प्रति उत्तरोत्तर श्रेष्ठतर होत जाणाऱ्या आहेत. अति नीचतम द्रव्यांश म्हणजे जड आणि श्रेष्ठतम द्रव्यांश ( कीं जो सर्व विश्वाचें स्पष्ट व निर्मळ असें एक प्रकारचें प्रतिस्वरूप आहे ). तो ईश्वर होय. वस्तुतः प्रत्येक द्रव्यांशांत मूलद्रव्य असल्याकारणानें पदार्थांचा परस्परांवर संस्कार होतोसें दिसतें. प्रत्येक द्रव्यांशांत जितकें अस्तित्व तितकेंच कर्तृत्व असल्यामुळें अस्तित्व व कर्तृत्व हीं सुसंगत होतात. सर्वांस एकवाक्यता प्राप्त होते ती ईश्वररूपी श्रेष्ठतम द्रव्यांशानें होते हे द्रव्यांश (सामर्थ्यांश) आत्मिक आहेत, भौतिक नाहींत. परमेश्वरानें हे सर्व द्रव्यांश निर्माण करून प्रत्येकास विश्वसुख उत्पन्न करितां येईल, असें सामर्थ्य व असा कार्यभाग दिल्यामुळें सर्वत्र एकवाक्यता, सौंदर्य आणि मधुरता दृष्टीस पडते. येथें सर्व द्रव्यांश

एका ईश्वरावरच अवलंबून असल्याकारणानें कोणासही स्वातंत्र्य नाहीं. कामक्रोधादिकांचें नियमन करण्याचें तेवढें स्वातंत्र्य जीवास आहे. ईश्वर मात्र स्वतंत्र म्हणून सत्य आहे. बाकी सर्व सिद्धांत औपाधिक सत्यत्वानें प्रादुर्भूत होतात. म्हणजे कोणती ही गोष्ट घेतली तरी तिचें सत्यत्व निरुपाधिक नसतें. उदाहरणार्थ 'दोन व दोन मिळून चार होतात' ह्याचा खरेपणा पहिले दोन व दुसरे दोन एकाच जातीचे आहेत कीं नाहींत त्याच्या खरेपणावर आणि दोन व चार यांच्या अर्थावर अवलंबून आहे. सारांश सर्व व्यवहार ईश्वरेच्छेनुसार होणाऱ्या इतरपदार्थांवर संस्कारास वश असणारा असा असतों ह्मणून त्याचा खरेपणा सोपाधिक आहे. ईश्वरानें केलें तसें हें विश्व झालें आहे. जीवाच्या संबंधानें या तत्त्वज्ञाचें असें ह्मणणें होतें कीं, जीव हाही द्रव्यांश आहे ह्मणून तो विश्वप्रतिबिंब आहे. त्याला सर्व ज्ञान असतें; पण ते अंधुक अस्पष्ट असतें ह्मणून जीवाला त्याचें भान नसतें. विषयाच्या उत्थापनानें हें ज्ञान जागृत होतें. ह्मणून नवें ज्ञान केव्हांही होत नाहीं हें स्पष्टच झालें.

हाब्सची नीति स्वार्थपर ( Egoistic ) होती स्पायनोझा ईश्वरावलंबी होता.

अठराव्या शतकांत अध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या प्रगतीला ओहोटी लागली; पण अधिभौतिक व अधिमानवी तत्त्वज्ञानाच्या शोधांस भरती आली. अनुभवानें मनोवृत्तींच्या उगमाचा शोध करावयाचा, शास्त्रीयज्ञानाच्या मर्यादेचा व शक्यतेचा तलास करावयाचा आणि 'जीव आणि समाज' या प्रश्नांचा ऊहापोह करावयाचा, इत्यादि विषय या शतकात भर जोरानें पुढे आले. इंग्लंडांत लॉक यानें जोरानें ही चळवळ सुरू केली व तेथून फ्रान्स व जर्मनी इत्यादि देशांत तिचा प्रसार झाला.

'मनुष्याच्या इतिकर्तव्याचा शोध करणें हेंच मनुष्याचें कर्तव्य आहे' हें पोपकवीचें महावाक्यच या शतकांतील चळवळींचें सूत्र आहे. या वाक्यमंत्रांत केवळ मानवी सुखाचे व्यवहारिक प्रश्नच येतात असें नाहीं तर, मानवी मनोवृत्तींच्या व्यापारांचें निरीक्षण करून त्यांवरच सर्व तत्त्वज्ञानाचें मंदिर अधिष्ठित करावयाचें, असा शास्त्रीय हेतुही येथें व्यक्त होतो. मानवी ज्ञानदृष्टीची मर्यादा कोणती, मानवी ज्ञानाचे उगम कोणते आणि तें ज्ञान उत्क्रांत कसें होतें, हें निश्चितपणानें ठरविल्याविना अध्यात्मिकज्ञानाचा विचार करणें व्यर्थ आहे, असें लॉक साहेबाचें मत होतें. हेंच मत त्यावेळीं सर्वसंमत होऊन अंतर्दृष्टीनें मानवी मनाचा अभ्यास होण्यास सुरवात झाली. 'एक बाह्य--विश्व ( ज्ञेय ) आहे व त्यास पाहणारें अंतर्विश्व ( ज्ञातृ ) मन आहे. तेव्हां मनांत बाह्यविश्वाची प्रतिमा कशी प्रवेश करिते!' हा या वेळचा मुख्य प्रश्न होता.

## स्वयंभू कल्पना, भावना.

हाब्सचें ह्मणणें असें होतें कीं, 'मनुष्याच्या सर्व कल्पनांचा उगम इंद्रियजन्य विषयज्ञानापासून आहे. या शिवाय त्याच्या कल्पनेला, किंवा भावनेला दुसरा उगम

संभवत नाहीं. अर्थातच दैवी अंश मनुष्यांत आहे व त्याला इंद्रियातीत ज्ञान आहे, हें म्हणणें मिथ्या आहे.' या मताचें खंडन करणारे **कडवर्थसारखे** तत्त्वज्ञ पुढें येऊन त्यांनीं 'ईश्वराची कल्पना, ईश्वरसंबंधीं भावना मनुष्याच्या अंतःकरणांत आहे, ती स्वयंभू आहे' असा प्रतिवाद केला. पण त्याचा फारसा उपयोग यावेळीं झाला नाहीं. 'मनुष्य जन्मास येतो तेव्हां आपल्या बरोबर ज्ञानाचें पूर्ण गांठोडें घेऊन येतो काय?' असा लॉकनें सवाल केला व त्याला अर्थातच 'नाहीं' असा जबाब मिळाला. लॉक व त्याचे अनुयायी यांची विचारसरणी येणेंप्रमाणें आहे. "मनामध्यें कल्पना असून त्या मनाला ठाऊक नसणें हें अशक्य आहे व मन नित्य विचारांत असतें हें म्हणणेंही खोटें आहे. लहान मुलांकडे काळजीपूर्वक पाहिलें असतां त्याच्यामध्यें त्या वयामध्यें शास्त्रीय अगर व्यावहारिक ज्ञानाचा उद्गम आहे, असें सर्वतोपरी दिसत नाहीं. तसेंच ईश्वरविषयक कल्पनाही स्वयंभु आहे. असें म्हणतां येत नाहीं; कारण स्वयंभु कल्पना असती, तर ती सर्वत्र विद्यमान असती व ती सर्वत्र सारख्या स्वरूपाची असती, पण असा अनुभव येत नाहीं. जगांत ज्या अनेक जाती आहेत, त्यांत ईश्वरीस्वरूपाविषयीं भिन्न कल्पना आहेत व कोठें तर त्या बिलकुलच नाहींत. एवंच स्वयंभु कल्पनांस अस्तित्वच नाहीं. तसेंच त्या गुप्त असतात, असेंही म्हणतां येत नाहीं; तसें असतें, तर अनुभवाची आवश्यकताच नव्हती. पण ज्याअर्थी अनुभवाची आवश्यकता आहे, त्याअर्थी स्वयंभु कल्पना प्रकट अगर गुप्तरीतीनें जन्मतः जीवाबरोबर येतात हें म्हणणें व्यर्थ आहे. जन्मतः जीवस्वभाव पांढऱ्या स्वच्छ कागदाप्रमाणें स्वच्छ व निर्मळ असा येतो. पुढें जसा अनुभव येतो, तसा तो भावनांचें अधिष्ठान होतो; म्हणजे त्याच्या मनांत साध्या व पुढें गौरवी ( Simple and complex ) भावना, कल्पना ( Ideas ) उत्पन्न होतात. विषयोपलब्धि व तत्संबंधी चिंतन हीं भावनांचें उत्पादन करितात. तेथून सर्व साध्या व गौरवी विचारांचा उद्भव होतो. स्मृति, तारतम्य, संबंध ज्ञान इत्यादि सर्व मनोव्यापार विषयोपलब्धीवरच अवलंबून असतात." सारांश विषयोपलब्धी ( Sensations ) व मनोव्यापार हे भिन्न आहेत, तथापि मनोव्यापार हे सर्वांशीं विषयोपलब्धीच्याच आश्रयानें असतात. मनोव्यापाराचें स्वातंत्र्य याप्रमाणें नष्ट झालें तें इतकें कीं, **बर्क्लेनें** सर्व सामान्य, निर्विशेष, कल्पनांचा निषेधच केला. कारण सामान्य कल्पनांस विषयच नाहीं. पहा कीं, मनुष्य ही विशेष कल्पना आणि मनुष्यत्व ही सामान्य कल्पना आहेत. पण मनुष्य या नांवाला जसा मनुष्यप्राणी हा विषय आहे तसा मनुष्यत्व हा विषय कोठें आहे? ह्यूम हा महातत्त्ववेत्ता या पंथाचा प्रणेता होता. यानें मनोव्यापारांस विषयोपलब्धीच्या ( Sensations ) नकला प्रतिबिंबें असें ठरविलें. जर्मनीमध्यें **वुल्फनें** कल्पना, भावना, मनीषा इत्यादि मनोव्यापार हे मज्जातंतूंचे विकार आहेत असें ठरविलें. ही अधिभौतिक विचाराची लाट फ्रान्सवर आदळून **व्हॉल्टेरनें** जडवाद प्रकट करून त्याच्या योगें सर्व लोकांस मोहून टाकिलें. **रूसोनें** मनोवृत्तींचें स्वातंत्र्य जीवस्वातंत्र्य पुनः स्थापित करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा परिणाम एका भयंकर राज्यक्रांतींत

झाला. एवंच अधिभौतिक-जड वादाचा जय होऊन अध्यात्मज्ञान, अतींद्रियज्ञान व त्यांची मीमांसा यांचा प्रायः लोपच झाला. **लँबर्ट** मात्र असें प्रतिपादन करी कीं, विचारांचा विषय जरी विषयोपलब्ध आहे, तथापि स्मरण, तारतम्य, संबंध जुळविणें, इत्यादि मनोव्यापार खुद्द मनाचेच आहेत; योग्य विचाराला विषयाची त्याचप्रमाणें विन्यासाची ( form )-तारतम्य पाहणें, संबंध जुळविणें, अनुमान काढणें इत्यादि मनोव्यापाराची ), उभयतांचीही आवश्यकता असते.

## बाह्य विश्वाचें ज्ञान.

**लॉकचे** मताप्रमाणे ज्ञान मिळविण्याचे दोन मार्ग आहेत; एक इन्द्रियजन्य विषयोपलब्धि व दुसरा मनोव्यापार: आपली ज्ञानेंद्रियें पदार्थांचें ग्रहण करितात, रूप दिसतें, शब्द कानावर पडतो, वास येतो, हे सर्व इन्द्रियजन्य ज्ञानाचे प्रकार होत. येथें पदार्थ इन्द्रियांस उत्तेजित करितात. (२) वरील ज्ञानाचे प्रकार सांगितले त्याचें तारतम्य संबंध, ह्या वरून निघणारी अनुमानें, बसणारी श्रद्धा होणारी श्रद्धा इत्यादि बुद्धि व्यापार होत. ह्या व्यापाराचें उत्थापन उपलब्धीनें होतें, हें आतांच सांगितले आहे; पण लॉकचें असे ह्मणणें असें कीं, मनोव्यापार हे आत्मप्रत्यक्ष असतात ह्मणून ते स्वच्छ व निर्मळ असून त्यांचें यथार्थज्ञान जीवास होतें, पण विषयज्ञानाचें तसें नाहीं. विषयांचे ज्ञान इंद्रियद्वारा होत असल्यामुळें त्यामध्यें यथार्थता व निश्चितता नसतात. भावना ( Idea ) आत्मप्रत्यक्ष असते म्हणून तिचें यथार्थ स्वरूप आपल्यास समजतें; पण बाहेरचा विषय आपल्यास प्राप्त झालेल्या कल्पनें प्रमाणेंच आहे, हें आपल्यास केव्हांही सांगतां येणार नाहीं. बाहेर वस्तु आहे, हें समजतें; पण तिचें यथार्थ स्वरूप समजणें प्रायः अशक्यच होय. आपल्या कल्पनांमधील विशेष, त्यांचे संबंध, आपल्यास सांगतां येतील; तर्कशास्त्र टीक ठरेल; व त्या त्या कल्पनांस जागृत करणारी ही वस्तु आहे इतकें मात्र सांगतां येईल; पण वस्तुस्वरूप आपल्यास कळणार नाहीं. फार कशाला ? आपण कोण आहों हें सुद्धां, मन काय आहे हें सुद्धां, आपल्यास कळत नाही व कळणार नाही ! ईश्वराचें अस्तित्व प्रमाणांनीं सिद्ध करितां येईल; पण **तो कसा आहे** हें मात्र समजणार नाहीं ! येथें मायावादाची पहिली पायरी आली.

**बर्कलेचें** मत असें आहे कीं, **बाह्य विश्वच नाहीं ?** बाह्य जगाचा परिचय आपल्यास त्या त्या पदार्थांच्या गुणांनीं होतो; गुण ह्या मनामध्यें उत्तेजित झालेल्या कल्पना आहेत; या कल्पना एकीकडे काढून ठेविल्या म्हणजे बाहेर ' विश्व ' असें काय राहील ? कांहीं नाहीं. निदान कांहीं आहे हें समजण्याचें साधन आपल्यापाशीं नाहीं. आतां बाह्य विश्वांत जर निर्विशेष सामान्यच नाहीं, तर निर्विशेष विश्व तरी कोठें येणार ? आतां आपल्या मनांत उद्भव होणाऱ्या कल्पना ह्या कोठून येतात ? याला बर्कलेचें उत्तर

असें आहे. आपल्या मनांत कल्पना येतात, त्या ईश्वरी इच्छेनें येतात; व ज्या पद्धतीनें त्या आपल्या मनांत उत्पन्न होतात, त्याला आपण विश्वनियम म्हणतों. ह्या मताचा परिपाक असा झाला कीं, सर्व विश्वच व विश्वगतवस्तु मिथ्या आहेत, बोलणा-शिवाय, ह्या सिद्धांताचें प्रतिपादन करणाराशिवाय, बाकीची मनुष्ययाति ही कल्पितच आहे; कारण ह्यांचें म्हणजे श्रोत्यांचें व इतर लोकांचें मन आत्मप्रत्यक्ष नाहीं, कल्पनागम्य आहे म्हणून असत्यच आहे. तेव्हां या तत्त्वज्ञ पंडितांच्या मतें आपल्याशिवाय सर्व मनुष्य मिथ्याच झाले व तोही इतरांच्या मतें मिथ्या होऊन सर्वत्र शून्यत्व होण्याचा समय येतो ! ! हें वाचून श्रीमत् बुद्ध व त्याचे माध्यमिक व शून्यवादी अनुयायी यांची आठवण कोणाला होणार नाहीं.

बर्कलेनें बाह्य जग काल्पनिक आहे, असे ठरविलें. पुढें ह्यूमनें अंतर्जगतही मिथ्या ठरविलें ! बाह्य पदार्थांचे गुण काढून घेतले असतां ज्याप्रमाणें बाहेर कांहीं शिलक राहत नाहीं, त्याचप्रमाणें मनाचे गुणधर्म एकीकडे ठेविले असतां आंतही बाकी कांहींच उरत नाहीं. पदार्थांचे गुण पदार्थांतून वजा केले, त्यांची आठवण आपण विसरलों म्हणजे बाकी काय राहते हें समजण्याचें साधन आपल्यापाशीं नाहीं, म्हणून समजण्या-सारखें कांहीं नाहीं, असें बर्कले म्हणतो; त्याप्रमाणें व त्याचप्रमाणांनीं ह्यूम असें सिद्ध करितो कीं, आत्मप्रत्यक्ष होणारे मनाचे गुण मनांतून वजा केले म्हणजे बाकी काय राहते, हें सांगणार साधन नाहीं, म्हणून मन असा पदार्थच नाहीं. आतां, ज्या संस्कारांचें आपल्यास ज्ञान होतें, ते संस्कार व त्याबरोबरच होणारे आकाश व काल यांचे **संस्कार प्रत्यक्ष म्हणून खरे आहेत,** असें आपल्यास म्हणतां येईल; संस्कारांचा समविषम-भावही सत्यत्वानें आपल्यास समजेल व या दृष्टीनें गणितशास्त्र व विशेषतः अंकगणित-शास्त्र खरें असतेंही; पण '**द्रव्य**' किंवा '**मन**' किंवा **कार्यकारणभाव**, याविषयीं जर आपल्यास केव्हांच कसलाही संस्कार होत नाहीं, तर हें उघड झालें कीं, द्रव्य, मन अथवा कार्यकारणभाव हे सत्य मानण्यास आपल्याजवळ कांहीच पुरावा नाहीं असें झालें. सारांश, 'द्रव्य आणि कारणता' ही वस्तुतः सत्य नसून केवळ मनुष्याच्या निरधिष्ठान कल्पनातरंगांतून उत्पन्न झालेलीं खुळें आहेत, असें या युगांतील तत्वज्ञांचें मत झालें. इंद्रियप्रत्यक्ष ज्ञान खरें संस्कारांचे संबंध, सारखेपणा व संख्या ठरविणारें म्हणजे गणित शास्त्र–सत्यकल्प; पण यापलीकडील, या आधारांशिवाय उत्पन्न झालेलीं सर्व शास्त्रें 'चुलींत जाळण्याच्या योग्यतेचीं' असें **ह्यूमनें** ठरविलें ! हा खरा चार्वाकवाद ( यद्दृष्टं तत्सत्यं हा वाद ) होय.

या तत्वज्ञानाचा प्रसार **फ्रान्समध्यें** होऊन तेथें नास्तिकत्वाचा कळस झाला. पण **जर्मनीमध्यें** निराळाच परिणाम होऊन **कँट**सारखा दिव्य तत्त्वज्ञ निर्माण झाला. **कँट** हा ह्यूमचा विरोधी शिष्य होय. याचा वृत्तांत पुढें येईलच. आतां येथें इतकेंच सांगा-

वयाचें कीं, कँटनें इंद्रियजन्यज्ञान व बुद्धिजन्यज्ञान, असे ज्ञानाचे दोन विभाग करून पहिल्याचे विन्यास निराळे [ आकाश आणि काल प्रकट करणारे ] आणि दुसऱ्याचे विन्यास [ अत्यंत सामान्य (सामान्यतम) विधानें करणारे ] असें ठरविलें. कालात्मक व स्थलात्मक विन्यास समजून घेऊन त्यांच्या साधनानें विचार केला असतां गणितशास्त्र निर्माण होतें व सामान्य-विधानात्मक विन्यासाचे सहाय्यानें विचारोपक्रम केला असतां अध्यात्मिकशास्त्र प्रकट होतें. कोणताही पदार्थ आपण पाहिला असतां त्याच्या गुणांचें ग्रहण होत आहे तोंच तो पदार्थ विशेष कालांत व विशेष स्थलीं आहे असें मनाच्या साहाय्यानें आपल्यास समजतें. स्थल व संख्या यांच्या साह्यानें गणितशास्त्रें सिद्ध होतात. यांच्या व कालांच्या साह्यानें अधिभौतिक शास्त्रें सिद्ध होतात. ही सर्व मनाची कामगिरी झाली, पण विषयाचें ग्रहण मन करीत आहे तोंच बुद्धि त्या विषयाची जाती, सत्स्वरूप इत्यादि ठरविते; आणि या पुढें आत्म्याचें अस्तित्व ईश्वराचें अस्तित्व ह्यांची कल्पना 'मी' विषयद्रष्टा करूं लागतों आणि या कल्पनेला सत्यत्व येते तें माझ्या पुरुषार्थाची सिद्धि मी करूं लागलों ह्मणजे येतें. हें अध्यात्मिक ज्ञान होय. नुसतें इंद्रियजन्यज्ञान दृश्यस्वरूपाचें स्वरूप व्यक्त करितें आणि बुद्धिजन्यज्ञान पदार्थांचें सत्स्वरूप प्रकट करितें. बुद्धिजन्यज्ञानाचे विन्यास अथवा बुद्धीचे विन्यास व वस्तुस्वरूप यांचा उद्गम ईश्वरी मनांत आहे; म्हणून बुद्धिज्ञान निःसंदेहत्वानें यथार्थ असतें.

## स्वभावसिद्ध धर्म.

अठराव्या शतकांतील ज्ञानमीमांसा ( Epistemology ) अध्यात्मिकशास्त्राच्या प्रगतीला प्रतिकूल होती. ही मीमांसा धर्मविचारालाही घातकच व्हावयाची; पण लोकांस सतराव्या शतकांतील धर्मगत लढायांनीं व वादप्रतिवादांनीं सतावून सोडल्यामुळें धर्मसंबंधानें या वेळीं जनसमूह उदासीनच नव्हता, तरी तडजोडीला अनुकूल होता. लॉकचें मत असें होतें कीं, स्वतंत्र व स्वातंत्र्यप्रिय राष्ट्रांत प्रत्येक पुरुषास व प्रत्येक समाजाला धर्मस्वातंत्र्य असलेंच पाहिजे. प्रत्येकानें आपलें वर्तन शुद्ध, धार्मिक व उदारपूर्ण ठेवावें, असा घोष या शतकांत जोरानें सुरू होता.

तत्त्वज्ञानाचें साहाय्य घेऊन विवेकबुद्धीस मान्य असा विश्वगामी धर्म असला पाहिजे, त्यांत विशेष विधिव्रतांची भानगड असूं नये, असें समंजस माणसांचें ह्मणणें होतें. हा धर्म अपौरुषेय असावा पण विवेकबुद्धीशीं विरोधात्मक नसावा. 'विवेकबुद्धीला ग्राह्य तीच दैवी प्रेरणा' असें एकदां ठरलें कीं, अवतारांचें अवतारकृत्य संपलेंच ह्मणावयाचें. ( शुद्ध मानवी विवेकबुद्धीला दैवी अवतारकृत्यें समजत नाहींत. पण कांहीं झालें तरी विवेकाला भक्त्युद्रेक हार जातच नाहीं.

' भक्त्युद्रेकाला उत्कटता आली, सत्य, मंगल व सौंदर्य यांची उन्नति प्रसृत करण्याचा उत्साह असला, व्यक्तिभावाचा निरास होऊन समष्टीची प्रीति उत्पन्न झाली,

म्हणजे धर्माचा उदय होतो. ही प्राप्त होण्याला सादर आश्चर्य आणि सात्विक प्रेम हीं हवींत. हें विश्व सुंदर, पूर्ण आणि सुसंबुद्ध असून त्याचा कर्ताही सर्वशक्ति, सर्वज्ञ व सकलमंगलगुणाधिष्ठान आहे, व्यक्तींची अपूर्णता विश्वपूर्णतेंत नष्ट होते आणि सर्वत्र मनोहर रामणीयकत्व आहे, अशी बुद्धि ज्ञानपूर्वक होणें व तदनुसार कर्म करणें' हाच धर्म होय, असें **शाफ्टस्बरी** ह्मणत असे. हें मत बरेंच प्रसृत झालें. तथापि सुखवादी व उपयोगवादी लोकांचा कल 'धर्म हा जीवसुखवर्धक असावा' इकडे असे. **कँटचें** ह्मणणें शाफ्टस्बरीसारखेंच होतें. **लायब्निझ** प्रतिपादितो कीं, शारीरिक दुःख नीतीच्या उल्लंघनापासून होतें. अज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या कामक्रोधादिकांपासून नीत्युल्लंघन होतें. अज्ञान हें उपाधिजन्य आहे. धार्मिक विश्व उत्पन्न करावयाचें तर तें अध्यात्मिक-शास्त्रद्वाराच उत्पन्न झालें पाहिजे. सारांश आह्मां मानवांस दृश्य होणारें हें विश्व आहे तोंवर उपाधि, अपूर्णत्व, अनीति आणि शारीरिक व मानसिक दुःखें असावयाचींच ! पुढें तो म्हणतोः आतां सर्वदयाघन परमेश्वरानें हें विश्व निर्मिलें आहे, ह्मणून त्यांत दुःखाचा अत्यंत अल्प असा अंश मात्र आला आहे ! दुःखाचा अल्पांश, म्हणण्याचें कारण हें कीं, या ईश्वर निर्मित विश्वांत दुःखोत्पत्ति होते ती मनुष्याला विषयापासून परांग्मुख करण्याकरितां होते. दुःख देण्याकरितां मात्र दुःखोत्पत्ति आहे, असें दुःखच या विश्वांत नाहीं. पण असा विचार करणारी माणसें या शतकांत फारच थोडी होती.

आधिभौतिकशास्त्री **बेली** व तत्वज्ञ ह्यूम यांनीं '**नीतिप्रसारार्थ धर्म उपयोगी आहे**, पण त्याला शास्त्रजन्य तात्विक मौल्य कांहीं नाहीं' असें ठरविल्याबरोबर धर्म हा नीतीचा परिचारक मात्र होऊन राहिला. सर्वत्र स्याद्वाद, यांचा नास्तिकपणा व चार्वाकी पंथाचा सुळसुळाट झाला. अर्थातच मानवी सुखाप्रीत्यर्थ मानवी विचारांनीं ठरलेला नीतीचाही पाया डळमळूं लागला. नीतिव्यतिरिक्त असे जे धर्माचे विधि व विधानें आहेत, तीं सर्व लबाड व पोटभरू लोकांनीं भोळ्या लोकांस फसविण्यासाठीं थोतांडें उत्पन्न केलीं आहेत असें पापभीरू लोक सुद्धां बोलूं लागले ! कालांत उत्पन्न झालेल्या आधिभौतिक शास्त्राबरोबरच कालातीत धर्मास खेंचून नेलें म्हणून हा अनर्थपात उत्पन्न झाला ! ! पण या मताला लवकरच 'खो' मिळून धर्मपुस्तकांचें दैवीजन्म सिद्ध करण्याचा फलद्रूप प्रयत्न सुरू झाला. तिकडे आतां वळूं या.

## नीतितत्त्वें.

**लॉकचा** अभिप्राय असा आहे कीं, ईश्वर आहे व त्यानें जीवाप्रीत्यर्थ कांहीं नियम केले आहेत. हे नियम पाळले तर बक्षीस मिळतें व नाहीं पाळले तर शिक्षा होते. हे बहालीबडतीचे जे नियम आहेत त्यावरून ठरलेलें आपलें मत त्यासच 'नीतिविधान' असें ह्मणावें. हीं नीतिबंधनें लोकमत, राजा व ईश्वर यांच्या करवीं बहिवाटलीं जातात आणि हे नीतिनियम सृष्टिव्यवस्थेवरूनच प्रकट होतात.

आपल्या जन्माबरोबर आपल्यास सूक्तासूक्त निवडण्याचें सामर्थ्य ( **विवेकशक्ति** Conscience ) परमेश्वरसत्तेनें मिळते, असें कांहीं लोक म्हणतात. यांपैकींच **क्लार्क हे** एक असून, 'पापाचरण व अनीतीचें आचरण अज्ञानामुळें अगर उन्मादामुळें होत असतें,' असें ते म्हणतात. **प्लेटो** म्हणे कीं, 'आपल्यास संपूर्ण ज्ञान होणें शक्य नाहीं. तरी पण नित्यनीतीचें निरपेक्ष माप ठरवितां येतें' 'हें माप सर्वत्र सारखें आहे, धर्मभेद असला, तरी नीतिभेद होणें शक्य नाहीं,' असें याचें मत होतें. 'नीतितत्त्वें नित्यसिद्ध व नित्यसत्य आहेत व पूर्णत्वाला जाणें हा पुरुषार्थ आहे' असें **वुल्फ म्हणे.** पूर्णत्व सौख्यद असनें, अपूर्णत्वानें दुःख उत्पन्न होतें, असेंही त्याचें ह्मणणें आहे. उपनिषदांत ह्या सिद्धांताचा उल्लेख अनेक वेळ आला आहे पूर्णत्व आणि उपयोगिता हे जयविजय नीति मंदिराचे द्वारपाल ( रखवालदार-याष्टिक ) आहेत, पण पूर्णत्व, अगर उपयोगिता यांचीं लक्षणें केवळ अनुभवावरून ठरविलीं गेल्यामुळें, अनुभव चंचल असल्यामुळें नीतीला अचल धर्माचा व निरपेक्ष तत्त्वज्ञानाचा आधार हवा असतो. **शाफ्ट्स्बरीनें** सौंदर्याची कल्पना येथेंही आणून स्वार्थ व परार्थ या उभयतांची एकवाक्यता सुखोत्पादक होईल असें करण्याचा उपदेश केला. तसेंच, विचारपरिपाकानें सिद्ध व प्रकट होणाऱ्या नीतिवृत्ति प्रत्येक जीवाला प्राप्त झाल्या आहेत व त्याच स्वार्थपरार्थांची मंगलप्रद एकवाक्यता करण्याला समर्थ आहेत; ह्यांच्या अनुरोधानें वागणें ही नीति होय; असें शाफ्ट्स्बरी म्हणतात. **हचिसन** ह्मणतो कीं, सद्वृत्ति आणि सौंदर्यवृत्ति ह्या जन्मतःच प्राप्त होतात; ह्यांचें अनुरोधानें वागणें ही नीति होय. **रुसो** हा सहज मनोवृत्तीचा पोशिंदा होय. ह्या जात्याच निर्मळ असतात, असें तो आपल्या शिष्यांस सांगत असे.

नीतीचा उद्भव समाजांत होतो. सुखोत्पादी वर्तन तें नीतीचें व दुःखोत्पादक तें अनीतिगत वर्तन होय. **लॉक, बट्लर, पाले** वगैरे धार्मिक नीतिकोविदांस हें मत पसंत होतें. पण **बेंथमादि** सुखविवेचक पण धर्मशून्य, निदान धर्मोदासीन नीतिज्ञांच्या '**लोककल्याणमूलक' नीतिवादाला येथें प्रारंभ झाला.** प्रकृतीच्या साम्राज्यांत जे नियम प्रकट होतात, तदनुसार वागणें श्रेयस्कर आहे, हा या सुखवादाचा **अध्यात्मिक** पाया आहे; तसेंच पूर्णत्व संपादन करणें, व सहजसिद्ध नीतिवृत्तीच्या अनुरोधानें वागणें, वरील सिद्धांताला **मानसिक आधार** आहे. ह्मणजे 'लोककल्याण कां करावें ? स्वतःचें अकल्याण करूनही लोककल्याण कां करावें ?' याला उत्तर असें कीं 'निसर्ग नियमांचा उद्देशच विश्वकल्याणात्मक आहे; ( १ ) आपल्या पूर्णतेला योग्य व सहजमनोवृत्तींच्या समाधानार्थ आपल्यास 'विश्वकल्याण केलेंच पाहिजे !' हीं उत्तरें आहेत. पण जन्मतःच जीव स्वकल्याणपर असतो, असें ज्याचें मत आहे, त्याला हीं उत्तरें काय होत ? ह्मणून ख्रिस्तीलोकांच्या समाधानार्थ ईश्वराची अशी आज्ञा आहे, व तिचें उल्लंघन केल्यास शिक्षा होईल, असें ख्रिस्तानुयायी ह्मणतात व राजाची आणि समाजाची

आज्ञा आहे असें सांगितलें ह्मणजे जडवाद्याचें समाधान होतें. पण यांत एक गोम आहे ती अशी कीं, राजदंडाच्या अथवा ईश्वरी शिक्षेच्या भयानें मनुष्य मात्र शरीरद्वारा नीतियुक्त वर्तन करील हें खरें; पण त्याचें मन स्वयमेव नीतिप्रद, नीतिवृत्तांचें होणार नाहीं, याची वाट काय? सर्वत्र भोंदूचा व्यापार वाढेल; आणि दंड व शिक्षा काढून टाकिल्या तर मनुष्यमात्र पुनः 'पशुवत्' होईल. ही खरी नीति नव्हे. मन सुधारलें पाहिजे; मग आचरण सहजच सुधारतें. 'आधीं मन मुंडा। बा मन मुंडा॥ कशास मुंडिता तुंडा॥

ह्यूमनें या सुखवादाला परिपक्वता देऊन त्यांतील वैगुण्य काढून टाकिलें. नीतितत्वांचा विचार करितांना मनोवृत्ति (Feeling) मनोविकार (Passions) आणि वासना (Volitions) यांचा उत्पत्तिविचार केला ह्मणजे नीतिवृत्तींचा विचार करितां येतो. ह्यूम हा सुखवादीच आहे. न्याय, परोपकार, इत्यादि 'समाजसुखोत्पादी' सद्गुणांप्रमाणेंच शहाणपण, धैर्य, दक्षता, कार्यक्षमता (Energy) इत्यादि सहजगत गुणधर्मही नीतिजन्य सुख उत्पन्न करितात, असें त्याचें म्हणणें आहे. पण त्याचें म्हणणें हें आहे कीं, हे सद्गुण व गुणधर्म पाहणाराच व्यक्तिसुख वाढवीत नसेल तरी, किंबहुना त्याला दुःखद होत असले तरी पाहणाराकडून शाबासकी मिळवितात. अर्थातच ही स्तुति स्वार्थी नाहीं व सहजसिद्धही नाहीं. ही स्तुति सहानुभूतिजन्य (Sympathy) आहे. ही सहानुभूति नीतिमान्यताच उत्पन्न करिते असें नाहीं, तर ही नीतिवर्तनही करविते. सारांश, ही कर्मेच्छाप्रचोदक आहे. हिची सद्व्यवस्था विवेकबुद्धीनें करितां येते; आणि ह्या वृत्तीनें 'कर्म चांगलें किंवा वाईट' इतकेंच आपण पाहत नाहीं, तर मनोवृत्तींचाही बरेवाईटपणा पाहतों व तोच प्रथम पाहिला पाहिजे. ह्यूमप्रमाणेंच **ॲडाम स्मिथ** (अर्थशास्त्राचा उत्पादक) याचेंही मत होतें. स्वार्थाप्रमाणेंच सहानुभूति महत्वाची आहे. ह्या वृत्तींचा उद्भव सामाजिक स्थितींत होतो. आमचा पौरस्त्य आर्य यज्ञ करावयास सांगतो.

याप्रमाणें व्यक्ती सुखाइतकाच किंबहुना त्यापेक्षां जास्त महत्वाचा प्रश्न 'सहानुभूति' हा झाला व सामाजिक सुखाचें जनकत्व अंतर्बाह्यसहानुभूतीकडे आलें.

नीति ह्मणजे सदाचार हें सर्वांस संमत आहे. बुद्धिपूर्वक सदाचार करणें ही नीति आहे. सदाचार ह्मणजे चांगला-शुद्ध-आचार (Right conduct). आतां, सत् ह्मणजे चांगलें शुद्ध होय. चांगलें ह्मणजे काय? चांगलें ह्मणजे स्वभोगपोषक, अथवा परोपकारी, किंवा स्वभावजन्य, किंवा सुंदर, किंवा पूर्णताप्रापक चांगलें ह्मणजे ज्या जगांत आपण राहतों, त्या जगांतील विवक्षित लोकांच्या सुखाची वृद्धि करणारें असा अर्थ युरोपियन संग्रहवादी करतात; **चार्वाकी, हॉब्स**

यांसारखे, चांगला ह्मणजे स्वसुखपोषक असा करितात; कोणी पूर्णताप्रापक व कोणी सुंदर असा करितात. सारांश, या जगांतील एक किंवा अनेक व्यक्तींस कोणत्या तरी प्रकारचें सुख देणारा जो वर्तनक्रम, तो चांगला असें म्हणण्याची पद्धति युरोपांत आहे. ह्मणजे नीतिशास्त्र हें या जगांत वागण्याचे नियम सांगणारें शास्त्र आहे असें त्यांचें मत आहे. या नियमांचा धर्माशीं संबंध असावा कीं नसावा हा युरोपांतील एक वादविषय आहे. आम्ही सदाचारास नीति म्हणतो व सदाचार म्हणजे धर्मपोषक वृत्ति व वर्तन असें समजतों. धर्मानें नीतीला पूर्णत्व येतें, व नीतीनें धर्म पुष्ट होतो. एकत्व प्रतिपादन करणारें जें तत्त्वज्ञान, त्या तत्त्वज्ञानाचें धर्म हें एक अंग आहे. तेव्हां नीति ही एकत्वप्रतिपादक धर्माची जननी व त्याच धर्माची कन्या आहे. नीतीचा संबंध इहलोकींच आहे असें धरिलें तरी, तेंच वर्तन व तीच वृत्ति नीतियुक्त होतील कीं, जीं आपला कारणदेह सुसंस्कृत करितात व श्रेष्ठ जन्माची तयारी करितात. एवंच आर्यनीतीचा संबंध सार्वकालिक आहे; या जगापुरताच मात्र आहे असें नाहीं. तसेंच श्रेष्ठ वर्तन करण्यास श्रेष्ठ ज्ञान हवें, आणि श्रेष्ठ वर्तन साध्य झालें तरच पुरुषार्थ साध्य होतो; म्हणजे श्रेष्ठ ज्ञानानुरूप श्रेष्ठ वर्तन पुरुषार्थीकरितां करावयाचें हा आमचा नीतिक्रम आहे. असो;

## कँट.

युरोपियन तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत कँट यांचें नांव चिरस्मरणीय झालें आहे व राहील. तत्त्वज्ञानाच्या प्रगतीच्या दृष्टीनें ते एक मोठे शककर्तेच झाले, असें ह्मणावयास पाहिजे. त्यांचा जन्म अठराव्या शतकांत जर्मनी देशांत झाला. त्या महापुरुषानें आपलें सर्व आयुष्य अध्ययन, अध्यापन आणि ग्रंथरचना या ब्रह्मकर्मांमध्येंच खर्च केलें. हे ब्रह्मचारी भीष्माचार्यांप्रमाणेंच सर्ववंद्य व सर्वपूज्य होते. या कँट साहेबांनीं ब्रह्मविचारांत एक मोठी क्रांति घडवून आणिली, आणि अप्रत्यक्षतः मायावादाचें प्राथमिक स्वरूप युरोपियन लोकांस कळवून केवलाद्वैत वेदांताचा तिकडील मार्ग सुकर केला.

असो; तत्त्वज्ञान, व्यवहारज्ञान, शास्त्रज्ञान, कोणतेंही ज्ञान घेतलें तरी, कोणताही विचार व अनुभव घेतला तरी, कँट यांना असें दिसून आलें कीं, आपलें ज्ञान, आपला विचार व आपला अनुभव हीं शुद्ध नाहींत. उदाहरणार्थ आपण 'ढग आले असतां मात्र पाऊस पडतो,' हेंच एक वाक्य, हा विचार अथवा हा अनुभव घेऊं. वरील वाक्यांत असलेलें ज्ञान तीन साधनांच्या द्वारा आपल्यास प्राप्त झालें आहे. पहिलें साधन म्हणजे आपलीं ज्ञानेंद्रियें होत. आपल्यास जें काय विषयज्ञान व्हावयाचें असतें, याला साक्षात् किंवा परंपरया इंद्रियांचें साधन अवश्य हवें असतें. आपलें विचार, आपल्या युक्तिबद्ध कल्पना, आपले आनुवंशिक संस्कार व आपली स्वभावघटना या सर्वांच्या मुळाशीं इंद्रिय-

ज्ञान आहे; व इंद्रियें विषयज्ञान मात्र ग्रहण करितात. एवंच सर्व विषयज्ञानाचा प्रारंभ करणारें जें इंद्रियज्ञान, तें सदैव इंद्रियांच्या रचनेवर अवलंबून असलें पाहिजे. म्हणजे इंद्रियविन्यास जसा असेल, तसें विषयज्ञान आपल्यास होणार. ढगाचा व पर्जन्याचा वर्ण, त्यांची घनता, त्यांचें वजन, त्यांची आर्द्रता, इत्यादि गुणांचें आकलन होतें तें प्रत्येक जीवाच्या इंद्रियघटनानुरूप होत असतें. ढगादिकांचे गुण आपल्यास इंद्रिय दाखवितील तसे दिसावयाचे. ढगाचे स्वरूपाचा इंद्रियांवर जो संस्कार होईल, त्या संस्काराचें आपल्यास जें ज्ञान होतें तें अर्थातच मिश्र, अशुद्ध असतें. हें कशावरून? तर पहा: इन्द्रियांनीं विषयज्ञान मनाकडे वाहून नेण्याचा मक्ता घेतला आहे, व या कामाप्रीत्यर्थ हीं इंद्रियें आपले संस्कार उमटवून मग मनाच्या स्वाधीन विषयज्ञान करितात. इंद्रियें स्वतः कांहीं देत नाहींत, पण त्यांची जशी रचना असेल त्याप्रमाणें तीं इंद्रियें विषयजन्य संस्काराला रूप देतात. पाणी तेंच, पण घागरींतील पाणी घागरीच्या आकाराचें व पातेल्यांतील पाणी पातेल्याच्या आकाराचें होतें. म्हणून त्यांचा संगति फलप्रद होऊन आपलें विषयभान अशुद्ध होतें, असें कँटनें ठरविलें. पुढें हें भान म्हणजे संस्कारद्वारा प्रकट होणारे ढग व त्याचें भान अथवा अनुभव मनापर्यंत जाऊन पोहोंचून आंत प्रवेश करतो न करितो, तों या अनुभवाच्या, व भानाच्या मागें काल आणि स्थल यांच्या उपाधि लागतात. बाह्यज्ञानाचा, विषयज्ञानाचा प्रवेश मनांत झाला कीं, कालाची व आकाशाची मनोनिर्मित उपाधि स्वीकृत करावी लागते. विषय अमुक वेळीं अमुक ठिकाणीं आहे असा आपल्यास त्याचा अनुभव येत असतो; सारांश, कालाचा व आकाशाचा संस्कार झाल्याखेरीज मनामध्यें विषयोपलब्धिच व्हावयाची नाहीं. यथार्थ विचाराचें व अनुभवाचें पृथक्करण केलें असतां त्याला मनाकडून काल व आकाश यांचे संस्कार होत असतात असें स्पष्ट दिसतें. 'ढगाचें येणें' या अनुभवांत सुद्धां कालस्थलांची उपाधि आहे! 'ही गोष्ट तुझ्या मनांत शिरली कां?' ह्या प्रश्नमूलक विधानाचा अर्थच असा कीं, ह्या गोष्टीला कालस्थलाचे संस्कार देऊन हा अनुभव आपलासा केलास ना? तात्पर्य, इंद्रियांपेक्षां जास्त जोरानें काम करून मन आपला कालस्थलांचा छाप इंद्रियजन्य ज्ञानावर उठवितें. नंतर ज्ञान होण्याचें तिसरें साधन, ज्ञानाचा तिसरा घटक, म्हणजे आपली बुद्धि होय. इंद्रियें देतील तसें स्वरूप धारण करून मनाचे कालस्थलात्मक संस्कारांचा स्वीकार केला म्हणजे अनुभवाला बुद्धिसंस्कार व्हावयाचा असतो, तो बुद्धीच्या स्वराज्यांत सुरू होतो. अस्तिनास्तिसंबंध, कार्यकारणसंबंध, साहचर्यसंबंध, इत्यादि ज्ञानव्यवस्थापक संबंध बुद्धिद्वारा आविर्भूत होऊन अनुभवाचें व्यवस्थित स्वरूप प्रकट करितात. कोणताही विचार अथवा अनुभव घेतला असतां त्याचें अस्तित्व, त्याचा कार्यकारणसंबंध इत्यादि सर्व संबंध समजल्याखेरीज त्या त्या अनुभवाला व्यवस्थित अगर संघटित स्वरूप येत नाहीं. निश्चय करण्याचें ज्ञानाला निश्चित स्वरूप देण्याचें काम बुद्धीचें आहे. 'ढग आले असतां मात्र पाऊस पडतो' यांत पर्जन्य पडण्याचें जें कार्य त्याला ढगांचें पूर्वागमन हें एक अवश्य कारण आहे; असें ज्ञान

होणें हें निश्चितज्ञान होय. याप्रमाणें बाहेरच्या विषयांचे ज्ञानाला प्रकट करणारीं इंद्रियें, मन व बुद्धि हीं जीं तीन साधनें आहेत, तीं प्रत्येकशः आपआपले संस्कार उत्पन्न करून अनुभवाचा अवतार करीत असतात. हें प्रकट झालेलें ज्ञान शुद्ध, केवल, निरामय असें अर्थातच नसतें. तें अशुद्ध, सापेक्ष व उपाधिजन्य असतें. म्हणजे इदंपदार्थ ( object ) स्वरूपतः जसा आहे तसा तो आपल्यास दिसत नाहीं. त्याचें स्वरूप इंद्रियांनी, मनानें व बुद्धीनें संस्कृत केलें असतें. यालाच व्यवहारिक सत्ता ( phenomenon ) म्हणतात. असलें जें अशुद्ध ज्ञान त्यालाच प्राच्यदेशस्थ आर्य लोक माया असें म्हणतात. इंद्रियमनोबुद्धिद्वारा झालेलें ज्ञान शुद्ध नाहीं, हा शोध कँट यांनीं सप्रमाण रीतीनें प्रकट केला, व त्या योगानें त्यांनी तत्त्वज्ञानाच्या प्रगतीची दिशा फिरवून तत्त्वज्ञानाच्या राज्यांत मोठी स्पृहणीय क्रांति केली; पण आमच्या इकडे हा विचार उपनिषत्काला व गीताकालीं होऊन सर्व बाह्यज्ञान मायिक म्हणजे अवास्तवस्वरूप आहे, असें ठरले होतें.

आतां कँट यांना एक गोष्ट स्पष्ट दिसली नाहीं असें मला वाटते. बाह्यवस्तूचें आपल्यास ज्ञान होतें, त्याचें पृथःकरण जेथपर्यंत त्या महापुरुषानें केलें तथपर्यंत ठीक झालें; पण इंद्रियादिकांनीं केलेले संस्कार वजा घातल्या नंतर विषयज्ञानरूपी वस्तूंत बाकी जें काय राहतें, आपलीं इंद्रियादि ज्ञान साधनें लीन झालीं असतां आपल्या ठिकाणीं जें काय शिल्लक राहतें त्या दोन्हीं शिल्लकी एकस्वरूपच असून व्यवहारांत मात्र त्यासंबंधानें ' अस्ति, भाति, प्रियता ( Existence Knowledge Bliss ) ' हें विधान करितां येतें, असा जो आमच्या ऋषींस ज्ञानप्रसाद झाला त्याचा अत्यंत अंधुक अंश कँट मुनींस मिळाला होता. अस्ति, भाति हें ज्याविषयीं विधान तेंच ब्रह्म होय. आंतबाहेर हें ब्रह्म एकरसात्मक असून या शिवाय दुसरी वस्तु नाहीं, असें अद्वैत वेदांत सांगतो. ही गोष्ट कँट यांना स्पष्ट दिसली नसावी. ' ज्ञाता व ज्ञेय एकच आहेत. ' असा उद्गार त्यांनीं काढला आहे हें खरें; पण ज्याला ते Pure Reason म्हणतात ( यालाच इकडील वेदांत आत्मा असें म्हणेल. ) त्याचें स्वरूप प्रत्येक विचारी पुरुषाला स्वमात्रसंवेद्य असून तें ' अस्तिभातिप्रियतात्मकच ' आहे, असें स्पष्ट ज्ञान कँटला झालें नसावें असें वाटतें. हें झालें असतें तर त्याच्या विचारमीमांसेत व आचारमीमांसेंत विरोध उत्पन्न झाला नसता. विचारमीमांसेत तो प्रपंचासंबंधेंही अज्ञेयवादी झाला व्यवहारांत श्रीकृष्ण व श्रीमच्छंकराचार्य हेही अज्ञेयवादीच आहेत. पण परमार्थदृष्टीनें ते उभयतांही आस्तिकवादी, ब्रह्मवादी, अद्वैतवादी आहेत. अनुभवाचीं सर्व साधनें नष्ट झालीं, तरी जोपर्यंत ' अस्मिता ' आहे तोपर्यंत ' अस्तिभातिप्रियता ' हे गुण प्रकट व्हावयाचेच आणि अस्तित्वाचा अंत केव्हांही होणें शक्य नाहीं, अशी इकडील दैवी व मानवी तत्त्वज्ञान्यांची प्रेरणैकजन्य सिद्धांतबुद्धि आहे आणि म्हणूनच आमचे तत्त्वज्ञानी सामान्यत्वानें सर्वत्र आस्तिकवादी आहेत. कँट यांना ब्रह्मवादाची कल्पना

नव्हती म्हणून ते अज्ञेयवादी झाले; पण आचारांत, नीतिशुद्ध व्यवहारांत सर्वव्यापी, सर्वनियामक व सर्वदयाघन पुरुषोत्तमाचें अस्तित्व त्याला गृहीतच करावें लागलें. हाच विरोध होय. विचारदृष्टीनें ' परमार्थ वस्तु आहे कीं नाहीं हें विदित नाहीं ' व नीतिदृष्टीनें ' ती आहे ' असें गृहीत मात्र धरून ( सिद्ध न करितां ) चालावयाचें हाच तो विरोध होय. असला विरोध ज्ञानमार्गाला व पुरुषार्थाला काय उपयोगी ?

असो; आतां आपण त्यांच्या नीतीकडे वळूं. जसजसें ज्ञान वाढत जातें, तसतशी कर्तव्यज्ञानाची कल्पना विस्तृत होत असते, ही गोष्ट केव्हांही विसरतां कामा नये. कँट साहेबाची ज्ञानमीमांसा इतका वेळ सांगितली त्याचें तात्पर्य तरी हेंच आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानास जसजसें निश्चितस्वरूप येऊं लागलें, तसतशी त्यांची नीतिविषयक कल्पनाही उदात्त होत गेली. ती कशी तें आपण पाहूं. कँट यांचे विद्यार्थीदशेचे दिवस संपून ते व्यवहारांत शिरतात, तोंच फ्रान्समध्यें प्रसिद्ध असलेल्या तत्कालीन रुसो नामक तत्ववेत्याचे ग्रंथ त्यांचे हातीं पडले. ह्या ग्रंथाच्या परिशीलनानें कँट यांच्या वृत्तींत फरक पडला. ईश्वराच्या घरीं सर्व जीव सारखेच असतात, मानवी प्राण्याची योग्यता फार मोठी आहे, केवळ विद्वत्ता हाच कायतो मोठेपणाचा गुण नव्हे, विद्वत्ता आणि महानुभावता ( औदार्य ) हे दोन निरनिराळे गुण आहेत, मनुष्य विद्वान असला ह्मणजे तो उदार अंतःकरणाचा असतोच असा नियम नाहीं, इत्यादि सिद्धांतांचें पारायण करून कँट यांनीं विद्वान तोच सदाचारी हा पुराणमार्ग सोडून दिला. नीतिमीमांसेचा उद्गम सुखदुःखांपासून होतो, ह्मणजे सौख्य देणारें तें नीतियुक्त, दुःख देणारें तें अनीतियुक्त, अशी त्यांची प्राथमिक कल्पना होती. नंतर व्यक्तिव्यक्तींमध्यें सुखदुःखाच्या कल्पनेंत भिन्नता दृश्य होते, एतदर्थ मानसशास्त्राचा अभ्यास करून हृद्वृत्तींत ( अंतःकरणाच्या वृत्तींत ) नित्यता कोठें आहे, वर्तनाला सद्गुणत्व प्राप्त करून देणारीं तत्त्वें कोणतीं, इत्यादि प्रश्नांचा विचार करून कँट यांनीं ठरविलें कीं, मानवी योग्यतेचें पोषण करून तिची उन्नति करणारें वर्तन तें सद्गुणात्मक, व मानवी योग्यतेची अवनति करणारें वर्तन तें दुर्गुणात्मक वर्तन होय. सद्गुणाचें मान ठरवावयाचें तें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखाच्या मापानें नव्हे, तर मानवी योग्यतेच्या श्रेष्ठकनिष्ठपणानें सद्गुण, दुर्गुण ठरवावयाचे आहेत. मानवी योग्यता ह्मणजे मनुष्याचा पशुपक्ष्यादिकांहून असणारा श्रेष्ठपणा होय. आहारनिद्राभयादि व्यवहार सर्वसामान्य आहेत हे खरे; पण पशूंस विवेक नाहीं, मनुष्यास आहे. मनुष्यानें स्वयोग्यतेप्रमाणें ह्मणजे विवेकद्वारा वर्तन करावें, ही त्याची योग्यता होय. या मानवी योग्यतेची अति उदात्त कल्पना मनांत असली व आचरणांत प्रकट करण्याचा प्रयत्न केला ह्मणजे श्रेष्ठ योग्यता साध्य करण्याचा मार्ग किती बिकट आहे याची प्रतीति येऊन संकटसहनता प्राप्त होते आणि आत्मसंयमन करण्याची संवय होते. असो; तेव्हां मानवी योग्यतेची उदात्त कल्पना मानसशास्त्राभ्यासानें, धर्मग्रंथांच्या पारायणांनीं आणि तत्त्वज्ञानाच्या उदात्त पुरुषार्थांनीं सिद्ध करून तदनुसार वर्तन करणें हा **नीतिपंथ होय.**

ही कँटची प्रथम भूमिका आहे. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' हा कृष्ण-पंथ आहे. आतां स्वसुख आणि परसुख (स्वार्थ आणि परमार्थ), प्रवृत्ति निवृत्ति, प्रपंच व परमार्थ हे जे पुरुषार्थ आहेत त्यांचा व अनुभवसिद्ध मानसशास्त्रप्रणीत सिद्धांतांचा पुष्कळ वेळ विरोध येतो. पहा कीं, स्वार्थ साधण्यासाठीं आपण पुष्कळ श्रम करितों व स्वार्थ साध्यही करितों; पण त्यापासून कित्येक वेळीं सुख उत्पन्न होत नाहीं, किंवा ज्या-पासून सुखनिष्पत्ति होईल असें वाटतें, तें वर्तन स्वार्थपर असत नाहीं, असा अनुभव पुष्कळ वेळां येतो. तेव्हां या विरोधाचें कारण काय असावें याचा शोध कँटनीं केला. हा शोध चालला असतांनाच ज्ञानोपलब्धीचा त्यांचा मार्ग शुद्ध केला जात होता; ह्मणजे इन्द्रियें, मन व बुद्धि हीं जीं ज्ञानाचीं मुख्य द्वारें यांचें परिशोधन कँट करीत होते. या परिशोधनांत असतांना कँट यांनीं हा शोध लाविला कीं, ज्ञानाचीं मूलतत्त्वें ह्मणजे आत्मज्ञान आणि आत्मविज्ञान होत. अर्थातच सुखदुःखात्मक मनोविकार हे विषयात्मक झाले; आणि ह्मणून 'मनोविकाराच्या व सुखदुःखाच्या द्वारानें नीतिशुद्धाशुद्धतेचा मार्ग ठरणे संभवनीय नाहीं, हें त्यांनीं ठरविलें. ह्मणजे ज्या अर्थी सुखदुःखें हीं विषयात्मक आहेत, विषयांशीं यांचा संबंध येतो, विषयांच्या कमीजास्त-पणावर सुखादिकांचा कमीजास्तीपणा होतो, त्या अर्थी नीतिदृष्टीनें सद्वर्तन कोणतें हा प्रश्न सोडविण्याचें सामर्थ्य विषयमूलक सुखदुःखांना नाहीं; विषय नित्यविकारी असतात; पण नीतितत्त्वें नित्य असतात: तेव्हां अनित्यात्मक विषयांपासून उत्पन्न होणारीं सुख-दुःखें हीं नित्य व शुद्ध अशा नीतितत्त्वांचें नियमन कसें करणार? हीं नीतितत्त्वें सम-जण्याचें एकच साधन आहे: तें कोणतें ह्मणाल तर विषयविमुख असणारें शुद्ध व निर्मळ आत्मज्ञान होय. ह्याच्या साहाय्यानें मात्र खरीं नीतितत्वें प्रकट होतात; हे विचार त्यांनीं प्रकट केलें ह्याचप्रमाणें खरें सुख अथवा खरा आनंद हवा असेल तर तो बाह्य विषयांपासून मिळणार नाहीं. तो खरा आनंद आपल्या अंतर्वृत्तींतच सांपडणार. आत्मारामाशीं एकतानता संपादण्याचा प्रयत्न करणें व स्वस्वरूपांत असणें हाच खरा आनंद होय. हेंच खरें समाधान आहे. या समाधानाप्रीत्यर्थ अवश्य असणारा जो आत्मव्यापार, तो, नीतिशुद्ध वर्तनाचा मूळ पाया आहे. आत्मव्यापार हेंच निःश्रेयस् आहे. यापरतें दुसरें कांहीं चांगलें नाहीं. आत्मेषणा ही आत्मव्यापाराची जननी आहे. **ही स्वतंत्र आत्मेषणा स्वस्वरूपाशीं तादात्म्यवृत्तीनें असली म्हणजे समा-धान असतें.** स्वस्वरूपानुरूप आत्मेषणेचा व्यापार असला ह्मणजे समाधान उत्पन्न होतें. ही कँट यांची द्वितीयभूमिका आहे. 'प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम्। उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम्,' येथेंही श्रीकृष्णांनीं हेंच सांगितलें आहे.

पुढें इतिहासाचा व मानसशास्त्राचा विचार करून त्यांच्या उत्क्रांतीची अभ्यासद्वारें झालेली कल्पना ज्ञानमीमांसा, ज्ञानाच्या तत्वांचें नित्यत्व आणि शेवटीं व्यव-हाराचें निरीक्षण आणि पृथक्करण ह्या तीन दृष्टींनीं झालेली कल्पना ही तृतीय भूमिका

आहे. (१) रूसोच्या तत्वाप्रमाणें नरजन्माची महद्योग्यता त्यांनीं स्वीकारली; पण मनुष्याचें येथील वर्तन सामान्यतः पापमूलक असतें असें अनुभवानें व इतिहासद्वारा जेव्हां त्यांना कळलें तेव्हां त्यांनीं असें ठरविलें कीं, प्राथमिक मनुष्याचें स्वार्थपर वर्तनच मानवी जातीच्या अभ्युदयाला, उत्क्रांतीला कारण होतें. पहा कीं, मनुष्यव्यक्तीचा पशु-समान असणारा जो दृश्य आत्मा तो लवकर स्वकर्मकुशल ह्मणजे संघटित होतो; पण त्याचा पारमार्थिक आत्मा अभ्युन्नत होण्यास फार दिवस लागतात. खाणेंपिणें, विषयजन्य सुखदुःख इत्यादि देहविषयक कल्पना लवकर दृढ होऊन मानवी व्यक्ति येथील विषयांचा उपभोग घेण्यास लवकर तयार होते; पण ज्ञान, ज्ञानपोषक सद्भाव, इत्यादि आत्मविषयक गुण संपादन करण्यासाठीं अवश्य असणाऱ्या मनोनिग्रहाचा, ज्ञानाचा, सद्भावाचा, परोप-काराचा अभ्युदय मानवी मनांत होण्यास फार दिनावधि लागते. नुसता सुखदुःखाचाच प्रश्न असला तर, मानवी देहाची इतिकर्तव्यता 'रावणकुंभकर्णाच्या' वेळींच संपली असती. पण ईश्वरी योजना तशी नाहीं. सुखदुःखाच्या पुढें जाऊन स्वव्यापारजन्य, आत्मकर्मजन्य योग्यता वाढवावयाची, सुखविषयानें सुखी व्हावयाचें नाहीं, तर स्वतःच्या आत्मिक योग्यतेनुसार प्राप्त झालेले विषय ('आपूर्यमाणचलप्रतिष्ठं' हा श्लोक पहा.) सुखद अथवा दुःखद आहेत हें ठरवावयाचें, उदयाचलाकडे नेणाऱ्या निरोगी अहमहमिकेनें समाजांत उन्नतिप्रवृत्ति उत्पन्न करून सर्वांस योग्यतेनुरूप व त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ कर्म करण्याची प्रेरणा उत्पन्न करावयाची व येणाऱ्या प्रतिबंधाचा नाश करून आपली योग्यता वाढवाव-याची व एकंदरीनें समाजाची उन्नति करावयाची हा ईश्वरी संकेत आहे, असें कँट यांना आढळून आलें. (लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि.) 'येथें प्रत्येक समंजस पुरुषाचें बुद्धिपुरःसर वर्तन कसें पाहिजे, तें पहा. (१) 'अशा तत्वानुसार वागा कीं, जें तत्व सर्वांनीं उपयोगांत आणावें. म्हणजे त्या तत्वानुसार वर्तन करावें, (२) प्रत्येक मानवी पुरुष हा पुरुषार्थ आहे, साधन नव्हे, हेंही ध्यानांत ठेवा, म्हणजे आपण पाळणार तीं तत्त्वें सर्वगामी आहेत व तीं तत्वें मानवांचा उद्धार करणारीं आहेत हें ध्यानांत ठेवा. (३) आपले मनोविकार येथें कुचकामाचे आहेत. ज्या योगें मानवी उन्नत्ति होईल, तसेंच आपण वागलें पाहिजे. त्या प्रकारचें वागणें योग्य अहमहमिकेनें सहजच होतें.' हें कँट साहेबांचे नीतिसिद्धांत आहेत. 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ' (२) ज्ञेयाचें ज्ञान आपल्यास सर्वगामी इंद्रियमनोबुद्धीच्या संस्कारांनीं होतें, तसेंच कर्त-व्याची मीमांसा आपल्यास सर्वगामी शुद्ध इच्छेनें करितां येते. जेथें इच्छा शुद्ध आहे, जेथें चित्त निर्मळ आहे, तेथेंच सत्कर्म होतें. (कर्मण्यकर्म यः पश्येत् हा श्लोक पहा). सत्कर्माची इच्छा म्हणजे नीतिबद्ध इच्छा होय. नीति नियमबद्ध आहे. जेथें पारमा-र्थिक नियमबद्ध नीति आहे तेथें सत्य आहे. अहंकारविमुक्त सद्वर्तन हीच नीति होय. आतां व्यवहारांत व मानवी स्वभावांत अहंकार प्रमुख आहे; तेव्हां नीतिनियम ठरविण्यास व्यवहार व मानवी स्वभाव उपयोगी नाहींत. येथें आत्मा प्रमाण आहे, व तो अंतर्यामीं असून वस्तुत्व तेथेंच आहे. अतएव व्यवहार ठरविणारा नियामक व्यवहारातीत, व्यवहारा-

त्पर असून आत्मविवेकजन्य असल्यामुळें तो नित्य व शुद्ध म्हणजे निरुपाधिक असतो. व्यवहारांत प्रतीतीस येणारा प्रकृतिसंवलित आत्मा हा शुद्ध आत्म्याहून गौण असून खालच्या प्रतीचा आहे. ( संस्तभ्यात्मानमात्मनः हा श्लोक पहा ). अर्थातच शुद्ध आत्म्याच्या तंत्रानें वागणारा हा गौण आत्मा असावा, असला पाहिजे.

आतां शुद्ध आत्मा निरंतर शुद्धच राहणार. त्याची व सोपाधिक आत्म्याची म्हणजे जीवाची भेट कशी होणार ? कँट यांना हें सांगतां येईना. मनुष्यस्वभावाला व मानवी अनुभवाला वळण देणारे कँट मुनि, यांचे नीतिनियम स्वभावाची व अनुभवाची सीमा फोडून इतके पुढें गेले आहेत कीं, या व्यवहारशून्य नियमांनीं व्यवहार कसा नियंत्रित करावा, हें त्यांस सांगतां येईना. ( ३ ) सद्भाव किंवा साधुभाव असणें हेंच काय तें ' चांगलें ' होय. चांगलेंपणा स्वयंभू आहे, तो सुखदुःखावर किंवा इतर गोष्टींवर अवलंबून नसतो, ' अमुक गोष्ट चांगली कां ? ' याला शेवटचें उत्तर म्हणजे ' ती चांगली आहे ' इतकेंच होय; कारण आपल्या शुद्ध इच्छेचें ती गोष्ट हें प्रकट स्वरूप आहे; आणि ह्मणूनच ती गोष्ट करणें आपलें कर्तव्य आहे. ( येथें संकेतार्थ नाहीं, स्वार्थ आहे, **कर्तव्य ह्मणून करावयाचें आहे.** ) आपली प्राणजन्य इच्छा ( काम, क्रोध इत्यादि, ) या आत्मिक इच्छेच्या सामान्यतः विरुद्ध असते. तेव्हां या प्राणजन्य इच्छेचें नियमन करणें, तिचा निग्रह करणें, हें आपलें कर्तव्य आहे, व हें कर्तव्य केलें पाहिजे. असा आत्म्याचा विध्युक्त उपदेश ( हुकूम ) आहे. ही आज्ञा पाळिली तर समाधान होईल. **आत्म्याची आज्ञा** ह्मणून आत्मनिर्दिष्ट कर्म करावयाचें ही नीति होय. या नीतींत दोन आत्म्यांचें, जीवशिवांचें युद्ध होऊन शेवटीं शिवाचा जय होतो. असो; या आज्ञेंत सांगितलें आहे तरी काय ? सामान्यत्वानें ही आज्ञा अशी आहे कीं, ' सर्वांस जें तत्त्व लागू करशील त्या तत्त्वानें स्वतः वाग ' व ' मानवी अभ्युदय हा पुरुषार्थ आहे, साधन नव्हे, असें समज. ' सारांश, उद्धारक कर्म कर. ( ' आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ' हा श्लोक पहा. ) ' उद्धार होऊं नये ' असें शुद्ध आत्म्यास कधीं वाटावयाचेंच नाहीं. अतएव ' आत्मनियमानुसार चाल ' ही सर्वगामी आज्ञा होय. येथें कां व कसें ? हे प्रश्नच नाहींत. ही गोष्ट मला करितां येईल कीं नाहीं, असा सुद्धां प्रश्न उत्पन्न होऊं शकत नाहीं. कारण तुला आत्मा सांगतो कीं ' तूं असें कर. ' यावरूनच तुला तें कर्म करण्याचें **स्वतंत्र सामर्थ्य** आहे, असें सिद्ध होतें. आतां हा नियम व्यवहारांत आणावयासाठीं आपली या नियमावर श्रद्धा व भक्ति आणि पूज्यभाव हीं असलीं पाहिजेत. पूज्यभाव हा पूज्य वस्तूच्या महत्त्वानें उत्पन्न होतो. अनुभवानें होत नाहीं. म्हणून पूज्यभावानें व्यावहारिक आत्मा कसा प्रेरित होणार, हेंही कँट यांना सांगतां येत नाहीं. असो; आत्मा स्वतंत्र आहे ह्मणजे तो स्वयंभू आहे, नवीन कार्य उत्पन्न करणारा आहे व वाटेल तें करणारा आहे. तो स्वयंभू आहे म्हणजे तो

जें कर्म करील, अगर जो नियम घालील, ते कांहीं कारणाकारितां किंवा फलाकारितां म्हणून नसतात; तर त्यांची स्वयंप्रवृत्तिच तशी असते म्हणून तशी प्रेरणा किंवा तसे नियम तो कारितो. ( स्वभावोऽध्यात्ममुच्यते ) सारांश, त्याची प्रवृत्ति निष्कारण अथवा स्वयंभू असतें. असें यांचें ह्मणणें आहे. 'खरें बोलावयाचें, तें **तें खरें आहे** ह्मणून स्वकल्याण, लोककल्याण, ईश्वरी अनुग्रह इत्यादि साध्य होतात ह्मणून नव्हे.' हें त्या नियमाचें स्वयंभुत्व होय. (दातव्यमित्येव यद्दानं दीयतेऽनुपकारिणे) ( २ ) तो नवीन कार्य उत्पन्न करणारा आहे, म्हणजे नैसर्गिक शक्तींच्या कार्यकारणसंततीनें जीं कार्यें होतात, त्यांहून भिन्न असें कार्य करून निराळीच कार्यकारणसंतति उत्पन्न करणारा म्हणजे स्वतंत्र आहे. (भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः) पहा कीं, नदीचा ओघ बदलून कालवा तयार करणें, किंवा नाटकाला जाण्याचा शोक असलेल्या माणसानें कीर्तनाला जाणें हीं मानवी आत्म्याच्या प्रेरणेनें झालेलीं **स्वतंत्र कार्यें** आहेत. तेव्हां नवीन कार्यकारणसंतति उत्पन्न करण्याचें त्याला सामर्थ्य आहे. आणि शेवटीं: ( ३ ) दोन विरुद्ध गोष्टींपैकीं सुखदुःख, धर्माधर्म इत्यादि पैकीं वाटेल त्याचा स्वीकार करण्याचें त्याला सामर्थ्य आहे. याचेंच नांव स्वतंत्रता होय. या स्वातंत्र्यानुरूप वर्तन ठेवणें हीच नीति आहे. अंतःकरणाच्या स्वयंभू प्रीतीनें सत्कर्म झालें पाहिजे: नुसता बाहेरचा डौल उपयोगी नाहीं. ( यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन । कर्मेंद्रियैःकर्मयोगमसक्तः स विशिष्यते ) स्वतःचा उद्धार व परार्थ सुख हा आपल्या व्यक्तिविषयक वर्तनाचा नियम असावा. ( लोकसंग्रहमेवाऽपि संपश्यन्कर्तुमर्हसि ) नित्य स्वयोग्यता वाढवीत जाणें हा उद्धाराचा मार्ग आहे. ( उद्धरेदात्मनाऽऽत्मानं. )

आतां ज्याप्रमाणें **स्वातंत्र्य** ही **पारमार्थिक वस्तु** आहे असें **मानावें** लागतें, त्याचप्रमाणें **अमरत्व** व **ईश्वर यांचेंही अस्तित्व** नीतिमीमांसेच्या व्यवस्थेकरितां **गृहीत घ्यावें लागतें.** या दृश्य विश्वांत अकारण ( स्वयंभू ) अशी वस्तु नाहीं. असल्या वस्तूचें ज्ञानही होणें अशक्य आहे. जर नीति हें शास्त्र शक्य असेल, तर **स्वयंभू प्रवृत्ति** ही वस्तु सत्य, पारमार्थिक ह्मणजे अतींद्रिय असली पाहिजे. ही वस्तु बुद्धीच्या आवाक्याबाहेर आहे. येथें **श्रद्धा, भावच** हवा. तुकाराम महाराज ह्मणतात त्याप्रमाणें 'ठेवा जाणिव गुंडाळून । येथें भावचि कारण' हा न्याय कँट साहेबांनीं उपयोजिला आहे. ह्याचप्रमाणें नीतियुक्त आचरणाला सुखाची संगति असली पाहिजे, असा आपला ग्रह असतो. अनुभवांत तर सद्गुण आणि सुख यांचें साहचर्य दिसत नाहीं. तेव्हां हें लग्न लागलेलें बघण्यास मनुष्याचा जीव **अमरच असला पाहिजे.** ह्मणजे तो स्वर्गांत सर्वांचें नियंत्रण करणाऱ्या देवाजीच्या येथें, सुख तेंच सद्गुण व सद्गुण तेंच सुख असा परिचय घेईल. असो येथें धर्मास सुरवात होते. नीतिनियम ह्मणजे ईश्वराच्या आज्ञा होत, हें स्वीकारलें ह्मणजे धर्मस्वीकार होतो.

असो; तेव्हां कँट यांच्या मतानुसार पाहिलें असतां मनुष्याचा अवतार सुखा-करितां नाहीं. सुख ह्मणजे इन्द्रियांची तृप्ति; पण हीं इंद्रियें व मन हीं चंचल आहेत. शिवाय पाहिजे तें मिळालें ह्मणजे सुख होतें; पण लगेच आणखी कांहीं पाहिजे अशी वासना, ह्मणजे दुःखाची माता, उत्पन्न होते. पुनः या कार्यकारणनिगडित विश्वामध्यें सुख-समाधान मिळणें शक्य नाहीं. कर्तव्य करण्याचें सामर्थ्य, योग्यता व संपत्ति येथें मिळतील; मनोनिग्रहही साधेल; पण अंतरात्मा शांत करून वासना दग्ध करणारें समाधान येथें ह्या दृश्य विश्वांत विषयसाधनानें मिळणार नाहीं. लोकसंग्रहाच्या वर्तनानें मनुष्याच्या इच्छा, वासना व कर्में नियमित व स्वरूपवंत होतील; पण खरें नित्य समाधान मिळणार नाहीं. हें समाधान ह्मणजे शुद्ध इच्छेशीं स्वस्वरूपाचें तादात्म्य होय. या शुद्ध इच्छेचा सर्वगामी नियम ह्मणजे आपला नियम सार्वत्रिक आहे, असें समजून तदनुसार वर्तन करणें हा होय. हा नियम व तदनुसार वर्तन हें स्वतंत्रताजन्य आहे. याप्रमाणें वागणें न वागणें जीवाच्या हातांत आहे. फलाकरितां कर्म करावयाचें नाहीं. कर्म ( कर्तव्य ) करावयाचें ह्मणून करावयाचें आहे. यानें जीवाची व समाजाची योग्यता वाढते. दुसऱ्याचें नुकसान न करितां स्वतःच्या कल्याणाची सर्वजण खटपट करूं लागले तरी जर समाज उन्नत होतो, तर स्वतःची योग्यता श्रेष्ठ करण्याच्या प्रयत्नानें समाज श्रेष्ठ झालाच पाहिजे. निदान स्वर्गांत तो असतो व तेथें तो सुखीही असतो. कारण स्वर्ग ह्मणजे देवाचा लोक, पारमार्थिक वस्तूंचें स्थान आणि स्वातंत्र्याचें माहेरघर. ह्या तीनही गोष्टी एकत्र झाल्या ह्मणजे नीतीचें राज्य संपून धर्माचें स्वराज्य सुरू होतें. पण नीतीला केवळ नीतिनियमाच्या स्वातंत्र्याची अपेक्षा आहे. असो; प्रत्येक प्रसंगीं मनुष्यानें कसें वागावें, हें सांगणारें तें नीतिशास्त्र. 'कसें वागावें?' हें ठरविण्यासाठीं, कोणी व कशा-साठीं? या प्रश्नांस उत्तरें मिळालीं पाहिजेत. कोणीं ह्मणजे स्वतःचें ज्ञान असून व्यक्तित्व ( Personality ) जबाबदारी ओळखण्याचें सामर्थ्य असणारा प्राणी यानें कसें वागावें? साध्य काय आहे? साध्य ठरलें ह्मणजे साधनही ठरेल. आतां कँट यांच्या मतानें साध्य ह्मणजे शुद्ध आत्म्याशीं संगत असणारी इच्छा ( Reason ) व शुद्ध इच्छा ( Practical Reason ) समाधानांत-तादात्म्य वृत्तींत-ठेवणें हें साध्य आहे. अंतःकरणवृत्तींचें नियमन करणारी जी शुद्ध इच्छा ती समाधानांत असणें हें साध्य होय. तेव्हां या इच्छेला तादात्म्यवृत्तींत ठेवणारें वर्तन तें नीतियुक्त वर्तन होईल. ह्या वर्तनाचा सामान्य नियम कँट यांनीं शोधून काढला व त्याचाच इतिहास हा इतका वेळ सांगितला.

आतांपर्यंत जें मार्गक्रमण केलें त्याचा इत्यर्थ हा आहे कीं, या कार्यकारणसंघटित विश्वांत वस्तुज्ञान होणें शक्य नाहीं; पण आपल्याला आपल्या अंतर्यामीं जी शुद्ध इच्छा प्राप्त झाली आहे, जिचें स्वरूप ऐतिहासिक मानवी जातींच्या उन्नतीवरून कांहींसें दृश्य होतें व जिचें अस्तित्व आपल्यास गृहीत धरावें लागतें, त्या स्वयंभू इच्छेच्या सर्वगामी

नियमांचें ज्ञान होणें शक्य आहे. स्वात्म्याप्रमाणें सर्वांचा आत्मा आहे व तत्प्रणीत नियम सर्वगामी आहे. तो नियम हा कीं, 'तुझ्या वागण्याचें नियम विश्वगामी झाले तरी तुझे वर्तनांत भिन्नता येणार नाहीं.' प्रत्येक प्रसंगीं या नियमांच्या कसानें वर्तन अजमावयाचें, हा नियम स्वयंभू आहे. येथें फलाकांक्षा नाहीं. हाच माझ्या समजुतीनें कँटमुनीच्या नीतिमीमांसेचा इत्यर्थ आहे. स्वार्थ, लोकसंग्रह, पूर्णता व ईश्वरी अनुग्रह या सर्वांचा अंतर्भाव वरील नियमांत होतो. हा नियम शुद्ध इच्छेचा ह्मणजे आत्मिक इच्छेचा आहे व या नियमानुसार वागलें तर देहात्मिक इच्छेचें नियमन होऊन शेवटीं ती श्रेष्ठ स्वरूपांत लीन होते.

असो; प्रकृति आणि पुरुष, सांख्य आणि कर्म, यांच्यामध्यें कँटनें विरोध दाखविला; त्यामुळें ज्ञानाचें एकत्व एकरसत्व नष्ट होतें कीं काय अशी त्यास भीति पडली. आत्मा आणि अनात्मक वासना यांमध्यें–या दोहोंची एकवाक्यता करणारा–संबंध दाखविणारा, तिसरा पदार्थ घेतल्याशिवाय वरील द्वंद्व मोडण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां मात्र ( ज्यानें मोजतां येतें तें, सुखदुःखाचें भान देणारी शक्ति अथवा बरें वाईट सांगणारी शक्ति ) ही वस्तु या तत्वज्ञानें गृहीत केली. मात्रेला पदार्थज्ञान पूर्ण असतें आणि मात्रेच्या योगानें प्रकृतिज वस्तु स्वफलगामी ( adapted to its End ) आहे कीं नाहीं हें पुरुषाला ( Subject ) समजतें. या मात्रांस कँटनें एक नांव दिलें, त्याचें आपण रसज्ञता विभावना ( judgment ) असें भाषांतर करूं. याप्रमाणें तीन वस्तु झाल्या. आत्मज्ञान, रसज्ञता आणि बुद्धि हे जाणीवेचें भेद होत. **आत्मज्ञान तत्त्वदर्शी आहे, बुद्धीनें पदार्थग्रहण होतें** आणि **रसज्ञतेच्या साहाय्यानें आपल्यास तत्त्वांचा पदार्थांशीं संबंध काय आहे, हें समजतें.** तत्व सोडून पदार्थांकडे धांव घेणारी, पदार्थ अथवा जगत् स्वफलगामी आहे किंवा दिसत आहे, असें सांगणारी जी रसज्ञता हीच आमच्या वेदांत्याची **माया,** एका अर्थानें होते. ही रसज्ञता बरेवाईटाचे, ( नीतीचे ) व सौंदर्याचें विचक्षण करिते व पदार्थज्ञानही करून देते. सारांश ज्ञान आणि पुरुषार्थ यामध्यें एकतानता आणणारी रसज्ञता ही आमच्या मायेची धाकटी बहिणच होय!

## श्रीकृष्ण व कँट.

नीति–सिद्धांतांत कित्येक अडचणीचे प्रश्न उत्पन्न होतात खरे; पण माझ्या समजुतीनें या अडचणींपैकीं बहुतेकांचा निरास करून युरोपियन विचारविश्वांत नीतिनियमांस, व मनुष्यकोटीस, जर कोणी श्रेष्ठत्व दिलें असेल तर ते **कँट** साहेबांनींच होय. अठराव्या शतकांत व एकोणिसाव्या अर्ध्या अधिक शतकभर नीतिशास्त्राला सुखैकगामित्वाचा जो प्रचंड ओघ लागत होता त्याला कँट साहेबांनीं मोठा बंधारा घालून मानवी

योग्यता वाढविणें व द्वेषशून्य व परोपकारी समाज उत्पन्न करणें हें मानवी कर्तव्य आहे, असा दुंदुभि सर्वांच्या कर्णपथावर जाऊन आदळेल, इतक्या जोरानें वाजविला. नीतिदृष्टीनें कँट यांचे जाणत्या विश्वावर अनंत उपकार आहेत.

आतां, मनुष्यास मनुष्यत्व कां प्राप्त झालें, आईबापांच्या सत्कर्मदुष्कर्माप्रीत्यर्थ पुत्रपौत्रादिकांस म्हणजे अनुवंशजांस निग्रहानुग्रह कां होतो, मनुष्याचा मुख्य पुरुषार्थ कोणता इत्यादि विषयांचा पूर्ण विचार जसा आमच्या इकडे ऋषिकालीं झाला, तसा तिकडे न झाल्यामुळें, व पुनर्जन्म ब्रह्मज्ञान इत्यादिकांची वार्ताही तिकडे ठाऊक नसल्यामुळें कँट यांचें नीतिशास्त्र अपूर्णच राहिलें. पुनः; आत्मिक इच्छेचा व दैहिक इच्छेचा संबंध कसा जोडावा, हेंही कँटसाहेबांस समजेना. असो; आतां एक गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, आमच्यापेक्षां फार तर कँट यांच्या नीतिमीमांसेंत **सामाजिक अस्तित्वाचा विशेष स्पष्ट विचार केला आहे**; पण या संबंधानेंही काय म्हणावयाचें तें पुढें पाहूं.

पण आधीं भगवान् श्रीकृष्ण यांनीं नीतिशास्त्राच्या उद्गमनादिकाचा कसा काय विचार केला आहे तें पाहूं. श्रीकृष्णपरमात्म्याचा अवतार केव्हां झाला, ते ईश्वराचा अवतार होते किंवा कै० प्रो० रा. रा. भागवत यांनीं नुकतेंच शोधून काढल्याप्रमाणें 'साधु' पुरुष होते, याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. भगवंतांनीं गीता सांगितल्यास किती वर्षें झालीं हें जरी सांगतां येत नाहीं, तरी कलियुगाला आरंभ होण्याच्या आधीं श्रीव्यास-मुनींनीं ही मोक्षमाला ग्रथन केली, अशी लोकवार्ता आहे; निदान पाणिनीनें व्याकरण लिहिलें तेव्हां ती अस्तित्वांत होती. सारांश, गीतेचा अवतार होऊन कमींत कमी २००० वर्षें झालीं. उपनिषदांच्या कालांतच गीताग्रथन झालें असलें पाहिजे; कारण गीतेमध्यें उपनिषत्सिद्धांतांचें मंडन असून भाषाही कठादि उपनिषदांच्या भाषेसारखीच सामान्यतः आहे.

वाचकांनीं ही गोष्ट विसरतां कामा नये कीं, ज्ञानाची सीमा जशी विस्तृत होते, तशी कर्तव्यसीमा वाढत जाते व कर्तव्याचें शीलही श्रेष्ठतर होतें; पण ज्ञानाचा अत्यंत विस्तार झाला, ब्रह्मज्ञानविज्ञान होऊन सर्वत्र 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरं। विनश्यत्स्व-विनश्यन्तं' पाहण्याची स्थिति प्राप्त झाली, 'सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते' ही स्थिति प्राप्त झाली म्हणजे 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' अशी अवस्था प्राप्त होते. यच्चयावत् सर्व एकरसात्मक, घनदाट ओतप्रोत भरलेलें ब्रह्म अंतर्बाह्य आहे, असा निश्चय होऊन त्याचा साक्षात्कार झाला म्हणजे सर्व शास्त्रांबरोबरच नीतिशास्त्राचाही लय होतो. 'आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते' ज्याला आत्मसमाधि लागली, जो जीवन्मुक्त झाला, तो कर्मबंधांतून, नीतिशास्त्रांतून सुटला. तेव्हां कँट साहेबांस जो शुद्ध, मुक्त व निर्लक्ष आत्मा नीतिशास्त्राची मीमांसा करितांना गृहीत घ्यावा लागला, तो

शुद्ध आत्मा वेदांतसिद्धांताप्रमाणें ब्रह्मस्वरूप असून अस्ति, भाति, प्रियता ( Existence, Knowledge, Bliss ) या स्वरूपाचा असतो व अंतर्बाह्य सर्वव्यापी असतोच असतो. हें जर खरें मानलें, तर त्या आत्म्याला कर्तव्य असें कांहींच राहणार नाहीं. हा वेदांती सिद्धांत खरा किंवा कसें, हें पहावयाचें हें स्थळ नव्हे. इतकें बरीक खरें कीं, ज्या ज्ञानसाधनांच्या म्हणजे इन्द्रियमनोबुद्धींच्या संस्कारांचा योग्य व युक्तिसिद्ध विचार करून, वस्तूचें याथात्म्यज्ञान आपल्यास होणें शक्य नाहीं व याचा आदिअंत समजणें शक्य नाहीं ' असें ' न रूपमस्येह तथोपलभ्यते, नांतो न चाऽऽदिर्न च संप्रतिष्ठा ' भगवंतांनीं गायिल्याप्रमाणें ज्यांना संसाराविषयीं ( Phenomenal existence ) उद्गार काढावे लागलें, तेच कँट साहेब **वेदांतग्रंथांच्या** आधारानें पुढें गेलें असते तर आत्मतत्त्व ( Reason ) त्यांनीं नीतीसाठीं व समाजशासनासाठीं मात्र गृहीत घेतलें, तें घ्यावें न लागतां सर्वच ब्रह्म आहे असा त्यांचा निश्चय झाला असता. ज्ञाता व ज्ञेय ( Subject and Object ) हे मुळांशीं एक असावें, अशी स्पेन्सरपंडितांप्रमाणें त्यांनाही अंधुक प्रेरणा झाली. पण विवर्तवादाची पद्धति त्यांस माहीत नसल्यामुळें ते ब्रह्मस्वरूपाशीं जाऊन कायमचे भिडले नाहींत. विवर्तवाद व मायावाद खरा कीं खोटा, हेंही पाहण्याचें हें स्थळ नव्हे. पण हा वाद त्यांनीं संपादन केला असता तर त्यांना आत्मिक इच्छा व दैहिक इच्छा यांमधील विरोध काढून टाकितां आला असता. आत्म्याला इच्छा नाहीं; पण जीवन्मुक्तास कधीकाळीं इच्छा झालीच तर तिचा दैहिक इच्छेशीं येणारा विरोध नष्टमूल असतो, याचाही परिचय कँट यांना आला असता. पुनः, प्राच्य आर्यांच्या व्यवहारांत व परमार्थांत जीव कीं प्राण होऊन गेलेला जो पुनर्जन्माचा सिद्धांत तो जर कँट साहेबांस अवगत असता, तर विषम दिसणाऱ्या पण सम असणाऱ्या ईश्वरी सृष्टींत त्यांना सद्भाव व सुख यांचा वियोग अथवा प्रतियोग दिसला तोही दिसला नसता, व त्या ' वियोगाचा संयोग ' करण्यासाठीं जो कल्पनाजन्य स्वर्ग बनवावा लागला तोही लागला नसता.

असो; कँट यांच्या समजुतीनें **अनुभवाशिवाय सिद्ध असलेला** जो सर्वगामी विधि ( I ought, therefore I can ) तो **अनुभवानेंच सिद्ध होतो** असें जाणून श्रीभगवंतांनीं '**समत्वं योग उच्यते**' असें सांगितलें आहे. भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांख्ययोगामध्यें ( Pure Reason ) आत्म्याचें ब्रह्मत्व सिद्ध करून व श्रुति, युक्ति व अनुभव यांच्या साहाय्यानें आत्म्याचें अविनाशित्व व सर्वव्यापृतत्व सिद्ध करून कर्मयोगाकडे ( Philosophy of Practical Reason ) जेव्हां वळणार, तेव्हां—म्हणजे सांख्य योगाचे शेवटीच—' स्वधर्ममपि चावेक्ष्य ' ( स्वतःचे कर्तव्याकडे लक्ष देऊन ) व ' सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । ततो युद्धाय ( कर्मणे ) युज्यस्व ' असा उपदेश केला. कर्मयोगाचा, मग तें कर्म सामाजिक, नीतिविषयक, धार्मिक अगर राजकीय असो—कर्मयोगाचा—आरंभ व शेवट ' बुद्धि निर्विकार,

निःसंग, निर्ममत्वाची ' ठेव, हें सांगण्यामध्यें आहे. कँट यांना धर्म ( Duty ) स्वयंभुत्वानें ( शुद्ध आत्मद्वारा ) समजतो. इकडील आर्यलोकांचा धर्म ( कर्म ) हा शास्त्रावरून ठरतो. पूर्वजन्मानुसार प्राप्त झालेल्या स्वभावाप्रमाणें व्यक्तिधर्म व सामाजिक धर्म ठरतात. ( अठरावा अध्याय ४०-४८ श्लोक पहा. ) धर्म याचा अर्थ कर्म (Duty) असा घेतला आहे, तेव्हां आपला स्वभाव कसा आहे, हें आपण स्वतः अथवा गुरुद्वारा समजून घेतले म्हणजे ( यो यच्छ्रद्धः स एव सः ) आपला धर्म शास्त्रावरून आपल्यास कळतो. तेव्हां धर्म, ( कर्तव्यकर्म, हाच शब्द यापुढें उपयोजूं. ) स्वयंभुत्वानें समजतो हें म्हणणें प्रायः सत्य नाहीं. धर्म ठरलेलाच आहे. आपला स्वभाव कसा आहे हें आपण अजमावून घेतलें म्हणजे झाले. सारांश, नीतिमीमांसेत मानसशास्त्र उपयोगशून्य म्हणून जें कँट साहेबांनी शेवटीं शेवटीं ठरविले ते खरें नाहीं. स्वभावानुसार कर्तव्यकर्म शास्त्रानें ठरविलें तें कशाचे आधारावर हेही पाहण्याचें हें स्थळ योग्य नव्हे; श्रीभगवंतांचे वेळीं प्रामाणिक शास्त्राचें मात्र प्राबल्य होते आणि म्हणूनच ' तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ' असें भगवान सांगून गेले. शास्त्राची रचना श्रुति, युक्ति आणि अनुभव या तिहींस अनुकूल असते हें सांगायास नकोच.

आतां भगवंतांनी प्राणीमात्रास व विशेषतः मानवी प्राण्यास जो नियम सांगितला तो ' स्वधर्मे निधनं श्रेयः ' ' श्रेयान्स्वधर्मो विगुणः ' ' उद्धरेदात्मनाऽऽत्मानम ' हा आहे. आपल्या स्वभावानें ठरलेलें जें प्रभुनिर्मित शास्त्रप्रणीत कर्तव्यकर्म तें करणें श्रेष्ठ आहे व प्रत्येक जीवानें आपला उद्धार स्वतःच्या आत्मबलानें करावा, हे दोन सार्वजनिक नियम होत. अर्थातच या दोन नियमावरून विषयोपभोग व स्वार्थ या दोहोंचा त्याग झालाच.

' नाऽऽत्मानमवसादयेत् ' ( आत्म्याची, जीवात्म्याची, हानि करूं नये ) या कळकळीच्या उपदेशावरून भगवंतास आत्म्याची योग्यता केवढी वाटते, याचें दिग्दर्शन होतें. ' नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ' ( जें नित्यकर्म म्हणून सांगितलें आहे, स्वधर्म म्हणून जो सांगितला आहे, त्याचा त्याग कव्हांही योग्य नाहीं. ) आणि ' यज्ञो दानं तपः कर्म त्याज्यं, कार्यमेव तत् ' म्हणजे आत्म्याची योग्यता वाढवून त्याचा उद्धार करण्यासाठीं जीवास पवित्र करणारें असें जें यज्ञदानादि कर्म, तें करण्यास कधींही चुकूं नये. यावरून स्पष्ट होतें कीं, हिंदुधर्मग्रंथांत नरदेहाची योग्यता मोटी मानिली आहे, व प्रत्येक साधकाला श्रेष्ठ मार्गानें जाण्याचें सामर्थ्य आहे, असाच आमच्या धर्मग्रंथांचा सिद्धांत आहे.

' दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणा फलहेतवः ' या उक्तीवरून ज्ञान व सुखदुःखादि मनोवृत्ति यांत विशेष आहे, इतकेंच नव्हे तर ज्ञान हें

सुखदुःखादि मनोवृत्तीपेक्षां अत्यंत श्रेष्ठ असून खरें समाधान आत्मज्ञानांतच आहे व त्याचप्रमाणें 'समत्व' नामक जो बुद्धियोग त्यांतही समाधान आहे, असें श्रीभगवन्मत होतें. याच मताचा अनुवाद स्काटलंड व इंग्लंड येथील नीतितत्वज्ञांनीं १८ व्या शतकांत केला. असो; तेव्हां बुद्धिविकास व मनोवृत्तिविकास हे शब्द एकार्थक नसून परस्परविरोधी आहेत हें तत्व फार प्राचीनकाळीं आपल्या पूर्वजांस विदित होतें.

ह्यानप्रमाणें अध्याय १४ मध्यें जी त्रिगुणमीमांसा केली आहे, सोळाव्यांत ज्या दैवी व आसुरी संपत्ति सांगितल्या, सतराव्यांत जो सामान्य, असंस्कृत पुरुषाच्या श्रद्धेचा विचार विस्तारपूर्वक केला आणि अठराव्यांत **यज्ञदानादिकांचा**, त्यागाचा, कर्मचोदक व कर्मसंग्राहक वृत्तीचा उहापोह केला, आणि सुखाची भवति न भवति केली त्या सर्वांचें तात्पर्य पाहिलें असतां असें दिसतें कीं, जीवांच्या ज्या मनोवृत्ति आहेत त्यांचा ( what is ) विचार यथास्थित करून नंतर **आहे त्यांच्या अनुरोधानें** 'स्वधर्मे निधनं श्रेयः' 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' इत्यादि पुरुषार्थांचा ( Ought to be ) मार्ग सांगितला आहे, तो अर्थातच प्रत्यक्ष अनुभवास येणारा, धर्मविहित, करावयास सोपा आणि पारमार्थिक आहे. प्रत्येक पुरुषामध्यें सत्त्वादि गुणत्रयाचा पूर्वजन्मानुसार, पूर्वजकर्मानुसार कमी आधिक अंश असतो व त्याचप्रमाणें प्रत्येक पुरुषाला सुख, ज्ञान व अव्ययत्व हवीं असतात. एवंच पुरुषामध्यें नित्यत्वानें असणारे सत्वादि गुण व त्याला हवी अशी वाटणारी सुखादित्रयाची इच्छा या नित्य गोष्टींवरून त्यानें कसें वागावें हें तत्त्वज्ञांनी शास्त्र पाहून ठरवावें. आपल्या आत्म्याची योग्यता काय आहे, हें ओळखून घेऊन, संकल्पजन्य सर्व इच्छा सोडून देऊन व मनानें इंद्रियांचा निग्रह करून आपलें कर्तव्य करावें असें सहाव्या अध्यायांतील २४ व २५ श्लोकांत सांगितलें आहे. मार्ग कठीण आहे, बिकट आहे, तथापि धीर न सोडितां श्रद्धापूर्वक स्वकर्तव्याचा सोपा मार्ग आदरावा, असें ४० वे श्लोकांत व दुसऱ्या अध्यायाच्याही ४० व्या श्लोकांत सांगितलें. **ही प्रथम भूमिका होय.**

आतां सत्त्वादिगुणत्रय यांचें तारतम्याचा, सुखादि मनोवृत्तींचा व सद्वर्तनाचा नेहमीं मेळ असतोच असें नाहीं. सत्वगुणाचा परिपाक सुखांतच होतो असें नाहीं व एका पुरुषाचें सात्विक वर्तन दुसऱ्या पुरुषाला अथवा समाजाला किंवा शास्त्राला सद्वर्तनच वाटेल असाही नियम नाहीं. उदाहरणार्थ, ज्ञानसंग्रह करणें, तपश्चर्या करणें हें सात्विक मनोवृत्तीचें कर्म आहे. पण आपल्या देशावर परशत्रु आला असतां त्या वेळीं स्वदेशसंरक्षणार्थ क्षात्रधर्माचा अंगीकार करणें, निदान तें धर्म्य क्षात्रकर्म करीत असतील त्यांस इतर प्रकारानें साहाय्य करणें हें न करितां एखादा पुरुष अशा प्रसंगींही ज्ञानसंग्रह अथवा तपश्चर्या करीत बसेल तर तें त्याचें सात्त्विक कर्मही इतरांस व शास्त्रास असात्त्विक वाटेल! तेव्हां नीतिशास्त्रांतील सर्वसाधारण तत्त्वें इतिहासावरून किंवा मनो-

विकारावरून ठरविणें योग्य नाहीं, असें जें कँट यांचें मत तें श्रीकृष्णांनीं तिरस्कृत केलें आहे. **जें आहे तें सुटणें शक्य नाहीं, प्रकृतीचा सर्वथा निग्रह करणें शक्य नाहीं,** हें त्यांचें मुख्य सांगणें आहे. एक गोष्ट बरीक शक्य आहे. ती कोणती म्हणाल तर सुखदुःखाचा, फलाचा, ज्ञानपूर्वक त्याग ही होय. जसजसें ज्ञान, परब्रह्माचें ज्ञान-विज्ञान, वाढत जाईल, त्या मानानें फलत्याग करणें सुकर व सुखकर होईल; हा त्याग म्हणजे विषयभोगाचा, फलाचा, त्याग होय. हा कां करावयाचा, तर तें फल नित्य व निर्विकारी नाहीं म्हणून. नित्य, बुद्ध, शुद्ध असें काय आहे? आत्मज्ञान म्हणजे आत्मसुख आहे. हें आत्मस्वरूप प्रकट करणारा जो आत्मा तो इंद्रियमनोबुद्धींच्या, विषयांच्या, विषयानुभवाच्या पलीकडे व त्यांहून विलक्षण असा आहे. हें आपल्या श्रुति-युक्तींनीं म्हणजे परोक्षतः समजेल; पण अपरोक्ष ज्ञान होणें तें स्वसंवेद्यत्वानेंच होणें आहे. हें आत्मसुख किंवा तज्ज्ञान बाह्य सुखदुःखांपासून होणें शक्यच नाहीं. आत्मसुख म्हणजेच नित्य व निर्विकारी सुख आहे व तें अंतर्यामींच्या समाधानवृत्तीपासूनच ( ही जीवन्मुक्ताच्या थोडीशी अलीकडील स्थिति आहे. ) मिळावयाचें आहे. तें सुख बुद्धिग्राह्य म्हणजे अतींद्रिय आहे आणि हें सुख असल्याविना बाह्य विषयांपासून सुद्धां सुखदुःख होणार नाहीं. कारण बाह्य विषय जड आहेत. सुखदुःख वृत्ति व तज्ज्ञान हे चैतन्यविषय आहेत. जेव्हां चैतन्यमात्रविषयात्मक बुद्धि होईल तेव्हां सुख म्हणजे समाधान होईल, हा कँट यांचा सिद्धांत म्हणजे भगवत्सिद्धांताची पुनरावृत्ति आहे. असो; तेव्हां विषयसुखाचा त्याग करून आत्मसुख मिळविण्याचे नियम कोणते? ज्ञान वाढवून आत्मौपम्यानें सर्वत्र समबुद्धि ठेवणें हा पहिला नियम व फलाकांक्षाविरहित व अभिमान-शून्यतेनें यज्ञदानतपादि लोकसंग्राहक कर्मे योगविहित नियमांनीं करणें हा दुसरा नियम आहे, व हे दोन्ही नियम परस्परसंबद्ध असून अनुभवातीत म्हणजे आत्मबुद्धिप्रेरित आहेत. **ही द्वितीय भूमिका होय.**

आतां कँट साहेबांनीं तिसऱ्या भूमिकेवर येतांना इन्द्रियसिद्ध अनुभवाची व आत्म-सिद्ध नियमांची व्यवस्था लावण्याचा प्रयत्न केला. मनुष्याला दोन आत्मे आहेत. एक दैविक आत्मा व दुसरा परमात्मा. असे दोन आत्मे मानून पुनः जात्यात्मा असा एक तिसरा आत्माही कँटसाहेब मानतात. कँटसाहेबांचा व प्रायः सर्व पाश्चिमात्यांचा असा ग्रह आहे कीं, सृष्टीभर उत्क्रांतितत्त्वाचा अंमल अव्याहत असून त्याच्या सत्तेनें जातीची—मनुष्याची—प्रगति, उन्नति, होत आहे. हा नियम कँटसाहेब म्हणतात त्याप्रमाणें आमच्या प्राचीन ऋषींच्या अनुभवास आला, असें स्पष्ट दिसत नाहीं. व्यक्तीचें आचरण सात्त्विक असेल तरच सुधारलेला समाज तयार होतो, असें त्यांचें मत होतेसें दिसतें. व्यक्तीच्या स्वार्थपोषक अहमहमिकेचा कांहीं उपयोग होतो, नाहीं असें नाहीं; पण समाजाची खरी, कायमची, पाठीमागें न येणारी, सुधारणा व्हावयाची असली म्हणजे समाजांतील बहुतेक व्यक्ति त्या त्या सुधारणेनें अभिषिक्त झालेल्या असल्याच पाहिजेत.

बाकी समाजाचीचशी काय, पण व्यक्तीच्या पुढील जन्माचा सुधारणा होत जावी व होत जाईल ही गोष्ट मुद्धां त्यास संमत होती, हें ' लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ' ह्यावरून व ' शुचीनां श्रीमतां गेहे, योगभ्रष्टाऽभिजायते । ' ' अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ' इत्यादि श्लोकार्धांवरून स्पष्ट दिसत आहे. तसच 'श्रुत्वाऽन्येभ्य उपासते' (अन्यः) हा तेराव्या अध्यायांतील श्लोकार्धही असेच सांगत आहे कीं, सत्पुरुष समाजांत असतील, तर त्यांच्या संगतीनें इतर लोकही उन्नत होतात. आतां सामाजिक आत्मा ह्मणजे विराटपुरुषाची कल्पना व ग्रामदेवता, स्थलदेवता, या कल्पनांचा विचार सात्विक बुद्धीने केला ह्मणजे होणार आहे. दोन आत्मे म्हणजे एक परमात्मा (क्षेत्रज्ञ आत्मा) व दुसरा क्षेत्रात्मा, देहात्मा, आभासिक आत्मा—अनात्मक आत्मा ह्या कल्पनाच मुळा प्राच्यदेशीय आहेत. ' संस्तभ्याऽऽत्मानमात्मना ' या पंक्तीवरून श्रेष्ठ व कनिष्ठ आत्म्यांचा कर्तव्ये काय आहेत हें स्पष्ट दिसत आहे. ' उद्धरेदात्मनाऽऽत्मानं ' ' आत्मैव ह्यात्मनो बधुरात्मैव रिपुरात्मनः ' हीं भगवद्वाक्येही दोन आत्म्यांचें अस्तित्व व त्यांत परमात्म्याचे पारमार्थिक अस्तित्व स्थापित करितात. तसेच स्थितप्रज्ञाची लक्षणे, सर्वच्या सर्व पांचवा अध्याय, १२ व्या अध्यायांतील भगवद्भक्तलक्षणें व १४ व्या अध्यायांतील गुणातीत पुरुषांचें वर्तन यांचे परिशीलन केले असतां श्रेष्ठ आत्म्याचे श्रेष्ठत्व लक्ष्यांत येईल.

आतां कॅट यानीं समत्वाचा अनुभवातीत ह्मणून जो नियम काढला आहे, त्याची ' विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः' यावरून—कॅट यांच्या सर्वसाधारण नियमाची—आवृत्ति गीताकालांत तरी निदान निघाली होती असे दिसते. पण हा नियम सर्वांनीं एकाच अथान पाळला पाहिजे, हा जो कॅट यांचा आग्रह तो मात्र श्रुतीस, युक्तीस व अनुभवास जुळत नाही. कॅट यांची निष्ठुरता किल्येकांस कौतुकास्पद होते व त्यांनीं जो निर्विशेष विधि (Categorical Imperative) सांगितला आहे तसा आपल्या ग्रंथांतून व विशेषतः गीतेत आढळत नाही. ह्मणून किल्येकांस विषादही वाटला आहे. ' उद्धरेदात्मनाऽऽत्मानं ' किंवा ' एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्याऽऽत्मानमात्मना । जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् । ह्या आज्ञा अपवादशून्यच आहेत; पण ज्ञानी लोकास ज्ञाननिष्ठा व कर्मयोग्यांस कर्मनिष्ठा असें तारतम्य ठेवून भगवंतांनी असे सांगितले कीं, स्वधर्मानें, स्वत चे योग्य कर्म करून, आपला उद्धार करून घेणे हें प्रत्येकाचे कर्तव्य आहे, व जसे ज्ञान वाढत जाईल, जशी आत्मिक योग्यता अधिक उन्नत होईल, तशी कर्तव्यसीमा वाढवावी, श्रेष्ठ धर्म स्वीकारावा, अशी भगवदनुज्ञा श्रुत्यादि त्रयीस संमत अशी आहे. आणि शेवटी 'सर्व कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते । हा पुरुषार्थ साधावा. सर्व कर्मे ब्रह्माश्रयाने करून निःसंगवृत्ति ठेवणे हींच नीतीची परमावधि आहे व ही ब्रह्मज्ञानाशिवाय साध्य नाहीं. हे सर्व नियम अनुभवाचे पोषक—फार तर काय पण जनकपिते आहेत. श्रुति जशा अनु-

भवातीत असून अनुभवाचें अधिष्ठान होतात, त्याचप्रमाणें वरील नियम होत. यांस नित्य व अविकलत्व आहे, त ब्रह्माधिष्ठानावर हे नियम आहेत ह्मणून होय. हे नियम देहादि पंचकोशांचे अथवा दैहिक ह्मणजे आभासिक आत्म्याचें नियमन करून त्याचा उद्धार करितात. पण आभासिक आत्मा व पारमार्थिक आत्मा त्यांचा संबंध कँटसाहेबांस सांगता येत नाहीं. कारण ज्ञानदृष्टीने आत्मारामाचें स्वरूप त्यांना समजलें नाहीं. त्याला श्रुतीचेंच ज्ञान हवें होतें, व अन्वयव्यतिरेकानें 'सर्वं खल्विदं ब्रह्म, अहमात्मा ब्रह्म।' असा निश्चय झाला असला पाहिजे होता. हा निश्चय झाला असला म्हणजे आभासिक आत्म्याच्या अंतर्यामीं परमात्मा आहे व परमात्म्याच्या सत्तेनें दृश्य आत्मा असतो, हें ज्ञानविज्ञान होऊन 'दिसतें तसें नाहीं, व आहे तें दिसत नाहीं' हा विवर्तवाद सिद्ध होतो. व्यवहारांत, त्या प्रापंचिक विश्वांत, या कार्यकारणबद्ध विश्वविसृष्टीत, जरी कोठें आत्मा दिसत नाहीं तरी तो या सर्वांच्या व पाहणाराच्या अंतर्यामी आहे व तोच साक्षी व नियंता आत्मा जीवाला 'अस्ति' स्वरूपाची तळमळ उत्पन्न करून तिकडे नेण्याचा मार्ग दाखवितो. हा मार्ग ह्मणजे कर्मयोग व ज्ञानयोग होय. कर्मयोगाने चित्त शुद्ध होते व ज्ञानयोगानें स्वस्वरूप कळतें. कर्मयोगांतच नीतीचा अंतर्भाव होतो हें सर्व विश्रुतच आहे.

परमात्म्याचा व जीवाचा संबंध काय ? वस्तुतः ते एकच आहेत. अज्ञानानें भिन्नता उत्पन्न झाली ह्मणून शास्ता व शासितक असा, सेव्यसेवक असा, पूज्यपूजक असा संबंध उत्पन्न झाला. आत्मनियमांचे (ईश्वरी नियमांचे) श्रद्धापूर्वक व बुद्धिपूर्वक अनुपालन करणें हीच त्याची सेवा, हीच त्याची पूजा आहे. तेव्हां चित्त शुद्ध ठेवून आत्मोद्धाराचें प्रामाणिक कर्म करीत असणे हेंच सद्वर्तन होय, 'सद्भावे, साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते। प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्द पार्थ युज्यते' हें सद्वर्तन होय. सद्भाव ( Right knowledge ) साधुभाव ( Right will ) व प्रशस्त कर्म ( Right act ), ह्या सर्वांस प्रत्येकीं व सर्वशः सत् शब्द लावितात. तेव्हां 'चांगलें' या शब्दांत या तिन्ही वस्तूंचा अंतर्भाव होतो व व्हावा. 'कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन। संगं त्यक्त्वा फलं चैव, स त्यागः सात्विको मतः' येथे सात्विक त्याग ह्मणजे सात्विक कर्म ह्मणून सांगितलें. तें असें कीं, त्यांत सदिच्छा व सत्कर्म असून पुनः कर्तव्यबुद्धि आहे. कँटसाहेबांचा रोख सदिच्छेवर आहे. पण ह्या सदिच्छेच्या पाठीशीं सात्विक धैर्य व सात्विक बळ नसेल तर ती सदिच्छा व्यर्थ होईल; ह्मणून इच्छा व कर्म करण्याची तयारी या दोहोंचाही अंतर्भाव येथें असला पाहिजे. ही इच्छा स्वयंभू—स्वयंप्रेरित आहे. जितकें सात्विक ज्ञान अधिक तितका या उद्धारक इच्छेचा जोर अधिक असल्यामुळें अहंकार, वासना, आभासिक ज्ञान इत्यादिकांचा पराजय होऊन जीवाला उद्धाराचा मार्ग सांपडतो, मात्र सात्विक ज्ञानाविषयीं, उद्धाराविषयीं, श्रद्धा मात्र हवी. 'श्रद्धावाँल्लभते ज्ञानं' हा नियम विसरूं नये.

श्रीकृष्णास मानवी मन चंचल आहे व कामक्रोधादि राजसी शत्रूंचें ठाणें इंद्रियमनोबुद्धीपर्यंत बसलेले आहे, व गुणांच्या तडाक्यांत जीवात्मा सांपडला असतां तो कसा मूढ होतो हे माहीत होतें असें ह्मणणें ह्मणजे सर्वज्ञ प्रभूस माझ्यासारख्या अल्पज्ञानें शिफारसपत्र देण्यासारखें आहे ! ! मला सांगावयाचे हे आहे की, कॅंट यांच्याप्रमाणे अनुभवशून्य नीतिशास्त्र निर्माण करण्याचा भगवद्धेतु नव्हता. कॅंट साहेबांनी चिकीर्षु आत्म्याची ( Practical Reason ), स्वतंत्र इच्छेची निरुपाधिक, निर्विशेष, आज्ञा ( Categorical Imperative ) ह्मणून एक नवीनच प्रस्थ काढिले आणि ही आज्ञा एकाच स्वरूपाने मनुष्यमात्रास व्यक्त होते असे ह्मटलें, तें वस्तुस्थितीस सोडून आहे. वस्तुस्थितीचा हा विपर्यास आहे. ही निर्विशेष आज्ञा पूर्ण स्वरूपानें व्यक्त होण्यास पुष्कळ ज्ञानसंचय व पुष्कळसे शुद्ध झालेले चित्त हवे असतें. चोर, जार, चहाड याची इच्छा ( ती शुद्ध नसतेंच ! ) नेहमी सन्मार्गानेच जाण्यास सांगेल हे ह्मणणे अनुभवाच्या विरुद्ध आहे. तेव्हां असल्या पुरुषांस नीति सांगावयाची ती सापेक्ष आज्ञेचीच हवी. याकरितां भगवंतांनी प्रथम शरीररक्षणासाठी, नंतर योगक्षेम चांगला चालविणाऱ्या देवतांची मर्जी सुप्रसन्न करण्यासाठी ( या देवतांस अर्पण करण्यासाठी केलेल्या कृतज्ञतापूर्वक यज्ञांतच पितृऋण, ऋषिऋण व देवऋण इत्यादिकांचा अंतर्भाव होतो. ) असे पर्याय सांगितले आहेत. तसेंच स्वार्थ, परार्थ व परमार्थ अशी जीं कर्मप्रचोदक तत्वे आहेत, त्यांचाही उल्लेख करून पूर्ण देहात्मक स्वार्थाचं कर्म इहलोकीसुद्धां सुखकर होत नाही, ( नायं लोकोस्त्ययज्ञस्य ) असें सांगितले आहे. आतां सुखदु खासाठी, विषयजन्य सुखदुःखासाठीं, आत्म्याचे अस्तित्व नाहीं हे 'मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः' यात सागितलें आहे. सुखदुःखाचा प्रवेश बुद्धीपर्यंत आहे. बुद्धीपलीकडे आनंद, समाधान आहे. तेव्हां इकडील म्हणजे विषयाकडील आनंदाचा विचार करण्याचे कारण नाही हें समजून व परमार्थासाठीं कर्म करणारा पुरुष सामान्यतः राजसवृत्ति सोडून कर्म करतो, असे धरलें ह्मणजे पौरस्त्य आर्यांचें सात्विक परोपकारी कर्म ह्मणजे 'परमेश्वरच माता, पिता, धाता, भर्ता पितामह' आहे, असे समजून कर्म करणें व स्वतःचे व इतरांचें परममंगल करणें हें होय. राजस परोपकाराचा उल्लेख 'यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः । दीयते' या श्लोकांत केला आहे; पण हें कर्म स्वोपकारक व स्वभोगवर्धक असतें, अशीच दृढ कल्पना आहे व हे राजस कर्म दुःखजनक होतें असा अनुभव आहे. असो; तेव्हां स्वदेहार्थ आणि परमार्थार्थ अशी दोन तत्वे कर्मप्रचोदक आहेत. ही तत्वें नित्य आहेत व सुरासुराप्रमाणें परस्परविरोधी आहेत आणि लोकसंग्राहक ज्ञानी व तत्त्वदर्शी जे महापुरुष असतात, ते सामान्य लोकांच्या स्वदेहार्थविषयक कर्मांच्या कल्पनांचा एकदम मोड न करितां हळू हळू त्यांस त्यांच्या सामर्थ्यानुसार ज्ञान शिकवितात आणि त्यांस श्रेष्ठ, श्रेष्ठतर पदवीस नेतात.

ज्ञानानें मनोनिग्रह करून जो विहित कर्मयोग आत्मनिष्ठापूर्वक करितो, त्याला जें निष्कल सुख प्राप्त होतें ( अ० ५ श्लोक २१-२२ ) तें केवळ अनंत व अक्षय्य असतें. हें मिळवून देणारी जी चित्तशुद्धि ती संपादन करण्यासाठीं 'कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते' या न्यायानें विहित कर्मयोग केलाच पाहिजे. हा कर्मयोग म्हणजे निरभिमान वृत्तीने व निर्लोभ मनाने केलेले शास्त्रोक्त कर्म (स्वधर्म) होय.

कोणत्याही पुरुषास केव्हांही 'तुला काय पाहिजे?' म्हणून विचारले तर तो 'सुख हवें' 'ज्ञान हवें,' 'आणि अविकारी अस्तित्व हवें' असे म्हणेल; म्हणजे सच्चिदानंदाची स्थिति हवी असे त्याला खोदून खोदून विचारिले म्हणजे म्हणेल. हें आमच्या इच्छेचे (आत्मिक व दैहिक) विषय आहेत. 'सत्' चित् व आनंद हे तिन्ही शब्द एकाच अर्थाचे (ब्रह्माचे) वाचक आहेत; तेव्हां ब्रह्म हवे असे प्रत्येकाला वाटतें. **सर्वत्र परब्रह्म आहे हें ज्ञात्याचें ज्ञान** असते; व आपण परब्रह्म असतांनाही **'परब्रह्म आपण नाहीं, तें व्हावें' असें जीवास वाटतें.** ही प्रत्येक जीवाची केवळ इच्छा, जसजसें तात्विक ज्ञान वाढते तसतशी जास्त प्रकट होते. 'तुला ब्रह्म व्हावेंसें कां वाटते?' या प्रश्नाला उत्तर नाही. असले तर हेच की, मी परब्रह्म आहें, म्हणून तसें मला वाटत. हा सामान्य सर्वसाधारण नियम आहे. हा श्रुत्यादि त्रयीस संमत आहे. व तो अनुभवाच्या पूर्वी सिद्ध झाला असून अनुभवाशीं संप्रतिपन्न आहे. अज्ञानामुळे परिच्छिन्न जीवास हा इच्छाप्रकार उत्पन्न होतो. अज्ञाननिवृत्तीने याचा नाश होतो. ही निवृत्ति करणे प्रत्येकाचें **कर्तव्य आहे**. अज्ञाननिवृत्ति होणार ती ज्ञानानें आणि निर्मळ मनासहित नित्य कर्माच्या आचरणाने होणार, तेव्हां ज्ञानसंपादन करणें व विज्ञानाप्रीत्यर्थ निर्मळ मनाने स्वकर्तव्य करण्याची मनोवृत्ति बनविणें हा नीतितत्वाचा मथितार्थ आहे. 'नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतं : अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥' त्यांचा हाच अर्थ आहे. 'कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन । संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विकोमतः ॥' हाच आर्य लोकांचा विधियुक्त नियम आहे.

'आत्मौपम्येन समं पश्यति' 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरं । यः पश्यति स पश्यति' 'समं सर्वेषु भूतेषु' हा ज्ञानी पुरुषाचे वर्तनाचा नियम आहे. अज्ञानी पुरुषानें श्रद्धा ठेवून ज्ञान संपादावें, स्वधर्माप्रमाणें वागावें, तें ईश्वरास समर्पण करावें व फलाकांक्षा धरूं नये, हा त्याचा मार्ग आहे. फलकामनेनें केलेले कर्म निरुपयोगी व सत्त्वविरुद्ध असतें.

जीवाला स्वातंत्र्य आहे. पूर्व कर्मानें उत्पन्न झालेल्या प्रारब्ध म्हणजे फलोन्मुख कर्मांचा जरी जोर असतो तथापि कर्मासंबंधें अहंकार न बाळगणें व सुखदुःखाविषयीं उदासीन राहून ज्ञानसंपादन करणें हे जीवाच्या स्वाधीन आहे. 'उद्धरेदात्मनाऽऽत्मानं' - याचा अर्थही हाच आहे, फलकांक्षा विलीन करून प्रकृतीशीं संग न ठेवतां, आत्म

मोहाचा तिरस्कार करून अध्यात्मनित्यत्व ठेविलें तर जीवात्म्याचें स्वातंत्र्य प्रफुल्लित होऊन तें ब्रह्मपदाला जातें.

याप्रमाणें माझ्या समजुतीप्रमाणे मी तारतम्य काढिलें आहे तें हें:—

( १ ) कँट साहेबांचा ज्ञानपरिशोधनप्रयत्न मायावादाचें समर्थन करितो; तथापि श्रीकृष्णास जो ब्रह्मज्ञानाचा ठेवा अवगत होता तो कँट साहेबाना अश्रुतपूर्व असल्यामुळें त्यांच्या ज्ञानमीमासेत व पुरुषार्थमीमांसेंत विरोध उत्पन्न झाला. श्रीकृष्णसंमत ब्रह्मज्ञानांत व पुरुषार्थात विरोध नाही.

( २ ) पुनः कँट साहेबांच्या नीतिनियमाला आत्मारामाच्या स्वरूपज्ञानाचा आश्रय नसल्यामुळे, त्याला वर्तनसामर्थ्य व इच्छास्वातंत्र्य, जीवाचें अमरत्व व ईश्वर या तीन गोष्टी व्यावहारिक परमार्थात सत्य असूनही, गृहीत घ्यावा लागल्या आहेत परमार्थात भेदाभेदच नाही. व्यावहारिक परमार्थात मनुष्याची शुद्ध इच्छा स्वतंत्रच असते. 'स ऐक्षत, बहुस्यां, प्रजायेयं,' ही श्रुति आहे; अनुभवही तसाच आहे. जीवाचे अमरत्व सर्वधर्मसंमत व युक्तिसिद्ध व कीटकसृष्टीच्या परीक्षणावरून अनुभवसिद्धही आहेच; पण आर्यधर्मातील पुनर्जन्माच्या सत्यत्वानें 'जीव अमर आहे' असे व्यावहारिक परमार्थात ठरलें आहे. देहाचे नियमन करणारा आत्मा जर अनुभवसिद्ध आहे, तर एकस्वरूपी नियमांनी बद्ध झालेल्या विश्वाचा आत्मा, त्याचा अंतर्यामी कोणी तरी असलाच पाहिजे. या गोष्टी सिद्ध करण्याचे आजचे प्रयोजन नाही; पण ह्या गोष्टी आहेत, असे सिद्ध करितां येतें व कँट यांना त्या गृहित घ्याव्या लागल्या आहेत.

( ३ ) फलत्याग हे तत्त्व कँट व श्रीकृष्ण यांस संमत आहे. मानवी महत्वाचा ( Human Dignity ) अभिमान कँट साहेबास फार म्हणून ही मलकारी वृत्ति सोडावी, असें कँट यांना सुचलें नाहीं. परमेश्वराने विहित नीतिनियमात अभिमान अप्रस्तुत असल्यामुळे सर्व जीवकोटींशीच काय पण भूतमात्रांशी समवृत्ति ठेवावी असा महोदारत्व शिकविणारा नियम श्रीकृष्णांनी सांगितला.

( ४ ) कँट साहेबांचा अनुभवाविरुद्ध मोठा कटाक्ष म्हणून त्यांनी आपल्या नीतिनियमांत, कर्तव्यकर्ममीमांसेंत व विधिरचनेत अनुभवाचा विटाळ म्हणून होऊं दिला नाहीं. परमेश्वर सर्वसाक्षी, तेव्हां अनुभवांतील सत्यभाग म्हणजे ब्रह्मोपयोगी तेवढा भाग घेऊन आपल्या नियमांस समंजसत्व आणिलें आहे.

( ५ ) कँट साहेबांचे मतें मानवप्राणी हा सृष्टीचा मुकुटमणि आहे. आमचें आर्यशास्त्र असें म्हणत नाही; व उत्क्रांतिशास्त्रांवरून मनुष्याचीही सुधारणा चालली आहे.

असें ठरतें. पुनः तो साधुभाव प्रकटण्यासाठी येथें आला, असे हे साहेब म्हणतात. पण तो कोठून आला व जसा म्हणजे जी जबाबदारी घेऊन तो आला, तसा तो कां आला ? याचे उत्तर त्यांजवळ नाही. पुनर्जन्माने ह्या प्रश्नाचा व्यावहारिक उलगडा होतो. तो तेथे कांहीं फलोन्मुख व कांहीं अफलोन्मुख संचित घेऊन व हे संचित ज्ञानाने नष्ट करण्याचे सामर्थ्य घेऊन येतो व परब्रह्मप्राप्ति हा त्याचा पुरुषार्थ आहे. कँटच्या स्वर्गात साधुभाव व सत्सुख यांचा समागम होतो; पण हें त्यानें सिद्ध केले नाहीं. आमच्या मताने एकनिष्ठ कर्मयोग्याला येथेच स्वर्ग सुखप्राप्तीपेक्षांही श्रेष्ठ असे समाधानसुख मिळते; असो.

कट याचे युरोपियन जगावर अनंत उपकार आहेत. श्रीकृष्णाचे सर्व जगावर तितकेच उपकार आहेत श्रीकृष्णाची पद्धति समजून घेऊन तदनुसार एकनिष्ठेने आचरण केले असता सर्व कामना परिपूर्ण होऊन आपला उद्धार होईल.

## वस्तुस्वरूप.

दृश्य ( Phenomena ) आणि केवल ( Nomena ) असा विशेष पतकरून कटने सर्व ज्ञानाचा अंतर्भाव दृश्यामध्ये केला होता, व केवलाचे निरूपण अस्तित्वरूपाने मात्र गृहीत धरले होते केवलाचे ज्ञान होणे नाहीं; पण केवलज्ञानाच्या आस्तित्वावाचून विचार करिता येणे शक्य नाहीं असे कटचे म्हणणे होते. जेकबीने या विरोधात्मक सिद्धांतावर टीका करून ठरविले का, जे आविर्भूत आहे त्याचे ज्ञान तेंच यथार्थज्ञान ( सत्य ) होय हेही परोक्षज्ञानच होय. अपरोक्षज्ञान, प्रत्यक्ष सत्य म्हणजे उपलब्धि ( Feeling; Sensation ) होय. व्यक्तोपलब्धि ( Perception ) आपल्यास जडपदार्थज्ञान करून देते व अतींद्रियज्ञान ( ईश्वर, स्वातंत्र्य, नीति व अमरत्व, इत्यादि ज्ञाने ) हे विवेकबुद्धीने होते. जेकबी उपलब्धीला अतिरिक्त महत्व देतो, हे सांगावयास नकोच रेन्होल्ड हा कँटानुयायी होता त्याचे मत असे आहे कीं, प्रत्येक जाणीवेंत, ज्ञातृज्ञान व ज्ञेयज्ञान अंतर्भूत होतात. ज्ञात्याकडून एकत्वाचे भान व ज्ञेयाकडून जडाचे वैचित्र्य ( विविधता ) ही प्राप्त होतात. तेव्हां जाणीवेला ज्ञाताही कळणें शक्य नाहीं व ज्ञेयही कळणे शक्य नाही. तथापि ज्ञेय ( जड ) हे विषयवासना उत्पन्न करून आपली इच्छा परतंत्र करिते व ज्ञातृज्ञान हे आपल्या स्वतंत्रेस कायम ठेवून नीतिमार्ग दाखविते. रेन्होल्ड जाणीवेला ( Consciousness ) अतिरिक्त महत्व देतो. फिश्टी ( १७६२—१८१८ ) हा मोठा तत्त्वज्ञ होऊन गेला. तो म्हणतो, तत्वज्ञानाचा प्रश्न हा आहे की, आपल्या जाणीवेमध्ये ज्यास कांहीं नित्य आणि निश्चित भावना ( necessary and certain Ideas ) आहेत, त्यांचें स्पष्टीकरण कसे करावयाचें ? या नित्य निश्चित भावनांमच ( भावनासमूहास ) आपण

अनुभव असें म्हणतों. या अनुभवाला आधार काय? आतां अनुभव म्हणजे जर बाह्यपदार्थसंबंधी ( ज्ञेयासंबंधी ) जाणीवेचा व्यापार आहे, तर अनुभव हा ज्ञेयोत्पन्न असला पाहिजे किंवा जाणीवेपासून उत्पन्न झाला असला पाहिजे. म्हणजे आपल्यास जो अनुभव येतो, तो पदार्थ ज्ञानाच्या योगानें येतो असें म्हटलें पाहिजे किंवा आपल्यास स्वतःस जो अहंभाव आहे, जाणीव आहे, तिच्या साहाय्यानें झाला पाहिजे. ज्ञेयोत्पन्न म्हटला तर, हें म्हणणें अभिमानाचें ( Dogmatic ) होईल. कारण हें सिद्ध करण्यास आपल्याजवळ आधार नाहीं व ज्ञानोत्पन्न म्हटलें तर चित्तोद्भावित ( Idealistic ) होईल. ज्ञेयापासून जाणीव उत्पन्न होतें व आपले सर्व बुद्धिविलास जड कार्यकारणाच्या अभंग शृंखलेपासून होतात, असें अभिमानानें म्हणणाऱ्या पुरुषास यदृच्छावादाचा व जडवादाचा अंगीकार केला पाहिजे. म्हणजे ज्ञेय जें जड तें अजड जें ज्ञान, याला कसें तरी उत्पन्न करितें असें म्हटलें पाहिजे. चित्तोद्भावनेचा ( Idealism ) स्वीकार केला तर ज्ञेयाचा उद्भव ज्ञात्यापासून-त्याच्या जाणीवेपासून-झाला आहे, ही जाणीव स्वतंत्र आहे आणि हा पंथ स्वातंत्र्यात्मक आणि कार्यकारित्वाचा आहे, असें ठरेल.* म्हणजे अजड जी जाणीव ती जडाला उत्पन्न करितें, असें म्हटलें पाहिजे. जड स्वतंत्र नाहीं, जाणीव स्वतंत्र आहे यांपैकी कोणता पंथ स्वीकारावा? नीतिदृष्टीला ( येथें वर्तनस्वातंत्र्य असतें. ) चित्तोद्भावनापंथ आवडेल; पुनः; याचा स्वीकार सर्वांनीं करण्याला एक कारणही आहे. अनुभवामध्यें पदार्थ आणि पदार्थज्ञान यांचा संगम होतो; पण पदार्थसंतति पाहतां-क्षणीं मनांत त्याच पदार्थांची संतति उत्पन्न होते; अथवा आपल्याला मानसिक संततिच गोचर होते; ही कशी होते, हें जडवाद्याला सांगतां येत नाहीं. बुद्धीचे व्यापार बुद्धिप्रत्यक्ष, आत्मप्रत्यक्ष असतात. एवंच बुद्धि व्यापार करिते व त्याच व्यापारांची तिला जाणीव असते. स्वप्रत्यक्ष असा जो व्यापार तो करून पुनः स्वरूप पाहणारी जी जाणीव हीच त्या अनुभवाची जननी आहे, असें म्हटलें पाहिजे. तेव्हां तत्त्वज्ञानाचें काम हें आहे कीं, त्यानें ज्ञेयानुभवाचें मूळ, जाणीवेचा स्वरूपाशीं जो संबंध असतो त्यांत आहे, असें दाखविलें पाहिजे. आत्मज्ञान हे या पंथाचें तत्त्व आहे. अंतर्दृष्टीनें हें आत्मज्ञान सर्व बुद्धिगत व्यक्तोपलब्धीपासून ( Percehtion ) सर्व बुद्धिव्यापार ( हे सर्व आत्मज्ञानाला प्रत्यक्ष असतात—) उदभुत करितें व त्यांचें चिंतन करितें, आणि बाह्यदृष्टीनें, ज्याला आपण पदार्थ किंवा वस्तु म्हणतों, ते पदार्थ व वस्तु ही सर्व बुद्धिव्यापारापासूनच उत्पन्न झाली आहेत, असें हेंच आत्मज्ञान दाखवितें. एवंच ज्ञेयज्ञान व्हावें असें वाटत असेल तर तें ज्ञेय आत्मज्ञानापासून निर्माण झालें आहे, असें समजल्याशिवाय गत्यंतर नाहीं. सारांश, आत्मज्ञान आणि स्वप्रत्यक्ष असणारे आत्मव्यापार हेच तत्वज्ञानाचे विषय होत. फिचीनें तत्वविचाराची पद्धति स्थापिली आहे ती पुष्कळशी आमच्या अद्वैतवेदांताला जुळते. उपलब्धि कशी होते. इंद्रियज्ञानापासून तों पूर्णज्ञानापर्यंतच्या पायऱ्या कोणत्या, विश्व आपणच कसें उत्पन्न करितों व त्याचा ज्ञान-संपादनार्थ कसा उपयोग होतो, नीतीमध्यें देहात्म्याचा व आत्म्याचा कसा विरोध आहे,

याचें निरूपण मूळग्रंथांतच पहावें. ज्ञान म्हटलें की, त्यांत ज्ञाता व ज्ञेय ( Thinking and Being ) हे अवश्य यावयाचेच. ज्ञान हवें असेल तोंपर्यंत यांचा नाश होणें शक्य नाहीं, किंवा पूर्ण ऐक्यही होणें शक्य नाहीं, असें **श्लेअरमाचेर** म्हणतो. परिच्छिन्नस्थितींत पूर्ण, केवल, निरुपाधिक ज्ञान व्हावयाचें नाहीं. त्याच्या जवळ जवळ गेलों तरी तें ज्ञान क्षितिजासारखेंच आपल्या जवळून पळत राहील. **एक ईश्वरस्वरूपांत मात्र हें साध्य आहे.** ईश्वरस्वरूप साध्य होण्यास अखंड भक्ति व एकनिष्ठ सेवा ही अवश्य आहेत. **शोपेनहार** म्हणून जो तत्वज्ञ झाला त्यानें विश्वास ( ज्ञेयाला ) जीवाला व मनोवृत्तीला 'इच्छेचें' स्वरूप दिलें. ही इच्छा स्वरूपतः एकस्वरूपच आहे. काल व आकाश यांच्यामुळें जी व्यक्तोपलब्धी होते, ती अनेकत्वाचें कारण आहे. दृश्यज्ञान व दृश्यभावना मात्र विविध, अनेक आहेत. स्वरूपांत सर्व एकरसमयच आहे. भेद धरिला म्हणजे अन्यायाला, अनीतीला प्रारंभ होतो. अभेदांत अनीति नाहीं. या विश्वेच्छेला ज्ञेय म्हणजे स्वस्वरूपच होय.

**हेगेल** हा सर्व युरोपियन तत्वज्ञानाला एकस्वरूप देण्यासाठींच जणों काय अवतीर्ण झाला होतो. हा १७७० सालीं जन्मला आणि १८३१ मध्यें पंचत्व पावला. याचा पंथ थोडक्यांत असा आहेः परमात्मा आपल्या केवल स्वरूपामध्यें ( in his Absoluteness ) हिरण्यगर्भाचे ( Cosmic Life ) जे विन्यास ( Form ) त्यांचें अधिष्ठान व वसतिगृह असतो. वस्तुशास्त्र, तत्त्वशास्त्र व बोधशास्त्र ( Doctrine of conceptions ) या रूपानें न्यायदर्शन ( Logic ) या विन्यासांचें निरूपण करितें. म्हणजे न्यायशास्त्रांची ( १ ) वस्तुशास्त्र ( २ ) तत्वशास्त्र व ( ३ ) बोधशास्त्र हीं भिन्न स्वरूपें आहेत. स्वकामानें स्वकामासाठीं ( For Itself ) परमात्मा प्रकट झाला म्हणजे विश्वोपपत्ति होतें. याचें विवेचन गतिशास्त्र ( Mechanics ) आधिभौतिकशास्त्र ( Physics ) व जीवशास्त्र ( Organics ) करितात. ब्रह्मतत्त्वज्ञान ( स्वस्वरूपज्ञान ) तीन भूमिकांनीं प्राप्त होतें. ( १ ) प्रत्यगात्मज्ञान ( यांतच मानसशास्त्रें येतात ); ( २ ) विराटस्वरूपाचें ज्ञान ( यांत सत्त्व, नीतिवृत्ति, राजशासन व इतिहास यांचा अंतर्भाव होतो. ) आणि ( ३ ) केवलात्मज्ञान ( यांत कलादिकांत दिसणारी केवलोपलब्धि Pure perception-, धर्म ( भावनाजन्य प्रतिरूप ), बोधरूप तत्वज्ञानाचा इतिहास ( Hist on of Philosophic Conceptions ) यांचा समावेश होतो ). आत्मा स्वरूपांत राहून प्रकट होतो आणि पुन. स्वरूपांत प्रविष्ट होतो हा उत्क्रांतीचा क्रम आहे. सर्व आत्ममयच आहे. परमात्मा 'अज्ञेय' स्वरूपांत असतां 'अस्ति' इतकाच असतो. पुढें त्याचें सच्चिदानंदात्मकत्व प्रकट होतें व पुढें त्याला स्वरूपज्ञान होतें; नंतर स्थूलापासून सूक्ष्मापर्यंतचें अचर व चर विश्व, जीवाची जाणीव, स्वरूपज्ञान, विवेक, सत्त्व, नीति, राजशासन इत्यादि स्वरूपें घेऊन पुढें ललितकला, धर्म व शास्त्रज्ञानासहित ब्रह्मज्ञान यांत परिणत होऊनच स्वरूपाप्रत परत येतो. स्थूला-

पासून अत्यंत सूक्ष्मापर्यंत प्रगमन करून पूर्णत्व प्राप्त करून घेणे ही आत्म्याची उत्क्रांति आहे, हाच प्रकार खरा असला पाहिजे असे हेगेल म्हणतो कारण जीव हा प्रथमतः विषयभोगापासून व इंद्रियज्ञानापासूनच प्रारंभ करितो. तेथें अनित्यता ( विरोध ) आढळून येऊं लागला म्हणजे विरोधपरिहारार्थ तो श्रेष्ठ ज्ञानाचा अधिगम करून स्वरूप पाहूं लागतो व शेवटा ब्रह्मज्ञान, बोधज्ञान (Science of conception) झाल्यावर विश्रांत होतो, स्वस्थ होतो. प्रत्येक व्यक्ति ही समष्टीकडे जाणाऱ्या उत्क्रांतीचा अवयव आहे, असें समजले तर मात्र ती व्यक्ति सत्य व वास्तविक आहे तिला निराळी काढिली व ती स्वतंत्र आहे असे मानिले, तर तिचे सत्यत्व व नित्यत्व हा नष्ट होतात ती केवळ कल्पनामय-बुद्धिविलासाचा एक खेळ-यदृच्छाप्राप्त आणि अज्ञेय अशी होते जें सत्, तेच चित व जे चित तेच सत आहे (What is real is reasonable and what is reasonable is real)

येथें अनीश्वरी तत्वज्ञानाचा इतिहास सांगणे अनवश्यक वाटल्यावरून तो दिला नाही.

युरोपमध्ये बेकन तत्वज्ञ झाल्यापासून सृष्टिशास्त्राकडे जनमनाने धाव घेतली. सृष्टिशास्त्रातील प्रमेयाचा अनुभव तत्काल येतो, आयुष्यात या शास्त्राचा विशेष उपयोग होतो, ह्मणून या शास्त्रास दोन तीन शतके अतिशय मान मिळाला व त्याप्रमाणें तेथील लोकास नवीन सृष्टिगुह्ये अवगत होऊन हे ज्ञान फलद्रूप झाले असे वाटूं लागले व वाटत आहे. आतां प्रश्न असा आहे की, सृष्टिशास्त्रानी जी ज्ञानपद्धति आखून ठेविली आहे तितक्याच मर्यादेत मानसिक वृत्तानी कोंडून घ्यावयाचे की काय ? ' नाही ' असे स्पष्ट उत्तर अद्यापि आले नाही तथापि ती उभयता जवळ जवळ येत आहेत. उत्क्रांति-तत्वानें गत्यात्मक शास्त्राचा फाजील जोर बराच कमी झाला आहे, व अशी आशा आहे की, लवकरच ब्रह्मतत्वाचा प्रसार होऊन उत्क्रांति व गतिशास्त्राचा पूर्ण अंतर्भाव होईल.

## एकुणिसावें शतक.

प्रथम फ्रान्समधून ' मन हे जडोत्पन्न आहे ' व आत्मा नाही, अशी लाट उसळली तिचा **मिलनें** निरास करून ठरविले की, मन व जड ह्या अनुभवाच्या दोन निरनिराळ्या व परस्परविलक्षण कोटया आहेत व त्याचा अभ्यास निरनिराळाच केला पाहिजे ' इच्छा स्वतंत्र आहे, विषयतंत्र नाही ' असे हॅमिल्टनने ठरविले लोटझने प्रतिपादिले की, विश्वचक्र हे जीवशक्ति व पुरुषार्थाची इच्छा ( ही सर्व वस्तूंची मानसिक व आत्मिक रहस्यें आहेत. ) सिद्धीस नेणारे-सुख देणारे-एक साधन आहे. अर्थातच इतर शास्त्रां-प्रमाणें-किंबहुना त्याहून जास्त महत्वाचे असे नीतिशास्त्र हेच अध्यात्माचे मूळ होत आहे, हे सिद्ध झालें, आणि अध्यात्मशास्त्र सर्व भेदाचे भेदत्व काढून त्यांस एकजीव करिते, असेही ठरले.

**कुंटची** तत्त्वज्ञानपद्धति इयावर स्थापिली आहे. 'सापेक्षतेचे अस्तित्व' हाच काय तो खरा सिद्धांत आहे. मनुष्य देवीकारणापासून अध्यात्मिक कारणाकडे जातो व येथून प्रत्यक्ष अनुभवाकडे येतो. गणितसिद्ध भौतिक शास्त्रे सर्वांत जास्त खरीं असतात. गणित, ज्योतिष, भौतिकशास्त्र, रसायन, जीवनशास्त्र, मानसशास्त्र व सामाजिकशास्त्र हीं उत्तरोत्तर जास्त संकीर्ण व ह्मणून जास्त महत्वाचीं व पाठीमागील सर्व शास्त्रांचा अंतर्भाव केला तर खरीं असणारी शास्त्रे आहेत. शेवटीं **कुंटनें** मनुष्यजातीला 'देवता' बनविली आहे '

**स्पेन्सरचे** सिद्धांत उत्क्रांतिवादात्मक आहेत याने अन्वयव्यतिरेकाच्या पद्धति घेऊन उत्क्रांतिवाद सर्व बाजूंनी व सर्व विषयदृष्टीने सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि अद्यापि या वादाला शास्त्रीय स्वरूप आलेले नाही.

वरील अति त्रोटक व त्रोटक ह्मणून अस्फुट अशा वृत्तातावरून युरोपियन तत्त्वज्ञानाचा ओघ अद्वैताकडे कसा वाहत आहे, याचे अस्पष्ट तरी चित्र वाचकांच्या डोळ्यासमोर उभे राहील असे वाटते. विशेषतः कंट, फिची, हेगेल याचे तात्त्विक शोध अद्वैत-सिद्धांताचे प्रपोषक आहेत इतका जरी समज झाला, आणि प्लेटो, अरिस्टॉटल, प्लोशिअस, कँट, फिची, हेगेल, शोपेनहार, इत्यादि तत्त्वज्ञांच्या तात्विक ग्रंथांचे साग्र अवलोकन करण्याची प्रेरणा होऊन ते वाचक त्या उद्योगास लागले तर माझ्या या घाईने काढलेल्या सारांशाचे बरेच सार्थक्य होईल. या सर्वांवर गीताग्रंथाची सरशी होते; कारण या ग्रंथांत सर्व विरोधाचा परिहार करण्याचा संकल्प मनात ठेऊन व्यवहार विरोधांचा व पारमार्थिक विरोधाचा समूळ उच्छेद केला आहे ब्रह्म एक आहे व आपण सर्वही ब्रह्म असून 'ब्रह्म नाहीं' अशी जी भ्रांति झाली आहे तिचा नाश करावयाचा व पुनः ब्रह्म व्हावयाचें आहे. वरील भ्रांति अज्ञानजन्य आहे. अज्ञानाचा नाश ज्ञानानें होतो ज्ञानाला चित्तशुद्धि हवी आहे. ती कर्माने मिळते. वर्णाश्रमाप्रमाणें कर्मभिन्नता असते; तथापि स्ववर्णाला व स्वाश्रमाला योग्य असें विहित कर्म केलें ह्मणजे निर्ममत्व व निरहंकारिता उत्पन्न होतात मग भोगरुचि जाऊन ज्ञानरुचि येते. विश्वज्ञान होऊं लागते. नित्यानित्यविवेक वैराग्य, शमदमादि व मुमुक्षा चित्तशुद्धिद्वारा प्राप्त होतात. शेवटीं आत्मज्ञान होते. या आमच्या क्रमाला उपयोगी पडणारें सिद्धांत युरोपियन तत्वज्ञानाच्या इतिहासांत मिळून त्या त्या सिद्धांतांच्या सिद्धीची उपकरणें मिळतात. येणें करून अनुमान दृढ होतें, अनुभव येतो व वेदांत ग्रंथावर श्रद्धा उत्पन्न होऊन ती ठसते. हा काय लहानसान उपयोग आहे !

# भाग १० वा.

## सारांश.

### गीता व ब्रह्मसूत्रें यांचा संबंध.

सर्व विद्यांचें व कलांचें मूळचे माहेरघर आणि अखेरचें विश्रांतिस्थान कोठें आहे ? यांचा पाया कोठे आणि कळस कोणता ? यांचें उगमस्थान कोणतें आणि मुख कोणतें ? हे सर्व एकाच अर्थाचे प्रश्न आहेत, आणि ह्मणून त्यांस उत्तरही एकच हवें. असो; तत्वज्ञान हें या प्रश्नाला अथवा प्रश्नमालिकेला उत्तर आहे. तत्वज्ञानामध्यें सर्व प्रकारचीं ज्ञानें व सर्व प्रकारचे धर्म यांचा अंतर्भाव होतो. हे तत्वज्ञान उपनिषदांमध्यें प्रकट झालें आहे, असा उच्चार मी या पुस्तकांत अनेकवेळ केला आहे. तसेंच एकापेक्षां अनेकवेळ असेंही सांगितलें आहे कीं, हें तत्वज्ञान निरनिराळ्या अधिकारांच्या मुमुक्षूंसाठीं दोन पृथक पद्धतींनीं अवतीर्ण झालें आहे. यादवकुलोत्पन्न श्रीकृष्णांनी हें तत्वज्ञान अर्जुनासारख्या कार्यकारी महापुरुषाला समजेल अशा सोप्या रीतीनें ‘ गीता ’ रूपानें सांगितलें आहे आणि श्री बादरायणव्यासांनीं हे तत्त्वज्ञान विशेष शास्त्रीयरूपानें व सशास्त्र पद्धतीनें ‘ सूत्र ’ रूपांत अवतीर्ण केलें आहे. ज्ञान एकच, त्याचें पर्यवसानही एकच; पण संसारी आणि संन्यासी लोकांस ह्मणजे सर्व प्रकारच्या लोकांस उद्बोध व्हावा एतदर्थ लौकिक पद्धतीचा आदर करून संसारी पुरुषांकरितां गीता सांगितली आणि शास्त्रीय पद्धतीचा स्वीकार करून संन्यासी पुरुषासाठीं सूत्रांचा अवतार केला. कथेमध्यें ज्याप्रमाणें वेदांती व सभ्य आणि वृद्ध स्त्री पुरुषांकरितां पूर्वरंगाची योजना असते आणि तरुण स्त्री–पुरुषांसाठीं व मुलांबाळांसाठीं एक आख्यान लावून व गमतीच्या गोष्टी सांगून कथेची परिसमाप्ति करितात, पुराणामध्यें जशा अनेक कथा सांगून तात्पर्यरूपानें कोणत्यातरी एका नीतितत्त्वाचा अथवा ज्ञानतत्त्वाचा बोध करितात, त्याप्रमाणें सर्व जीवमात्राच्या कृतार्थतेकरितां गीता आणि ब्रह्म सूत्रें यांची जोडी एका तत्वज्ञानाचा मात्र उद्घोष आज हजारों वर्षे करीत आहे. आपल्या देशांत जे धर्माचार्य झाले त्यांचाही समज असाच होता. आचार्य पदवी मिळवूं इच्छिणारा प्रत्येक पुरुष, सांख्य व योग या उभयतांची एकवाक्यता करणारे तत्वज्ञानी पुरुष, या सर्वांचा कटाक्ष हा कीं गीता हा उपनिषद्वामहस्त आणि ब्रह्मसूत्रें हा दक्षिणहस्त असल्यामुळे गीता आणि सूत्रें उपनिषदांचाच अर्थ प्रतिपादन करण्यासाठीं अवतरलीं आहेत, हें सिद्ध करावें. ह्या त्रयीला* प्रस्थानत्रयी असें

---



म्हणतात. या त्रयीचा जो समन्वय करील त्यालाच मात्र आचार्यपदवीचा लाभ पूर्वकालीं मिळत असे. असो; सूत्रांत जो अर्थ शास्त्र-पद्धतीनें सिद्ध केला तोच अर्थ सूत्रांच्या आधीं कित्येक शेंकडों वर्षें गीता केवळ सिद्धांतद्वारा सांगत होती. तात्पर्य, श्रीगीतेमध्यें व सूत्रांमध्यें एकच विषय म्हणजे उपनिषदांचा अर्थ प्रकट करणें हा आहे. असा कोणताही विषय गीतेमध्यें नाहीं कीं, ज्याची फोड सूत्रांत केली नाही. मात्र सिद्ध करण्याचे प्रकार निरनिराळे आहेत. गीतेचा प्रकार सर्वांस सरस वाटेल. सूत्रांचा प्रकार सांसारिकाला नीरस आहे. शास्त्रशुद्ध पण अशास्त्रीय पद्धतीनें गीतेमध्यें विषयाची मांडणी केली आहे, असें पंडित ह्मणेल; व शास्त्रीय पद्धतीची पण दिसायला निबर आणि समजायला कठिण अशी सूत्रांची रचना आहे, असें सामान्य मनुष्य ह्मणेल. गीता हें गाणें आहे, सूत्रें हा 'पाऊणकीचा पाडा' आहे. गीता रंजविते, सूत्रें शिकवितात. गीता माऊली आहे, सूत्रें सासुबाई होतात. गीता सूर्याचा अरुणोदय आहे, सूत्रें सूर्याचा माध्यान्हकाळ आहे. अशा उभयतांच्या निरनिराळ्या भूमिका आहेत, तरी तात्पर्यरूपानें त्या एकाच अर्थाचें प्रणयन करितात.

## (१) हा अर्थ म्हणजे ब्रह्मस्वरूपाचें वर्णन होय.

उपनिषदें अनेक आहेत. पण त्यांतल्यात्यात ब्रह्मस्वरूपाचें वर्णन यथाशक्ति पण प्रधानत्वानें करणारीं उपनिषदें १० किंवा फार तर ११ होत. ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडुक्य, ऐतरेय, तैतिरेय, छांदोग्य आणि बृहदारण्यक अशी हीं दहा उपनिषदें आहेत. श्वेताश्वतर हें एक ११ वें उपनिषद ब्रह्मस्वरूपाचें वर्णन करितें. पण यावर श्रीमच्छंकराचार्यांचें भाष्य नाहीं ह्मणून याची 'मुख्य' उपनिषदांत गणना करित नाहींत. कौषीतकी हेंही एक चांगलें उपनिषद आहे. असो; या दहा किंवा अकरा उपनिषदांमध्यें ब्रह्मस्वरूपाचें वर्णन आहे. हें वर्णन दोन प्रकारचें आहे. बुद्धीला, अग्र-बुद्धीला आकलन करितां यावें म्हणून केलेलें जें वर्णन तें सगुण होतें. बुद्धीच्या पली-कडे आणि म्हणून केवळ अनुभवानें मात्र संवेद्य होणारें स्वरूप निर्गुण असतें. हाच प्रकार गीतेमध्यें व सूत्रांमध्यें आहे. ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान करून देणें हा उभयतांचाही हेतु आहे. आतां या हेतूचा

## आह्मांस उपयोग काय ?

असें हजारो लोक हजारो प्रकारांनीं आजपर्यंत विचारीत आले आहेत व पुढेंही विचारतील. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धापर्यंत शंका घेण्याची पद्धति-मुख्यतः व्यक्तिविषयक असे. अलीकडे या प्रश्नालाही सामाजिक अथवा राष्ट्रीय स्वरूप आलें आहे. दोन्हीही कालीं प्रश्न विचारण्याचा मूळ हेतु ज्ञानविषयक असें व असतो. गीतेमधील एक श्लोक घेऊन मला काय ह्मणावयाचें आहे त्याची फोड करितों.

[ ५४५ ]

## आर्तो, जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ.

आर्त ( २ ) जिज्ञासु ( ३ ) अर्थार्थी व ( ४ ) ज्ञानी असे भक्तांचे ४ प्रकार भगवंतांनीं सांगितले आहेत. आतां उपासनेमध्ये चार प्रकारचे उपासक असतात, त्याप्रमाणें कर्मामध्यें व ज्ञानामध्येही चार प्रकारचे कर्मठ व ज्ञानी असतात. ( १ ) आर्त ह्मणजे वर्तमानस्थिति अत्यंत दुःसह संताप देणारी असल्यामुळे त्या स्थितीला सर्वथा कंटाळलेला पुरुष होय. ही स्थिति सुटावी, या स्थितीतून आपण बाहेर यावे, ह्मणून कर्म करणारा तो कर्मठ, उपासना करणारा तो भक्त, आणि ज्ञान मिळविणारा तो वेदांती, असे ह्मणतां येईल. या स्थितीतून मी सुटावें, पुढे कांही का होईना ! असे जो ओरडतो तो आर्त होय. येथें विंचु आहेत आणि ते सण सण नांग्या मारित आहेत, येथून पळून जाऊं या, पुढच्या पुढे हरि आहे, असे ह्मणणारे लोक ' आर्त ' होत. भविष्यत्कालांत काय वाढून ठेविलें आहे, हे आर्तास विदित नसते. तो ह्मणतो वर्तमानकाळातून मला बाहेर जाऊं द्या. हल्लाची स्थिति भयंकर आहे ही नको. हाच ' आर्त ' होय. हा ' आर्त वेदविहित कर्म करील, किंवा उपासना करील, किंवा ज्ञान मिळविण्याची खटपट करील. पण मुख्य हेतु सद्य स्थितीच्या दुर्धर प्रसंगांतून सुटका करून घ्यावयाचा हा असेल. या आर्ताचे कर्म उपासना किंवा ज्ञान ह्या सर्वांचा विनियोग वर्तमानकाळांतून सुटण्याचा हा असतो. आपण हिंदु लोक पुष्कळ दिवसांपासून म्हणजे सुमारे दोनतीन हजार वर्षे ' आर्ताचा ' धडा पाठ करित आहोंत. संसार दुःखद आहे, अमंगळ आहे, तापकारी आहे, म्हणून त्याच्या कचाट्यांतून कसे तरी सुटावे ही आमची धडपड सुमारे दोनतीन हजार वर्षे चालली आहे. आमच्या येथील हवा कमी जास्ती उष्ण म्हणून म्हणा किंवा थोडयाशा श्रमानें आयुष्यास लागणाऱ्या गोष्टींचा मुबलक पुरवठा येथे होत असे म्हणून म्हणा, कोणत्या तरी कारणाने किंवा कारणांनी श्रम करण्याची आमची संवय कमी कमी होत चालली आहे व ही जसजशी कमी होत आहे, तसतसा संसार दुःखमय होत जातो आहे; श्रमाचा र्‍हास कमी होत चालला की श्रमाचा वाटा जास्त वाढतो व इकडूनही संसार दुःखमय होतो ! हे दुःख चुकविण्यासाठी आम्हीं कर्माचा तर नाहीच, पण उपासनेचा व ज्ञानमार्गाचा आश्रय घेतो. गुरुजी व पुष्कळ प्रामाणिक ग्रंथ ही आपल्यास सांगतात कीं, " दुःखाची खाण म्हणजे संसार होय; हें दुःख जर चुकवावयाचे असेल, दुःखाची आत्यंतिक निवृत्ति जर करून घ्यावयाची असेल तर उपासनामंत्र घ्या किंवा ज्ञानमार्गाचा अवलंब करा." हे गुरुजींचे व ग्रंथांचें ह्मणणें खरें आहे यांत शंका नाही. पण आपण सर्वांनी एक गोष्ट मुख्यतः लक्ष्यांत ठेविली पाहिजे ती ही कीं, श्रम कमी करणें म्हणजे कर्म कमी करणे होय. कर्म कमी झाल्यामुळें आपल्याशी प्रेमाने स्वयंवर करणारी जी शारीरिक, मानसिक व सांपत्तिक दरिद्रता, ती आपल्या पदरी पडते व **गरीबी आली ह्मणून स्वस्थतेंत समाधान मानणें** आणि **व्याप करण्यांत दुःख मानणें हा एक पंथ** आणि योग्य तें

कौशल्य संपादन करून मग केलेल्या श्रमाचें फल जी शारीरिक, मानसिक व सांपात्तिक संपत्ति तिचा विनियोग दुसऱ्याचें दु.ख निवारण करणें व त्याचें कायमचें सुख वृद्धिगत करणें या कामीं केला असता उत्पन्न होणारें जें समाधान व काम करण्यापासून उत्पन्न होणारा उत्साह व सुख यांत आनंद मानणे हा दुसरा पंथ आहे. आमच्या येथे आजला पहिल्या-पक्षाची म्हणजे संसारांत दुःख मानणाऱ्या आर्तांची सरशी आहे. संसार दुःखद आहे, हें खरें: पण आमची मंडळी श्रमाला भिऊन तो दुःखद म्हणतात, तसा मात्र तो नाहीं. विषयाच्या मोहांत सांपडणें, विषय म्हणजे स्वेतर वस्तु उपभोग्य होय असे समजणें, उपभोग हाच पुरुषार्थ मानणें आणि उपभोग मिळाला तर सुख मानणें आणि उपभोग मिळाला नाहीं तर दु.ख मानणे, ह्या सर्वांनीं संसाराला दुःखदत्व येते हें खरें आहे. पण यांत दुःखाचा भाग **सांसारिक** नसून **आपला** म्हणजे **आपल्या कर्तबगारीचा** किंवा **तिच्या अविद्यमानतेचा भाग आहे**. असो; भगवान म्हणताातः विषयोपभोगा-त्मक संसार दुःखदायी म्हणून कां होईना मनुष्यें जर वेदविहित कर्म करतील, वेदविहित उपासना करतील, अथवा वेदविहित ज्ञानमार्गाचे आक्रमण करतील, सारांश उपभोगात्मक मात्र संसार दुःखाचा आहे असे समजल्यावर व समजल्यामुळे केवळ उपभोगाचे ध्येय सोडून देऊन स्वस्थ न बसतां जर कर्म, उपासना अथवा ज्ञान यांचा अधिकारानुसार अवलंब करतील, तरी मला आनंदच आहे. सांत विषयाला सोडून अनंताच्या कांसेला लागले तरच सुख मिळेल. कारण जीव तेथून परमात्म्याचा म्हणजे अनंताचा अंश अनंतच आहे, तेव्हां अनंताचें समाधान करणारें सुख अनंतरूपच असलें पाहिजे. अर्थातच हे समाधान सात विषयांच्या सांत उपभोगांपासून कसे मिळणार? हे समजून जीव अनंताच्या आश्रयाला आले म्हणजे ईश्वरास आनंद होतो, हे साहजिकच आहे.

आर्तांचा म्हणजे विषयदु.खाने होरपळून गेल्यामुळे बाहेर पडणाऱ्या लोकांचा हा विचार झाला. यापुढे **जिज्ञासु** म्हणजे वर्तमान परिस्थितीच्या पलीकडे काय आहे हे समजून घेण्याची इच्छा करणारे लोक होत. हे आर्तापेक्षां श्रेष्ठ होत. आर्तांना **सद्यःस्थिति नको असते** इतकेच. तिच्या पलीकडे काय आहे हे ठाऊकही नसतें आणि ठाऊक करून घेण्याची इच्छाही नसते. जिज्ञासु हा ज्ञानाचा भुकेला आहे. **जीवमात्राला ही भूक हवी**. आमच्यासारख्या तरुणपणीच वृद्धावस्था आलेल्या लोकांस जाणण्याची इच्छाच नाहीशी झाली आहे. व्यवहारांत ही जाणण्याची इच्छा असेल तर अमेरिकेसारखी खंडे सांपडतात, घन वस्तूंनाही पारदर्शकत्व देणारे **रांटिजन** किरणा-सारखे किरण सांपडतात व उपभोगाचेही अनेक प्रकार निघतात. पण केव्हां? जेव्हां आपल्या सद्यःस्थितीच्या, सद्यःज्ञानाच्या, पलीकडे काय आहे, हें समजण्याची इच्छा म्हणजे जिज्ञासा असते, तेव्हां व्यवहार सोडून परमार्थाच्या शोधाला लागले, तर 'अधिकस्य अधिकं फलं' या न्यायाने जिज्ञासूला विशेष ज्ञान, विशेष आनंद आणि विशेष स्थिरता देणारे प्रदेश सांपडण्याचा संभव असतो. नुसत्या क्षणभंगुर सुख देणाऱ्या

पण आदिअंति निरंतर दुःख देणाऱ्या उपभोगाला कंटाळून, तप म्हणजे काय, यज्ञ म्हणजे काय, दान म्हणजे काय, त्याचप्रमाणें योग म्हणजे काय, भक्ति ह्मणजे काय, ज्ञान तें कसलें असतें, अशा जाणण्याच्या खऱ्या जिज्ञासेनें जो विहित कर्म, विहित उपासना व विहित ज्ञान यांचें स्वरूप जाणण्याची यथार्थ खटपट करितो, तो पुरुष व त्याची उद्योगसंतति पाहूनही परमेश्वराला आनंद होतो. 'विषयोपभोग हें आपलें ध्येय नाहीं, हें आपलें अंतिम साध्य नाहीं: कारण आपलें स्वरूपच उपभोगाच्या पलीकडचें आहे.' असें जो पुरुष जाणतो व आपलें स्वरूप काय आहे हें समजण्यासाठीं जो शास्त्रविहित कर्मादिकांच्या पाठीमागें लागतो, तो पुरुष आर्तापेक्षां श्रेष्ठच समजला पाहिजे; कारण विषयोपभोगानें उत्पन्न होणाऱ्या सुखाहून व विषयोपभोगाच्या ज्ञानाहून आपलें निजस्वरूप कांहीं तरी निराळ्या सुखाचें व निराळ्या ज्ञानाचें बनलें आहे तें सुख काय असेल, तें ज्ञान काय असेल, हें जाणण्याच्या सदिच्छेनें जो बाहेर पडला तो 'पिछेसे होय तो होय' असें ह्मणणाऱ्या साहसी आर्तापेक्षां जास्त श्रेष्ठ व परमेश्वराला विशेष प्रिय असला पाहिजे यांत शंका नाहीं. असो; हा जिज्ञासु विहित कर्म, विहित उपासना, विहित ज्ञान संपादावयास लागतो.

तिसरा वर्ग 'अर्थार्थी लोकांचा.' ह्या अर्थी ह्मणजे अर्थ मिळवूं इच्छिणाऱ्या लोकांची स्थिति जिज्ञासूच्या स्थितीपेक्षां वरल्या दर्जाची आहे. या लोकांना सद्यःस्थितीपलीकडे काय आहे, हे समजले आहे आणि ती ज्ञानवस्तु आपल्यास हवी आहे अशी बळकट इच्छा व काम करण्याची हौस यांस उत्पन्न झालेली आहे. व्यवहारांत सुद्धां जिज्ञासु पुरुषापेक्षां ज्ञानी पुरुष श्रेष्ठतर योग्यतेचा असतो. सद्यःस्थितीला कंटाळणें ही सुधारणेची पहिली पायरी आहे. सद्यःस्थितीचें सुख असो वा कर्म असो वा ज्ञान असो, ती साध्य झाल्यावर ह्मणजे त्या स्थितीस अवश्य असणारें कर्म व ज्ञान आपल्या अधिगत झाल्यावर तिचा कंटाळा येणे, ती नकोशी वाटणें हा नित्यतरुण मनाचा साहजिक धर्म आहे. अर्थातच कंटाळा आला ह्मणजे आपल्या वरची, आपल्या स्थितीच्या पलीकडची स्थिति काय आहे हें पाहण्याची इच्छा होणें, हा श्रेष्ठ मनाचा श्रेष्ठतर धर्म आहे. ही स्थिति, ही नवीन स्थिति, सद्यःस्थितीपरांस श्रेष्ठ आहे असें समजलें आणि हे समजत असतां वरिष्ठ प्रतीचें कर्म करण्याची, वरिष्ठ प्रतीची उपासना करण्याची आणि वरिष्ठ प्रकारचें ज्ञान संपादण्याची योग्यता अंगीं बाणली ह्मणजे ती वरिष्ठ प्रकारची स्थिति आपल्यास हवी अशी जबरदस्त अथवा अनावर इच्छा उत्पन्न होते; आणि या इच्छेला फलांचें मूर्तस्वरूप मिळावें म्हणून तो तो पुरुष विहित ज्ञानोपासनादिकांचा आश्रय करितो आणि योग्यकाळीं त्याचे श्रम फलद्रूप होतात, ह्मणजे तो श्रेष्ठतर योग्यतेला जातो. पहा कीं, परिक्षा पास झाल्यानंतर हल्लींच्या पदवीधराला पहिल्या प्रथमच जेव्हां तीस रुपयाची नोकरी लागते तेव्हां व पहिला पगार हातांत येतो तेव्हां जो आनंद होतो, तो केवळ अवर्णनीय असतो. पुढें वर्ष दोन वर्षें झालीं, संसाराचा 'आणा' पाठीमागें लागला ह्मणजे त्या तीस रुपयांचा

कंटाळा येतो व पुढें कांहीं श्रेष्ठ प्रकारचें काम आहे कां, याच्या शोधास आमचा नवाशिका सांसारिक वीर लागतो. अर्थातच श्रेष्ठ प्रकारचीं अनेक कामें त्याला दृष्टीस पडतात व त्याच वेळीं सद्यःस्थितीचें काम उत्तम रीतीनें संभाळून इतर श्रेष्ठतर कामाची वार्ता शोधून काढण्याची योग्यता त्याला प्राप्त होते. सद्यःस्थितीच्या कामापेक्षां श्रेष्ठप्रतीचीं कामें आहेत व तीं कामें संपादन करण्यासाठीं कांहीं श्रेष्ठतर प्रतीची योग्यता संपादन केली पाहिजे असें आपल्या जिज्ञासूला समजलें ह्मणजे तो ती विशिष्ट योग्यता संपादन करण्यासाठीं 'लोअर, हायरचा' अभ्यास करितो. सारांश, श्रेष्ठ प्रतीचें कर्म, श्रेष्ठ प्रतीची उपासना व श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान अधिगत करण्याच्या मार्गाला लागतो आणि अनुकूल परिस्थिति असली ह्मणजे परिक्षा पास होऊन लवकरच 'अव्वल कारकून' 'मामलेदार' होण्याच्या पंथाला लागतो; ह्मणजे अर्थार्थी होतो. अथवा मामलेदारी मिळविण्याच्या इच्छेनें अभ्यासाची उपासना करितो. ह्याच प्रकार परमार्थांतही लागू पडतो. परब्रह्माचें अथवा परमेश्वराचें स्वरूप कसें आहे व तो ज्ञान व सुख कसें व किती देतो हें कळलें म्हणजे त्या सुखासाठीं व ज्ञानासाठीं तो पुरुष विहितमार्गानें यत्न करावयास लागतो. अर्थातच हा पुरुष जिज्ञासूहून उंच दर्जाचा आहे. याला परोक्षरीतीनें परमात्मस्वरूप किंवा परमेश्वरस्वरूप कळलें आहे; व पुनः असेंही कळलें आहे की, तें परब्रह्म किंवा तो परमेश्वर ज्ञानदाता व सुखसंपादक आहे. या पुरुषाला विशेष प्रकारचें सुख म्हणजे निर्मळ सुख हवें व सर्वज्ञता हवी आहे. ह्या वस्तु हव्या आहेत म्हणून तो ह्या वस्तु देणाऱ्या परमेश्वराची आराधना विहितमार्गानें करितो. आर्ताला पुढची स्थिति माहित नसते, जिज्ञासूला ती स्थिति समजून घेण्याची इच्छा असते आणि अर्थार्थीला ती समजलेली स्थिति प्राप्त करून घेण्याची इच्छा असते. असे हे वरवरच्या श्रेष्ठ योग्यतेचे पुरुष आहेत व दुःखांतून सुटावें म्हणून, काय आहे तें समजावें म्हणून आणि दुसरी स्थिति प्राप्त व्हावी म्हणून कर्म करणारे, उपासना करणारे व ज्ञानार्जन करणारे कर्मठ, उपासक अथवा ज्ञानार्थी लोक विषयमार्गांत धडपड करून लोळत पडणाऱ्या जीवस्तंभापेक्षां उत्तरोत्तर श्रेष्ठ प्रतीचे लोक आहेत, असें भगवान् म्हणतात, तें सर्वथा सत्यच आहे.

या पुढचा वर्ग ह्मणजे ज्ञानी लोकांचा. हे लोक अत्यंत श्रेष्ठ होत. यांपेक्षा वरिष्ठ पुरुष सांपडणें शक्यच नाहीं. सुख, ज्ञान, व निर्विकारता ह्या वस्तु बाहेरच्या नसून निजस्वरूपांतच त्या आहेत, व त्या तिन्ही वस्तु भिन्नस्वरूपाच्या नसून एकस्वरूपाच्या आहेत हें ज्यास कळलें तो ज्ञानी होय. परब्रह्म, परमेश्वर, सर्वसुखनिधान, सर्वज्ञानसागर, सर्व अक्षरता हीं सर्व सदासर्वदा आपणच आहोंत असें ज्याला परोक्षज्ञान झालें, नव्हे साक्षात् ज्याला विज्ञान झालें ह्मणजे ज्याला अनुभव आला, त्याची योग्यता काय वर्णावी ? ह्या पुरुषाचा स्वार्थ सर्वथैव संपला; सुखदुःखाचें द्वैत मावळलें; शोकमोहाच्या वृत्ति अस्तंगत झाल्या; आतां या पुढें स्वार्थ तो काय उरला ? ज्ञानरूप झाल्यानंतर जिज्ञासेचें कारण नसल्यामुळें ती वृत्ति मनीच्या मनींच जिरून गेली. सर्वच आपण झाल्यावर

दुःख होणार कसलें व होणार कोणाला ? एवंच स्वार्थाचा परिघ सर्वथा मावळल्यानंतर या पुरुषाचें कर्म होणार तें परोपकारकच होणार. ज्ञानी पुरुषाला कर्मच नसतें असें ह्मणणें एकदृष्टीनें बरोबर आहे. आपण सर्वजण कांहींतरी स्वार्थ–हेतु मनांत ठेऊन अभिमानानें कर्म करितों असा अनुभव आहे. हेतूशिवाय जर कर्मच नाहीं, ज्ञानी पुरुषाचे स्वार्थ हेतूच जर मावळले, तर ज्ञानी पुरुषाला स्वार्थदृष्टीनें कर्म नाहीं, हें ह्मणणें या दृष्टीनें बरोबर आहे. पण जावत्कालपर्यंत तो शारीरिक स्नानाचमनादि व भोजनादि देहोपकारक कर्में देहपातापर्यंत हेतुशून्यतेनें करित राहतो, तावत्कालपर्यंत हेतुशून्यतेनेंच यज्ञ-दान तपादि परोपकारक सत्कर्में देहपातापर्यंत हा ज्ञानी पुरुष करित राहील. आपला देह राहवा ह्मणून स्नानादि कर्में जशीं आपोआप ( ह्मणजे कर्माभिमानाशिवाय व फल-वासनाशून्यतेनें ) होतात, त्याचप्रमाणें विराटपुरुषाचा सामाजिक देह रहावा ह्मणून यज्ञ-दान तपादि कर्में आपोआप ह्मणजे अभिमानाशिवाय व फलवासनेशिवाय होत राहतील, यांत मला तरी शंका वाटत नाहीं. परोपकारक कर्माचा अभिमान व फलापासून उत्पन्न होणारें सुखदुःख होत राहील तर अद्यापि ज्ञानामध्यें कर्मीपणा आहे, असें समजलें पाहिजे. पण प्राप्त झालेलें कर्म करावयाचें, असाही अभिमान जेथें मावळला पण तें कर्म सहज व अहेतुकतः करावयाची अथवा घडावयाची अंतर्बाह्येंद्रियांस संवय लागली, त्याचप्रमाणें प्राप्त झालेलें सामाजिक कर्महीं घडावयाची अशी संवय ज्ञान प्राप्त होत असतांनाच लाग-लेली असली ह्मणजे समाजांतील श्रेष्ठ पुरुषाचें ज्ञानपोषक, नीतिवर्धक, सारांश समाज-संकर्षक कर्म, उपासना व ज्ञान त्या त्या समाजाला अत्यंत उपकारक होतें, होईल व झालें पाहिजे यांत मला शंका वाटत नाहीं. परमेश्वरांनीं ' ज्ञानी त्वात्मैव मे मतं ' असें ह्मटलें आहे, त्याचें तात्पर्य हेंच आहे. परमेश्वराला कांहीं मिळवावयाचें नसूनही जसें ते लोक-संग्रहासाठीं नित्य कर्म करितात, तसेंच कर्म ज्ञानी ह्मणविणाऱ्या पुरुषास व्हावयास हवें, अशी त्यांची, शास्त्रकारांची व श्रीमच्छंकराचार्यादि महापुरुषांची व विभू-तींची इच्छा दिसते. विदेहमुक्ति मिळावयास जसा देहाभिमान सुटून देहपाताची आवश्यकता व मनबुद्धींद्रियादिकांची अत्यंत उन्नतावस्था होणें अत्यंत इष्ट आहे, तसेंच विदेहमुक्ति सर्वथा मिळण्याला सर्व प्रकारचे अभिमान सुटून सामाजिक अथवा विराट-पुरुषाच्या देहाला व मनादि अंतर्बाह्येंद्रियांलाही अत्यंत उन्नतावस्था प्राप्त झाली असली पाहिजे. व्यक्ति दृष्टीनें पुरुष मुक्त झाला म्हणजे तो सुटला असें जें कांहीं लोकांस वाटतें, तें खरें नसावें असें मला वाटतें. असो; हा वादग्रस्त प्रश्न एका बाजूला ठेविला तरीं भगवंतांचें ज्ञानी भक्ताचें कौतुक अवास्तव आहे, असें कोणीही पुरुष म्हणूं शकणार नाहीं. कारण या ज्ञानी म्हणजे निजरूप ओळखलेल्या म्हणजे सर्व मनोगत–कामांच्या वृत्ति मावळलेल्या, सुखदुःखातिरिक्त झालेल्या व आत्मानंदामध्येंच सदैव दंग झालेल्या पुरुषाची उपासना, या पुरुषाचें कर्म व या पुरुषाचें ज्ञान हीं सर्व अखंड स्वरूपात्मकच असतात. या पुरुषाचें भजन, याचें ज्ञान, याचें कर्म एका परमात्मप्रीत्यर्थ ह्मणजे

स्वात्मप्रीत्यर्थ असतात; ह्मणून यांची भक्ति अखंड व अभंग असते. अर्थातच हे सर्व श्रेष्ठ भक्त होत. यांची भक्ति एकनिष्ठ असते.

असो; तेव्हां अखंड आनंद व अखंड ज्ञान देणारें जें ब्रह्म त्याचें ज्ञानविज्ञान आपल्यास अवश्य आहे असें पहिलें तीन भक्त ह्मणतील व 'माझें निजरूपच तें आहे' असें ज्ञानी भक्त म्हणेल. पहिले तीन गृहस्थ केवळ स्वतःचें संतारण करण्यासाठीं व स्वसंतारण करण्याचा उपदेश करण्यासाठीं ब्रह्मस्वरूपाकडे जातात. कुटुंबाला, समाजाला व राष्ट्राला ही विराटस्वरूपाकडे, सर्वव्यापी विष्णुस्वरूपाकडे, सर्व अधिष्ठान जें ब्रह्म त्याकडे जावयाचें आहे आणि त्या समाजाचें आपण अंग ह्मणून स्वतःचें संतारण करित असतां कुटुंब, समाज व राष्ट्र या या संस्थांची उन्नति, अंगांगीभाव कायम ठेऊन, केली पाहिजे, तद्व्यतिरिक्त व्यक्तिसुधारणा होणें शक्य नाहीं, नीतिसुद्धारणा होणें शक्य नाहीं, सामाजिक व राष्ट्रीय सुधारणा होणें शक्य नाहीं, धर्मसुधारणा होणें शक्य नाहीं, हें तत्त्व व या तत्त्वाचें माहात्म्य वरील भक्तांस पूर्णपणें उमजलें नसतें. ज्ञानी भक्तांला निजरूप मिळावावयाचें हा मुद्दां हेतु नसतो. त्यानें निजरूपाची ओळख करून घेतली असल्यामुळें त्याची भक्ति अभंग असते. ही अभंग भक्ति आणि हा संकल्पाचा अभाव दृढ असतो ह्मणून त्याला व्यवहाराचे, नीतीचे, धर्माचे, सारांश सार्वजनिक प्रश्न सोडविणें सहज होतें. ब्रह्मज्ञानाचा उपयोग काय, याला तो व्यक्तिविषयक उत्तराची अपेक्षाच ठेवित नाहीं. त्याच्या विचारांत, उच्चारांत आणि आचारांत ब्रह्मस्वरूप खिळलें गेल्यामुळें 'उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत ॥ जडजीवा उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ॥ असें सेवा न्हावी म्हणतो त्याप्रमाणें किंवा 'सहज बोलणें हितउपदेश । करूनि सायास शिकविती ॥ या तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणें त्यांचे नैसर्गिक आचरणच समाजसंतारणाचें काम करित असतें. याप्रमाणें **ब्रह्मज्ञानाचा उपयोग स्वविमोचन व समाजविमोचन करितां येणें हा आहे.**

## ब्रह्मज्ञानविज्ञानाचीं साधनें.

ब्रह्मज्ञान संपादून मोक्षमार्गाचा अवलंब करणाऱ्या पुरुषानें म्हणजे मुमुक्षूनें साधन चतुष्टय साध्य करून घेतलें पाहिजे. हें हिंदुलोकांस सांगणें म्हणजे सूर्याला काजवात दाखविण्याप्रमाणें असमंजस होय. साधनचतुष्टययाचा ऊहापोह आमच्या येथें इतका झाला आहे कीं, आतां त्यावर जास्त लिहावयाचा प्रयत्न करणारा पुरुष क्षीरसागरांत अर्घ्य दिला असतां किंवा अर्घ्यप्रदान केलें असतां त्या समुद्राचें पाणी कितीं वाढलें हें बघणाऱ्या मुलाप्रमाणेंच बालिश होय. नित्यानित्यविवेक, इहामुत्रवैराग्य, शमादमादि षट्क आणि मुमुक्षा हीं जीं चार साधनें सांगितलीं आहेत, तीं साध्य करून घेतलीं असतां अज्ञानविनाशाचा कोणताही भाग साध्य होईल, मग मोक्षमार्ग साध्य होईल यांत शंका कसली ? हें ज्ञानविज्ञान सर्व-

विश्रुत आहे, तथापि एक दोन गोष्टींचा उल्लेख करून मग भवसागरांतून तारून नेणारे जे आमचे चार आचार्य आहेत, त्यांमध्ये एकवाक्यता कितपत आहे याचा अमळ विस्तारानें विचार मी करणार आहें.

## नित्यानित्यवस्तु विवेक आणि आधुनिक शास्त्रें.

ज्योतिःशास्त्राची माहिती करून घ्यावयाची असेल तर त्रिकोणमिति, गोलाध्याय दर्शनानुशासन, इत्यादि शास्त्रांचे ज्ञान अवश्य असतें. त्रिकोणमिति शिकावयाची असेल तर भूमितीचा अभ्यास करावा लागतो. कांहीं अंकगणिताचें व बीजगणिताचें ज्ञान झाल्याशिवाय भूमितीमध्यें जीं गृहीत कृत्यें व प्रत्यक्षप्रमाणें ह्मणून सांगतात, त्यांचें ज्ञान होत नाहीं. अंकगणित समजायला थोडेसें तरी व्यवहारज्ञान लागतें. सारांश त्रिकोणमिति नीट समजून घ्यावयाची असल्यास भूमिति, अंकगणित व व्यवहारज्ञान इत्यादि गोष्टी अवश्य असतात व ज्योतिःशास्त्र शिकावयाचें असल्यास वर नमूद केलेलीं शास्त्रें आवश्यकतःच समजून घेतलीं तर ज्योतिःशास्त्राची सशास्त्र माहिती होईल; त्याप्रमाणें सर्व विद्या व शास्त्रें यांचें प्रमुखत्व ज्या विद्येकडे साहजिकतः येतें, ती ब्रह्मविद्या नीट रीतीनें समजून उमजण्यासाठीं मुमुक्षूला अनेक विद्यांचें, अनेक शास्त्रांचें व अनेक कलांचें अध्ययन केलें पाहिजे. उदाहरणार्थ एकच गोष्ट घेतों. या नित्यअनित्य विश्वामध्यें ज्या चराचर आणि मूर्तामूर्त अनंत वस्तु आहेत त्यांमध्ये नित्य म्हणजे सदैव अविकार्य स्थितीत, स्वरूपामध्यें राहणारी वस्तु कोणती आहे की, जी समजून घेतली असतां आत्मा नामक नित्य वस्तूचा आपल्यास उद्बोध होईल ? ही नित्य वस्तु म्हणजे प्रत्येक विद्येंतील, प्रत्येक शास्त्रांतील व प्रत्येक कलेतील नित्य सिद्धांत होत. पहा की, परिस्थिति सारखी असेल तर दोनी मध्यें दोन मिळविले म्हणजे चार होनात असा गणिशास्त्रांतील सिद्धांत ज्याला उमगला नाहीं; कार्य उत्पन्न झालें कीं त्याला कारण तत्पूर्वी आवश्यकतः उत्पन्न झालेंच असलें पाहिजे, हा मूर्तामूर्त शास्त्रांतील सिद्धांत ज्यानें समजून घेतला नाहीं; विश्वसंघटनात्मक व्यापार सुरू असतां जीं विसृष्टीचीं ( Evolution; From Simple to Complex; (2) From Homogeneous to Heterogeneous व ( 3 ) From Indefinite to Definite ) कार्यें प्रचलित असतात त्या सर्वांत नित्यत्वानें दृश्य होणारा उत्क्रांतीचा स्पष्ट नियम, ह्यांची ज्यास माहिती नाहीं; कोणत्याही भौतिक अथवा मानसिक शास्त्रांचें अध्ययन करून ज्यानें–नित्यत्वाचा निःयम-सिद्ध करून घेतला नाहीं; विश्वामध्यें जी घडामोड प्रत्येक क्षणीं चालली आहे तिच्या मूळाशीं एक तत्त्व कायमचें असतेंच असतें असें शास्त्राभ्यासानें व स्वानुभवानें ज्याला कळलें नाहीं; त्याला नित्यानित्य वस्तुविवेक कळणार कसा आणि कळला तरी स्वतः अजमाऊन घेतल्याखेरीज उमजणार तरी कसा ? नित्यानित्यवस्तु त्यास समजणार नाहीं व समजली तरी उमजणारही नाहीं. पहा कीं, आपल्या प्राणप्रियेचा वियोग झाला असतां वेडा होऊन गेलेला पुरूरवा किंवा भवभूतीचा माधव अगनगखगांस आपल्या प्रियेचा समाचार सांगण्या-

प्रीत्यर्थ विनंति करित आहे, कुबेरकोपामुळें बहिष्कृत झालेला यक्ष वर्षाऋतूंतील मेघास आपल्या प्रिय भार्येकडे आपला प्रेमसंदेश घेऊन जाण्याची विनंति करित आहे, आपलें दर्शन होऊन प्रेमानें होरपळून गेल्यामुळें पंचत्व पावलेल्या प्रियाकरितां कठोर तपश्चर्या करणारी महाश्वेता, चंद्रपीडा जवळ आपली करुणरस परिपूर्ण प्रेमकथा सांगत आहे इत्यादि रतिविलापांच्या सुभग अथवा असुभग गोष्टी तारुण्याच्या प्रथमवयांत वाचणारा आमचा हल्लींचा विद्यार्थीवर्ग ज्याप्रमाणें कल्पना सृष्टींत मात्र मदनकुतहलाचा अनुभव घेऊन तत्संबंधी अवास्तविक सिद्धांत बांधूं लागतो, त्याचप्रमाणें मोक्षशास्त्राला साधनीभूत असणारा जो नित्यानित्यविवेक त्याचा अनुभव नसल्यामुळें आमचा नवशिक्या मुमुक्षु सामान्य दृष्टांतांनीं फसून जातो, व फसून जावा यांत काय आश्चर्य आहे? लोकांच्या तोंडून युद्धाच्या रम्य कथा व त्याची वीररसपरिप्लुत वर्णनें ऐकून बाहु स्फुरण पावणारा उत्तरबाळ ज्याप्रमाणें तो अपरंपार कौरव-सेनासंभार व त्यांची तीं दिव्य शस्त्रास्त्रें, तें चतुरंग सैन्य व त्यांचा तो तुमुल व हृदयभेदी रणरव ऐकून व पाहून बिचारा घाबरून गेला, त्याचप्रमाणें मोक्षशास्त्राच्या मनोहर गोष्टी व त्यांनी मनोहारी संगीतें चतुर पुराणिकांच्या अथवा वाचस्पतीतुल्य हरिदासांच्या तोंडून ऐकल्यामुळें मोक्ष मिळविण्यासाठीं हापापलेला आधुनिक मुमुक्षु कामक्रोधांच्या त्या दुर्भेद्य-ऊर्मी सहन करण्याच्या वेळीं गर्भगलित होऊन जातो, यांत चमत्कार तरी कसला? व्यवहारज्ञान नसतांही व्यावहारिक शास्त्रांतील नियम पाळण्याची प्रतिज्ञा करून मोक्षमार्गाचें आक्रमण करूं पाहणारे नवशिके मुमुक्षूंची अशीच गडबड उडावयाची. एतदर्थ आमच्या शास्त्रकारांची अशी आज्ञा आहे कीं, केवळ गुरुमुखावरच न विसंबतां व पांचचार जे ठराविक दृष्टांत आहेत त्यांवरच नुसती भिस्त न ठेवतां दुःखात्मक संसारांतही अवश्य लागणारीं जीं व्यावहारिक व धर्मशास्त्रें आहेत, त्यांचें अध्ययन व त्यांचा अनुभव घेऊन नित्य कोणतें व अनित्य कोणतें, याचा निर्णय करावयास शिकावें. हें शिकणें चांगलें अंगवळणीं पडलें आणि नित्य वस्तूच आपल्यास हवी आहे व तिच्या अधिगमासाठीं आपण वाटेल ती अनित्य वस्तु टाकून देण्यास तयार आहों, असा मनाचा पक्का निर्बंध झाला व संसारांतील हरएक प्रकारच्या गोष्टींत आपण नित्या-बद्दल, निदान पुष्कळ दिवस टिकणारी वस्तु आहे तिच्यासाठीं, अनित्य अथवा तत्काल सुख देणाऱ्या गोष्टींचा किंवा मनोवृत्तींचा त्याग करण्यास सिद्ध आहों, असा आपल्या स्वतःस अनुभव येऊं लागला ह्मणजे नित्यानित्य वस्तूचा विवेक परिपक्क होऊन नित्य वस्तूचा संग्रह करण्याची बुद्धि व श्रद्धा निश्चित करितां येण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं बाणत चाललें ह्मणजे मग आपल्यास आत्मवस्तूचा अभ्यास करण्याचा एक अधिकार मिळाला असें म्हणतां येईल. ज्या सांपत्तिक, राजकीय, शारीरिक, मानसिक व धार्मिक परिस्थितींत आपला जन्म झाला, तिच्यापेक्षां श्रेष्ठतर स्थितींत मी आपलीं मुलें–बाळें व आपला समाज नेण्यासाठीं यथाशक्ति प्रयत्न करीन व यासाठीं देवयज्ञ, ऋषियज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ व भूतयज्ञ असे पंचमहायज्ञ करण्याचा जो प्रत्येक दिवसाचा विधि आहे

तो मी यथासांग पार पाडीन, जें दान व जी तपश्चर्या करण्याचा पावनकारक विधि सांगितला आहे, तोही सशास्त्र सिद्धीला नेईन आणि मोक्षमार्गाचा अवलंब करण्याचे वेळीं याज्ञवल्क्यांनीं आपल्या भार्येस ( मैत्रेयीस ) उपदेश करून तिला आत्म-विद्या सांगितली व तिचें समाधान केलें त्याचप्रमाणे माझ्या बायकामाणसांचें व मुलीं-लेंकरांचें समाधान करून मी मोक्षमार्गाचा अवलंब करीन, असा निश्चय करून नित्यानित्य विवेक आपल्यास कितपत साध्य होत आहे हें पहात रहावें. शरीर अनित्य आहे, वैभव शाश्वत नाहीं, आईबापांची, बायकामुलांची, इष्टमित्रांची संगति दुपारच्या सावली सारखी आहे. फार फारतर या जन्मापर्यंत टिकणारी आहे हे दाखले रोज संसारी पुरुषास येतात व बोलण्याचे वेळी त्यांची सत्यताही आपल्यास पटते, आणि ह्मणून मोक्षशास्त्र आपल्यास वहिवाटितां येईल, असे आर्त जे आपण त्या आपल्यास वाटते. पण हा निवळ भ्रम आहे. प्रत्यक्ष करणी करण्याची वेळ आली ह्मणजे वरील दाखले लटपटून जातात. अतएव प्राचीन व आधुनिक शास्त्रांच्या परिशीलनानें, धर्मशास्त्रांत जे विधि सांगितले आहेत त्यांचें विचारपूर्वक आचरणाने, विचारदृष्टीनें व अनुभवानें नित्यानित्य विवेक करण्यास शिकावें, जास्त वेळ टिकणाऱ्या सुखाप्रीत्यर्थ कमी वेळ टिकणारें सुख टाकून देण्याची संवय लावून घ्यावी, कुटुंबाचे परमार्थ सुख वृद्धिंगत होत जाण्यासाठीं आपल्या ऐहिक व पारमार्थिक सुखावरही पाणी सोडण्याची दीक्षा घ्यावी, केव्हांही शास्त्रज्ञान, कलाज्ञान किंवा तत्त्वज्ञान हे ऐहिक व परमार्थिक, व्यष्टीचें व समष्टीचें सुखप्रपोषकच होत असतें व 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' हें समजून ज्ञान मिळ-विण्यासाठीं मात्र उपभोग घ्यावयाचे असा निश्चय करून तो प्रत्यहीं अमलांत आणीत जावा, आणि निर्विकार स्थिति ही रागद्वेषापेक्षां अत्यंत विलक्षण सुख देणारी आहे हें समजून घेऊन शांतता, मनःशांतता, वाढविण्याप्रीत्यर्थ व सामाजिक शांततेच्या प्रपोषणार्थ यथाशक्ति प्रयत्न असावा, इत्यादि प्रकारची तपश्चर्या अथवा योगाभ्यास केला तरच नित्या-नित्याचा विवेक शास्त्र शुद्ध होईल, असे वाटते. हाच अभ्यासयोग भगवंतांनीं आठव्या व बाराव्या अध्यायांत सांगितला आहे. सारांश योग्य ह्मणजे योगाभ्यासाला अनुकुल असें ज्ञान मिळवावयाचें व परिस्थितीस अनुरूप असें विहित कर्म करित राहावयाचें आणि भूत-कालीन अथवा भविष्यकालीन सुखदुःखांचा विचार न करितां ह्मणजे सुखदुःखांची चिंता व शोक करून ( शोकानें व चिंतेनें ) आपल्या मनाची ( बुद्धीची व अहंवृत्तीची ) स्थिति विकारवश होऊं न देतां आपले कर्तव्य एकनिष्ठ श्रद्धेनें करावयाचें व येईल प्रसंग तो सुखसमाधानानें पार पाडावयाचा, ( म्हणजे सुखदुःखे समेकृत्वा ) असा निश्चय हळूहळू करून व त्याप्रमाणें वागावयास लागून जर आपण विवेक संपादित गेलों तर परमार्थाला इष्ट जो नित्यानित्यविवेक तो आपल्यास साध्य होईल अशी माझी समजूत आहे. असो; तेव्हां कायिक अथवा मानसिक क्लेशांमुळें स्वकर्तव्याचा तामसी त्याग करून 'कर्मानें ब्रह्मरूप वाढत नाहीं, किंवा कर्म केल्यानें कमी होत नाहीं' असा शास्त्रार्थ सांगावयाचा व आपलें दौर्बल्य आच्छादित करावयाचें ही संवय आमच्या सामाजिक दुर्दैवानें

आपल्या समाजांतील श्रेष्ठ पुरुषांस लागली आहे, ह्या परस्परविघातक संवयीनें विश्वाच्या अंतर्बाह्य नित्यनियमांच्या नूतन शोधाला आम्ही आंचवलों, इतकेंच नव्हे, तर आमच्या पूर्वजांनीं आपल्या अद्वितीय बुद्धिप्रभावानें व विलक्षण कर्मकौशल्यानें जे इह-परमार्थ साध्य करणारें ज्ञानसामर्थ्य व कर्मसामर्थ्य मिळविलें होतें तेंही गमावून बसलों. समाजांत श्रेष्ठ मानलेल्या ब्राह्मण जातीचें हें ज्ञानाविषयीचें औदासिन्य व कर्मा-विषयीची विकलता पाहून बाकींच्या लोकांनीं ब्राह्मणनिष्ठ राहून त्यांचें घातुक अनुकरण केलें व सर्वत्र पुरुषार्थाचा उच्छेद करणारा व येथील नैसर्गिक संपत्तीला अनुकूल असणारा आळस बळावला; तो आळस, ती मनाला व शरीराला दुबळेपणा आणणारी दुष्ट संवय, नेमळें समाधान यांना पार झुगारून देऊन, अथवा एकदम झुगारून देणें कठि-णच आहे, तेव्हां क्रमाक्रमानें झुगारून देण्याचा प्रयत्न करून आपण व्यावहारिक आणि तदनुकूल पारमार्थिक, तसेंच पारमार्थिक व तदनुकूल व्यावहारिक, नित्य कोणतें आहे, अनित्य कोणतें आहे, याचा व्यक्तिशः व समाजशः विचार करावा आणि व्यक्तिनिष्ठ समा-जाला आणि समाजनिष्ठ व्यक्तीला इहपर हितकर नित्य आहे त्याचा संग्रह करून, विघात-कारी अनित्याचा त्याग करावयास शिकूं या व त्याग करावयास लागूं या. हाच काय तो श्रेयोमार्ग आहे असें मला वाटतें म्हणून याचा हा विस्तार केला आहे. असो; हा नित्यानित्य विवेक आपल्या हस्तगत झाला म्हणजे लागलीच उत्तम प्रकारचें

## वैराग्य

आपल्यास मिळूं लागतें. सर्वदा अविकृत स्थितीनें स्वरूपांत राहणारें तें नित्य होय. त्या ह्या नित्यावरच प्रेम ठेवणें व येथील अथवा स्वर्गांतील विषयांच्या ज्ञानानें व उपभोगानें मिळणारें जें सुख आहे तें अनित्य आहे, म्हणून त्याविषयीं उदासीन राहणें, तें सुख व ते सुखविषय सर्वथा वर्ज करणें याचें नांव वैराग्य होय. जसें जसें ज्ञान वाढत जातें, तसें तसें नित्य समजत जातें; आणि नित्य समजत जातें तसें नित्याचा संग्रह करावा ही बुद्धि दृढ होते. ही बुद्धि दृढ होत जातें, तसतसें विषयवैराग्य वृद्धिंगत होतें. एवंच नित्यज्ञानावर वैराग्याची स्थिति अवलंबून आहे. ज्याप्रमाणें नित्याची व्याप्ति क्षणभंगुरा-पासून तो अनंतकालापर्यंत आहे म्हणजे नित्य हें सापेक्ष असून त्याची व्याप्ति ज्ञानानुसार अनंतकालापर्यंत, अविकृत आणि अविकार्य स्थितीपर्यंत म्हणजे स्वरूपापर्यंत होत जाते, त्याचप्रमाणें वैराग्य हें शारीरिक सुखापासून तों आत्मसुखापर्यंतचा प्रदेश व्याप्त करितें. म्हणजे पुष्कळ काल टिकणाऱ्या सुखाकरितां व विषयाकरितां क्षणिक अथवा कमी वेळ टिकणाऱ्या सुखांचा व सुखविषयांचा त्याग करावयाचा, येथून वैराग्याला आरंभ होऊन सापेक्षतेनें तें वाढत जातें; तें इतकें कीं, बाह्य विषय मात्र सर्व कालभंगुर आहेत, त्या पासून उत्पन्न होणारें सुख तेंही कालभंगुर म्हणजे केव्हां तरी नष्ट होणारें आहे, अतएव बाह्य विषय व तज्जन्य सुखही त्याज्य आहेत असा विचार पूर्वक समज होऊन त्या

बुद्धीच्या अनुषंगानें श्रद्धा उत्पन्न होते व ते ते बाह्य विषय व तज्जन्य सुख यांचा आपण त्याग करितों; ह्याचें नांव वैराग्य होय. या प्रपंचावरून नित्य, ज्ञान आणि वैराग्य यांचें साहचर्य आहे असा निश्चय होईल तर माझें इष्टकार्य झालें. बालवयांत मनांत येईल तोच विषय सुखकारी आहे, असा अज्ञानानें ग्रह होतो. तसेंच या वेळीं मानसिक सुखापेक्षां शारीरिक सुखाची, नैतिक व धार्मिक सुखापेक्षां शारीरिक व मानसिक सुखाची, आणि लोकांच्या सुखापेक्षां आपल्या स्वतःच्या सुखाची चाड जास्त असतें. वय वाढत जाऊन ज्ञान मिळूं लागलें, अनुभव येऊं लागला, ह्मणजे अज्ञानाचे ढग विरूं लागतात आणि मनांत येईल तोच विषय सुख देतो असें नाहीं व तो सुखकारक होतो असाही नियम नाहीं, हें ज्ञान स्वतःच्या अनुभवावरून व आप्तइष्टांनीं सांगितल्यामुळें प्राप्त होतें. ह्याचप्रमाणें मानसिक सुख हें श्रेष्ठप्रतीचें व ह्मणूनच जास्त वेळ टिकणारें आहे. नैतिक अथवा धार्मिक सुख हें शारीरिक व मानसिक सुखांपेक्षां श्रेष्ठतर व चिरकालिक आहे असेंही ज्ञानविज्ञान वयोमानाप्रमाणं वाढत जातें. तसेंच समाज जसजसा वाढत जातो व सुसंस्कृत होत जातो, त्याप्रमाणें व्यक्तिसुखापेक्षां सामाजिक सुख व ह्या सामाजिक सुखापेक्षांही पारमार्थिक सुख म्हणजे स्वरूपसुख श्रेष्ठतर व अनाद्यनंत आहे, अशी सात्विकबुद्धि व सात्विकश्रद्धा उत्पन्न होऊन कनिष्ठ प्रतीच्या सुखांविषयीं अप्रेम, हेयबुद्धि, वैराग्य उत्पन्न होते. हें खरें वैराग्य होय. रामचंद्राला परस्त्रीविषयीं जें वैराग्य होतें, पंडुसुत धर्माला अधर्माविषयीं जें अप्रेम होतें, रामदासस्वामींनीं उपभोगाविषयीं जो तिटकारा दाखविला, शिवाजीमहाराजांनीं परकामिनीवर जो बहिष्कार घातला, रामशास्त्री प्रभुणे यांनीं परधना-विषयीं जी उग्र उदासीनता दाखविली, तें वैराग्य, तें अप्रेम, ती हेयबुद्धि, तो तिटकारा, तो बहिष्कार व ती उग्र उदासीनता बाह्य विषयांचें सर्वथा विसर्जन करील, तेव्हां वैराग्य-वृत्ति संचारूं लागली असें म्हणतां येईल. पण बायकामुलांवर संतापून गेल्यामुळें, दोन तीन वेळां स्मशान यात्रेला जावें लागल्यामुळें, श्रम लागणाऱ्या कामाच्या नावडीमुळें जें वैराग्य येतें तें खरें नव्हे. तें आगंतुक वैराग्य होय. दुःखाचा आवेग सहन न झाल्या-मुळें उत्पन्न झालेलें हें वैराग्य, दुःखकारण संपलें कीं, डळमळूं लागतें. संकट आलें असतां एकादा व्यसनी पुरुष जसा आपलें व्यसन सोडावयास तयार होतो व संकटविमो-चन झाल्याबरोबर पुनः 'पहिल्या पाढयावर' येतो तसाच अविचारी वैराग्याचा विपाक हटकून होतो. अर्जुनाचा संन्यास याच प्रकारचा होता. तसेंच हल्लीं आमच्या समाजांत वावरणारे बैरागी, वाघे, मुरळ्या, गोसावी, भाविणी यांचें वैराग्य आहे कीं, वैराग्याची थट्टा आहे? आमचे वैराग्यशिक्षक कोण? तर भिक्षुक, हरिदास आणि पुराणीक! यांपैकीं किती लोक असे सांपडणार नाहींत, कीं, ज्यांच्या अंतर्बाह्य आचारविचारांवरून हे लोक वैराग्याच्या वैराग्याचें म्हणजे प्रपंचाचें शिक्षण देणारें धंदेवाले लोक आहेत, असें ह्मणतां येणार नाहीं? आमच्या हिंदु समाजांतील स्त्रियांचें पातिव्रत्य सर्वथा व सर्वदा अनुकरण करण्यासारखें असतें ही आनंदाची व अभिमानाची वार्ता कोणाही हिंदुपुरुषास नव्यानें सांगावयास नको आहे. हें सर्वांशीं खरें आहे, तथापि ज्या

माऊलींच्या दुर्दैवानें त्यांच्यावर अकाली वैधव्याचा प्रसंग येतो व हा प्रसंग आल्यामुळें त्यांस संन्यस्तवृत्ति पत्करावी लागते, त्या बिचाऱ्या माऊलींचें वर्तन बाह्यतः व शरीरतः शुद्ध राहतें म्हणून त्यांच्या सर्वांगीं पूर्ण वैराग्य बाणलें असें आपल्यास सत्यदृष्टीनें केव्हांही म्हणतां येणार नाहीं. 'आधीं मन मुंडा बा मुंडा। कशासि मुंडिता तुंडा' असें गर्जना करून सांगणारे संत आणि 'आली सिंहस्थ पर्वणी। न्हाव्या भटा झाली धणी' असें कठोर पण कल्याणकरी वाणीनें सांगणारे तुकोबा महाराज अनेक वेळां **मानसिक, ऐच्छिक व आत्मिक वैराग्य पाहिजे**; वरपांगी वैराग्य उपयोगाचें नाहीं असें सांगतात, तें आपण विसरूं नये. ("कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्।...मिथ्याचारः स उच्यते.॥) असत्य दांभिक लोकांस भगवंतांनीं मिथ्याचारी म्हटलें आहे. सारांश, वैराग्य, उपभोगासंबंधीं वैराग्य, इहपरलोकीं जे सुखकारी उपभोग आहेत, त्यांसंबंधींचें वैराग्य, ज्ञानपुरःसर आणि विज्ञानपुरःसर मुमुक्षूच्या आंगांत शिरलें तरच कार्य होईल. श्रेष्ठ प्रतीचें ज्ञान होऊन नित्याची ओळख पटली व तें नित्य आपल्यास हवेंसें वाटूं लागलें, त्याचा ध्यास लागला, तें मिळविण्याची खटपट सुरू झाली म्हणजे अनित्य सुख देणाऱ्या, स्वतः विकृत अथवा विकार्य स्थितींत असणाऱ्या विषयांवर अप्रीति होते आणि नित्याचें ज्ञानविज्ञान खंबीर झालें म्हणजे अनित्याविषयींचें वैराग्यही कायमचें होतें. उघडच आहे, नित्यवस्तूच्या लाभापासून किंवा अधिगमापासून जें सुख होतें तें समाधानी स्वभावाचें असल्यामुळें चिरकाल टिकणारें, जास्त घनदाट, जास्त भरींव आणि जास्त सामर्थ्याचें असतें. छकडीच्या लावण्या गायिल्यानें सुख होतें; पण कोणाला? शारीरिक उपभोग म्हणजेच पुरुषार्थ सिद्धि होय, असें वाटणाऱ्या पुरुषाला! उपभोगाची तृष्णा उद्दीपित करणारे खानपानादि पदार्थ अथवा स्रक्चंदन, वनिताशृंगरादि विषय परमेश्वर तुल्य वाटतात. पण हेच पुरुष ज्ञानमार्गाला लागले व्यवहारांत ही नित्य कोणतें अनित्य कोणतें, याचा विवेक करतां येऊं लागला, नित्याविषयीं बुद्धि व श्रद्धा स्थिर होऊन प्रथम जास्त वेळ टिकणारे, नंतर जास्त वेळ टिकून सुख देणारे, पुढें जास्त वेळ टिकून जास्त सुख देऊन दुःख उत्पन्न न करणारे, असे विषय घेण्याची संवय लागली म्हणजे तदितर विषय टाकून देण्याला आरंभ होतो. हा वैराग्याचा आरंभ होय. आपला पुरुषार्थ कोणता तो निश्चित ठरला व त्याचीं साधनें निश्चित ठरलीं म्हणजे तदितर विषयांविषयीं वैराग्य दृढ होत जातें. शेवटीं कधींही कमीं किंवा विकृत न होणारें, केव्हांही दुःख न देणारें व केव्हांही इतर विषयाचें भान उत्पन्न होऊं न देणारें जें आत्मस्वरूपज्ञानविज्ञान तें मिळालें म्हणजे वैराग्याची पूर्णावस्था होते, ती इतकी कीं, या पुरुषाकडे जाण्यास विषयच धजत नाहींत. (रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते॥) हें मूर्तिमंत वैराग्य होय. आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं हा श्लोक पहा. याप्रमाणें ज्या क्रमानें नित्यज्ञान व्यवहारांतूनच हुडकून काढून परमार्थांत शिरतें, त्याच क्रमानें वैराग्यही प्रथमतः विशिष्ट वैराग्याचें स्वरूप धारण करित करित शेवटीं विषयवैराग्यरूप बनतें. व्यवहारांतील नित्य स्वानुभवानें व गुरुमुखानें समजूं लागलें म्हणजे मोक्ष मार्गाला जाण्याचा पहिला अधिकार मिळतो, त्याचप्रमाणें व्यवहारांतील अनिष्ट

विषयावरील अप्रेम उत्कट स्वरूप पावून शेवटीं शेवटीं बाह्य विषय तेवढा त्याज्य करावयाचा ही स्थिति प्राप्त झाली म्हणजे मोक्षमार्गाचा दुसरा अधिकार मिळाला असें समजावें; अथवा मोक्षाच्या तटाचा दुसरा दरवाजा उघडला असें समजावें. या पुढें आणखी दोन अधिकार अथवा दोन दरवाजे उघडावयाचे आहेत. तिसरा अधिकार संपादावयाचा म्हणजे

## ( ३ ) शमदमादिषट्क

साध्य करून घ्यावयाचें; हें कार्यही अत्यावश्यकापैकींच आहे. शमदमादिकांचा विचार पुष्कळच झाला असल्यामुळें आणि अंतःकरणाच्या नियमानें अथवा युक्तत्वानें सर्व अंतर्बाह्य इंद्रियें शांतच होतात, असा अनुभव असल्यामुळें मला या संबंधें विशेष विस्तार करावा, असें वाटत नाहीं. नित्यज्ञान होऊन वैराग्य जसजसें स्थिर होत जातें, तसतशीं ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, अंतःकरणें म्हणजे वासनेसह मनबुद्धि आणि सुसंस्कृत श्रद्धा, ही मंडळी युक्त स्थितींतच असतात. पहा कीं, तरणाताठा श्रीशुकाचार्य दिगंबर असतांनाही बायकांच्या अंगावरून गेला तेव्हां शुकाचार्याच्या अंतःकरणांत व इंद्रियांत चलबिचल झाली नाहीं, इतकेंच नव्हे, तर ज्या बायकांच्या दृष्टीस तो पडला, त्यांच्या गांभीर्यांत बालाग्रही भिन्न भाव आला नाहीं, हें शमदमादि संपत्तीचें उत्तम उदाहरण आहे. स्थित प्रज्ञाचीं लक्षणें सांगतांना 'यस्मान्नोद्विजते लोको०-इ.' असें भगवंतांनीं म्हटलें त्याचें तात्पर्य हेंच-आहे. अगदीं अलीकडचें उदाहरण म्हणजे मिरजेस गेल्या पाव शतकाचे पूर्वी **अण्णाबोवा** म्हणून असत, त्यांचें होय. यांची वृत्ति बाळपणाची असे. हे सदा आनंदी असत. हे सदैव नग्न असत तरी बायकामुलांस यांच्याशीं वागतांना संकोच वाटत नसे. कांहीं लोकांस हे 'साधु' असें वाटे व कांहीं लोक 'हा वेडा आहे' असें म्हणत. इतकें मात्र खरें कीं, यांचें वैराग्य अति कडकडित होतें; म्हणजे यांची अंतर्बाह्येंद्रियें पूर्णपणानें शांत व स्थिर झालेलीं होती. एके दिवशीं स्वतःच्या इच्छेनें किंवा कोणा लुच्चाच्या सांगण्यावरून एक विश्वयोषिता यांच्या जवळ जाऊन लडिवाळपणानें यांस अंजारूं गोंजारूं लागली, पण बोवांच्या अंगावर शहारे येईनात! पुढें तिनें निर्लज्ज होऊन हातांत कामदंड घेतला व त्याचें मर्दन करूं लागली. तथापि कोणत्याही इंद्रियांत कोणत्याही प्रकारचें उत्तेजन नाहीं! हें पाहून तिनें कयास केला कीं बोवा तृतीय प्रकृति आहेत! पुढें दुसरे दिवशीं ती स्नानास श्रीकृष्णेवर गेली तेथें बोवा अकस्मात् प्रकट झाले व 'हा पहा रांडे! मी क्लीब कसा आहे तो' असे अभिनयपूर्वक शब्द उच्चारून ती स्वारी तेथून पळून गेली. याचें नांव शमदमादिकांचें साधन. वरील कहाणी सांगोवांगीची नव्हे; घडलेली गोष्ट आहे. तात्पर्य अंतरिंद्रियांवर, बाह्येंद्रियांवर जीवाला स्वामित्व हवें असतें तें विषय वैराग्यापासून म्हणजे नित्यानित्यवस्तु विवेकापासून मात्र मिळेल. इंद्रियनिग्रह, मनोविजय, सहनशीलता, उदासीनता इत्यादि मोक्षमार्गाला नेणारे गुण

केवळ नित्य ज्ञानापासून परंपरेनें प्राप्त होतील. एवंच हा मनोबुद्धीचा दरवाजा व्यवहारांत उघडून जसजसें बुद्धिद्वारा ज्ञान प्राप्त होईल, जसजसें वैराग्य श्रद्धेच्या द्वारानें सिद्ध होत जाईल, तसतसा या षट्कसंपत्तीचाही लाभ होत जाईल. 'पुत्राचे सहस्र अपराध माता काय करी तयाचा खेद । हा मनःसंपत्तीचा दाखला जसा प्रत्येक माऊलीच्या गृहांत सांपडतो, तसाच दाखला आपल्या वर्तनांत आणण्याला शिकावें. १५।१६ वर्षांपर्यंतच्या पुत्राच्या वर्तनामध्यें मातुश्रीला जसा दोष दिसत नाहीं कदाचित दिसलाच तरी ती जशी त्याचा प्रतिकार करण्याचा उपदेश प्रेमानें करितें, त्याप्रमाणें आपलें नातेवाईक, आपले इष्टमित्र, आपले जातभाई, आपले राज्यबंधु आपले राष्ट्रबंधु व आपले मानवबंधु सर्वत्र वावरत आहेत, असें स्वात्मत्वाचें वर्तुळ हळुहळू वाढवून मानावयास लागावें आणि चुक्यांकडे किंवा अपराधांकडे दोषदृष्टीनें न बघतां त्यांचे दोष प्रेमानें नाहींसे करण्याचा यत्न करावा. हा यत्न साधेल व आपलाही मनोविजय होईल. केव्हां ? जेव्हां व्यक्तिस्वार्थाची दृष्टि सर्वथा मावळेल तेव्हां. आपल्यासाठीं सर्व जगांचा व्यवहार चालला आहे व चालावा, ही संकुचित व समाजविघातक बुद्धि त्यागून देऊन जेव्हां आपल्या दुःखाची आत्यंतिक निवृत्ति करूं इच्छिणारा पुरुष दुसऱ्याच्या अधिकारानुसार त्याचें इहपारलौकिक कल्याण करण्यासाठीं हर्षानें व मनोभावापासून झटेल, सारांश कुटुंबासाठीं, समाजाप्रीत्यर्थ व राष्ट्राकरितां, राजास्तव ह्मणजे या सर्वांचें ज्ञानदृष्टीनें व सुखदृष्टीनें यथाशक्ति कल्याण करण्यासाठीं मी जन्मलों आहे व प्रेमळपणानें समाजांत राहिलों तर माझेंही कल्याण होईल, अशा शुद्ध बुद्धीनें वागलें तरच नित्यज्ञानाची मर्यादा वाढेल, वैराग्याचा परिघ विस्तीर्ण होईल आणि मनःशुद्धीचें कार्य सुसंस्कृत होऊन विस्तीर्ण होईल. मनःशोधनाचें कार्य समाजांत होतें तसें इतरत्र होणें अशक्य आहे. एकांतानें विचाराला दार्ढ्य येईल, पण हें दार्ढ्य कायमचें आहे कीं नाहीं हें अजमावण्याचें उत्तम स्थान ह्मणजे समाज होय. वैराग्याच्या सुवर्णाला कस लावावयाचा तो समाजांत लावावा लागेल. ह्याचप्रमाणें नित्यज्ञान मिळवावयाला उत्तम स्थान ह्मणजे समाजच होय. अनुभव मिळण्याचें स्थान समाजच आहे. समाज नसता, तर नित्यानित्यविवेकाचे धडे आपण आपला सगळा जन्म वेंचला असता तरी कितीकसे मिळाले असते ? तसेंच समाजाच्या अभावीं आपल्याला वैराग्याचें ज्ञान व वैराग्याचा अनुभव मिळण्याचें ठिकाणच नव्हतें. चित्तशुद्धीचाही हाच इतिहास आहे. श्रुतीनें व स्मृतींनीं नित्य नैमित्तिक कर्में करण्यास सांगितलीं आहेत, त्याचें तात्पर्यच समाजांत राहून व समाजांत वागून आपण आपलें चित्त शोधून घ्यावें, हें आहे. ईश्वराची उपासना सांगितली आहे व ईशभक्ति अनन्य ठेऊन लोकसंग्रह करण्यास सांगितलें आहे, त्याचें तात्पर्यही हेंच आहे कीं, अतिसुंदर ध्येय यथाशक्ति मनापुढें ठेऊन ईश्वरदृष्टीनें ह्मणजे सार्वजनिक कल्याण करण्याच्या दृष्टीनें वागलें असतां ज्ञान वाढेल, नित्यावर भक्ति उत्पन्न होईल, वैराग्य बाणेल आणि चित्ताचें शोधन होईल. असो: याप्रमाणें चित्तशुद्धी होऊन मोक्षमार्गाचा तिसरा अधिकार मिळाला अथवा मोक्षगडाचा तिसरा दरवाजा उघडला ह्मणजे चवथा दरवाजा

ज्या अंतर्गृहांत नेतो, तो बालेकिल्ला व त्या किल्ल्याच्या आंत नेणारा दरवाजा दिसूं लागतो. येथें रमणीय शोभा आहे; पण दिसतांना मात्र सर्वत्र भेसुर प्रकार प्रकट होतो. असो; हा दरवाजा किंवा दिडी ह्मणजे

## मुमुक्षा

होय. नित्यानित्य विवेक, वैराग्य, मनःशोधन इत्यादिकांच्या साहाय्यानें मोक्ष नांवाचा किल्ला सर करणें सोपे होईल हें खरें; पण याला एक शर्त आहे. ती ही कीं, मुक्त होण्याची इच्छा उत्कट झाली असली पाहिजे. ही इच्छा नसेल तर वरील तीन अधिकारांच्या साहाय्याने व्यवहार मात्र उत्तम प्रकारचा सिद्ध होईल.

या तीन साधनांच्या योगाने पाश्चिमात्य लोक आजमित्तीला केवढ्या थोरल्या आणि किती विचित्र विषयसंपत्तीच्या प्रेमालिंगनांत दंग झाले आहेत, पहा. त्यांचा नित्यानित्याविषयींचा विवेक जागृत झाल्याला आज सुमारें ५०० वर्षें झाली. इतक्या अवधींत त्यांनी पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंच महाभूतांसंबंधीं अपूर्व आणि अश्रुतपूर्व असे शोध लाविले आहेत; जल, वायु, अग्नितेज या शक्तींस अथवा मनुष्यानें शोध केला असतां स्वरूपतः प्रकट होणाऱ्या या भूतत्रयाच्या देवतांस, प्रसन्न करून घेऊन मानवी प्रपंचांतील प्रचंड कामें त्यांच्या कडून घेऊं लागले आहेत, पृथ्वीच्या उदरांत शिरून ह्या लोकांनी तेथील बहुत रत्नें बाहेर काढलीं आहेत, इतकेंच नव्हे तर पृथ्वीला जन्मून किती वर्षें झालीं असतील, या ज्ञानाचाही त्यांनी सपाटून शोध चालविला आहे. रामायणांतील चौदा-चौकड्यांचें राज्य करणारा, देवदेवतांस बंदीत टाकणारा, अत्यंत उग्र पण एकनिष्ठ तपश्चर्येनें व सशास्त्र गायनानें शंकरास संतुष्ट करणारा जो राजा रावण, त्याकडे हजारों देवता गृहकृत्यें करण्यास लाविल्या होत्या असें म्हणतात. पण त्या कविकल्पित आणि ह्मणूनच अतिशयोक्तिपरिप्लुत काव्य वर्णनालाही मागें सारून सद्यःकालीं पाश्चात्यांनीं अग्नि-वरुणांकडे ओझ्यांच्या व माणसांच्या गाड्या व जहाजें ओढण्याचें व गिरण्या चालवून हजारों चात्या व माग एकदम चालविण्याचें काम दिलें आहे, इंद्राचें वज्र ह्मणून काम करणारी विद्युद्देवता आज मित्तीला संदेशवाहकाचें म्हणजे डाकवाल्याचें व ट्राम सारख्या गाड्या ओढण्याचें काम करित आहे, सूर्याकडे चित्रें काढण्याच्या कामाची नेमणुक झाली आहे, वायु देवता पिठाचीं जातीं चालविणें, बागेस पाणी शिपणें, पंखे व झोंपाळे चालविणें इत्यादिकाचें काम जलदेवतेच्या किंवा विद्युद्देवतेच्या साहाय्यानें करित आहे. अशीं अनेक नव्हे अनंत कामें देवदेवतांकडे सोंपवून तिकडील मनुष्यप्राणी मानवी सुखामध्यें यत्किंचितही कमी-पणा न आणितां मानवी श्रमाचें गुरुत्व कमी करावें, पण कार्याचें गुणमान वरच्या म्हणजे श्रेष्ठ प्रतीचें असावें, अशा योजनेमध्यें गुंतला आहे. त्याचप्रमाणें तिकडील लोकांनीं मानवी

शरीराची, मनाची व शीलवृत्तीची अंतर्बाह्य रचना कशी आहे, आदिकालीं कशी होती, भविष्यकालीं कशी असेल याचा व मानवी कुटुंबाच्या निरनिराळ्या समाजांची अधिभौतिक, अध्यात्मिक व अधियाज्ञिक स्थिति कशी होती व ती कसकशी उत्क्रांत होत आली आहे, तिचा ओघ कोणत्या मार्गानें जाणार यांचा शोध लावण्यासाठीं मोठमोठाले तपोनिधी तपश्चर्या करित बसविले आहेत! गणित, तर्क, व्याकरण इत्यादिकांमध्यें आमचे लोक एकदां बिनीवाल्यांचें काम करित असत. पण तो मनु पालटून हल्लींच्या पाश्चात्य ऋषींनीं या मानसिक शास्त्रांमध्ये अतर्क्य प्राविण्य मिळवून एका गणिताच्या जोरावर व पदार्थविज्ञानाच्या व दर्शनानुशासनाच्या साहाय्यानें सूर्यचंद्रमंगलादि स्वपरावलंबी तेजोराशींचें वजनमाप, त्या त्या लोकांवरील भूरचना, अंतरिक्षस्थिति इत्यादि चमत्कारिक माहिती हुडकून काढिली आहे! ज्या देवदत्त तत्त्वज्ञानावर व धर्मावर आम्ही पौरस्त्य आर्य आजपर्यंत डौल मारित होतो, त्या तत्त्वज्ञानाच्या वर्तुळा जवळ जवळ पाश्चात्य तत्त्वज्ञ-येऊन पोहोंचले आणि आम्ही लवकर जागें झालों नाही तर तत्त्वज्ञान शिकविण्याचें आमचें आचार्यत्व लुप्त होऊन आम्हांस केवळ 'आचारीपणाचा' च धंदा शिल्लक उरेल की काय, अशी भीति बाळगण्याचीं कारणें उत्पन्न झाली आहेत. पण आम्हासच हंसावयास नको; प्रत्यक्ष निसर्ग देवीलाही आपलें विविध घटनापटुत्व आतां संभाळूनच ठेविलें पाहिजे. मानवी शरीरांतील अनेक रस मानवी कृतीने उत्पन्न करावें, ही महत्वाकांक्षा युरोपियन विश्वामित्रांनी मनांत धारिली आहे आणि ही आकांक्षा व तदवश्यक योग आणि ज्ञान ही त्रयी जर अखंड काम करित राहील तर बावीसाव्या किंवा तेविसाव्या शतकांतील स्मर्यमाणपुरुषाचे नुसतें संगमरवरी पुतळेच न राहतां जिवंत पुरुषच किंवा अजरामर पुरुष प्रतिकृतीच स्मारक स्वरूपानें उभ्या राहतील असा सुमार दिसतो!

वरील संपत्तिसमृद्धीने, ज्ञानसमृद्धीनें, बलसमृद्धीने व क्रियासमृद्धीनें मानवी विषयसुखांत कांहीं जास्त भर पडली, यांत शंका नाही. ह्याचप्रमाणें मानवी मनाची व शीलाची रचनाही सुसंस्कृत झाली आहे, असे म्हटलें पाहिजे. तथापि मुक्तीमध्यें मिळणारें जें दुःखविन्मुख सुख किंवा अज्ञानशून्य ज्ञान अथवा विकाररहित अविकार्य शांति, ह्यांचा मात्र लाभ या समाजास आजच्या स्थितींत होणें शक्य नाहीं. जावत्कालपर्यंत इंद्रियादि प्रचोदक मनोवृत्तींचें तोंड बहिर्मुख आहे, अंतर्मुख नाहीं, जोंपर्यंत निवृत्तिमूलक प्रवृत्तीचा उगम झाला नाहीं, जोंपर्यंत आत्मज्ञान म्हणजे अद्वैतज्ञान झालें नाहीं, सारांश जोंपर्यंत 'मीच ब्रह्म आहे' असा बुद्धीचा निश्चय होऊन सत्त्वशील वृत्तीच्या ज्ञानबलक्रियेंत अवतीर्ण झाला नाही, जोंपर्यंत राममय वृत्ति झाली नाही, तोंपर्यंत ही सवाई रावणी संपत्तीही मोक्षदृष्टीनें व्यर्थच होय. पहा कीं, सुखविषय पुष्कळ वाढले किंवा विषय उत्पन्न करण्याचीं साधनें मुबलक झालीं, तरी तीं तीं सुखें घेण्याला व त्या त्या साधनांचा उपयोग करण्याला जी बुद्धि, जें बल, जी इच्छाशक्ति अवश्य हवी, ती सर्वांस सारखी कोठून मिळणार! ज्ञान, बल आणि क्रिया यामध्यें नेहमीं वैचित्र्य राहणार; कारण यांची

घडला पूर्वजन्मींच्या कर्म—संचयानुरूप व्हावयाची. या पूर्वसंचितावर किंवा पूर्वजन्मावर तुमचा विश्वास असो वा नसो, 'ईश्वर आहे व तो न्यायी आणि व्यवस्थित आहे,' इतक्या गोष्टी गृहीत घेतल्या आणि प्रत्येक कार्याला योग्य असें कारण असावें लागतें, हा अनुभव, जिवंत ठेविला म्हणजे प्रत्येक जीवाच्या शरीरमनाची ठेवण त्याच्या पूर्वजांच्या व पूर्वजन्मींच्या संचितावरून ठरते असें मानावयास पाहिजे. येथेंही जीवास स्वातंत्र्य आहे. पण हा विषय निराळा असल्यामुळे त्याचा विचार येथें नको. मला हें दाखवावयाचें आहे की, साधनसंपत्ति सारखी असली तरी निश्चयाने जीवाची ज्ञानबल-क्रिया ही त्रयी सारखीच असते, असें नाही. अर्थातच उच्चनीच भाव उदयास येतो. मत्सर उत्पन्न होतो. तामसी कृत्ये अवतीर्ण होतात. दुःख जन्मास येते. युरोपमध्ये बहुधा प्रत्येक राष्ट्रांत क्रांति उत्पन्न करणाऱ्या अराजक पथाचे जे बंड माजले आहे, मजूर आणि भांडवलवाले, यांच्यामध्यें जो रणसंग्राम गर्जू लागला आहे, गरीब आणि श्रीमंत यांच्यामध्यें तंटा लागला आहे, 'आजपर्यंत कुलीन लोकांकरितां राज्य होते, आतां आमच्या करितां राज्य चालवावयास हवें' ही जी अनाधिकारी लोकांनी ओरड चालविली आहे, श्रीमंतां-वरच करांचा बोजा असावा असे जे गरीब लोकांचें मागणे आहे, या सर्वांचा इत्यर्थ काय आहे? इत्यर्थ हा की, साधनें विपुल असली तरी स्वार्थबुद्धि जिवंत आहे व कोणतेंही साधन करून स्वार्थाची सिद्धी करावयाची हा उद्देश जिवंत आहे, तोपर्यंत समाजांत कांहीं लोक दुःखी राहतील व ते लोक सर्व समाजाचे जीवित दुःखमय करतील. तेव्हां कर्म मात्र करण्याचे आपले कर्तव्य आहे, फलदाता परमेश्वर आहे; परमेश्वर करील ते न्याय्य आणि ह्मणून मला मान्य असले पाहिजे; हा समज प्रबळ होईल तेव्हां समाजांतील सामाजिक दुःख नष्ट होईल. पण हा समज म्हणजे अद्वैताचे पूर्णज्ञान आणि परमेश्वराची सात्विक भक्ति यांच्या साहाय्यानें मात्र उत्पन्न होणारा होय. असो; अशी निवृत्तिमूलक प्रवृत्ति उद्भवत नाही तोपर्यंत साधनसंपत्तीच्या वैपुल्याबरोबरच असमाधानाचें बीज वाढत जावयाचें हे ठरलें आहे. आमच्या इकडे 'ठेविले अनंतें तैसेंची राहावें। चित्तीं असो द्यावें समाधान ॥' ही तुकोबाची योग्य उक्ति अतिरिक्त व अविवेकी विश्वासानें बाणली गेली आहे. तसेंच नैसर्गिक संपत्तीचें वैपुल्यही आमच्या देशांत रगड आहे. तथापि आमच्या देशांत दुःख आहेच! शास्त्र निवृत्तिमूलक प्रवृत्ति मागतें तर आह्मी शास्त्राच्या पुढे जाऊन मूर्तिमंत निवृत्तीचा, समाधानाचा आश्रय करितों! कर्मानें बंध होतो, ह्मणून आम्ही कर्माचाही त्याग केला; तथापि आमच्या मागचें तापत्रय सुटत नाहीं हें काय? याला उत्तर एका व्यावहारिक म्हणीनेंच देतों. 'चणे आहेत तर दांत नाहींत!' ही आमची स्थिति आहे. ईशदयेनें तात्त्विक अद्वैतज्ञान आमच्या येथें अवतीर्ण होऊन आह्मां लोकांस समाधानाची गुरुकिल्ली लाधली ही गोष्ट आमच्या संचितानुरूप उत्तमोत्तम झाली. ईश्वराच्या अनुग्रहानें आमचा देश, येथील हवा, पाणी, जमीन, वृक्षसृष्टि, जीव-सृष्टि, पर्वत, नद्या इत्यादि अनेक रत्नांची दिव्य जोड आह्मांस मिळाली आहे. चारी खंडांतील उत्तम उत्तम चिजा एका जागीं असल्यामुळें हा हिंदुस्थान

देश म्हणजे सर्व जगाचें 'उत्कृष्ट पदार्थ संग्रहालयच' झाला आहे हेंही खरें. ह्याचप्रमाणें आमची बुद्धीही पहिल्या प्रतीची आहे, हे मागील महापुरुष व हल्लीचे महापुरुष व त्यांच्या बुद्धीचे वैभव आणि विलास पाहिले असता वाटते. ही गोष्ट सुद्धा स्पृहणीयच आहे. शेवटीं, राजसी अगर तामसी वृत्तींचा अतिरेक करावा, दुसऱ्यास सतावून होरपळून सोडावें असेंही आमचे शील नाहीं. इतक्या सर्व गोष्टी अनुकूल आहेत खऱ्या. पण एक गोष्ट नसल्या-मुळे आमचा संसार व आमचा परमार्थ हीं दोन्हीं बिनसलीं. एखादी नवयौवना त्रिभुवन-सुंदरी बत्तीस लक्षणांनी युक्त आहे, पण कपाळी कुंकू नसेल तर त्या बिचारीचें तारुण्य व सौंदर्य मातीच्या मोलानेंही जात नाहीत, त्याप्रमाणे आमची स्थिति झाली आहे. **आह्मांला कर्म करावयास नको आहे!** कर्मविपाकाच्या सूत्राचा अर्थ कळला नाही ह्मणून ह्मणा, आमची नैसर्गिक संपत्ति पुष्कळ असल्यामुळें कर्म करण्याची जरूरी नव्हती ह्मणून ह्मणा किंवा हवेमध्ये दुबळेपणा आणण्याचे सामर्थ्य आहे ह्मणून ह्मणा, **आह्मांला कर्म करण्याची हौस नाहीं हें बरीक खरें. आह्मी कर्म करित नाहीं, ह्मणून आह्मांला जीवापाड काम करावें लागते!** कर्म करावे लागलेंच तर आह्मी शंकरा-चार्यांच्या कामासारखीं बुद्धीचीं कामे व शिवाजी महाराजाच्या सारखी कर्तृत्वाचीं कामें लीलेनें उठवून देतो, व देऊं. अद्यापिही आमची बुद्धि व कार्यशक्ति मूलतः कायम आहेत आणि त्याना आह्मी वहिवाटूं लागलो ह्मणजे ती पाश्चात्याबरोबरीची होतील हें खरें, पण आह्मांला काम करण्याची हौस नाहीं, हें त्याच्यापेक्षा जास्त खरें आहे. 'देवा-सारखा स्वस्थ बैस' असें आमच्या आयांचे सांगणें आह्मास आहे व 'आतां हे काम संपेल केव्हां आणि मी **स्वस्थ** होईन केव्हां?' हे आमचे देवाजवळ किंवा यजमाना-जवळ किंवा स्वतःशीं मागणे आहे. 'मा ते संगोऽस्त्वकर्मणि' (कर्म करण्याविण स्वस्थ नको राहू!) हे भगवद्वचन काम करावयास सांगत असतां, कामाशिवाय जीवाचा एक क्षणही जाणे शक्य नाहीं असा निसर्गाचा नियम असताही कर्माविरुद्ध गीता–सांख्यांनी ओरड केली ह्मणून, कापिल–सांख्यांनी ओरड केली ह्मणून, बौद्धांनी ओरड केली म्हणून-आह्मी कर्म करावयाची हौस, कर्म करण्याविषयींचा उल्हास टाकून दिला आहे.- काम करावयास नको ह्मणून आह्मी कर्मकर्त्या पुरुषांना व राष्ट्रांना 'राजस' असे तुच्छता-दर्शक नांव योजून ठेविले आहे. काम करावयास नको म्हणून आह्मी आपणास 'साधे' असें उच्चतादर्शक उपपद धारण करितो. कर्मबद्धक आहे व ते संसारांत घालिते ही आमची ओरड कायम ठेवण्याविषयीं आम्ही सदैव तक्षकाप्रमाणे दक्ष असतो. शिवाय, कामाची हौस नसल्यामुळे आमची कामे बहुधा ज्ञानशून्य असतात. या ज्ञानशून्यत्वामुळे व उल्हासाभावामुळें आणि स्वस्थ बसण्याच्या अनावर हौसेमुळे आम्हीं उठविलेली कामें सामान्यतः तिसऱ्या किंवा चवथ्या प्रतीचा असतात. अर्थातच या कर्मफलानें आमचा रोजचा गुजारा होण्याची मारामार पडते; ह्मणून आम्ही संपत्तीच्या माहेरघरी असून शंखाप्रमाणें भिकारी राहतो व पोटाची खळगी भरण्यासाठी व लज्जेचें संरक्षण करण्याकरितां 'धडुत पांघरुण' घेण्यासाठीं आह्मांस अष्टौप्रहर काबाडकष्टाची कामें करावीं लागतात; यामुळेंही

आमची कामाची हौस अगदींच कमी झाली आहे. हौस कमी म्हणून काम कमी, काम कमी म्हणून दारिद्र्यकृपा, या कृपेमुळे अज्ञान, अज्ञानामुळे कामाचा जास्त बोजा व काम जास्त म्हणून हौस कमी, असे हे कर्मविपाकाचे चक्र आम्ही फिरवीत बसलों आहों! या चक्रविभ्रमांमध्यें आमचे शील आम्ही विसरलों. आता आम्ही पराकाष्ठेचे मत्सरी, पराकाष्ठेचे स्वार्थी आणि मतिविकाराचे पराकाष्ठेचे दास बनलों आहों. चित्त-शुद्धि नाहीं म्हणून आमची मोक्षवार्ता ही संपल्या सारखीच झाली आहे. एवंच एक कर्माच्या हौसेची व आमची फारकत झाली आहे म्हणून आमच्या जवळ उत्तमोत्तम तात्त्विक ज्ञानाची संपत्ति, उत्तमोत्तम धर्ममार्ग, व उत्तमोत्तम नैसर्गिक व मानासिक संपत्ति असतांही आम्ही पराकाष्ठेचे अज्ञानी आणि पराकाष्ठेने दरिद्रि झालो आहों. सारांश मोक्षाची हौस नसल्यामुळे पाश्चिमात्य लोक मोक्षास मुकले व परंपरेने सांसारिक सुखास आचवले व आम्हांला कर्माची हौस नसल्यामुळे आमचा संसार दुःखमय झाला व परंपरेनें आम्ही मोक्षमार्गापासून भ्रष्ट झालो, इतकेंच नव्हे तर सोन्यासारखा आमचा धर्म त्यालाही आम्ही आंचवलो! तरी पण काही धर्म समजुतास 'हाच आमचा सनातन धर्म' असें नाव देतो व त्या समजुतीचा धोंडा गळ्याशी बांधून आम्ही भवसागर पार पडण्याची तयारी करित आहोत! असो कांही ईशकृपा पाश्चात्यांन्यावर आहे म्हणून प्रवृत्तीच्या पाठीमागे धांवत असतां निवृत्तीचे मार्ग केव्हा केव्हा त्यास उपलब्ध होतात व आमच्यावरही परमेश्वराचा अनुग्रह आहे म्हणून ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम इत्यादि कर्ते धर्मसुधारक व हेमाद्रि, शिवाजी, बाळाजी विश्वनाथ, रामचंद्र नाळकंठ, बाळाजी बाजाराव, माधवराव, रामशास्त्री प्रभुणे व नानाफडणीसादि कर्ते राज्यसुधारक आमच्या येथे उत्पन्न होऊन कर्मोल्हासाचे रोपटे लावून जातात. पुन., असेंही म्हणता येईल की, पूर्व आणि पश्चिम यांचा हिंदुस्थानात जो संगम ईश्वरेच्छेने व ईशकृपेनें झाला आहे त्या संगमाचा ईशसंकेत असा दिसतो की, पौरस्त्य आर्यांची निवृत्तिप्रीति पाश्चात्य आर्यांच्या अंतःकरणात उत्पन्न व्हावी आणि पाश्चात्य आर्यांच्या कर्मोल्हासाचे बीज पौरस्त्यांचे मनोभूमीत उत्तम रीतीनें रुजावें आणि उभयतांसही निवृत्तिमूलक प्रवृत्तीचें व प्रवृत्तिमूलक निवृत्तीचें फल मिळून उभयतांची संसार यात्रा परमार्थपर व्हावी म्हणजे उभयतासही प्रेय आणि श्रेय यांचा लाभ होऊन इहपर कल्याणप्रदमंगल उभयतांच्या पदरीं पडावे. याप्रमाणें मुक्त होण्याची इच्छा असेल तर इहपरलोकीं समाधान राहून मोक्ष मिळेल. मोक्ष म्हणजे दुःखविरहित सुख असे प्रारंभीच मी म्हटलें आहे. ह्याचप्रमाणें मोक्ष म्हणजे अज्ञान-विरहित ज्ञान होय आणि विकारविरहित अस्तित्व होय. फलाची आशा ठेविली नाही आणि कर्तृत्वाचा अभिमान धरिला नाहीं म्हणजे दुःखशून्य सुख मिळतें. कर्म करणें हेच सुख आहे; यातूनच फलवासनेनें उत्पन्न होणारा शोकमोह व कर्तृत्वाभिमानामुळे उत्पन्न होणारें सुखदुःख या उभयतांस [illegible] आणि निष्कारण विहित कर्म करण्यास आरंभ केला व ह्या आरंभाला माझा परमेश्वरी अनुग्रह उत्तम प्रकारचा असतो अशी श्रद्धा असली म्हणजे उत्तम समाधान असतें. उपनिषदांच्या, ब्रह्म-

सूत्रांच्या, गीतेच्या, ह्या तिन्ही ग्रंथावरील आचार्यभाष्यांच्या आणि ज्ञानेश्वरीच्या साहाय्यानें व गुरूच्या उपदेशानें श्रवणमनन निदिध्यासाची दृढ संवय लागून ब्रह्मचिंतन अखंड श्वासोच्छ्वास लागले म्हणजे ज्या ज्ञानांत अज्ञानाचा एक कणही नाही, ज्या ज्ञानाच्या प्रकाशवंत ज्योतीनें सर्व अज्ञानाचा नाश होऊन तें नामशेषही राहत नाहीं, ज्या ज्ञानरूपी साधूच्या भेटीनें अज्ञानालाच ज्ञानस्वरूप प्राप्त होतें, तें ब्रह्मात्मैक्य–ज्ञानविज्ञान प्राप्त होतें. विषयज्ञानाचा असा अनुभव आहे कीं, ज्ञान एकपट वाढलें तर अज्ञान शतपट वाढतें; पण आत्मज्ञानाचा, तत्त्वज्ञानाचा असा नियम आहे कीं, एकदां आत्मज्ञानविज्ञान झालें म्हणजे सर्वत्र ज्ञानसमुद्र ओतप्रोत व घनदाट सर्वत्र पसरला आहे, असें वाटते, नव्हे असें होतें. 'माझें व तुझें' असें भान जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत विकार, विकृति, विपरिवर्तन, परिभ्रमण, हें चालावयाचेंच. दृश्य, दर्शन आणि द्रष्टा, ज्ञेय, ज्ञान आणि ज्ञाता, ही त्रयी अथवा अस्मत्प्रत्ययज्ञान व युष्मत्प्रत्ययज्ञान हें द्वैत जोंपर्यंत आहे तोंपर्यंत अस्मताचा (Subject) युष्मतावर (Object) व युष्मताचा अस्मतावर संस्कार होऊन मायेचे म्हणजे मिथ्या ज्ञानाचे म्हणजे संसाराचें कार्य म्हणजे विकार्यत्व निरंतर राहतें. परमज्ञानी श्रीशुकाचार्य श्रीजनकराजाचे भेटीला गेले तेव्हां त्यांनी राजास सेवकाहाता निरोप सांगून पाठविला कीं, 'मी आलों आहें म्हणून सांग.' 'गांठोडे खालीं ठेऊन मग राजसभेत या' असें राजाचें प्रत्युत्तर आलें. आचार्यांजवळ खालीं ठेवण्यासारखे कांहींच नव्हतें म्हणून पुनः तोच निरोप पाठविला व पुनः तेंच प्रत्युत्तर आलें. याप्रमाणें तीनचार हेलपाटे सेवकानें खाल्ले. पुढें पूर्णज्ञानी राजा द्वाराजवळ आला आणि आचार्यांस वंदनपूर्वक म्हणालाः "तें 'मीं' चें बिऱ्हाड टाकून द्या!" तेव्हां आचार्य समजले. सारांश 'मीपणा' नाहासा केला कीं, विकाराचें राज्य संपतें. याप्रमाणें दुःखाची आत्यंतिक निवृत्ति, ज्ञानरूपता व अस्तिरूपता म्हणजे ब्रह्मज्ञानविज्ञान होय. हें प्राप्त झालें, आपले आपल्यास मिळालें, विसरलें होतें त्याचें पुनः स्मरण झालें, अज्ञानाचा एक ढग आला होता तो नाहीसा झाला म्हणजे स्वस्वरूपाचा अधिगम होतो, जीवकार्य संपतें, कृतकृत्यता होते, समजावयाचे ते समजतें, मोक्ष मिळतो. मोक्ष मिळवावयाची इच्छा मात्र पाहिजे. ही मुमुक्षा आमच्या मोक्षगडाचा चवथा दरवजा होय. यांतून आंतील प्रदेश पाहिला, आंत जाऊन गुरूच्या आश्रयानें व साहाय्यानें श्रवणमननाचा धडाका सुरू केला, म्हणजे परोक्षज्ञानाला अपरोक्ष साक्षात्काराचें स्वरूप येते. हाच मोक्ष. येथें जन्ममरण, कर्माकर्म, ज्ञानाज्ञान संपतें. देह आहे तोंपर्यंत हा पुरुष विहित कर्म करितो, परोपकार करितो, भजनपूजन करून इतरांस करावयास लावितो, ध्यानचिंतन करून इतरांकडूनही करवितो आणि देहपातानंतर ब्रह्मीब्रह्म होऊन जातो!

आतां यानंतर उपनिषदांवर व उपनिषदांचे हस्तद्वय (१) ब्रह्मसूत्रें आणि (२) भगवद्गीता, यांवर भाष्यें लिहून पंथप्रवर्तक जे आचार्य झाले, त्यांच्या विचारांत कोठें कोठे साम्य आहे त्यां स्थलांपैकीं कांहीं स्थलांचा निर्देश करावयाचा व उपसंहाराची

आटपा आटप करावयास लागावयाचे येवढेंच कार्य उरलें आहे. पण हें कार्य हातीं घेण्याच्या अगोदर एका सामान्य समजूतीचा निर्देश करून माझी वाणी शुद्ध व्हावी एत-दर्थ त्या समजूतीचा विस्तार करितों.

## हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हन्ति न बध्यते

भगवंतांनीं अठराव्या अध्यायांत सर्व गीताशास्त्राचा उपसंहार केला आहे, हें आतां जगद्विश्रुतच झालें आहे. या उपसंहाराला आरंभ करण्याचे अगोदर ह्मणजे १३ व्या श्लोकांपासून पुढें कांहीं श्लोकापर्यंत कर्मसाधनें व कर्मोपाधि यांची मीमांसा भगवंतांनीं चालविली आहे. या कर्म-मीमांसेंत भगवंतांस असें सांगावयाचें आहे कीं, केवळ आत्मस्वरूपावर जे लोक कर्म-कर्तृत्वाचा आरोप करितात ते लोक अजाण होत. आत्म-स्वरूपाचा कर्मकर्तृत्वाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नसतो, व संबंध असणें केव्हांही शक्य नाहीं.' हें सिद्ध करण्यासाठीं भगवान् सांगतातः 'ज्या आत्मस्वरूपामध्यें केव्हांही अहंता ( परिच्छिन्न स्वरूपाची-संकुचित स्वरूपाची-जाणीव ) नसते, जेथें कर्मविपाकाच्या योगानें बुद्धीवर बरावाईट संस्कार होण्याचा संभवच नाहीं, त्या स्वरूपाच्या हातून-अथवा हातून कमचें, साक्षित्वानेंच कां ह्मणाना ?-या सर्व लोकांची हत्या झाली, तथापि दुसऱ्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें तें आत्मस्वरूप कोणाचीही हत्या करित नाहीं, आणि सर्व लोक हे मुळांत परब्रह्मस्वरूपच असल्यामुळें कोणाची हत्याही होत नाहीं. हन्ता नाहीं व हत्या नाहीं ह्मणून ब्रह्मस्वरूपाला केव्हांही बंध नाहीं.' हा भगवन्मताचा मथितार्थ आहे, असें मला वाटतें.

पण आमच्या इकडे सांप्रदायिक वेदांती ह्मणून जे आपल्यास ह्मणवितात, ते या पदांचा अर्थ निराळा करितात. ज्या पुरुषाला ब्रह्मज्ञान झालें, तो या जगांत कसेंही वागला तरी, त्या वागण्यापासून त्याला बंध प्राप्त होत नाहीं, असाच या शब्दावलीचा अर्थ आहे, असें ते जोरानें प्रतिपादितात. योगवासिष्ठांत व त्रिपुरारहस्यांत 'चुडालाख्यान' आहे, तेथेंही आपल्या नवऱ्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान होऊन कितपत शांति प्राप्त झाली आहे हें पहाण्यासाठीं केवळ विश्वयोषितेस साजेल असें आपलें वर्तन नवऱ्याच्या दृष्टीस पडलें असतांनाही आपल्या पतीच्या शांतीचा भंग होत नाहीं, असें जेव्हां ब्रह्मज्ञ चुडालेनें पाहिलें, तेव्हां तिची खातरी झाली, असा कथाभाग वर्णिला आहे. ह्याचप्रमाणें जड-भरताची गोष्ट, रंगनाथ स्वामींची गोष्ट, मुक्ताबाईची गोष्ट इत्यादि गोष्टींचा आधार घेऊन ते असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करितात कीं, आत्मज्ञानविज्ञान झालेला पुरुष काय वाटेल तें करो, नीतीच्या सर्व नियमांस धाब्यावर बसवो, वर्णाश्रमाच्या आचारविचारांचे जे कांहीं नियम आहेत, त्यांना जाळून त्यांची राखरांगोळी करो, उपासनेचें, उपास्याचें व उपा-सकांचें मातेरें करो, पंचमहापातकांसारखीं पातकें करो, तो वरील कृत्यांनीं बद्ध होणें

शक्यच नाहीं. माझ्या समजुतीनें हा अतिशयोक्तीचा अर्थ आहे व हा केवळ प्ररोचना करितां ह्मणजे लोकांचें लक्ष इकडे लागावें ह्मणून घातलेला आहे. एक 'राम' नाम घेतलें ह्मणजे सकल पातकांचा संहार होतो, अजामिळानें मरतांना आपल्या नारायण नामक मुलाला हांक मारिली, त्या पुण्याईनें तो महाचांडाल पापी उद्धरून गेला इत्यादि भक्ति पंथांतील गोष्टींचा उद्देश ज्याप्रमाणें सामान्य मनुष्याचे मनही भक्तीकडे ओढावें असा असता, त्या सारखाच कांहींसा हा प्रकार आहे. ज्ञानविज्ञान झालेला पुरुष सुख दुःखांच्या कल्पना टाकून देतो, सुखाचा पाऊस पडला किंवा दुःखाचे पर्वत येऊन कोसळले तरी तो सुखानें उल्लसित होत नाहीं किंवा दुःखानें अतिखिन्न होत नाहीं, हें कबूल आहे. त्याचप्रमाणें 'निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः' (त्रिगुणातीत जो ब्रह्ममार्ग म्हणजे ब्रह्मस्थिति त्या मार्गातील विद्वान् पुरुष विधिनिषेधांच्या चक्रांतून बाहेर पडतात. अमुक गोष्ट करावी, किंवा दुसरी गोष्ट करूं नये हा भेदाभेद त्यांच्या येथें नाहीं विधिनिषेधांचा अम्मल केवळ सुखदुःखाला वश असणाऱ्या जीवांपुरतांच असतो. ह्या सुखदुःखाच्या साम्राज्यांतून जे बाहेर पडले, ज्यांना सुखदुःखें स्पर्शच करूं शकत नाहींत, त्यांच्या पुढें बिचारे विधिनिषेध, गोगलगाय होऊन जातात. सारांश विधिनिषेधांची सत्ता यांच्यावर चालत नाहीं.) हें आचार्यांचें म्हणणेंही वावगें नाहीं. कल्पनासृष्टीचा जो स्वामी झाला, ज्याच्या कल्पना प्रत्यक्ष सृष्टिदेवतेलाही वंद्य होऊन जो सृष्टीचीं रहस्यें आपल्या वाणीप्रतिभेनें प्रकट करितो, ज्याच्या भाषाप्रभुत्वापुढें प्रत्यक्ष सरस्वती देवीची नैसर्गिक भाषा-रमणीयता निस्तेज होते, ज्याची काव्यरचना भारताचार्याला अनुसरण करावी असें वाटतें, त्या कल्पनाचतुर; भाषापति, रचनाकुशल कविमुकुटमणीला काव्याचे नियम बांधित नाहींत, व या नियमांना तोही जुमानित नाहीं हें खरें आहे. शिवाजी सारख्या, नेपोलियन सारख्या, वाशिंग्टन सारख्या विभूतींना सामान्य पुरुषांचे नियम लागूं पडत नाहींत हे कांहीं खोटें नाहीं. हाच न्याय लागू केला म्हणजे ब्रह्मात्म्यैक्याची ज्याला पूर्ण ओळख झाली, ब्रह्माशिवाय दुसरें ज्याला चिंतनच नाहींसें झालें, स्वतःच्या सुखदुःखाचे विचारही जेथून अस्तंगत झाले, मानापमानाचें 'गोंवे' ज्यानें पार फेकून दिले, त्या पुरुषानें शेंडी केवढी ठेवावी, वैश्वदेव केल्याशिवाय अन्न ग्रहण करूंच नये कीं काय, अन्नाचें ग्रहण केव्हां व कोठें करावें, इत्यादि **जातिसंरक्षणाचे** नियम पाळले नाहींत, तर त्याच्या हातून दोष होत नाहींत, असें मुख्यतः म्हणण्याचा हेतु आहे. शून्यलब्धीपर्यंत ज्यानें गणिताचें अध्ययन केलें, त्याला 'एकी एकी एक' हा पाढा जसा घोकीत बसावयास नको, व्याकरणाचीं सूत्रें रचणाऱ्या पाणिनी 'महर्षींना' ज्याप्रमाणें 'रामो हरिः' ची संथा घेण्याचें कारण नाहीं, न्यायासनावर बसून न्याय देणाऱ्या न्यायमूर्तींला ज्याप्रमाणें 'सदोष मनुष्य वध' म्हणजे काय हें कलम घोकीत बसावें लागत नाहीं, प्रसिद्ध भिवा सुतारासारख्या किंवा प्रसिद्ध राजा रविवर्मा सारख्या स्वयंभू चित्रकाराला 'रंग कसे कालवावे व कोणत्या प्रमाणांत मिळवावे' याची यादी ठेवावयास नको, त्याचप्रमाणें ब्रह्म

पुरुषास स्वतःसंबंधीच्या सुखदुःखाला उत्पन्न करणारे जे विधिनिषेध आहेत, त्यांची संथा घेण्याचे किंवा त्या नियमांप्रमाणें वागण्याचे कांहीं कारण नाहीं. हे सर्व ठीक आहे. पण याचा अतिरेक करून वेदांती पुरुषाने व्यभिचार केला, मातृपितृपुत्रहत्या केली, एखाददुसऱ्या घराला आग लावून आळीच्या आळी फस्त करून टाकिली, व आपल्यां-तील जे कर्ते पुरुष आहेत त्यांच्या विरुद्ध खोट्यानाट्या गप्पा अधिकाऱ्यांस जाऊन सांगि-तल्या, सारांश समाजसंरक्षणाचे जे नियम आहेत ते त्याने मोडले तर त्याला त्यांपासून बद्धकता प्राप्त होत नाहीं, असा विशेष अर्थ काढण्याचा जो आग्रह दिसतो, तो आग्रह अवास्तव आहे असें दिसतें. प्रथमची शंका अशी आहे की, लाखो लोकांपैकी ज्या एकाला मात्र ब्रह्मज्ञानाचा गड्डा सांपडतो, तो विहित कर्म, विहित उपासना व विहित योगाभ्यासानें साध्य झालेल्या श्रवणमनन निदिध्यासाने मात्र ब्रह्मपदाजवळ पिपीलिका मार्गाने गेलेला असतो. जन्मजन्मांतरीच्या सत्कर्माने, सदुपासनेने व सज्ज्ञानाने ही कमाई गुरुप्रसादाच्या जोरावर केली असते. अशी संवय ज्या पुरुषाला लागली, जन्मजन्मांतरीं ज्याच्या हातून सात्विक आचरण होत गेलें, पुण्याईच्या जोरावर ज्याला सत्कुलांतच जन्म प्राप्त झाला, त्या पुरुषाला ब्रह्मज्ञानविज्ञानाची जोड लाधल्याबरोबर त्याच्या हातून 'भलतेंसें' कर्म होईल, अशी कल्पना करण्याचें मुद्दां संभवत नाहीं. पाणिनीने कधा 'रामांत' असा सप्तमीचा संस्कृतात प्रयोग केला आहे, किंवा तानसेनाने कधीं सकाळच्या प्रहरीं 'बिभास' रागावरील ताना घेण्याला आरंभ केला आहे, किंवा रविवर्म्याने विशाल पुरु-षाच्या चित्राला **नथ** घालण्याचा प्रयत्न केला आहे किंवा कालीदासाने कधीं शकुंतलेच्या कोमल मुखांतून कपालकुंडलेला साजे अशी कर्कश वाणी काढली आहे, असा प्रकार कधीं तरी संभवेल काय? हा विचार कल्पनागम्य तरी आहे का? ह्या वरील गोष्टी पूर्वोक्त पुरुषा-कडून होणे म्हणजे बर्फाने घरे जाळण्या पैकीच चमत्कार आहे. सारांश सुमत्या संवयीच्या जोरानेंच ब्रह्मज्ञ पुरुष अन्यपंथानें जाणार नाहीत. दुसरी शंका अशी की, या पुरुषाचें कर्म संपते तेव्हा ज्ञान प्राप्त होतें. कर्तृत्वाचा अभिमान सुटल्याखेरीज व कर्मफलाची वासना नष्ट झाल्या खेरीज ब्रह्मज्ञानविज्ञान होणे शक्यच नाहीं. तेव्हा कर्तृत्वच जेथें संपलें तेथे '**ब्रह्मज्ञानें** अमुक गोष्ट **केली**' असें म्हणण्यांत काय तात्पर्य आहे? ब्रह्मज्ञाच्या हातून कांहींच होत नाहीं; कारण करायाचें असें त्याला कांहींच राहिलें नसतें. असें जर आहे तर **ब्रह्मज्ञानें 'व्यभिचार' केला** या म्हणण्याचा अर्थ तरी काय? माझ्या समजु-तीनें या वाक्याला अर्थच नाहीं 'विस्तवाचा सडा घालून मी अंगण गारेगार करून सोडिलें' हें वाक्य जसें अर्थशून्य आहे नव्हे, अनर्थवाचक आहे, त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञासंबंधी वरील वाक्य होय. ब्रह्मज्ञानें लोकांचा उद्धार केला हे वाक्य जितकें अप्रशस्त आहे, तितकेंच त्यानें लोकांचा घात केला, हें वाक्य अप्रशस्त होय. ब्रह्मज्ञ 'कांहीं करित नाहीं' असे म्हणावयाचें आणि त्याचवेळीं व त्याच मुखानें 'ब्रह्मज्ञाने अमुक पातक केलें' असें म्हणावयाचें म्हणजे आप-णच आपल्या वाक्यांचा व्याघात करण्याचें महापातक तरी करावयाचें किंवा ज्यास आपण उपदेश करितों, त्यास कोणत्याही प्रकारची अक्कल नाहीं, असें आपण समजतोसें

दाखवावयाचें आहे ? पण या दोन्ही गोष्टी शक्य नाहींत. परस्परविरोधी विचार आपल्यास फार दिवस कोणी बोलूं देणार नाहीं, व एक दोन वेळ बोलूं दिलें तरी कित्येक शहाणे पुरुष आपल्या विरोधी विचारांचा जाब आपल्यास विचारतीलच विचारतील. आतां त्या ब्रह्मज्ञाच्या हातून ह्मणजे 'त्याला नकळत कांहीं अनीतीची गोष्ट झालीच तर त्याला त्याबद्दल दंड नाही,' असें म्हणणें असेल तर मला इतकेंच ह्मणावयाचें आहे कीं, कोणतीही गोष्ट आपण केली किंवा आपल्याला करावी लागली, किंवा आपल्या हातून झाली, तर त्याबद्दल इहलोकीच्या नैसर्गिक ह्मणजे ईशनिर्मित नियमांप्रमाणें त्या गोष्टीचा परिणाम आपल्यावर किंवा समाजावर झालाच पाहिजे. विस्तवावर कोणीही पाय ठेवो, मूल असो, मोठा बापय्या असो, किंवा ब्रह्मज्ञ असो, किंवा तो जाणून ठेवो वा नकळत पडो त्याचा पाय भाजलाच पाहिजे. पाय भाजल्यावर लहान मूल ओरडेल बापय्या पायाला झटका देईल! ओरडणार नाही तो कदाचित्; पण मुलाप्रमाणेंच त्याला दुःख होईल. ब्रह्मज्ञ पुरुष पायाला झटका देईल कदाचित्, पण ओरडणारही नाहीं, किंवा त्याला दुःखही होणार नाहीं. परंतु त्याची कातडी भाजल्यावांचून किंवा त्याच्या पायाला फोड आल्यावांचून राहणार नाही. याचप्रमाणें ब्रह्मज्ञ जी जी काय कृत्यं किंवा अपकृत्यें करील म्हणजे त्याच्या हातून त्याला नकळतहीं कृत्यापकृत्यें होतील त्याच्याबद्दल त्याला म्हणजे त्याच्या शरीराला शारीरिक-व मानसिक कृत्य असेल तर मानसिक-दंड होईल. नकळत गुन्हा झाला असतां राजा किंवा समाज कमी शिक्षा देतो, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञाला राजा म्हणजे समाज अथवा समाजपति कमी दंड करील व यमाजीभास्कराच्या दरबारांत खडानूखडा चौकशी होत असते, तेथेंही त्याच्या लिंग शरीराला जे काय शारीरिक व मानसिक शासन व्हावयाचे असेल ते होईल. म्हणजे एतावता आम्हां सामान्य पुरुषांना जे निग्रहानुग्रहाचे नियम लागूं असतात, तेच त्यालाही लागतात. त्याच्या आमच्यांत फरक इतकाच की, हे नियम त्याच्या अपराप्रकृतीपर्यंत मात्र जाऊन पोहोंचतात आणि 'अपराप्रकृति म्हणजेच मी' असा मला मायेच्यामुळें व्यामोह असतो ह्मणून माझ्या अपराप्रकृतीलाच वस्तुतः निग्रहानुग्रह होत असतो तरी तो 'दंड मला होत आहे,' तें बक्षीस 'मला मिळत आहे' असें अज्ञानानें मला वाटतें. इतका फरक उभयतांमध्ये आहे आणि असावयाचाच. तात्पर्य हें कीं ब्रह्मज्ञ पुरुषाकरितां कांही निराळे नियम नाहींत. ब्रह्मज्ञ म्हणजे ब्रह्म झालेला होय. ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' हें वाक्य जगत्प्रसिद्ध आहे. ब्रह्माला मोक्ष नाहीं व बंध नाहीं, हें सर्वसंमतच आहे. ब्रह्मज्ञ पुरुषाच्या हातून कृत्य घडतें म्हणजे त्याच्या शरीराकडून तें कृत्य होते व त्या कृत्यानुसार शरीराला दंड किंवा बक्षीस मिळतें. ब्रह्माला कोणी शिक्षा, दंड करूं शकतच नाही. अर्थात ब्रह्मदृष्टीनें ब्रह्मज्ञ पुरुष ब्रह्म कांही करितही नाहीं व त्यामुळें बद्धही होत नाहीं; व त्याला त्या बंधन-मोक्षाबद्दल खंती किंवा उल्हासही वाटत नाहीं. पापपुण्याचीही त्याला खबर नसते, हें ठीकच आहे. इतका भाग मलाही कबूल आहे. पण याचा अर्थ केव्हांही असा होतो

नये की, ब्रह्मज्ञ पुरुषानें वाटेल तो अनाचार करावा, असा त्याला परवाना मिळाला आहे! ईश्वराचे घरीं असा परवाना सुटणें शक्यच नाहीं. असा, ही वाक्ये ग्रथित करण्याचा उद्देश इतकाच दिसतो की, कर्मकांडामध्ये जे वर्णाश्रमाचे नियम सांगितले आहेत, त्या नियमाप्रमाणे परमहंस परिव्राजकाचार्यांनें अरण्यात वा एकांतांत सुद्धां चाललेच पाहिजे, असें नाहीं. तो वर्णाश्रमात नसतो म्हणून त्याला वर्णाश्रमाचे नियम लागत नाहींत, किंवा तो समाजांत राहत नसेल तर त्याला समाजाचे नियमही लागू नयेत पण वर्णाश्रमात राहावयाचे, समाजातही राहावयाचे, पण वर्णाश्रमाचे किंवा समाजाचे नियम पाळावयाचे नाहात, हें चालावयाचे नाहीं उघडच आहे, वर्णाश्रमात व समाजात राहिल्यानें वर्णाश्रमापासून अथवा समाजापासून होणारे लाभ जर आपल्यास हवे आहेत, तर तेथें राहून त्या त्या संस्थाचे नियमही पाळणे म्हणजे बंधन प्राप्त करून घेणे अत्यंत अवश्य आहे. लाभहानि ही दोन्हीं ज्याची नष्ट झाली तो ब्रह्मस्वरूपच झाला मग त्याला परवानाही नको, किंवा स्वातंत्र्यही नको. त्याच्या शरीराला निग्रहानुग्रह झाला तरी त्याला त्याची क्षिति नसल्यामुळे तो स्वत बद्ध-मुक्त काहींच होत नाहीं एवच जाणून बुजून अन्याय करण्याचा परवाना ब्रह्मज्ञास मिळत नाहीं व मिळावयाचाही नाहीं

## सर्व विसंवादी आचार्यांचा सुसंवाद.

आमच्या या आर्यधर्मात वेदान्तज्ञानविज्ञानाचा उद्घोष करणारे जे अपौरुषेय ग्रंथ आहेत त्यात मुख्यत: उपनिषदाचा समावेश होतो, हे सत्य अनेक वेळा सांगण्यात आले आहे. जीव, जगत आणि ईश्वर या त्रयाचे स्वरूप, लक्षण, परस्पर संबंध, जगन्निर्माणाचा हेतु, जीवाचें अंतिम साध्य व त्याचे कर्तव्य, इत्यादि विचार या उपनिषदांत केव्हा स्पष्टपणानें तर केव्हा अस्पष्टपणानें आलेले आहेत. हा अस्पष्टपणा दूर व्हावा आणि उपनिषदामध्ये केव्हा केव्हा विरोध आहेसा सामान्य वाचकांस भास होऊन त्याचा जो घोटाळा होतो तो नाहींसा करावा एतदर्थ गीता व ब्रह्मसूत्रें याचा अवतार झाला. गीतेमध्येही तिसऱ्या, चवथ्या, पाचव्या, बाराव्या, सतराव्या, अठराव्या अध्यायाच्या आरंभीं व तिसऱ्या, सहाव्या, अकराव्या अध्यायाच्या मध्ये अर्जुनाचा घोटाळा झाला म्हणून त्याने प्रश्न केले आहेत, ब्रह्मसूत्रातही अनेक वेळ पूर्वपक्ष उभा करून म्हणजे शंका उद्धृत करून तिचे निवारण केलें आहे. इतका प्रयास श्रीमद्व्यासांनीं केला आहे, तथापि त्याच श्रीमद्भगवद्गीतेचा अर्थ विशद करणारे व सूत्रांची व्यवस्था लावणारे जे भाष्यकार झाले, या उभय ग्रंथावर व उपनिषदावर 'विद्वन्मान्य' भाष्यें केलीं म्हणून ज्यांस आचार्य पदवी प्राप्त झाली त्या भाष्यकार आचार्यामध्ये तरी एकवाक्यता कोठें आहे? 'नानापंथ व नानामतें। झालीं जगीं असंख्यात॥ आतां कोठें भाव धरूं। देवा चित्त कोठें स्थिरूं?॥' असा प्रश्न प्रत्येक विचारी पुरुषास येतो. त्याचें समाधान स्थूलमानानें

करण्यासाठीं आणि अत्यंत अंतरगांतील एक दोन गोष्टी सोडून दिल्यावर सर्वत्र ऐकमत्य आहे, असें दाखविण्याचा हा माझा प्रयत्न आहे. मागें एका भागांत या ऐकमत्याचें दिग्दर्शन केलें आहे; पण त्यापेक्षां जास्त विस्तारानें व जास्त सुलभ भाषेंत हें विवेचन होईल तर बरें, अशा कांहीं सन्मान्य हितचिंतकांच्या आग्रहपूर्वक सूचना आल्यावरून मी हा प्रयत्न करित आहे. इकडे वाचकांचें सावधान चित्त असावें अशी प्रार्थना करून व प्रो० देसाई, इंदूर कॉलेज यांनीं 'वैदिक तत्त्वसिद्धांत' या किंवा अशा नांवाचा जो एक सुविचार परिप्लुत निबंध लिहिला, त्याचा मला या कामीं फार उपयोग झाला, ह्याचप्रमाणें 'गीतासमन्वय' या नांवाचा कलकत्त्याकडे एक अल्पसा सुंदर ग्रंथ झाला आहे, त्याचाही मी प्रमुक्तमनानें उपयोग करून घेतला, हें सांगून आतां प्रकृत कार्याला आरंभ करितो. येथे निरनिराळ्या आचार्यांच्या मतांचें भाषांतर शब्दशः नाहीं, तात्पर्य समजण्यापुरतें अर्थशः आहे हें समंजस वाचकांस सांगावयास नकोच आहे.

## केवळ कर्माची अनुपयोगिता.

श्रीमच्छंकराचार्यः—

शारीरिक, वाचिक व मानसिक अशी तीन प्रकारचीं कर्में आहेत. हीं कर्में श्रुतिस्मृतिविहित असतील तर तीं कर्में धर्मपर होतात. 'आतां या नंतर धर्माचा विचार करावयास आरंभ करूं या' असें जैमिनी ऋषींनीं पूर्वमीमांसेचा विषयप्रवेश करितांना प्रथम सूत्रांत ह्मटलें आहे. हा धर्मविचार करित असतां त्यांस अधर्माचाही विचार करावा लागला. उघडच आहे कीं 'अधर्म कोणता' हे विचार करून ठरविलें ह्मणजे अधर्मात्मक कर्में कोणतीं व त्यांचा त्याग कां व कसा करावयाचा हे समजतें. असो: याप्रमाणें अनर्थ व दुःख उत्पन्न करणारीं अधर्मकृत्यें टाकावयाचीं व इष्टफल म्हणजे सुख उत्पन्न करणारीं धर्मकृत्यें करावयाचीं असें ठरतें. या फलांचा उपभोगही कायावाचामन ह्या करवीं आपण घेतों; म्हणजे ब्रह्मदेवापासून तो सांबापर्यंतचे सर्व चराचर भूतजात घेतात. हा उपभोग कमीजास्ती सुखकारक होतो....असो; याप्रमाणे अज्ञानवश जे लोक (जीव) आहेत त्यांस शरीरादि धारण करणें भाग पडून सुखदुःखांचा कमीजास्तपणा उत्पन्न करणारीं धर्ममूलक अथवा अधर्ममूलक कर्में ह्या जीवांच्या हातून घडतात. श्रुतिही सांगते कीं, 'कर्मसंचयामुळें शरीर धारण करणाऱ्या जीवांला सुखदुःखांचा सहवास कर्मानुसार व्हावयाचाच' (छांदोग्य ८।१।२।१). एवंच **केवळ कर्मच जोंपर्यंत घडत** आहे, मग तें कर्म वैदिक असो; वा लौकिक असो,—तोंपर्यंत मोक्षस्वरूप मिळणें अशक्य आहे. (पहा शां. भा. ब्र. सू. अ. १ पाद१ सू. ४) प्रत्येक क्षणाला नाश पावणारें केवळ कर्म, कालांतरानें उत्पन्न होणाऱ्या फलाचें जनक होईल हे म्हणणें योग्य नाहीं. कारण अभावात्मक कारणापासून भावात्मक कार्याची उत्पत्ति होणें अशक्य आहे. तरी पण नाश पावणारें कर्म, स्वतःचें फल उत्पन्न करून मग नाश पावतें व कालांतरानें कर्मकर्ता

त्या फलाचा उपभोग घेतो, असें म्हणावें तर तेंही जुळत नाहीं: कारण फल भोक्त्याचा संबंध उत्पन्न होण्यापूर्वीच फल निर्माण होतें, हे म्हणणें युक्तीस धरून नाहीं. अदृष्ट फल उत्पन्न होतें तें अचेतन असतें म्हणून त्याच्या एकट्याच्या हातून कांहीं होणें शक्यच नाहीं. (पहा शां. भा. ब्र. सू. अ. ३ पा. २ सू. ३८). उदाहरणार्थ 'स्वर्गकामोयजेत' हा विधि घेतला तर कसें होतें, तें पाहूं. यज्ञ कर्म संपल्यानंतर काळानें स्वर्ग मिळतो अशी सरणी आहे. पण संपलेलें जें कर्म तें स्वतः देहपातानंतर मिळणारा स्वर्ग कसा उत्पन्न करील? उत्पन्न करणें शक्यच नाहीं. आतां यज्ञ केला असतां कांहीं एक फल उत्पन्न होतें व देहपातानंतर तें फल स्वर्ग देतों असें म्हणावें तर देहपातानंतर स्वर्ग मिळविणाऱ्या पुरुषाचा संबंध सद्यःकालीं फल उत्पन्न करणाऱ्या कर्माशीं कसा जुळणार? हेंही जुळत नाहीं. बरें अदृष्ट उत्पन्न होतें, असें म्हणावें, तर तें बिचारें अचेतन आहे. कोणी तरी योजक असल्याशिवाय नुसतें कर्म, किंवा कर्मफल किंवा अदृष्ट कांहीं एक करूं शकत नाहीं. मग मोक्षाची गोष्ट लांबच राहिली.

श्रीमद्रामानुजाचार्यः—

कठोपनिषदाच्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या वल्लीत २३ व्या मंत्रांत असें म्हटलें आहे की, 'वेदाचें पुष्कळसें प्रवचन करून, पुष्कळसा बुद्धिपूर्वक विचार करून, किंवा जन्मभर श्रवण करून, आत्मस्वरूपाचा लाभ व्हावयाचा नाहीं.' सारांश नुसत्या श्रवण-मनन-निदिध्यासानें ब्रह्मपदाची प्राप्ति होणार नाहीं....नुसतीं विहित कर्में जरी केलीं तरी मोक्षप्राप्ति होणार नाहीं. कारण सत्कर्म केलें तरी 'मी हें कर्म केलें' हा अभिमान व 'मला ह्या कर्माचें फल मिळालें पाहिजे' ही वासना हीं उभयतां ज्ञानविरोधी आहेत व तीं स्वरूपज्ञान होण्याच्या मार्गांत येतात; म्हणजे मोक्षज्ञान उत्पन्न होऊं देत नाहात....श्रुतिही असेंच सांगतें कीं, व नुर्नास्य यागादिकांचें फल स्वभावतः संकुचित आणि कालभंगुर असतें. या फलाच्या योगानें सर्वव्यापि व त्रिकालाबाधित जें ब्रह्म त्याचा लाभ होणें शक्य नाहीं. (रामा. भा. ब्र. सू. अ १ पाद. १ सू. १.) याचप्रमाणें या आचार्यांचे तिसरा अध्याय, पाद ४ मधील प्रथम प्रथम सूत्रांवरील भाष्य वाचिलें असतां व याच अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील शेवटचीं सूत्रें घेतलीं असतां किंवा 'किं प्रजया करिष्यामो वेदानुवचनेन वा' या श्रुतिमंत्रावरील स्पष्टीकरण पाहिलें असतां कोणासही हें कळल्यावांचून राहणार नाहीं कीं 'केवळ कर्मानें मोक्ष प्राप्त होणें शक्य नाहीं,' असेंच यांचें मत आहे.

श्रीमध्वाचार्यः—

हे जे सर्व लोक म्हणजे निरनिराळीं निवास-स्थानें आहेत, या सर्वांचा निरीक्षणपूर्वक विचार केला असतां या उपभोग-स्थितीसंबंधानें वैराग्यच उत्पन्न होतें. 'जें स्वयंभू आहे व विकारशून्य असून नित्य आहे, तें उत्पन्न झालेल्या म्हणजे

सादिकर्मापासून व विनाश पावणाऱ्या म्हणजे सांत कर्मापासून केव्हांही उत्पन्न होऊं शकत नाही. हा नियम अबाधित आहे. ब्रह्म सत्य आहे. बाकीचे, म्हणजे तदितर सर्व, असार व्यर्थ आहे. यासाठी विरक्त झालेला पुरुष सद्गुरूला शरण जातो. उघडच आहे की नित्य स्वयंभूरूपी जो मोक्ष तो कर्मानें केव्हांही सिद्ध व्हावयाचा नाही, असे जाणून तो विरक्त या कर्मसंचित संसारासंबंधे उद्विग्न होतो. (म. भा. १ पा. १ सू. १.. ) कर्मामध्यें केव्हांही स्वतः फल उत्पन्न करण्याचे सामर्थ्य नसते. कारण ते स्वतः अचेतन आहे. सामान्य फलाची जर ही अवस्था तर मोक्षनामक जे नित्यफल, त्याचे कर्तृत्व केवळ कर्माकडे कसले येणार? (अ ३. पा. २ सू ४१) कर्म हे एक ज्ञानाचे उपांग आहे उत्तमप्रकारची मुक्ति हवी असेल तर तेथे कर्माचा काही एक उपयोग नाही. याच अध्यायाच्या चवथ्या पादांतील प्रारंभींची १३।१४ सूत्रे, माध्व भाष्यासहित काळजीपूर्वक वाचिली असतां कर्म हे कारणरूपी अचेतनसाधनाप्रमाण निर्बल आहे. त्याचा योजक अमन्यावांचून नुसत्या कर्माला काही एक करितां येत नाही, अर्थातच सर्वांचे इष्ट जे मोक्ष नामक साध्य ते देतां येत नाही; असा या आचार्याचा अभिप्राय पडला आहे, असे दिसून येईल.

श्रीमद्वल्लभाचार्यः—

'जिज्ञासायां सम्प्रवृत्तो नाद्रियेत्कर्मचोदनाम्।' (जाणून घेण्याच्या इच्छेला जो प्रवृत्त झाला आहे त्याने अज्ञानकृत कर्माकडे अथवा अज्ञानी लोकासाठी केलेल्या कर्माकडे आदरपूर्वक बघू नये.) तपादिकाची ब्रह्मज्ञानदृष्टाला अनुपयोगिताच आहे. कारण तपादिकर्म हे ब्रह्म-साधन नव्हे. कर्माच्या अंगी चित्तशुद्धि करण्याचे सामर्थ्य आहे. पण पूर्वमीमांसा केव्हा केव्हा विपरीत बोध करणारी आहे. म्हणून कर्म हेच मोक्षसाधन आहे असे सांगणारी पूर्वमीमांसा व तेथील विचार शुद्ध नाहीत. (अ. १ पा. १ सू. १ ) कांही लोक कर्म व कर्मापासून होणारे अदृष्ट ही दोन्ही स्वयंभुत्वाने फल-साधक आहेत, असे म्हणतात; हे युक्तिबद्ध नाही. कारण अचेतन जे कर्म ते कोणतेही कृत्य घडवून आणण्याला स्वत असमर्थच राहणार. शिवाय, श्रुति जेव्हां जेव्हां फलाचा उल्लेख करिते तेव्हां तेव्हां परमेश्वर फलदाता आहे, असे सांगते. आपला इहलोकीचा अनुभवही असाच आहे की, केवळ कर्माच्या हातून कांही होत नाही. (अ. ३ पा. २ सू. ३७-४२...)ईश्वर. 'न साधुना कर्मणा भूयान्नोएव असाधुना कनीयान्' (परमेश्वर हा साधुकर्म केले असतां मोठा होत नाही किंवा असाधु कर्म केले असतां लहान होत नाही;) जो स्वयंभू आहे तो उत्पन्न झालेल्या लहान मोठ्या धर्माधर्माना किंवा कर्माकर्मांनी लहान मोठा कसा होणार? 'न कर्मणा. अमृतत्त्वमानशुः॥' (कर्मानें केव्हांही अमृतपदवी म्हणजे मोक्ष मिळत नाही. (अ. ३ पा. ४ सू. ८ पहा.)

याप्रमाणे श्रीमच्छंकराचार्यादि चारही आचार्यांच्या भाष्यांचें वरवर अवलोकन केले असतां आपल्याला एक गोष्ट उत्तम प्रकारें नजरेस पडेल की, **'नुसत्या कर्मानें**

**मोक्ष मिळावयाचा नाहीं.**' असे या चोघांही आचार्यांचें मत होतें. दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । कामात्मानः स्वर्गपरा.. क्रिया-विशेष-बहुलां... बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ हे गीतेतील श्लोक मनन पूर्वक वाचले आणि 'एतमेव लोक मिच्छन्तो...पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थाय' 'नास्त्यकृतः कृतेन' इत्यादि श्रुतिवाक्यांवरूनही वरीलच सिद्धांत सुविशद होतो. आतां हे सांगावयास नकोच आहे की, हे चारही आचार्य वेदश्रुतींस व वेदश्रुत्यनुकूल स्मृतींस सन्मान देणारे होते. ह्या आचार्यांमध्ये अतिशय विरोध आहे, अशी आपली कल्पना आहे, व त्यांच्या त्यांच्या शिष्यवर्गांनी हा विरोध इतक्या विकोपास नेला आहे की, या आचार्यांमध्ये कोठे तरी एक-वाक्यता, ऐक्यमत अथवा सुसंवाद असेल असे प्रथम दर्शनी वाटतच नाहीं. यास्तव सर्व विचारी पुरुषांस आग्रहपूर्वक व विनंतिपूर्वक अशी सूचना करण्याचे धाडस करितो की, प्रो० देसाई यांनी जो उद्योग चालविला आहे, त्याचे सकौतुक अभिनंदन करून त्यांना पुढील मार्ग क्रमण करण्यास उत्साह द्यावा म्हणजे त्यांच्याच अनुषंगानें जी मी थोडे विचार सादर दाखविणार आहे ती तात्त्विक साम्यें पुष्कळशा उजेडांत येतील आणि पंथापंथांमध्ये जो उग्र आणि निर्घृण विसंवाद आजला दृग्गोचर होत आहे, त्याचे स्वरूप मृदु व अनुकंपनीय होईल. असो; तुमच्या कर्ममार्गानें केव्हांही सुटका व्हावयाची नाही, सुटका करून घ्यावयाची असेल तर श्रुतिस्मृतिप्रणीत ज्ञानमार्गाचा मात्र आश्रय केला पाहिजे, असे या सर्वांचें मत होतें. केवळ कर्म हे संसारांतील दुःखें सुद्धा नाहीशीं करण्याला व निरतिशय सुख देण्याला असमर्थ आहे या विषयांत केवलाद्वैतवाद्यापासून तो शुद्धाद्वैतवाद्यापर्यंत सर्वत्र रमणीय ऐकमत्य आहे, हे आपण पाहिलेच आहे. आतां मोक्ष मिळवावयाचा असेल तर ज्ञानाचा, परमात्मस्वरूपाच्या ज्ञानाचा, परब्रह्मस्वरूपज्ञानाचा, आपल्यास अवलंब अवश्य केला पाहिजे, या मुद्यावर सुद्धां सर्वत्र ऐकमत्य आहे हें दाखवितो. पण हे मंगलकारी काम हातांत घेण्याच्या अगोदर गीतासमन्वयकाराचा एतद्विषयक अभिप्राय पाहिला पाहिजे होता, असे कोणास वाटण्याचा संभव आहे. ह्या समन्वयभक्तांच्या समाधानार्थ इतकेंच सांगतो की, ज्ञानाचा सुद्धां संपूर्ण ज्ञात्यावरोबर आतांच उल्लेखिलेल्या समन्वयकाराचा सिद्धांत अवतीर्ण करितो. पूर्वोल्लिखित चारही आचार्य ज्ञानवादी आहेत, तेव्हां एकदोन उतारे घेऊन मात्र ही समन्वयता दाखवितो.

## ज्ञानेनैवहि कैवल्यं.

श्रीमच्छंकराचार्य:—

गीतेचा उपोद्घात लिहित असतां आचार्य म्हणतातः या गीताशास्त्राचें उद्दिष्ट संक्षेपानें सांगावयाचे म्हणजे या शास्त्राच्या साहाय्यानें जीवांस निरतिशय सुख मिळावें, मोक्ष मिळावा हे होय. संसारवृक्षाचे सबीज आणि सफल निःशेष

दहन झालें म्हणजे मोक्ष सिद्ध झाला. हा मोक्ष मिळविण्याला सर्व कर्मांचा संन्यास करून आत्मज्ञान **मिळविलें** पाहिजे व तें मिळाल्यावर **विज्ञान होण्यासाठीं मनन, निदिध्यास केला पाहिजे.** 'सांख्यांनीं ज्ञान योगालाच एकनिष्ठ असलें पाहिजे,' असें तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत सांगितलें आहे, त्याचें विवरण करितांना 'शुद्ध ज्ञानापासून मात्र मोक्ष प्राप्त होतो असें सांगण्याचा श्रीमद्गीताशास्त्राचा व सर्व प्रामाणिक उपनिषदांचा अभिप्राय आहे, असें हे आचार्य ह्मणतात.' शिवाय गीता-भक्तांच्या हे लक्ष्यांत असेलच कीं, ६६ वा श्लोक झाल्यानंतर आचार्यांनीं गीतातात्पर्य-भाष्य या नांवाचा निबंध लिहिला आहे, त्यांत 'आत्मस्वरूपाचें विज्ञान होतांक्षणींच मोक्ष प्राप्त होतो, असा सर्व उपनिषदांचा व गीतेचा अभिप्राय आहे.. आत्मज्ञान हेंच काय तें केवल मोक्षाचें साधन आहे, तें ज्ञान झालें तरच मृत्यूचा प्रदेश अतिक्रांत करितां येतो, जन्म मृत्यूचें चक्र चुकण्यास दुसरें साधन नाहीं,' इत्यादि विषय आचार्यांनीं श्रुति, युक्ति व अनुभव ह्यांच्या साहाय्यानें निरुत्तरतः सिद्ध केला आहे. अज्ञानाच्या योगानें भेदबुद्धि उत्पन्न होते ह्मणून व अभेदवृत्ति ही जीवमात्राला स्वाभाविक, स्वयंसिद्ध आहे ह्मणून त्याला ह्मणजे जीवाला आत्मज्ञान झाल्यानंतर तो सहजच अविद्येला, मायेला, भेदबुद्धीला सर्वथा बहिष्कार घालतो, तिला हांकलून देतो आणि अनंत, ज्ञानस्वरूप जो आत्मा, परमात्मा त्याच्याशीं एकस्वरूप होऊन राहतो. ब्रह्म जाणणारा ब्रह्म होतो; ब्रह्म असूनच ब्रह्म स्वरूपाशीं एकात्मक होतो. (पहा ब्र. सू. अ. ३ पाद २ सूत्र २७.)

श्रीमद्रामानुजाचार्यः —

मोक्षप्राप्तीला आत्मज्ञान अवश्य आहे. मात्र आत्मज्ञान झालें म्हणजे तत्पूर्णात कर्म निर्वासनेनें व अनासक्तीनें होते. मनांतून आशा आणि आसक्ति नष्ट झाल्या म्हणजे मन शुद्ध होतें. हे मन शुद्ध झालें व बुद्धि स्थिर झाली म्हणजे आत्मविज्ञान होतें. (पहा गीता अ २. श्लोक ५३) मन शुद्ध होणें म्हणजे मनाचें मनपण नाहींसें होऊन उन्मनी अवस्था येणें आणि बुद्धि स्थिर होणें म्हणजे आशामनीषादि सर्व बुद्धिघटकद्रव्यें नष्ट होणें. सारांश शांकरमतानें जीवबुद्धि नाहींशी होऊन आत्मज्ञानविज्ञान प्रकट होणें होय. हे आत्मज्ञा-नानेंच कायतें होणार ! .' विष्णूचें परम पद जो मोक्ष—ज्ञानी पथिकांचें नित्य विश्रांति-स्थान तो प्राप्त होतो. कोणाला ? आपलें मन स्वाधीन ठेऊन शुद्ध बुद्धीच्या योगानें म्हणजे शास्त्राच्या अध्ययनानें व गुरुप्रसादसाहाय्यानें ज्याची बुद्धि **शुद्ध ज्ञानवती झाली आहे**, तिच्या योगानें जो आत्मचिंतन सदैव करितो त्याला मोक्षप्राप्त होतो. (अ. ३ श्लो. १ ). याचप्रमाणे चवथ्या अध्यायांतील तेहतीसाव्या व पस्तीसाव्या श्लोकांवरील भाष्यही वाचण्याची मी वाचकांस शिफारस करितो. 'जे ज्ञानी आहेत त्यांना मी अत्यंत प्रिय असतो व मला ते अत्यंत प्रिय असतात' (अ. १० श्लो. १६) ज्ञानी ह्मणजे 'आपण भगवंताचे अंग, चिदंग, एकरसत्वानें असून प्रकृतिविरहित जें आत्मस्वरूप तें पाहणारा,'

असा यांचा अर्थ आहे. 'तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति. नान्यः पंथा विद्यतेऽयनाय' ह्या श्वेताश्वतर उपनिषन्मंत्राचा अवतार करून ज्ञान हा मोक्षोपाय आहे असें हे आचार्य ह्मणतात. यांचा अर्थ वर दिलाच आहे. सत्य आणि सम्यग्ज्ञान यांच्या साहाय्यानें ब्रह्मस्वरूप मिळतें हे मुंडकोपनिषदांतील दोन उतारे समर्थ देतात; आणि आपल्या सूत्राच्या भाष्याचे शेवटीं म्हणतात 'ब्रह्मज्ञानाचे' फल अनंत आणि कालाबाधित आहे; ह्मणून ब्रह्मज्ञानाची जिज्ञासा म्हणजे ब्रह्म जाणण्याची इच्छा करूं या म्हणजे ब्रह्मस्वरूपाचा ऊहापोह करूं या. सर्वकाल टिकणारे फल म्हणजे मोक्ष हें या विचाराचें पर्यवसान आहे.

श्रीमन्मध्वाचार्यः—

'तमेव विद्वानमृत इह भवति' (आत्मज्ञानी पुरुष अमर होतो) याची व्याख्या करितांना 'येथें ज्ञानानें मोक्ष होतो' याचा अर्थ असा कीं, 'ईश्वरी प्रसादानें मात्र मोक्ष मिळतो, दुसऱ्या कशानें नाहीं' असें प्रवचन केलें आहे. ईश्वरी प्रसाद ज्ञानीपुरुषांवर (भक्तांवर) मात्र होतो, हें सुप्रसिद्धच आहे...ज्ञानाचें मुख्य साधन श्रवणमननादि आहे, कर्म नव्हे. कर्म परंपरेनें साधन आहे. (ब्र. सू. अ. १ पाद १ सू. १.)...ब्रह्मज्ञान उपनिषद्द्वारा मात्र व्हावयाचें आहे. (ब्र. सू. अ १ पा. १ सू. ५). याचप्रमाणें अ. ३ पा. २ सू. २७ वर व्याख्यान करितांना हे आचार्य श्वेताश्वतरांतील एक मंत्र उद्धृत करितात. (ब्रह्माचें एकनिष्ठ ध्यान, त्याच्याशीं नित्य संयोग आणि तत्स्थिति प्राप्त झाली म्हणजे विश्वमायेची निवृत्ति होऊन मोक्ष मिळतो.) यावर यांच्या शिष्यांनीं व्याख्यान करितांना ह्मटलें आहेः 'दृष्ट्वैव ते मुच्यन्ते (परमात्म्याचें दर्शन झालें कीं, मुक्तिच मिळते). सारांश, यांच्या मतें विष्णु हा परमात्मा आहे. भक्तीनें या परमात्म्याचा प्रसाद होतो. प्रसाद झाला म्हणजे ज्ञान होतें आणि ज्ञानानें मुक्ति मिळते हें स्पष्टपणें यांच्या शिष्यांनीं चवथ्या पादाच्या प्रस्तावनेंत ह्मटलें आहे. आठव्या सूत्रावर व्याख्यान करितांना 'ज्ञानादेवापवर्गः' **(मोक्ष ज्ञानानें मात्र मिळतो.)** असेंही ह्मटलें आहे.

श्रीमद्वल्लभाचार्यः—

ब्रह्मज्ञान केवळ उपनिषदांच्या योगानें मात्र होणारें आहे. (अ. १ पा. १ सू. १; अ. ३ पा. ३ सू. १ पहा) परब्रह्माचीं विश्वरूपें वेदांतश्रुतींनीं सांगितलीं आहेत, असा सूत्रांचा अर्थ आहे. तिसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादांतील आठव्या सूत्रांत कर्माचें अंग म्हणजे ज्ञान नव्हे, **ज्ञान हें मुख्य साधन आहे, पुरुषार्थ ज्ञानानें साध्य होतो,** उपनिषद्वाक्यांनीं आणि अनाशक असें जें कर्म म्हणजे वस्तुतः परब्रह्माचें एकनिष्ठापूर्वक ज्ञानस्वरूपद्वारा चिंतन त्यानें, अथवा ब्रह्मस्वरूप ज्ञानानें आणि ब्रह्मस्वरूप ध्यानानें, ब्रह्मस्वरूपाचा अधिगम होतो, असा यांचा–चवथ्या पादाच्या आठव्या सूत्रावरील व्याख्यानावरून–अभिप्राय व्यक्त होतो.

सारांश ज्ञान हेंच मोक्षाधिगमाचें साधन आहे, असा सर्वांचा अभिप्राय सामान्यत्वानें आहे. मोक्षस्थितीचें स्वरूपाबद्दल वादप्रतिवाद असेल; पण तें मिळविण्याच्या साधनांसंबंधें वाद नाहीं आणि नसावा. कर्मानें मात्र मोक्ष मिळेल असें एक कर्मठांशिवाय कोणीही म्हणत नाहीं. अर्थातच ज्ञानवादी म्हणत नाहीं. त्याचप्रमाणें मोक्षप्राप्तीला ज्ञानाची आवश्यकता नाहीं, असेंही कोणी म्हणत नाहीं. याप्रमाणें सर्व आचार्यांचें या मुद्द्या संबंधानेंही ऐकमत्यच आहे. नुसतें वरवर वाचित गेलें तर या सर्वांमध्यें विरोध आहे, असें वाटेल, प्रतिपक्षी एकमेकांस कसे भेटतात, एकमेकांच्या संबंधानें अनुदार उद्गार कसे काढितात, गौण मुद्द्यांवर एकमेकांचा उणीपुरी, वर्मंमर्में, कशीं काढतात हेंच नुसतें पाहिलें असतां विरोधाला जें भयंकर स्वरूप येईल, तें वाटणें व तें भिणें क्षणभर एका बाजूस ठेऊन मुख्य व प्रस्तुत गोष्टींसंबंधें या सर्वांचे विचार काय आहेत हें पाहिलें म्हणजे सर्वत्र एकवाक्यताच दिसेल. पावसाळ्याच्या प्रारंभीं कृष्णाबाईस येणारें नवीन पाणी निवळूं दिलें म्हणजे तें जसें स्वच्छ आणि निर्मळ दिसतें किंवा कृष्णमेघांनीं आच्छादिलेला चंद्रमा मेघ विरून गेल्यावर आपल्या विलक्षण तेजानें प्रकाशित होतो, त्याप्रमाणें अप्रस्तुत गोष्टींचा त्याग करून मुख्य गोष्टींसंबंधानें या चार पंथप्रपंथप्रवर्तकांचा उद्धारक अभिप्राय एकसारखाच पडला आहे हें समजणेंही आनंदाची व उल्हासाची वार्ता होय. याचप्रमाणें आणखी कांहीं विचारांसंबंधानें आर्यभूच्या तत्त्वज्ञांचें ऐकमत्य आहे कीं काय हें पाहण्याच्या आनंददायी प्रयत्नाला पुनः एकवार लागूं या. मोक्षज्ञान मिळवून घेऊन मोक्षप्राप्ती करून घेण्याला **ज्ञानाची कर्माशीं जोड अवश्य करावी लागते कीं काय** हा प्रस्तुतचा विषय आहे. ब्रह्मस्थिति ही ज्ञानमय स्वरूपाची आहे व ती अनाद्यनंत असून अविकार्य आहे या गोष्टींबद्दल कोठेंच वाद नाहीं. त्याचप्रमाणें जीवाचें मूळचें स्वरूप कोणतेंही असो, तें स्वरूप अनाद्यनंत आहे यासंबंधानेंही कोणामध्यें वाद असण्याचें कारण नाहीं. आतां जीवास जें स्वरूप प्राप्त झालें आहे, तें नाहींसें होऊन त्याचें मूळ स्वरूप त्यास मिळवून द्यावयाचें किंवा त्यानें मूळ स्वरूप मिळवून घ्यावयाचें, हा जो पुरुषार्थ तो ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयानें होतो, किंवा कसें हा वादविषय आहे. आतां या प्रश्नाचा विचार आपले आचार्य कसा काय करितात, त्याची दिशा पाहूं.

## ज्ञानकर्मसमुच्चय अवश्य आहे काय ?

श्रीमच्छंकराचार्यः--

यांचे गीताभाष्य काळजीपूर्वक वाचणाऱ्या विद्वानास सांगण्याची अपेक्षाच नाहीं कीं 'कर्मानें मात्र मोक्ष मिळतो' या दुर्मताचा विध्वंस करण्यासाठीं जसा त्यांनीं यशस्वी प्रयत्न केला आणि नुसत्या कर्मठांचा चर्पटपंजरी नामशेष करून टाकिली, त्याचप्रमाणें 'ज्ञान व कर्म' यांचें साहचर्य केव्हांही असूं शकत नाहीं, हें मत अथवा हा

सिद्धांत स्थापण्याचाही प्रयत्न केला व आपल्या अलौकिक बुद्धिप्रभावानें, विलक्षण परंतु सशास्त्र व साधार वादपद्धतीनें आणि लोकोत्तर भाषाप्रभुत्वानें तो प्रयत्न यशस्वीही केला. गीतेच्या उपोद्घातांत, दुसऱ्या अध्यायावरील भाष्यग्रंथांत अनेक वेळां, त्याचप्रमाणें पहिल्या षडध्यायींतल्या प्रायः प्रत्येक अध्यायांत आणि सरशेवटीं १८ वे अध्यायांतील ६६ वा श्लोक झाल्यानंतर अवतीर्ण केलेल्या गीतातात्पर्यभाष्यांत ह्या विषयांतील प्रमेयांचा उच्चार, पुनरुच्चार आणि पुनः पुनरुच्चार लोकोपकारास्तव अनेक वेळ केला आहे. तेव्हां ' कर्म हें उत्पत्तिविनाशाच्या नियमानुसार वागणारें, कालभंगुर, परिस्थित्यवच्छिन्न स्वरूपाचें असतें, ज्ञान हें षड्विकारविरहित, कालाबाधित व स्वतंत्र स्वरूपाचें असतें; म्हणून ह्यांचें सख्य केव्हांही जमावयाचें नाहीं. ' हें गीतावाचकांस सांगावयास नको आहे. अशाच अर्थाचा उहापोह अ. १ पा. १ सूत्र ४ मध्यें आणि अ. ३ पा. ४ सू. ८–१३ पर्यंत झाला आहे. चवथ्या सूत्रांत शंकराचार्य एक शंका उत्थापित करितातः "ब्रह्माचें प्रामाणिक ज्ञान जरी शास्त्रावरून होते, तथापि तें ज्ञान हें एक साधन आहे आणि शास्त्रानें आचरण्यास आज्ञापित केलेला जो धर्म, त्याला साहाय्य करणारें हें साधन आहे. सारांश वेदामध्यें सांगितलेलें सर्व ज्ञान कर्मांचें अंगभूत साधन आहे. कारण उघड आहे कीं, ' मांडावें काय व सांडावें कोणतें ' हें ठरविण्याचें व ठरविल्याप्रमाणें आचरण करण्याला प्रवृत्त करण्याचें काम शास्त्राचें आहे. शास्त्रांत ज्ञानाचा विषय आहे; तेव्हां कोणतें कर्म करावें कोणतें करूं नये, हें सांगत असतां ओघानें मात्र ज्ञानाचा विषय वेदांत आला; म्हणून ज्ञान हें मुख्य नसून कर्मांचें एक अंग आहे." आचार्य म्हणतात, ही चुकी आहे. ज्ञान हाच काय तो वेदांताचा मुख्य विषय आहे. कर्मकांडांत सांगितलेल्या विधि-निषेधांनीं चित्तशुद्धि होऊन निष्काम कर्माचरण व्हावयास लागलें व गुरूपदेश झाला म्हणजे ज्ञानकांडांतील ज्ञानग्रंथांचे व मंत्रांचे श्रवणमननादिकांचा अभ्यास सुरू होतो. नंतर लवकरच अधिकारानुसार स्वरूपज्ञानाचा बोध होतो; आणि साक्षात्कार झाला म्हणजे कर्मांचा किंवा ज्ञानकर्मसमुच्चयाचा संबंध नाहींसा होऊन ज्ञाता केवळ ' धर्माहून निराळा, अधर्माहून वेगळा, कार्याहून भिन्न आणि कारणाशीं असदृश ' अशा प्रकारचें ' भूतभविष्याहून ' वेगळें असें स्वरूप होऊन बसतो. मोक्षस्वरूप नित्य आहे. मोक्ष प्राप्त झालेल्या पुरुषाचीं सर्व कर्में लयाला जातात. तो आनंदस्वरूप होतो. सारांश येथें कर्माचा गंधमात्रही नाहीं. पुनः हाच विषय याच पद्धतीनें तिसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादांत विस्तृत केला आहे. शरीरी जो जीव आहे तो संसारात्मक म्हणजे जन्म-मृत्युप्रद स्थितीपेक्षां जास्त योग्यतेचा आहे असें या पादाच्या ८ व्या आणि त्या पुढच्या कांहीं सूत्रांत व्यास महर्षींनीं सांगितलेलें आहे आणि शंकराचार्यांनीं मुख्य मुख्य उपनिषदांतील मंत्रांचा अवतार करून त्यांच्या साहाय्यानें ज्ञानस्वरूपी जीवाला स्वरूपसाधनासाठीं व स्वरूपसाध्य झाल्यावर कर्माची अपेक्षा नाहीं, असें सिद्ध केलें आहे. ' पारमेश्वरमेव हि शारीरस्य पारमार्थिकं रूपं ' ( शरीरांत राहणारा जो पुरुष त्याचें पारमार्थिक स्वरूप परमेश्वरात्मकच आहे ) हा यांचा सिद्धांत होय. आणि हें स्वरूप प्राप्त करून घेण्याला

एक ज्ञानच समर्थ आहे; हें यांचें साधन होय. सारांश ज्ञानकर्मांचा समुच्चय यांच्या मतें अशक्य व अनिष्ट आहे.

श्रीमद्रामानुजाचार्यः—

ब्रह्मसूत्र तिसरा अध्याय; ४ था पाद १ लें सूत्रः यामध्यें हे आचार्य म्हणतात कीं, ब्रह्मध्यानानेंच जीवास अतिरिक्त लाभ होतो. पुढें २-८ सूत्रांत 'ज्ञान हें कर्माचें उपांग आहे,' असा पक्ष श्रीमद्व्यासांनींच उत्थापित केला आहे. तदनुसार त्या पक्षाचें विवरण करून ८ व्या सूत्रव्याख्यानांत हे आचार्य म्हणतात. ज्ञान हें स्वरूपतःच जीवाला उपकारक होतें. परब्रह्म हा ज्ञानाचा विषय आहे, हें श्रुतीनें अनेक वेळ सांगितलें आहे. हें ब्रह्म निर्दोष आणि उत्तम गुणांनीं परिपूर्ण आहे. या परिपूर्णाचें ज्ञान झालें म्हणजे ब्रह्मप्राप्ति होऊन अमरत्व मिळतें. सारांश ज्ञानानेंच जीवास पुष्कळ फायदा होतो, हें म्हणणें खरें आहे. याचप्रमाणें १४ वें सूत्राचे व्याख्यानांत हे आचार्य म्हणतातः ज्ञानाची महति वाढावी एतदर्थ कर्म करण्याची श्रुतीनें परवानगी दिली आहे; म्हणजे ज्ञानाचें सामर्थ्य असें कांहीं विलक्षण आहे कीं, ज्ञात्यानें कितींही कर्में केलीं तरी त्या कर्मांचा लेप त्या ज्ञानाचे जोरावर झाल्यास लागत नाहीं. कारण मुंडकोपनिषदांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, जन्ममरणाचें व दुःखाचें कारण जें बरें वाईट कर्म, त्या कर्मांचा क्षय ब्रह्मज्ञानानें होतो. १९ व्या सूत्रांत 'यज्ञोऽध्ययनं दानं' असा तीन धर्मस्कंधाचा विचार छांदोग्यांत आला आहे. त्याचें स्पष्टीकरण करितांना म्हणतात कीं, हीं तीन कार्यें गृहस्थाश्रम्यांचीं आहेत व येथें कर्म हवें हें ठीक आहे. पण त्याच छांदोग्यांत 'अरण्यांत जाऊन जे श्रद्धा व तप आचरितात, अर्थात ज्ञानमार्गाचा अवलंब करितात, त्यांनाही श्रेष्ठ म्हणजे देवयानमार्गाचा लाभ होतो.' यावरून ज्ञानकर्मांचा समुच्चय इष्ट नाहीं हें स्पष्ट आहे. २० व्या सूत्राच्या व्याख्यानांत भाष्यकार म्हणतात कीं, ज्याअर्थी ऊर्ध्वरेते (ब्रह्मचारी) यांनीं ज्ञान संपादन करावें अशी स्पष्ट आज्ञा आहे, त्याअर्थी ज्ञान हें स्वतंत्र आहे व तें स्वयमेव जीवांवर उपकार करायाला समर्थ आहे असें ठरतें. अर्थातच कर्मांचा व ज्ञानाचा संबंध, अंगांगी संबंध अगर सहकारी संबंध, असण्याचें कांहीं एक कारण नाहीं.

श्रीमन्मध्वाचार्यः—

ब्रह्मसूत्राच्या तिसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादांत जो विषय आला त्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं यांनीं जें भाष्य लिहिलें व त्यावर जी व्याख्या झाली आहे, त्यांतही वरील प्रमाणेंच भावार्थ आहे. 'ज्ञानेनैवाप्यते सर्वं कर्मणात्वधिकं भवेत्' (सर्व जें काय मिळवावयाचें आहे याला ज्ञानाची मात्र अपेक्षा आहे. कर्म असेल तर अधिक फल मिळेल, पण त्याची आवश्यकताच आहे असें नाहीं.) (सू.९) या वरील व्याख्याकार 'अतो ज्ञानस्य सर्वपुरुषार्थसाधनत्वादत्यंतापेक्षितं तदितिसिद्धम्' (म्हणून ज्ञानाकडे

सर्व पुरुषार्थांचें साधकत्व येतें आणि ज्ञान पुरुषार्थसाधक आहे म्हणून त्याची अत्यंत अपेक्षा आहे ) ' पठेद्वेदानर्थानधीयीताथ विचार्य ब्रह्म विंदेदितिच कौषारवश्रुतिः ' ( वेद-पठन करावे, त्यांच्या अर्थाचा अध्ययन पूर्वक अभ्यास करावा आणि नंतर विचार करून आणि पुनः विचार करून ब्रह्मप्राप्ति करून घ्यावी. ) ही कौषारवश्रुति संमतिपर उल्लेखितात. १३ व्या सूत्रावरील भाष्याची व्याख्या करितांना 'अर्थस्य धर्मज्ञानद्वारा; मोक्ष-साधनत्वं धर्मस्य ज्ञानद्वारा; ज्ञानस्य साक्षात्' ( अर्थ हा धर्मज्ञानांचे द्वारा मोक्षाचें साधन होतो, धर्म हा ज्ञानद्वारानें मोक्ष मिळवून देतो आणि ज्ञानानें साक्षात् मोक्ष मिळतो.) अर्थातच कर्माची आवश्यकता उरत नाहीं. १४ व्या सूत्राच्या भाष्यांत 'ज्ञानिनो यथेष्टा-चरणा इति' ( ज्ञानीपुरुषाला जे आवडेल तें त्यानें करावें.) असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यानें, अमुकच श्रुत्युक्त कर्म केलें पाहिजे, असा त्याच्यावर कोणाचाही ताबा चालावयाचा नाहीं. सारांश तो कर्मस्वतंत्र झाला. अर्थात् तो वेडेंवांकडें कर्म करणार नाहीं हें सर्वसंमत आहे. ज्ञानस्तुतीसाठीं मात्र असें म्हटलें. 'आत्मन्यैवच संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते' हा श्लोक या आचार्यांनीं उद्धृत केला आहे तो गीतेंतील आहे, हें सांगावयास नकोच आहे.

श्रीमद्वल्लभाचार्यः—

तिसऱ्या अध्यायांतील चवथ्या पादांत व विशेषतः विसाव्या सूत्रांत हाच विषय आहे. 'न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्वमानशुः' 'परेण नाकं निहितं गुहायां विभ्राजते यद्यतयो विशन्ति' ( कर्मानें मोक्ष मिळाला नाहीं, प्रजोत्पादन करून मिळवितां येईना, अर्थ संचय करूनही मोक्षसिद्धि होत नाहीं. त्यागानें मात्र मोक्ष मिळूं शकतो. ) ( तसेच मुक्त जे आहेत ते उत्तम प्रकारच्या लोकात वास्तव्य करित असताही परमेश्वराचा विरह सहन होईना म्हणून भक्तीनें तत्स्वरूपाचें आराधन करितात. ) या श्रुतींवर भाष्य लिहितांना श्रीवल्लभाचार्य म्हणतात कीं येथें त्याग म्हणजे **कर्माचा त्यागच** विहित आहे. शुकाचार्यादिकांनीं कर्मत्याग केला व मुक्त झाले यावरून ज्ञान हें कर्माचें उपांग होऊं शकत नाहीं. ( सू. ९ ) दहाव्या सूत्रांत श्रुतिमंत्र देऊन कर्मत्यागपक्षच श्रेष्ठ आहे, असें ठरवितात. १२ व्या सूत्राचा अर्थ तर वेदाध्ययन करणारानें, मात्र कर्माची चौकशी करावी, ब्रह्मज्ञान्याला कर्ममीमांसा करण्याचें कांहीं एक कारण नाहीं, असाच अर्थ केला आहे. अखंड ब्रह्मज्ञानानें अद्वैतभाव झाल्यावर कर्मभान किंवा कर्मशेषत्वानें ज्ञान आहे, हें भान कसें उत्पन्न व्हावयाचें? आणि ऊर्ध्वरेते जे ब्रह्मचारी किंवा संन्यासी यांस ज्ञानानें मोक्ष मिळतो, असें म्हणणाऱ्या श्रुतीला, अर्थातच 'कर्म हें ज्ञान सहकारी नाहीं,' असेंच संमत असलें पाहिजे. ( सू. १६, १७). आणि सर्वार्थ जाणणारी श्रुति असें कसें सांगेल कीं 'ज्ञानाच्या कक्षे बाहेर असणारें जें, कर्म, त्याच्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नसणारें कर्म करा? अर्थातच सांगणार नाहीं. ( सू. १८, १९ ). याप्रमाणें पुढील सूत्रांतही याच मतांचा म्हणजे मोक्षाची

प्राप्ती करून घेणाऱ्या पुरुषाला ज्ञानविज्ञान झालें म्हणजे झालें, कर्मांची आवश्यकताच आहे, असें नाहीं, असा यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

याप्रमाणें ( १ ) कर्मानें मात्र पुरुषार्थसिद्धि होणें शक्य नाहीं, ( २ ) ज्ञानानें मात्र हा कार्यभाग सिद्ध होईल. आणि ( ३ ) या ज्ञानविज्ञानाला कर्मसहाय्याची कोणत्याही प्रकारें अपेक्षा नाहीं असें सिद्ध झालें. व्यवहार चालविण्यासाठीं इहपरलोकीं विशेष सुखोपभोगाचा लाभ व्हावा एतदर्थ व्यावहारिक, नीतियुक्त व श्रुतिविहित कर्मे करावें; आपण जीवमात्र असलें कर्म नित्य करितों व पुढें आपण करूं व इतर लोक करतील हा प्रश्न निराळा. विषयांचा उपभोग· हाच ज्यांचा मुख्य पुरुषार्थ आहे त्या त्या लोकांनीं व्यवहारादिकांनीं सांगितलेलीं किंवा ठरविलेलीं कर्मे करावीं आणि हीं उपभोगात्मक फलें देणारीं कर्मे कशीं व केव्हां करावीं यांचें ज्ञानही अवश्य संपादन करावें. त्याच्या आड आमच्या हिंदुतत्त्वज्ञांपैकीं कोणताही तत्त्वज्ञ येणार नाहीं. पण उपभोगात्मक सुखाला पुरुषार्थ चिरकाल राहणारा नव्हे, इतकेंच नव्हे तर सुखेच्छेनें मात्र प्रेरित झालेली व्यक्ति किंवा समाज सुखी राहण्याचा योग अवश्य येतोच असाही नियम नाहीं. फार काय सांगावें? सुखलोलुप सुखभक्तांस सुखभोगानें सुख होत नाहीं. हा अनुभव ज्यांस आला आहे किंवा दुसऱ्यांस असा अनुभव येतो, असें ज्यांला उत्तम समजलें आहे, तो पुरुष सुखाच्या मागें न लागतां कांहीं एक पुरुषार्थ मनांत धरून त्याचा एकनिष्ठेनें पाठलाग करितो. सामान्यतः धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ असतात. धर्म, अर्थ आणि काम ह्या सर्वांचें पर्यवसान सुखोत्पादक परिस्थिति उत्पन्न करण्यामध्यें होतें. पण हें सुख निरंतरचें नव्हे, सुख घेणारा जो जीव त्याची अंतर्बाह्येंद्रियेंही शाश्वतचीं नव्हेत, असें अनुभवानें जेव्हां जीवाला समजतें, तेव्हां निरंतरचें सुख व एकात्मक सुखभोक्ता यांचा शोध करावयास हा पुरुष लागतो. या वेळीं अशा वस्तूचें ज्ञान व दर्शन हवें असतें व ज्ञान घेणारीं व पाहणारीं सर्व इन्द्रियें अशीं असावींतशीं त्यास वाटतें कीं, दोन्हीं एक स्वरूपच असतील! हेंच आमचें परब्रह्म होय. व या परब्रह्मक्षेत्राची वाट दाखविणारा एकच वाटाड्या आहे. तो वाटाड्या म्हणजे उपनिषदांनीं प्रसिद्ध केलेला ज्ञानविज्ञानमार्ग होय. उपनिषदें हेंच सांगतात कीं, ज्ञानमार्गानें मात्र मोक्ष मिळेल. उपनिषदांचा हाच अभिप्राय आहे कीं, तत्प्रणीत ज्ञानविज्ञानाचा आश्रय अधिकारानुसार केला असतां मोक्षाला अप्रतिकूल असें सुख मिळेल आणि ऐहिक आणि पारत्रिक सुख वाढविणारा मोक्ष मिळेल. उपनिषद्ग्रंथाचें विचारपूर्वक पारायण झालें असतां ऐहिक व पारमार्थिक वस्तूंचें ज्ञान संवृद्ध होऊन मोक्षमार्ग सुकर होईल आणि मोक्षमार्गाचें ज्ञान झालें म्हणजे ऐहिक आणि पारत्रिक विषयांचें ज्ञान पायाशुद्ध होईल. उपनिषदांचें ज्ञानविज्ञान पूर्वसंप्रदायांच्या साहाय्यानें झालें असतां व्यक्तीची व समाजाची ज्ञानसंबंधीं, नीतिसंबंधीं, धर्मसंबंधीं उत्तरोत्तर उन्नति होत जाऊन आपण पौरस्त्य आर्य इतर आर्यांस व अनार्यांस मोक्षाच्या वाटेला लावूं आणि इतरस्थ समाजांवर आपण

आत्मिक सत्ता चालवूं लागलों म्हणजे आपलें ज्ञान, आपली नीति व आपला धर्म यांची उन्नति होईल. सारांश मोक्षाची वाट दाखविणारा एकच आणि तो उपनिषत्प्रणीत ज्ञान-मार्ग आहे. येथें कर्माचा, अगर धर्माचा साक्षात्संबंध नाहीं. परंपरया संबंध आहे. पण तो ज्ञानभूमिकेच्या योग्यतेहून पुष्कळ कमी योग्यतेचा आहे. येथेंही सर्व आचार्यांचें एकमत झालें ही उत्तमच गोष्ट झाली. याप्रमाणें ज्ञान आणि कर्म यांच्या योग्यतेचा विचार होऊन ज्ञान हें सर्वथा श्रेष्ठ आहे, असें ठरलें.

ज्ञानाच्या साहाय्यानें मात्र जर ब्रह्मज्ञान व्हावयाचें आहे, तर तें ज्ञान तरी कसें संपादन करावयाचें ? ह्या प्रश्नाला उत्तर दिलें पाहिजे. मागें एकदां सांगितलेंच आहे कीं आह्मां आर्यांच्या नव्या व जुन्या दृष्टीनें आमची अशी श्रद्धा आहे कीं, सत्य व त्रिकालाबाधित ज्ञान मिळविण्याचें मुख्य साधन ह्मणजे वेद होत; विशेषतः त्यांतील ज्ञानकांडाचा भाग होय. हें ज्ञानकांड ह्मणजे उपनिषदें. ब्रह्मज्ञान व्हावयाचें तें या उपनिषदांच्या साहाय्यानें. हीं उपनिषदें ईश्वरप्रणीत आहेत आणि ह्मणूनच श्रद्धेय आहेत. या उपनिषदांस अनुकूल जीं प्रत्यक्षप्रमाणें, अनुमानें इत्यादि असतील तीं ज्ञानसंपादनार्थ खुशाल घ्यावीत. मात्र श्रुतिविरुद्ध अथवा श्रुत्याधाररहित जे तर्कवितर्क आहेत, त्यांची मातब्बरी मात्र कोणताही प्रामाणिक जिज्ञासु मानणार नाहीं. असो; तर ह्या उपनिषदांतर्गत ज्ञानासंबंधानें आपले चार तत्त्वज्ञ काय ह्मणतात, तिकडे अंमळसें अवधान देऊन पाहूं.

श्रीमच्छंकराचार्यः—

अध्याय १ पा. १ सू. ४ वर भाष्य लिहिण्याला आरंभ करण्याचे अगोदर कर्मठांच्या शंकेचें निवारण आचार्यांनीं केलें आहे, त्यांत ब्रह्मज्ञान समजून घेण्याला प्रमाणभूत ग्रंथ कोणता याचा विचार ओघानें करावा लागला आहे. आचार्यांनीं सरशेवटीं असा निकाल दिला आहे; "ब्रह्म (ब्रह्मज्ञान) समजून घेण्याला ह्मणजे खरें ब्रह्मज्ञान समजण्याला वेदच प्रमाण आहेत, हें सिद्ध झालें." दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील तिसऱ्या सूत्र-भाष्यांत हे आचार्य म्हणतात; "वर जे आम्ही प्रवचन केलें आहे, त्यावरून सर्व तर्क-ग्रंथांचाही विचार केलासें झालें. आतां हे तर्कग्रंथ केव्हां केव्हां तत्त्वज्ञानाचा विषय सोपा करून देतात, हें खरें आहे. व यांसाठीं आम्ही त्यांचे उपकारबद्धही होतों. पण नेहमीं हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, तत्त्वज्ञान उपलब्ध करून घ्यावयाचा मुख्य व प्रामाणिक उगम म्हणजे वेदवाक्येंच होत; वेदवाक्यांशिवाय तत्त्वज्ञान होणें शक्यच नाहीं. 'ज्याला वेदज्ञान विदित नाहीं त्याला ब्रह्मज्ञानही श्रुत नसतें.' असें तैत्तिरीय ब्राह्मणा-मध्यें म्हटलें आहे. 'तो उपनिषदावरून कळून येणारा पुरुष कसला असतो ? हा माझा प्रश्न आहे.' असें बृहदारण्यक श्रुतींत प्रश्नपूर्वक विचारून विषयप्रवेश केला आहे. वेदांत ज्यांस आधार नाहीं, असें पुरुषकल्पनाजन्य तर्क अप्रतिष्ठित अस-

तात; म्हणजे त्यांना पुरुषकल्पनेखेरीज दुसरा आधारच नसतो. आतां पुरुषकल्पना काय ? एकदां सातच पदार्थ आहेत असें म्हणेल व पुनः तेच पदार्थ १६ आहेत असें सांगेल. केव्हां आरंभवादाचा आश्रय करील, तर केव्हां परिणाम वादालाच श्रेष्ठत्व देईल. तेव्हां या कल्पनाजन्य तर्कवितर्कांचा भरंवसा काय मानावा ! शिवाय हे तर्क सर्व विचारी पुरुषांस मान्य होतात, असें थोडेंच आहे ! पुष्कळ विचार करून कोणी कल्पना काढिली कीं ती केवळ 'स्वकपोलकल्पित' आहे, तिला कसलाच आधार नाहीं, असें दुसरे विचारी पुरुष म्हणावयाचेच. त्यांचें खंडन तिसऱ्यांनीं करावें. चवथ्यांनीं ह्यांचें प्रतिखंडन करावें, असा क्रम चालून शेवटीं अनवस्था प्राप्त होते. सारांश वेदांचा किंवा प्रत्यक्षादि प्रमाणांचा पाठिंबा नसेल तर सर्व तर्क 'व्यर्थतर्क' होतील. अर्थातच व्यवहारांत तर्काला महत्व आहे, तर्काशिवाय व्यवहार अशक्य होईल हें खरें; पण हे व्यावहारिक तर्क तरी प्रत्यक्ष प्रमाणांच्या अथवा प्रत्यक्ष प्रमाणांच्या आश्रयानें चालणाऱ्या अनुमानादि प्रमाणांच्या साहाय्यानें चालतील तेव्हां. सारांश तर्काला कोणत्या तरी प्रामाणिक प्रमाणाचा आश्रय हवा असतो. हा व्यवहार झाला. आतां मोक्षासारख्या, ब्रह्मज्ञानासारख्या, अतिगंभीर, जीवाचें व ज्ञानाचें सार्थक्य ज्यावर अवलंबून राहणार अशा विषयांचा विचार तर्कांच्या साहाय्यानें करीनच म्हटलें तर ते ते तर्क सुदृढ अशा पायावर उत्पन्न झाले असले पाहिजेत. ब्रह्मस्वरूपाचें लक्षण ठरवितांना प्रत्यक्षाचा उपयोग नाहीं; कारण ब्रह्माला रूपरसगंधादि कांहींच नाहीं. ब्रह्म हें इंद्रियांस अगोचर असल्यामुळें ब्रह्मज्ञान होण्याला प्रत्यक्ष प्रमाणाचा उपयोग होत नाहीं. अनुमानाचा कांहीं उपयोग व्हावा असें म्हटलें तर तेंही शक्य नाहीं. कारण अनुमान प्रमाणाचा भर *हेतु, लिंग, परामर्श, व्याप्ति इत्यादिकांवर असावयाचा. पण ब्रह्म ही जगद्विलक्षण वस्तु असल्यामुळें, एकाकी, अनाद्यनंत, इंद्रियागोचर असल्यामुळें येथें हेतु, लिंग परामर्श अथवा व्याप्ति, यांचा उद्भवच होत नाहीं. एवंच अनुमानालाही जागा नाहीं. ब्रह्म एकच वस्तु आहे म्हणून उपमानप्रमाण येथें लंगडें पडतें. शब्द प्रमाणाशिवाय बाकीच्या प्रमाणांची अशीच वाट लागणार. तेव्हां वेदासारख्या ईश्वर प्रणीत शब्दावर जर तर्काची इमारत रचिली असेल तरच तर्कशास्त्राचा उपयोग होणार आहे. एवंच श्रुतींशिवाय ब्रह्मज्ञान होणें शक्य नाही हें ठरलें. केवळ धर्म कोणता व अधर्म कोणता हें जर शास्त्राशिवाय म्हणजे वेदाशिवाय कळत नाहीं, तर ब्रह्मविषय वेदाशिवाय कसा समजेल हें कळतच आहे! धर्म आणि अधर्म या दोन्ही गोष्टी अतींद्रिय आहेत. ( पहा सू. २५ पा. २ अ. ३ ) ब्रह्मवस्तु धर्मापेक्षां व अधर्मापेक्षां अत्यंत विलक्षण आहे व धर्माधर्मांच्या पलीकडची आहे. अर्थातच ती वस्तु समजून घेण्याला श्रुतिज्ञानच करून घेतलें पाहिजे. पुनः श्रुतिसुद्धां दुरून व अस्पष्टपणानेंच

---

* पर्वतो वन्हिमान् । धूमात् । यत्र धूमस्तत्र वन्हिः । यथा महानसे । तथा अयं । तस्मात् तथा । हे अनुमानाचे अवयव आहेत. धूमात् हा हेतु, धूम हे लिंग, पर्वत धूमवंत आहे हा परामर्श आणि जेथें धूम तेथें वन्हि, ही व्याप्ति होय.

ब्रह्म दाखविणार!! पण इतका तरी अधिकार काय तो एकट्या श्रुतीलाच आहे. तात्पर्य ब्रह्मज्ञान केवळ श्रुतिगम्य आहे."

श्रीमद्रामानुजाचार्यः—

अध्याय १ पाद २ च्या उपोद्घातांत या आचार्यांनीं म्हटलें आहे कीं, 'वेदवेदांतांचें तात्पर्य एक पुरुषाचें, म्हणजे पुरुषोत्तमाचे, सकलगुणमंडित परमेश्वराचें ज्ञान, परब्रह्म-ज्ञान, प्रकट करण्यामध्यें पर्यवसित होतें. सारांश परब्रह्माचें ज्ञान हें सर्व वेदवेदांतांचें सार आहे. या वेदवेदांताशिवाय दुसरा कोणताही मार्ग नाहीं कीं, जो आपल्यास परब्रह्माचें ज्ञान करून देईल. तर्क इत्यादि सर्व प्रमाणें परब्रह्मापर्यंत पोहोंचतच नाहीत. तात्पर्य परब्रह्म हें वेदैकवेद्य आहे.' 'वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः' असें भगवंतांनीं गीतेमध्यें म्हटलें तें वेदांचा अभिप्राय जाणूनच म्हटलें आहे. 'शूद्राला ब्रह्मज्ञान होणें शक्य नाहीं, कारण त्याला वेदज्ञान नसतें आणि वेदज्ञान नसलें म्हणजे ब्रह्मज्ञान होणें अशक्य असतें' असें यांचें मत पहिला अध्याय, तिसरा पाद आणि ३२ वें सूत्रांत प्रकट झालें आहे. 'केवळ मानवी तर्कावर स्थापित झालेलीं सर्व प्रमेयें असत्य आणि अप्रतिष्ठ असतात. पुनः, हीं प्रमेयें दुसऱ्या कांहीं प्रमेयांकडून खंडित केलीं जातात; आणि हें खंडन प्रतिखंडनाचे काम सारखें चालूं राहतें. बुद्ध, कणाद, अक्षपाद, जिन, कपिल, पतंजली या दर्शनकारांचें ग्रंथ वाचिले असतां प्रत्येक जण दुसऱ्याचें मत खंडन करण्यास कसा तत्पर असतो हें समजते. (अ. २।१।११) केवळ मानवी बुद्धीच्या बुद्धींतून ज्या कल्पनांचा किंवा प्रमेयांचा उद्भव झाला, त्या कल्पना व तीं प्रमेयें खंडित करणारा जास्त चतुर भेटला म्हणजे या कल्पनांचें व प्रमेयांचें अस्तित्व नष्टप्राय होतें. मानव-बुद्धिजन्य तर्कवितर्कांचें पर्यवसान असेंच व्हावयाचें. व्यावहारिक प्रकरणांच्या संबंधानें जर तर्कवितर्कांची ही स्थिति, तर इंद्रियागोचर ज्या धर्मादिक वस्तु आहेत व शब्दाशिवाय इतर सर्व प्रमाणांला अगोचर जी ब्रह्मवस्तु आहे, त्या वस्तूंचें परिशोधन आणि परिज्ञान तर्कवितर्क काय करून देणार! हें ज्ञान करून देण्याला केवळ उपनिषदें मात्र समर्थ आहेत. तर्कवितर्कांनीं इष्ट असल्यास वेदवेदांतांतील प्रमाणांचा पुरावा करावा; पण स्वतः तें ब्रह्मविचारांत सर्वथा पंगु आहेत. ब्रह्मज्ञानाला वाट एकच वस्तु दाखविणार. ती वस्तु म्हणजे वेद होत. (२।१।१२) कापिलसांख्य, पातंजलकृत योग यांस वेदप्रामाण्यांत कमी जास्ती कांहींएक करितां येत नाहीं, याचें कारण हेंच होय कीं, ते मनुष्यकृत आहेत आणि ते अपौरुषेय आहेत.'

---

बुद्ध हे बौद्ध धर्माचे प्रस्थापक. सुमारे खि. पू. ६ वें शतकांत झाले. कणाद=हे वैशेषिक दर्शनाचे प्रस्थापक. यांनीं विचारपरंपरा परमाणूपर्यंत नेली. अक्षपाद=न्यायदर्शनकार गौतम. जिन=जैनमतप्रस्थापक.

श्रीमन्मध्वाचार्यः--

दुसऱ्या अध्यायाचा पहिला पाद प्रस्तुत करणारीं जीं पहिलीं १०।१२ सूत्रें आहेत, त्यांत वेद हे नित्य आहेत, स्वतः प्रमाण आहेत, त्यांस तर्कांची वगैरे दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची अपेक्षा नाहीं, असा भाग सांगून नंतर वेदांत ज्या गोष्टी व जीं फलें सांगितलीं आहेत, त्या गोष्टी व तीं फलें योग्यकालीं प्रकट होतात म्हणूनच वेद प्रमाण आहेत, असें मानणें भाग पडतें, असें प्रतिपादिलें आहे. तर्कादिकांस योग्य आश्रय नसेल तर ते सर्वथा व्यर्थ आहेत. कारण एक तर्क दुसऱ्याचा पराभव करून त्याचा नाशही करितो. 'श्रुति-गतिस्तु ब्रह्मवाचकत्वेन प्रदर्शिता' (श्रुतीचें तात्पर्य ब्रह्मस्वरूपाला प्रकट करण्यामध्यें पर्य-वसित होतें. (२।१।१३) ब्रह्म हें औपनिषदिक म्हणजे उपनिषदाच्या मात्र ज्ञानानें गम्य आहे. एक उपनिषद्ज्ञान मात्र ब्रह्माला जाणूं शकेल. (१।१।५) 'ना वेद विन्मनुते' (वेदवेत्ता जो नव्हे त्याला ब्रह्मज्ञान होत नाहीं.) या श्रुतीचा यांनींही याच प्रश्नाच्या निर्णयासाठीं अवतार केला आहे. 'श्रुतिसाहाय्यरहितमनुमानं न कुत्रचित्। निश्चयात्साधयेदर्थं प्रमाणांतरमेवच॥' हा श्लोक सर्वांनीं ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. हा श्लोक कूर्मपुराणांतून याच आचार्यांनीं उद्धृत केला आहे.

श्रीमद्वल्लभाचार्यः--

पहिल्या अध्यायांतील पहिल्या पादाच्या पांचव्या सूत्राचा प्रवेश करितांना म्हणतातः 'चिद्रूप आणि ज्ञानप्रधान जें ब्रह्म त्याच्या स्वरूपाचा निर्णय करण्यासाठीं पांचव्या अधिकरणा-पासून पुढचीं कांहीं अधिकरणें आहेत. आतां शंका अशी आहे कीं, "ब्रह्म हें स्वयं-प्रकाश आहे, सर्व प्रमाणांस अगोचर आहे, 'येथें वाणीला सुद्धां परत फिरावें लागतें'! अशी स्थिति असतां आपण ब्रह्मविचार कसला करितां? स्वप्रकाशविरोध व श्रुति-विरोध आहे." यावर हे आचार्य उत्तर देतातः 'ब्रह्म हें इतर प्रमाणांस अगोचर आहे हें खरें; पण श्रुतिप्रमाणांस तें अगोचर आहे, असें नाहीं. कारण श्रुतीचा उच्चार परमेश्वरानें निःश्वासरूपानें व निरपेक्षबुद्धीनें केला आहे. अर्थातच परमेश्वराचे मात्र निःश्वास त्याचें वर्णन करूं शकतील. दुसरेंः "त्यानें विचार केला, कल्पनेंत पाहिलें कीं, 'मी पुष्कळ होईन व प्रजा उत्पन्न करीन'" अशा पुष्कळ श्रुति आहेत. यांचें तात्पर्य असें आहे कीं, सर्व प्रमाणांस अगोचर असणारा परमात्मा लोकसृष्टि उत्पन्न करून स्वतःस व्यवहारयोग्य करितां झाला; आणि भगवान् सत्यसंकल्प आहे म्हणून जसा त्यानें संकल्प केला तसेंच त्यानें केलें आणि जसें त्यानें केलें तसेंच वेदग्रंथांत लिहून ठेविलें. तात्पर्य वेदवाक्यें सत्य आहेत. तसेंच सृष्ट्यादिकांचा उद्भव प्रतिपादन करणारे वेदांत ब्रह्मप्रतिपादक आहेत. एवंच ब्रह्मज्ञान इतर कोणत्याही प्रमाणानें सिद्ध न होतां वेदानें मात्र सिद्ध होतें हें ठरलें.' तर्कवादाची शुष्कता यांनींही दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांत दाखविली आहे. 'आर्षं धर्मोपदेशं च धर्मशास्त्राविरोधिन। यस्तर्केणानुसंधत्ते, स धर्मं वेद, नेतरः'॥ हाही श्लोक वरच्या सारखाच संग्राह्य आहे. अर्थही स्पष्टच आहे.

याप्रमाणें ब्रह्मज्ञान जर इष्ट आहे तर त्याचा अभिगम वेदापासूनच केला पाहिजे, असें सर्व आचार्यांचें ऐकमत्य साहजिकतःच झालें आहे. हाही एक आनंदाचाच भाग होय. ब्रह्मज्ञान होणार तें ज्ञानमार्गानें, वेदप्रणीत ज्ञानमार्गानें; नुसत्या कर्मानें किंवा कर्माचा अंशभाक् असणाऱ्या ज्ञानानें नव्हे! ब्रह्मज्ञान वेदप्रणीत ज्ञानमार्गानें होणार या विषयीं सर्व तत्त्वविचारी आचार्यांचें ऐकमत्य झाले हाही अपूर्वच योग आहे.

ब्रह्मज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान होय, असे मीं अनेक वेळ या उपसंहारात म्हटलें आहे. अनंतकोटी ब्रह्मांडांचा उत्पत्तिस्थितिलयादि व्यापार करून पुनः स्वतःअलिप्त राहणारा, विश्वव्यापी असून निःसंगत्वानें असणारा, कर्माकर्मानुसार प्रत्येक जीवाला सुखदुःख देऊन आपण स्वतः निरतिशय उदासीनतेनें वागणारा, परमार्थतः नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त असून मायावी, महानाटकी, पूर्ण, अनादि, अनंत, अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय, अरस, अगंध, असा निर्गुण असून पुनः सर्व सद्गुणगणांचें निधान जो अखिल ब्रह्मांड-नायक श्रीभगवान् अथवा परमात्मा अथवा परब्रह्म, या परब्रह्माचा लाभ व्हावा, निदान तें परब्रह्म प्राप्त करून देणाऱ्या मार्गाचा लाभ व्हावा म्हणून यावज्जीवाचा प्रयत्न अहर्निश सुरू आहे. सुखासाठीं, ज्ञानासाठीं, मृत्यु नसावा यासाठीं जन्मास आल्यापासून प्रत्येक लहान मोठ्या जीवाचा अखंड उद्योग आहे. प्रत्येक उद्योगाचा हेतु सुख, किंवा ज्ञान किंवा अमरता यांपैकी कोणता तरी एक असतो. आपण मनुष्याचेंच चरित्र बघूं या. आमचे हिंदुलोक आधी संसार उत्पन्न करून मग पैसे मिळविण्याच्या उद्योगाला लागोत, किंवा युरोपियन लोक आधी पैका तयार करून मग बायकोच्या शोधाला लागोत, फलश्रुति एकच. म्हणजे सुख मिळविण्याची खटपट आहे. खटपटीचा पौरस्त्य क्रम बरा किंवा पाश्चात्य क्रम जास्त सुखकर ह्याचा येथें विचार कर्तव्य नाहीं. खटपटीच्या हेतूचा, परिश्रमास लावणाऱ्या प्रेरकाचा प्रश्न आहे. याचप्रमाणें अगदीं लहान मुलापासून वृद्धापर्यंत पुष्कळ गोष्टी जिज्ञासेच्या इच्छेनें होत असतात. पीठ लवंडणाऱ्या तरतरित बालकापासून तों मृत्युनंतर काय होतें याची विचिकित्सा करणाऱ्या कठोपनिषदांतील नाचिकेत्याप्रर्यंत सर्व मानवी प्राण्यांमध्यें जिज्ञासावृत्तीचें अंकुर स्पष्टपणानें बाहेर येतात. **जिज्ञासावृत्ति जिवंत आहे तोंपर्यंत जगण्यांत सुख आहे.** ह्याचप्रमाणें अमर-पणाची इच्छा घ्या. मनुष्य कोणत्याही दुःखात असो, कितीही अज्ञानांत गढून गेलेला असो, त्याला मरावेसें वाटत नाही. परकी वस्तु पाहिल्याबरोबर घाबरणाऱ्या लहान अर्भकापासून तों कांहीं कर्मविपाकानें शूकर योनी प्राप्त झालेल्या एका ज्ञानी संतापर्यंत सगळ्यांना मरणाचें भय वाटतें; अमरपणांत सुख वाटतें. आणि सर्व प्राण्यांची अज्ञानतः व शास्त्रकार आणि वैद्यराज यांची बुद्धिपूर्वक अशी धडपड चालली आहे कीं, जीवाला या देहांतच अमरत्व कसें प्राप्त होईल. तात्पर्य सुख, ज्ञान आणि अमरता ही त्रयी साध्य व्हावी एतदर्थ सर्व जीवांचा, सर्व व्यवहारांत गुंतलेल्या व परमार्थाचा शोध करणाऱ्या मानवांचा उद्योग अखंड सुरू आहे. ह्याचप्रमाणें सर्व व्यावहारिक शास्त्रांचा आणि

धार्मिक ग्रंथांचा उद्देशही असाच आहे. या त्रयीचें म्हणजे सच्चिदानंदाचें लक्षण आपल्यास नीटसें आणि कायमचें बांधितां यावें म्हणून तत्त्वज्ञानही याच गोष्टीचा विचार करितें. जीव, जगत् आणि परमेश्वर या तीन मूळ पदार्थांचा संबंध ठरवितांना युरोपियन तत्त्ववेत्त्यांनीं याच मार्गाचा सादर स्वीकार केला आहे. पण सत्य आणि शुद्ध सिद्धांत सांगणारे उपनिषदांसारखे प्रासादिक व प्रामाणिक ग्रंथ पौरस्त्य आर्यांच्या पूर्वकर्मसंचयानुसार आर्यावर्तांतील आर्यांसच लाभल्यामुळें म्हणजे पाश्चिमात्य देशांत उपनिषदादि पुरुषकल्पनातीत (अपौरुषेय) ग्रंथांचा लाभ न झाल्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाला, त्यांच्या वेदांताला स्थैर्य आलें नाहीं, इतकेंच नव्हें, तर त्यांच्या वेदांतामध्यें मुख्य गोष्टींच्या संबंधानेंही अद्यापपर्यंत एकवाक्यता झाली नाहीं. पुरुषकल्पनाच त्या! तेथें एकवाक्यता होणार कशी? आमच्या इकडेही पुरुषकल्पनांचें काहूर माजून पुष्कळ सभ्य व असभ्य वादप्रतिवाद झाले. पण ते वाद केव्हां वेदमंत्रांतील अर्थाच्या संबंधानें व केव्हां इतर क्षुल्लक बाबींच्या संबंधानें झालें. मुख्यगोष्टीं-संबंधानें म्हणजे ब्रह्मस्वरूपाच्या संबंधानें किंवा तेथें मिळणाऱ्या सुखशांतिसंबं-धानें, किंवा कर्मविपाकाच्या संबंधानें अथवा जीवाच्या अमरत्वासंबंधानें केव्हांही झाले नाहींत. जीवाचें आत्मत्व नाकबूल करणारा **बुद्ध** घ्या, ब्रह्माच्या एकत्वाविषयीं साशंक राहणारा **सांख्य** येऊं द्या, ईश्वराच्या दयालुत्वावर मात्र भरंवसा ठेवण्यास सांगणारा **शांडिल्य** किंवा **नारद** घ्या, कोणीही आस्तिकवादी घेतला तरी त्याला वरील मुख्य गोष्टी संमत होत्या; वर्तमान कालीन विचारी पुरुषास त्या गोष्टी संमत आहेत आणि भविष्यत्कालीन पुरुषांस त्या मान्य होतील. तात्पर्य, ज्ञानकांडाचा उपदेश करणारे, ज्ञान-कांडद्वारां ब्रह्मोपदेश करून ब्रह्मस्वरूपाचें परिकथन करणारे आणि तत्वज्ञानाच्या उत्तर-भूवाचा अंत पाहणारे आमचे वेदांतग्रंथ हे सर्व अस्तिकवाद्यांस मान्यच असले पाहिजेत. अशी जर वस्तुस्थिति आहे, तर आपल्या तत्वज्ञान प्रवर्तक आचार्यांमध्यें जो संवाद आढळतो, जी एकमतता सांपडते, जें विचारतादात्म्य दृष्टीस पडतें, त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. वेदवेदांत ईश्वरप्रणीत आहेत, त्यांतील सिद्धांत नित्य आहेत, त्यांतील आज्ञा सत्य आहेत, असें मानणारा प्रत्येक विचारी हिंदु वरील गोष्टीमध्यें आपलाही अंतर्भाव करील म्हणजे वरील सिद्धांत त्यालाही कबूल असतील, यांत काय आश्चर्य आहे? आतां ब्रह्मस्वरूपादि जे विषय मी मागें नमूद करून ठेविले आहेत त्यांचा विचार करून आणि कांहीं किरकोळ गोष्टी सांगून हा 'सारांश' आटपावयाचा.

यापुढें सर्व पुरुषार्थांतील उत्तम पुरुषार्थ जो मोक्ष त्याचें लक्षण काय व स्वरूप काय, यासंबंधीं या चारही आचार्यांमध्यें संवाद आहे कीं विसंवाद आहे, (२) जगत् (३) जीव आणि (४) ईश्वर या तीन पदार्थांच्या संबंधानें आपल्या पंथप्रवर्तक आचार्यांचें काय म्हणणें आहे, या पदार्थांचीं लक्षणें ते कशीं बांधतात, स्वरूपासंबंधें त्यांचे काय विचार आहेत (५) मायेविषयीं प्रत्येकाचा अभिप्राय काय आणि सरशेवटीं (६) या

चारही मतप्रवर्तकांकडून आपण कोणता बोध घ्यावयाचा इत्यादि विषयांचा नामनिर्देश करून मोक्षस्वरूपलक्षणाकडे वळतों. पण इकडे आपला मोर्चा वळविण्यापूर्वी ब्रह्मस्वरूपलक्षणांत आपल्या चार आचार्यांचें काय मत आहे हें पाहूं या.

## ब्रह्माचें लक्षण व स्वरूप.

श्रीमच्छंकराचार्यः—

'**अस्तित्व**', अनादित्व अनंतत्व सच्चित्स्वरूपत्व, अजत्व, परब्रह्मत्व इत्यादि परब्रह्माचीं स्वरूपलक्षणें आहेत. ब्रह्म हा शब्द 'बृह्=मोठें होणें' या धातूपासून निघाला आहे. ब्रह्माधिष्ठानापासून विश्वाचीं उत्पत्तिस्थितिलयादि कार्ये होतात. आनंद हेंही त्याचें स्वरूप आहे. तें सर्वव्यापी आहे. तें सर्वकारण, सत्यस्वरूप, सर्वात्मा स्वयंभू, स्वयंप्रकाश, एकरसमय, सर्वांतर्यामी, सर्वज्ञ, नित्य, अविकार्य, सर्वशक्तिमान, मायास्वामी आहे. अव्यक्त असल्यामुळें तें इंद्रियागोचर आहे. तें सर्वांतयामी आहे म्हणून सर्वव्यापी आहे; सर्वव्यापी आहे व एकरस आहे म्हणून तें अव्यय व अक्षर आहे. तें एकचएक आहे म्हणून स्वतंत्र आहे; त्याचा स्वभाव नित्य, मुक्त आहे म्हणून त्याला कांहीं हित कर्तव्य अथवा अहित परिहर्तव्य ( कांहीं चांगलें केलें पाहिजे असा किंवा वाईट टाकून दिलें पाहिजे असा ) कर्तव्यनिर्बंध नाहीं. तें सर्वत्र अभिन्न स्वरूप असल्यामुळें त्याच्या स्वरूपांत कोठेंही विशेष प्रकार नाहीं, म्हणजे सर्व ठिकाणीं त्याचें स्वरूप एकरसात्मक आहे. आकाशाचें स्वरूप जसें सर्वठिकाणीं सारखेंच असतें, कमी आकाश किंवा जास्ती आकाश, घट्ट आकाश, पातळ आकाश, काळें आकाश किंवा पिंवळें आकाश, असा भेदाभेद असत नाहीं; घटाकाश, मठाकाश हे भेदाभेद सुद्धां घट फुटतां क्षणीं किंवा मठ नष्ट झाल्याबरोबर नाहींसे होतात, मूळस्वरूपांत ज्याप्रमाणें केव्हांही भिन्नभाव असत नाहीं, त्याचप्रमाणें ब्रह्म स्वरूपांतही कोठेंही व केव्हांही भिन्नभाव असणें संभवतच नाहीं. काल, स्थल, किंवा परिस्थिति यांतील सर्व गोष्टी अथवा प्रत्येकी एक एक गोष्ट ब्रह्मरूपांत बालाग्रही भेद करूं शकत नाहीं. कारण कालस्थलांच्या अंतर्यामीही ब्रह्मच असतें. ब्रह्म मंगल गुणांचें माहेर घर आहे, कारण ब्रह्माचें स्वरूप शुद्धानंदमय आहे आणि जेथें शुद्ध आनंद असतो, तेथें अवश्यतः मंगल गुणगणांची वसति असते. त्याचें सामर्थ्य विलक्षण आहे. उघडच आहे कीं ज्याच्या सत्तेनें आणि सत्तेखालीं पंचमहाभूतें व त्यांच्या अनंत शाखा या विश्वांत अनंत प्रकारची उलाढाल करितात, सारांश आपला विलक्षण शक्तिप्रभाव दाखवितात, त्या ब्रह्माचें सामर्थ्य अति विलक्षण असलें पाहिजे. पुनः चमत्कार हा आहे कीं, कोणत्याही प्रकारच्या इंद्रियादि साधनांचें सहाय्य नसतांही त्याला इंद्रियादिकांचे सर्व व आणखी कांहीं शक्तिचमत्कार करण्याचें सामर्थ्य आहे. कान नसून ऐकणें, डोळे नसून रूप पाहणें, जिव्हा नाहीं तरी रुचि घेणें आणि नाकाच्या गैर हजेरींत वास घेतां येणें, हें सामर्थ्य अजब नव्हे काय? मन नसतांही कल्पना करणें, बुद्धीच्या अभावीं

निश्चय करणें, हें अघटितघटना सामर्थ्य नव्हे काय? अथवा यांत आश्चर्य तरी कसलें? शब्द स्पर्श, रूप, रस, गंध यांस अंतर्बाह्य व्यापून यांच्या अंतर्यामीं असणारें, सर्व संकल्पविकल्पाचें, सर्व निश्चयानिश्चयांचें जें स्वतःच आत्मस्वरूप, त्याला, त्या सर्वव्यापी ब्रह्माला, विशेष विषयांचें ज्ञान झाल्यास त्यांत फारसें आश्चर्य नाहीं. असो, ब्रह्म हें स्वतः निराकार असून सर्व आकारवंत पदार्थांस व आकाराच्या शास्त्रकलांस स्वरूप देणारें आदिस्थान आहे. त्या ब्रह्माला नामरूपाचा स्पर्श नाही. गंधही नाहीं. उघड आहे. जें एकच एक आहे, त्याला नांव तरी कसें द्यावयाचें व कोणी द्यावयाचें? दुजेपणा, दुसरा पदार्थ असेल तर नांव ठेवावयाचें! एकरसात्मक आणि घनदाट पसरलेल्या ब्रह्माला नांव ठेवितां येणें शक्यच नाहीं. पदार्थाला अंत असेल तर, त्याला चोहींकडून सीमा असेल तर, रूप प्राप्त होईल. पण जें स्वतः अनंत बाजूंनी अनंत त्याला कोणतें रूप असणार? कोठेंही, कसल्याही प्रकारचा रिता ठाव नाहीं असें भांडें गच्चोनगच्च भरलें असतां त्यांतील पाण्याला जशा लाटा येणें संभवनीय नाहीं, त्याचप्रमाणें जें स्वतः सर्व असून एक स्वरूपानें सर्वत्र पसरलें, त्याला रूप कसलें असावयाचें आहे? ज्या पासून रूपच उत्पन्न होणार, त्याला रूपाची उपाधि कधीही नसावयाची हें हातांतील अंगठी इतकें उघड आहे. आकाशाचें जसें भाग पाडतां येत नाहीत, तसेंच याचेही भाग पाडणें अशक्य आहे. हें सर्वांहून मोठें आहे तरी सर्वांहून लहानही आहे. हें ब्रह्म या विश्वांतील जगतांचें निमित्तकारण असून पुनः उपादान कारणही आहे. कुंभार हा घटाचे निमित्तकारण आणि माती हें त्या घटाचें उपादान कारण होय, पण ब्रह्म स्वतःच्या लीलाविग्रहार्थ अथवा भूतांच्या कर्मविपाकानुसार ही अनंत कोटीं जगतें उत्पन्न करतेंसें दिसतें. सारांश हीं दिसणारीं जगतें ब्रह्म, आणि त्यांचा कर्ता करविताही ब्रह्मच होय. कुंभाराला जसा घटोत्पत्तीसाठीं दंडाचा आश्रय करावा लागतो, तसा आश्रय, किंवा तशीं आयुधें किंवा हत्यारेंही या ब्रह्माला लागत नाहीत. असो; सर्व वेदवेदांत या ब्रह्मस्वरूपाचेंच वर्णन करितात. पुनः वेदवेदांताचें कर्तृत्व ब्रह्माकडेसच असतें. हें ब्रह्म वेदांतैकगम्य आहे. वेदवेदांतच याला सिद्ध करतील. या ब्रह्माचें ज्ञानविज्ञान करून घेणें हा पुरुषार्थ होय. हा पुरुषार्थ ह्मणजे मोक्ष; आणि मोक्ष ह्मणजे स्वस्वरूपाची प्राप्ति अथवा अखंडावाप्ति होय.

याप्रमाणें शंकराचार्यांनीं ब्रह्मस्वरूपाचें व लक्षणाचें वर्णन केलें आहे. हें जें वर वर्णन आलें आहे, तें स्थूलमानानें आलें आहे. तथापि या स्वरूपवर्णनांत बहुधा महत्वाचे सर्व भाग आले आहेत व या वर्णनाशीं जर श्रीरामानुजाचार्य व इतर प्रसिद्ध आचार्य यांची संमति मिळेल तर सर्वकारण जें ब्रह्म, सर्व स्थितिस्थापक जें ब्रह्म आणि सर्वांनाच जेथें लवकर किंवा उशीरा जावयाचें आहे म्हणजे जन्ममरणाच्या चक्रांतून सुटून स्वरूपाप्रत जावयाचें आहे असें जें ब्रह्म, त्याच्या संबंधानें तरी विमत नाहीं, विसंवाद नाहीं असें होईल.

ही गोष्ट साध्य होईल तर आणखी काय पाहिजे ? आणि मलाही पण असा भरंवसा आहे कीं जर सर्व आस्तिक आचार्यांना वेद मान्य आहेत, उपनिषदें मान्य आहेत, बादरायणकृत ब्रह्मसूत्रें मान्य आहेत, सारांश तत्त्वज्ञानाचा संग्रह करणाऱ्या उपनिषदांचीं सारभूत जीं बादरायणसूत्रें तीं जर मान्य आहेत, तर मुख्य गोष्टींच्या संबंधानें या आचार्यांमध्यें विसंवाद आहे अशी जी भ्रामक समजूत झालेली दिसते, तिला तरी थारा नाही, असें कोणाही विचारनिष्ठ पुरुषाला सिद्ध करितां येईल. संप्रदायामध्यें फरक असो, एखाद दुसऱ्या मुख्य प्रश्नासंबंधें भेदभाव असो; कांहीं किरकोळ गोष्टींमध्यें मतभेद असो, चालेल. असा कोठे फरकच नसेल तर स्वतंत्र विचार करण्याचें सामर्थ्यच नष्ट झालें असें होईल ! पण मुख्यांपैकीं पुष्कळ गोष्टींत ऐकमत्य आहे, अशी जोंपर्यंत स्थिति आहे, तोंपर्यंत या चार आचार्यांच्या भिन्न शिष्यांनी सर्वत्र विसंवाद आहे, आपल्या मताव्यतिरिक्त बाकीचीं सर्व मतें कलिप्रेरित आहेत, असा मनाचा ग्रह करून घेऊन स्वेतरमतवाद्यांस 'राक्षस, धर्मद्रोही, समाजविघातक' अशा शेलक्या शेलक्या विशेषणांचें दान करावयाचे व स्वेतर आचार्यांच्या भक्तांची व अनुयायांची फक्त 'शिवराई' नाण्याने मात्र संभावना करावयाची हा प्रकार खरोखर उद्वेगजनक होय. श्रीमच्छंकराचार्यांचे लेख जे विचारी पुरुष वाचतील, त्यांस असें सहज आढळून येईल कीं, आचार्यांच्या शिव्या म्हणजे 'तो देवाचा प्रिय आहे' या चालीवरच असावयाच्या. श्रीमद्रामानुजाचार्यांचाही सामान्यतः असाच प्रकार आढळून येईल. असें जर आहे, मुख्य आचार्यांमध्यें जर ही उदारमनस्कता आढळतें, हे मतप्रवर्तक जर स्वतः इतके उदार अंतःकरणाचे असतात, तर ज्यांचें काम नुसतें मतमीमांसा करण्याचें आहे, त्यांनी इतकी संकोचवृत्ति कां दाखवावी, हे समजत नाहीं. किंवा निराळ्या तऱ्हेनें असेंही म्हणतां येईल कीं मोठमोठाले ग्रंथ वाचून, परिस्थितीचें आकलन करून, आपलें प्रामाणिक मत ग्रहण करण्याचें सामर्थ्य समाजांत आहे कीं नाहीं हें पाहून, समाजामध्यें शांतता किंवा संक्षोभ उत्पन्न करणाऱ्या शक्ति कशा प्रकारच्या आहेत, यांचें आकलन करून आणि भविष्यत्कालांत आपल्या मताचा विपाक कसा काय उतरेल या गोष्टींचें गणित करून मग आपलें मत स्थापन करणारा जो अवतारी किंवा महापुरुष असतो, त्याला लागणारी बुद्धि, अवश्य असणारें धोरण, अपरिहार्य असलेली लोककल्याण-बुद्धि इत्यादि मंगल गुणगणांचा संग्रह अर्थातच त्याच्या अनुयायांमध्यें असण्याचा संभव प्रायः कमीच असतो. हा कमीपणा हे लोक मग भरून काढतात. कसा ? तर आपल्या आचार्यांच्या प्रतिपक्ष्यांस शिव्या देऊन ! प्रेमाने होणाऱ्या गोष्टीची सिद्धता करण्याला हे लोक तामसीवृत्तीचा अंगीकार करितात. असो; या तिसऱ्या चवथ्या प्रतीच्या लोकांच्या गलबल्यांकडे लक्ष्य न देतां प्रत्येक वेळीं मुख्य आचार्यांचा आश्रय घ्यावा. अर्थातच वाचकाचें मन व मत कलुषित होणार नाहीं, आणि एकवाक्यता करण्यास ठीक पडेल. मूळ झऱ्याकडे गेलें असतां जसें तेथें शुद्ध व निर्मळ पाणी मिळतें, त्याचप्रमाणें अवतारी पुरुषाजवळ जाऊन त्याशीं किंवा त्याच्या ग्रंथांशीं साक्षात्परिचय केला असतां आप-

ल्यास त्याच्या मताचें शुद्ध स्वरूप समजेल. हाच न्याय सर्वत्र लागूं केला असतां पुष्कळ वेळा जो निरर्थक गैरसमज होतो तो नाहींसा होऊन आपल्या व इतरांच्या मनाची स्वच्छता बिघडणार नाहीं. असो; ह्या आवश्यक विषयांतराचें तात्पर्य हें आहे कीं शिव्यांचा सारखा सपाटा पाहिला, म्हणजे त्या शिव्यांच्या नादीं न लागतां दुसरीकडे जावें, आणि तो शिव्या देणारा 'भगत' ज्या विभूतीच्या अनुयायी-पणानें वागतो, त्या विभूतीकडे जाऊन त्याचें खरें मत समजून घ्यावें. आतां तेथेंही शिव्याचाच बाजार असेल तर त्या पंथांत 'राम' नाहीं, असें समजून आपल्या उद्यो-गाला लागावें. खऱ्या सिद्धांताला शिवराई अस्त्राची अपेक्षा नसते व खोट्या मताला शिव्यांच्या आधाराचा कांहीं उपयोग होत नाहीं !

श्रीमद्रामानुजाचार्यः—

'बृह्=मोठें होणें' या धातूपासून ब्रह्म=अतीशय मोठेंपणा, अतीशय मोठी वस्तु आणि परब्रह्म म्हणजे सर्वांत अति मोठी, सर्वश्रेष्ठ वस्तु होय; असा अर्थ झाला. हें लक्ष्मीचें, सर्व विषयांचे प्रिय वसतिस्थान आहे. ह्या पुरुषोत्तमाचें वर्णन एक अपौरुषेय वेद मात्र करूं शकतात; पण ते सुद्धां 'नेति, नेति' असें म्हणून (आह्मांला सर्व स्वरूपाचें सर्व वर्णन करितां येत नाहीं असें म्हणून) स्तब्ध होतात, मौनावतात. तो हा पुरुषोत्तम स्वतःच्या लीलेसाठीं अखिल विश्वांतील सर्व जगतांचीं उत्पत्तिस्थितिलयादि कार्यें हातांत घेऊन शेवटास नेतो. तसेंच हें ब्रह्म किंवा हा पुरुषोत्तम आपल्या भक्तांस शांतिरूप सुख देऊन त्यांचें निःश्रेयसरूपी कल्याण करितो. याचें एकनिष्ठ भजन ज्ञानपूर्वक केलें असतां हा जन्ममरणापासून सोडविणारा आहे. जन्ममरण संपणें म्हणजे मायेचें राज्य संपणें म्हणजे मोक्षावाप्ति होय. ब्रह्म हें ज्ञानैकगम्य आहे. हें एक आणि अद्वितीय आहे हें जग-तांचें निमित्त कारण व उपादान कारण आहे. तें सर्वज्ञ व सर्वशक्तिमान आहे. तें सत्य-संकल्प आणि सर्वदयाघन आहे. तें सर्वांच्या अंतर्यामीं असून पुनः सर्वाधार आणि सर्वनियामक आहे. तें सर्वांचा आत्मा असून पुनः 'हे श्वेतकेतो ! तुझा आत्माही तेंच ब्रह्म आहे !' 'तत्त्वमसि' तें हेंच होय. तें सच्चिदानंदस्वरूप आहे. तें नित्य आहे. तें सर्वकारण आणि सर्वकार्य आहे. तें **निर्गुणी म्हणजे पापशून्य** आणि सगुण म्हणजे सद्गुणी आहे. तें अनाद्यनंत आहे. तें आनंदस्वरूप आहे. तें ज्ञानरूप असून ज्ञानी आहे, आनंदस्वरूप असून आनंदी आहे आणि सत्तावाचक सत्पदार्थही आहे. ब्रह्म हें शांतीचें माहेरघर आहे. येथें गेलें म्हणजे चिंता, भय, अज्ञान, पाप, दुःख इत्यादि अमंगल पदार्थांचा नाशच होतो. जीव हे त्याचे अंश होत. ते **सविशेष** आहे, **निर्विशेष** नाहीं. ब्रह्म सर्वव्यापी आहे. हीं **जगतें ब्रह्माचें शरीर आहेत;** आणि ब्रह्म त्या शरीराचा आत्मा आहे. ब्रह्मज्ञ पुरुष ज्ञानरूप होतो. हें ब्रह्म जगतें उत्पन्न करितें, म्हणजे आपणच स्वतः स्वलीलेसाठीं जगतें व तदंतर्गत पदार्थ होतें. स्वतः निराकार असून तें दुसऱ्यांस अनंत प्रकारचे आकार देतें. ह्याचा प्रकृतीशीं अथवा

कर्मांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं व असणें शक्यही नाहीं. कारण प्रकृति त्रिगुणात्मक आहे आणि परब्रह्म हे त्रिगुणातीत आहे. तें अज आहे, तें अमर आहे, तें नित्य, बुद्ध, शुद्ध आणि मुक्त आहे. पंचमहाभूतें त्याचींच स्वरूपें आहेत. भक्तांनीं एकनिष्ठेनें त्याचें आराधन केलें असतां ते तत्स्वरूप होतात. माया ही ब्रह्माची एक शक्ति आहे. तें अव्यय, अक्षर, अव्यक्त आहे. त्याला विकार दुसऱ्याकडून होणें शक्य नाहीं. तें स्वतंत्र आहे. ते कालस्थलाला व परिस्थितीला नियमित करितें, पण त्याचें नियमन करणारा दुसरा कोणताही पदार्थ नाहीं. त्याचें सामर्थ्य विलक्षण आहे. जीवांसारखीं पंच ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें नसूनही ब्रह्माला सर्व विषयांचें ग्रहण करितां येतें. याला मोठयाहून मोठें किंवा लहानाहून लहान होतां येतें.

ह्याप्रमाणें श्रीमद्रामानुजाचार्यांच्या भाष्यांत मला जें ब्रह्मलक्षण समजून घेतां आलें त्याचें तात्पर्य वर दिलें आहे. एकच गोष्ट ध्यानांत ठेविली तर शंकराचार्य व रामानुज यांच्यामध्यें जो वादविषय आहे, त्याची उग्रता पुष्कळच कमी होईल. शंकराचार्यांचा जो सगुण ईश्वर तो रामानुजांचा परमेश्वर किंवा परब्रह्म आहे, येवढी खूणगांठ घालून ठेविली म्हणजे झालें. शंकराचार्यांच्या सगुण ब्रह्मांत आणि रामानुजांच्या परब्रह्मांत बहुधा फारसा भेद राहणें शक्यच नाहीं. रामानुज जीवस्वरूपानें सगुण ब्रह्मापर्यंत जातात व पुढें जाण्यासारखें कांहीं नाहीं, व जाणें शक्यही नाहीं, म्हणतात. मर्जी त्यांची! शंकराचार्य आत्मस्वरूपानें ब्रह्मस्वरूपापर्यंत जाऊन वेदांताचे आत्मस्वरूपाच्या भूमीवरील बोल स्पष्ट करण्यासाठीं मायेचा आश्रय घेतात आणि वेदांतांतील प्रत्येक वाक्याची व शब्दाची उपस्थिति लावितात; उत्तम आहे. पण यांच्या सगुण ब्रह्मांत आणि त्यांच्या परब्रह्मांत या पुढें जाण्यानें अथवा दुसऱ्याच्या मागें राहण्यानें थोडाच फरक पडणार आहे? सारांश ह्या सगुणनिर्गुण ब्रह्माची, या भेदामुळें उत्पन्न झालेल्या मायेची आणि वरच्या उताऱ्यांत जबऱ्या ठशांनीं छापलेल्या मजकुराची वजावाट केली म्हणजे एकमताचा केवढा थोरला विस्तार मागें राहतो, याचा विचार वाचकांनींच करावा. आतां **मायेचा** प्रश्न फार मोठा आहे, त्याच्या उत्तरावरच कोणता सिद्धांत खरा व कोणता खोटा हें ठरावयाचें आहे, हेंही खरें; पण तो मायासिद्धांत खरा ठरलाच तर फार फार झाल्यास, निर्गुण ब्रह्माचा लाभ करून घेणें, हें अगत्याचें होईल. यापरतें आणखी काय सिद्ध व्हावयाचें आहे? सगुण ब्रह्माला किंवा पुरुषोत्तमाला या मायेच्या अस्तित्वानें कोणताही धक्का लागावयाचा नाहीं. रामानुज व इतर आचार्य विद्यमान काळींसुद्धां शक्तिस्वरूपानें व केव्हां केव्हां फसविणारी शक्ति, या स्वरूपानें मायेचा आश्रय करितातच! असो; केव्हांही भक्ति, श्रद्धा यांचें राज्य कमी होण्याचाही संभव नाहीं. चित्तशुद्ध होत असतां व योगाचा अभ्यास सशास्त्र पद्धतीनें, श्रीकृष्णपद्धतीनें, चालला असतां ध्यानप्रसंगीं, चिंतनप्रसंगीं भक्तीचें साम्राज्य अखंड चालूच राहतें. शिवाय, मोक्षस्वरूप आपल्यास ठरवावयाचेंच आहे व तेथें या आचा-

यांची एक वाक्यता कितपत होते, हेंही बघावयाचेंच आहे. त्यावेळीं आपण पाहूंच कीं मोक्षानें ब्रह्मस्थितिच प्राप्त झाली तर संसार, जन्ममृत्यु, सुखदुःख, कर्माकर्म आणि धर्माधर्म इत्यादिकांचा विमोक्ष होऊन जीव ब्रह्म होईल. श्रीरामानुज म्हणतात त्याप्रमाणें ज्ञानस्थितिच प्राप्त होऊन परमेश्वराचें कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं हें सामर्थ्य जीवास प्राप्त झालें नाहीं तर व त्याचा मत्सरादि सर्व भाव नष्ट झाला असेल तर तो जीव परमेश्वराचें ज्ञानपूर्वक भजन करित होत्साता सुखांत अनंत काळपर्यंत राहील. तेव्हां इकडून भांडण्यास जागा आहे, असें नाहीं. एवंच माझ्या समजूतीनें या दोन्ही पंथांत हमरीतुमरीवर येऊन भांडण्यासारखें फारसें मोठें भेदक्षेत्र आहे, असें दिसत नाहीं. मग वाद कां? केवळ संप्रदायामुळें. केवळ एकमेकांच्या मूळ सिद्धांताच्या अज्ञानामुळें अथवा तद्विरुद्ध दुराग्रहामुळें हा वितंडवाद सुरू होतो. ही ज्वाला पेटली, अभिमानाचें तेल त्याच्यावर पडलें, 'जिंकणार कोण, हरणार कोण?' असें ओरडणाऱ्या सभोंवतालच्या लोकांनीं जोराचा फुंकर घातला म्हणजे सर्वत्र अग्नि महाराजांचें साम्राज्य होऊन फक्त कोळसे म्हणजे मतमतांतरांतील अशुद्ध भाग सर्वांच्या हातांला लागतात! या आचार्यांनीं भाष्याला आरंभ केल्यानंतर पहिल्याच सूत्राचें विवरण करित असतां ब्रह्माची निर्विशेषता, एकरसमयता, माया इत्यादिकांचा प्रतिकूल रीतीनें ऊहापोह करून ब्रह्म सविशेष आहे, एकरसमय नाहीं, माया नाहीं म्हणजे जगत् सत्य आहे, जीव अनेक आहेत, असा उपनिषद्वाक्यांचा आपल्या पद्धतीनें अर्थ करून निष्कर्ष काढिला आहे, हें ठीक झालें. पण यांनीं तरी प्रकृतीच्या अनंत स्वरूपांचें व जीवांच्या भिन्न स्थितींचें एकीकरण करून प्रकृति म्हणजे ब्रह्माचें अचिदात्मक ( जड ) शरीर आणि जीव म्हणजे ब्रह्माचें चिदात्मक म्हणजे ज्ञानात्मक शरीर, असा संग्रह केलाच आहेना? शंकराचार्य थोडेसे आणखी पुढें गेले इतकेंच. त्यांनीं चित् आणि अचित् यांच्या मूळाशीं सत्ता म्हणजे अस्तित्व आहे त्याचा आधार घेऊन अस्तित्व–सत्ता–हीच सर्वांच्या अस्तित्वाला कारण झाली आहे, म्हणून तीच सर्व साधारण आहे असें ठरविलें. सत्ता, अस्तित्व–सत्, हें ब्रह्मस्वरूप होय. आतां चित्व म्हणजे ज्ञान हे सत्तेशिवाय असावयाचें नाहीं, तसेंच सत्तेचें अस्तित्वही ज्ञानाशिवाय असणें व जाणणें शक्य नाहीं. एवंच सच्चिदात्मक ब्रह्म झालें. याला, याचप्रमाणें आनंदाची जोड दिली म्हणजे सच्चिदानंदस्वरूप सिद्ध होतें. एकच एक झालें, भेदाभेद नुरला म्हणजे गति संपतें आणि अक्षरत्व प्राप्त होतें. असो; तात्पर्य विचारविषयाला **विचाराचें** स्वरूप प्राप्त होईपर्यंत विचाराची गति थांबावयाचीच नाहीं. पण हा गतीचा भाग झाला. रामानुज जेथें थांबतात, तेथपर्यंत तर वाद नाहीं. बरें? विचार दृष्टीनें पुढें जाणाऱ्या तत्त्वज्ञांचा कोणाच्यानेंही पाय धरवत नाहीं. मग फुकाची तळमळ कां? बरें! शंकराचार्य ग्रीस देशांत त्यांच्या जन्मापूर्वींच्या बाराशेंव्या शतकांत गेले नव्हते नां? तेथें **पार्मिनिडीजनें** व पुढें **प्लेटानें** ह्यांच्या सारखा पण विशेष अंधुक असा मायावाद कसा उत्पन्न केला? आचार्यांच्या निधनानंतर सुमारें एक सहस्र वर्षांनीं जर्मनींत हा मायावाद कसा उत्पन्न झाला?

जर्मनींतील तत्त्वज्ञानावतंस कँट साहेबानें तर शांकरभाष्य वाचण्याचा कांहीं संभव नव्हता, व वाचिलेंही नव्हतें. पण त्यानेंही एक बराच खासा मायावाद उत्पन्न करून पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या प्रगतीला एक निराळेंच वळण दिलें. मायावाद आचार्यांनीं स्वयंभूपणानें उत्पन्न केला नाहीं; त्याला वेदांत व गीतेंत पुष्कळ आधार आहेत. पण समजा, त्यांनीं उत्पन्न केला असला तर त्यांत बिघडलें काय ? सर्व वेदांची, वेदांताची, गीतादिग्रंथांची, पंचमहाभूतांची, जीवांची, व्यवस्था जर या प्रमेयानें खाशी लागते, कोठेंही विरोध राहत नाहीं, विचाराचें गाडेंही सुयंत्र चालतें, असें जर आहे, 'तर मायावाद आचार्यांनीं उत्पन्न केला म्हणून तो खोटा असें रामानुजाचार्यांनीं अथवा त्यांच्या शिष्यांनीं म्हणावयाचें कारण नाहीं किंवा श्रीरामानुज सगुणब्रह्मापाशींच थांबले व त्यांनीं जीव आणि जगत् हीं सत्य मानिलीं, तर शंकराचार्यांनीं--शंकराचार्य तर रामानुजांच्या वेळीं जिवंतच नव्हते म्हणा--किंवा त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं विशिष्टाद्वैतवाल्यांविरुद्ध कोलाहलही माजविण्याचें कारण नाहीं.

. श्रीमन्मध्वाचार्यः—

ब्रह्म हा शब्द बृंह वाढणे, वाढविणे यापासून झाला आहे. याचा मुख्य म्हणजे **वाच्यार्थ विष्णु आहे. नारायण हा सर्व गुणांनीं युक्त आणि दोषवर्जित आहे.** तो परम आहे. **ब्रह्म म्हणजे विष्णुच** होय असें 'तन्नोविष्णुरितिवचनात्' श्रुतिच म्हणते. भाल्लवेयश्रुति म्हणते कीं, सर्व नांवें एका विष्णुचीच आहेत. हा सर्व भुवनांचा आधार व आश्रय आहे. हा विश्वकर्ता, विश्वभर्ता व विश्वहर्ता, विश्वनियंता, बंधकर्ता, मोक्षदाता व बुद्धिप्रवर्तक आहे. तो जीवांचा पिता, माता, धाता, भर्ता व उपदेष्टा आहे. तो वाणी, नेत्र इत्यादि इंद्रियांस अगम्य पण वेदांना ओळखतां येण्यासारखा आहे. तो नित्य आहे, शुद्ध आहे, केवळ आहे, निर्गुण म्हणजे **दुष्टगुणरहित आहे.** तो विश्वपर्ता आहे, पुरुषोत्तम आहे, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी, कर्माध्यक्ष, सर्वसाक्षी, सर्वज्ञ आहे. तो आनंदमय, परमात्मा व भगवान आहे. तो सच्चिदानंद आहे. **तो क्षीर समुद्रांत राहतो.** परमार्थतः तो **जीवविलक्षण व जडविलक्षण आहे.** तो स्वतंत्र आहे. तो विश्व-जनकाचा जनक आहे. तो अनाद्यनंत आणि अजरामर आहे. तो सत्यकाम, सत्यसंकल्प आणि सर्व दयाघन आहे. त्याला भूक, तहान, शोक, मोह, जरा, मृत्यु इत्यादि कांहीं नाहीं. अत्यानंद झाला म्हणजे जीव जशी क्रीडा करितो, याप्रमाणें आनंदमय विष्णु विश्वोत्पत्ति-संहार करून क्रीडा करित आहे. तो पूर्णकाम आहे. यथा कर्म, तथा फल देणारा आहे. तो शरीरी आहे, पण त्याला शरीरापासून उत्पन्न होणारे दोष स्पर्श करित नाहींत. तो अविभागी, अविकारी, नित्य व **नित्यगुणात्मक आहे. प्रकृति व काल यांच्याप्रमाणें पुरुष नित्य आहे. हा निमित्तकारण आहे.** तो उपनिषद्वेद्य आहे.

याप्रमाणें मला आढळलीं तशीं ब्रह्मलक्षणें माध्वमतांतून घेतली आहेत. भाष्य ग्रंथांत हीं मला आढळलीं. काळ्या ठशांनीं छापलेल्या लक्षणांशिवाय इतर जी लक्षणें सांगितलीं आहेत, ती वेदमान्य व म्हणूनच इतर आचार्यांस मान्य होतील, अशीं आहेत. या आचार्यांस ज्ञानापेक्षां भक्तीचें माहात्म्य जास्त वाटतें, म्हणून यांनीं उपासनेवर जास्त जोर दिला आहे. शंकराचार्यांसही भक्ति नकोशी नाही. सगुण ब्रह्माशीं एकात्मता होईपर्यंत केवलाद्वैताच्या आचार्यांसही भक्ति, अनन्य भक्ति, ऐकांतिक भक्ति, हवीच आहे. सारांश माध्वमतांचें ब्रह्म म्हणजे सगुण ब्रह्म, व्यक्तब्रह्म, नाम रूपाला आलेलें ब्रह्म, असा अर्थ समजुतीसाठीं केला म्हणजे वादविवादाला जागाच राहत नाही. पुनः, गीतासमन्वयकार म्हणतात त्याप्रमाणें शंकराचार्य तरी एका दृष्टीनें निर्गुण ब्रह्म हे 'सच्चिदानंद' लक्षणयुक्त आहे, असेंच म्हणताताना ? निर्गुण म्हणजे शून्य वस्तु असा आचार्यांचाही अर्थ नाही. समन्वयकार म्हणतात त्याप्रमाणें माझेंही मत आहे कीं, व्यावहारिक दृष्टीनें, मोक्षमार्गाला लागण्यासाठीं व लागल्या नंतर मुमुक्षूनें काय काय गोष्टी संपादिल्या पाहिजेत, कोणकोणत्या यज्ञ स्वाध्यायतपादिकांनी चित्तशुद्ध केली पाहिजे, यांमध्यें कोणत्याही प्रकारचा विसंवाद या निरनिराळ्या भाष्यांत दिसणें शक्य नाही. सारांश मोक्षाकरितां अवश्य असणारें कर्म व अवश्य उपासना यामध्यें विसंवाद नाही. ही वस्तुस्थिति आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं विश्व, विश्वपति आणि विश्वांतील जीव, हें विश्वांतील पदार्थत्रितय, यांचा परस्परसंबंध व शेवटचें स्पष्टीकरण वरील व्यावहारिक कर्मानें अगर व्यावहारिक उपासनेनें होईल. वरील तीन पदार्थांचा सयुक्तिक व सशास्त्र उलगडा करणें हें ज्ञानाशिवाय, विश्वाच्या अंतर्बाह्य ज्ञानाशिवाय, व आत्मज्ञानाशिवाय व्हावयाचें नाहीं. हें अनंत कोटी चमत्कार प्रकट करणारें विश्व हें काय आहे, कांहीं वेळ या विश्वगत पदार्थांचा व विश्वगत शक्तींचा दास तर कांहीं वेळ त्यांचाच स्वामी होणारा व होऊं पाहणारा हा आपला कर्ता, भोक्ता व द्रष्टा जीव याचें मूळस्वरूप कसलें आहे, हें विश्व व या विश्वांतील जीव या उभयतांचाही पति जो सच्चिदानंद परमेश्वर, त्याचें स्वरूप, त्याचा विश्वाशीं व जीवाशीं कोणत्या प्रकारचा संबंध आहे, इत्यादि विचार मनुष्यजीवाच्या मनांत आल्याशिवाय राहत नाहींत. मानवी विचार म्हणजे एक महानदीच होय. समुद्रापर्यंत जाऊन अथवा आकाशांतील मेघसमूहापर्यंत पोहोंचून त्याच्याशीं समरस व्हावयाचें आणि विशिष्ट नामरूपाचा त्याग करावयाचा हीं त्या महानदीचीं कामें जशीं केव्हांही थांबविनां यावयाचीं नाहींत, त्याचप्रमाणें विचाराचा ओघ केव्हांही स्तब्ध करितां यावयाचा नाहीं. या अखंड प्रवाहाच्या मानवी विचाराला श्रुतीचें साहाय्य गुरुप्रसादानें मिळूं लागलें म्हणजे विचाराला एकनिष्ठभक्तीनें निदिध्यासाचें स्वरूप येऊन उच्चार होऊं लागतो, व पुढें आचाराचें स्वरूप येतें. याप्रमाणें विचाराची आचरणामध्यें उत्क्रांति झाली म्हणजे ज्ञानाला विज्ञानाचें स्वरूप येतें. विज्ञान प्राप्त झाल्यावर अधिकाराप्रमाणें मानवी जीव पुनः विचार, पुनः श्रुतिसहाय्य, पुनः गुरुप्रसाद, पुनः एकनिष्ठभक्ति, पुनः सादरउच्चार

आणि पुनः यथार्थ आचार हें उपासनामिश्रित कर्मचक्र व कर्मश्लिष्ट उपासना, यांचें यंत्रचक्र चालू ठेवितो. कोठपर्यंत हें चक्र चालवयाचें? ह्या चक्राचे योगानें विश्व, विश्वगत जीव आणि विश्वपति यांचा पूर्ण स्फोट होईपर्यंत हे चक्र चालू राहावयाचें आहे. या पदार्थांची एकवाक्यता, एकात्मता होईपर्यंत, हे चक्र सुरू राहणार. सारांश प्रश्न विचारणारा प्रश्नविषय होईपर्यंत, पाहणारा पाहणे होईपर्यंत, 'एकमेवाऽद्वितीयं' असें होईपर्यंत, हें चक्र चालवयाचें आहे. अनेक जन्मांनीं संसिद्धि प्राप्त व्हावयाची, असे श्रीकृष्ण सागतात. अर्जुनानेंही बहुजन्म घेतले होते, अशीच गीतेतील उल्लेख-रचना आहे. तेव्हा जीवाचा अधिकार अमुक दर्जापर्यंतचा आहे, त्यापुढें त्याला जातां यावयाचें नाहीं, किंवा त्याला अधिकारही मोठा प्राप्त व्हावयाचा नाहीं, हें म्हणणे व्यर्थ आहे. म्हणजे निर्गुणाकडे जीवास गेलेंच पाहिजे, व निर्गुण झालें पाहिजे. तथापि व्यावहारिक कर्मांत व उपासनेत, तसेंच ब्रह्माच्या बहुतेक लक्षणात आणि सगुण ब्रह्माच्या सर्व लक्षणात उत्कृष्ट सुसंवाद आहे ही गोष्ट उल्हासाची होय. नव्हे काय?

. श्रीमद्वल्लभाचार्यः—

सच्चिदानंद, परब्रह्म, व्यापक, अव्यय, सर्वशक्तिमत, स्वतंत्र, सर्वज्ञ आणि **निर्गुण** (**प्राकृत धर्मरहित**) आहे **निर्गुण ब्रह्म आणि सगुण भगवान् एकच होत.** तें ब्रह्म अविकृत आहे. त्याला देशकाल, वस्तुस्वरूप इत्यादि परिच्छेद नाहीं. म्हणजे तें देशकालातीत आणि वस्तुस्वरूपातीत आहे. त्याला स्वगत, सजातीय आणि विजातीय भेद नाहात. म्हणजे तें अंतर्बाह्य एकरूप आहे, त्याचें सजातीय जे जीव त्याचा व ब्रह्माचा भेद नाहीं व विजातीय जी प्रकृति तिच्याशींही भेद नाहीं. **शौच, दया, सत्य इत्यादि त्याचे स्वाभाविक गुण आहेत.** तें मायास्वामी आहे, तें सेव्य, सर्वरूप आणि ज्ञेय आहे. तेंच कर्ता, भोक्ता, अंतर्यामी, वैश्वानर, आधेय आधार, प्राणभृत्, मुक्तोपसृप्य, भूमन, अक्षर, प्रशासक, सेतु, विधरण, परपुरुष, परतः पर, परमात्मा, अपहतपाप्मन, परंज्योति, अव्यक्त, सूक्ष्म, सर्वकर्ता, सर्वाभिन्ननिमित्तोपादन, निराकार परंतु **साकार** आनंदरूप (रसरूप) आहे. तें निःसीम परिपूर्ण आहे. निरवयव असून **सर्वावयव पूर्ण आहे**, निरिंद्रिय असून **सर्वेंद्रिय आहे.** तें सर्वावरक आहे तें सर्वकारण म्हणजे जगताचें व जीवांचे कारण आहे. **जगत्, जीव** ही जोडी ब्रह्मरूप, ब्रह्माभिन्न व ब्रह्माजन्य आहे. प्रापंचिक पदार्थांहून ब्रह्म हें विलक्षण आहे. **क्रीडा करण्यासाठीं व ऐश्वर्यादि गुण प्रकट करण्यासाठीं** हें विश्व व हे जीव सर्वशक्तिमान् ब्रह्म निर्माण करितें. हें ब्रह्मामध्यें लीन असलेलें विश्व आविर्भूत होत असताना ब्रह्माचा आनंदांश तिरोभूत (अदृश्य) होतो. ह्या आविर्भाव तिरोभावाचें चक्र (संकोचविकासाचा क्रम, विसृष्टीचा आणि विसंहाराचा क्रम, उत्क्रांतीचा व अपक्रांतीचा क्रम (Evolution and Devolution) परब्रह्माच्या स्वतंत्र इच्छानुसार

होतो. ब्रह्म हें न्यायोपबृंहित (तर्कवितर्कांनीं सिद्ध झालेलें) सर्व-वेदांत-प्रतिपादित आणि सर्व धर्मयुक्त असें-हें ब्रह्म-आहे. याचें माहात्म्य अनंत व अपार आहे. हें ज्ञान झाल्यावर उत्तमोत्तम भक्ति उत्पन्न होते आणि नंतर साक्षात्कार होऊन मुक्ति मिळते. **ब्रह्मामध्यें विरोधी धर्म आहेत.** ते निर्धर्मक, निराकार, निर्विशेष, निर्गुण असून सधर्मक, साकार, सविशेष व सगुण आहे. तें लहानाहून लहान असून मोठ्याहून मोठें आहे. एकच पण अनंत मूर्तिमान, कूटस्थ पण चल, अकर्तृ पण कर्तृ, अविभक्त असून विभक्त, अगम्य असून गम्य, एक असून नानाविध सृष्टिरचना करणारे, निर्घृण नसून क्रूर, इत्यादि अनंत विरुद्ध युक्त असें हें विचित्र ब्रह्म आहे! प्रमाण असून प्रमेय असणारें, साधन असून फल होणारें, सर्वांहून श्रेष्ठ असून मशकांची व नागांची बरोबरी करणारें, फार काय सांगावें, अविकृत असून परिणाम पावणारें, स्ववश असून भक्तवश होणारें चतुर असून भक्तासाठीं वेडें होणारें, आत्माराम असून भक्तरमण होणारें आणि इतकें करून पुनः निर्लेप राहणारें हें ब्रह्म आहे.

हा श्रीमद्वल्लभाचार्यांच्या ब्रह्मस्वरूपाचा व तल्लक्षणाचा अंशावतार आहे. तात्पर्य हें आहे कीं, निर्गुण ब्रह्म व सगुण ब्रह्म यांची बेरीज करून समन्वय करण्याचा यांचा विचार आहे. निर्गुण म्हणजे प्राकृत गुणराहित्य असा यांचा अर्थ आहे. तेव्हां हे श्रीमद्रामानुजाचार्यांच्या पद्धतीशीं लवकर साम्य पावतील असें दिसतें. तथापि रामानुजांचें विशिष्ट अद्वैत यांस मान्य नाहीं. रामानुजमतांत जड व चैतन्य हें विशेष कायम राखून अद्वैत सिद्ध करण्याचा प्रयत्न आहे. वल्लभजी आचार्यांचें शुद्धाद्वैत आहे म्हणजे जें दृश्यमान व कल्पनागम्य आहे आणि जें श्रुतींत सांगितलें आहे, **तें जसें दिसतें तसेंच आहे,** दिसण्या असण्यांत भेद नाहीं असें या आचार्यांचें म्हणणें आहे. अर्थातच या आचार्यांस 'मायावाद' कबूल नाहीं. हा मायावाद शांकर मतानुयायांशिवाय दुसऱ्या कोणत्याही हिंदु आचार्यांस संमत नाहीं. मायावादाचा आश्रय केला नाहीं तर ब्रह्माचे ठिकाणीं विरुद्धधर्मांचा आश्रय करावा लागतो. विरुद्धधर्मवंत ब्रह्म आहे, येवढें सांगून तत्त्वज्ञानाचें काम भागत नाहीं. त्या विरुद्ध धर्मसाहचर्याची उपपत्ति श्रुति, युक्ति संमत असली पाहिजे. ब्रह्म सर्व शक्तिमत् असेल म्हणजे वाटेल तें करण्याचें ब्रह्मास सामर्थ्य असेल व तें स्वेच्छेनें वाटेल तसें वागत असेल, हें सांगणें म्हणजे उपपत्ति तयार करणें नव्हे. ईश्वर किंवा ब्रह्म स्वतंत्र असलें तरी तें न्यायाचे, धर्मांचे नियम सोडून वागणार नाहीं. एवंच स्वातंत्र्यानें किंवा सर्वशक्तीनें विरुद्ध धर्मांची फोड होत नाहीं; व ब्रह्माला वाटेल तसें स्वैर वागण्याचें सामर्थ्य आहे, असेंही म्हणणें शोभत नाहीं. असो; तेव्हां विरुद्ध धर्मांची दुसरी कांहीं तरी उपपत्ति सांगितली पाहिजे. हा विशेषाचा प्रकार झाला. पण यांच्या ब्रह्मस्वरूपांत व आचार्यांच्या ब्रह्मस्वरूपांत पुष्कळच साम्य आहे. जबऱ्या खिळ्यांनीं छापलेलीं लक्षणें शिवाय करून बाकीच्या सर्व लक्षणांत व स्वरूपांत एकवाक्यताच आहे.

शिवाय गमतीची गोष्ट अशी आहे कीं, केवलाद्वैत, शुद्धाद्वैत आणि विशिष्टाद्वैत या तिन्ही पंथांत ब्रह्म हें निराकार स्वरूपानें सर्वत्र ओतप्रोत भरलें आहे, तें स्वरूपतः प्रापंचिक ( व्यावहारिक ) धर्मांच्या अस्तित्वांहून विलक्षण आहे, तें सर्वकारण आहे; तें शुद्ध, नित्य, बुद्ध व मुक्त असून सर्वाधार आहे. जगत् व जीव हीं परब्रह्माचीं परिच्छिन्न स्वरूपें आहेत, पण ब्रह्मरूपच आहेत, ब्रह्माभिन्न आहेत, ब्रह्मानन्य आहेत, हेंही या तिन्ही आचार्यांस संमत आहे. हें वेदांतवेद्य आहे व याचें ज्ञान होईल तरच मुक्ति मिळते, हेंही सर्व संमत आहे. शिवाय मुक्ति अथवा मोक्ष हाच पुरुषार्थ आहे आणि आत्मप्रसाद झाल्याविना मोक्षसिद्धी होत नाहीं येथेंही ऐकमत्यच आहे. तसेंच वेदांताचें अध्ययन करावयाला जी साधन संपत्ति लागते, तीही सर्व आचार्यांस मान्य आहे. सगुणब्रह्म किंवा रामानुजांचे ब्रह्म अथवा वल्लभाचार्यांचे आविर्भूत ब्रह्म, याची उपासना करण्यासाठीं जी श्रद्धेची किंवा भक्तीची आवश्यकता असते, तीही सर्व आचार्यांस मान्यच आहे. शास्त्रप्रमाणें ब्रह्म-स्वरूपाचें ज्ञान मिळवितांना व आराधन करितांना जी कर्माची अपेक्षा असतें तीही कोणासही अमान्य नाहीं. लोकसंग्रहासाठीं कर्म करावें असें सर्वच आचार्य श्रुतिस्मृत्यनुसार म्हणतात. तसेंच परमात्मस्वरूपापासून देहसुखाकडे वळविणारी जी माया, अज्ञानजन्य माया, तिचा निरास करण्याविषयीं सर्वांचा उपदेश असून 'काम क्रोध जसें प्रेरितील तसेंच वागूं नये' हेंही सर्वजण सांगतात. आतां वाद काय तो उरला एका प्रश्नासंबंधें. आणि तो प्रश्न व्यावहारिक नसून तात्विक आहे. या तात्विक भागांतही या प्रश्नाचें अध्यात्मिक ( metaphysical ) स्वरूप आहे. जें दिसत आहे व जें मनोगम्य अथवा बुद्धिगम्य आहे त्याच्या पलीकडे काय आहे, कशाच्या आधारावर हें दृश्य, ज्ञेय व कल्पनागम्य विश्व अधिष्ठित झालें आहे, कशाचें ज्ञान झालें असतां शंका सर्वत्र मावळून जाऊन अभंग शांति मिळेल, कोणत्या तऱ्हेची मानसिक नव्हे–आत्मस्थिति प्राप्त करून घेतली म्हणजे येथील सुखदुःखाचा, येथील ज्ञानाज्ञानाचा व येथील विकाराविकारांचा प्रश्न सुटेल, ही जी प्रत्येक जीवाला समजून घेण्याची आकांक्षा आहे, ज्या आकांक्षेप्रीत्यर्थ ज्ञानदृष्टीनें, सुखदृष्टीनें अथवा मृत्युभीतीनें, प्रत्येक जीवाची तळमळ व धडपड चालली आहे, त्या आकांक्षेचा हा प्रश्न आहे. हा आत्मस्वरूपाचा प्रश्न आहे म्हणून तात्विक आहे. हा आत्मस्वरूपाचा प्रश्न खरा, पण दृश्याच्या साहाय्यानें सुटणारा नव्हे; वेदांत वाक्यावरून होणारा जो बुद्धीचा निश्चय अथवा आत्मप्रतीति, तिच्या साहाय्यानें हा प्रश्न सुटणार म्हणून अध्यात्मिक आहे. हा व्यवहारापुरता आणि तोही कांहीं वेळ मात्र एकीकडे ठेविला म्हणजे व्यवहाराच्या तत्त्वज्ञानांत व धर्माच्या तत्त्वज्ञानांत बालाग्रही फरक या आचार्यत्रितयामध्यें प्रतीतीस येत नाहीं.

आतां याच प्रश्नासंबंधानें गीतासमन्वयकार काय म्हणतात तें पाहूं या. ( पृ. ३६६ श्री. भ. गी. समन्वयभाष्यसहिता ).

'जगतांस उत्पन्न करणें इत्यादि कर्म आहे तें ब्रह्माचें पारमार्थिक कर्म नव्हे,' या शांकरमताचा कोणीही हिंदु आचार्यानें स्वीकार केला नाहीं; कारण तें मत स्वीकारणें

म्हणजे बौद्धमताचा गुप्त रीतीनें अंगीकार करणें होय, असें सर्व आचार्यांस वाटलें. म्हणून सगळ्या आचार्यप्रतिपक्ष्यांनीं या मताचा अनादर केला! शंकराचार्य काय म्हणतात तें पहा: "ज्याप्रमाणें सर्वव्यापी आकाशाला 'घटाकाश, मठाकाश' इत्यादि संकुचित स्वरूप घटमठादिकांच्या योगें प्राप्त होतें, त्याचप्रमाणें संकुचित करणाऱ्या अविद्याजन्य नामरूपादिकांमुळें ब्रह्मालाही संकुचित स्वरूपी म्हणजे नामरूपाचे आधीन व्हावें लागतें. नामरूप अविद्येनें उत्पन्न केलें आहे, हें तर ठरलेलेंच आहे. व ह्याच-प्रमाणें नामरूपांच्या मात्र साहाय्यानें अस्तित्वांत आल्यासारखे कार्यकारणरूपी संघात असतात, म्हणजे शरीरेंद्रियांदिक समूह कार्यकारणदृष्टीनें जन्मास येतो. ह्यांच्या अनुषंगानें व अनुरोधानें 'जीव' नांवाचे 'प्राज्ञ' नांवाचे प्राणी असतात. हे प्राणी परमार्थतः ब्रह्मस्वरूपीच असतात. पण उपाधि लागली म्हणजे घटाकाश, मठाकाश असे जसे स्वतः अनंत निराकार आकाशाचे स्वरूपभेद होतात, ह्याचप्रमाणें उपाधींच्या स्वाधीन झालेले हे प्राज्ञ जीव असतात, आणि ह्या जीवांवर व्यवहारामध्यें ईश्वराची पूर्ण सत्ता असते. ह्याप्रमाणें अविद्याकृत आणि म्हणून अविद्यात्मक असणाऱ्या ज्या उपाधि त्यांच्यामुळें उत्पन्न होणारी जी परिच्छिन्न अथवा संकुचित अवस्था, इच्या दृष्टीनें मात्र या ईश्वराचें ऐश्वर्य, सर्वज्ञता व सर्वसत्ताधीशता उत्पन्न होतात. परमात्मदृष्टीनें म्हणजे वास्तविक पाहिलें असतां, जेव्हां विद्येच्या सामर्थ्यानें सर्वच्या-सर्व अविद्या व उपाधि अस्ताचलावर जाऊन निःशेष होतात, तेव्हां परब्रह्माच्या आत्म-स्वरूपामध्यें सत्ताधीशता, सत्ता, सत्ता चालविण्याला योग्य जीव, सर्वज्ञता, किंचिज्ञता इत्यादि व्यवहार आत्मस्वरूपात–संभवतच नाहींत. म्हटलेंच आहे 'जेथें पाहावयाला, ऐकायला, जावयाला, दुसरें कांहीं उरत नाहीं (नसतेंच) तो 'भूमा' होय.' 'जेव्हां सर्व आत्मस्वरूपच ओतप्रोत भरून जातें, तेव्हा कोण कोणाला पाहणार?' याप्रमाणें परमार्थ स्थितीमध्यें सर्व व्यवहारांचा अभावच होतो, असें श्रुतीचें तात्पर्य आहे. ह्यालाच अनुसरून गीतेमध्यें भगवान् म्हणतात 'प्रभु जो आहे, तो कर्तृत्व किंवा कर्में, किंवा कर्मफलें आणि त्यांचा व कर्म, कर्मकर्ता, यांचा संयोग, हें कांहींच करित नाहीं.॰ ही सर्व माया आहे. हा त्या बाईचा खेळ आहे. परमात्मानामक प्रभु पापपुण्य इत्यादि कशाचाच अंशभाक् होत नाहीं. केवळ मायेचें राज्य आहे, म्हणून जिकडे तिकडे कर्ता, कर्म, कर्मफल, पापपुण्य इत्यादि मोह पसरला आहे,' सारांश, येथेंही म्हणजे परमार्थाच्या अवस्थेमध्यें सत्ता, सत्ताधीशता, सत्ताधीनता इत्यादि व्यवहारांचा अभावच असतो. पण जेव्हां व्यावहारिक अवस्था सुरू होते, मायेचें राज्य प्रचलित होतें तेव्हां श्रुतिसुद्धां 'ईश्वरजीवादि' विषयांचा अंगीकार करतें. पहा: हा सर्वेश्वर, हा भूतांचा स्वामी, हा भूतपालक, हा सेतु, हीच मर्यादा, अशीं स्वरूपें जीवांचा घोटाळा होऊं नये म्हणून परमात्मा घेतो" (पहा वेदांत सूत्रें अध्याय २ पाद १ सूत्र १४). पण ज्ञानोदय झाला म्हणजे जीवाचें जीवत्वच नष्ट होतें असें नाहीं, तर ब्रह्माचें '[illegible]कार्यत्व' ही नष्ट होतें. शंकराचार्य म्हणतात: "'तें तूं आहेस' या अभेद ज्ञापविणाऱ्या [illegible]

वाक्यानें जसा त्यावेळींच वस्तुतः अभेदच प्रत्ययाला येतो, त्याप्रमाणें जीवाचें जीवत्व व ब्रह्माचे सृष्टिकर्तृत्वही विलुप्त होते. उघडच आहे. भेदज्ञान आहे त्याच्यामुळें उत्पन्न झालेला जो बाजार, त्याचा अंतच यथार्थ ज्ञानानें, साक्षात्कारानें होतो." हे **समन्वय** भाष्यकार म्हणतात कीं, ज्या अर्थी आचार्यांनीं उत्पत्तीच्या अगोदरच ब्रह्म हें ज्ञानस्वरूप असतें असे गृहीत केले आहे व ज्या अर्थी सृष्टिरचनेच्या पूर्वीच ही आपली सृष्टि ब्रह्मज्ञानाचा विषय झाली होती असेंही म्हणतात, त्याअर्थी वरील म्हणणें म्हणजे 'साक्षात्कार झाला असतां भेदवृत्ति मावळून जाते' हे म्हणणें केवळ शब्द मात्र पर्यवसायी आहे. शारीरिक सूत्रांच्या पहिला अध्याय, पहिला पाद, पांचवें सूत्र यामध्यें पुढील शंका व तिचे निवारण कसें केलें आहे, तें पहाः प्रतिपक्ष्याची शंका अशी आहे. '**सर्वज्ञ** हा शब्द स्वार्थानें ब्रह्माला सुद्धां लावितां यावयाचा नाहीं. **पीतांबर** या शब्दाचा 'पिवळे वस्त्र' असा अर्थ लुप्त होऊन त्याचा जसा रेशमी वस्त्र इतकाच अर्थ राहिला आहे, त्याप्रमाणें ब्रह्माला 'सर्वज्ञ' हा शब्द उपचाराने म्हणजे लक्षणेनें ( सर्वापेक्षां अधिक ज्ञान ) लावावयास पाहिजे. कारण ब्रह्माची ज्ञानक्रिया जर अखंड चालू आहे, तर **ज्ञानक्रियेचे** दृष्टीनें ब्रह्माचें सर्व ( पूर्ण ) **ज्ञानस्वातंत्र्य लुप्तच झालें कीं नाहीं?**' या शंकाकारास असें विचारावयाचें कीं नित्य ज्ञानक्रिया असली म्हणजे सर्वज्ञत्वाचा हानि कशी होते? पहा कीं सर्व विषयांवर प्रकाश पाडणें हेंच ज्याच्या ज्ञानाचें स्वरूप आहे व हें स्वरूप अखंड आहे, तो सर्वज्ञ नाहीं हें म्हणणें योग्य नाहा. बरें ज्ञानच जर अनित्य असेल, तर ब्रह्माला केव्हां ज्ञान असतें केव्हां नसतें, असा प्रकार होऊन तें सर्वज्ञ नाहीं, हा सिद्धांत निघेल. तेव्हां ब्रह्माचें ज्ञान नित्य आहे असें धरिलें म्हणजे हा दोष येत नाहीं. 'आतां ज्ञाननित्यत्व ब्रह्माचे ठिकाणी आहे असें धरिलें तर ज्ञानक्रियेचे दृष्टीनें म्हणजे जाणण्याचें सामर्थ्य ब्रह्माला आहे, म्हणून पूर्ण स्वातंत्र्य नाहीं' असें म्हणशील तर तुझें हे म्हणणे बरोबर नाहीं. कारण, नित्य तेजःस्वामी जो सूर्य, नित्य तापद आणि प्रकाशक आहे असे आहे. 'सूर्य ताप देतो व प्रकाश पाडितो' या विधानावरून तो पूर्ण स्वतंत्र आहे, असें आपण नाहीं कां म्हणत?– तो प्रकाशक्रिया करितो म्हणून त्याचें प्रकाशस्वातंत्र्य कमी होते कीं काय? नाहीं. तसेंच ब्रह्माची ज्ञानक्रिया अखंड आहे, म्हणून त्याचें ज्ञानस्वातंत्र्य कमी होत नाहीं. पण, हा तुमचा दृष्टांत बरोबर नाहीं. कारण सूर्य ताप देतो अथवा प्रकाश पाडितो, असें आपण केव्हां म्हणतों? जेव्हां तापणारा अथवा प्रकाशित होणारा दुसरा कोणता तरी पदार्थ अस्तित्वांत असतो तेव्हां. आणि उत्पत्तीच्या पूर्वी ज्ञानविषय जे पदार्थ त्यांचें अस्तित्वच नसते म्हणून ज्ञानक्रिया दृष्टीनें ब्रह्माला स्वातंत्र्य नसतें. हें म्हणणें ठीक नाहीं. कारण 'सूर्य प्रकाशतो' असें जेव्हां आपण विधान करितो, तेव्हां प्रकाशित होणारे पदार्थ आहेत किंवा नाहींत, हा विचारच आपल्या मनांत नसतो. याचप्रमाणें प्रागुत्पत्तीच्या वेळीं म्हणजे सृष्टि होण्याचे अगोदरच 'ब्रह्माने पाहिलें' असें कर्तृत्वासंबंधीं विधान केलेंच आहे कीं नाहीं? आतां पाहणें हें सकर्मक आहे म्हणून पाहण्याचा पदार्थ कोणता तरी हवा आहे, असें म्हणशील

तर आम्हांलाही हें इष्टच आहे. कारण पाहण्याचें पदार्थ तुझ्या शंकेनें प्रकट झाले. 'असे ते कोणते पदार्थ कीं जे प्रागुत्पत्तीच्या काळांत ईश्वरी ज्ञानाचे विषय होतात?' असें विचारशील तर सांगतों ऐक. ज्याला ब्रह्म हें नांव देतां येत नाहीं, ज्याला अब्रह्म असेंही म्हणतां येत नाहीं, जें अव्याकृत अथवा अव्यक्त आहे, परंतु जें आतां व्यक्त होणार, असें जें नामरूप तें ईश्वरी ज्ञानाचा विषय असतें. बाबा? ज्याच्या नुसत्या प्रसादसामर्थ्याच्या साहाय्यानें योगी लोकांस भूतभविष्याचें प्रत्यक्ष ज्ञान होतें असा योगशास्त्रयांचा सिद्धांत आपल्यास सांगतो, त्या नित्यसिद्ध ईश्वराला सृष्टिस्थितिसंहाराचें ज्ञान असतें, हें सांगावयास पाहिजे काय? पुनः तूं दुसरी अशी शंका घेतलीस कीं "'प्रागुत्पत्तीच्या काळीं ब्रह्माचा शरीरादिकांशीं संबंध नसतो म्हणून ब्रह्म पाहणारें आहे किंवा विचारवंत आहे, असें म्हणणें योग्य नाहीं.' ही तुझी शंका अस्थानीं आहे. सूर्यप्रकाशाप्रमाणें ब्रह्माचें ज्ञानस्वरूप नित्य आहे. सूर्याला जशी प्रकाशशील अशा पदार्थांची अपेक्षा नसते किंवा प्रकाशाला साह्यभूत होणाऱ्या–तेलवातीची अपेक्षा नसते, त्याचप्रमाणें नित्यज्ञानस्वरूपी ब्रह्माला ज्ञानसाधनांची म्हणजे इंद्रियादिकांची अपेक्षा नसते. बाबा! अविद्येमुळें संसाराच्या, जन्ममरणरूपी चक्राच्या भोंवऱ्यांत सांपडलेल्या जीवाला शरीरादि व इंद्रियादि साधनांची अपेक्षा असते, त्याप्रमाणें ज्याला ज्ञानप्रतिबंधक अविद्येचा संस्पर्शही नाहीं त्याला ज्ञान होण्यासाठीं इंद्रियांची अपेक्षा असण्याचें कारणच नाहीं." याप्रमाणें जर वस्तुस्थिति आहे म्हणजे ब्रह्म जर ज्ञानस्वरूप आणि सृष्ट्युत्पत्तीचा नामरूपभेद पाहणारें आहे तर हें परमार्थिक व हें व्यावहारिक असा भेद अंगिकारून तत्त्वनिर्णय तरी कसा करावयाचा? पुनः; जें ब्रह्म निरवयव आहे, त्याच्यावर येणारा सावयवत्वाचा दोष, शंकराचार्य पुढील पद्धतीनें घालवूं पाहतात. अध्याय २ पाद १ सू० सत्तावीस मध्यें एक शंका उत्पन्न करून तिचें निराकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. आचार्य या २७ व्या सूत्रावर भाष्य लिहित असतां एक आक्षेप उत्पन्न करितात; "अहो आचार्य! प्रत्यक्ष श्रुति झाली म्हणून काय झालें? आम्हांला विरोधी अर्थाचें ग्रहण करण्यास सांगेल कीं काय? तिच्या आधारावर तुम्ही म्हणतां कीं ब्रह्म हें निरवयव आहे आणि असें असूनही रूपांतर होतें, तें सगळ्या ब्रह्माचें होत नाहीं! ब्रह्म निरवयव असेल तर त्याचें (१) रूपांतर तरी व्हावयाचें नाहीं, किंवा (२) रूपांतर झालें तर तें सगळ्या ब्रह्माचें होईल. कांहीं अंशाचे रूपांतर होतें व दुसरा अंश स्वरूपांतच राहतो असें म्हणाल तर ब्रह्मामध्यें एक रसत्व नसून अनेकरसत्व आहे असें होईल व तें सावयव आहे असें ठरेल. आतां जेथें यज्ञादिकांसारखें कर्म करावयाचें आहे तेथें म्हणजे 'अतिरात्रीचे' वेळीं षोडशी चमस यजमानानें घ्यावा 'अतिरात्रीचे वेळीं षोडशी चमस यजमानानें घेऊं नये' असा जेथें आज्ञाविरोध उत्पन्न होतो, तेथें विकल्प आहे. कोणताही पक्ष यजमानानें घेतला तरी प्रत्यवाय नाहीं, व कोणताही पक्ष घेण्याला यजमान स्वतंत्र असतो. म्हणून कर्म करण्याचें अवधान पुरुषतंत्र असतें; अर्थातच तेथें विरोध उत्पन्न होत नाहीं. पण येथें तसा प्रकार नाहीं. येथें ज्ञानाचा विषय आहे. ज्ञान-

विषयांत पुरुषस्वतंत्रतेची अपेक्षा नाहीं व तिला येथें अवकाशही नाहीं. सारांश येथें विकल्पाच्या आश्रयानें म्हणजे केव्हां रूपांतर होतें, केव्हां नाहीं, असा विकल्प घेतला तरी विरोधपरिहार होत नाहीं. असा हा कठिण प्रसंग आहे व याचें निवारण होणें प्रायः दुरापास्तच आहे." "नाहीं, हाही दोष आमच्या वस्तूला स्पर्श करित नाहीं. कारण हा जो तुला रूपभेद दिसत आहे हा सगळा मायाकल्पित आहे. वस्तुतः नाहीं. अविद्येनें रूपभेद आहे, अशी जाणीव झाली म्हणून परब्रह्मवस्तूंत रूपभेद थोडाच होणार आहे? एखाद्याच्या दृष्टीला वैगुण्य आल्यामुळें एक चंद्राचे दोन चंद्र दिसावयास लागतील; म्हणून तेथें दोन चंद्र झाले असें होत नाहीं. याचप्रमाणें अविद्येनें रूपभेद झाला म्हणून वस्तूंत स्वरूपभेद झाला, असेंही होत नाहीं. या विश्वामध्यें जें नामरूपादि अनेकत्व दिसत आहे, तें अविद्यानिर्मित, अव्यक्ताव्यक्त, अशा नामरूपानें-हें अनेकत्व दिसत आहे. वर सांगितल्याप्रमाणें या नामरूपाला तत्त्व म्हणतां येत नाहीं, व तत्त्व नाहीं असेंही म्हणता येत नाहीं. असो; हे जें नामरूपादि त्याच्या योगानें ह्या ब्रह्मावरही सर्व विश्व व त्यांची रूपांतरे यांचा आरोप उत्पन्न होतो. पण परमार्थानें जें परब्रह्म आहे म्हणजे ब्रह्माचें जें वास्तविक स्वरूप आहे, ते सर्वदां एक स्वरूपच असतें आणि या विश्वाच्या पलीकडे जे वेदांतवेद्य आत्मरूप आहे, तेच तें असतें," असें म्हटलें तरी मूळ आचार्यांचा जो अभिप्राय आहे त्याचा सिद्धि होत नाहीं. कारण येथेंही 'ब्रह्म हें कारण आहे' असा स्वीकार करावाच लागतो. याचप्रमाणें प्रत्यक्ष जें कार्य आहे, त्याचा स्वीकार केल्यावांचूनही गत्यंतर नाहीं तुम्ही विवर्तवाद घ्या किंवा परिणामवाद घ्या कोणाच्यानेंही सृष्टिरहस्याचा, या सृष्टीत व सृष्टिसंबंधानें जीं गूढ आहेत, त्यांचा निश्चित असा कांहींच निकाल देतां येत नाहीं. हीं जीं गुह्यें आहेत, त्याचें गुह्यत्व मनुष्यबुद्धीला उकलावयाचें नाहीं असेंही या आचार्यांनीं आपलें मत स्पष्ट सांगितलें आहे. दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादाच्या एकतीसाव्या सूत्रावर भाष्य लिहित असतां शंकराचार्यांनी स्पष्ट म्हटलें आहे 'हें अतिगंभीर, अतिगुप्त किंवा राजगुह्य जे परब्रह्म त्यांचा अंत लागलाच तर तो श्रुतिमार्गानेंच लागणार. येथें तर्काचें कांहीं एक चालावयाचें नाहीं. पुनः, असा कांहीं नियम नाहीं कीं, ज्या कारणासाठीं एकाला कांहीं विशेष सामर्थ्य आलें त्याच कारणसंघतानें दुसऱ्यालाही तेच सामर्थ्य आलें पाहिजे. ब्रह्माचे ठिकाणीं सर्व गुणांचा प्रतिषेध केला आहे. तथापि त्याच्यामध्यें सर्वशक्तिमत्व असल्याचाही पुष्कळ संभव आहे. याचप्रमाणें ब्रह्म हें कारण आहे, असें पतकरिलें म्हणजे त्याचें ठिकाणीं सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमानत्व इत्यादि गुणांचा अध्याहार करावा लागतो. ही गोष्टही शंकराचार्यांस असंमत नाहीं. अ० २ पाद १ शेवटचें सूत्र पहा. पादपरिसमाप्ती करितांना शंकराचार्य म्हणतातः "ब्रह्म हें कारण आहे व त्यामध्यें...सर्व कारणधर्म आहेत असेंही ठरतें. सारांश हें ब्रह्म सर्वज्ञ, सर्वशक्ति, मायापति असें ठरतें. उपनिषदांच्या आधारावर व आश्रयानेंही आमची पद्धति निर्माण झाली आहेः म्हणून येथें शंकेला जागा राहत नाहीं." आतां ब्रह्माचें ठिकाणीं सर्वज्ञत्वाचा स्वीकार केला म्हणून किंवा ब्रह्माचा कार्याशीं संबंध

प्राप्त झाला म्हणून ब्रह्माला कोणत्याही प्रकारचा दोषबंध लागत नाहीं. कारण अकर्तृत्व हें परमात्म्याचें स्वरूप आहे आणि मायेच्या आश्रयानें त्याला प्रवर्तक धर्मांचा आरोप स्वीकारावा लागतो. याप्रमाणें कार्यसंबंध झाला तरी व ब्रह्माकडे प्रवर्तकत्व आलें तरी ब्रह्म हें स्वरूपापासून केव्हांही च्युत होत नाहीं. "ज्याप्रमाणें जीवाला संसारांतील जन्ममरणादि दुःखाचा अनुभव येतो त्याप्रमाणें ईश्वराला, परमेश्वराला, दुःखाचा अनुभव केव्हांही येणें शक्य नाहीं, अशी आम्ही प्रतिज्ञा करितों. जीवाला अविद्येनें बळकट मिठी मारिली असल्यामुळें, 'देह हाच माझा आत्मा' असा त्याला मोह पडतो व ह्या मोहानें उत्पन्न केलेल्या दुःखामुळें 'मी दुखी आहें' असा अज्ञानकृत दुःखात्मक अभिमानही त्याचे अंगांत संचार करितो. पण परमेश्वराला याप्रमाणें देहाभिमानही नसतो व दुःखाभिमानही नसतो....व्यवहारामध्यें सुद्धां कांहीं भाग्यवंत लोकांस जर आत्मज्ञान व उत्तम शांति हीं प्राप्त झालीं आहेत असें आपल्यास दिसतें तर स्वरूपतः जो परमेश्वर विषयशून्य व ज्याला आपल्या म्हणजे ब्रह्मवस्तुशिवाय कांहींच दिसत नाहीं, अशा नित्यज्ञानस्वरूपी ईश्वराला स्वरूपज्ञान यथार्थ असतें व त्यास शांति मूर्तिमंत मिळते असें आदरून सांगण्याचें तरी कांहीं प्रयोजन आहे काय? तेव्हां सम्यग्दर्शनाचा म्हणजे यथार्थ ज्ञानाचा कांहीं उपयोग नाहीं, असें म्हणण्याचें बिलकुल कारण नाहीं, हें स्पष्ट आहे. पहा कीं, सर्व विश्वाला व्यापणारा सूर्याचा अथवा चंद्राचा प्रकाश 'डोळा घालिता अंगोळी' या न्यायानें म्हणजे असल्या उपाधींनीं सरळ किंवा वांकडा झाल्यासारखा दिसतो म्हणजे उपाधि सरळ, वांकड्या ज्याप्रमाणें असतील त्याप्रमाणें तसें स्वरूप करणाराला दिसतो, पण वास्तविक रीतीनें पाहिलें तर स्वरूपापासून च्युत होत नाहीं, ज्याप्रमाणें घटादिकांत राहणारें आकाश घटादि हलविले म्हणजे हलविलेंसें दिसतें, पण आकाश कोठेंही जात येत नाहीं किंवा हलत नाहीं, ज्याप्रमाणें उदकपात्रादि पाण्यानें भरलेलीं भांडीं प्रकंपित केलीं असतां पात्रांतील पाण्यांत पडलेलें सूर्यप्रतिबिंब प्रकंपित झाल्यासारखें दिसतें, तथापि तो सर्वप्रकाशक प्रकंपित होत नाहीं, त्याचप्रमाणें अविद्यानिर्मित, बुद्ध्यादि उपाधींनीं संकुचित असा जो ईश्वरी अंश 'जीव' त्याला दुःख झालें तरी त्याचा अंशी जो ईश्वर त्याला दुःख होत नाहीं." (पहा. अ. २ पा. ३ सू. ४६).

याचप्रमाणें ब्रह्म आणि ईश्वर अथवा निर्गुण ब्रह्म आणि सगुण ब्रह्म असा भेद पर आणि अपर यावरून होतो. परब्रह्म म्हणजे निर्गुणब्रह्म आणि अपरब्रह्म म्हणजे सगुणब्रह्म अथवा परमेश्वर, असा या आचार्यांचा अभिप्राय आहे. "अविद्येनें उत्पन्न केलेल्या नामरूपादि (संकुचित करणाऱ्या) विशेष्यांचा जेथें प्रतिषेध केला जातो आणि अस्थूलादि शब्दांनीं ज्याचें स्वरूप लक्षित केलें जातें, सारांश सर्व मर्यादेच्या पलीकडचीं नामें ज्या ब्रह्माला योग्य असतात तें परब्रह्म होय. पण कांहींएक विशिष्ट उपासनेला नामरूपांनीं मंडित अशा एका विशेष स्वरूपाचा उल्लेख करावयाचा असतो, त्या मर्यादित किंवा विशिष्ट स्वरूपाला—असें 'मनोमय—प्राण हेंच ज्याचें शरीर'—'प्रकाशस्वरूप' असलीं

विशेषणें देऊन विशिष्ट स्वरूप बनविलेल्या स्वरूपाला अपर ब्रह्म–सगुणब्रह्म–परमेश्वर–असें म्हणतात,” हा शंकराचार्यांचा अभिप्राय आहे, आणि येथेंच इतर भाष्यकार आचार्यांचा व शंकराचार्यांचा विरोध आहे. शंकराचार्यांचें जें अपर ब्रह्म, तेंच इतर लोकांचें परब्रह्म आहे. त्यांच्या परब्रह्माचें स्वरूप व्यक्त, प्रकट झालेलें आहे. आतां परब्रह्मस्वरूपाच्या लक्षणांशिवाय जर त्यांनीं इतर कोणत्याही वस्तूचा ब्रह्मामध्यें अंतःप्रवेश केला नाहीं, तर अर्थातच वादविवादाला जागाच उरत नाहीं. वादाचें स्वरूप जाऊन वितंडतेला म्हणजे तंटयाला आरंभ होतो. ‘सत्य, ज्ञान, अनंत हें ब्रह्म आहे’ ‘आनंद हें ब्रह्म आहे’ इत्यादि जीं ब्रह्मस्वरूप लक्षणें आहेत, त्यांचा अनादर करून केवळ शून्यवस्तूला ब्रह्म म्हणावयाचें, असा प्रकार शंकराचार्यांनीं केव्हांही केला नाहीं. तसेंच त्यांचे प्रतिपक्षी जे आचार्य आहेत त्यांनीं स्वरूपाहून ‘अधिक कांहीं कल्पित वस्तु ब्रह्म आहे’ असेंही म्हटलेलें नाहीं. **रामानुजाचार्यांची उक्ति** पहा: ‘अशब्द, अस्पर्श,’ इत्यादि ब्रह्मलक्षण प्रतिपादनकरणारी श्रुति सांगतें कीं, ब्रह्म हें **भूतभौतिकाहून अत्यंत विलक्षण आहे**. दिव्य आणि कल्याणकर गुण परमेश्वरामध्यें आहेत म्हणून तो सगुण आणि प्राकृत व त्याज्य गुणांचा त्यानें त्याग केला आहे म्हणून तो निर्गुण आहे. ( वेदांततत्वसार ). **श्रीमन्माध्व:** “श्री विष्णुसंबंधानें सर्व विरोधांचा परिहार श्रुतीनें केला आहे. ज्या ज्या गुणांनीं भगवान् घटित झाले आहेत, त्या त्या गुणांचीच प्रकटता श्रुतीनें केली आहे. भगवंताचे घटक गुण कोणते ? तो ज्ञानात्मक, ऐश्वर्यात्मक व शक्त्यात्मक आहे व श्रुतीनें हेच गुण प्रकट केले आहेत.” यांच्यावर भाष्य करणारे यांचे शिष्य म्हणतात कीं, ज्ञानादिकाचा संग्रह करून अन्तवंत वगैरे दोष या आचार्यांनीं नाहींसे केले आहेत. **श्रीमद्वल्लभाचार्य म्हणतात.** “श्रुतीनेंच सांगितलें आहे कीं तो ( भगवान् ) ज्ञानमात्र आहे. आतबाहेर, इकडेतिकडे, तो सर्वच्या सर्व एकरसात्मक ज्ञानानें परिपूर्ण आहे; कारण स्वरूपाला अतिरिक्त करणाऱ्या इंद्रियांचा त्याच्या ठिकाणीं अभावच आहे.” सारांश, ब्रह्मविचार करावयाचा असेल तर तो प्रपंचरूपानें करूं नये; श्रुतींत सांगितलेल्या ब्रह्मस्वरूपानें करावा. फार काय सांगावें ! प्रपंचाचा विस्तार सुद्धां ब्रह्मदृष्टीनें करावा. व्यवहारामध्यें अस्तित्व, भातित्व, प्रियत्व हे ब्रह्मस्वरूप आहे असें समजावें. पण जड, स्थूलादिक पंचमहाभूतांचें धर्म किंवा सुखदुःखादि जीवाचे धर्म हे ब्रह्मस्वरूपांत जातात, असें कधींही मानूं नये. एकनिष्ठ योगाभ्यासरूपी नेत्रांनीं सर्वत्र ब्रह्मस्वरूप अवलोकन करावें हा शंकराचार्यांचा अभिप्राय श्रीकृष्णांनीं अगोदर गीतेमध्यें प्रकट केला आहे ( पहा अ. ८ श्लोक २१–२४ ).

शंकराचार्यांनीं मायेचा अंगीकार केल्यामुळं इतर आचार्य त्यांस मायावादी असें म्हणतात व याच कारणानें शंकराचार्यांचा कीर्तिचंद्र कांहींसा मलिन होतो. तेव्हां आपण ‘माया’ म्हणजे काय, हें पाहूं. “माया म्हणजे परमेश्वराची दैवी शक्ति होय. हिचें स्वरूप अव्यक्त नामरूपाचें आहे. पहिला अध्याय, पाद चवथा, सूत्र नववें यांत

'मायेचा' विचार शंकराचार्यांनीं प्रसंगोपात्त केला आहे. ते म्हणतात: 'माया ही परमेश्वरी शक्ति आहे. इच्या सहाय्यानें समस्त विश्व उत्पन्न होतें,' असें सांगण्याचा श्वेताश्वतर श्रुतीचा अभिप्राय आहे; 'माया ही प्रकृति व महेश्वर ( परमेश्वर ) मायापति आहे' असें उपनिषदांत स्पष्ट म्हटलें आहे. याचप्रमाणें 'प्रत्येक अविद्याकार्यांचे ठिकाणीं परमेश्वराची सत्ता मात्र मायेला काम करावयास लावितें.' असेंही म्हटलें आहे. याचप्रमाणें 'प्रधान' या नांवाची माया ही कोणी स्वतंत्र शक्ति आहे, असें कोणालाही 'आपल्याच सारखी पुष्कळशी प्रजा उत्पन्न करणारी व श्वेत, रक्त, कृष्णवर्णाची माया नामक अनादि वस्तु आहे,' या श्वेताश्वतर उपनिषदांतील मंत्रावरून सिद्ध करितां यावयाचें नाहीं. सारांश माया म्हणजे अव्याकृत नामरूपांची अवस्था म्हणजे नामरूपें प्रकट होण्यापूर्वीची त्यांची अवस्था होय." पुनः आणखी हे आचार्य म्हणतात: "नामरूपांची जोडी मायेनें निर्माण केलेली आहे, ही जोडी पारमार्थिकतः सत्य आहे असें म्हणतां येत नाहीं व असत्य आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. संसाराचा प्रपंच म्हणजे विस्तार हीच जोडी होय. आपल्यास मात्र अविद्येनें ही जोडी ईश्वराचें स्वरूप आहेसें वाटतें. शिवाय सर्व श्रुति आणि स्मृति आपल्यास सांगतात कीं, माया ही ईश्वराची शक्ति आहे. हिलाच प्रकृति असें म्हणतात. या प्रकृतीहून म्हणजे नामरूपाहून निराळा सर्वज्ञ, नामरूपांस अस्तित्व देऊन त्यांचा प्रपंच करणारें जें आकाश, त्या आकाशाचाही नियंता व अंतर्यामी, असा परमेश्वर आहे." (अ. २ पा. १ सू. १४ पहा). शंकराचार्य अ. १ पा. ४ सू. ३ यावरील भाष्यांत म्हणतात: "अव्यक्त नांवाची एक बीज शक्ति आहे. ती अविद्यात्मक आहे. ही मायामयी शक्ति परमेश्वराच्या आश्रयानें असते, ही एक गाढ निद्रेची अवस्थाच आहे. आणि हे संसारी जीवस्वरूप ज्ञानाला सर्वथा विसरून जाऊन इच्यामध्यें म्हणजे या अज्ञानामध्यें खुशाल निद्रा घेत आहेत," हें जें शंकराचार्य म्हणतात, तें सर्व इतर आचार्यांस संमत आहे. म्हणजे इतर सर्व आचार्य या मायेसंबंधीं असेच उद्गार काढितात. 'भगवंताचे धर्म जीवांस समजत नाहींत, हा प्रकार ईश्वरी इच्छेनें म्हणजे मायेनें होतो' हें म्हणणेंही मायावादाला विरोध करणारें नव्हे. मग शंकराचार्यांची इतर आचार्य निंदा करितात, याचें कारण काय? आचार्यांनीं असद्वादाचा आश्रय केला आहे, म्हणून त्यांच्या विरुद्ध हा निंदेचा वर्षाव आहे असें म्हणावें तर तसाही भाग नाहीं. कारण. **असद्वाद** हा अयोग्य आहे, श्रुति-युक्ति संमत नाहीं, असें शंकराचार्यांनीं स्वतः पुष्कळ वेळ सांगितलें आहे. (पहा अ. २ पा. १ सू. १८ ). यांत म्हटलें आहे "कोणाला दहीं, घट किंवा कुंडलें हवीं असलीं तर तो पुरुष ह्या तीन पदार्थांचीं जीं दूध, माती व सोनें हीं कारणें आहेत, त्यांचा आश्रय करून वरील वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करितो, असा व्यवहार आपण नित्य पाहतों. दहीं हवें आहे त्यांनीं मृत्तिकेचा आश्रय केला, किंवा घट हवा आहे त्यानें दूध मिळवून आणिलें आहे, असें आपल्या दृष्टोत्पत्तीला कधींही आलें नाहीं ना? यावरून असत्कार्यवाद (कार्य हें उत्पन्न होण्यापूर्वी कोणत्याही स्वरू-

पानें अस्तित्वांत नसतें, असे म्हणणाऱ्या लोकांचा वाद ) युक्तीला धरून आहे, असें दिसत नाहीं." इतकेंच नव्हे, तर आचार्य म्हणतात कीं, वेदांतामध्यें सद्वादच आहे. "कार्य उत्पन्न होण्याचेपूर्वी ज्या स्थितींत असतें, ज्या अनुपलब्ध किंवा अनुद्भूत (Unevolved) स्थितींत असतें, त्या स्थितीला वेदांतांत 'असत्' असें म्हणतात." यावरून आचार्य सद्वादाचा स्वीकार करितात, हें स्पष्ट आहे. याचप्रमाणें 'कारणाप्रमाणेंच कार्य जें जगत् (हीं सृष्टि) त्याच्याशीं तिन्हीं काळीं अव्यभिचार आहे, म्हणजे कारण आणि कार्य यांची केव्हांही ताटातूट होत नाहीं,' हाही त्यांचा सिद्धांत आहे. याप्रमाणें (१) माया ही ईश्वरी शक्ति आहे, या प्रश्नासंबंधानें, (२) असद्वादामध्यें व (३) कार्यकारणांच्या त्रैकालिक अवस्थांमध्यें जर सर्वत्र एकमत आहे, तर मग हा तंटा कां? हा तंटा इतक्याच कारणाकरितां दिसतो कीं, आचार्यांनीं 'जगत् हें मिथ्या आहे' हा वाद उत्पन्न करून मायावाद व असद्वाद यांस आपल्या भाष्यांत विशेष प्राधान्य दिलें आहे. या शंकेचें समाधान या टीकाकारांनीं असें केलें आहे: "प्रपंचविलय केला तरच ईश्वरप्रणीत योगाला सुकरता प्राप्त होईल आणि प्रपंच खोटा आहे, जगत् खोटें आहे, असें गृहीत केल्यावांचून प्रपंचविलय होऊं शकत नाहीं" म्हणून हा वाद आचार्यांनीं उत्थापित केला आहे. पुढें आणखी हे टीकाकार म्हणतात कीं, 'हा माझ्या कल्पनेचा सिद्धांत नसून आचार्यच या दृष्टीनें मायावादाचें उत्थापन करितात. पहा अ. ३ पा. २ सू. २१ शंकाकार म्हणतोः "अनेकत्वाचें भान उत्पन्न करणारा जो प्रपंच आहे, तो नाहींसा करावा, अशी आज्ञा करण्याचा श्रुतीचा अभिप्राय आहे. कारण प्रपंचाचा जर नाश केला नाहीं, प्रपंचविलय जर केला नाहीं, तर ब्रह्मतत्त्वाचें ज्ञान उत्पन्न होणार नाहीं. म्हणून ब्रह्मतत्त्वाचा अवबोध होण्याला प्रतिबंध करणारा जो प्रपंच त्याचा सर्वथा प्रविलाप केलाच पाहिजे. उघडच आहे. स्वर्गसुखाची अपेक्षा करणाराला 'यज्ञ याग कर' हा उपदेश करावा लागतो, याचप्रमाणें ज्याला मोक्ष हवा त्यानें प्रपंचविलय केला पाहिजे. म्हणजे त्याला सांगितलें पाहिजे कीं, 'तू प्रपंचविलय कर.' तसेंच अंधेरामध्यें ठेवलेल्या घटादिक वस्तूंसंबंधे ज्याला वास्तविक ज्ञानाची अपेक्षा आहे, त्यानें दृष्टिबंध करणाऱ्या तमाचा निरास केला पाहिजे. ब्रह्मतत्त्व समजून घेण्याची ज्याला इच्छा आहे, त्यानें वरील दृष्टीनें प्रपंचविलय केलाच पाहिजे. कारण प्रपंच म्हटला तरी त्याच्या मुळाशीं ब्रह्म असतें. ब्रह्माच्या मुळाशी, स्वभावांत, प्रपंच नसतो. तेव्हां अर्थातच नामरूपी जो प्रपंच त्याचा प्रविलाप केला तरच ब्रह्मावबोध होईल." ही प्रतिपक्षाची शंका घेऊन आचार्य तिचें समाधान करण्यासाठीं म्हणतातः प्रपंचविलय म्हणजे काय समजतां तुम्ही? काय अग्नीचा ताप तुपाला लागल्याबरोबर त्या थिजलेल्या तुपाचा थिजलेपणा, कठिणपणा नाहींसा होतो, तशी प्रपंचविलयाची गोष्ट आहे? किंवा डोळ्यांत कांहीं वैगुण्य असल्यामुळें एक चंद्राच्या जागीं दोन चंद्र दिसूं लागले म्हणून औषधयोजना करून चंद्राच्या अनेकत्वाचा प्रविलाप करितात, त्याप्रमाणें अविद्येमुळें ब्रह्मावर जो नामरूपाचा आरोप आला आहे, तो विद्येच्या योगानें काढून टाकावयाचा आहे. अर्थात नामरूपाचा, द्वैताचा, प्रविलय करावयाचा

आहे ? तुमचें म्हणणें आमच्या पहिल्या दृष्टांतास अनुसरून असेल तर आणि हा विद्य-मान असणारा द्वैतप्रपंच सजीव देहांस ( अध्यात्मिक वस्तूंस ) व पृथ्व्यादि पंचमहाभूतांस ( आधिभौतिक वस्तूंस ) अंतर्भूत करित असेल तर, व हा प्रपंच नष्ट करावयाचा आहे, असें तुमचें म्हणणें असेल तर, आम्ही म्हणतों कीं, हा प्रविलय, हा अध्यात्मिक व अधिभौ-तिक विश्वाचा प्रविलय करणें मनुष्याला सर्वथा अशक्य आहे.—पुरुषप्रयत्नानें ह्या सर्व वस्तु नाहींशा होणार कशा ? नुसत्या कल्पनेमध्यें सुद्धां यांचा प्रविलाप झाला आहे, असें ज्ञान होणें अशक्य आहे. ह्मणून तुम्ही ह्मणतां हा प्रविलय व त्याचा उपदेश या दोन्ही गोष्टी अशक्य व असमंजस आहेत. अर्थातच असा उपदेश श्रुति कधींही करणार नाहीं. पण समजा, एखाद्यानें ही अघटितघटना केली ह्मणजे पृथ्व्यादि पंचमहा-भूतांचा व सर्व जीवांचा प्रविलय केलाच तर, दुसऱ्याक्षणीं निदान या वेळीं तरी हें विश्व पंचमहाभूतशून्य झालें असलें पाहिजे. अर्थात या वेळीं पंचमहाभूतें नाहींत, व त्यास पाहणाराही कोणी नाहीं, अशी स्थिति असली पाहिजे. अशी स्थिति नाहीं, हें आपण उभयतां प्रत्यक्षच पाहत आहोंत. यावरून तुमची पहिली कल्पना ठीक नाहीं, हें ठरलें. आतां तुमची दुसरी कल्पना घेतली तर काय निष्पन्न होतें, तें पाहूं या. "शुद्ध ब्रह्मावर अविद्येच्या आरोपानें सिद्ध झालेला जो नामरूपात्मक प्रपंच, तो विद्यासंपादन करून काढून टाका आणि याप्रमाणें प्रपंचविलय करा, असें तुमचें ह्मणणें असेल तर आह्मांस इतकेंच ह्मणावयाचें आहे कीं, 'एकच एक अद्वितीय ब्रह्म आहे' 'तेंच सत्य आहे, तोच आत्मा आहे, फार काय, तें तूंच आहेस' अशीं जीं श्रुतीचीं महावाक्यें आहेत, यांच्या श्रवणमननादिकांनीं ब्रह्मज्ञान करून घेतलें तर ब्रह्मावर झालेला नामरूपात्मक द्वैतप्रपंचाचा आभास आपोआपच नष्ट होईल. हें ब्रह्मज्ञान झालें ह्मणजे विद्या अथवा ज्ञानविज्ञान स्वयंभूपणानेंच प्रकट होतें. ह्या विद्येच्या योगानें अविद्येचा बाध होतो आणि अविद्या नष्ट झाली ह्मणजे अज्ञानजन्य जो सकल द्वैतप्रपंच तो नाहींसा होतो. झोंपेंतून जागा झालेल्या पुरुषाचें स्वप्न व त्यांतील चमत्कार जसें जागें झाल्याबरोबर नाहींसें होतात, त्याप्रमाणें विद्या प्राप्त झाल्याबरोबर अविद्याकृत प्रपंचाचा विलयही होतो." पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील तिसऱ्या सूत्रावर व्याख्यान करितांना हे आचार्य ह्मण-तात: "महाप्रलयाचे वेळीं सुद्धां या जगतांचा जो प्रविलय होतो तो प्रविलय म्हणजे काय असें विचाराल तर सांगतों कीं, हीं जगतें शक्त्यवशेषप्रविलीन होतात. म्हणजे ज्या ज्या उपादान शक्तींच्या सामर्थ्यानें हीं जगतें उत्पन्न झालीं, त्या सर्व उपादान शक्ति मात्र जिवंत राहून बाकीचा सगळा प्रपंच नष्ट होतो." यावरून हें उघड अनुमान आहे कीं, सर्वशक्तिमंत जें ब्रह्म त्याची धारणा सुलभत्वानें करितां येईल असा, व धारणाकरितां येण्यासाठीं जगाचा प्रविलय करावयाचा आहे, आणि तो प्रविलय सुद्धां जगाचीं मूळ उपादान कारणें ठेऊन करा-वयाचा आहे. एवंच ब्रह्म सर्व शक्तिवंत आहे व शक्त्यवशेषानें जगतांचा नाश करावयाचा आहे, या दोन्ही गोष्टी शंकराचार्यांस मान्य नव्हत्या, असें म्हणतां यावयाचें नाहीं. अर्थातच इतर आचार्यांशीं विरोधही या विषयासंबंधें येण्याचें कारण नाहीं.

ब्रह्म सर्वशक्तिवंत आहे, "ब्रह्म एकच आहे, तथापि त्याची शक्ति विलक्षण असल्यामुळें हें विचित्र व विकारवंत विश्व आणि त्याचा प्रपंच करण्याचें त्यास सामर्थ्य आहे," असें त्यांनीं म्हणणें युक्तच आहे. "ब्रह्म हें सर्वज्ञ, सर्वशक्ति आणि मायावति आहे" असें अध्याय दोन, पाद १ सूत्र ३० व ३७ च्या भाष्यांत स्पष्ट म्हटलें आहे.

याप्रमाणें मायावादासंबंधानेंही फारसा मतभेद होईल असें वाटत नाहीं. आतां या मायावादांत सामान्यतः अंतर्भूत होणाऱ्या दोन तीन पारिभाषिक शब्दांचा विचार करून हा मायावाद आटपतों. रज्जूचे ठिकाणीं सर्पज्ञान किंवा शिंपीचे ठिकाणीं रजताचें ज्ञान होतें हा अनुभव सर्व वाद्यांस आहे. पण या अनुभवाला काय नांव द्यावें व त्याची उपपत्ति कशी करावी, या संबंधानें सर्व मतवाद्यांत वैचित्र्य आहे. 'ख्याति' वाद जो उत्पन्न झाला आहे त्याला कारण उपपत्तीचें भिन्नत्व हेंच होय. पुष्कळ प्रकारच्या ख्याति आहेत; त्यांतील तीनचार ख्यातींचाच मी थोडा विचार करणार आहे. अख्याति, आत्मख्याति, अन्यथाख्याति, असत्‌ख्याति, सत्‌ख्याति व अनिर्वचनीय-ख्याति हे ख्यातीचे विविध प्रकार आहेत. ख्याति म्हणजे प्रसिद्धि, प्रतीति अथवा ग्रहण, भान व कथन हेही ख्यातीचे अर्थ आहेत. सर्वांचें तात्पर्य एकच आहे. असो; आतां असत्‌ख्यातीपासून आरंभ करूं. असत्‌ख्याति म्हणजे नसलेल्या पदार्थाचें भान आणि कथन. आतां शिंपी असून तिच्यावर रुप्याचा आभास झाला असतां शून्यवादी माध्यमिक ( बुद्धानुयायांतील एकपंथ ) म्हणतात कीं, असत् अशी जी शिंपी तिच्यावर असत् अशा रुप्याचा भास झाला आणि म्हणून भ्रम उत्पन्न झाला. या शून्यवाद्यांच्या मतानें सर्व विश्व व त्याचा द्रष्टा जीव व परमेश्वर हे सर्व असत् म्हणजे नास्तित्वरूपी आहेत. सर्वत्र शून्याचें राज्य आहे.—हे राज्य तरी आहे, असें म्हणतात, हें तुमचें आमचें सुदैवच होय !—असो; रुप्याचें ज्ञान होतें तें असत् आहे, म्हणून रुपेंही असत् आहे अशी यांची विचारप्रणालिका आहे. तथापि असत् शुक्तिकेचें जें नित्य भान होत असतें, त्याच्याच ठिकाणीं रुप्याचें भान आकस्मिकतः होणें ही भ्रांति आहे असें हे म्हणतात. सारांश वस्तूचा अभाव असतांना वस्तूचें अस्तित्व भ्रांतस्थितित मानावें लागतें, एवंच माया आहे, अध्यास आहे, हें ठरतें. क्षणिक विज्ञानवादी बौद्ध भ्रमित ज्ञानाला आत्म-ख्याति असें नांव देतात. विज्ञान म्हणजे बुद्धीचा विलास. हा विलास क्षणभर मात्र राहतो म्हणून यांस क्षणिक विज्ञानवादी म्हणावयाचें. विज्ञान म्हणजे बुद्धिविलास. हाच यांचा आत्मा आहे. एवंच आत्मा म्हणजे क्षणमात्रजीवी बुद्धीचा विलास होय. हा बुद्धिविलासच सत्य आहे, दुसरें कांहीं नाहीं, असें यांचें मत आहे. बाहेर जो वृक्षपाषाणादि सृष्टिविन्यास दिसतो, हा सर्व बुद्धिजन्य आहे, कल्पित आहे. वस्तुतः बाहेर कांहीं नाहीं असें हे क्षणिक बौद्ध म्हणतात. शिंपाचेठायीं, रुप्याचा भास होतो, त्यावेळीं तो भास व भासित पदार्थ खराच असतो. पण नेहमीं भास होतो तो पदार्थानुसार होतो. आतां बाहेर पदार्थच जर नाहीं, तर भास कसला होणार ?

बुद्धिविलासच म्हणाल तर क्षणक्षणा यदृच्छेनें पालटणाऱ्या बुद्धीचा विलास व त्याचें भान हीं विशिष्ट प्रकारानेंच कां व्हावीं याला कांहीं कारण तुम्ही आत्मख्यातिवाले सांगत नाहीं, आणि निश्चितपणानें जीं हीं भानें होतात, त्या व्यतिरिक्त जें भान तें कां होतें हेंही तुम्हांस सांगतां येत नाहीं, तुमच्या मतानें दोरीवर सर्पाचा आभास झाला म्हणजे दोरीच्या भानाची अपेक्षा असतां सापाचें भान झालें हें कां झालें हें तुम्हांस नीटपणें सांगतां येत नाहीं. भ्रांतीचें कारण तुम्हांस स्पष्टपणानें सांगतां येत नाहीं व येथें शक्यही नाहीं. अख्यातिवादी म्हणतात कीं जेव्हां अतत्पदार्थाचे ठिकाणीं तत् बुद्धि होते म्हणजे रज्जूचे ठिकाणीं अरज्जुबुद्धि होते, तेव्हां भ्रांति होते, हें खरें आहे. पण ही भ्रांति होण्याचें कारण काय आहे? मंद अंधकार असतांना कांहीं तरी लांबच लांब पडलें आहे असें पाहून सर्प पडला असावा अशी जी भ्रांति होते ती पूर्वी सर्प पाहिला असतो त्याची स्मृति आणि भ्रांतिक्षणीं लांबच लांब पडलेल्या पदार्थाचें स्पष्ट दर्शन हीं दोन्हीं म्हणजे स्मरण आणि दर्शन या ज्ञानांचा घोंटाळा होऊन, म्हणजे स्मृतिज्ञान व प्रत्यक्षज्ञान यांचे भेदाभेद काय असतात यांचें ग्रहण न झाल्यामुळें घोंटाळा होऊन दुष्ट ज्ञान होते व तें पुढें यथार्थज्ञान प्रत्यक्ष झाल्यानंतर बाधित होते. सारांश भ्रांति हें नवीन ज्ञान नव्हे तर स्मृति व प्रत्यक्ष यांचा भेद न कळल्यामुळें झालेलें दुष्ट ज्ञान होय. पण हा दोष कोणाचा? असें या अख्यातिवाद्यांस विचारलें तर त्यांस कांहींच सांगतां येत नाहीं. सारांश भ्रांति म्हणजे काय व ती कां होते, हें या लोकांसही सांगतां येत नाहीं. सांख्य हे अख्यातिवादी आहेत. यांच्या मतें खोटें किंवा असत् ज्ञानच नाहीं. दोरीच्या ठिकाणीं सर्पाचा भास झाला तो भास किंवा शिंपल्यावर रुप्याचा भास झाला तो, हे दोन्हीं भास म्हणजे दोन्हीं ज्ञानें खरीं आहेत. पूर्वी पाहिलेला पण आतां स्मृतीमध्यें असलेला सर्प लांबच लांब होता. आतां प्रत्यक्ष असणारी दोरीही लांबच लांब आहे; तेव्हां प्रत्यक्ष असणाऱ्या ह्या दोरीचे लांबीमुळें **स्मृती**मध्यें असणाऱ्या लांब सर्पाचें स्मरण झालें आणि खरें स्मृतिज्ञान व खरें प्रत्यक्षज्ञान यांमध्यें घोंटाळा होऊन **हा सर्प** आहे असा भास झाला. येथें **हा** प्रत्यक्ष आहे, सर्प स्मृतींत आहे. स्मृति व प्रत्यक्ष यांचा गोंधळ होऊन **हा सर्प** असें भान झालें. पण दोरी प्रत्यक्ष पाहिल्यावर सर्पभान दुष्ट होतें, असें ज्ञान झालें. एवंच दुष्ट ज्ञानांत स्मृतिज्ञान व प्रत्यक्षज्ञान यांचा अविवेक होतो. हा अविवेक भ्रांतीचें कारण आहे असें ह्मणा हवें असेल तर, पण ज्ञान मिथ्या आहे असें मात्र आह्मी ह्मणणार नाहीं. कारण भासमान होणारें ज्ञान खोटें ह्मणावें तर खरें ज्ञान कोणतें हें ठरवावें लागेल व सर्वत्रच अनवस्था होऊन जाईल. येथें अविवेकानें कां होईना पण भ्रांती होतें, ही गोष्ट संमत आहे व ही गोष्ट ऐक्यमत्याला पुष्टच करणारी आहे. या नंतर लक्ष्यांत ठेवण्यासारखा एक अन्यथाख्यातीचा पक्ष आहे; त्याचें म्हणणें असें: अन्यथाख्याति म्हणजे पुढें असलेली वस्तु एक जातीची असून तिची प्रतीति अन्य रूपानें येणें ही होय. किंवा अन्य ठिकाणीं असलेली वस्तु आपल्यास येथें प्रत्यक्ष दिसणें हेंही अन्यथाख्यातीचेंच लक्षण आहे. आतां अन्यस्थळीं असलेला

पदार्थ येथें कसा प्रत्यक्ष होतो, म्हणजे अन्यस्थळीं असलेल्या पदार्थांशीं येथें असणाऱ्या इंद्रियांचा संनिकर्ष कसा होतो, हे विचारल्यास हे अन्यथाख्यातीवादी म्हणतात कीं, " हें रुपें आहे ' या ज्ञानांत हें हा पदार्थ प्रत्यक्ष आहे, रुपें हें ' हें ' याचें विशेषण आहे. आतां विशेष्याशीं इन्द्रियांचा संनिकर्ष होतो, विशेषणांशीं व्हावाच लागतो, असा नियम नाहीं. तेव्हां ' हें ' ह्या विशेष्याशीं इन्द्रिय संनिकर्ष झाला म्हणजे ' हें रुपें आहे ' याचें ज्ञान प्रत्यक्ष होतें. सारांश भ्रांतिकाळां रुप्याचे ज्ञान प्रत्यक्ष होते. म्हणजे अरण्यांतील खाणीमध्यें असणारें जें रुपें त्याचें शिंपीच्या ठिकाणीं प्रत्यक्षज्ञान झालें, हें नेत्र दोषानें झालें म्हणून हें ज्ञान मिथ्या आहे. असो; कांहीं म्हटलें म्हणजे नैयायिकांचा किंवा शुद्ध द्वैतवाद्यांचा पक्ष घेतला काय, किंवा सांख्य अथवा विशिष्टाद्वैतवाद्यांचा पक्ष घेतला काय, तात्पर्य एकच आहे. ते हें कीं, भ्रमस्थळीं एका पदार्थाचे ठिकाणीं दुसऱ्या पदार्थाचें ज्ञान होतें. मग हें ज्ञान नैयायिक व शुद्धाद्वैती म्हणतात त्याप्रमाणें नेत्रदोषानें दूरस्थ पदार्थ प्रत्यक्ष झाला म्हणून होवो, (किंवा श्वेतरधर्मी पदार्थांचा अध्यास पदार्थावर होवो) अथवा सांख्य म्हणतात तसें दूरस्थ पाहिलेल्या सर्पाचें स्मृतिज्ञान व येथें असलेल्या लंबायमान वस्तूचें प्रत्यक्ष ज्ञान यांच्या ग्रहामध्यें अविवेक झाला, म्हणून भ्रांति होवो, एका वस्तूच्या ठिकाणीं दुसऱ्या वस्तूचें ज्ञान झालें तें भ्रांतिजन्य ज्ञान आहे. नैयायिक व शुद्ध द्वैती **अन्यथाख्याति** असें या भ्रांतीला म्हणतात व सांख्य याच भ्रांतीला **अख्याति** म्हणतात. शुद्धाद्वैती वल्लभ हे या भ्रांतीला अज्ञानदशेंत **अन्यथाख्याति** व ज्ञान स्थितींत **अख्याति** अशीं नांवें देतात. अद्वैतवादी–केवलाद्वैतवादी–या भ्रमजन्य ज्ञानाला **अनिर्वचनीयख्याति** असें म्हणतात. अनिर्वचनीय म्हणजे जेथें ' सत् ' ( खरें ) असें म्हणतां येत नाहीं, कारण भ्रमकाळीं दिसलेला सर्प, रज्जुज्ञान झाल्यावर नाहींसा होतो. खरें ज्ञान बाधित होत नाहीं. ' असत् ' ( खोटें ) असें म्हणतां येत नाहीं. कारण भ्रांतिकाळीं सर्प दिसतो. नसलाच तर दिसला कसा असता? असत् दिसेल कसे? व ' सदसत् ' असेंही म्हणतां येत नाहीं; कारण एकाच ज्ञानाचे ठिकाणीं खरें व खोटें असे धर्म राहूं शकत नाहींत. इंद्रियें व अर्थ यांचा संनिकर्ष झाल्या व्यतिरिक्त ज्ञान होत नाहीं. भ्रांतिकाळीं कां होईना, पण सर्पज्ञान झालें आहे, **सर्प दिसला** आहे म्हणून हें ज्ञान असत् नाहीं. भ्रमनिवारण झाल्यानंतर **दोरी** दिसते, सर्प नष्ट होतो म्हणून तें नष्ट झालेलें सर्पज्ञान सत् ( खरें ) नाहीं. भ्रांतिकालीं झालेलें सर्पज्ञान सत् व असत् असूं शकेल असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण एकाचकाळीं एका ज्ञानाचे ठिकाणीं दोन अत्यंत विरोधी धर्म असूं शकावयाचे नाहींत. तात्पर्य जें ज्ञान ' सत् ' नाहीं, ' असत् ' नाहीं, व ' सदसत् ' ही नाहीं तें **अनिर्वचनीय** ज्ञान अथवा ती अनिर्वचनीय ख्याति होय. अध्यास म्हणजे अनिर्वचनीय ख्याति होय. येथेंही अन्यवस्तूचे ठिकाणीं अन्यतर वस्तूचें भान 'आहे ही सर्व सामान्य गोष्ट सर्व आचार्यांस संमत आहे. सारांश भ्रांति हा धर्म सर्वांस मान्य आहे. केवळ भ्रांतीच्या मीमांसेमध्यें विप्रतिपत्ति आहे.

—७७—

युरोपियन मतानें पाहिल्यास ज्या ज्ञानाला आमचे आचार्य अध्यास किंवा माया म्हणतात, त्या ज्ञानाला तिकडील तत्त्वज्ञ 'सापेक्षज्ञान' असें म्हणतात. सापेक्ष म्हणजे जें निरपेक्षज्ञान नव्हे तें ज्ञान. **यथार्थ ज्ञानाला** ( Knowledge of things in themselves ) निरपेक्ष ( Absolute ) ज्ञान असें नांव द्या. आतां जसा अर्थ म्हणजे वस्तु आहे, तसें ज्ञान, म्हणून निरपेक्ष ज्ञान, होणें शक्यच नाही. कारण इंद्रियें व पदार्थ यांचा संनिकर्ष झाल्यावांचून विषयज्ञान होण्याला दुसरें साधनच नाहीं. सारांश विषयाचें, ज्ञेयाचें, ज्ञान होण्याला प्रत्यक्षाशिवाय दुसरें प्रमाण नाहीं. इंद्रियांशिवाय दुसरें साधन नाहीं. अनुमान, शब्द, उपमान, इत्यादि प्रमाणें आहेत; पण ता सर्व प्रत्यक्षोपजीवि असल्यामुळें प्रत्यक्षाचा कायतो प्रमाणदृष्टया विचार करावयाचा आहे. ह्याचप्रमाणें मन, बुद्धि, इत्यादि ज्ञानसाधनें आहेत, पण तींही इंद्रियांच्या द्वारानें सर्व विषयज्ञानग्रहण करित असल्यामुळें इंद्रियांचा मात्र विचार साधनदृष्टीनें करावयाचा आहे. असो; तेव्हां इंद्रियें व अर्थ यांचा संनिकर्ष झाला म्हणजे जें ज्ञान होते तें प्रत्यक्ष ज्ञान. आतां विषयाच्या स्वरूपासंबंधानें किंवा गुणकर्मासंबंधानें मला जें ज्ञान होतें तें **विषय जसा आहे तसें होत नाहीं**, तर **इंद्रियें ज्याप्रमाणें सांगतील, रपोट देतील, त्याप्रमाणें हें ज्ञान असणार.** इंद्रियांची घडण आहे त्यापेक्षां निराळी असती तर त्यांचें सांगणें, त्यांचा रपोट निराळाच आला असता. ज्याला कांविळ झाली आहे किंवा ज्याच्या डोळ्याचें भिंगास चीर पडली आहे, त्याचा वस्तुविषयक रपोट सामान्य मनुष्याच्या रपोटाहून निराळा असतो; कोणाला रंग दिसत नाहीं, कोणाला वासाचें भान असत नाहीं, कोणाला स्वराचें गोत्र कळत नाहीं, अशा इंद्रियवैकल्यानें उत्पन्न होणाऱ्या विभिन्न अनुभवावरून असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं, इंद्रियघटना निराळी असती तर ज्ञान, वस्तुज्ञानही, निराळें झालें असतें, हें उघड आहे. अर्थातच हल्लींच्या मानवजातीला जी इंद्रियघटना व जो इंद्रियविन्यास प्राप्त झाला आहे, तदनुरूप वस्तुज्ञान होत आहे; जशी वस्तु आहे तसें ज्ञान आपल्यास होत नाहीं. ( न रूपमस्येह **तथोपलभ्यते** ) ह्या गीतावाक्याचा अनुवाद १७ व्या १८ व्या व १९ व्या शतकांत युरोपदेशांत होत होता, ही गोष्ट कौतुकाची, अभिमानाची व धन्यवादाची आहे. नव्हे बरें ? असो; वस्तुज्ञान होतें तें इंन्द्रियें रपोट देतील तसें होतें म्हणजे इंन्द्रियें जें ज्ञान देतात, तें सापेक्ष ज्ञान म्हणजे आमचें मायिक ज्ञान होय. हें सापेक्ष ज्ञान **सत्** नाहीं. कारण तें वस्तूचें निरपेक्षज्ञान, केवलज्ञान, नव्हे, **असत्** नाहीं, कारण तें प्रत्यक्ष दिसत आहे, 'सदसत्' ही नव्हे म्हणून **अनिर्वचनीय** होय. सारांश कोणत्याही सेंद्रिय जीवाचें ज्ञान सापेक्षच असावयाचें. प्रत्यक्ष परमेश्वराचें ज्ञानही सापेक्षच असावयाचें; कारण तो तरी बाह्य वस्तूच पाहणार. पाहण्याचा, कळण्याचा, विषय आला कीं, झालेलें ज्ञान **सापेक्षच** असावयाचें. यावरून स्पेन्सरादि तत्त्वज्ञांनीं असा निष्कर्ष काढिला कीं, निरपेक्षज्ञान, केवलज्ञान, शक्यच नाहीं. अर्थातच हें मत ग्राह्य नाहीं. कारण कोणत्याही प्रकारें इंद्रियांचें सहाय्य न घेतां 'अहं' विषयीं मला जें भान प्राप्त झालें आहे तें केवलज्ञानच आहे. आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान, हीं केवल-

ज्ञानें होत. या आत्मज्ञानाचें जें स्फुरण झालें, तेंच श्रुति वदली म्हणून श्रुतीला प्रामाण्य आलें व तें ज्ञानही केवलात्मकच आहे. इतर सर्वज्ञान व्यावहारिक, सापेक्ष म्हणून मायिक होय. तेव्हां हें ज्ञान समजून घेऊन त्याचा निरास करावयाचा व आत्मज्ञानाचा संग्रह करावयाचा हा श्रुतीचा व गीतेचा कटाक्ष आहे.—असो.

माया ही (ब्रह्मास सगुण स्वरूप देऊन निर्माण झालेल्या) परमेश्वराची शक्ति आहे. हिलाच अविद्या म्हणतात. हिचें लक्षण काय असें विचारलें तर कांहीं सांगतां यावयाचें नाहीं. हिला वस्तु म्हणजे सत्यपदार्थ म्हटलें तर तेंही शोभत नाही; कारण ती वस्तुतः नाहीं. पण ही माया नाहीं, असें म्हटलें तर तेंही ठीक नाहीं; कारण ती आहेशी दिसते. अर्थातच हिचा उगम भ्रांतीपासून आहे. भ्रांतीपासून जिचा उद्भव आहे, तिचें लक्षण देतां येणें शक्य नाहीं. पण विचार करितां असें दिसतें कीं, नामरूपात्मक आणि म्हणून द्वैतप्रपंचात्मक विश्व झालेसें दिसत आहे व त्यांत जीव जन्मास येऊन सुख-दुःखादि भोगतातसे दिसतें, हा सर्व मायेचा खेळ आहे. ज्याप्रमाणें एखादा गारुडी आपल्या अजब अशा जादूगिरीच्या कसबानें एक अद्भुत चमत्कार उत्पन्न करून दाखवितो, नसेल ते उत्पन्न करितो व असेल तें नाहींसें करितो, त्याचप्रमाणें महा शक्तिमान् जो सर्वज्ञ प्रभु तो या मायेच्या सहाय्यानें हें विश्व उत्पन्न करून आपणच त्याचा कर्ता, भर्ता, शास्ता व हर्ता आहे असें, व आपणच उत्पन्न केलेल्या आणि उत्पन्न झाल्यावर स्वकर्मानें परिणत झालेल्या सुखदुःखांचा उपभोग घेऊन हर्ष शोकान्वित असणाऱ्या जीवांस उत्पन्न करितोसें दिसतें. याप्रमाणें या दिसणाऱ्या विश्वाचें उपादानकारण माया हें खरें; पण माया ही एक ईश्वरी शक्ति आहे म्हणून ईश्वरच या विश्वाचें उपादानकारण आहे, निमित्त कारण तर तो आहेच आहे. ब्रह्माशीं सक्षम होऊन मायेनें अथवा रामजोशी-बोवा म्हणतात त्याप्रमाणें माया नामक कोल्हाटणीनें एकदां खेळ सुरू करून प्रवृत्ति-पंथाचा पाया घातला म्हणजे 'एकाचे एकवीस व पांचाचे पंचवीस' होण्याला आरंभ होतो. अनेकत्व आलें म्हणजे भेदाचें राज्य सुरू होऊन नामरूपात्मक जगतांचा उदय होतो. पुढें पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचप्राण, मन, बुद्धि, अहंकार, इत्यादि भेद, प्रभेद, प्र-प्रभेद होतात, शरीरयष्टि तयार होते. हा जडसृष्टीचा उत्क्रां-तीचा अथवा विसृष्टीचा क्रम होय. उपनिषन्मंत्रावरून हा क्रम सांख्यांनीं ठरविला आणि त्याचाच अवलंब कांहीं उत्तरकालीन उपनिषदांनीं व वेदांतप्रवर्तक शंकराचार्या-दिकांनीं करून विश्वोत्पत्तीची व देहोत्पत्तीची प्रणालिका निश्चित केली. ही उत्क्रांती, ही विसृष्टि, मायानिर्मित तर खरीच आहे व विश्वांत दिसणारे भेदप्रभेद हेही या कोल्हाट-णीचेच खेळ आहेत. पण या सर्व खेळांत एक गोष्ट सर्वत्र ओतप्रोत भरलेली आहे, एक वस्तु सर्वत्र अनुस्यूत आहे. ती वस्तु म्हणजे ब्रह्म होय. याचप्रमाणें अज्ञानाला वश होऊन भेदप्रभेद पाहणारे, सुखदुःख भोगणारे जे अनंत जीव ते हे द्रष्टे दिसतात, हे वस्तुतः निरनिराळे नसून 'अवघे ब्रह्मरूप' आहेत; पण यांनीं मायेच्या स्वाधीन आपलें

झाल केलें असल्यामुळें ' हा मी, तो मी नव्हे ' असा भेदभाव; व ' हें माझें, हें तुझें नव्हे' असाही भेदभाव निर्माण करून घेऊन सुखदु:ख भोगीत आहेत. सारांश ज्ञानस्वरूप जें एक ब्रह्म त्याचेंच विभाजन झालें कीं काय असा भ्रम होऊन हें ज्ञानस्वरूप ब्रह्म आपल्यासच अनंत ' ज्ञानी ' जीव असें कल्पून सुखदु:खाचा, अनुभव घेत आहे, कामक्रोधाचा आवेग सहन करित आहे, जन्ममरणाच्या घटीयंत्रांत सांपडलें आहे, कर्माकर्म व धर्माधर्म या विधिनिषेधांच्या साम्राज्यांत गुरफटलें आहे, असें दिसतें. पण अंतर्यामीं व वस्तुतः हें सर्वच ब्रह्म आहे. सारांश पाहण्याचा विषय जें हें विश्व तेंही ब्रह्म आणि पाहणारा जो जीव तोही ब्रह्म आणि पाहणें हेंही ब्रह्म, असा सर्व समन्वयाचा प्रकार आहे. पण हा दिसणारा प्रपंच मायेनें केलेला आहे; म्हणून मायेचें दिसणारें व असणारें स्वरूप समजून घेऊन जीवानें स्वस्वरूपाकडे जावें हा सर्व शास्त्रांचा, सर्व धर्मांचा व सर्व तत्त्वज्ञानांचा अभिप्राय आहे.

याप्रमाणें हें दृश्य विश्व अथवा व्यावहारिक विश्व आहे. आतांच सांगितल्याप्रमाणें येथें अनंत जीव आपआपल्या बुद्ध्यनुसार व कामक्रोधानुसार येथें व्यवहार करित आहेत व याच जगांत जीवाच्या ज्ञानाला व रागद्वेषाला विषय होणारे अनंत पदार्थ आहेत, ही प्रतीति प्रत्येकास आहेच आहे. पण परमार्थदृष्टीनें पाहिलें असतां हीं अनंत विशेषज्ञानें व या विशेषज्ञानांचे विशेष विषय हें खरें नाहीत, हा सर्व मायेचा घटोत्कची बाजार आहे, हें पुष्कळांस, पुष्कळ पुष्कळांस, विदित नसतें. असो, पण यावरून कोणीं असें मात्र अनुमान काढूं नये कीं, विज्ञानवादी बुद्धांचा सिद्धांत खरा आहे. विज्ञानी बुद्ध असें म्हणतात कीं, " ' सत्य ' असें कांहींच नाहीं. आपल्याला विज्ञान होईल, अनुभव येईल, तो मात्र खरा; बाकी त्या विज्ञानाचा किंवा अनुभवाचा विषय बाह्य विश्वांत मुळींच नसतो." सारांश आपल्या बुद्धीचे विलास मात्र खरे असतात. बाकी येथें कांही एक खरें नसतें. ह्या मतांत व इंग्लंडांतील बिशप बार्कले साहेबांच्या मतांत बरेंच साम्य आहे. असो; पण शंकराचार्यांच्या दृष्टीनें हें मत वेदसंमत नाहीं म्हणून व खरेंही नाहीं म्हणून सर्वथा त्याज्य आहे. आपल्या विज्ञानांत जेवढें सत्य आहे, तेवढें बाहेरच्या विज्ञान-विषयांतही आहे, हें विसरतां कामा नये. दोन्हीही म्हणजे अनुभव व अनुभवविषय मायेचे विलास आहेत खरे; पण त्यांच्या मूळाशीं ब्रह्म म्हणजे सत्य वस्तु आहे. अर्थातच या म्हणण्यानें शून्य वादाचाही निरास होतो.

जादूगाराचें इंद्रजाल काय आहे हें न कळल्यामुळें अतज्ञ लोक फसतात. याचप्रमाणें ज्यांस आत्मज्ञान झालें नाहीं आणि म्हणून ज्यांस मायेच्या पडद्यांतून व पडद्या पलीकडे काय आहे हें बघतां येत नाहीं, त्या लोकांस सद्वस्तु काय आहे हें समजत नाहीं. आपण स्वतः ब्रह्मरूप असतांही मायेच्या झपाट्यानें जीव अंधळा होतो आणि ज्यांच्याशीं आपला संबंध नाहीं त्या उपाधींस ममत्वानें बघूं लागतो. मी शरीर, मी

प्राण, मी इंद्रियें, मी मन, असा त्याला भ्रम होतो. शरीर, प्राण, मन, इंद्रियें, बुद्धि हीं सर्व आपल्या मायेचीं लाडकीं बाळकें बरें ? हे सर्व अज्ञानाचे विलास ना ? वस्तुतः ज्ञानस्वरूप, आनंदरूप, सत्तारूप जो जीव (हा परमेश्वराचाच अंश !) हा अमायावंत असल्यामुळें तटस्थ असावयाचा खरा; पण मायेच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें हाच जीव अल्पज्ञ, अल्पानंदी, जन्ममरणाचा दास, अल्पशक्ति असा झालासा दिसतो. पुनः; हीच माया ह्या भ्रांत जीवाला कर्म करावयास लावते. कामक्रोधाचे व सुखदुःखाचे प्रवर्तक ( प्रेरक ) उत्पन्न होऊन हे जीवाच्या पाठीमागें लागतात. हें कोणाचें सामर्थ्य ? मायेचें बरें ! प्रलयाच्या अंतापर्यंत अज्ञानी जीव जन्मोजन्म प्रापंचिक कर्म करीत राहतो आणि सृष्टीचा क्रम सुरू झाला म्हणजे पुनः कर्म करावयास लागतो. अनंत काळपर्यंत अज्ञानी जीव म्हणजे मायेनें झपाटलेला जीव अज्ञानी कर्मांत म्हणजे तत्काळ सुख देणाऱ्या पण अंतीं दुःखात्मक होणाऱ्या कर्मांत गुरफटून राहतो. पण कांहीं भाग्योदय होऊन जर एखादे वेळीं विचाररूपी ज्ञानपंचाक्षरी मिळाला, गुरुप्रसाद झाला, ईशकृपा झाली, तर तो ज्ञानपंचाक्षरी मायेनें झपाटलेलें झाड सोडवितो. म्हणजे ही माया जर समूळ उखणून काढावयाची असेल, सर्व अज्ञानाचा, सर्व अविद्याविजृंभणाचा निःपात करावयाचा असेल तर वेदांत सांगितलेला जो ज्ञानमार्ग आहे त्याचें आराधन करण्यास आरंभ केला पाहिजे. अंधकाराचा नाश जसा दीप करितो, तृष्णेचा नाश उदक करितें, संशयाचा निरास खरें ऐकल्यानें होतो, त्याचप्रमाणें मायेचा नाश ब्रह्म ज्ञानानें होतो. ज्ञान होऊन विज्ञान होणे म्हणजेच ब्रह्मज्ञान होय.

माया ही वस्तु म्हणजे भ्रांतिजन्य अध्यास आहे, प्रत्यक्षानुमानादिकांचे विषयांची जननी आहे, असे वरील वर्णनावरून वाचकांस समजलेंच असेल. उपाधि, नामरूपें, हिचींच बालकें होत. सत्व, रज व तम हे तीन गुण मायेचे आहेत. या गुणांनीं व या गुणांवरच ती सर्व जीवांस कामक्रोधादिकांनी वश करिते व झुलवित असते. हिचें मूळस्वरूप 'अव्यक्त' होय. व्यक्त स्वरूप म्हणजे हें विश्व होय. बाह्य विश्व म्हणजे दिसणारें जगत् आणि अंतर्विश्व म्हणजे प्रत्यक्ष अनुमानादि ज्ञानें व कामक्रोधादि मनोवृत्ति होत. पण ही दोन्हीं विश्व मायाजन्यच आहेत. "मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ॥" लौकिकच व्यवहार हिच्या आश्रयानें चालतो, असें नाहीं तर वैदिक व्यवहार सुद्धां हीच घडवून आणिते. "भ्रामयन्सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया ॥" तामस व राजस अवस्थेंत जीवाला कर्मप्रेरक मायाच आहे. मायाच नसती तर जीव सदैव तामस स्थितींतच राहिला असता. पण ही माया राजस स्थितींत जीवाला तापदायक होते, तथापि त्याकडून सुखदुःखात्मक कर्म करिवते. सात्विक स्थितींत आल्यावर म्हणजे स्वार्थीकर्म सुटून ज्ञानाचा अधिगम झाल्यावर ही माया जीवाचें दास्य पत्करून त्यास क्रमाक्रमानें उन्नत स्थितीला नेते व शेवटीं आपण नष्ट होऊन जीवास शिवस्वरूप देते. मात्र माया ही दासी आहे, आपण तिचे दास नव्हों, असें जीवानें प्रत्येकक्षणीं ध्यानांत ठेऊन तद-

नुसार आचरण केलें पाहिजे. सारांश, विचारी जीव शास्त्रपूर्वक विचार करून मायेला म्हणजे मायेला दासी करितो; पण तोच जीव अज्ञानाला वश झाला म्हणजे तो मायेचा दास होतो.

माया ही भ्रांति खरी, खोटीही खरी; पण कोणाला ! वेदानुसार विचार करणाराला माया भ्रांतिजन्य आहे असें दिसेल. अज्ञानी पुरुषाला हें जगत् व येथील व्यवहार सर्वतः खरे वाटतात. त्याला मायेचा प्रश्न येतच नाहीं. एवंच ज्ञानी पुरुषाला व अज्ञानीपुरुषाला 'माया' खोटीच वाटणार. त्यांच्या दृष्टीनें माया नाहींच आहे. तर मायेचें वसतिस्थान कोणतें ? अज्ञान्याला कांहींच समजत नाहीं म्हणून त्याच्या दृष्टीनें माया हा पदार्थच नाहीं. ज्ञान्याला सर्वच समजतें, म्हणून त्याच्याही दृष्टीनें माया नाहीं ! जग दिसतें तसेंच आहे असें ज्याला वाटतें त्याला माया भासत नाहीं. तसेंच जगत् नसून ब्रह्मच आहे, असें ज्ञान ज्याला झालें, त्यालाही माया भासत नाहीं. तेव्हां माया 'खोटी' हेंच खरें. पण ब्रह्म म्हणून कांहीं आहे, जगाच्या, दिसते त्याच्या, पलीकडे कांहीं तरी असलें पाहिजे, असें ज्ञान ज्याला परोक्षतः झालें आहे, परंतु भासणारें जग परमार्थतः नाहीं असा अनुभव देणारें ज्ञानविज्ञान ज्याला झालें नाहीं, त्याला मायेचा विचार करावा लागतो. असो; हा विचार मी अन्यत्र केला आहे, इतर मोठमोठ्या अधिकारी पुरुषांनींही याचा विचार पुष्कळच केला आहे, व पुष्कळ विचार करण्यासारखाही आहे, हें सर्व खरें; पण स्थळाचा अभाव म्हणून मी येथेंच मुक्काम करितों.

श्रीमच्छंकराचार्यांशिवाय वेदांतावर भाष्यें लिहिणारे आचार्यांपैकीं तिघांचा मात्र मी वारंवार उल्लेख केला आहे. हे तिघेही आचार्य, शंकराचार्यांच्या मायावादाला सर्वथा विरोध करितात. हा असा स्पष्ट व पूर्ण विरोध आहे तरी व्यावहारिक कर्म व उपासना या गोष्टीमध्यें या सर्वांत कोठेंच विसंवाद नाहीं हें दाखविण्याचा माझा संकल्प आहे.

श्रीमद्रामानुजाचार्यः—

"अविद्या म्हणजे स्वरूपाचें पूर्ण अज्ञान, ( २ ) किंवा ज्ञानेंद्रियें बिघडल्यामुळें होणारें मिथ्या ज्ञान ( ३ ) किंवा मज्जातंतूमध्येंच कांहीं बिघाड झाल्यामुळें होणारें भ्रांतिजन्य ज्ञान, होय. हें अज्ञान जीवांस असतें व यामुळें ते जीव फल देणाऱ्या सदसत्कर्मांमध्यें गुरफटून जातात. त्यांचा ज्ञानरूप जो स्वभाव त्याला विसरून जाऊन आपण अचित् म्हणजे जड आहों असें त्यास अविद्या म्हणजे माया, तिच्या योगानें वाटतें. स्वप्नामध्यें आपण जें काय पाहतोसें वाटतें तें सर्व मायिक म्हणजे मिथ्या असतें. माया ही परमेश्वरी शक्ति आहे. प्रकृति ती हीच होय. विश्वाचें 'माया' हें उपादान कारण आहे. आणि ही माया परमेश्वराच्या आज्ञेंत चालते; कारण परमेश्वर मायापति आहे. जीव हा मायेचा दास आहे. 'अविद्या म्हणजे कर्मसंज्ञा होय' असें विष्णु-

पुराण ह्मणतें. भेदाभेदाला कारण ही अविद्या आहे. परमेश्वराचें ध्यान केलें असतां या अविद्येचा नाश होतो. ज्या वस्तु विकार्य आणि मर्त्य आहेत त्यांत, खरें 'सत्य' नाहीं ह्मणजे त्या 'असत्' असतात. या दृष्टीनें सर्व 'अचित्' पदार्थ 'असत्' आहेत. 'अहंकर्तृत्व' अविद्याजन्य आहे. त्याचप्रमाणें 'ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान' हे भेदही अविद्याजन्यच आहेत. तसेंच अनादि कर्मपरंपरेच्या संस्कारानें जीवाचें मूळ स्वरूप 'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः' ह्या न्यायानें आच्छादित होतें, ह्मणजे जीव संसारांत असतात तोंपर्यंत त्यांस मूळ स्वरूपाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. हा संसार 'ब्रह्माच्या' अज्ञानानें उत्पन्न होतो. जीव गुणांशीं सक्त होतात ह्मणून कर्मांच्या चक्रांत सांपडतात."

येथें मायेचा जेवढा भाग या आचार्यांनीं घेतला आहे, तितक्यामध्यें विसंवाद मुळींच नाहीं. जीव ज्ञानस्वरूप असतां, तो अज्ञान कां पत्करितो हा वाद यांनीं उत्थापित केलाच नाहीं, म्हणून 'सर्व भेदज्ञान अज्ञानमूलक आहे व अज्ञानपर्यवसायी आहे' या प्रश्नाकडे या आचार्यांचें लक्ष गेलें नाहीं. असो; समन्वयकारांनीं या आचार्यांचें म्हणून एक वाक्य दिलें आहे, तें चिंतनीय आहे. "शरीरगोचरात्वहंबुद्धिरविद्यैव। यथोक्तं भगवता पराशरेण 'श्रूयतांचाप्यविद्यायाः स्वरूपं कुरुनंदन। अनात्मन्यात्मबुद्धिर्या इति.'" ("ज्या बुद्धीला शरीर मात्र गोचर आहे, शरीरापलीकडील भाग, भौतिकापलीकडील आत्मिक भाग, गोचर नसतो, ती अहंबुद्धि अविद्याच समजावी. भगवान पराशर ह्मणतात. 'कुरुनंदना! अविद्येचें स्वरूप मी सांगतों तें एकः अनात्मकाला आत्मा असें म्हणणें, जाणणें, हीच अविद्या'") हें श्रीमद्रामानुजांचें वाक्य मला उपलब्ध झालें नाहीं. पण हें जर वाक्य त्यांच्या ग्रंथांत असेल तर वादाचा पुष्कळसा भाग कमी होईल. व्यावहारिक दृष्टीनें श्रीमच्छंकराचार्य या संमतीपेक्षां जास्त कांहीं मागत नाहींत.

श्रीमन्माध्वमतसंस्कारकांचा अभिप्राय पहाः 'सच्चिदानंदरूपाणां जीवानां कृष्ण-मायया' अचिन्त्याऽविद्यया तत्त्वविस्मृत्या संसृतिभ्रमः॥ भागवतामृत. (सच्चिदानंदस्वरूपी जे जीव त्यांस तत्त्वाचें विस्मरण करविणारी कृष्णमाया कीं जिचें स्वरूप कसें आहे तें सांगतां येत नाहीं व चिंतनही करितां येत नाहीं, ती अविद्या उत्पन्न झाली म्हणजे या शुद्ध जीवांस--संसारभ्रम होतो) म्हणजे 'अविद्येनें उत्पन्न होणारा जो संसार तोही भ्रमात्मकच आहे' असा अर्थ समन्वयभाष्यकार देतात. हें जर खरें असेल तर श्रीमन्मध्वाचार्यही शांकरमताला बरेच अनुकूल आहेत, असें होईल. ही एक मोठी सद्वार्ताच होय. पुढें हेंच माध्वानुयायी म्हणतातः "मुक्तस्थितीमध्यें जीवाला स्वरूपज्ञान होतें आणि तो मायेपासून निवृत्त होतो."

श्रीमद्वल्लभाचार्यः—

'जीव जर ब्रह्माचा अंश आहे तर त्याला दुःख कां' अशी शंका उत्थापन करून हे आचार्य म्हणतातः "आपण पुष्कळ होऊन रमावें," अशी परब्रह्माला इच्छा झाली.

तेव्हां परब्रह्माचें जें आनंदस्वरूप तें अंतर्धान पावून ब्रह्माला जीवस्वरूप प्राप्त झालें, आणि ऐश्वर्य, वीर्य, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य या ब्रह्माच्या षड्गुणाचा लोप झाला; त्या बरोबर (१) दीनता व पराधीनत्व, (२) दुःखसंगति (३) हीनत्व (४) जन्ममरणादि सर्व संकटपरंपरा (५) अहंबुद्धि, विपरीतज्ञान, मूर्च्छा इत्यादि प्रसंग आणि (६) विषयासक्ति, हे सहा प्रकारचे दोष जीवा बरोबरच जन्मास आले. पहिल्या चार दोषांनीं जीव बद्ध झाला व पुढील दोन दोषांनीं त्याला विपरीतज्ञान झालें. "भगवंताच्या मायेमुळें त्याला निराळ्याच स्वरूपांत पाहतात." "शरीर मिळालें कीं जीवत्व प्राप्त झालेंच; मग तें ब्रह्माला स्वेच्छेनें मिळो वा जीवाला पूर्वकर्मानें मिळो." या आचार्यांच्या मतानें द्वैतज्ञान हें अविद्येचें कार्य आहे व संसारही अविद्याकार्य आहे, असतही आहे. द्वैतज्ञान व संसार यांचा नाश ज्ञानानें होतो.

हा सर्व मायाप्रपंच झाला. वाचकांनीं कृपा करून इतकें लक्ष्यांत ठेवावें कीं, हीं सर्व मतें व्यावहारिक कार्यापुरतीं म्हणजे भक्ति व उपासना व यांस अनुकूल असणारें कर्म यांच्या स्पष्टीकरणापुरतींच घेतलीं आहेत. असो; या मताच्या काळजी पूर्वक अवलोकनावरून कोणासही असें स्पष्ट दिसून येईल कीं, सगुण ब्रह्माच्या प्राप्तीपर्यंत तरी कोठेंही विसंवाद नाहीं. माझा देह हाच आत्मा आणि येथें मिळणारें जें सुखदुःख तेंच माझें प्राप्तव्य असें वाटणाऱ्या प्रत्येकाचा असा अनुभव असतो कीं जीवित दुःखमय आहे. साधुसंतांचा उपदेश असाच आहे, धर्मही तेंच सांगतो आणि तत्त्वज्ञान याच सिद्धांतांचा युक्तिशुद्ध अनुवाद करितें. तेव्हां आत्मविचारशून्य जीवित दुःखमय आहे, या सिद्धांतांत व आमच्या तत्त्वज्ञान्यांत मतवैचित्र्य नाहीं हें नीटच आहे. अनात्मवस्तूला आत्मवत् मानिल्यानें व तसेंच आचरण केल्यामुळें दुःखपरंपरा जन्मास येते; येथेंही ऐकमत्य आहे. ( हीच शंकराचार्यांची माया होय! ) ही दुःखपरंपरा ज्ञानानें, ज्ञानानुकूल भक्तीनें आणि भक्तिसंवादिनी कर्मानें नाहींशा करितां येईल, यांतही सर्व संमतिच आहे. या पुढचे तात्त्विक प्रश्न आहेत, ब्रह्म काय, जीव काय, जगत् काय? इत्यादि तत्त्वाचें प्रश्न आहेत, यांत मात्र एकता होणें सर्वथा शक्यच नाहीं. हे तिन्ही पदार्थ परमार्थतः मात्र एकच आहेत असें शंकराचार्य म्हणणार, परमार्थतः व व्यवहारतः हे तिन्ही पदार्थ एकच आहेत, असें श्रीवल्लभाचार्य सांगणार; ब्रह्म एकच पण जीव व जगत् हे त्याचे, ब्रह्माचे दोन निरनिराळे प्रकार आहेत, असें श्रीरामानुजाचार्य प्रतिपादणार आणि हे तिन्ही पदार्थ परस्परांहून परमार्थतः व व्यवहारतः अत्यंत भिन्न आहेत, असें श्रीमन्मध्वाचार्य रहस्य प्रकट करणार! व्यवहारांत भेद दिसतो याला कारण माया आहे, असें मात्र सर्वजण म्हणतात! जीवांनीं मुक्त व्हावें, ही श्रीमन्मध्वाचार्यांस अत्यंत कळकळ म्हणून भेद असतांही जीवांनीं देहबुद्धि किंवा विषयबुद्धि धरूं नये, एतदर्थ [illegible] उपदेश करितात कीं, देहबुद्धि किंवा विषयासक्ति यांचा अंगीकार [illegible]

म्हणजे माया उत्पन्न होते; अथवा परमेश्वरीमायेनें आपल्याला देहबुद्धीचा व विषयासक्तीचा अंगीकार करावासें वाटतें! आपल्यास तात्पर्य समजून घ्यावयाचें आहे, तें इतकेंच की, व्यावहारिक आचरणामध्ये सर्वांचें एकसारखेंच मत आहे. ज्या मायावादाप्रीत्यर्थ श्रीमच्छंकराचार्यांस वेदाभिमानी व वेदप्रतिपक्षी हे शिव्यांची लाखोली वाहत आहेत, त्या मायावादासंबंधें सुद्धां सर्व आस्तिक हिंदु तत्त्वज्ञांत व्यावहारिक ऐक्यच आहे.

आतां जीवाकडे वळावयाचें. या जीवाप्रीत्यर्थ तर सर्व शास्त्रें व सर्व धर्म प्रवर्तले आहेत. तत्त्वज्ञानाचें प्रकट होणें व प्रसिद्धि करणें या जीवासाठींच होय. तेव्हां याचें नामरूप ( याचें लक्षण ) याचा आकार, याचा व शरीराचा संबंध, याचा व ब्रह्म, ईश्वर यांचा संबंध, याच्या निरनिराळ्या अवस्था, मृत्यूनंतरची स्थिति, आणि मुक्त झाल्यानंतरची स्थिति इत्यादि विषयांचा विचार करून आणि ज्या शास्त्रप्रवर्तकांच्या मतांमध्यें विमति व संमति पाहत आहोंत, त्यांचा जीवासंबंधानें काय अभिप्राय आहे, हेंही पाहूं या.

## ( अ ) जीवाचें नामरूप.

श्रीमच्छंकराचार्यः—

याला उपनिषदांमध्यें पुरुष, प्रत्यगात्मा, आत्मा, ब्रह्म, क्षेत्रज्ञ ( व्यावहारिक भाषेंत कर्ता, भोक्ता, ) प्राण, इत्यादि अनेक नांवे आहेत. याचें स्वरूप परमार्थतः पाहिलें असतां ज्ञान आहे. हा स्वभावतः अनंत व अकर्मा आहे. परमात्मा हाच जीवात्मा होय. उपाधींच्यामुळें सांत, कर्तृत्वभोक्तृत्वाचें लक्षण असलेला, ज्ञाता, शरीरावच्छिन्न दुःखी, नामरूपात्मक, विकारी, प्राण, इंद्रियें, मनबुद्धि इत्यादिकांनीं संकुचित झालेलासा दिसतो. पण तो वास्तविक पाहतां ब्रह्म आहे. तो अज व नित्य आहे. तो ज्ञान–स्वरूप आहे. तो विभु ( सर्वव्यापी ), शाश्वत, सर्व कारणांचा, इंद्रियांचा स्वामी, आहे. सारांश परमार्थतः तो ब्रह्म आहे. मात्र त्याला अविद्या, कर्म आणि पूर्वसंस्कार यांची उपाधि लागली म्हणजे तो स्वरूप विसरून जाऊन आपल्यास 'जीव' असें मानितो.

## ( आ ) त्याचे आकार व शरीरसंबंध.

परमार्थतः जीव ब्रह्मस्वरूपच आहे. तेव्हां त्याचें नामरूप, आकार इत्यादिकांचा विचार करण्याची आवश्यकता नाहीं. येथें त्याचे आकाराचा विचार त्याच्या सोपाधिक स्थिति पुरताच केला आहे, 'तो अणुपरिमाण, परमाणुपरिमाण, अराग्रमात्र शरीरी, शरीरेंद्रियप्रवर्तक' इत्यादि आकाराचा आहे अशी प्रायः समजूत आहे. शरीराशी त्याचा संबंध पूर्वसंचितानुरूप होतो. संचित संपलें म्हणजे हा शरीरसंबंध सुटतो.

## जीव आणि ब्रह्म.

शांकरमतानें बघितलें म्हणजे जीव आणि ब्रह्म ह्या परमार्थतः वस्तुच दोन नाहींत. ही एकच वस्तु आहे. या उभयतांचा संबंध म्हणजे तादात्म्यसंबंध होय. उपाधीच्या-मुळें जीवावर अज्ञानाचा, दुःखाचा व विकार्यत्वाचा आरोप आलेला आहे. अर्थातच या जीव स्थितींत विचारदृष्टीनें परमेश्वराचें एकनिष्ठेनें आराधन म्हणजे चिंतनपूर्वक ध्यान केलें म्हणजे बंधांत असल्यासारखा जो भ्रम आहे, तो नष्ट होऊन मुक्ति मिळेल. ह्या उपाधिविच्छिन्न आत्म्याची म्हणजे जीवाची कर्तव्यक्षमता परमेश्वर संमतानेंच त्या जीवाच्या पूर्वकर्मानुरूप होत असते. जीवस्थितींतील आत्मा आनंदमूर्ति नसतो. जीवस्थितींतील जीव ब्रह्मापासून निराळा झाल्यासारखा दिसतो. कारण गाढ निद्रेंत व मरणकाळच्या सुषुप्तींत ज्ञानी जीवाभोंवती प्राज्ञ आत्म्याचें म्हणजे ब्रह्माचें आवरण असल्यामुळें ज्ञानी जीवालासुद्धां आंतील बाहेरील, कोणताही विषय दिसत नाहीं. जीवाची म्हणून निराळी उत्पत्ति झाली आहे असें श्रुति केव्हांही म्हणत नाहीं.

### ( इ ) त्याच्या अवस्था.

शांकरमतान्वयें जीवाला म्हणजे ब्रह्माला अवस्थांतरता नाहीं. पण उपाधीनें जीवत्व प्राप्त झालेंसेंच झालें तर जागृतावस्थेंत जीव देहेंद्रियपंजराचा अध्यक्ष असतो. स्वप्नस्थितींत नाडीवर होऊन जीवस्थितींतील वासनांचा उपभोग घेतो आणि पूर्ण शांतिसुखाचा अनु-भव घेण्यासाठीं सुषुप्ति अवस्थेमध्यें या स्थूल आणि सूक्ष्म देहांच्या अभिमाना पलीकडे जाऊन, स्वयंप्रकाश जें ब्रह्म त्यामध्यें येऊन मिसळला म्हणजे ज्ञानीपणा सोडून देतो आणि ज्ञानरूप होतो. स्वप्नामध्यें तो वाटेल तिकडे विहार करण्यासाठीं जातो. मूर्च्छा ही अवस्थात्रयासारखींच आणखी एक अवस्था आहे.

### ( ई ) मृत्यूनंतरची स्थिति.

जीव अमर आहे, ही गोष्ट सर्वसंमत आहे. तेव्हां एक देह सुटल्यानंतर दुसरा देह प्राप्त होतो, तो पहिल्या देहांतील कर्मानुसार म्हणजे हिशेबानेंच होतो. मात्र देहां-तून प्रयाण करणाऱ्या जीवाचें आवरण देहबीजभूत तन्मात्रांनीं केलेलें असतें. हेंच प्राणांचें वसतिस्थान होय. असो; जीव नंतर चंद्रलोकांत जाऊन राहतो व तेथें सत्कर्म-फलांचा उपभोग घेतो. हा फलभोग झाल्यावर तो मृत्युलोकांत म्हणजे कर्मभूमींत स्वानु-शयानुसार ( पूर्वसंचितापैकीं शिलक असलेला भाग ) पुनः जन्म घेतो. ही पुण्यवंताची गोष्ट झाली. पापी लोक असतात ते निम्नहालय जो यमलोक तेथें जातात; आणि स्वदु-ष्कृतानुरूप होणाऱ्या यमयातना तेथें भोगून पुनः परत येतात व अनुशयानुसार पुनः जन्म

घेतात. ब्रह्मज्ञानाच्या मार्गाला जे लागतात, ते मात्र देवयानपथानें सूर्यलोकाप्रत जाऊन पुढें वैद्युन्मार्गानें व परमेश्वराच्या अनुग्रहानें पुनः जन्म घेऊन, पुनः ज्ञानविज्ञान वाढवून शेवटीं ब्रह्मलोकाप्रत जातात. येथून जातांना प्रत्येक जीवाबरोबर प्राण, ज्ञान कर्मेंद्रियें, पापपुण्य, अविद्या आणि पूर्वकर्मसंस्कार ( संचितकर्म ) इतकी सामुग्री दिली जाते. उदकरूपानेंही जीव इंद्रलोकीं जाऊन तेथें पुण्यभोग घेतल्यावर पुनः तो जीव अव्यक्त रूपानें वनस्पतींत अगर उदकांत शिरतो आणि पूर्वकर्मानुसार तेथून जीव-शरीरांत शिरून जन्म घेतो. ही अज्ञानी जीवाची जन्मपरंपरा आहे. ज्ञानी जीवास देहपात होताक्षणींच मुक्ति मिळते. हे ज्ञानी जीव म्हणजे जीवन्मुक्तच होत. येथे जीवस्थितीचा स्थूलमानानें मात्र विचार केला आहे.

## जीवाची मोक्षस्थिति.

जीवन्मुक्त झालेला जीव देहपातानंतर मुक्त होतो म्हणजे ब्रह्म होतो. तो प्रकाशस्वरूप होतो, सर्वव्यापी होतो, सर्वज्ञानरूप होतो, तो सर्वसद्गुण संपन्न होतो, असें जैमिनी आचार्य म्हणतात, तो शुद्धचैतन्यरूप होतो असें औडुलोमी म्हणतात. आचार्य बादरायणांचे मतें हा जीवात्मा ज्ञानरूप व सर्व सद्गुणसंपन्न होतो. तो सत्यसंकल्प आणि सर्वस्वतंत्र होतो. आचार्यांचे मतें ( शंकराचार्यांचे मतें ) तो ब्रह्मरूप होतो. त्याला पुनः जन्म नाहीं. त्याचें जन्ममरण संपलें.

ह्यावरून स्पष्ट लक्ष्यांत येईल कीं, श्रीमच्छंकराचार्यांचें मतें 'जीव ब्रह्मच आहे, तो व ब्रह्म एकच आहेत' असा सिद्धांत आहे. ही परमार्थ स्थिति होय. व्यवहारांत जे जीव आपल्यास दिसतात, ते कमीअधिक मानानें मायेच्या झपाट्यांत सांपडलेले असतात. या स्थितींत त्यांचें ज्ञान अल्प, त्यांचें सुख अल्प, त्यांचें अस्तित्व जन्ममरणांनीं लांच्छित झालेलें, ही स्थिति असते. जीव मूळचा ज्ञानरूप असल्यामुळें, अज्ञानानें गुरफटलेला असतांही 'मी अज्ञानी आहे हें ज्ञान व मी सर्वज्ञ व्हावें' अशी इच्छा प्रबल असते. तो मूळचा 'सुखरूप' असल्यामुळें त्याची निर्मळ सुखप्रीत्यर्थ धडपड सुरू असते. विषयापासून तरी सुख मिळेल असें समजून तो विषयांच्या पाठीस लागतो. तो जातीचा अमर आहे म्हणून आपण चिरंजीव असावें, असें त्यास वाटतें. असो; पण हा जीव अज्ञानवश झाल्यामुळें सर्वज्ञ असतांही अल्पज्ञसा दिसावयास लागतो व त्याला स्वतःही मी अल्पज्ञ आहें, असें वाटतें. यासाठीं त्यानें विश्वाचा अंतर्बाह्य शोध करून आत्मस्वरूप समजून घेण्यासाठीं सद्गुरूची व वेदांची कांस धरावी; एकनिष्ठेनें श्रवणमनन झाल्यावर त्याचें हरवलेसें वाटणारें ज्ञानरूप त्याला मिळेल. जातीचा तो सुखरूपना? पण अज्ञानचक्रांत सांपडल्यामुळें बाहेरून सुखविषय आणून तो तद्द्वारा शांतीसुख मिळविण्याची खटपट करितो आणि फसतो. या करितां वेदांत व शास्त्रांत जें कर्म विहित म्हणून

सांगितलें आहे तें होईल तितक्या निष्कामबुद्धीनें करण्याला आरंभ करावा, निदान तें कर्म भगवदर्पण करावें आणि ईश्वरास आवडेल असा उद्योग करूनही जर अनिष्ट सुखदुःखें प्राप्त झालीं तर भगवदिच्छा म्हणून समाधानांत रहावें. भगवान् म्हणतात, त्याप्रमाणें निर्मान, निर्मोह आणि जितसंगदोष, या आयुधांनीं सज्ज होऊन विनिवृत्तकाम जर आपण झालों, तर आपल्या स्वस्वरूपाचें जें शांतिसुख आहे तें आपोआपच आपल्यास प्राप्त होईल. याचप्रमाणें अमरत्वाचा हिशेब आहे. परमेश्वराचें एकनिष्ठ भजनपूजन, चिंतनध्यान सर्वात्मना होईल, वरील ज्ञान व वरील आनंद यांच्यासह होईल, तर आपलें स्वस्वरूपाचें अमरत्व प्राप्त होण्याला अवकाशच नाहीं. येथें बाहेरून कांहीं मिळावयाचें आहे, असा भागच नाहीं. वस्तु आपलीच, आपल्याजवळ असतांना, हरवलीशी भ्रांतीनें वाटत असते, ती वस्तु आपल्याजवळच आहे, असें स्वरूपज्ञानानें समजून घ्यावयाचें. स्वरूप समजलें कीं ब्रह्मपद मिळतें. स्वरूप हरवलेंसें होऊन आपली मूळची ब्रह्मस्थिति विसरली कीं जीवस्थिति येते. हेंच अज्ञान. याचा नाश ज्ञानानें व्हावयाचा. जीव निराळा, जगत् निराळें व ईश्वर निराळा असा भेदाभेदच आचार्यांस ठाऊक नाहीं. असो; अज्ञानानें आलेली जीवस्थिति घालवावयाची असेल तर वेदांतश्रवणानें परोक्षज्ञान करून घेऊन आणि कर्म, उपासना आणि ज्ञान यांच्या एकनिष्ठ ध्यानुचिंतनानें विज्ञान प्राप्त करून घेऊन ब्रह्मज्ञ व्हावें म्हणजे अपरोक्षज्ञान होतें, साक्षात्कार होतो; म्हणजे अज्ञानानें आलेलें अभ्रपटल नाहींसें होऊन पुनः ज्ञानरूपत्व प्रकट होतें. याप्रमाणें ज्ञानी जीव सद्योमुक्त होतात अथवा अवश्य असेल तेव्हां क्रममुक्तीच्या मार्गानें जातात. प्रत्येक जीव केव्हांना केव्हां तरी मोक्षमार्गाला लागून मुक्त व्हावयाचा आहे ही आनंदाची वार्ता 'मम वर्त्मानुवर्तन्ते' येथें भगवंतांनीं प्रकट केलीच आहे ! !

श्रीमद्रामानुजाचार्य.

**जीवांचीं नांवें:** पुरुष, आत्मा, प्रत्यगात्मा, क्षेत्रज्ञ, कर्ता, भोक्ता व प्राण इत्यादि उपनिषत्प्रणीत नांवें यांसहीं संमतच आहेत. जीव म्हणजे एक व्यक्ति आहे. अशा व्यक्ति अनंत असतात व त्या परस्परांहून सर्वथा विभिन्न असतात. हा जीव परब्रह्माचा अंश आहे व तो परब्रह्माच्या कक्षेंतच नित्य वास्तव्य करणारा आहे. हा जीव स्वरूपानें किंवा व्यक्तिरूपानेंच नित्य राहणार आहे. तो अज, अमर, ज्ञानी, कर्ता, भोक्ता, प्राणपती, इंद्रियमनोबुद्धींचा स्वामी व शाश्वत आहे. त्याच्या सभोंवतीं अज्ञानदशेंत भूत सूक्ष्मांचें अथवा तन्मात्रांचें कडें असतें. जीवांचा आकार सूक्ष्म आहे म्हणजे तो **अणुपरिमाण** आहे. कारण त्याचें वास्तव्य अंतःकरणांत आहे. आणि अंतःकरण अथवा तेथील दहराकाश फारच लहान असतें. श्वेताश्वतरांत असें म्हटलें आहे कीं, केंसाच्या शंभराव्या अंशाचा शंभरावा अंश, हें जीवाच्या आकारमानाचें प्रमाण आहे !

## जीव आणि ब्रह्म.

जीव हा ब्रह्माचा अंश आहे. बरीवाईट किंवा पापपुण्यात्मक कर्मे केल्यामुळें उत्पन्न झालेली जी संस्काररूपी अविद्या, तिला वश झाल्यामुळें हा जीव आपलें ज्ञानीस्वरूप आणि ब्रह्मसेवेचा धर्म हें विसरून जातो आणि आपण जडच आहोंत, जडसंबद्धच आहोंत, असें मानावयास लागतो. त्याचें स्वरूप ज्ञान आहे आणि ब्रह्मसेवा हा त्याचा धर्म आहे. **तो ब्रह्मरूप होणें केव्हांही शक्य नाहीं.** तो ब्रह्माचें शरीर आहे म्हणजे ब्रह्म जीवाच्या अंतर्यामीं राहून त्याचें नियमन करतें. सर्व जीव मिळून ब्रह्माचें चित् नामक ( ज्ञान नामक ) शरीर होतें व जडवस्तु मिळून त्याचें अचिन्नामक ( जड-नामक ) शरीर असते. ' जीवभूतां महाबाहो ! प्रकृतिं विद्धि मे पराम् ' असें भगवानच म्हणतात. जीवाचा ब्रह्माशीं भेदाभेदसंबंध आहे. तो ज्ञानरूप असल्यामुळें ब्रह्माहून अभिन्न आहे. अज्ञानामुळें उपाधि उत्पन्न होऊन तो ब्रह्माहून भिन्न होतो. पुनः जीव अणु आहे, अल्प शक्तिवंत व अल्प ऐश्वर्याचा असा आहे. यांचे नांव भेदाभेदसंबंध होय. तो आनंदरूप आहे, पण ह्या सांसारिक स्थितीत त्याला पूर्ण आनंदाचें भान नाहीं. जीव परतंत्र आहे. परब्रह्म स्वतंत्र आहे.

## जीवाच्या अवस्था.

जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति अशा तीन जीवाच्या अवस्था आहेत. तीनही अवस्थांत जीव उपभोक्ताच असतो. ह्या अवस्थांचें या आचार्योनीं दिलेलें वर्णन प्रायः शंकराचार्यांसारखेंच आहे. मूर्च्छेची जी चवथी अवस्था तीही अर्ध मृत्यूचीच अवस्था आहे, असें हेही आचार्य म्हणतात. मृत्यूनंतरची स्थूलव्यतिरिक्त जीवाची संक्रमण स्थिति तीही उपनिषदानुसारच या आचार्योनीं वर्णिलेली आहे. सत्कर्म असेल तर चंद्रलोकीं जाऊन स्वकर्माचा उपभोग घेणें व भोग संपल्यावर कर्मभूमीवर कोणत्या तरी रूपानें येऊन आपल्या अनुशयानुसार कोणत्या एका कुलांत जन्म घेणें, प्रारब्धानुसार सुखदुःख भोगणें व संचितान्वयें आणि पुरुषकारत्वाच्या जोरावर नवीन कर्म करणें, पुनः मरणें, पुनः जन्म घेणें, हें राहाटगाडगें ज्ञानपूर्वक निष्काम-कर्माचा अतिशय होईपर्यंत चालूं राहतें. वाईट कर्म करणारे जीव यमलोकांत जाऊन तेथें देहदंड भोगितात, पुनः अनुशयानुसार जन्माला येतात, कर्म करितात, मरतात, पुनः जन्माला येतात, हा व्यापार परमेश्वरार्पित निष्कामकर्माचा अतिशय होईपर्यंत चालतो. आणि ज्यानें विहितनित्यनैमित्तिक कर्मं भगवदाराधनपूर्वक करून वेदांतज्ञान व वेदांतउपासना हीं आपलीशीं केलीं, ज्याला ब्रह्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें, तो पुरुष सद्गुरूचा अनुग्रह घेऊन कोणत्यातरी जन्मांत मुक्त होतो. म्हणजे आपलें जें व्यक्तिविषयक ज्ञानस्वरूप तें धारण करून ब्रह्मचिंतनांत मग्न होतो. त्याला ब्रह्मसाधर्म्यही मिळेल, पण **ब्रह्म-तादात्म्य मिळणार नाहीं.** नामरूपापकीकडे

जाऊन व पापविन्मुख होऊन तो शुद्ध ज्ञानरूप व स्वयंप्रकाश होतो. तो या स्थितींत परमेश्वराचें चिच्छरीर असतो, हें मागें सांगितलेंच आहे. हीच मुक्त स्थिति होय.

या सिद्धांतांत जीवस्वरूपासंबंधें मात्र शांकरमताशीं विरोध आहे. बाकी सर्वत्र एकमतच आहे. तेव्हां जीवाचें जें काय मूळचें स्वरूप असेल, त्या स्वरूपाचा मायेनें जो विसर पडतो, तो नाहींसा करून पुनः स्वरूपाप्रत जाण्यासाठीं जीवानें काय केलें पाहिजे, या विषयांत कोठेंही वरील आचार्यद्वयांत मतविरोध नाहीं. तात्पर्य; येथेंही जीवाच्या स्वरूपाशिवाय भांडण्याला दुसरें स्थळ नाहीं.

श्रीमन्मध्वाचार्यः—

यांच्याही विवरणांत जीवाची नावें, त्याच्या अवस्था, त्याची मृत्यूनंतरची स्थिति, यांत मतवैचित्र्य होण्याचा संभव नाहीं. कारण उघड आहे कीं, या गोष्टी उपनिषदांनींच ठरविल्या आहेत. जीवाचें स्वरूप व जीवाला मोक्ष मिळाल्यानंतर त्याची मुक्तस्थिति, यांत मतभेदाचा प्रसंग येणार. तथापि जीवाचें जें मूळचें स्वरूप असतें, त्याचें जें स्वाभाविक स्वरूप असतें, तें त्याला मुक्तस्थितीत मिळतें; याही संबंधानें कोठें विसंवाद नाही. ही व्यवस्था स्वरूपाधिगमाबद्दलचीच आहे असें नाहीं, तर जीवाचें ईश्वराशीं जें नातें स्वाभाविक आहे, त्या नात्यांतही मुक्तस्थितीनंतर फरक पडत नाहीं. पुनः स्वरूपाला जाण्यासंबंधें जे मार्ग सांगितले आहेत, ज्ञान उपासना, कर्म ही जी साधनत्रयी सांगितली आहे, शिवाय चित्तशुद्धीचे जे प्रकार सांगितले आहेत तेही सर्व संप्रदायप्रवर्तकांस सुसंमतच आहेत. एवंच स्वरूप हें साध्य आणि चित्तशुद्धीसह ज्ञानादित्रय हें साधन यांत मतभेद होण्याला अवकाशच नाहीं. एतावता मुख्य वाद राहिला जीवस्वरूप व जीवेश्वरसंबंध याविषयीं. या दोन वस्तूंचा माध्वमतानुसार थोडासा विचार करून पुढच्या मार्गास लागतों.

## जीवस्वरूप.

जीव हें एक पृथक् तत्त्व आहे. तो नित्य, ज्ञाता, अज, अमर, अणु, कर्ता, भोक्ता, परमेश्वरभिन्न, पण त्याचा अंश आहे. जीव अनेक आहेत. जीव व परमेश्वर एक नाहींत. जीव-जीव एक नाहींत व जीव-जगत् एक नाहींत. जीव बुद्धिमनइंद्रियांचा स्वामी व प्रेरक आहे, तो अल्पज्ञ, अल्पसत्ताक आणि अल्पसुखी असा आहे. म्हणजे ब्रह्मा इतकें त्याला ज्ञान नाही, सुख नाहीं व ब्रह्माइतकी त्याची व्याप्तीही नाहीं. तो परमेश्वराचा सेवक आहे व असावा. हें त्याचें मूळस्वरूप आहे. पण अज्ञानवशात् तो परमेश्वराचें भजन सोडून देतो आणि विषयांचें भजन करावयास लागतो. या प्रमाणें विषयवश म्हणजे कर्मवश म्हणजे सुखदुःखवश होतो व जन्ममरणाच्या चक्रांत

सांपडतो आणि बद्ध होतो. पुढें श्रीविष्णूची आराधना, सद्गुरूचा उपदेश व श्रवण-मनन इत्यादिकांच्या सहाय्यानें उपरति झाली म्हणजे तो निष्कामकर्म, निष्काम उपासना व निष्काम ज्ञान संपादून मुक्त होतो म्हणजे स्वरूपप्राप्ति करून घेतो. सालोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता या चार मुक्तींपैकीं एक मुक्ति, त्याच्या कर्म वैचित्र्यानुरूप व ज्ञानसंस्कारानुसार प्रत्येक जीवाला मिळते व तो स्वरूपानंदांत व ईश्वराचें भजनपूजन करित होत्साता भक्त्यानंदांत सुखरूप राहतो. जीवाला मुक्ति मिळते ती परमेश्वराच्या अनुग्रहानें मिळते. यांच्या मतानें 'परस्तु नित्यः पुरुषः प्रकृतिः काल एवच । ...विष्णुः स्वयं नित्यः परात्परः ॥ हीं चार नित्य आहेत. जीव नित्य आहे तरी परमेश्वरापासून तो उत्पन्न होतो, (अर्थात प्रकट होतो, होयना?) असें यांचें मत आहे व ते असें म्हणतातही: उपाध्यपेक्ष्या तेषामुत्पत्तिरपि गीयते । (उपाधिरहीनें त्यांची उत्पत्ति होते असें म्हणावयाचें). जीव अणुपरिमाण आहे, तथापि योगसामर्थ्यानें व ईशकृपेनें बहुव्यापि होतो. याचे बल, तेज, ओज, ज्ञान, आनंद इत्यादि गुण नित्य नाहींत. परमात्मकृपा होऊन स्वरूप मिळालें म्हणजे हे गुण प्रकट होतात. तो कर्ता व भोक्ता आहे पण स्वतंत्र नाहीं, ईश्वरतंत्र आहे. जीवाला नांवें अनेक आहेत. त्यांत 'पुत्रोहं परमात्मनः' (मी ईश्वराचा पुत्र आहे) हें नांव चमत्कृतिजनक आहे.

## मोक्षस्थिति.

स्वरूप प्राप्त झाल्यानंतर हा यथेच्छ सर्व सुखाचा अनुभव घेतो. जे भोग परमात्म्यास मिळतात ते याला मिळतात. सारांश, मनोंद्रियद्वाराच याच्या सर्व ज्ञानक्रिया व कर्मक्रिया होतात, असें जैमिनि म्हणतात. ज्ञानद्वारा जीव सर्व सुखांचा उपभोग घेतो, असें दुसरे पंडित म्हणतात. बादरायण दोहींचाही अंतर्भाव करून 'सर्व भोग ज्ञानरूप जो हरि तद्वारा भोगिले जातात,' असें म्हणतात. मुक्तस्थितींत जीव सत्यसंकल्प होतो. तो केवल सत्यज्ञानपतींच्या स्वाधीन असतो. या मुक्त जीवांचें शरीरही चिदात्मक असतें. मुक्तस्वरूपांत तारतम्य असतें हें वर सांगितलेंच आहे. पण सर्व मुक्तजीवांचें एक काम आहे; आणि तें हें कीं, शुद्ध सुखाचा उपभोग घेत व ब्रह्माचें दर्शन घेऊन त्याचें नित्य चिंतन करित राहावें. या जीवास भौतिक सुखदुःखांचा किंवा गुणदोषांचा लेशमात्रही स्पर्श होत नाहीं. त्याला पुनः जन्ममरण नाहीं.

या मतासंबंधानें विशेष सांगावयाचें कांहीं नाहीं. शुद्धद्वैती जे माध्ववैष्णव यांचा जीव–परमेश्वर–विलक्षण आहे व तो मुक्तस्थितींतही तसाच राहणार, हें मत एकीकडे बाजूला काढिलें म्हणजे सर्वत्र एकवाक्यताच आहे. विषय म्हणजे बाह्य वस्तूंच्या अधिगमानें सुख होवो किंवा 'सुखरूप' झाल्यामुळें सुख होवो, मुक्तस्थितींत परमोच्च आनंद आहे, हें या आचार्यांसही संमत आहे. हीच गोष्ट ज्ञानाची व मरण्याची. त्यांत-

मेश्वराच्या इंद्रियांनीं तो बघतो म्हणून तो सर्वज्ञ झाला काय किंवा ज्ञानरूप झाला म्हणून सर्वज्ञ झाला काय, तात्पर्य एकच आहे. मरणाची म्हणजे विकारांचीही गोष्ट अशीच आहे. विकार पावणाऱ्या व करणाऱ्या सर्व वस्तूंपासून म्हणजे उपाधींपासून तो सुटला म्हणून अमर झाला किंवा तो 'सत्तारूप' झाला म्हणून मरणशून्य झाला, फलितार्थ एकच आहे. जीव मुक्त झाला म्हणजे जन्ममरणांच्या व इतर अनंत उपाधींच्या भोंवऱ्यांतून सुटून जीव स्वस्वरूपाला जाऊन मिळाला व पुनः तें स्वरूप कधींही सुटावयाचें नाहीं, अशी योग्यता प्राप्त होऊन तो स्वस्वरूपाला मिळाला असें होतें. हेंही सर्ववादीलोकांस कबूलच आहे. मग वाद राहिला 'स्वरूपा संबंधानें व संप्रदाया संबंधानें!' एवढ्यासाठींच जर रण माजवावयाचें, तर या दोन गोष्टी व्यवहारांत बाजूला ठेवल्या तर काय हरकत आहे? आतां जीवेश्वर-संबंधाविषयीं एकच शब्द लिहितों व हें द्वैतप्रकरण आटपतों. जीवाचें व ब्रह्माचें स्वरूप एकच असलें तरी मायेची उपाधि असतांना जीवानें साध्य जें ब्रह्म त्याचें ज्ञान करून घेऊन उपासना करावी व त्या उपासनेला निष्काम व निर्लोभ कर्म करित असतांना ब्रह्मचिंतनानें पुष्टि द्यावी, येथेंही सर्वत्र ऐकमत्य आहे. सारांश मायेच्या उपाधींनीं ग्रस्त झालेल्या जीवांचा व परमेश्वराचा संबंध सेव्यसेवकत्वाचा आहे, हें मत कोणासही असंमत नाहीं. मायिक स्थितींत जीव व कर्ता भोक्ता आहेसें वाटतें तरी पूर्वसंचितानुसार व ईश्वरीप्रेरणेनें म्हणजे पूर्वजनित संस्कार आणि ईश्वरप्रेरणा यांच्या बेरीजवजाबाकीनें त्याचें कर्तृत्वभोक्तृत्व विशिष्ट होतें; यावरूनही जीव सर्वथा स्वतंत्र नाहीं, असेंच सिद्ध होतें. उपाधींचें व आत्म्याचें लग्न लागून आत्म्याला जी जीवस्थिति प्राप्त होते तीच जीवाची उत्पत्ति आणि उपाधींचा सर्वथा नाश होऊन जीवाला आत्मस्वरूप प्राप्त होणें हा मोक्ष, असें समजलें व उपाधींशीं लग्न व घटस्फोट, हे संस्कार ईश्वरप्रणीत नियमांच्या अनुद्वारानें होतात, असें ध्यानांत ठेविलें म्हणजे जीवाचीं उत्पत्यादि रूपांतरें ईश्वरच करवितो असें दिसेल. तेव्हां शांकरमताप्रमाणें जीव (मायिक आत्मा) व मध्वमतांत प्रस्थापित केलेला पारमार्थिक जीव, हे एकच आहेत, असें एक क्षणभर वादशांत्यर्थ गृहीत केलें म्हणजे जीवेश्वरसंबंधांत प्रायः विमतच होईल असें नाहीं. सारांश मागें पुष्कळ वेळ म्हटल्याप्रमाणें व्यवहारांत वाद नाहीं. परमार्थांत, अध्यात्मिकांत, वाद आहे तो पंडितांकडे सोंपवून देऊन आपण ऐक्यच प्रस्थापित करूं या.

श्रीमद्वल्लभाचार्यः—

हे आचार्य शुद्धाद्वैती आहेत. एक मायावाद खेरीज करून केवलाद्वैत व शुद्धाद्वैत अथवा वल्लभांच्या पारिभाषिक संज्ञेंत 'मायावाद' व 'ब्रह्मवाद' यांत फारसें वैचित्र्य नाहीं. मतसाम्याचें दिग्दर्शन करण्यासाठीं जीवस्वरूप आणि जीवेश्वर-संबंध या दोन विषयांतील कांहीं गोष्टींचा अवतार करितों. या आचार्यांचें मत 'शुद्धाद्वैतमार्तंड' या नांवाचा एक ग्रंथ मुंबईस प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून समजून घेण्यास फार सुलभ झालें आहे. असो; आतां